# THE

# VEDÂRTHAYATNA

OR

## AN ATTEMPT TO INTERPRET THE VEDAS.

**MARÂṬHÎ AND ENGLISH TRANSLATIONS,**

TOGETHER WITH A SANSKRIT PARAPHRASE,

OF THE

## ṚIGVEDA SAMHITÂ

WITH THE

**ORIGINAL SAMHITÂ AND PADA TEXTS,**

AND NOTES IN MARÂṬHÎ

## VOL. III.

**( Hymns 122-191. )**

*( Registered under Act XXV of 1867 ).*


**Bombay:**

PRINTED AT THE "NIRṆAYA-SÂGAR" PRESS.

*February 1880.*

# वेदार्थयत्न.

## ऋग्वेदसंहिता,

पदांसहित

व

तिचें मराठी आणि इंग्रजी

## भाषांतर,

संस्कृत व्याख्या आणि मराठी टीका.

**भाग २.**

( सूक्त १२२–१९१ ).

---

मुंबईंत

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

---



---

शके १८०१.

फेब्रुआरी १८८० इ०.



## प्रस्तावना.

वेदार्थयत्नाचे दोन भाग संपून तिसऱ्यास आरंभ होण्याच्या या संधीला ऋग्वेदसंहितेचा जो भाग छापून भाषांतरादींसहित वेदार्थयत्नांत प्रसिद्ध झाला आहे, त्याविषयीं कांहीं विचार सुचतात ते आमच्या वाचकांपुढें सादर करणें अवश्य दिसतें.

दुसऱ्या भागाच्या शेवटापर्यंत एकशें एकवीस सूक्तें संपून पहिला अष्टक संपूर्ण झाला. हीं सूक्तें पंधरा ऋषींनीं केलेलीं आहेत. या ऋषींतून जरी प्रसिद्ध असे कोणी दिसत नाहींत, तरी त्यांत विश्वामित्रकुळांतले दोन, कण्वकुळांतील दोन, आङ्गिरसकुळांतील तीन, गोतमकुळांतील दोन, असे चार प्रसिद्ध ऋषिकुळांतील ऋषि आहेत. हे ऋषि कोणत्या देशांतले, आणि एकमेकांपासून किती किती वर्षांच्या अंतरानें होऊन गेलेले हें जरी सांगवत नाहीं, आणि कदाचित् याच पंधरा ऋषींचीं हीं एकशें एकवीस सूक्तें होत अशाविषयीं परंपरागत कथेपेक्षां दुसरें प्रमाण असतें तर बरें झालें असतें असें जरी आहे, तथापि या पहिल्या अष्टकांत असलेलीं एकशें एकवीस सूक्तें निरनिराळ्या ऋषींचीं आहेत आणि तीं प्रायः वर सांगितलेल्या पंधरा ऋषींचींच आहेत असें ह्मणण्यास विशेष बाधा नाहीं. तर या पहिल्या अष्टकांत जो प्रकार आपल्या पाहण्यांत येतो, तो केवळ एक दोन व्यक्तींचा आहे अथवा एक दोन ठिकाणचा अथवा एक दोन

१ मधुच्छन्द वैश्वामित्र, २ जेता माधुच्छन्द, ३ मेधातिथि काण्व, ४ शुनःशेप आजिगर्ति, ५ हिरण्यस्तूप आङ्गिरस, ६ कण्व घौर, ७ प्रस्कण्व काण्व, ८ सव्य आङ्गिरस, ९ नोधा गौतम, १० पराशर शाक्त्य, ११ गौतम राहूगण, १२ कुत्स आङ्गिरस, १३ कश्यप मारीच, १४ ऋज्राश्वादिक वार्षागिर, १५ कक्षीवान् दैर्घतमस औशिज.

विशेष प्रसंगांस अनुलक्षून आहे असें नाहीं; तर वेदाच्या काळीं, म्हणजे वेदसूक्तें ज्या काळीं उत्पन्न झालीं त्या काळीं वेदांत सांगितलेले उपासनांचे प्रचार, रीतिभाती इत्यादि ज्या चालू असत त्यांचा चांगला मासला या पहिल्या अष्टकांत आहे असें म्हणण्यास अडचण नाहीं. वास्तव या पहिल्या अष्टकाविषयीं जें पुढें आम्ही सांगणार आहों, तें बहुतकरून सर्व वेदकालीन आर्यजनांस लागू आहे असें समजावें असें आमचें म्हणणें आहे.

वेदकाळीं ज्या देवांस आर्यजन भजत, त्यांतूनहि बहुतेक देव या पहिल्या अष्टकांत येऊन चुकले आहेत. वेदांत प्रायः तेहतीस देव असल्याविषयीं पुष्कळ ठिकाणीं उच्चार आलेला आहे. ते तेहतीस देव म्हणजे कोणकोणते समजावयाचे, याविषयीं आणि तेहतिसांपेक्षां दहापांच अधिक देव मानीत असत कीं नाहीं याविषयीं जरी थोडा वाद असला (सू.३४मं. ११ आणि त्याजवरील टीप पहा ), तरी पहिल्या अष्टकांत आलेले जे खालीं लिहिलेले तेवीस देव, ते त्या तेहतीस देवांपैकीं मुख्य आहेतः—१ अग्नि, २ वायु, ३ इंद्र, ४ मित्र, ५ वरुण, ६,७ दोघे अश्वी देव, ८ मरुत्(गण), ९ त्वष्टा, १० ब्रह्मणस्पति, ११ सोम, १२ ऋभुगण, १३ सविता, १४-१५ द्यावापृथिव्यौ, १६ विष्णु, १७ पूषा, १८ भग, १९ उषा, २० अर्यमा, २१ रुद्र, २२ सूर्य, आणि २३ अदिति. तेव्हां देवांच्या संबंधानें पाहिलें तरी पहिल्या अष्टकांत जें सांगितलें आहे, त्यावरून वेदकालीन देवांविषयीं आणि धर्माविषयीं आणि उपासनेच्या प्रकारांविषयीं अनुमान करण्यास बरींच साधनें आहेत असें आम्हांस वाटतें.

आतां प्रथमदर्शनीं असें सुचतें कीं वेदाचा अर्थ समजण्यासारिखाच नाहीं अशी जी सर्वसाधारण समजूत आपल्या लोकांमध्यें आहे, तिला वस्तुतः आधार नाहीं. जरी कांहीं मंत्रांचा अर्थ स्पष्ट समजत

नाहीं, आणि वेदासारिख्या अतिपुरातन ग्रंथांमध्यें कांहीं मंत्र दुर्बोध असल्यास विशेष नवल नाहीं, तथापि बहुतेक सर्व भाग समजण्यासारिखे आहेत यांत संशय नाहीं; आणि वेदासारिखा अत्यंत प्राचीन ग्रंथ अत्यंत प्राचीन संस्कृतांत लिहिलेला असतांहि त्याचे बहुतेक भाग जे समजण्यासारिखे आहेत, त्यांचें श्रेय आमच्या वेदपाठक ब्राह्मणांला आणि और्णवाभ, यास्क, दुर्ग, सायण इत्यादिक जे आचार्य यांनीं मिळविलेलें आहे.

या ब्राह्मणांचे आणि आचार्यांचे उपकार आपणांवर केवढे आहेत तें आपल्या मनावर नीट रीतीनें ठसण्याकरितां आपण असें लक्ष्यांत ठेवावें कीं, ब्राह्मणांसारिखेच जे प्राचीन पारसी लोक त्यांचा वेदासारिखाच 'आवस्ता' म्हणून झंद भाषेंत ग्रंथ आहे, तो वेदापेक्षां फार अर्वाचीन असतांहि त्याचे बहुतेक सर्व भाग उच्चाराच्या आणि अर्थाच्या संबंधानें वादग्रस्त आहेत. त्याचें कारण असें कीं, वेदाच्या पाठाचा आणि अभ्यासाचा प्रचार जसा ब्राह्मणांनीं अतिप्राचीन काळापासून अव्याहत परंपरेनें ठेविला आहे, तसा पारसी लोकांमध्यें ठेविलेला नाहीं.

आतां वेदाचा अर्थ समजण्यास परिश्रम लागतात; परंतु आम्हांस वाटतें कीं, परिश्रम लागतात याच कारणामुळें त्याचा अभ्यास लोक करीत नाहींत असें नाहीं, तर त्याचीं कारणें दुसरींहि आहेत. आणि त्यांतून, ज्यांनीं वेदाचें रक्षण पाठादिकेंकरून केलें, त्यांनींच आणि त्यांसारिख्याच लोकांनीं त्याच्या अभ्यासाला अडचणी उत्पन्न केल्या हें एक कारण होय.

वेदाच्या काळीं संस्कृत भाषा बऱ्याच परिपक्व दशेला आली होती. कारण ज्या भाषेंत कविता होतात, आणि त्या तरी एक दोन वृत्तांनींच रचिलेल्या नव्हेत, तर अनेक निरनिराळ्या प्रकारच्या वृत्तांनीं रचिल्या जातात, ती भाषा पक्व दशेला आलेली आहे असें

समजावें हा सिद्धांत वेदास लाविला तर, वेदाच्या वेळीं संस्कृत भाषा उंच दशेला आली होती असें उघड होतें. पहिल्या अष्टकांतच पाहूं गेलें तर त्यांत चोवीस वृत्तें आलीं आहेत. आणि सर्व ऋग्वेदसंहितेंत तर शाहत्तर आहेत.* यांतून कितीएक साधीं वृत्तें असून दुसरीं कितीएक मिश्रित वृत्तें आहेत. परंतु ही परिपक्वता म्हणजे माघ, रघुवंश इत्यादिक अर्वाचीन ग्रंथांत दृष्टीस पडणारी कृतक परिपक्वता नव्हे; कारण ऋग्वेद ज्या भाषेंत लिहिला आहे, ती केवळ विद्वान्, पंडित, कवि, शास्त्री आणि आचार्य इत्यादिकांचीच भाषा नसे, तर सामान्य लोक जी भाषा बोलत, आणि सामान्य लोकांबरोबर वर सांगितलेल्या प्रकारचे लोक ज्या भाषेनें व्यवहार चालवीत, तीं-

*हीं वृत्तें खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत. १अतिधृति. २अतिजगती. ३अतिशक्करी. ४ अत्यष्टिः. ५ अनुष्टुप्. ६ अनुष्टुप् पिपीलिकामध्या. ७ अभिसारिणी. ८ अनुष्टुब्गर्भोष्णिक्. ९ अष्टिः. १० अक्षरैः पङ्क्तिः. ११ आस्तारपङ्क्तिः. १२ उष्णिक्. १३ उपरिष्टाद्बृहती. १४ उष्णिग्गर्भा. १५ उपरिष्टाज्ज्योतिः. १६ उरोबृहती. १७ ऊर्ध्वबृहती. १८ एकपदा. १९ एकपदा जगती. २० एकपदा विराट्. २१ ककुप्. २२ ककुम् न्यङ्कुशिरा. २३ काविराट्. २४ काकुभः प्रगाथः २५ कृतिः २६ गायत्री. २७ गायत्री यवमध्या. २८ चतुष्पदा विराट्. २९ जगती. ३० तनुशिराः. ३१ त्रिष्टुप्. ३२ त्रिष्टुप् (मध्यज्योतिः) ३३ न्यङ्कुसारिणी. ३४ नष्टरूपी. ३५ द्विपदा. ३६ द्विपदा विराट्. ३७ द्विपदा त्रिष्टुप्. ३८ द्विपदा गायत्री. ३९ द्वैपदं (वैराजम्). ४० धृति. ४१ पुरउष्णिक्. ४२ पिपीलिकामध्या. ४३ पुरस्ताद्बार्हतम्. ४४ पङ्क्तिः. ४५ पादनिचृत्. ४६ प्रागाथं बार्हतम्. ४७ प्रतिष्ठा. ४८ प्रस्तारपङ्क्तिः. ४९ पदपङ्क्तिः. ५० प्रागाथं काकुभम्. ५१ प्रतिष्ठा गायत्री. ५२ प्रागाथम्. ५३ पङ्क्त्युत्तरा. ५४ बृहती. ५५ महाबृहती यवमध्या. ५६ बृहती पिपीलिकामध्या. ५७ महापङ्क्तिः. ५८ महाबृहती. ५९ महापदपङ्क्तिः. ६० महासतोबृहती. ६१ मध्येज्योतिः. ६२ विराट्. ६३ विराट्स्थाना. ६४. विराड्रूपा. ६५ विष्टारबृहती. ६६ विराट्स्थाना त्रिष्टुप्. ६७ विराड्रूपा सतोबृहती. ६८ विराट्पूर्वा. ६९ वर्धमाना. ७० विपरीता सतोबृहती. ७१ विषमपदा बृहती. ७२ विष्टारपङ्क्तिः. ७३ शक्करी. ७४ सतोबृहती. ७५ स्कन्धोग्रीवी बृहती. ७६ द्वासीयसी.

त हीं ऋग्वेदाचीं सूक्तें साधारण लोकांस समजत अशा रीतीनें उघड शब्दांनीं आणि विशेष अलंकारांविरहित लिहिलीं आहेत. कालिदासानें आपलीं काव्यें आणि नाटकें रचिलीं तीं विद्वान् मंडळीसाठींच रचिलीं. साधारण लोक कालिदासाच्या वेळीं सुद्धा संस्कृत भाषा जाणत नसत. परंतु हिरण्यस्तूप, कुत्स, पराशर, इत्यादिक जे ऋग्वेदसूक्तांचे कर्ते, त्यांणीं आपापलीं सूक्तें लोकव्यवहारांत चालू असलेल्या भाषेंत लिहिलेलीं आहेत. ही गोष्ट वेदाच्या भाषेंत समास बहुतकरून येत नाहींत यावरून, आणि आले तर फार लहान आणि सोपे असतात यावरून; भाषेमध्यें कृतक अलंकार कांहीं नाहींत यावरून; व कवितेंत योजिलेले शब्द प्रायः लोकव्यवहारांतील साधे आणि सोपे आहेत, इत्यादिक प्रमाणांवरून सिद्ध होते. वेदसूक्तांची कविता जरी रघुवंशासारिखी मधुर नाहीं अथवा नैषधासारिखी श्लेषाढ्य नाहीं, तरी ती साधी, सुंदर, सहजोक्तिसंपन्न आणि निष्कपट अर्थगौरवांनीं भरलेली आहे. तींत जरी कालिदासासारिख्या सुंदर उपमा नाहींत, तथापि उषा (प्रातःकाळचें अरुण वर्णाचें तेज), वरुण (रात्रिरूप देव), सविता (सूर्यरूप देव) इत्यादिक सृष्ट पदार्थांचीं आणि तेजांचीं अत्युत्तम वर्णनें त्यांत भरलीं आहेत.

वेदाच्या संबंधानें लोकांची समजूत अशी आहे कीं, वेदसूक्तांचे द्रष्टे अथवा कर्ते जे ऋषि, ते गिरिगह्वरीं राहणारे विरक्त मुनि असत, ते संसार करीत नसत, त्यांस घरादाराची अवश्यकता नसे, त्यांस द्रव्याची इच्छा नसे, त्यांस या जगासंबंधी कशाचीच काळजी नसे, ते सतत शांतीनें, क्षमेनें आणि दयेनें आर्द्र असत, दुसऱ्याचें वाईट इच्छीत नसत, आणि ते नित्य तपश्चर्येमध्यें निमग्न असत, त्यांचे आंगीं तपश्चर्येच्या योगानें विलक्षण दिव्य शक्ति येत असे, ते शाप देऊन भस्म करूं शकत, ते केवळ 'भूदेव' या पृथिवीवर अवतरलेले

असत, ते चिरायु असत, त्यांच्या मनांत जर सूर्यानें अमुक वेळीं उगवावें अथवा अमुक वेळपर्यंत मावळूं नये असें आलें आणि त्याप्रमाणें त्यांनीं सूर्यास आज्ञा केली, तर सूर्य ती आज्ञा मोडीत नसे; सारांश, सकळ देव आणि सकळ त्रैलोक्य त्यांचे हातीं असे.

पण जो ऋक्संहितेचा भाग प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून उघड दिसून येतें कीं, ऋषि म्हणजे कवि; आणि ज्यांनीं वेदाचीं सूक्तें पाहिलीं ( दृष्ट ) अथवा रचिलीं, ते साधारण लोकांपैकींच असत. ते गिरिगह्वरीं राहत नसत, तर गांवें आणि शहरें यांत घरदार करून संसार चालवून राहत असत; ते आपलीं घरेंदारें मोठ्या औत्सुक्यानें आणि प्रेमानें संभाळून राहत असत; त्यांच्या संसारास ज्या वस्तु लागत असत त्यांच्या प्राप्तीसाठीं ते हरतऱ्हेनें झटत असत; आणि खावयास अन्न, आणि धनसंपत्तीचा उपभोग हीं आपणास प्राप्त व्हावीं म्हणून ते देवांची प्रार्थना करीत असत; ते आपणास धन मिळावें म्हणून सदैव प्रयत्न करीत असत आणि प्रार्थना करीत असत; ते या जगासंबंधीं सुखें आपणास प्राप्त व्हावीं आणि दुःखें नाहींशीं व्हावीं म्हणून प्रयत्न करीत, आणि देवांस त्यानिमित्त फार आळवीत; ते सतत शांत आणि दयार्द्र नसत, तर अनार्य शत्रूंशीं नित्य लढत असत आणि त्यांचा नाश होओ, आणि आपलें कल्याण होओ, त्यांचा युद्धांत पराभव होओ आणि आपला जय होऊन आपणास त्यांची संपत्ति लूट मिळो, असें ते प्रार्थीत असत; ते नित्य तपश्चर्येमध्यें निमग्न नसत, तर संसारांतच राहून देवभक्तिपरायण असत, संसारासंबंधी जीं अनेक कार्यें, तीं ते मोठ्या तत्परतेनें आणि आसक्तीनें करीत; तपश्चर्येच्या अथवा यज्ञादिक भक्तिप्रचारांच्या योगानें त्यांस कोणतेंहि अमानुष अथवा दुसरें सामर्थ्य प्राप्त होत नसे; ते शाप देऊन कोणास भस्म करीत नसत, आणि आपण शाप दिला तर दुसऱ्याचें वाईट होईल

आणि आशीर्वाद दिला तर कल्याण होईल असें ते मानीत नसत. ते आपण 'भूदेव' आहों असें मानीत नसत. तर आपण बळहीन, दीन, आणि पापी मर्त्य आहों असें समजत असत. ते आपल्या सत्तेनें सूर्यादिकांस थांबवीत नसत अथवा चालवीतहि नसत. ते आम्हांप्रमाणें अतिशय अल्पायु असत, आणि ते जर शंभर वर्षें जगले तर आपलें मोठें भाग्य असें मानीत असत, आणि आपण शंभर वर्षें जगावें अशी प्रार्थना करीत असत. ते आपल्या आंगीं कांहीं शक्ति अथवा पवित्रता अथवा श्रेष्ठता आहे असें समजत नसत. त्यांस पुत्रपौत्र आवडत असत, आणि ते विशेषेंकरून शूर आणि सामर्थ्यवान् आणि बुद्धिमान् आणि युद्धांत यशस्वी होणारे असे असावे म्हणून ते प्रार्थना करीत असत. त्यांस गुरेंढोरें, रथ, आणि विशेषंकरून घोडे असावे, आणि त्यांनीं आपणाकरितां शर्यती जिंकाव्या असें ते प्रार्थीत असत. ते मोठ्या पहाटेस उठून अग्नि प्रदीप्त करून इंद्रादि देवांस प्रसन्न करण्याकरितां प्रतिदिनीं हवि अर्पण करीत असत. अर्पण करावयाच्या पदार्थांमध्यें सोम, दुधाचे केलेले पायसादि पदार्थ, आणि जव अथवा सातू या धान्याचा पुरोडाश अथवा कण्या आणि मांस हे चार मुख्य असत असें दिसतें. तांदुळाचें (तण्डुल हें) नांव सगळ्या ऋग्वेदसंहितेंत कोठें आलेलें नाहीं. त्याप्रमाणें गव्हांचेंहि (गोधूम हें) नांव कोठें आलेलें नाहीं. 'तण्डुल' हें नांव अथर्वसंहितेंत मात्र एका ठिकाणीं आलें आहे, आणि 'गोधूम' हें तैत्तिरीय संहितेंत आलें आहे. वेदकाळींचे लोक साधे भोळे होते, आणि आम्हां आधुनिक मर्त्यांप्रमाणेंच पापी आणि दुर्बल होते. पण ते शूर असत आणि आपल्या आसपास राहत असणाऱ्या अनार्य अथवा रानटी लोकांशीं नित्य लढत असत. ते देवांचीं देवळें बांधीत नसत, आणि त्यांच्या मूर्तिंहि करीत नसत असें दिसून येतें. त्यांची पूजा करण्याची रीति म्हटली म्हणजे अग्नीला पेटवून त्यांत देवांप्रीत्यर्थ तुपाच्या आहुति आणि

वर सांगितलेल्या चार पदार्थांचें केलेलें हवि टाकणें ही असे. त्याला ते 'यज्ञ' असें म्हणत. आधुनिक काळीं ज्याला आपण यज्ञ म्हणतों, तसा लांबलचक आणि फार दिवसपर्यंत करावयाचा असा यज्ञ अतिप्राचीन काळीं नसे. प्रतिदिनीं, प्रातःकाळीं, मध्याह्नीं आणि सायंकाळीं ते सोम काढून देवांस अर्पण करीत आणि त्यांची स्तुति गात. याला ते तीन 'यज्ञ' अथवा तीन 'सवनें' असें म्हणत. केव्हां केव्हां नुस्ती स्तुतिच गाइली तरी त्यालाहि ते 'यज्ञ' असें म्हणत असत.

ऋग्वेदसंहितेंत सर्वत्र असें दृष्टीस पडतें कीं, तींतील ऋषि अथवा सूक्तकर्ते कवि देवापाशीं आपणांस संपत्ति, गाई, घोडे, आणि शूर पुत्रपौत्र आणि युद्धांत यश आणि शत्रूची संपत्ति लूट हीं आपणास मिळावीं असें प्रार्थीत असत. यज्ञ करून देवांस प्रसन्न करणारे जन धार्मिक होत आणि यज्ञ न करणारे अधार्मिक होत असें ते नित्य म्हणत, आणि अधार्मिकाचें धन आपणास प्राप्त होओ अशाहि प्रार्थना थोड्या आहेत असें नाहीं. या ऋक्संहितेंत ब्रह्मज्ञानाविषयींचे भाग थोडे आहेत, बहुतकरून सर्व भाग प्रार्थनाबद्धच आहेत, आणि ती प्रार्थना प्रायः वर सांगितलेल्या प्रकारची असते. यावरून हे आर्य लोक जेथें राहत त्या प्रदेशांत आसपास देवांस न भजणारे असे अनार्य जन बहुत असत, आणि ते त्यांस वारंवार यज्ञादिक धर्मकर्मांविषयीं प्रत्यवाय आणीत, आणि त्यांस अनेक प्रकारांनीं त्रास देत असत असें दिसून येतें. तर हे आर्य कोणत्या प्रदेशांत होते? याविषयीं निश्चयानें अजून सांगवत नाहीं; कारण झालेल्या भागांतच नव्हे, पण ऋक्संहितेंत कोठेंच स्थानिक संबंधाचे निर्देश फारसे आले नाहींत. म्हणजे जुन्या राजांचीं, भक्तांचीं, अथवा ऋषींचीं नांवें पुष्कळ आलेलीं आहेत, आणि अमुक देवानें अथवा देवांनीं अमुक भक्तावर अमुक उपकार केला असें पुष्कळ

ठिकाणीं सांगितलें आहे, पण त्या वेळच्या शहरांचीं अथवा देशांचीं अथवा नद्यांचीं, अथवा पर्वतांचीं, अथवा प्रदेशांचीं किंवा लोकांचीं नांवें फारच थोड्या ठिकाणीं आलीं आहेत; त्यामुळें आर्य लोकांविषयीं स्थाननिर्णय करण्यास जितकीं साधनें पाहिजेत तितकीं अजून उपलब्ध नाहींत. मात्र कितीएक नद्यांचीं नांवें कितीएक ठिकाणीं आलीं आहेत, त्यावरून हे आर्य लोक वेदकाळीं पंजाबच्या पलीकडे काबुलाजवळ अथवा फारच झालें तर पंजाबांत असावे असें अनुमान निघतें. पण त्याला अजून जितकीं सुदृढ प्रमाणें पाहिजे आहेत, तितक्यांचा शोध लागावयास वेळ लागेल.

स्थाननिर्णयाप्रमाणेंच वेदकालीन आर्यांच्या कालनिर्णयाविषयींहि म्हटलें पाहिजे. तूर्त इतकेंच म्हणणें योग्य दिसतें कीं, ह्यांतून कितीएक सूक्तें रचिलीं गेलीं त्याला पुष्कळ हजार वर्षें गेलीं असावीं. हा वेदग्रंथ आधुनिक नव्हे, अत्यंत प्राचीन आहे. पण त्याला पांच हजार वर्षें झालीं किंवा अधिक किंवा कमी झालीं, त्याविषयीं चांगली अटकळ सुद्धा करतां येत नाहीं. मात्र ऋग्वेद फार प्राचीन आहे असें म्हणण्यास झालेल्या एक अष्टकांतहि पुष्कळ प्रमाणें मिळतील. त्यांत सांगितलेल्या गोष्टी, लोकांच्या रीतिभाती, चाली, आणि आर्य जनांच्या स्थिति इतक्या प्राचीन दिसतात कीं, वेदासारिखा प्राचीन ग्रंथ आर्य लोकांच्या ग्रंथांत तर नाहींच, पण दुसऱ्या लोकांच्याहि ग्रंथांत असेल कीं नाहीं याविषयीं आम्हांस फारच संशय दिसतो. परंतु वेदाच्या कालाविषयीं निर्णय करण्यापूर्वीं सर्व वेदांच्या सर्व संहिता, सर्व ब्राह्मणें, सर्व आरण्यकें, आणि वेदसंबंधाचे जे दुसरे पुष्कळ अति मोठमोठे ग्रंथ आहेत, त्यांचा अभ्यास आणि विचार झाला पाहिजे एवढेंच नव्हे, पण वेदकाळाच्या आलीकडचे असें ज्या ग्रंथांविषयीं आपण मानितों,

ते असंख्य ग्रंथ शोधून त्यांचें मथन झालें पाहिजे. जसें एकादा पुरातन पुरुष केव्हां होऊन गेला हें दाखविण्याला त्याचे वंशज किती होऊन गेले, आणि ते प्रत्येक किती किती वर्षें जगले, हें जाणणें आवश्य आहे, तसें वेदाआलीकडच्या ग्रंथांविषयीं जर कालनिर्णय होऊं लागेल, तर वेदाविषयीं कालनिर्णय होण्याचे दिवस जवळजवळ येऊं लागतील. या सर्व कामाला तूर्त पाश्चात्त्य पंडितांनीं बरीच कंबर बांधिली आहे; पण त्यांच्यापेक्षां आमच्या विद्वानांला या प्रकरणांत यशस्वी होण्याचीं साधनें विशेष आहेत आणि संभवहि अधिक आहे हें प्रायः कोणीहि कबूल करील. यासाठीं वेदाविषयीं लोकांची जिज्ञासा तूर्त आहे त्यापेक्षां पुष्कळ मोठी वाढली पाहिजे, आणि ती केवळ वेदामध्यें काय आहे इतकें जाणून घेण्यापुर्तीच असून उपयोग नाहीं, तर ती वेदासारिख्या अत्यंत प्राचीन ग्रंथाच्या अभ्यासापासून जे लाभ व्हावयाचे, ते करून घेण्याच्या संबंधानें वाढली पाहिजे.

ऋग्वेदासारिखा अत्यंत प्राचीन ग्रंथ समजावयास कठिण असला म्हणून नवल नाहीं; परंतु वस्तुतः त्याच्या कालाकडे पाहिलें तर जितका कठिण असावा तितका तो कठिण नाहीं ही एक सुदैवाची गोष्ट समजली पाहिजे. वेदाच्या संबंधानें जे देव येतात ते किती, आणि त्यांतून मुख्य मुख्य देवांचें स्वरूप काय काय आहे, आणि प्रत्येकाचे मुख्य मुख्य पराक्रम कोणकोणते, तें समजलें म्हणजे बहुतकरून पुढचे भाग सोपे जानात. उदाहरणार्थ, इंद्र हा एक प्रमुख देव आहे. त्यानें वृत्रासुराला, म्हणजे जमिनीवर पाऊस न पडूं देणारा आणि सूर्याचा प्रकाश आकाशांतच लपवून ठेवून खालीं न येऊं देणारा जो मेघरूपी शत्रु, अथवा ढग, त्याला आपल्या वज्रानें फोडून, म्हणजे त्याजवर विजेचा प्रहार करून, उदकांच्या धारा खालीं वाहविल्या, आणि सूर्याचें तेज भूमीवर पडे असें केलें; तो

सोम पिण्याविषयीं फार उत्सुक असतो; त्याचे साहाय्यकर्ते 'मरुत्' देव म्हणजे वारा वाहविणारे जे वायुरूपच देव, ते होत; (म्हणजे पाऊस जो जो कोणी पाडील, त्याला ढगांस हाकून आणणारा देव साहाय्य करितो ही कल्पना स्वाभाविक आहे); तो सकळ पृथिवीला आणि द्युलोकाला आणि अंतरिक्षाला उत्पन्न करणारा होय. ह्या गोष्टी एकदा समजल्या म्हणजे इंद्राविषयींचीं सूक्तें सहज समजूं लागतात. त्याप्रमाणेंच अग्नि हा मनुष्यांकडेस येणारा देवांचा दूत होय; म्हणजे त्याच्या ठायीं मनुष्यांनीं अर्पिलेलीं हव्यें तो घेऊन देवांजवळ प्रविष्ट करितो आणि देवांची कृपा मनुष्यांवर करवितो. अग्नि म्हणजे केवळ भूमीवर पेटवितात तोच नव्हे, तर विजेच्या रूपानें आकाशांत उत्पन्न होणारा, सूर्याच्या प्रखरतेजोरूपानें द्युलोकांत जळत असणारा, आणि दावाग्नीच्या रूपानें मोठमोठीं अरण्यें जाळून टाकणारा, प्रातःकाळीं सौम्य उषेच्या सुंदर रूपानें उगवणारा जो प्रकाश आणि ताप, तोहि अग्निच होय; तो प्रत्येक घरीं प्रातःकाळीं पेटविला जातो म्हणून तो घरोघर नित्याचा पाहुणाच जणुं होय; तो देवांला प्रसन्न करितो त्यापेक्षां देवांचा धांवा करणारा तो होताच, म्हणजे कविच होय, असा मानिला जातो. ह्या गोष्टी अग्नीविषयीं एकदा समजल्या म्हणजे अग्नीविषयींचीं सूक्तें समजूं लागतात. तसेंच उषा म्हणजे प्रभातकाळीं सौम्य कांतीच्या रूपानें उगवणारी सूर्याची प्रभा, ती प्रत्यहीं पहांटेस सुंदर तरुण स्त्रीप्रमाणें उंची वस्त्रें आणि अलंकार घालून शोभिवंत होऊन येते, आणि सकळ जगताला जागें करून प्रत्येकास आपआपल्या कामीं पाठविते, आणि ती येतांच पक्षी जागे होऊन गावयास लागतात, भक्तजन स्तोत्रें म्हणून देवभजनीं तत्पर होतात, आणि हव्य देऊं लागतात, आणि रात्रभर जणुं मरून पडलेले सर्व प्राणी पुनः जीवंत होतात, हें उषेचें स्वरूप एकदा समजलें म्हणजे

उषेविषयींचीं सूक्तें समजूं लागतात. आणि सविता म्हणजे सूर्यरूपीच देव, तो सतत चालत असतो आणि प्रतिदिनीं सकाळीं येतो; तो येण्याच्या पूर्वीं सकळ जग अंधारमय असतें. आणि तो येतो तो जणूं अंधारानें व्याप्त अशा प्रदेशांतूनच येतो, आणि जेथें प्रकाश नाहीं तेथें प्रकाश उत्पन्न करितो ('केतुं कृण्वन्नकेतवे'), आणि जेथें नांव रूप कांहीं नाहीं तेथें पदार्थांचीं रूपें दृष्टीस पाडितो ('पेशः कृण्वन्नपेशसे'); इत्यादि स्वरूप सवित्याचें एक वेळ समजलें म्हणजे मग सवित्याविषयींचीं सूक्तें समजावयास लागतात. याप्रमाणेंच इतर देवांविषयीं आहे, आणि याप्रमाणें वेदाच्या दुसऱ्याहि भागांविषयीं आहे. यामुळें आणि वेदाचा अर्थ समजावा म्हणून आपल्या वाडवडिलांनीं करून ठेविलेलीं जीं निरुक्त, नैघंटुक, भाष्य इत्यादिक मोठ्या महत्त्वाचीं साधनें, त्यांच्या योगानें, वेदाचा अर्थ दुर्लभ नाहीं हें मोठें भाग्य समजलें पाहिजे, आणि आर्य लोकांच्या प्राचीन स्थितीचा अभ्यास त्यांच्या ग्रंथांवरून करूं इच्छिणाऱ्या हिंदु लोकांस अभिनंदनीय होय, आणि त्यांस उत्तेजन देण्यासारिखें आणि वेदाभ्यासाच्या व्यासंगाविषयीं त्यांच्या आंगीं उत्साह उत्पन्न करण्यास योग्य होय.

वेदांत एका वस्तूचें मोठें माहात्म्य आहे. ती वस्तु सोम होय. सोम हा देवांस पाजीत आणि वेदकाळचे आर्यजन आपणहि पीत. सोमपानापासून देवांला अत्यंत हर्ष, अत्यंत आनंद, अत्यंत साहस, अत्यंत बळ आणि अत्यंत उत्साह प्राप्त होतो, असें जिकडे तिकडे सांगितलें आहे. सोमाला नववें एक समग्र मंडल अर्पिलें आहे. तें सोमाविषयींच आहे. सोमाचें मोठें माहात्म्य वर्णिलें आहे. यावरून, ग्रीस आणि इटली वगैरे प्राचीन काळीं मद्य पीत, आणि शाक्त लोक अर्वाचीन काळीं जसें मद्य पितात, आणि पराधीन होतात, तसें हें वेदकाळींचें 'सोम' नांवाचें मद्य आर्यजन पिऊन पराधीन होत असत असें

कितीएक मानितात. पण आम्हांस वाटतें कीं, हे प्राचीन आर्य लोक देवांस पाजावयाचा सोम आपण स्वतः पीत होते हें जरी निःसंशय खरें आहे, तरी पिऊन पिऊन पराधीन होईपर्यंत ते पीत नव्हते यांत कांहीं संशय नाहीं. किंबहुना त्यांच्या स्वताहाच्या पिण्याविषयीं फारच थोड्या ठिकाणीं सांगितलें आहे. देवांच्या पिण्याविषयीं मात्र अनेक ठिकाणीं उच्चार येतात. आतां सोम हें एक प्रकारचें मद्य असे, आणि त्यांत गाईचें दूध वगैरे घालून तें मसालेदार करीत, आणि आर्य लोक आपण पिऊन देवांलाहि अर्पण करीत, याविषयीं मात्र कांहीं संशय दिसत नाहीं. सोमाचें महत्त्व शेवटीं येवढें वाढलें कीं, त्याला देव मानून इतर देवांप्रमाणें त्यालाहि भजूं लागले.

पण सोमाच्या, तुपाच्या, आणि पुरोडाशाच्या आणि मांसाच्या आहुति अग्नींत देवांप्रीत्यर्थ टाकणें याशिवाय, आणि स्तोत्रें करून त्यांच्या योगानें देवांची कीर्ति गाणें याशिवाय, आराधनेचे अथवा भजनाचे दुसरे प्रकार वेदाच्या अतिप्राचीन काळीं आधुनिक काळाप्रमाणें चालू होते असें दिसत नाहीं. उदाहरणार्थ, फळें, पुष्पें, नैवेद्य इत्यादिक देवांनिमित्त कशावर तरी टाकणें अथवा कशाच्या तरी पुढें ठेवणें हें त्या वेळचे लोक आचरीत असें दिसत नाहीं.

ऋग्वेदांत सांगितलेले बहुतेक सर्व देव म्हटले म्हणजे कशाचे तरी अभिमानी देव होत. उदाहरणार्थ अग्नि म्हणजे जगतांत जो जो म्हणून ताप अथवा कोणतेंहि तेज, तदभिमानी म्हणजे तद्रूप देव होय. वरुण म्हणजे रात्रीचा अभिमानी देव, म्हणजे रात्रिरूपच देव. इन्द्र म्हणजे आकाशांतून भूमीवर पाऊस पाडणारी जी शक्ति, तदभिमानी देव. सविता म्हणजे सूर्याचा अभिमानी देव, म्हणजे सूर्यरूपच देव. मित्र म्हणजे दिवसाभिमानी देव, म्हणजे दिवस जो तद्रूपच देव. मरुत् म्हणजे वादळें जीं, त्यांचे अभिमानी देव, म्हणजे वादळें जीं, तद्रूपच

देव. द्यु म्हणजे अंतरिक्षावरील प्रकाशानें व्याप्त जो निःसीम प्रदेश, त्याचा अभिमानी देव, म्हणजे द्युरूपच देव. तो नवरा आणि पृथिवी-ही त्याची स्त्री. द्यू आणि पृथिवी हीं सर्व देवांचीं मातापितरें होत असें सांगितलें आहे. आणि हें रूपक स्पष्टच आहे. कारण सविता, वरुण, उषा इत्यादिक जे देव, ते द्यावापृथिवीच्या उदरांत म्हणजे ह्या दोहोंमधील जी पोकळी, तींत उगवतात म्हणून त्यांचे पुत्र असें त्यांस म्हणतात. याप्रमाणेंच उषेला द्यूची कन्यका असें म्हणतात. द्युलोक, पृथिवी, आणि अंतरिक्ष इत्यादिक जो अवकाश अथवा पोकळी, तिला अदिति अथवा अखंड पोकळी असें म्हणून तिला देवी मानिली आहे. याप्रमाणें वेदांतील बहुतेक सर्व देव रूपकसिद्ध आहेत. पण ज्यांला 'देवता' असें अनुक्रमणिकादिक ग्रंथांत म्हटलें आहे, ते सर्वच 'देव' नव्हत. अमुक ऋचेची 'देवता' अमुक म्हणजे ती ऋचा ज्या वस्तूविषयीं असेल, ती वस्तु. जसें कितीएक ऋचा 'उलूखला'-विषयीं म्हणजे उखळाविषयीं आहेत, त्या ऋचांची 'देवता' उलूखल. यावरून उलूखल 'देव' होय असें झालें नाहीं, तर उलूखलाला कवितासंबंधानें सचेतन मानून त्याविषयीं निर्देश केला आहे. या रीतीनें देवतांचा विचार केला म्हणजे त्यांत 'देव' अथवा 'देवी' थोड्याच राहतात. उरलेल्या देवता कवींच्या आलापांत अचेतन असतांना सचेतन मानिलेले पदार्थ, या नात्यानें विरघळून आपल्या देवत्वाप्रत मुकतात. यांचीं प्रमुख उदाहरणें म्हटलीं म्हणजे वर सांगितलेलें 'उलूखल,' यज्ञशाळेचीं 'द्वारें' (द्वारो देव्यः), 'यूप' अथवा यज्ञस्तंभ (वनस्पतिः), 'बर्हि' म्हणजे दर्भ, उषा, रात्र, 'स्वाहा' म्हणजे आहुति देतांना 'स्वाहा' असा म्हणावयाचा उद्गार, आपो देवी अथवा आकाशांतून पडणारीं मेघोदकें इत्यादि.

बाकी उरलेल्या देवांतून बहुतेक देव वेदोत्तरकालीन, म्हणजे

पुराणादिक ग्रंथांत प्रसिद्ध आहेतच. पण त्यांचें स्वरूप थोडेंबहुत बदललेलें आहे; आणि ज्यांना वेदाच्या ऋषींनीं 'देव' तर नाहींच पण 'देवता' सुद्धा म्हटलें किंवा केलें नाहीं, ते इतर देवांमध्यें येऊन मिसळले आहेत. स्वरूप बदलल्याचीं उदाहरणें:—'मरुत्' हे वादळाचे देव असत. अर्वाचीन ग्रंथांत 'मरुत्' म्हणजे साधारण देव झाले, आणि वेदांत 'मरुत्' हे इंद्राचे सखे अथवा मित्र होत असें सांगितलें आहे, पण आलीकडेस इंद्र सकळ देवांचा राजा आणि सकळ देव त्याची प्रजा असें झालें आहे. वरुण हा वेदांत मोठा देव असें प्रतिपादन केलें आहे, आणि तो मनुष्यांनीं केलेलें पाप पाहतो आणि त्याजबद्दल पारिपत्य करितो. तो इंद्राप्रमाणें जगतावर राज्य करितो इत्यादि. पण वेदोत्तरकालीन ग्रंथांत, म्हणजे पुराणादिकांत, वरुण हा केवळ पाताळचा राजा होऊन बसला आहे. अदिति ही जी महा अवकाशाची देवता, जिच्या उदरीं सविता, वरुण, मित्र, पूषा, अर्यमा हे नित्य जन्म घेतात म्हणून त्यांस 'आदित्य' म्हणतात, ती पुराणादिक ग्रंथांत केवळ सर्व देवांची माता होऊन बसली, आणि शिवाय ती कश्यपाची स्त्री झाली, आणि 'दिति' म्हणून पौराणिकांनीं कश्यपास दुसरी स्त्री करून दिली, तिच्याशीं ती सापत्नभाव करणारी सामान्य स्त्री होऊन बसली.

अश्वी म्हणून जे देव वेदांत प्रसिद्ध आहेत, आणि जे सकळ दुःखितांस साहाय्य करणारे आणि प्रतिदिनीं प्रातःकाळीं उषेमागून येणारे, ते पुराणादिक अर्वाचीन ग्रंथांत 'अश्विनीकुमार' या नांवाचे दोन वैद्य झाले, आणि त्यांस देवांला औषध द्यावें आणि बरें करावें इतकेंच काम नेमून दिलें गेलें. इंद्र देव जो सकळ देवांमध्यें श्रेष्ठ, अत्यंत बळवान्, महाप्रतापी, महातेजस्वी, महाशूर, वृत्रादिक असुरांला आपणच मारून टाकणारा, ज्याच्या योगानें द्युलोक आपल्या

ठिकाणीं राहतो, आणि पृथिवी आपल्या ठिकाणीं अचल राहते, तो पौराणादिक आणि आधुनिक काळीं साधारण एक देव झाला; आणि रावणासारिखा यःकश्चित् राक्षस जर बळावला आणि थोड्याशा हिंदू लोकांस त्रास देऊं लागला, तर त्याचाहि नाश करण्याची शक्ति त्याला राहिली नाहीं, आणि, त्याच्या नाशार्थ वेदांत अगदीं अप्रसिद्ध (किंबहुना निजरूपानें अज्ञात ) असा जो विष्णु, त्याला त्यानें सर्व देवांस घेऊन शरण जावें, आणि त्याजकडून भूमीवर अवतार घेववावा, इतका तो निर्बळ होऊन बसला! रुद्र जो आपल्या कृपेनें आणि औषधानें मनुष्यांस रोगापासून बरे करणारा आणि जो सकल भुवनांचा प्रभु असें समजत, तो आधुनिक काळीं भयंकररूपी देव झाला आहे. त्याच्या अंगावर आतां रुंडमाळा असतात, तो तपश्चर्या करून करून कृश झालेला आणि नित्य श्मशानामध्यें वास करणारा असा झाला आहे.

याप्रमाणें वेदकालीन देवांची अवस्था आधुनिक ग्रंथांत झाली आहे. आतां जे देव वेदांत ऐकूनहि ठाऊक नाहींत अथवा असलेच तर फारच क्वचित् सांगितलेले असून, ज्यांचें माहात्म्य वेदोत्तरकालीं फार वाढलें, असे तर पुष्कळ आहेत. उदाहरणार्थ, राम, कृष्ण, ब्रह्मा, विष्णु, शिव, विठोबा, जगन्नाथ, डाकोरनाथ, हनूमान्, नारसिंह, रामनाथ, काशीविश्वेश्वर आणि यांसारिखे दुसरे अनेक देव. यांतून 'ब्रह्मा,' 'विष्णु,' आणि 'शिव' हे तर आधुनिक काळीं सर्वव्यापी देव होऊन बसले आहेत, यांतून 'शिव' म्हणून देव तर ऋग्वेदांत ठाऊक सुद्धा नाहीं, 'विष्णु' हें नांव आहे, पण तें एका सूर्यरूप देवाचें होय, म्हणजे सूर्याला अथवा सवित्यालाच विष्णु असें म्हणत. आणि हा विष्णु वेदांत साधारण देवतांपैकीं होय, याचें माहात्म्य वेदांत विशेष नाहीं. ब्रह्मा जो सर्व जगताचा कर्ता, तो

ऋग्वेदांत आलेला नाहीं. दुसरे जे वर सांगितले, त्यांविषयीं तर उच्चार सुद्धां नाहीं, आणि असण्याचा संभव देखील नाहीं यांत नवल नाहीं. पण सांप्रतकाळीं या नवीन देवांचें प्राबल्य मोठें झालें आहे हें प्रसिद्धच आहे.

याप्रमाणें अत्यंत प्राचीन काळीं प्रसिद्ध असलेले देव आतां मागें पडले आणि नवे देव पुढें आले असें झाल्यानें वेदांतील देवांस आपण विसरलों काय? आणि वेदाचा महिमा जागरूक होता तो आतां नष्ट झाला काय? आणि वेदाचा आपला आतां कांहीं संबंध राहिला नाहीं असें झालें आहे काय?

हिंदू लोकांचे संस्कार सर्व वैदिक आहेत. विवाह, श्राद्ध, मेलेल्याची दिनक्रिया, गर्भाधान, उपनयन, श्रावणी, इत्यादिक जीं कर्में, त्यांत वेदांतील देवतांला आह्वान करून अजून आपण हवि अर्पण करितों. त्या त्या वेळीं इंद्र, वरुण, मित्र, सविता, पूषा, अर्यमा, अदिति, मरुत् इत्यादिक जे वेदांतील देव, त्या सर्वांस आपण आहुति देऊन त्यांनीं आम्हांला आशीर्वाद द्यावा म्हणून त्यांची प्रार्थना करीत असतों, आणि ती प्राचीन आर्यांनीं रचून ठेविलेलीं जीं सूक्तें, त्यांच्याच द्वारें करीत असतों; आणि त्यांला हवि, आज्य, पुरोडाश हींहि देत असतों. आणि त्यांला बसावयाला कुशासनहि घालीत असतों, आणि प्रसंगीं ( यज्ञ करितों तेव्हां ) सोम आणि मांस हींहि अर्पण करीत असतों. पण प्राचीन काळीं जे प्रचार आमच्या आर्य पूर्वजांचे या अर्चनाविषयीं असत, त्यांची नक्कल अथवा टवाळी आपण केल्याप्रमाणें आपल्या हातून आचरण होत असतें. जेथें प्राचीन आर्य लोक प्रत्येक प्रसंगास अनुलक्षून नव्या स्तुति रचून नवीं हव्यें अर्पण करीत, आणि त्यांस जे इष्ट असत ते वर मागून घेत, तेथें आपण जुने मंत्र सांप्रतच्या प्रसंगास अनुसरून नसलेले, आम्हांस

समजत नसलेले, आणि केव्हां केव्हां आमच्या मनांत जें मागावयाचें असतें त्याच्या विरुद्ध कांहीं तरी प्राप्त व्हावें अशा अर्थाचे, असे म्हणून, ते मंत्र केवळ उच्चारण्यांत पुण्य आहे असें समजतों. याचीं उदाहरणें झालेल्या ऋक्संहितेच्या भागांत पुष्कळ आलीं आहेत. एकाद्या देवाची आराधना कर्तव्य असतां ज्या मंत्रांत त्याचा संबंधहि नाहीं तसले मंत्र आराधनेच्या वेळीं म्हणावे, किंवा जेथें आयुष्य वाढावें अशी प्रार्थना करावयाची आपल्या मनांत असते तेथें आयुष्याच्या ऱ्हासाचा मंत्र ह्मणावा, या प्रकारचीं उदाहरणें सूक्त ९२ मं. १० येथें पहा. तर अशा दृष्टीनें पाहिलें तर वेदकालीन धर्माचा आतां लोप होऊन गेला आहे असें म्हणण्यांत कांहीं अयोग्य नाहीं.

पण वेदोत्तरकालीन जे पुराणें, इतिहास, इत्यादिक ग्रंथ, त्यांतील ज्या कथा आणि आचार, ते वेदांतील प्रचार आणि आचार, वेदांतील देव आणि त्यांचीं माहात्म्यें, वेदांतील समजुती आणि प्रार्थना, यांच्या वास्तविक अथवा प्रमादयुक्त अर्थापासून निर्माण झालेले अथवा त्यांवर अवलंबून राहणारे होत, अशाविषयीं कोणाचीहि खात्री झाल्याशिवाय राहणार नाहीं. सारांश, आमचे अर्वाचीन आचार, प्रचार, चाली, रीतिभाती आणि उपासनामार्ग, आणि धर्मसंबंधी आणि व्यवहारसंबंधी गोष्टी ह्यांचा अर्थ, वेद जर हल्लीं आपल्या हातीं नसता, तर आम्हांस समजण्यास कांहींच मार्ग नव्हता. उदाहरणार्थः—त्रिविक्रमाचा अथवा वामनाचा जो अवतार, त्याणें बळीकडून तीन पावलें टाकतां येतील इतकी भूमि मागून घेऊन, तीन पावलांनीं सर्व त्रिभुवन आक्रांत केलें, आणि तिसऱ्या पावलास अवकाश उरला नाहीं इत्यादिक जी कथा, तिचा अर्थ असा आहे कीं, 'त्रिविक्रम' म्हणजे सूर्य, तो सकाळीं उगवतो तेव्हां त्याचें एक पाऊल झालें, दोनप्रहरीं मध्याह्नीं येतो तेव्हां त्याचें दुसरें पाऊल, आणि तिसरें पाऊल

पश्चिमेस मावळतो तें टाकण्याच्या पूर्वींच तो नाहींसा होतो म्हणजे तिसरें पाऊल कोठें टाकतो हें समजत नाहीं. तर असें जें वेदांत सांगितलेलें सूर्याविषयींचें रूपक,* तें वेदावरून आम्हांस अवगत झालें नसतें, तर आम्हांस त्या अवताराचें खरें स्वरूप कसें समजलें असतें बरें? इंद्राच्या स्त्रीचें नांव 'शची' आणि इंद्राशीं शचीचें लग्न झालें इत्यादिक ज्या कथा, त्या इंद्राला 'शचीपति' असें वेदांत (शची=पराक्रम, पति=प्रभु=पराक्रमाचा प्रभु; 'पराक्रम करणारा' या अर्थी) विशेषण लाविलें आहे, त्यावरून† उद्भवल्या हें आम्हांस वेदाशिवाय कसें समजलें असतें? कोणी पाहिजे त्याणें नव्याण्णवपर्यंत यज्ञ करावे, पण शंभर केले अथवा शंभराव्या यज्ञाला आरंभ झाला, कीं त्याबरोबर इंद्र त्याचा मत्सर करूं लागतो, आणि त्याला अनेक विघ्नें आणून शंभराव्या यज्ञाची समाप्ति होऊं देत नाहीं, ही कथा अर्वाचीन ग्रंथांत सर्वत्र पसरली आहे, आणि इंद्राच्या हेवेखोर स्वभावाविषयीं अनेक कथा सांगितल्या आहेत, त्यांचा अर्थ काय? इंद्राला 'शतक्रतु' असें जें वेदांत विशेषण लाविलें आहे त्याशिवाय दुसरें बीज कांहीं नाहीं असें आम्हांस वेदाशिवाय समजलें ‡नसतें. पृथिवीवरील इतर लोकांत तशी चाल नसून, हिंदु आणि पारशी याच लोकांत विस्तवाला पूज्य मानण्याची आणि विवाहादिक सांसारिक महाकृत्यें विस्तवाच्या साक्षीनें करण्याची चाल कशी पडली? याचें उत्तर वेदाशिवाय आपणास देतां आलें नसतें. या प्रकारेंकरून अनेक रीतींनीं वेद आमच्या विचारांत, प्रचारांत आणि आचारांत शिरून व्याप्त झालेला आहे; मात्र सूक्ष्मदृष्टया त्याचें स्वरूप आणि अस्तित्व त्या विचारादिकांत आहे

---

* सू. २२ मं. १६, पृष्ठें १८० । १८१ यांजवर टीप आहे ती पहा.

† सू. ५३. मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

‡ सू. ४ मं. ८ आणि टीप पहा.

तें जाणून घेतलें पाहिजे. या संबंधानें पाहिलें तर वेद आणि वेदकाळींच्या चाली, कथा आणि समजुती आपणांमध्यें अजून लुप्त झाल्या नाहींत, तर त्या अजून जागृत आणि जीवंत अशा आम्हांमध्यें नांदतच आहेत.

परंतु वर सांगितलेल्या प्रकारेंकरून आम्हां हिंदू लोकांतीलच अर्वाचीन समजुतींचा आणि कथांचा खुलासा वेदावरून होतो असें नाहीं, पण आर्य लोकांच्या दुसऱ्या शाखा, म्हणजे पारसी, ग्रीक, रोमन इत्यादि जे लोक मोठमोठे या भूतळावर होऊन गेले, त्यांच्याहि प्राचीन आणि अर्वाचीन कथांचा खुलासा वेदावरून होतो. ग्रीक आणि रोमन लोकांचीं जीं विस्तीर्ण पुराणें, त्यांत 'जौस्पिता' हा सर्व देवांचा बाप आणि पृथिवी त्याची स्त्री इत्यादिक कथा प्रसिद्ध आहे. तर हा 'जौस्पिता' म्हणजे वेदांत सांगितलेला 'द्यौष्पिता', म्हणजे द्युरूप जो पिता, तोच होय, हें वेदाशिवाय आपणास कळलें नसतें. आणि ग्रीक आणि रोमन लोक यांचा जो 'जौस्पिता' (अथवा जूपितर्) याविषयींच्या कितीएक गोष्टी, 'द्यौष्पिता' वेदांत आहे त्याची कथा अवगत नसती तर, खुलासेवार समजल्या नसत्या. वेदासारिखा अत्यंत प्राचीन ग्रंथ जर आज आमच्या हातीं नसता, तर पारसी, ग्रीक, रोमन आणि त्यांचे आधुनिक वंशज असे जे युरोपस्थ लोक त्यांचा आमचा बांधवसंबंध काय आहे त्याचीं उत्तम प्रमाणें नष्ट झालीं असतीं. जर हा वेद आपल्या हातीं नसता, तर प्रथमच्या मनुष्यांच्या आंगीं ईश्वराचें अद्वितीयत्व, एकत्व आणि सर्वश्रेष्ठत्व इत्यादिक जे गुण, ते आर्य लोकांस हळुहळू कसे अवगत झाले हें कोणासच समजण्यास आधार सांपडला नसता. कारण आर्य लोक जरी प्रथम अनेक देवांस भजत, तथापि ते, ईश्वर एकच आहे आणि अनेक देव हे त्याचे मूर्त भिन्न भिन्न गुण

आहेत असें हळुहळू कसे समजूं लागले, तें वेदसूक्तांवरूनच समजून येतें. इत्यादि अनेक संबंधांनीं पाहिलें तरी वेद हा अजून पूर्वींप्रमाणेंच जागरूक स्थितीमध्यें असून प्राचीन काळाप्रमाणेंच पूज्य आहे असें कबूल करावें लागतें.

मात्र इतकें खरें आहे कीं, वेदमंत्रांनीं पाहिजे ती गोष्ट करण्याची अथवा प्राप्त करून घेण्याची शक्ति येते, आणि त्यांत सांगितलेल्या सर्वच गोष्टी दिव्य आहेत, आणि त्यांचें ज्ञान मनुष्यांस होणें नाहीं; जर झालें तर तो दिव्यप्रसाद त्याला झाला असें समजावें, इत्यादि म्हणणारे जे लोक, त्यांची मात्र निराशा झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु इतिहासकर्ते, मानवी सुधारणुकेचे आणि स्वभावाचे अभ्यासकर्ते, धर्मतत्त्वांविषयींचे शोधकर्ते आणि सामान्य सर्व विद्वान् यांला ऋग्वेद नित्य प्रिय राहील यांत संशय नाहीं.

वेदांत कांहीं भाग अजून नीट समजत नाहींत असें पाहून जर कोणाला निराशा वाटत असेल, तर त्यांनीं असा विचार करावा कीं, वेदासारिखा अत्यंत पुरातन ग्रंथ दुसरा आर्य लोकांचा तर उपलब्ध नाहींच पण इतक्या मोठ्या काळजीनें जपून ठेविलेला, आणि प्राणापलीकडे मानून सांभाळिलेला, आणि त्यामुळेंच प्रायः प्रमादांपासून मुक्त, आणि क्षेपकांनीं दुष्ट न झालेला, असा धर्माचा अथवा काव्याचा अथवा दुसऱ्या शास्त्रावरचा ग्रंथ कोठेंच नाहीं म्हटल्यास चालेल, निदान एवढा मोठा ग्रंथ तरी इतका शुद्ध प्राचीन काळीं होता तसाच राहिलेला दुसरा नाहीं. तथापि कितीएक प्रसंगीं सायणाचार्यांसारिखे भाष्यकारहि मुळाशीं भिन्न असा स्वरपाठ अथवा अक्षरपाठ घेऊन अर्थ करण्याची अवश्यकता कबूल करितात. असे जे थोडे मंत्र, ते शिवाय करून बाकी भाग प्रायः समजावयास सोपे असतात. तथापि वेदाची भाषा अत्यंत पुरातन असल्यामुळें साधारण संस्कृत व्याकर-

णावरून आणि व्युत्पत्तीवरून जेथें निर्वाह होत नाहीं अशीं अनेक स्थळें आहेत; त्या त्या ठिकाणांच्या संबंधानें पाहिलें तर वेदाच्या भाषेचा आणि व्याकरणाचा निराळा अभ्यास केला पाहिजे असें जरी कबूल करावें लागतें, तरी आम्हां हिंदू लोकांस तसला अभ्यास करण्याला जितकीं साधनें आहेत, तितकीं परकीय लोकांस नाहींत. असें असतां वेदार्थाचा अभ्यास सांप्रतकाळीं पश्चिम खंडांत जितका होत आहे, त्याच्यापेक्षां आमच्या ह्या आर्यदेशांत, या वेदाच्या जन्मभूमींत, या वेदाच्या माहेरघरीं अगदीच थोडा होत आहे, किंबहुना होतच नाहीं असें म्हटल्यास चालेल.

माझा स्वताहाचा तर अनुभव असा आहे कीं, वेदाच्या अभ्यासाला जीं साधनें आम्हां हिंदू लोकांस आहेत, आणि त्याचा खरा अर्थ आम्हांस समजण्याचा एकंदरींत जेवढा संभव आहे, त्यापेक्षां पाश्चात्त्यांस साधनें थोडीं आणि समजण्याचा संभवहि थोडा. याविषयीं मी हें काम हातीं धरिल्यापासून आजपर्यंत वेदसंबंधाचे पाश्चात्त्यांचे ग्रंथ जे जे पाहिले, आणि त्यांच्याशीं आमच्या लोकांचे ताडून पाहिले, त्यावरून खात्री होण्यासारखी आहे. याचें मुख्य कारण असें आहे कीं, हिंदू लोक जसे काय वेदाच्या माहेरींच असल्यामुळें बहुतेक ठिकाणीं पाश्चात्त्यांस अत्यंत अडचणीअंतीं समजण्यास कठिण अशा ऋचा आमच्या लोकांस सहज समजण्यासारिख्या असतात. कारण प्राचीन आर्य हिंदू आणि अर्वाचीन आर्य हिंदू यांजमध्यें मोठेंच अंतर पडलें आहे असें नाहीं. आणि आम्हांमध्यें आणि पाश्चात्त्यांमध्यें तर सर्व गोष्टींनीं मोठेंच अंतर आहे. यास्तव पाश्चात्त्य विद्वान् पश्चिमेंतच राहून आपल्या मोठ्या उद्योगाच्या आणि अभ्यासाच्या योगानें वेदार्थसंपादनाविषयीं जरी शोध लावून मोठे अत्यंत उपयोगी ग्रंथ लिहितात, आणि आम्हांस त्यांचा उपयोग

जरी मोठा होतो; तथापि वेद आमचा आहे या नात्यानेंच नव्हे, पण आम्ही वेदाच्या या आर्यभूमींत त्याजबरोबर राहिलों आहों या सहवासाच्या आणि साहचर्याच्या नात्यानें पाश्चात्त्यांप्रमाणें आम्हीं श्रम केले तर आम्हांला जशी वेदार्थाची प्राप्ति होण्याचा संभव आहे, तशी आमच्या पाश्चात्त्य विद्वान् बंधूंला नाहीं असें आम्ही नम्रपणानें म्हणण्याची परवानगी घेतों. आणि आमच्या आर्य बंधूंस अशी विनंति करितों कीं, वेदाभ्यासाविषयीं आणि वेदार्थलाभाविषयीं आमचें जें हें श्रेष्ठ भाग्य, तें आम्हीं झिटकारून टाकूं नये, तर त्याचा आम्हीं लाभ घ्यावा हें आमचें कर्तव्य आहे इतकेंच नव्हे, पण त्यापासून होणाऱ्या आनंदांचा आम्हीं उपभोग न घेतला तर आमच्या उत्तम धनाचा आम्हीं अव्हेर केला असें होईल, याचा त्यांणीं विचार करावा.



माझे

सर्व आर्य बंधु व भगिनी

यांस

हें भाषांतर

सादर समर्पण केलें आहे.

भाषांतरकर्ता.

## ॥ अथ द्वितीयाष्टके प्रथमोऽध्यायः ॥

### सूक्तम् १२२.

अङ्गराजस्य महिष्या दास्यां दीर्घतमसोत्पादितः कक्षीवान् ऋषिः । विश्वे देवा देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**प्र वः पान्तं रघुमन्यवोऽन्धो यज्ञं रुद्राय मीळ्हुषे भरध्वम् ।**
**दिवो अस्तोष्यसुरस्य वीरैरिषुध्येव मरुतो रोदस्योः ॥ १ ॥**

प्र । वः । पान्तम् । रघुऽमन्यवः । अन्धः । यज्ञम् । रुद्राय । मीळ्हुषे । भरध्वम् ।
दिवः । अस्तोषि । असुरस्य । वीरैः । इषुध्याऽइव । मरुतः । रोदस्योः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. हे रघुमन्यवः ( =शीघ्रमनसः=सोत्कण्ठा ) [ ऋत्विजः ], [ यूयं ] मीळ्हुषे रुद्राय ( =उदाराय रुद्राय ) वः ( =युष्माकं ) पान्तं ( =पातव्यम् ) अन्धः ( =अन्नं =सोमलक्षणमन्नं ) यज्ञं [ च ] प्र भरध्वं ( =प्रकर्षेण संपादयत =अर्पयत ) । इषुध्येव ( =इषुध्ययेव=युष्मत्स्पर्धयेव ) [ अहमपि ] रोदस्योः ( =द्यावापृथिव्योर्मध्ये वर्तमानैः ) असुरस्य दिवः ( =बलवतो द्युदेवस्य ) वीरैः ( =पुत्रैः=पुत्रभूतैर्वरुणादिदेवैः सह ) मरुतः अस्तोषि ( =स्तौमि ) ॥

१. हें सूक्त 'विश्वे देवां'विषयीं आहे. 'विश्वे देव' याचा अर्थ 'सर्व देव.' परंतु सर्व देव म्हणजे जितके देव वेदांत येतात तितक्यांविषयीं हें सूक्त नव्हे, पण अमुक एकच देवाविषयीं नसतां इंद्र, वरुण इत्यादि जे प्रमुख देव, त्यांविषयीं मुख्यत्वेंकरून यांत सांगितलेलें आहे. इतर क्षुद्र देवतांविषयीं थोडा उल्लेख मात्र असतो. बहुतकरून विश्वे देवांचीं सूक्तें अशींच असतात.

## अष्टक २, अध्याय १.

## सूक्त १२२.

ऋषि—अङ्गदेशच्या राजाच्या राणीची दासी उशिज् इच्या पोटीं दीर्घतमस् याजपासून झालेला कक्षीवान् नांवाचा पुरुष. देवता—विश्वे देव. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे उत्सुक [ऋत्विज] हो, उदार रुद्राकारणें तुमचें पेय हवि [आणि] तुमचा यज्ञ अर्पण करा. द्विलोकांतील जे द्युदेवाचे पुत्र त्यांसहित मरुतांस मी ईर्षेनेंच जणुं स्तवीत आहें.

## ASHṬAKA II, ADHYÂYA I.

## HYMN 122.

To *Vis've Devas* (i.e. the several Gods collectively). By *Kakshîvân*, the son of *Dîrghatamas* by the slave of the Queen of the *Angas*. Metre—*Trishṭubh*.

1. Offer your liquid oblation, O eager friends, [and] your sacrifice to bounteous Rudra. I am praising as if with rivalry the Maruts together with the sons of god Dyaus, who live in heaven and earth.

---

या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे मित्र हो, तुम्ही रुद्राला हवि आणि सोम अर्पण करा आणि मी द्युदेवाचे पुत्र जे वरुणादिक देव, आणि रुद्राचे पुत्र जे मरुत्— कीं जे सर्व द्यावापृथिवींत राहणारे होत— त्यांला स्तवितों; तर पाहूं, तुम्ही हवि चांगलें अर्पण करितां, कीं मी स्तोत्र चांगलें रचून म्हणतों.'

'उदार रुद्राकारणें' = 'मीळ्हुषे रुद्राय.' मीढ्वान् (कृपाळु किंवा उदार) हें विशेषण रुद्रास पुष्कळ ठिकाणीं लाविलेलें असतें. सू. ११४ मं. ३ पहा. 'रुद्र' या देवाविषयीं सू. ४३ आणि विशेषेंकरून त्याचा मं. १ याजवरील टीप पहा.

'पेय हवि' = 'पान्तम् अन्धः' म्हणजे सोम. 'पान्त' शब्दाचा हा अर्थ दुसऱ्या दोन तीन मंत्रांत आला आहे. ऋ. १०. ८८. १ यांत 'हविः पान्तम् अजरम्' असें आलें आहे, आणि त्याचा हाच अर्थ तेथें सायणांनीं केला आहे तो पहा.

'यज्ञ अर्पण करा' म्हणजे यज्ञामध्यें जे सोमाशिवाय दुसरे पदार्थ हवि इत्यादिक अर्पण करावयाचे ते.

पत्नीव पूर्वहूतिं वावृधध्यां उषासानक्ता पुरुधा विदाने।
स्तरीर्नात्कं व्युतं वसाना सूर्यस्य श्रिया सुदृशी हिरण्यैः ॥ २ ॥
पत्नीऽइव । पूर्वऽहूतिम् । ववृधध्यै । उषसानक्ता । पुरुधा । विदाने इति ।
स्तरीः । न । अत्कम् । विऽउतम् । वसाना । सूर्यस्य । श्रिया । सु-
ऽदृशी । हिरण्यैः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. पत्नीव ( =पत्नी इव=पत्न्याविव=पत्न्यौ यथा ) पुरुधा ( =बहुधा=बहुभिः प्रकारैः=विविधवर्णवस्त्रालंकाररूपैः ) विदाने ( =विद्यमाने=दृश्यमाने ) उषासानक्ता (=रात्र्युषसौ) पूर्वहूतिं (=प्रथमम् आह्वानं) वावृधध्यै (=वर्धयितुं=वयं यथा कुर्मस्तथा कर्तुम् ) [ आगच्छताम् ]। [ विशेषतस्तु ] व्युतं ( =विशेषेण सुन्दरं यथा तथा निर्मितम् ) अत्कं ( =वस्त्रं ) वसाना ( =परिदधती ) स्तरीर्न ( =स्तरीरिव=युवतिः स्त्रीव ) सूर्यस्य श्रिया ( =सूर्यस्य प्रभया ) हिरण्यैः ( =सुवर्णविकारभूतैरलंकारैश् ) [च] सुदृशी ( =शोभमाना ) [ उषा ] [ आगच्छतु ] ॥

'द्विलोकांतील' = 'रोदस्योः.' म्हणजे पृथिवी आणि तिच्या बाहेरील जो निःसीम आणि सूर्य, तारे, नक्षत्रें इत्यादिकांनीं भरलेला द्युलोक त्यांजमध्यें राहणारे. 'द्विलोकांतील' याचें आधुनिक समजुतीप्रमाणें 'त्रैलोक्यांतील' असें भाषांतर केलें तर चालेल.

'द्यू देवाचे पुत्र त्यांसहित' = 'असुरस्य दिवः वीरैः.' वरुण, सविता, अर्यमा, पूषा, भग इत्यादिक जे वेदांतील प्रमुख देव, ते द्यूचे पुत्र होत असें वेदांत सांगितलें आहे. आणि म्हणून द्यूला 'पिता' ही संज्ञा आहे. सू. ७१ मं. ५ आणि टीप पहा. शिवाय 'दिवः पुत्रासः असुरस्य वीराः' = 'बळवान् द्यू देवाचे शूर पुत्र' (ऋ. ३.५३.७ आणि १०.६७.२), आणि 'महः पुत्रासः असुरस्य वीराः दिवः'='मोठ्या बलवान् द्यूदेवाचे शूर पुत्र' (ऋ. १०. १०. २) असें द्यूदेवाविषयीं आणि त्याच्या पुत्रांविषयीं (म्ह. देवांविषयीं) सांगितलें आहे तें पहा.

'असुरस्य दिवः.' याचा अर्थ सायणांनीं निराळा केला आहे.

'ईर्षेनेंच जणुं' = 'इषुध्येव.' 'इषुध्या' शब्द पुनः आलेला नाहीं. त्यामुळें प्रयोगान्तराचें प्रमाण अर्थाला मिळत नाहीं.

वृत्तानुरोधेंकरून पहिल्या पादांत '०मन्यवो अश्वो,' तिसऱ्यांत 'अस्तोषि असुरस्य' आणि चवथ्यांत 'रोदसीओः' असें म्हणावें लागतें.

२. पत्न्यांप्रमाणें भिन्नरूपानें आविर्भूत होऊन प्रथमचें आह्वान करविणाऱ्या ज्या उषा आणि रात्र, त्या [ येओत ]. उंची विणकर वस्त्र नेसणाऱ्या स्त्रीप्रमाणें सूर्याच्या प्रभेनें [ आणि ] सुवर्णाच्या अलंकारांनीं शोभणारी [उषा] [येओ].

2. [May] Ushas and Night, manifesting themselves variously, [come] to promote the first invocation like two wives. [May Ushas], shining beautifully with the brightness of the sun, [and] with golden ornaments like a youthful damsel clad in finely woven garment, [be pleased to come].

---

२. विश्वे देवांपैकींच ज्या उषा आणि रात्र, त्यांविषयीं ही ऋचा आहे. या ऋचेंत दोन अर्थात दोन वाक्यें आहेत, पण क्रियापद एकांतहि नाहीं. तीं सायणास अनुसरून आम्हीं अध्याहृत घेतलीं आहेत, त्याशिवाय निर्वाह नाहीं; आणि तो अध्याहारहि बराच स्वाभाविक आहे.

प्रथमार्धाचा भावार्थ असा आहे कीं, जशा एकाद्या पुरुषाच्या दोन स्त्रिया असाव्या आणि आपणावर नवऱ्याची दृष्टि पडावी म्हणून प्रत्येक स्त्री अनेक वेळां अनेक वस्त्रालंकार घालीत असते, तशा एकमेकांपासून भिन्न, आणि भिन्न भिन्न वेळीं भिन्न असे वस्त्रालंकार घालणाऱ्या म्ह. रूपें घेऊन दृष्टीस पडणाऱ्या ज्या उषा आणि रात्र, त्या येओत आणि आमचें पहांटेस करावयाचें देवभजन आम्हांकडून करवोत. दुसरें अर्ध केवळ उषेविषयींच आहे: एकादी स्त्री जशी बारीक वस्त्र नेसून शोभते, तशी सूर्याची कोमळ प्रभा आंगावर जणुं पांघरून आणि सुवर्णाचे अलंकार ( तारे ) घालून सुशोभित दिसणारी जी उषा, ती येओ.

'प्रथमचें आह्वान' = 'पूर्वहूतिम्.' म्हणजे पहांटेस जें देवांचें आह्वान करावयाचें तें— पहांटचें भजन.

'पत्न्यांप्रमाणें' = 'पत्नीव.' येथें पत्नीइव ( पत्न्याविव ) असें झालें नाही हें छांदस समजलें पाहिजे. पत्न्यांप्रमाणें, या उपमेचा भावार्थ, पत्नी जशी वेगवेगळीं वस्त्रें घालते असा तर आहेच, पण त्याशिवाय पत्नी जशी पहांटेस उठून नवऱ्याला उठविते आणि देवयजनाची तयारी करिते, असाहि आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'व्युतम्'च्या स्थलीं 'विउतम्' असें वाचावें लागतें.

**ममत्तु नः परिज्मा वसर्हा ममत्तु वातो अपां वृषण्वान् ।**
**शिशीतमिन्द्रापर्वता युवं नस्तन्नो विश्वे वरिवस्यन्तु देवाः ॥ ३ ॥**

ममत्तु । नः । परिऽज्मा । वसर्हा । ममत्तु । वातः । अपाम् । वृषण्ऽवान् ।
शिशीतम् । इन्द्रापर्वता । युवम् । नः । तत् । नः । विश्वे । वरिवस्यन्तु । देवाः ॥ ३ ॥

**उत त्या मे यशसा श्वेतनायै व्यन्ता पान्तौशिजो हुवध्यै ।**
**प्र वो नपातमपां कृणुध्वं प्र मातरा रास्पिनस्यायोः ॥ ४ ॥**

उत । त्या । मे । यशसा । श्वेतनायै । व्यन्ता । पान्ता । औशिजः । हुवध्यै ।
प्र । वः । नपातम् । अपाम् । कृणुध्वम् । प्र । मातरा । रास्पिनस्य । आयोः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. परिज्मा ( =परितो गन्ता ) वसर्हा ( =उषसि काले तमोरूपस्यासुरस्य हन्ता =सविता ) नः ( =अस्मान् ) ममत्तु ( =मादयतु=आनन्दयतु ) । अपां वृषण्वान् ( =मेघोदकानां वर्षिता ) वातः ( =वायुः ) नः ( =अस्मान् ) ममत्तु (=मादयतु= आनन्दयतु ) । हे इन्द्रापर्वता ( =इन्द्रापर्वतौ=हे इन्द्र, अपिच हे मेघाभिमानिन् देव), युवं (= युवां ) नः ( =अस्मान् ) शिशीतं ( = तीक्ष्णीकुरुतम्=तीक्ष्णबुद्धीन् कुरुतम्)। तत् (=एवं च) विश्वे देवाः (=सर्वेपि देवाः) नः (=अस्मान् ) वरिवस्यन्तु ( = अस्मभ्यं दानशीला भवन्तु ) ॥

४. उत ( =अपि च ) औशिजः ( =उशिजः पुत्रः कक्षीवान् अहं ) श्वेतनायै (=श्वेतयन्त्या उषसः काले ) व्यन्ता ( =व्यन्तौ=हविर्भक्षयन्तौ) पान्ता ( =पान्तौ= सोमं पिबन्तौ) त्या (=त्यौ=तौ प्रसिद्धौ) मे (=मम) यशसा (=यशसौ ) [ अश्विनौ ] हुवध्यै ( =आह्वातुं ) [प्रवृत्तोस्मि] । [हे ऋत्विजः], [यूयं] वः अपां नपातम् (=वः उदकानां पुत्रं=युष्माकं प्रियम् अग्निं ) प्र कृणुध्वं ( =स्तुत ) [ अपि च ] रास्पिनस्य आयोः ( =प्रज्वलनध्वनियुक्तस्य गन्तुः=अग्नेः ) मातरा ( =मातरौ=मातापितरौ द्यावापृथिव्यौ ) प्र [ कृणुध्वं ] ( =स्तुत ) ॥

३. परिभ्रमण करणारा सविता आम्हांला आनंदित करो, उदकांला वर्षविणारा वायु आम्हांला आनंदित करो. हे इंद्र आणि पर्जन्य हो, तुम्ही आम्हांला बुद्धिमंत करा. विश्वे देव आम्हांला धनदाते होओत.

३. May circumambient Savitâ gladden us. May Vâyu, the showerer of the waters, gladden us. Make us wise, O ye Indra and Parvata. May all the gods become bounteous to us.

४. आणि पहांटेला खाणारे [ आणि ] पिणारे जे माझे तेजस्वी [अश्वी],त्यांला बोलाविण्याला [हा] उशिजेचा पुत्र [प्रवृत्त होत आहे]. [ हे मित्र हो], तुम्ही आपल्या [प्रिय] उदकपुत्राला स्तवा, तुम्ही फसफस नाद करणाऱ्या अग्नीच्या आईबापांला [ स्तवा ].

4. And the son of Us'ij [ is intent ] on invoking those my glorious As'vins, who at the dawn of day eat [ the offering ] [ and ] drink [ the Soma ]. And praise ye [ my friends ], the son of the waters ( Agni ), your [ favourite ]; [ praise ye ] the parents of the rustling traveller.

---

३. या ऋचेच्या पहिल्या पादांत सवित्याविषयीं सांगितलें आहे, दुसऱ्यांत वायूविषयीं, तिसऱ्यांत इंद्रापर्वतांविषयीं ( म्हणजे इंद्र आणि पर्जन्य यांविषयीं ) आणि चवथ्यांत विश्वे देवांविषयीं सांगितलें आहे.

'परिभ्रमण करणारा सविता' = 'परिज्मा वसर्हा.' 'वसर्हा' शब्द दुसऱ्या ठिकाणीं कोठें आलेला नाहीं. सायणांस अनुसरून आम्हीं अर्थ केला आहे.

'वायु' = 'वातः.' सू. ८९. मं. ४ पहा. 'वायु' मेघोदक देतो यांत नवल नाहीं.

'पर्जन्य' =' पर्वत.' 'पर्वत' शब्दाचा अर्थ अक्षरशः डोंगर इतकाच आहे. त्यावरून डोंगरासारिखा दिसणारा जो मेघ तो; मग मेघजल देणारा असा पर्जन्य देव असा अर्थ होऊं लागला. या अर्थी 'पर्वत' शब्दाचे प्रयोग ऋग्वेदांत पुष्कळ आहेत. हा 'पर्वत' देव बहुतकरून इंद्राबरोबर येतो. म्हणूनच ऋ. १०. १५८. ३ यांत सायणाचार्य 'पर्वत' याला 'इन्द्रसहचरः पर्वताख्यो देवः' (=इन्द्राबरोबर असणारा पर्वत नांवाचा देव ) असें म्हणतात. ऋ. ७. ३७. ८ याजवरहि सायण म्हणतात, 'पर्वत इति कश्चिदिन्द्रस्य सखा, एत-

आ वो रुवण्युमौशिजो हुवध्यै घोषेव शंसमर्जुनस्य नंशे ।
प्र वः पूष्णे दावन आँ अच्छा वोचेय वसुतातिमग्नेः ॥ ५ ॥ १ ॥

आ । वः । रुवण्युम् । औशिजः । हुवध्यै । घोषाऽइव । शंसम् । अर्जुनस्य । नंशे ।
प्र । वः । पूष्णे । दावने । आ । अच्छ । वोचेय । वसुऽतातिम् । अग्नेः ॥ ५ ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

५. [हे देवाः], अर्जुनस्य नंशे (=श्वेतकुष्ठस्य नाशाय) घोषेव (=घोषानाम्नी स्त्री यथा तथा) वः आ हुवध्यै (=युष्मान् आह्वातुम्) औशिजः (=उशिजः पुत्रः कक्षीवानहं) रुवण्यं (=नादयुक्तं) शंसं (=स्तोत्रं) [प्रवच्मि]। वः (=युष्माकं मध्ये) दावने पूष्णे (=दानशीलाय पूष्णे देवाय) आ (=आभिमुख्येन) प्र [वच्मि]। अग्नेः वसुतातिं (=धनदातृत्वम्) अच्छा वोचेय (=आभिमुख्येन प्रवच्मि=अग्निमत्राहूय तस्य दानशीलत्वं प्रस्तौमि) ॥

---

त्संज्ञो देवः' (=पर्वत म्हणून कोणीएक इन्द्राचा मित्र देवविशेष). ऋ. ४. ५५. ५ यावरहि सायण 'पर्वत' देव म्हणजे 'इन्द्रसखा' एक होय असें म्हणतात. 'पर्जन्य' म्हणजे उदकाचा देव वेदांत प्रसिद्ध आहे तोच प्रस्तुत मंत्रांत 'पर्वत' शब्दानें समजावयाचा असें सायणांस अनुसरून आम्हीं मानिलें आहे.

वृत्तास अनुसरून पहिल्या पादांत 'परिज्जमा' आणि दुसऱ्यांत 'अपआं' असें म्हटलें पाहिजे.

४. भावार्थः—' आणि पहांटेस येऊन हवि भक्षणारे आणि सोम पिणारे जे तेजःपुंज अश्वी, त्यांस उशिजेचा पुत्र मी हाक मारीत आहें. आणि हे मित्र हो, तुम्हीं प्रिय अग्नीला स्तवा, आणि अग्नीच्या आईबापांस (द्यावापृथिवींस) हि स्तवा.'

'उशिजेचा पुत्र '=' औशिजः.' म्हणजे स्तोत्रकर्ता कक्षीवान् ऋषि.

'उदकपुत्राला '= 'अपां नपातम्.' म्हणजे मेघोदकांनीं भरलेल्या अंतरिक्षांत विजेच्या रूपानें उत्पन्न होणारा जो अग्नि, त्याला.

वृत्तासाठीं 'विअन्तों पान्ता औशिजो' असें दुसऱ्या पादांत, तिसऱ्यांत 'अपआं' आणि चवथ्यांत 'रासिपनसिंअ आयोः' असें वाचावें लागतें.

५. [ हे देव हो ], कोड जाण्यासाठीं घोषा [ मोठ्यानें स्तवन करीत असे] तसा [मी] उशिजेचा पुत्र तुमचें आह्वान करण्यासाठीं मोठ्यानें स्तोत्र [ करीत आहें ]. तुम्हांतून दानशील जो पूषा, त्याजपाशीं मी प्रार्थितों, मी अग्नीला बोलावून त्याचें औदार्य प्रार्थितों.

5. As Ghoshâ [sang loud praises to you] for the destruction of her leprosy, so is the son of Us'ij [singing] a loud praise for your invocation. I offer praises to Pûshan, bounteous among you. I praise the bounty of Agni.

५. यांत ऋषि म्हणतोः—'हे देव हो, आपलें कोड जाण्यासाठीं घोषा जशी तुमची स्तुति मोठ्यानें करीत असे, तसें मी तुमचें स्तोत्र गाऊन तुम्हांला बोलावीत आहें. तुम्हांतून विशेष दाता जो पूषा, त्याला मी प्रार्थितों; आणि अग्नीच्या औदार्याची स्तुति करून मी त्याला बोलावितों.'

'घोषा.' सू. ११७ मं. ७ आणि त्याजवरील टीप पहा.

'आह्वान करण्यासाठीं...स्तोत्र करीत आहें'=' हुवध्यै.' येथें ' प्रवृत्तोस्मि ' इतकें अध्याहृत घेतलें पाहिजे. ' हुवध्यै ' इतक्याचा अक्षरशः अर्थ 'बोलाविण्यासाठीं ' किंवा ' आह्वान करण्यासाठीं ' असा आहे.

ही ऋचा पूषा आणि अग्नि यांजविषयीं आहे, त्यांचा निर्देश पर्यायान्तरांनीं केला आहे.

या ऋचेच्या तिसऱ्या पादांत अकरा अक्षरें असावीं त्याच्या ठिकाणीं आठच आहेत. त्यांतून मोठीच ओढाताण केल्याशिवाय अकरा अक्षरें निष्पन्न होत नाहींत. कारण

प्र वः पूषणं दावने आ ।

असें करण्यापेक्षां तिसऱ्या पादांत एक 'अच्छ' शब्द अधिक होता, आणि तो कालान्तरीं नष्ट होऊन आतां एकच राहिला आहे, असें समजणें सयुक्तिक दिसतें. तो जर असता तर तिसरा आणि चवथा हे चरण असे म्हणतां आले असतेः—

प्र वः पूषणे दावने आ अच्छ ।
अच्छा वोचेय वसुतातिमग्नेः ॥

**श्रुतं मे मित्रावरुणा हवेमोत श्रुतं सदने विश्वतः सीम् ।**
**श्रोतु नः श्रोतुरातिः सुश्रोतुः सुक्षेत्रा सिन्धुरद्भिः ॥ ६ ॥**

श्रुतम् । मे । मित्रावरुणा । हवा । इमा । उत । श्रुतम् । सदने । वि-
श्वतः । सीम् ।
श्रोतु । नः । श्रोतुऽरातिः । सुऽश्रोतुः । सुऽक्षेत्रा । सिन्धुः । अ-
त्ऽभिः ॥ ६ ॥

**स्तुषे सा वां वरुण मित्र रातिर्गवां शता पृक्षयामेषु पज्रे ।**
**श्रुतरथे प्रियरथे दधानाः सद्यः पुष्टिं निरुन्धानासो अग्मन् ॥७॥**

स्तुषे । सा । वाम् । वरुण । मित्र । रातिः । गवाम् । शता । पृक्ष-
ऽयामेषु । पज्रे ।
श्रुतऽरथे । प्रियऽरथे । दधानाः । सद्यः । पुष्टिम् । निऽरुन्धानासः ।
अग्मन् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. हे मित्रावरुणा ( =मित्रावरुणौ ), [ युवां ] मे ( =मम ) इमा हवा ( =इमानि हवानि=एतानि आह्वानानि ) श्रुतं ( =शृणुतम् ) । उत ( =अपि च ) सदने ( =यज्ञगृहे ) विश्वतः ( =सर्वतः–इतरेषामपि ) सीम् ( =एतानि=आह्वानानि ) श्रुतं ( =शृणुतम् ) । [ तथैव ] श्रोतुरातिः ( =श्रवणयोग्या धनसंपत्तस्याः सा ) सुश्रोतुः ( =शोभनश्रवणा=सम्यग्यथा तथा स्तोत्रस्य श्रोत्री ) सुक्षेत्रा ( =शोभनक्षेत्राणि स्वतीरयोः क्लेदयन्ती ) [ एतादृशी ] सिन्धुः ( =एतन्नाम्नी नदी=तदभिमानिनी देवता ) अद्भिः ( =उदकैः सह ) नः ( =अस्माकम् ) [ आह्वानं ] श्रोतु ( =शृणोतु ) ॥

७. हे वरुण, हे मित्र, वां ( =युवयोः ) पृक्षयामेषु ( =एतन्नामसु केषुचिदुपासकेषु ) [ तथा ] पज्रे ( =आङ्गिरसकुले जाते मयि कक्षीवति ) [ या ] गवां सा ( =प्रसिद्धा ) शता ( =शतसंख्याका ) रातिः ( =धनं ) [ सा ] स्तुषे ( =स्तूयते ) । श्रुतरथे (=एतन्नाम्नि उपासके) प्रियरथे (=एतन्नाम्नि उपासके) [च] सद्यः (=क्षिप्रं) पुष्टिं दधानाः निरुन्धानासः ( =गवादिसंपदं ददतो दत्तां संपदं स्थिरां कुर्वन्तश्च ) [ विश्वे देवा ] अग्मन् ( =अस्मान् प्रति आगच्छन्तु ) ॥

६. हे मित्रावरुण हो, तुम्ही हीं माझीं आह्वानें ऐका; तुम्ही यज्ञगृहांत चोहींकडे केलेलीं हीं [आह्वानें] ऐका; [ आणि ] प्रख्यातसंपत्तिमान्, उत्तम रीतीनें प्रार्थना ऐकून घेणारा, [ आणि ] उत्तम शेतांला भिजविणारा जो सिंधु [ देव], तो उदकांसहित आमचें [ आह्वान ] ऐको.

६. Hear these my invocations, O Mitra and Varuṇa; and hear the same from all sides in the sacrificial hall. May Sindhu, of renowned wealth, liberally attentive [to prayer], and watering excellent fields, hear my [invocation] with the waters.

७. हे वरुणा, हे मित्रा, पृक्षयामाच्या कुळांत [ आणि ] पज्राच्या कुळांत तुम्हीं दिलेली ती शेकडो गाईंची संपत्ति गाइली जात आहे. श्रुतरथाचे घरीं [ आणि ] प्रियरथाचे घरीं संपत्ति एकाएकीं देऊन अचल करणारे [ सर्व देव ] [ येथें ] येओत.

7. That your gift, O Varuṇa, O Mitra, of a hundred cows to the Prikshayâmas [and ] to Pajra is praised.—May [the Gods], who easily kept prosperity in the houses of S'rutaratha and Priyaratha, come [to us ].

---

६. यांत 'मित्र,' 'वरुण' आणि 'सिन्धु' यांविषयीं सांगितलें आहे. मित्र आणि वरुण हे तर प्रसिद्धच आहेत, आणि त्यांविषयीं पूर्वी पुष्कळ सूक्तांत सांगितलेलें आहे.पण या ठिकाणीं 'सिन्धु' म्हणजे कोण? सायणाचार्य 'जलाभिमानिनी देवता'=उदकांवर जिचा अधिकार आहे अशी देवता, असें म्हणतात. परंतु कोणतीं जलें तें सांगत नाहींत. कितीएक पाश्चिमात्य विद्वान् 'सिन्धुः' म्हणजे येथें सिन्धु नदी ( सिंधमधील ) असें म्हणतात. हा अर्थ 'उत्तम शेतांला भिजविणारा' ( म्हणजे जिच्या कांठीं उत्तम शेतें पिकत असतात ) असें विशेषण आहे त्यावरून संभवतो खरा. नदीविशेष विवक्षित असल्याशिवाय 'सुक्षेत्रा' याचा निर्वाह चांगला लागत नाहीं. आणि ऋ. १०. ७५ या सूक्तावरून तर सिन्धु नदीच विवक्षित असावी असें वाटतें.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'हवा इमा,' आणि चवथ्यांत 'सुक्षेतरा' असें म्हणावें. पण तिसऱ्यांत साताच अक्षरें आहेत. त्यांतून अकरा अक्षरें काढणें

अस्य स्तुषे महिमघस्य राधः सचा सनेम नहुषः सुवीराः ।
जनो यः पज्रेभ्यो वाजिनीवानश्वावतो रथिनो मह्यं सूरिः ॥८॥

अस्य । स्तुषे । महिऽमघस्य । राधः । सचा । सनेम । नहुषः । सुऽवीराः ।
जनः । यः । पज्रेभ्यः । वाजिनीऽवान् । अश्वऽवतः । रथिनः । मह्यम् । सूरिः ॥ ८ ॥

जनो यो मित्रावरुणावभिध्रुगपो न वां सुनोत्यक्ष्णयाध्रुक् ।
स्वयं स यक्ष्मं हृदये नि धत्त आप यदीं होत्राभिर्ऋतावा ॥ ९ ॥

जनः । यः । मित्रावरुणौ । अभिऽध्रुक् । अपः । न । वाम् । सुनोति । अक्ष्णयाऽध्रुक् ।
स्वयम् । सः । यक्ष्मम् । हृदये । नि । धत्ते । आप । यत् । ईम् । होत्राभिः । ऋतऽवा ॥ ९ ॥

## भाषायाम्.

८. [ अहम् ] अस्य महिमघस्य ( =महाधनस्य=महाभागस्य ) [ देवसंघस्य ] राधः ( =धनं ) स्तुषे (=स्तुवे ) । नहुषः (=मनुष्यभूता ) [ वयं ] सुवीराः (=वीर्यसंपन्नैः शोभनपुत्रपौत्रैः संयुक्ताः सन्तः ) सचा ( =सहैव ) [ देवसंघदत्तं धनं ] सनेम ( =लभेमहि ) । [ अपि च ] यो जनः ( =देवसंघः ) पज्रेभ्यः ( =अङ्गिरोभ्यः ) वाजिनीवान् ( =अन्नस्य दाता ) [ अभूत् ] [ स ] मह्यम् अश्वावतः ( =अश्वयुक्तस्य ) रथिनः ( =रथयुक्तस्य ) [ च ] [ धनस्य ] सूरिः ( =प्रेरको=दाता ) [ भवतु ] ॥

९. हे मित्रावरुणौ, अभिध्रुक् ( =आभिमुख्येन=ऋजुना मार्गेण युवाभ्यां द्रुह्यन् ) अक्ष्णयाध्रुक् ( =वक्रेण मार्गेण च युवाभ्यां द्रुह्यन् ) यो जनः ( =पुरुषः ) वां ( =युवयोरर्थम् ) अपः ( =सोमरसरूपमुदकं ) न सुनोति ( =नाभिषुणोति ) स [ जनः ], ऋतावा ( = ऋतेन यज्ञादिना पूजनेन युवां सेवमान उपासको ) यद् ईं ( =यज्ञभवं ) होत्राभिः ( =स्तुतिभिः स्तोत्रद्वारा ) आप ( =प्राप्नोति) [ तस्मिन् विषये ] स्वयम् [ एव ] हृदये ( =स्वचित्ते ) यक्ष्मं ( =पीडां=व्याधिं ) नि धत्ते ( =स्थापयति )॥

८. मी महासंपन्न [ देवसमूहा]चें धन स्तवितों. आम्ही [ सर्व ] मनुष्यें मिळून पुत्रपौत्रांसहित [ देवांच्या प्रसादाला] पावूं असें होओ. जो [ देव]जन पज्रांला धन देणारा [झाला आहे, तो] मला अश्वयुक्त [ आणि ] रथयुक्त धनातें पाठविणारा [ होओ ].

८. I praise the liberality of this [ race of Gods ] possessed of great wealth. May we [ all ] men, accompanied by our sons and grandsons, obtain [ wealth ] together. May that divine race, that has been the giver of food to the Pajras, be the sender to me of [ wealth ] rich in horses [ and ] in chariots.

९. हे मित्रावरुण हो, [तुमचा] द्वेष उघड रीतीनें करणारा, [आणि] वांकड्या मार्गानें [ तुमचा ] द्वेष करणारा जो जन तुम्हांकरितां सोम काढीत नाहीं तो, धार्मिक मनुष्य आपल्या स्तुतींच्या योगानें जें जें पावतो, तें पाहून स्वतः आपल्या हृदयांत रोग उत्पन्न करून घेतो.

9. That person, O Mitra and Varuṇa, who hates [you] in a straightforward manner [ and ] hates [you] in a crooked way, and does not extract the Soma for you, puts a disease in his heart of his own accord when he sees what the pious man attains to through [his] prayers.

कठिण आहे. कदाचित् ' शुरोतु नेअः शुरुओतु रातिः' असं म्हणावयाचें काय?

७. या ऋचेचा पूर्वार्ध मित्र आणि वरुण या दोन देवांविषयीं आहे; उत्तरार्ध सर्व देवांविषयीं सामान्य आहे.

' पृक्षयाम,' ' श्रुतरथ ' आणि ' प्रियरथ ' हीं सायणांनीं विशेषनामें घेतलेलीं नाहींत. विशेषणें घेऊन निर्वाह केला आहे.

' पज्रकुळांत'=' पज्रे.' 'पज्र' म्हणजे ' अङ्गिरस.' सू. ५१ मं. १४ पहा.

८. ही ऋचा सर्व देवांच्या समुदायाविषयीं आहे, अमुक एक देवाविषयीं अथवा देवांविषयीं नाहीं.

' धन स्तवितों '=' राधः स्तुषे.' म्हणजे धन देण्याविषयीं जें औदार्य तें.

' पज्रांला ' म्हणजे माझे जे वाडवडील त्यांला; अंगिरसांला.

' पाठविणारा होओ '=' सूरिः [ भवतु]'. हा 'सूरि' शब्दाचा संभाव्य अर्थ सायणांस अनुसरून आम्हीं दिला आहे.

स व्राधतो नहुषो दंसुजूतः शर्धस्तरो नरां गूर्तश्रवाः ।
विसृष्टरातिर्याति बाळ्हसृत्वा विश्वासु पृत्सु सदमिच्छूरः ॥१०॥२॥

सः । व्राधतः । नहुषः । दंऽसुजूतः । शर्धःऽतरः । नराम् । गूर्तऽश्रवाः ।
विसृष्टऽरातिः । याति । बाळ्हऽसृत्वा । विश्वासु । पृत्ऽसु । सदम् । इत् । शूरः ॥ १० ॥ २ ॥

## भाषायाम्.

१०. स ( =एतादृशः=पूर्वमन्त्रावसानोक्तो युवयोर्भजकः ) दंसुजूतः ( =दान्तैरश्वैः प्रेरितः=सुशिक्षिताश्वयुक्तः ), शर्धस्तरः ( =अतिशयेन प्रबलः ), नरां गूर्तश्रवाः (=मनुष्याणामुद्गीर्णकीर्तिः=मनुष्यैर्गीतकीर्तिः ) विसृष्टरातिः ( =याचकेभ्यो दत्तधनः) बाळ्हसृत्वा ( =अशङ्कितगमनः ) [ अपि च ] सदमित् शूरः ( =नित्यमेव शौर्योपेतो विजेता ) [ सन् ] विश्वासु पृत्सु ( =सर्वेषु संग्रामेषु ) व्राधतो नहुषः ( =उपद्रवकारिणो मनुष्यान्=शत्रून् प्रति ) याति ( =अभियाति=तानभिभवति ) ॥

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'पज्रेभिअः' आणि चवथ्यांत 'महीअं' असें वाचलें पाहिजे.

९. 'हे मित्रावरुण हो, जो कोण मनुष्य तुमचा उघड रीतीनें द्वेष करितो अथवा वांकड्या मार्गानें द्वेष करितो, आणि तुम्हासाठीं सोमरस काढून अर्पीत नाहीं त्याला, धार्मिक मनुष्य स्तोत्रांनीं तुम्हांला स्तवून तुम्हांपासून जें जें भाग्य मिळवितो, तें पाहून अतिशय दुःख होतें; पण तें दुःख दुसऱ्यानें त्याला दिलेलें नसतें. तो आपण होऊनच आपल्या हृदयांत रोग उत्पन्न करून घेतो.' त्याला अतिशय दुःख कां होतें तें पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे.

'उघड रीतीनें द्वेष करणारा '='अभिध्रुक्.' अक्षरशः 'समोरासमोर द्वेष करणारा.' पर्यायानें किंवा गुप्त रीतीनें नव्हे.

'वांकड्या मार्गानें द्वेष करणारा '= 'अक्ष्णयाध्रुक्.' म्हणजे उघड रीतीनें नव्हे, तर गुप्तपणें आणि पर्यायानें. हा दुसऱ्या प्रकारचा द्वेषी समजावयाचा आहे. 'अक्ष्णयाध्रुक्' अथवा 'अक्ष्णया' किंवा 'अक्ष्ण' हा शब्द ऋक्संहितेंत पुनः आलेला नाहीं. पण येथें सायणांस अनुसरून दिलेला अर्थ ग्राह्य आहे असें वाक्यसंदर्भावरून दिसतें.

वृत्तासाठीं 'सुनोति अक्ष्णयाध्रुक्' असें दुसऱ्या चरणांत आणि 'होत्राभिः' असें चवथ्यांत म्हटलें पाहिजे.

१०. तो [ तुमचा भक्तजन ] चांगले शिकलेल्या चपळ घोड्यांवर बसून जाणारा, अतिशयेंकरून प्रबळ, मनुष्यांनीं गीतकीर्ति, दानें देणारा, निःशंक रीतीनें चालणारा, आणि सदैव शूर असा होऊन सकळ युद्धप्रसंगीं नाशक मनुष्यांवर चाल करून जात असतो.

10. Such a worshipper, being carried swiftly by well disciplined horses, being exceedingly powerful, one whose fame is sung by men, liberal in giving largesses, bold in his steps [ and ] ever brave, attacks harmful men in all battles.

१०. मित्रावरुणाच्या भक्ताला जें जें प्राप्त होतें तें सर्व पाहून अधार्मिक जन रोगापासून झुरल्याप्रमाणें झुरतो असें वर सांगितलें. आतां काय काय प्राप्त होतें तें सांगतोः— 'त्याला उत्तम शिकाऊ घोडे प्राप्त होतात; तो अति प्रबळ होतो; त्याची कीर्ति सकळ मनुष्यें गातात; त्याची औदार्याविषयीं प्रख्याति होते; तो निःशंकपणें आणि निर्भयपणें चालतो आणि तो उपद्रविक सर्व मनुष्यांवर पाहिजे त्या संग्रामांत चढून गेला तरी तो सदैव विजयी होतो.'

'चांगले शिकलेल्या चपळ घोड्यांवर बसून जाणारा '=' दंसुजूतः.' हा अर्थ सायणानुसारें केला आहे. इतर विद्वान् ( पश्चिमेकडील ) इतरथा व्याख्या करितात. पण जरी हा शब्द कठिण आहे हें कबूल केलें पाहिजे, तरी एकंदरीनें सायणाचाच अर्थ विशेष ग्रहणीय दिसतो.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' नरआम् ' आणि चवथ्यांत ' शुऊरः ' असें वाचलें पाहिजे.

**अध ग्मन्ता नहुषो हवं सूरेः श्रोता राजानो अमृतस्य मन्द्राः ।**
**नभोजुवो यन्निरवस्य राधः प्रशस्तये महिना रथवते ॥ ११ ॥**

अध । ग्मन्त । नहुषः । हवम् । सूरेः । श्रोत । राजानः । अमृतस्य । मन्द्राः ।
नभःऽजुवः । यत् । निरवस्य । राधः । प्रऽशस्तये । महिना । रथऽवते ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. अध (=अथ=अतः कारणात्) हे अमृतस्य (=अमृतत्वस्य) मन्द्रा राजानः (=प्रियाः प्रभव) [आदित्याः], [अस्य] सूरेः (=भजकस्य) नहुषः (=मनुष्यस्य) हवम् (=आह्वानं प्रति) ग्मन्त (=आगच्छत) श्रोत (=तच्च शृणुत)। निरवस्य रथवते (=निरवस्य रथवतः=रक्षणरहितस्य रथिनः=अनाथस्य योद्धुः) यद्राधः (=यद्धविः) [तत्] नभोजुवः (=नभसि जवेन गच्छन्तो) [यूयं] महिना प्रशस्तये (=महिम्ना प्रशंसितुं=सादरं स्तोतुम्) [अर्हथ] ॥

इमां सायण एवं व्याख्यातवान्। हे राजानो राजमानाः सर्वस्येश्वरा वा हे मन्द्रा मादयितारो यूयममृतस्यामरणस्य सूरेः स्तोत्रादिप्रेरकस्य नहुषो मनुष्यस्य मम हवमाह्वानं श्रोत। शृणुत। ......अध अथ श्रवणानन्तरं ग्मन्त। आगच्छत। ......किमर्थमागमनम्। उच्यते। नभोजुवो नभसि व्याप्ता यूयं यद्यस्मान्निरवस्य निर्गतरक्षकस्य युष्मद्व्यतिरेकेण रक्षकान्तररहितस्य। अथवा निर्गतो मुखादुच्चारितो रवः शब्दः स्तोत्ररूपो यस्य तादृशस्य रथवते रथवतो यजमानस्य। षष्ठ्यर्थे चतुर्थी। महिना महिम्ना माहात्म्येन। ......तेन युक्तं राधः समृद्धिसाधनं हविर्लक्षणं संराधकं स्तोत्रं वा प्रशस्तये प्रशंसितुं कामयध्वे। तस्मादाह्वानं शृणुत आगच्छत चेति। इति ॥

११. तर हे अमरत्वाचे प्रिय राजे हो, तुम्ही उपासना करणाऱ्या [या] मनुष्याच्या आह्वानाप्रत या, आणि तें ऐका. आणि अनाथ योद्ध्याचें जें हवि तें अंतरिक्षव्यापकीं तुम्हीं मोठ्यानें वाखाणण्यास [योग्य होय].

11. Come, therefore, ye beloved kings of immortality, to the invocation of [this] worshipping man, and hear the same. [That] which is the offering of the forlorn soldier, you, hastening through the sky, [ought] loudly to applaud.

११. 'असें आहे त्यापेक्षा अमृत्यूचे राजे असे जे तुम्ही प्रिय आदित्य, ते तुम्ही या, आणि या यजमानाचें आह्वान ऐका. कारण कीं अनाथ असा योद्धा जें हवि तुम्हांला अर्पितो तें तुम्ही मोठ्यानें वाखाणण्यास योग्य होय, आणि वाखाणीतहि असतां.'

ही ऋचा कठिण आहे. उत्तरार्धांत क्रियापद नाहीं आणि 'नभोजुवः' आणि 'रथवते' यांचा अन्वय वाक्यांत लावणें कठिण आहे. सायणांनीं सगळ्या ऋचेचें भाष्य कसें केलें आहे तें भाष्येखालीं पहा.

'अमरत्वाचे प्रिय राजे हो'=' अमृतस्य मन्द्रा राजानः.' ऋ. १०. ९३. ४ यांत 'ते घा राजानो अमृतस्य मन्द्राः'='ते अमृतत्वाचे प्रिय राजे होत' असें आदित्यांविषयींच म्हटलें आहे तें पहा.

'अनाथ योद्ध्याचें जें हवि'=' निरवस्य रथवते यद् राधः.' 'रथवते' ह्या चतुर्थीऐवजीं, षष्ठी असावयाची, पण 'प्रशस्तये' या चतुर्थींच्या साहचर्याकर्षणामुळें तीहि चतुर्थी झाली आहे असें दिसतें.

'[योग्य होय]'='[अर्हथ].' हें येथें अध्याहृत घेतलें पाहिजे.



4609

**एतं शर्धं धाम यस्य सूरेरित्यवोचन्दशतयस्य नंशे ।**
**द्युम्नानि येषु वसुताती रारन्विश्वे सन्वन्तु प्रभृथेषु वाजम् ॥१२॥**

एतम् । शर्धम् । धाम । यस्य । सूरेः इति । अवोचन् । दशऽतयस्य । नंशे ।

द्युम्नानि । येषु । वसुऽतातिः । ररन् । विश्वे । सन्वन्तु । प्रऽभृथेषु । वाजम् ॥ १२ ॥

**मन्दामहे दशतयस्य धासेर्द्विर्यत्पञ्च बिभ्रतो यन्त्यन्ना ।**
**किमिष्टाश्व इष्टरश्मिरेत ईशानासस्तरुष ऋञ्जते नॄन् ॥ १३ ॥**

मन्दामहे । दशऽतयस्य । धासेः । द्विः । यत् । पञ्च । बिभ्रतः । यन्ति । अन्ना ।

किम् । इष्टऽअश्वः । इष्टऽरश्मिः । एते । ईशानासः । तरुषः । ऋञ्जते । नॄन् ॥ १३ ॥

### भाषायाम्.

१२. यस्य सूरेः ( =यजमानस्य ) दशतयस्य ( =दशविधस्य ) [ धासेः=हविषो ] नंशे ( =प्राप्तये ) [ वयमागताः स्मस् ] [ तम् ] एतम् ( =एनं सूरिं ) शर्धं धाम ( =बलवन्तं विदधाम ) इति [ देवा ] अवोचन् ( =ब्रुवन्तु ) । [ अपि च ] येषु [ विश्वेषु देवेषु ] द्युम्नानि ( =वैभवानि ) वसुतातिः ( =धनसंपच्च ) रारन् ( =रमन्ते =तिष्ठन्ति ) [ ते ] विश्वे [ देवाः ] प्रभृथेषु ( =यज्ञेषु ) वाजम् ( =अन्नं ) सन्वन्तु ( =संभजन्तां=सेवन्ताम् ) ॥

दशतयस्येत्यत्र दशेन्द्रियसंवर्धकत्वेन दशावयवस्यान्नस्येति सायणः ॥

१३. [ अपि च देवा एवं ब्रुवन्तु] । यद् (=यस्मात् कारणात्) द्विः पञ्च (=दश) अन्ना ( =अन्नानि ) बिभ्रतः ( =धारयन्तो भक्ता इमे ) यन्ति ( =उपायान्ति=अस्मान् उपासते ) [ तस्मात्] [तस्य] दशतयस्य धासेः (=दशविधस्य=दशत्वमसगृहीतत्वाद्दशप्रकारस्यान्नस्य ) [ सेवनेन ] मन्दामहे ( =मोदामहे=हृष्टा भवेम ) । इष्टाश्वः ( =एतन्नामा ) इष्टरश्मिः ( =एतन्नामा च राजा ) [ इत्येतादृशाः ] किं ( =किं कुर्युः ? ) एते [ भक्ता एव ] ईशानासः ( =ईशानाः=प्रभवस् ) तरुषः (=शत्रूणां तारकाः=विजयिनः सन्तो ) नॄन् ( =मनुष्यान् ) ऋञ्जते ( =प्रसाधयन्ति=स्ववशमानयन्ति=स्ववशगतान् करिष्यन्ति ) ॥

१२. 'ज्या उपासकाचें दशविध [अन्न] भक्षावयाला [आम्ही] आलों आहों, त्या ह्या [उपासका]ला आपण प्रबळ करूं,' असें [देव] बोलोत. ज्यांजवळ सर्व भाग्यें [आणि] द्रव्यसंपत्ति राहतात, ते सकळ [देव] [आमच्या] यज्ञांत हविरन्न सेवन करोत.

१३. [आणखी देव असें म्हणोत,] दोन वेळ पांचपट अन्नें घेऊन ज्यापेक्षां [उपासक लोक] येताहेत, [त्यापेक्षां] [या] दशविध अन्नाच्या [भक्षणा]नें [आपण] आनंदित होऊं. इष्टाश्व काय [करणार आहे]? इष्टरश्मि काय [करणार आहे]? हे[च] विजयशाली प्रभु मनुष्यांला आपल्या अधिकाराखालीं आणतील.

12. May [the Gods] say, 'Let us make this worshipper powerful, to enjoy whose tenfold [offerings we have come].' May all [the Gods], on whom riches and affluence attend, enjoy the offering in [our] sacrifices.

13. [And may they say]: Let us be delighted with the tenfold offering when [the worshippers] approach, bringing the twice five oblations. What [can] Ishtâs'va [do]? What [can Ishtaras'mi [do]? These overpowering rulers will subjugate the people.

१२. भावार्थः— 'सकल देव येओत, आणि म्हणोत कीं, 'ज्या यजमानाचें दशविध अन्न भक्षण्यासाठीं आम्ही आलों आहों, त्या या यजमानाला आपण प्रबळ करूं,' असें म्हणोत, आणि या आमच्या यज्ञांत ते हविरन्न सेवन करोत. कारण कीं त्यांच्या पदरीं सकळ वैभवें आणि धनें राहत असतात.'

'दशविध [अन्न]'=' दशतयस्य [धासेः].' दहा प्रकारचें अन्न पुढच्या मंत्रांत देखील सांगितलें आहे; पण तें कोणतें तें समजण्यास साधन नाहीं. सायणाप्रमाणें दशविध अन्न म्हणजे काय. तें भाषेखालीं उतरून घेतलें आहे तें पहा. मात्र दहा चमसांत अन्न भरून अर्पण करावयाचें म्हणून दशविध अन्न असें जें ते म्हणतात, त्याजकडेस लक्ष्य देण्यासारिखें आहे.

हिर॑ण्यकर्णं मणिग्रीवमर्णस्तन्नो विश्वे॑ वरिवस्यन्तु दे॒वाः ।
अ॒र्यो गिर॑ः स॒द्य आ ज॒ग्मुषी॒रोस्रा॑श्चाकन्तू॒भये॑ष्व॒स्मे ॥ १४ ॥

हिर॑ण्यऽकर्णम् । म॒णि॒ऽग्री॒व॒म् । अर्णः॑ । तत् । नः॒ । विश्वे॑ । व॒रि॒व॒-
स्य॒न्तु॒ । दे॒वाः ।
अ॒र्यः । गिर॑ः । स॒द्यः । आ । ज॒ग्मुषीः॑ । आ । उ॒स्राः । चा॒क॒न्तु॒ ।
उ॒भये॑षु । अ॒स्मे इति॑ ॥ १४ ॥

---

सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । मन्दामहे । स्तुमो वयं देवान् । मदि स्तुतौ ।......कि-मर्थम् । दशतयस्य धासेर्दशेन्द्रियतृप्तिसाधनत्वेन दशावयवस्यान्नस्य यत्रस्मात् द्विः पञ्च दशविधान्यन्नानि । दशचमसंगृहीतत्वादन्नस्य दशविधत्वम् । एवंविधमन्नं धारयन्तो दश चमसाध्वर्यवो यन्ति । होमाय गच्छन्त्याहवनीयं प्रति । यद्वाश्वमेधिकानि दशान्नानि जुहोतीत्याम्नातान्याज्यमध्वादीनि दशविधान्यन्नानि विश्वेभ्यो होतुं धारयन्तो यन्ति यदा तदा मन्दामह इति । न चेष्टाश्वप्रभृतीन्यष्टॄन्विहाय कस्मादस्मान्प्रत्यागमिष्यन्तीति वाच्यम् । तरुषः शत्रूणां तारकान् । ...... नॄन् नेतॄन्कर्मणाम् । एवं महानुभावान्वरुणादीनिष्टाश्व एतन्नामको राजा किमृञ्जते । किं प्रसाधयति । तथेष्टरश्मिश्च किमृञ्जते । एत इदानीं वर्तमाना ईशानासः पृथिव्या ईश्वरा राजानश्च न प्रसाधयन्ति । यद्वा येषां स्तोतॄणामस्माकमेते स्तुता देवा ईशानासः स्वामिनः किल तादृशांस्तरुषः शत्रूणां तारकान् नॄन् कर्मनिर्वाहकानस्मानिष्टाश्वादयः किं साधयन्ति किमुपद्रवन्ति । न प्रभवन्तीत्यर्थः । इति ॥

---

## भाषायाम्.

१४. तत् ( =तस्मात् कारणात् ) विश्वे देवाः ( =सर्वेपि देवाः ) नः (=अस्मभ्यं ) हिरण्यकर्णं ( =सुवर्णालंकारयुक्तकर्णं ) मणिग्रीवं (=मणिहारयुक्तग्रीवम् ) अर्णः ( ?=रूपं ) वरिवस्यन्तु ( =परिचरन्तु=ददतु ) । [ अपि च ] उस्राः ( =दीप्तिमन्तो ) [ देवाः ] सद्यः ( =झटिति ) आ जग्मुषीः ( =मुखान्निर्गच्छन्तीः ) अर्यः ( =अरीः=देवान्प्रति गन्तीः=भाविका ) गिरः ( =स्तुतीः ) अस्मे उभयेषु ( =मयि स्तोतरि विषये यजमानविषये च ) चाकन्तु ( =कामयन्ताम्=प्रेम्णा सेवन्ताम् ) ॥

अर्यः अरणीयो विश्वेषां देवानां संघो जग्मुषीः स्तोतुर्मुखान्निर्गच्छन्तीर्गिरः स्तुतीरुस्राः । विकारे प्रकृतिशब्दः क्षीराज्यादीनि हवींषि च सद्योऽस्मदागमनानन्तरमेव चाकन्तु । कामयन्ताम् । इति सायणः ॥

१४. तर सकळ देव सुवर्णालंकार कानांत असलेलें [आणि] गळ्यांत मणि असलेलें रूप आम्हांला देओत. देदीप्यमान [ देव ] आमच्या झटिति आलेल्या भाविक स्तुति आम्हां उभयतांवर कृपा करून मान्य करोत.

14. May All the Gods then grant us a person with gold ornaments in the ear and precious stones round the neck. May the brilliant [ Gods ], out of regard for us both, love our pious praises that come readily.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'धाम'च्या ठिकाणीं 'धाअम' असें म्हणावें लागतें.

१३. हा मंत्र कठीण आहे. आम्हीं केलेल्या भाषांतराचा भावार्थ असा आहे कीं, 'देवांनीं असें म्हणावें कीं, हे उपासक दहा चमसांतून हवि घेऊन आम्हांस अर्पण करावयास येत आहेत, त्यापेक्षां हें दहा पेल्यांतील हवि आपण भक्षण करून आनंदित होऊं. इष्टाश्व आणि इष्टरश्मि हे राजे या आमच्या उपासकांपुढें काय करणार आहेत? हे आमचे उपासकच विजयी होऊन मनुष्यांवर अंमल करितील.'

'दोन वेळ पांचपट अन्नें'='द्विः पञ्च अन्ना.' म्हणजे दशविध अन्न=हवि. दहा चमसांत किंवा पेल्यांत घालून अर्पिलेलें.

'इष्टाश्व' आणि 'इष्टरश्मि' हे कोणी मोठे राजे असतील, आणि ते या ऋचेंत सांगितलेल्या उपासकांस उपद्रव करणारे, आणि सर्व जगताला आपल्या अमलांत आणूं इच्छिणारे असे असतीलसें दिसून येतें. पण हीं दोनी नांवें पुनः ऋक्संहितेंत आलेलीं नाहींत; आणि सायणांनीं तीं जरी विशेषनामें मानिलीं आहेत, तरी त्यांविषयीं इतिहास कांहींच सांगितलेला नाहीं.

'हेच'='एते.' म्हणजे हे जे उपासक सांप्रत हवि देत आहेत ते.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'यन्तिअन्ना' असें म्हणावें लागतें.

१४. हीहि ऋचा बरीच कठिण आहे. दिलेल्या भाषांतराचा भावार्थः —'सर्व देव आम्हांला कानांत सुवर्णालंकार असलेलें आणि गळ्यांत हिऱ्याचे हार घातलेलें असें रूप (? मूल) देओत. आणि देदीप्यमान (वसवः) जे सर्व देव, ते मज स्तोत्यावर आणि माझ्या यजमानावर कृपा करून आमच्या भाविक आणि तोंडांतून झटकन येणाऱ्या स्तुति ऐकून घेओत.'

'रूप'='अर्णः.' म्हणजे लेकरूं असें सायण म्हणतात. 'अर्णः' याचा त्यांनीं केलेला अक्षरार्थ आम्हीं भाषांतरांत दिला आहे. परंतु 'अर्णः' म्हणजे रूप अशा-

**चत्वारो मा मशर्शारस्य शिश्वस्त्रयो राज्ञ आयवसस्य जिष्णोः ।**
**रथो वां मित्रावरुणा दीर्घाप्साः स्यूमगभस्तिः सूरो नाद्यौत् ॥**
**॥ १५ ॥ ३ ॥**

चत्वारः । मा । मशर्शारस्य । शिश्वः । त्रयः । राज्ञः । आयवसस्य । जिष्णोः ।
रथः । वाम् । मित्रावरुणा । दीर्घऽअप्साः । स्यूमऽगभस्तिः । सूरः । न । अद्यौत् ॥ १५ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

१५. मशर्शारस्य ( =मशर्शारनाम्नो राज्ञश् ) चत्वारः, जिष्णोः (=जयशीलस्य ) आयवसस्य राज्ञः ( =आयवसनाम्नो राज्ञश्च ) त्रयः शिश्वः ( =शिशवः=पुत्राः ) मा ( =मां ) [ पीडयन्ति ] । [ अतः कारणात् ] हे मित्रावरुणा ( =मित्रावरुणौ ), वां ( =युवयोः ) दीर्घाप्साः ( =दीर्घरूपः=विस्तृताकृतिः ) स्यूमगभस्तिः ( =सुखकरदीप्तिश्च ) रथः, सूरो [ रथो ] न (=सूर्यस्य रथो न=सूर्यस्य रथ इव), अद्यौत् (=प्रकाशताम्=तमारथाय तेषां शासनाय युवामागच्छतम् ) ॥

विषयीं प्रयोगान्तरांची अपेक्षा आहे.

'भाविक '=' अर्यः. ' सायण अर्थ निराळा करितात. भाषा पहा.

' आम्हां उभयतांवर '=' उभयेषु अस्मे. ' म्हणजे स्तोते जे आम्ही आणि आम्हांबरोबर यज्ञ करणारे जे यजमान, त्यांजवर.

वृत्तसुखासाठीं चवथा चरण ' उक्षाक्षाकन्तु उभयेषु अस्मे ' असा म्हणावा लागतो.

१५. [ हे मित्रावरुण हो ], मशर्शाराचे चार, [ आणि ] जयशाली आयवस राजाचे तिघे पोर मला [ उपद्रव करितात ]. [तर] हे मित्रावरुण हो, तुमचा विशाळ आकाराचा [ आणि ] सुखकारक प्रभावान् रथ सूर्याच्या [ रथा ]प्रमाणें प्रकाशत येओ.

15. The four boys of Mas'ars'âra [and] the three [boys] of the victorious King Âyavasa [harass] me. May [therefore], O Mitra and Varuṇa, your chariot of vast magnitude [and] of delightful rays, come shining, like [that] of the sun.

१५. हें सूक्त येथें संपलें. ऋषीच्या मनांत प्रसंगास अनुलक्षून जें मागावयाचें आहे तें आतां यांत मागितलें आहे. तें हें: 'मशर्शार नांवाच्या राजाचे चार पोरगे, आणि सर्वांस जिंकणारा जो आयवस राजा त्याचे तिघे पोर, असे सात जण मला उपद्रव देत आहेत. तर हे मित्रावरुण हो, तुम्ही आपल्या विशाळ आणि शांत प्रभेच्या रथांत बसून त्यांच्या शासनासाठीं इकडे या.'

मशर्शार आणि आयवस यांविषयीं कांहीं इतिहास ठाऊक नाहीं. हीं नांवें सुद्धा पुनः ऋक्संहितेंत आलेलीं नाहींत.

वृत्तासाठीं चवथा चरण 'स्यूमगभस्तिः सूअरो न अद्यौत्' असा म्हटला पाहिजे.

## सूक्तम् १२३.

दीर्घतमसः पुत्रः कक्षीवान् ऋषिः। उषा देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**पृथू रथो दक्षिणाया अयोज्यैनं देवासो अमृतासो अस्थुः।**

**कृष्णादुदस्थादर्या३विहायाश्चिकित्सन्ती मानुषाय क्षयाय॥ १॥**

पृथुः। रथः। दक्षिणायाः। अयोजि। आ। एनम्। देवासः। अमृतासः। अस्थुः।

कृष्णात्। उत्। अस्थात्। अर्या। विऽहायाः। चिकित्सन्ती। मानुषाय। क्षयाय॥ १॥

**पूर्वा विश्वस्माद्भुवनादबोधि जयन्ती वाजं बृहती सनुत्री।**

**उच्चा व्यख्यद्युवतिः पुनर्भूरोषा अगन्प्रथमा पूर्वहूतौ॥ २॥**

पूर्वा। विश्वस्मात्। भुवनात्। अबोधि। जयन्ती। वाजम्। बृहती। सनुत्री।

उच्चा। वि। अख्यत्। युवतिः। पुनःऽभूः। आ। उषाः। अगन्। प्रथमा। पूर्वऽहूतौ॥ २॥

---

### भाषायाम्.

१. दक्षिणायाः (=दक्षिणाया गोरिव दात्र्याः=उषसः) पृथू रथः (=विस्तीर्णो रथः) अयोजि (=अश्वयुक्तोभूत्)। एनं [रथम्] अमृतासः देवासः (=अमृता देवाः=मरणरहिता देवा) आ अस्थुः (=आरूढवन्तः)। अर्या (=पूजनीया) विहायाः (=महती) [उषा] मानुषाय क्षयाय चिकित्सन्ती (=मनुष्याणां वसतये प्रकाशितुम् इच्छन्ती सती) कृष्णाद् उद् अस्थात् (=नैशात् तमस उदितवती) [पश्य पश्य]॥

२. वाजं जयन्ती (=संग्रामेषु धनं जयन्ती) बृहती (=महती) सनुत्री (=दात्री) [एतादृश्युषा] विश्वस्माद् भुवनात् (=सर्वस्माद् भूतजातात्) पूर्वा (=प्रथमा) अबोधि (=जागृताभूत्)। पुनर्भूः (=पुनःपुनः=प्रतिदिनं जायमाना) युवतिः (=तरुणी) [सा] उच्चा व्यख्यत् (=उच्चैः प्रकाशितवती=उच्चैः स्वकिरणान् प्रक्षिप्तवती)। उषाः पूर्वहूतौ (=प्रभातकाले कृत आह्वाने=प्रभातकाले कृतायां देवोपासनायां) प्रथमा (=सर्वेभ्यो देवेभ्यः पूर्वा) आ अगन् (=आगतवती) [पश्य पश्य]॥

## सूक्त १२३.

ऋषि—कक्षीवान् (पूर्वसूक्ताचा जो कर्ता तोच). देवता—उषा. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [ हा पहा ] उषेचा विशाळ रथ जोडिला आहे. अमर देव त्याजवर बसले आहेत; [आणि] पूजनीय [आणि] महा [उषा] मनुष्यांच्या वसतीकरितां प्रकाशावें म्हणून काळोखांतून उगवत आहे.

२. धनांतें जिंकणारी, मोठी, [ आणि ] उदार [ उषा ] सकळ भुवनाच्या पूर्वी जागृत झाली आहे [पहा]. पुनः पुनः जन्मणारी, नित्यतरुण [ उषा ] उंच प्रकाशत आहे, [ आणि ] उषा पहांटेच्या उपासनेच्या वेळीं पहिलीच आली आहे [ पहा ].

## HYMN 123.

To *Ushas* (the dawn). By *Kakshîvân* (author of the previous hymn). Metre—*Trishtubh*.

1. The vast chariot of Ushas is yoked. The immortal Gods are seated in it. Venerable great Ushas, desiring to shine for the abodes of men, has risen from darkness.

2. She has awoke, the first of all creation—the winner of spoil, the great, the bounteous [Ushas]; the young damsel, born every day, has shot her rays high: Ushas has come first in the morning invocation.

---

१. हेंहि सूक्त कक्षीवान् ऋषीचेंच आहे. देवता मात्र उषा आहे.

ऋषि सुप्रभातीं उठून पूर्वेकडेस पाहून बोलत आहे असें समजलें पाहिजे: 'ही पहा उषा आपला रथ जोडून त्यांत सविता, पूषा इत्यादि देवांस बसवून, आम्हां मनुष्यांच्या, वसतींत प्रकाश पडावा म्हणून, अंधारांतून निघून प्रकाशतें प्रकाशत येत आहे.'

'अमर' = 'अमृतासः.' हें केवळ सहजोक्तिदर्शक विशेषण आहे. मरणारे असे कांहीं देव आहेत असें विवक्षित नाहीं.

वृत्तासाठी पहिल्या आणि दुसऱ्या चरणांच्या मध्यें 'अयोजि एनं' असें आणि तिसऱ्यांत 'अर्या 'च्या ठिकाणीं 'अरिआ' असें वाचावें लागतें.

२. 'युद्धांत उपासकांला धन जिंकून देणारी, आणि महोदार जी मोठी उषा, ती अजून सकळ जग निजलेंच आहे

यदद्य भागं विभजासि नृभ्य उषो देवि मर्त्यत्रा सुजाते ।
देवो नो अत्र सविता दमूना अनागसो वोचति सूर्याय ॥ ३ ॥

यत् । अद्य । भागम् । विऽभजासि । नृऽभ्यः । उषः । देवि । मर्त्यऽत्रा । सुऽजाते ।
देवः । नः । अत्र । सविता । दमूनाः । अनागसः । वोचति । सूर्याय ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. हे सुजाते ( =सुष्ठुजाते=उत्तमकुलवति ) देवि उषः, यद् ( =यस्मात् कारणात् ) [ त्वम् ] अद्य ( =अस्मिन् दिने ) मर्त्यत्रा ( =मर्त्येषु जनेषु ) नृभ्यः ( =अस्मभ्यं मनुष्येभ्यो ) भागं विभजासि ( =सौभाग्यं विभज्य ददासि ) अत्र ( =तस्मात् कारणात् ) दमूनाः ( =गृहमित्रभूतः ) सविता देवः ( =दीप्तिमान् सविता देवः ) नः ( =अस्मान् ) सूर्याय [ देवाय ] अनागसः वोचति ( =पापरहितान् ब्रवीतु= अस्मान् पापरहितान् सूर्यसमीपे यथा ब्रूयात् त्वं तथा कुरु ) ॥

सायणस्तु यद् यं भागं भजनीयं स्वकीयप्रकाशस्यांशं विभजासि । विभज्य ददासि । यद्वा मर्त्यत्रा मर्त्येषु मध्ये नृभ्यो यजमानेभ्यो देवानां भागं विभज्य ददासि । उषसि प्रवृत्तायां हविषो दीयमानत्वादुषसो दातृत्वमुपचर्यते । अत्रास्मिन् भागविषये दमूना......तादृशः सविता प्रेरको देवो नोऽस्मान् अनागसो वोचतु । अपापान् यागयोग्यान् ब्रवीतु । अनुगृह्णात्वित्यर्थः । किमर्थम् । सूर्याय । अस्मद्यागदेशं प्रति सूर्यस्यागमनार्थम् । इति ॥

इतक्यांत जागृत झाली आहे पहा. दरदिवस जन्माला येते तरी नित्य तरुण अशी उषा उगवून आपली प्रभा उंच आकाशांत फेकून देत आहे पहा. आणि मोठ्या पहांटेला उठून आम्ही ज्या निरनिराळ्या देवांची उपासना करीत आहों, त्यांतून एकटी उषाच सर्वां अगोदर म्हणजे सविता, अश्वी इत्यादिक देव पहांटेस येणारे आहेत तरी, त्यांच्या अगोदर आली आहे पहा.'

'उंच प्रकाशत आहे '=' उच्चा व्यख्यत्.' म्हणजे क्षितिजाच्या खालीं असून तेथून आकाशांत उंच प्रदेशीं पोंहचत अशा रीतीनें आपले किरण वर फेकून देत आहे. उषेचा अथवा अरुणाचा उदय ज्यांनीं लक्ष लावून पाहिला असेल, त्यांना हें वर्णन फार साहजिक दिसेल.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'विअख्यत्' असें व्यस्त म्हणावें लागतें.

३. हे देदीप्यमान सुजात उषे, ज्यापेक्षां तूं आज मर्त्यजनांत [आम्हां] मनुष्यांला सौभाग्य वांटून देत आहेस, त्यापेक्षां गृहमित्र सविता देव, आम्ही पापरहित आहों असें सूर्याला सांगे असें तूं कर.

3. Inasmuch as thou, O brilliant [and] high-born Ushas, art giving away good luck to [us] men among mortals today, so may brilliant Savitá, the household friend, [through thee] recommend us to Sûrya as being sinless.

३. भावार्थः—' हे उषे, तूं आज उगवून सर्वां आम्हांस आपला प्रकाश दाखवून सुखी करीत आहेस. तर इतका तुझा अनुग्रह आहे, त्यापेक्षां तूं सवित्या देवाला सांग की, आम्हीं अपाप आहों, आणि तसें सांगून त्याजकडून सूर्याला इकडे आणीव; तसें तूं न करशील तर कदाचित् सूर्य तूं नित्य आणितेस तो आज येणार नाहीं.'

' ज्यापेक्षां—त्यापेक्षां'='यद्—अत्र.' म्हणजे ' ज्यापेक्षां तूं आम्हां अनाथ मर्त्यांवर इतकी कृपा करितेस, आणि उगवून सुखी करितेस, त्यापेक्षां तूं सूर्याला घेऊन येण्याचा अनुग्रह करशील अशी आमची प्रार्थना आहे,' असें तात्पर्य.

' सुजात '=' सुजाते.' म्हणजे मोठ्या कुळांत जन्मल्याप्रमाणें उदार आणि थोर मनाची आणि दीनांवर उपकार करणारी, असा भावार्थ.

' सौभाग्य '=' भागम्.' म्हणजे प्रकाशरूपी, आणि प्रकाशापासून जो आनंद आणि भयरहितता हीं प्राप्त होतात तद्रूपी सौभाग्य.

या ऋचेंत केलेल्या प्रार्थनेच्या शब्दांवरून सविता आणि सूर्य हे निराळे असे दिसतात. सविता म्हणजे सूर्यावरची अधिकारिणी देवता, आणि सूर्य म्हणजे जो प्रकाशमान गोल तो, असा भेद बहुतकरून विवक्षित असतो.

वृत्तानुरोधेंकरून दुसऱ्या पादांत 'मर्तिअत्रा ' आणि चवथ्यांत ' सूरिआय' असें म्हटलें पाहिजे.

**गृहंगृहमहना यात्यच्छा दिवेदिवे अधि नामा दधाना ।**
**सिषासन्ती द्योतना शश्वदागादग्रमग्रमिद्भजते वसूनाम् ॥ ४ ॥**

गृहम्ऽगृहम् । अहना । याति । अच्छ । दिवेऽदिवे । अधि । नाम । दधाना ।
सिसासन्ती । द्योतना । शश्वत् । आ । अगात् । अग्रम्ऽअग्रम् । इत् । भजते । वसूनाम् ॥ ४ ॥

**भगस्य स्वसा वरुणस्य जामिरुषः सूनृते प्रथमा जरस्व ।**
**पश्चा स दघ्या यो अघस्य धाता जयेम तं दक्षिणया रथेन ५॥४**

भगस्य । स्वसा । वरुणस्य । जामिः । उषः । सूनृते । प्रथमा । जरस्व ।
पश्चा । सः । दघ्याः । यः । अघस्य । धाता । जयेम । तम् । दक्षिणया । रथेन ॥ ५ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. अहना (=सुन्दरी उषा) दिवेदिवे (=प्रतिदिनं) नामा (=नामानि रूपाणि) अधि दधाना (=धारयन्ती) गृहंगृहम् अच्छ (=प्रतिगृहं) याति (=गच्छति)। द्योतना (=द्योतनशीला दीप्तिमती) [उषाः] सिषासन्ती (=दातुमिच्छन्ती =दात्री) [सती] शश्वत् (=नित्यम्) आ अगात् (=आगच्छति) [अपि च] वसूनां (=हवीरूपाणां धनानाम्) अग्रमग्रम् इत् (=तत्तच्छ्रेष्ठभागं) भजते (=सेवते=स्वीकरोति) ॥

५. हे सूनृते उषः (=प्रियमधुरवचने उषो देवि), भगस्य स्वसा (=भगदेवस्य स्वसृभूता), वरुणस्य जामिः (=वरुणदेवस्य च स्वसा) [त्वं] प्रथमा जरस्व (=सर्वेभ्यो देवेभ्यः पूर्वं स्तुता भव)। यः [कोपि] अघस्य धाता (=पापस्य धर्ता =रात्रौ तवोषसोऽभावे निशायास्तमसि वर्तमानः अस्माकं हिंसको) [भवति] स पश्चा दघ्याः (=स पश्चाद्दघ्याः=पराङ्मुखः सन् गच्छतु=त्वां दृष्ट्वापगच्छतु)। तं दक्षिणया (=दक्षया सहायभूतया त्वया) रथेन (=तव रथेन=तव रथाविर्भवनेन) जयेम (=अपगमयेम) ॥

४. प्रतिदिनीं [निरनिराळीं] रूपें धारण करणारी सुंदर [उषा] प्रत्येक घरीं जाते. उदार देदीप्यमान उषा नित्य येत असते, [आणि] हविरन्नांचा पहिला पहिला भाग सेवन करीत असते.

4. Fair [Ushas] goes to every house, each day assuming new forms. Bounteous and fair Ushas comes daily [and] enjoys the first of every offering.

५. हे मधुरवचने उषे, भगाची स्वसा [आणि] वरुणाची बहीण [अशी जी] तूं, [ती] सर्वांच्या अगोदर स्तविली जा. जो [कोण] उपद्रव करणारा [होय], तो मागें हटो, त्याला [आम्ही] [तुज] उषेचें साहाय्य घेऊन [तुझ्या] रथाच्या योगानें जिंकूं [असें कर].

5. Sister of Bhaga [and] sister of Varuṇa, O sweet-voiced Ushas, be thou praised first. May he, who is the doer of evil, remain behind; may we conquer him with [thy] chariot through thee the liberal [Ushas].

४. 'उषा नित्य ताजीं रूपें घेऊन प्रत्येक घरीं येते, आणि ती नित्य येते, आणि देवांला अर्पण करावयाचीं जीं हव्यें, त्यांचे उत्तम उत्तम भाग सेवन करिते, कारण ती सर्वांच्या अगोदर येत असते.'

'उदार'='सिषासन्ती.' अथवा हविरन्न भक्षण्याची इच्छा करणारी, भक्षूं इच्छिणारी, असाहि अर्थ चांगला संभवतो.

'पहिला पहिला भाग'='अग्रम् अग्रम्.' कारण कीं उषा सर्वांच्या अगोदर मोठ्या पहाटेला येत असते.

[illegible] 'प्राति अग्र' असें पहिल्या [illegible] पाहावें.

५. 'हे मधुर भाषणारे उषे, भगदेवाची आणि वरुण देवाची बहीण अशी जी तूं, ती सर्व देवांच्या अगोदर आमचीं स्तवनें स्वीकारून घे. आमचें वाईट करणारा जो कोण असेल, तो मागें पडो, आणि उषेच्या साहाय्यानें आम्ही त्याला जिंकूं असें होओ,' असा भावार्थ.

भग आणि वरुण यांची बहीण असें उषेला म्हणण्याचें कारण उघड आहे. भग आणि वरुण हे दोघेहि सूर्याच्या पोटीं जन्मलेले होत आणि उषा सुद्धा सूर्याची कन्यका होय. सू. ४८ मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा. भग म्हणजे सूर्यरूपीच देव. वरुण म्हणजे रात्रिरूप देव. भग याविषयीं सू. १४ मं. [illegible] सू. ४४

उदीरतां सूनृता उत्पुरंधीरुदग्नयः शुशुचानासो अस्थुः ।
स्पार्हा वसूनि तमसापगूह्ळाविष्कृण्वन्त्युषसो विभातीः ॥ ६ ॥

उत् । ईरताम् । सूनृताः । उत् । पुरम्ऽधीः । उत् । अग्नयः । शुशुचानासः । अस्थुः ।
स्पार्हा । वसूनि । तमसा । अपऽगूह्ळा । आविः । कृण्वन्ति । उषसः । विऽभातीः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. सूनृताः ( =मधुरस्तोत्राणि ) उदीरताम् ( =उद्गच्छन्तु=उच्चार्यन्ताम् ) । पुरंधीः ( =पुरंधयः=हविर्दानरूपाणि कर्माणि ) उद् [ ईरताम् ] ( =उद्गच्छन्तु=समारब्धानि भवन्तु ) । [ अपि च ] शुशुचानासः ( =शुशुचानाः=अत्यन्तं दीप्यमाना ) अग्नयः ( =आहवनीयादयः ) उद् अस्थुः ( =उत्तिष्ठन्तु=प्रज्वलन्तु ) । विभातीः उषसः ( =विभात्य उषसः=दीप्तिमत्य उषसः=नानादेशेषु समानेहनि उद्गच्छन्त्य उषसः ) तमसा अपगूह्ळा ( =अन्धकारेण अपगोपितानि ) स्पार्हा ( =स्पार्हाणि =स्पृहणीयानि=श्रेष्ठानि ) वसूनि ( =वस्तूनि ) आविष्कृण्वन्ति ( =प्रकटीकुर्वन्ति ) [ हि ] ॥

मं. ८ इत्यादि स्थळें पहा.

'सर्वांच्या अगोदर स्तविली जा '= ' प्रथमा जरस्व.' म्हणजे सविता इत्यादिक जे इतर देव, ते तुझ्या नंतर येणारे, तूंच प्रथम येणारी, म्हणून तुझेंच स्तोत्र आम्ही प्रथम करीत असतों.

' उपद्रव करणारा मागें हटो '=' अघस्य धाता पश्चा दध्याः.' म्हणजे रात्रीच्या अंधकारात फिरून आमचें अकल्याण करूं इच्छिणारा जो असेल तो. सू. ४८ मं. ८ पहा. ( अप द्वेषो...अप स्रिधः मघोनी उच्छत् इ० ). उषा आपल्या तेजःपुंज रथांत बसून उगवतांच पिशाच, निशाचर आणि चोरटे पळून जातात या गोष्टीस उद्देशून ऋषीचें म्हणणें आहे.

६. मधुर स्तोत्रें उच्चारिलीं जाओत. हविर्दानें सिद्ध होओत. तेजःपुंज अग्नि प्रज्वलित होओत. [कारण कीं] अंधकारानें झांकलेल्या उत्तम उत्तम पदार्थांस देदीप्यमान उषा प्रगट करीत आहेत.

6. Let sweet hymns be sung; let oblations be poured out; let the brilliant fires be kindled. [For] the bright Ushases are manifesting the excellent creation, that was shrouded by darkness.

६. 'हे मित्र हो, ही पहा उषा उगवून, ज्या अंधकारानें सर्व भुवनाला रात्रीं झांकून ठेविलें होतें, त्यास आपल्या प्रकाशानें प्रगट करीत आहे. तर तुम्ही उठा आणि मधुर गायनें गा, हव्यें अर्पण करा, तेजःपुंज अग्नि पेटवा' असें ऋषि आपल्या जवळच्यांस म्हणत आहे. उषेचा उदय होत आहे असें पाहून ऋषि बोलत आहे, असें समजलें पाहिजे.

'उषा प्रगट करीत आहेत'=' उषसः आविष्कृण्वन्ति.' 'उषसः' हें बहुवचन जेव्हां येतें, तेव्हां बहुतकरून दररोजची एक एक उषा मिळून ज्या अनेक उषा त्या, किंवा दररोज येणारी जी उषा ती, असा अर्थ होत असतो. पण येथें एकवचन असावें असें असतां, अनेकवचन योजिलें आहे, तें वेगवेगळ्या प्रदेशांत एकाच दिवसीं उगवणाऱ्या ज्या उषा त्या, अशा संबंधानें योजिलें आहे असें वाटतें.

वृत्तासाठीं 'आविष्कृण्वन्ति उषसो' असें चवथ्या चरणांत म्हटलें पाहिजे.

अपान्यदेत्यभ्य१न्यदेति विषुरूपे अहनी सं चरेते ।
परिक्षितोस्तमो अन्या गुहाकरद्यौदुषाः शोशुचता रथेन ॥ ७ ॥

अप । अन्यत् । एति । अभि । अन्यत् । एति । विषुरूपे इति विषुऽरूपे । अहनी इति । सम् । चरेते इति ।
परिऽक्षितोः । तमः । अन्या । गुहा । अकः । अद्यौत् । उषाः । शोशुचता । रथेन ॥ ७ ॥

सदृशीरद्य सदृशीरिदु श्वो दीर्घं सचन्ते वरुणस्य धाम ।
अनवद्यास्त्रिंशतं योजनान्येकैका क्रतुं परि यन्ति सद्यः ॥ ८ ॥

सऽदृशीः । अद्य । सऽदृशीः । इत् । ऊम् इति । श्वः । दीर्घम् । सचन्ते । वरुणस्य । धाम ।
अनवद्याः । त्रिंशतम् । योजनानि । एकाऽएका । क्रतुम् । परि । यन्ति । सद्यः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. [अह्नोः =अहोरात्रयोः=रात्र्युषसोर्मध्ये] अन्यत् ( =एकं=रात्रिरूपम् ) अप एति ( =अपगच्छति ) अन्यत् ( =अपरम्=उषोरूपम् ) अभि एति ( =आभिमुख्येन गच्छति=आगच्छति ) । [ एवं सत्यपि ] विषुरूपे ( =भिन्नरूपे=कृष्णशुक्लवर्णयुक्तत्वेन नानाविधस्वरूपे ) अहनी ( =रात्र्युषसौ ) सं चरेते ( =सहैव चरतः=एकत्रैव तिष्ठतः ) । परिक्षितोः ( =पर्यायेण वसतो रात्र्युषसोर्मध्ये ) अन्या ( =रात्रिस् ) तमः (=अन्धकारं) गुहा (=गुहायां=गुहासदृशेषु सर्वेषु स्थलेषु ) अकः (=करोति=स्थापयति ) [ अन्या ] उषाः शोशुचता ( =अत्यन्तं दीप्तिमता ) रथेन अद्यौत् (=प्रकाशते=सर्वान् भावान् प्रकाशयति ) ॥

८. [ नानाप्रदेशेषु प्रकाशमानाः सर्वा अपि उषसः ] अद्य सदृशीः ( =सदृश्यः [illegible] परस्परमेकरूपा एव ) [ भवन्ति ] उ ( =उत=अपि च ) श्वः ( =अपरस्मिन् [illegible] आगामिनि दिनेपि ) सदृशीः इत् ( =सदृश्य एव ) [ भविष्यन्ति ] । [ उषसः ] वरुणस्य (=रात्र्यभिमानिनो देवस्य) दीर्घं धाम (=विषयं पन्थानं) सचन्ते ( =[illegible] =अनुगच्छन्ति ) । अनवद्याः ( =दोषरहिताः ) [ उषसः ] एकैका [illegible] नानि [ इति वेगेन ] सद्यः ( =एकस्मिन्नेव दिने ) क्रतुं ( [illegible] वरुणस्य प्रदेशं ) परि यन्ति ( =परितो गच्छन्ति=[illegible] ) ॥

७. [रात्र आणि उषा यांतून] एक निघून जाते [आणि] दुसरी येते; भिन्नरूपी [असतांहि] रात्र आणि उषा ह्या एकत्र संचार करितात. पर्यायानें वर्तणाऱ्या ज्या रात्र आणि उषा, त्यांतून एकजण खांचकोपऱ्यांत अंधकार भरून ठेविते, [आणि] उषा [ही] देदीप्यमान रथांत बसून प्रकाशते.

८. आज [सर्व उषा] एकसारिख्या [आहेत] [आणि] उद्यांहि एकसारिख्याच [असतील]. [त्या उषा] वरुणाच्या लांब मार्गानें जातात. निर्दोषी [अशा ज्या उषा, त्यांतून] एकेक तीस तीस योजनें, याप्रमाणें प्रबळ [वरुणा]च्या सभोंतालीं एक दिवसांत प्रदक्षिणा करितात.

7. One of the two recedes, the other comes forward: different in form both night and Ushas move together. Of the two who live by turns, one fills all hollows with darkness, [the other], Ushas, shines with [her] brilliant car.

8. [All Ushases are] alike today and [they will be] alike even tomorrow. They follow the long course of Varuṇa. Pure [Ushases] go round [the province of] mighty [Varuṇa] in a single day at thirty leagues each.

---

७. 'रात्र आणि उषा ह्यांतून एक, (म्हणजे रात्र), मागें जाते; आणि दुसरी, म्हणजे उषा, ही रात्र जातांच पुढें येते. आणि उषा व रात्र ह्या दोघी भिन्नरूपाच्या आहेत. तथापि त्या एकमेकींजवळच राहतात—एकत्रच जणुं राहतात. एकामागून एक अशा क्रमानें चालणाऱ्या ज्या रात्र आणि उषा, त्यांतून एक (म्हणजे रात्र) आली म्हणजे, ती सर्व खांच खळगे अंधारमय करून टाकिते; आणि रात्र जाऊन उषा आली, म्हणजे आपल्या तेजस्वी रथाच्या योगानें तो सर्व अंधार नाहींसा करून टाकिते.'

'एकत्र संचार करितात'='सं चरेते.' म्हणजे रात्रीला लागून उषा, आणि उषेला लागून रात्र असते; दोघींमध्यें व्यवधान नाहीं; म्हणून दोघी एकत्र संचार करितात असें म्हटलें आहे.

'पर्यायानें वर्तणाऱ्या'='परिक्षितोः.' म्हणजे एक गेल्यावर दुसरी येते, ती गेल्यावर पुनः पहिली येते अशा क्रमानें वर्तणाऱ्या.

जानत्यह्नः प्रथमस्य नाम शुक्रा कृष्णादजनिष्ट श्वितीची ।
ऋतस्य योषा न मिनाति धामाहरहर्निष्कृतमाचरन्ती ॥ ९ ॥

जानती । अह्नः । प्रथमस्य । नाम । शुक्रा । कृष्णात् । अजनिष्ट । श्वितीची ।
ऋतस्य । योषा । न । मिनाति । धाम । अहःऽअहः । निःऽकृतम् । आऽचरन्ती ॥ ९ ॥

एकैवोषा नानादेशेषु यतः कारणाद् उदेति अतः कारणात् तस्या बहुत्वम् । एवं बहुत्वमाप्ताः सर्वा उषसः परस्परं यथाद्य सदृश्यो भवन्ति तथैव श्वोपि परस्परं सदृश्य एव भविष्यन्ति । ता अन्धकारस्याधिदेवस्य वरुणस्य विषये प्रदक्षिणं कुर्वन्ति । एकैका त्रिंशद्योजनानि प्रकाशते । एवं सर्वा अपि बलवतो वरुणस्य आन्धतमसपथमनु एकस्मिन् दिने प्रदक्षिणं कुर्वन्तीत्यर्थः ॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान । अद्यास्मिन्नहनि सदृशीरित् परस्परं सदृश्य एव । तथा श्व इत् परस्मिन्नप्यहनि सदृशीः परस्परं सदृश्य एव । उशब्दोऽपिशब्दार्थः । इच्छब्द एवार्थः । अद्यतन्योऽपि श्वस्तनीभिः सदृश्यः श्वस्तन्यश्चाद्यतनीभिः । एवमहरन्तरेण सादृश्यम् । कथं सादृश्यमिति तदुपपाद्यते । यदा नक्षत्राणि न दृश्यन्ते सूर्यश्च नोदेति उषसः स कालः । स चैकत्रिंशतिघटिकाभिः षड्विंशतिपराभिश्च संमितः । सूर्यो हि प्रतिदिनमेकोनषष्ट्यधिकपञ्चसहस्रयोजनानि मेरुप्रादक्षिण्येन परिभ्रमति । तथा सति यत्र यत्र लङ्कादिभूप्रदेशे सूर्यो गच्छति । तस्य तस्य पुरस्तात्त्रिंशद्योजनमुषा अपि गच्छति । सूर्यो यस्मिन् देशे गच्छति तत्र त्रिंशद्योजनं पुरस्ताद्देशस्थितानामुदिता दृश्यते । एवं सर्वप्रदेशेष्वपि । तथोषा अपि यत्र गच्छति ततः पुरस्तात्त्रिंशद्योजनभूभागवर्तिनामुदिता दृश्यते । एवं लङ्कादिसर्वप्रदेशस्थितानामप्युषस उदयोऽवगन्तव्यः । एवं च सत्येकस्मिन्भूभागे यावत्कालं यथोषाः प्रकाशयति तथा भूभागान्तरेऽपि तावन्तं कालं प्रकाशयति । एवमुक्तरीत्यैकस्मिन्नेवाहनि सर्वप्रदेशवर्तिनामप्युषसः सदृश्यः। प्रदेशबाहुल्यमपेक्ष्योषसां बहुत्वाद्बहुवचनम् । एवमेकरूपा उषसोऽनवद्याः शुभ्राः । तासामुदयात्सर्वे भावा अनवद्या भविष्यन्ति किमु वक्तव्यं तासामनवद्यत्वे । दीर्घमुक्तरीत्यात्यन्तमायतं वरुणस्य तमोनिवारकस्य सूर्यस्य धाम स्थानं मेरुवलयं सचन्ते । प्रतिदिनं सेवन्ते । कियद्दूरमिति तदुच्यते । त्रिंशतं योजनानि । त्रिंशद्योजनानि पुरतः । सूर्यो यत्र यत्रोदेति ततस्ततस्त्रिंशद्योजनं पुरस्ताद्[illegible] । किञ्च । आसां मध्य एकैकोषा लङ्कादेकैकभूभागवर्तिनां क्रतुं गमना[illegible]

९. दिवसाचें प्रथमचें दर्शन जाणणारी अशी जी प्रकाशणारी गौरवर्णी उषा, ती काळ्या [अंधकारां]तून जन्मते आहे पहा. तरुण [उषा], उपासनेच्या कामाला बाध आणीत नाहीं; तर प्रतिदिवसीं [आमच्या] घरीं येत असते.

9. Knowing the first appearance of day, fair Ushas is born shiningly out of darkness. She fails not the law of the truthful rite, coming to the house from day to day.

---

वृत्तासाठीं पहिला चरण 'अपान्यदेति अभि अन्यदेति' असा म्हणावा लागतो.

८. 'निरनिराळ्या देशांत उगवणाऱ्या ज्या उषा त्या जशा आज एकमेकींसारिख्याच आहेत, तशाच उद्यांहि एकमेकींसारिख्याच असणार. आकाशाच्या पोकळीमधून पसरलेला जो वरुणाचा (अंधाराच्या देवतेचा) मार्ग, त्या मार्गानें ह्या उषा प्रदक्षिणा करितात. कोणत्या तरी एका ठिकाणीं उषा उगवली म्हणजे, तिचा प्रकाश तीस योजनेंपर्यंत पडतो. तेथून दुसरीं तीस योजनेंपर्यंत दुसरी उषा उगवते; तेथून पुनः तिसरीं तीस योजनेंपर्यंत तिसरी उषा. तर प्रत्येक उषा तीस योजनें याप्रमाणें ह्या सर्व उषा मिळून महाबल वरुणाच्या मार्गानें प्रदक्षिणा करितात' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

'वरुणाच्या लांब मार्गानें'=' दीर्घं वरुणस्य धाम.' जसा सूर्य आकाशांत आकाशाभोंवतालीं पूर्वेकडून पश्चिमेकडेस प्रदक्षिणा करितो, तसा वरुण म्हणजे रात्रिरूप जो देव, तोहि प्रदक्षिणा करितो असें समजत आहे. तर ज्या मार्गानें [illegible] प्रदक्षिणा करितो त्याच मार्गानें उषाहि प्रदक्षिणा करितात असें ऋषि म्हणतो. सूर्याच्या मार्गानें असें म्हटलें असतें तरी चाललें असतें, पण सूर्याच्या मागून उषा जाते असें दिसत नाहीं, वरुणाच्या (रात्रीच्या) मागून जाते असें दिसतें, म्हणून वरुणाच्या मार्गानें असें म्हटलें आहे.

'एकेक तीस तीस योजनें याप्रमाणें'=' त्रिंशतं योजनानि एकैका.' 'योजन' म्हणजे किती अंतर घ्यावयाचें तें समजत नाहीं. अंतरवाचक 'योजन' शब्द ज्यांत आला आहे, तीं स्थळें सर्व वाचून पहातां, योजन म्हणजे किती अंतर वेदाच्या वेळीं समजत त्याचा निर्णय होत नाहीं.

'निर्दोषी'= 'अनवद्याः.' म्हणजे शुद्ध कांतीच्या. ज्यांच्या अंगाला कशाचाच डाग नाहीं त्या. 'सुंदर' इतकाच पर्यवसानीं अर्थ आहे.

'प्रबळ [वरुणा]च्या सभोंताली'= 'क्रतुं परि.' 'क्रतु' हें विशेषण 'प्रबळ,' 'समर्थ' या अर्थी निरनिराळ्या देवांस ऋक्संहितेंत लाविलेलें आढळतें.

वृत्तासाठीं तिसऱ्या आणि चवथ्या चरणाच्या मध्यें 'योजनानि एकैका' असें निरनिराळें वाचलें पाहिजे.

---

[illegible] दिवसाचा अगदी प्रथमचा भा- | [illegible] होतो हें जसें एकाद्या पु-

**कन्येव तन्वा३ शाशदानाँ एषि देवि देवमियक्षमाणम् ।**
**संस्मयमाना युवतिः पुरस्तादाविर्वक्षांसि कृणुषे विभाती १०॥५॥**

कन्याऽइव । तन्वा । शाशदाना । एषि । देवि । देवम् । इयक्षमाणम् ।
सम्ऽस्मयमाना । युवतिः । पुरस्तात् । आविः । वक्षांसि । कृणुषे ।
विऽभाती ॥ १० ॥ ९ ॥

तद्विषयां प्रज्ञां वा । तथा च निरुक्तम् । क्रतुं दधिक्राः कर्म वा प्रज्ञां वा । नि० २.२८ । इति । सूर्यस्तदानीमेव स्वोदयकाल एव परियन्ति । परितो गच्छन्ति । निर्वहन्तीत्यर्थः । तत्तद्भूभागविशेषेण सूर्यस्योदयो ज्योतिःशास्त्रे प्रदर्शितः । उदयो यो लङ्कायां सोऽस्तमयः सवितुरेव सिद्धपुरे । मध्याह्नो यमकोट्यां रोमकविषयेऽर्द्धरात्रः स्यादिति ॥

९. प्रथमस्य ( =उद्गतः ) अह्नः ( =दिवसस्य ) नाम ( =रूपं=प्रभातकाले प्रकटीभवतो दिवसस्य प्रथमं किंचिदेव प्रकाशमानं दर्शनं ) जानती ( =अवगच्छन्ती= दिवसो यदोदेतुमारभते तं कालं बोधन्ती ) श्वितीची (=प्रकाशवती ) शुक्रा (=स्वयं दीप्ता ) [ उषाः ] कृष्णात् ( =कृष्णवर्णाद् ) [ अन्धकाराद् ] अजनिष्ट ( =उज्जातास्ति ) [ पश्य पश्य ] । [ एषा ] योषा ( =तरुणी उषा ) ऋतस्य धाम ( =सत्यभूताया यज्ञाद्युपासनायाः कर्म अमुकस्मिन्कालेमुकः कर्मभाग आचरितव्य इति यो नियमस्तं ) न मिनाति ( =न हिनस्ति ) [ तांहं परिपालयति ] । [ सा हि ] अहरहः ( =प्रतिदिनं ) निष्कृतं ( =स्थानम्=अस्माकं गृहं प्रति ) आचरन्ती ( =आगच्छन्ती ) [ भवति ] ( =यज्ञादीनि प्रभाते कर्तव्यान्युपासनाकर्माणि कारयितुं स्वकाले नित्यमागच्छति ) ॥

## भाषायाम्.

१०. कन्येव ( =कमनीया प्रगल्भा स्त्रीव ) तन्वा शाशदाना ( =शरीरेण शाशद्यमाना=स्पष्टतां प्राप्नुवती ) [ त्वं ] हे देवि, देवं ( =देवजनं=देवान् ) इयक्षमाणं ( =सेवितुमिच्छन्तं पुरुषं प्रति ) एषि ( =गच्छसि ) । युवतिः [ इव ] ( =यौवनोपेता स्त्रीव ) संस्मयमाना ( =सम्यक् स्मयमाना=ईषद्धसन्ती ) विभाती (=भास्वती ) [ त्वं ] पुरस्तात् ( =जनानां पुरतो ) वक्षांसि ( =स्तनाद्यवयवान् ) आविष्कृणुषे ( =आविष्कुरुषे=प्रकटीकरोषि ) ॥

१०. हे देवी, तूं देवांला भजणाऱ्या [जना]प्रत [एकाद्या] तरुणीप्रमाणें [आपले] अवयव स्पष्टपणें प्रगट करीत करीत येत असतेस. तेजस्वी [अशी जी तूं, ती] सुंदर रीतीनें हास्य करून [आपले] स्तनावयव [एकाद्या] तरुणी[प्रमाणें] उघडे करून दाखवीत असतेस.

10. Proudly manifesting thy person like a young damsel thou comest, O goddess, to the man who worships the gods. Smiling beautifully like a young woman thou, bright Ushas, dost exhibit [thy] breasts.

हकामांत दक्ष असलेल्या तरुणीला ठाऊक असतें, तसें हिला ठाऊक असतें. आणि ही गौरवर्ण उषा काळ्या अंधारांतून प्रकाशत प्रकाशत येते. आणि जशी एकादी तरुण स्त्री उपासनकर्मांला व्यत्यय येऊं नये म्हणून मोठ्या पहांटेस उठून सर्व सिद्धता करिते, तशी उषा सर्व सिद्धता करण्यासाठीं पहांटेस सर्वांचे घरीं येते; त्यामुळें उपासनेचें कर्म वेळच्या वेळेवर होत असतें, त्याला प्रत्यवाय येत नाहीं.

'दिवसाचें प्रथम दर्शन'='अह्नः प्रथमस्य नाम.' अक्षरार्थ 'प्रथम दिवसाचें दर्शन' असा आहे. कोमळ प्रकाश जो मोठ्या पहांटेला फांकूं लागतो, तो विवक्षित आहे.

'बाध आणीत नाहीं'='न मिनाति.' ऋ. ७. ७६. ५ याजवरील भाष्यांत 'मिनन्ति' शब्दाचा अर्थ काय केला आहे पहा.

'घरीं येत असते'='निष्कृतम् आचरन्ती.' 'निष्कृत' शब्दाविषयीं ऋ. ९. १५. १; ९. ६१. २५; ९. ६४. १५; ९. ६९. ४ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. आणि 'येत असते' असा जो 'आचरन्ती' याचा अर्थ केला आहे, त्याविषयीं ऋ. १०. ३५. ६ (उषसः आ चरन्तु=आगच्छन्तु) याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तानुरोधेंकरून प्रथम चरणांत 'जानती अह्नः' असें संधिव्यस्त वाचावें लागतें.

१०. 'देवभजक जे लोक असतील, त्यांजपुढें तूं एकाद्या सुंदरांगी स्त्रीप्रमाणें येऊन उभी राहतेस; त्यांजपुढें तूं तरुण स्त्रीप्रमाणें आपले अवयव हांसत हांसत थोडथोडे प्रगट करीत असतेस.'

'देवांला भजणाऱ्या [जना]प्रत'='देवम् इयक्षमाणम्.' अथवा दीप्तिमान् (देवम्) उपासक जनाप्रत असाहि अर्थ होऊं शकेल.

सुसंकाशा मातृमृष्टेव योषाविस्तन्वं कृणुषे दृशे कम् ।
भद्रा त्वमुषो वितरं व्युच्छ न तत्ते अन्या उषसो नशन्त ॥ ११ ॥

सुऽसंकाशा । मातृमृष्टाऽइव । योषा । आविः । तन्वम् । कृणुषे । दृशे । कम् ।
भद्रा । त्वम् । उषः । विऽतरम् । वि । उच्छ । न । तत् । ते । अन्याः । उषसः । नशन्त ॥ ११ ॥

---

सायणस्तु तन्वा । ...... । शाशदानः शाशाद्यमानः । नि० ६ · १६ । इति यास्कः । कन्येव कमनीया कन्यकेव । कन्या कमनीया भवति ...... इति यास्कः । सा यथा जनान्तिके विवसना संचरति तथा हे उषस्त्वं कन्या कमनीया प्रगल्भा सती तन्वा शरीरेण शाशदाना स्पष्टतां गच्छन्ती दृश्यसे । पश्चात्प्रगल्भा सती हे देवि देवनशील इयक्षमाणं यष्टुमिच्छन्तमभिमतं दातुमिच्छन्तं वा देवं द्योतनस्वभावं सूर्यरूपं प्रियमेषि । गच्छसि । ततः पश्चात् युवतिर्यौवनोपेता सती पुरस्तात्परयुः सूर्यस्य पुरतः संस्मयमाना समीषद्धसन्ती हास्यं कुर्वती विभात्यत्यन्तं भासमाना वक्षांसि वक्षसोपलक्षितानवयवानाविष्कृणुषे । प्रकटीकरोषि । यद्वा युवतिरिति लुप्तोपमा । यथा लोके प्रगल्भा योषित् पुरस्तात्प्रियतमस्य पुरतः संस्मयमाना दन्तप्रदर्शनायेषद्धसनं कुर्वती...... । यद्वा पुरस्तात्पूर्वस्यां दिशि संस्मयमाना स्मितोपमप्रकाशं कुर्वती युवतिः सर्वेषु भावेषु मिश्रणशीला वक्षांसि । वक्ष इति रूपनाम । दन्तस्थानीयानि नीलपीतादीनि रूपाण्याविष्करोषि । इति ॥

---

## भाषायाम्.

११. मातृमृष्टा (=मात्रा शुद्धीकृता=स्नापिता) [ अत एव] सुसंकाशा (=सुष्ठु शोभमाना ) योषेव ( =तरुणी स्त्रीव) दृशे कं ( =दर्शनाय=यथा त्वां जनाः पश्येयुस्तथा ) तन्वम् आविष्कृणुषे ( =शरीरं=शरीरावयवान् आविष्कुरुषे=प्रकटीकरोषि ) । [ तस्मात् ] हे उषः, भद्रा ( =कल्याणी ) त्वं वितरं (=विप्रकृष्टं यथा भवति तथा ) वि उच्छ ( =अन्धकारं विवासय ) । तत् ते ( =तव तत् व्युच्छनं=तमोविवासनम् ) अन्या उषसः ( =अतीता आगामिन्यश्चोषसः ) न नशन्त ( =न प्राप्नुयुः=

११. [एकाद्या] आईनें न्हाऊं घातलेल्या, [ आणि ] [ तेणें-करून ] सुशोभित दिसणाऱ्या तरुणीप्रमाणें [ तूं आपली ] अंग[शोभा ] [ जनांस ] दिसावी म्हणून प्रगट करितेस. [ तर ] हे उषे, सौभाग्यवती [जी ] तूं, [ती] दूरवर प्रकाश, [अशी] कीं दुसऱ्या उषा [ तुझी ] बरोबरी करूं शकणार नाहींत.

11. Like a young damsel, bathed by her mother and decorated [ with ornaments ], thou dost exhibit [ thy ] person that it may shine. Shine thou auspicious one, O Ushas, far and wide, so that other Ushases may never equal thee.

' आपले अवयव स्पष्टपणें प्रगट करीत करीत '=' तन्वा शाशदाना.' अक्षरशः अर्थ, 'शरीरानें अतिस्पष्टता पावलेली' अशी तूं. म्हणजे जिचे अवयव टटटटून जणूं बाहेर फुटले आहेत अशी जी तूं, ती.

वृत्तासाठीं पहिल्या चरण ' कन्या इव तनुआ शाशदाना ' असा म्हटला पाहिजे.

११. एकादी तरुण कन्या आईनें न्हाऊं घातली, आणि अलंकारांनीं शोभविली, म्हणजे जशी शोभते, तशी तूं शोभतेस, आणि लोकांनीं तुझें सुंदर स्वरूप पहावें म्हणून तूं तें प्रगट करितेस. तर हे उषे, तूं दूरवर प्रकाशून अंधकाराला हाकून लाव, कीं जेणेंकरून आजपर्यंत होऊन गेलेल्या आणि पुढें येणाऱ्या उषा तुझी बरोबरी करूं शकणार नाहीत.'

' दिसावी म्हणून '=' दृशे.' अक्षरार्थ दिसण्यासाठीं इतका आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' आविस्तनुअं ' आणि तिसऱ्यांत ' वि उच्छ ' असें वाचलें पाहिजे.

**अश्वा॑वती॒र्गोम॑ती॒र्वि॒श्ववा॑रा॒ यत॑माना॒ र॒श्मिभि॒ः सूर्य॑स्य ।**
**परा॑ च॒ यन्ति॒ पुन॒रा च॑ यन्ति भ॒द्रा नाम॒ वह॑माना उ॒षास॑ः ॥१२**

अश्व॑ऽवतीः । गोऽम॑तीः । वि॒श्वऽवा॑राः । यत॑मानाः । र॒श्मिऽभि॑ः ।
सूर्य॑स्य ।
परा॑ । च॒ । यन्ति॑ । पुन॑ः । आ । च॒ । य॒न्ति॒ । भ॒द्रा । नाम॑ । वह॑मा-
नाः । उ॒षस॑ः ॥ १२ ॥

---

यथा न प्राप्नुवन्ति त्वं तथा व्युच्छ ) ॥

मातृमृष्टेत्यत्र मातृभिर्जननीभिः शुद्धीकृता...... । यथा लोके मात्रादिना स्वलंकृतात्यन्तं शोभना सती स्वकीयं लावण्योपेतं सर्वशरीरं दर्शनायाविष्करोति तद्वत्त्वमपीत्यर्थः । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

१२. अश्वावतीः ( =अश्ववत्यः=अनेकैरश्वैरुपेता ) गोमतीः (=गोभिः संपन्ना ) विश्ववाराः ( =विश्वैर्वरणीयाः=सकलप्रियाः ) सूर्यस्य रश्मिभिः ( =किरणैर् ) यतमानाः ( =संगच्छमानाश्च ) [ इत्येतादृश्य ] उषसः भद्रा नाम वहमानाः ( =भद्राणि कल्याणानि नाम नामानि रूपाणि धारयन्त्यः ) [ सत्यः ] परा च यन्ति पुनरा च यन्ति ( =परागच्छन्ति पुनरागच्छन्ति च ) ॥

सूर्यस्य रश्मिभिर्यतमाना इत्यत्र सूर्यरश्मिभिः साकं तमोनिवारणाय प्रयत्नं कुर्वाणाः । यद्यपि सूर्यरश्मय एव जगत्प्रकाशनाय प्रभवन्ति तथापि सूर्योदयात्पूर्वं तमोनिवारणस्यापेक्षितत्वात्तासामपि प्रयतनमविरुद्धम् । रश्मिदेवता अपि प्रकाशिका इत्यर्थः । इति सायणः ॥

१२. अश्वसंपन्न, गोसंपन्न, जगत्प्रिय, [आणि] सूर्याच्या किरणांशीं मिळून जाणाऱ्या [ अशा ज्या ] उषा, [त्या] कल्याणकारक रूपें धारण करीत निघून जातात, आणि पुनः परत येतात.

12. Rich in horses, rich in cows, dear to the world, [and] uniting with the rays of the sun, the Ushases depart and come back again, assuming auspicious forms.

---

१२. ' ज्यांच्या पदरीं अश्वांची आणि गाईची संपत्ति भरली आहे, ज्या सकळांस प्रिय होत, आणि ज्या शेवटीं सूर्यकिरणांला मिळून जातात, त्या उषा नित्य सौभाग्यपूर्ण रूपें धारण करीत करीत जातात, आणि पुनः येत असतात,' असा भावार्थ.

' सूर्याच्या किरणांशीं मिळून जाणाऱ्या '=' सूर्यस्य रश्मिभिर्यतमानाः.' म्हणजे, सूर्यकिरणांत ज्या शेवटीं पर्यवसान पावतात त्या. सायणांनीं अर्थ निराळा केला आहे, पण ' सूर्यस्य रश्मिभिः यतमानः ' असें अग्नीला एक दोन मंत्रांत म्हटलें आहे त्यावरून ( ऋ. १०. ६२. ११ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्यहि पहा ) आम्हीं, कितीएक पाश्चात्त्यांस अनुसरून, दिलेला अर्थ आधारबद्ध दिसतो.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ' सूरिअस्य ' असें म्हणावें लागतें.

ऋतस्य रश्मिमनुयच्छमाना भद्रंभद्रं क्रतुमस्मासु धेहि।
उषो नो अद्य सुहवा व्युच्छास्मासु रायो मघवत्सु च स्युः १३॥६
ऋतस्य। रश्मिम्। अनुऽयच्छमाना। भद्रम्ऽभद्रम्। क्रतुम्। अस्मासु। धेहि।
उषः। नः। अद्य। सुऽहवा। वि। उच्छ। अस्मासु। रायः। मघवत्ऽसु। च। स्युरिति स्युः॥ १३॥ ६॥

## भाषायाम्.

१३. ऋतस्य (=सत्यभूतस्य यज्ञस्य=यज्ञादिरूपाया उपासनाया) रश्मिम् अनुयच्छमाना (=प्रग्रहं धारयन्ती=फलजनकमार्गेण यज्ञादिरूपामुपासनामस्माभिः कारयन्ती) [त्वम्] अस्मासु भद्रंभद्रं (=तत्तत्कल्याणं=सर्वं कल्याणं) क्रतुं (=प्रज्ञां=कर्मविषयां बुद्धिं) धेहि (=स्थापय)। हे उषः, सुहवा (=शोभनाह्वाना=सुखेनाहूयमाना=आह्वानसुलभा) [त्वम्] अद्य (=अस्मिन् दिने) नः (=अस्मदर्थं) वि उच्छ (=विविधं=विस्तीर्णं यथा भवति तथा विवासय=तमो निवारय=प्रकाशस्व) [अपि च] अस्मासु [स्तोतृषु] मघवत्सु (=हविर्लक्षणधनयुक्तेषु=यजमानेषु) च रायः (=संपदः) स्युः (=यथा भवेयुरत्वं तथा कुरु)॥

ऋतस्य रश्मिम् अनुयच्छमानेत्यत्र ऋतस्य सत्यभूतस्य रश्मिं रश्मीन् अनुयच्छमानानुकूल्येन प्रवर्तमाना त्वम्......। हविर्लक्षणधनयुक्तेष्वस्मासु यजमानेषु रायश्च स्युः। बहुविधानि धनानि संभवन्त्विति पूर्वोक्तेन क्रतुना सह समुच्चयार्थश्चशब्दः। इति सायणः॥

१३. उपासनेचा लगाम धारण करणारी अशी जी तूं, ती चांगल्या चांगल्या बुद्धि आमच्या आंगीं घाल. हे उषे, आह्वानसुलभ अशी जी तूं, ती आम्हांसाठीं आज प्रकाश, आणि आमचे घरीं आणि यजमानांचे घरीं संपत्ति राहतील असें कर.

13. Holding the rein of the rite, inspire thou into us every auspicious desire. Shine thou easily invoked one, O Ushas, for us to-day. May there be riches in our house as well as in [ that of the ] sacrificers.

१३. हा या सूक्ताचा येथें उपसंहार झाला. यांत ऋषीनें अभीष्ट वर मागितला आहे. तो म्हणतो:–' पहांटेस येऊन उपासनाकर्मरूप घोड्याचा लगाम धरून जणुं त्याला चालविणारी जी तूं, ती आमचे आंगीं सर्व कल्याण बुद्धि प्रवेशतील असें कर. तूं भक्तांची हाक सहज ऐकून घेतेस, आणि त्यांला पावतेस. तर आम्हीं तुझें आतां केलेलें आह्वान ऐकून तूं आज ये, आम्हांकरितां दूरवर प्रकाश, आणि आम्ही जे स्तोत्रें रचणारे कवि, त्यांच्या घरीं, आणि तुला हवि अर्पण करणारे आमचे हे यजमान यांच्याहि घरीं, सर्व समृद्धि जेणेंकरून होईल तसें कर.'

' उपासनेचा लगाम धारण करणारी '=' ऋतस्य रश्मिम् अनुयच्छमाना.' ' ऋतस्य रश्मिः' या शब्दांचा अर्थ असा करणें इष्ट आहे असें ऋ. ५. ७. ३ ( ऋतस्य रश्मिमाददे ) या मंत्रावरून वाटतें.

' आह्वानसुलभ '=' सुहवा.' म्हणजे भक्तांनी हाक मारितांच त्यांला पावणारी.

' आमच्या घरीं '=' अस्मासु. ' म्हणजे मी जो स्तोता आहें, त्या मज कक्षीवंताच्या घरीं. अथवा हवि अर्पण करणारा जो मी, त्या मज कक्षीवंताच्या येथें असा अर्थ करावा. मग यजमान वेगळे राहिले नाहींत.

वृत्तसुखासाठीं तिसऱ्या चरणांत 'वि उच्छ' असें वाचावें, आणि तिसरा आणि चवथा या चरणांमध्यें संधि करूं नये.

## सूक्तम् १२४.

दैर्घतमसः कक्षीवान् ऋषिः। उषा देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**उषा उच्छन्ती समिधाने अग्ना उद्यन्त्सूर्य उर्विया ज्योतिरश्रेत्।**
**देवो नो अत्र सविता न्वर्थं प्रासावीद्द्विपत्प्र चतुष्पदित्यै॥ १॥**

उषाः। उच्छन्ती। सम्ऽइधाने। अग्नौ। उत्ऽयन्। सूर्यः। उर्वि-
या। ज्योतिः। अश्रेत्।
देवः। नः। अत्र। सविता। नु। अर्थम्। प्र। असावीत्। द्विऽपत्।
प्र। चतुःऽपत्। इत्यै॥ १॥

---

### भाषायाम्.

१. उषा उच्छन्ती (=तमो निवारयन्ती सती) [आगच्छति]। अग्नौ समिधाने (=समिद्धे सति) उद्यन् (=उदयं प्राप्नुवन्) सूर्यो ज्योतिः उर्विया अश्रेत् (=स्वप्रकाशं विस्तीर्णं यथा तथाश्रयति)। अत्र (=अस्मिन् कालेपि) अर्थं (=गमनीयं=कर्म प्रति) नु (=क्षिप्रम्) इत्यै (=गन्तुं=यथा वयं सर्वे स्वस्वकार्याणि प्रति क्षिप्रं गच्छामस्तथा) नः (=अस्मान्) द्विपत् (=पादद्वययुक्तं प्राणिजातं) चतुष्पद् (=पादचतुष्टययुक्तं प्राणिजातं च) सविता प्रासावीत् (=तमसः सकाशात् प्रेरितवान्=मोचितवान् भवति)॥

सायणस्तु। एषोषाः समिधानेऽग्नौ। अग्नित्वसामान्येनैकवचनम्। अग्निषु समिध्यमानेषु सत्सु। कर्मार्थे कर्तृप्रयोगः। उषःकाले ह्याहवनीयादयः प्रज्वाल्यन्ते। उच्छन्ती तमो विवासयन्त्युर्वियोरु बहुलं ज्योतिः प्रकाशमश्रेत्। सेवते। प्रकाशते प्रकाशयति वा सर्वम्। किमिव। उद्यन् सूर्यः। उपमाप्रधाननिर्देशः। उदितः सूर्य इव। सूर्यो यथा प्रकाशयति तथेत्यर्थः। अत्र त्वदुदयानन्तरमस्मिन्कर्मणि वा सविता देवः सर्वस्य प्रेरकः सूर्यो नोऽस्मदर्थं नु क्षिप्रमर्थम्। अर्थशब्दोऽत्र विशेषणवाची नपुंसकलिङ्गः। अयन्नर्थानि कृणवन्नपांसीत्यादौ। ऋ. ७. ४. ८। तथा दृष्टत्वात्। अरणीयं द्विपत् पादद्वयोपेतं मनुष्यादिरूपं धनं प्रासावीत्। अनुजानातु। ददात्वित्यर्थः। तथा चतुष्पत् पादचतुष्टयोपेतं गवादिरूपं धनं प्रासावीत्। किमर्थम्। इत्यै। द्विपदां चतुष्पदां च गमनाय। यद्वा न इत्या इति संबन्धः। अस्मद्गमनागमनादिव्यापारायेत्यर्थः॥

## सूक्त १२४.

ऋषि–दीर्घतमा याचा पुत्र कक्षीवान् ( पूर्वसूक्ताचा जो कर्ता तोच). देवता–उषा. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. उषा उजेडत [येत आहे]. अग्नि प्रज्वलित केला आहे; आणि नुक्ताच उगवणारा सूर्य आपलें तेज विस्तीर्ण प्रदेशीं उंच फेकीत आहे. आणि या प्रसंगीं देदीप्यमान सवित्यानें आम्हांला, द्विपदांला, आणि चतुष्पदांला लवकर आपापल्या कामीं जाण्यासाठीं अंधकारांतून मुक्त केलें आहे.

## HYMN 124.

To *Ushas.* By *Kakshîvân*, the son of *Dîrghatamas* (author of the previous hymn). Metre—*Trishtubh.*

1. Ushas [is come] dawning. Agni being kindled, the sun has sent forth its light on high. Now divine Savitâ has brought us forth [ from darkness]—us, the bipeds and the quadrupeds, that we may quickly go to our work.

---

१. हेंहि सूक्त कक्षीवान् ऋषीचेंच असून उषेविषयींच आहे. परंतु या पहिल्या मंत्रांत केवळ उषःकाळाचें वर्णन नसतां, प्रातःकाळाचें वर्णन आहे. ऋषि प्रातःकाळाला अनुलक्षून म्हणतो:–‘उषा प्रकाशत प्रकाशत उगवली आहे. आम्हीं आपले अग्नि पेटविले आहेत. सूर्य आपले बालकिरण क्षितिजाच्या खालूनच अंतरिक्षाच्या अत्युच्च प्रदेशीं फेकीत आहे. आणि आम्हीं आणि सर्व द्विपद सृष्टीनें आणि चतुष्पाद सृष्टीनें लवकर उठून आपआपल्या कामीं जावें म्हणून, सवित्यानें आम्हां सर्वांला अंधकारांतून मुक्त करून पुनर्जन्म जणुं दिलें आहे.’

‘ विस्तीर्ण प्रदेशीं उंच फेकीत आहे ’ =‘ उर्विया अश्रेत्.’ म्हणजे संकुचित करून पूर्वी धरीत होता, तसें आतां करीत नाहीं, तर दूर पसरून धरीत आहे.

सायणांनीं वेगळा अर्थ केला आहे तो भाषेखालीं उतरून घेतला आहे.

‘ अंधकारांतून मुक्त केलें आहे ’= ‘ प्रासावीत्.’ अक्षरशः ‘[ पुनः ] उत्पन्न केले आहेत, ’ रात्रीं जणुं नाहींसे झालों होतों त्या आम्हांला पुनः जन्मास आणिलें आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत ‘ नु अर्थम् ’ असें वेगळें वाचलें पाहिजे.

अमिनती दैव्यानि व्रतानि प्रमिनती मनुष्या युगानि ।
ईयुषीणामुपमा शश्वतीनामायतीनां प्रथमोषा व्यद्यौत् ॥ २ ॥
अमिनती । दैव्यानि । व्रतानि । प्रऽमिनती । मनुष्या । युगानि ।
ईयुषीणाम् । उपऽमा । शश्वतीनाम् । आऽयतीनाम् । प्रथमा । उषाः ।
वि । अद्यौत् ॥ २ ॥
एषा दिवो दुहिता प्रत्यदर्शि ज्योतिर्वसाना समना पुरस्तात् ।
ऋतस्य पन्थामन्वेति साधु प्रजानतीव न दिशो मिनाति ॥ ३ ॥
एषा । दिवः । दुहिता । प्रति । अदर्शि । ज्योतिः । वसाना । समना । पुरस्तात् ।
ऋतस्य । पन्थाम् । अनु । एति । साधु । प्रजानतीऽइव । न । दिशः । मिनाति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. दैव्यानि व्रतानि (=देवसंबन्धीनि कर्माणि) अमिनती (=अहिंसन्ती=परिपालयन्ती) मनुष्या युगानि (=मनुष्याणि=मनुष्याणाम् आयूंषि) प्रमिनती (=हिंसन्ती=क्षपयन्ती) [अपि च] ईयुषीणां (=गतवतीनां) शश्वतीनाम् (=असंख्यातानाम्) उपमा (=समीपतमा) आयतीनाम् (=आगामिनीनां) प्रथमा [एषा] उषाः वि अद्यौत् (=विशेषेण प्रकाशितवती पश्य पश्य) ॥

३. ज्योतिर्वसाना (=ज्योतीरूपं वस्त्रं परिदधाना) दिवो दुहिता (=द्युरूपस्य देवस्य दुहितृभूता) एषा [उषाः] समना (=समानकाले=यो यस्मिन्काले दर्शि तस्मिन्नेव काले) पुरस्तात् (=पूर्वस्यां दिशि) प्रत्यदर्शि (=पुनरपि दृश्यते पश्य पश्य)। [सा] प्रजानतीव (=कांश्चिद् गन्तव्यान् प्रदेशान् प्रकर्षेण जानती यथा तथा) [इयम्] ऋतस्य पन्थां (=सत्यभूतस्य आदित्यस्य सवितुर्वरुणस्य वा मार्गम्) अनु[लक्ष्य] साधु (=सुष्ठु) एति (=गच्छति)। दिशो न मिनाति (=दिशो न बाधते=पूर्वदिगन्यदिशि दर्शनाद्दिशां वैपरीत्यं यथा स्यात्तथा न करोति अपि तु दिशां परस्परसंबन्धो यथा यथायथं शिष्येत तथैव चरति) ॥

समनेत्यत्र समना सम्यग्मनयित्री चेष्टयित्री। ...... । यद्वा सह युगपदेव प्रत्यतेवबुध्यते प्राणिभिरिति समना। व्युत्पत्त्यनवधारणादनवग्रहः। सा तादृशी अत-

२. देवांचे नियम पाळणारी, मनुष्यांचीं आयुष्यें हरण करणारी, येऊन गेलेल्या असंख्य [ उषां]तून शेवटची, [ आणि ] येणाऱ्या [उषां]तून पहिली, [अशी ही ] उषा प्रकाशली आहे [पहा].

३. प्रभा[रूप वस्त्र] नेसलेली ही द्यूची कन्यका नेहमीच्याच वेळीं पूर्वेस पुन: प्रकाशली आहे [ पहा ]. ही आदित्याच्या मार्गानें मार्ग ठाऊक असलेल्या एकाद्या स्त्रीसारिखी नीट चालते, दिशांला बाध आणीत नाहीं.

2. Not violating the ordinances of the gods, stealing away the life of men, this Ushas, the last of those numberless [ Ushases ] that have gone by, [ and ] the first of those of the future, has shone forth.

3. Clad in effulgence, this daughter of Heaven has appeared in the east at the same time [as before]. Like one well-acquainted with the regions, she goes along the path of the Âditya, faithfully observing [ the relations of ] the quarters of the globe.

---

२. 'सवित्याच्या पूर्वी उषेनें उगवावें; आणि उगवतांच देवभजकांस प्रकाश द्यावा, की जेणेंकरून ते देवोपासनेंत एकदम तत्पर होतील; उषेनें उगवल्यानंतर फार वेळ राहूं नये, लवकर निघून जावें; प्रकाशावें तें कोमळ प्रकाशानें प्रकाशावें; इत्यादि जे नियम, ते उषा मोडीत नाहीं, तर ती ते पाळिते. पण ती जसजशी दरदिवस येऊन जाते तसतशी ती मनुष्यांचीं आयुष्यें हरण करिते. अशी जी ही आजची उषा, कीं जी होऊन गेलेल्या अनंत उषांपैकीं शेवटची, आणि पुढें येणाऱ्यांपैकीं पहिली, ती प्रकाशली आहे पहा.'

वृत्तसुखार्थ पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांत अनुक्रमें 'दैविआनि,' 'मनुषिआ' आणि 'वि अश्रौत' असें वाचावें.

३. 'कान्तिरूप वस्त्र नेसलेली ही द्यूची कन्यका कालच्या वेळींच पहा पुन: पूर्व दिशेकडे दृष्टीस पडत आहे. ही आदित्याच्या मार्गानें समोर पहा कशी रस्ता चांगला जाणणाऱ्या स्त्रियेप्रमाणें जात आहे. ही भलत्याच दिशेला उगवून, भलत्याच दिशेला जर जाईल, तर पूर्व कशाला म्हणावें, पश्चिम कशाला म्हणावें, दक्षिण कशाला म्हणावें आणि उत्तर कोणती समजावी याविषयीं फार घोटाळा होईल; पण ही तसें होऊं देत नाहीं. पूर्वेसच उगवते आणि पश्चिमेकडेसच जाते, त्यामुळें दिशांचा परस्पर संबंध पूर्ववत् राहतो.'

'द्यूची कन्यका'='दिवो दुहिता.' सू. ४८ मं. १ आणि त्याजवरील टीप पहा.

**उपो अदर्शि शुन्ध्युवो न वक्षो नोधा इवाविरकृत प्रियाणि ।**
**अद्मसन्न ससतो बोधयन्ती शश्वत्तमागात्पुनरेयुषीणाम् ॥ ४ ॥**

उपो इति । अदर्शि । शुन्ध्युवः । न । वक्षः । नोधाःऽइव । आविः ।
अकृत । प्रियाणि ।
अद्मऽसत् । न । ससतः । बोधयन्ती । शश्वत्ऽतमा । आ । अगात् ।
पुनः । आऽईयुषीणाम् ॥ ४ ॥

---

स्यादित्यस्य पन्थां पन्थानं मेरोः प्रान्तप्रदेशमनुक्रमेण साधु सम्यगेति गच्छति । सूर्यो यत्र यत्र गच्छति तत्र तत्र पुरस्तादुषा अपि गच्छतीत्यर्थः । सैव विशेष्यते । प्रजानतीव ।....। यथा लोके प्रियतमेऽनुरागयुक्ता काचिद्भर्तारं सर्वास्ववस्थासु न विमुञ्चति तथेयमपीत्यर्थः । किंच दिशः प्रागादिका न मिनाति । न हिनस्ति । किंतूषा यत्र गच्छति सा प्राचीत्येवं प्रागादिव्यवहारं करोतीत्यर्थः । इति सायणः ॥

ऋतस्य पन्था इति पदद्वयं सायणेन ( ऋ. ५. ८०. ४ ) एषा व्येनीत्यादौ अत्रवदेव विवृतमस्ति । प्रायस्तु स यज्ञस्य मार्ग इति ऋक्संहितायां व्याचष्टे । पूर्वोक्तमन्त्रे एषा दिवो दुहितेत्यादौ च आदित्यस्य मार्गमनुगच्छतीति व्याख्यानम् अपरिहरणीयम् । तत्र चेदमनुसंधेयम् । यद्यपि ऋतस्य पन्था इत्येतस्य यज्ञस्य मार्ग इत्यक्षरार्थो भवति तथापि ऋतार्थं यज्ञार्थम् आदित्यादयो येनान्तरिक्षमार्गेण पूर्वस्या दिशः सकाशात्पश्चिमदिक्पर्यन्तं विततेन आगच्छन्ति स ऋतस्य पन्था आदित्यस्य पन्था इति संभाव्यम् इति ॥

---

## भाषायाम्.

४. शुन्ध्युवो न वक्षः (= आदित्यस्य वक्षःस्थलमिव ) [ एषोषा ] उपो अदर्शि (= समीप एव दृश्यते पश्य पश्य ) । नोधा इव (= नोधाः कविरिव ? ) प्रिया (= प्रियाणि=स्वतेजांसि ) आविरकृत (= प्रकटीकरोति पश्य पश्य ) । पुनरेयुषीणां (= पुनः पुनः आगतवतीनाम् =आगच्छन्तीनां ) शश्वत्तमा (= नियतमागच्छन्ती) [ एषोषा ] अद्मसत् न (= पाचिकेव ) ससतो बोधयन्ती (= स्वपतो जनान् जागरयन्ती ) [ सती ] आ अगात् (= आगतास्ति पश्य पश्य ) ॥

अस्याः पूर्वार्धो दुर्बोधः सायणेनापि कथंकथमपि व्याख्यातः । एषोषाः । उपो इति निपातत्रयसमुदायात्मक एको निपातः । सर्वैः समीपे एवादर्शि । दृश्यते । अत्र दृष्टान्तः । शुन्ध्युवो न वक्षः ......... । शुन्ध्युरादित्यः । सर्वेषां शोधकत्वात् ।

४. [ ही पहा उषा ] आदित्याच्या वक्षःस्थळाप्रमाणें जवळ दिसत आहे. हिणें नोध्याप्रमाणें [आपलीं ] प्रिय [ तेजें ] प्रगट केलीं आहेत. निजलेल्यांस स्वयंपाकिणीप्रमाणें जागे करणारी, [आणि] पुनःपुनः येणाऱ्यांमध्यें अतिनियमितपणें येणारी [ ही उषा ] आली आहे [ पहा ].

4. She has exhibited herself near like the breast of the sun. She has manifested [ her ] beloved [ splendors ] like Nodhas. Waking those that are asleep even as a cook, [ Ushas ], the most unfailing of those that have come, has appeared.

---

' दिशांला बाध आणीत नाहीं '=' न दिशो मिनाति.' उषा आणि सूर्य अथवा त्यांजसारिखे जे प्रकाशमान तारे इत्यादि, ते जर भलत्याच दिशेला उगवतील आणि भलत्याच दिशेनें जातील तर सर्व दिशांचा भंग होईल यांत संशय नाहीं.

' आदित्याच्या मार्गानें '=' ऋतस्य पन्थाम्.' हा अर्थ सायणांस अनुसरून दिला आहे. अक्षरशः अर्थ ' सत्याच्या मार्गानें ' इतकाच होतो, आणि हे शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत; त्यांचा सायणाचार्य प्रायः 'सत्यभूत जो यज्ञ त्याच्या मार्गानें' असा अर्थ करीत असतात. पण प्रस्तुत मंत्रांत आणि ऋ.५. ८०. ४ यांतहि हाच उत्तरार्ध आला आहे त्या ठिकाणीं ते 'ऋतस्य पन्थाम्' म्हणजे आदित्याच्या ( सूर्याच्या ) मार्गानें असें भाष्य करितात; आणि वाक्यसंदर्भाकडे पाहतां तसें करणें इष्ट आहे इतकेंच नाहीं, पण केल्याशिवाय योग्य निर्वाह दिसत नाहीं. आणि सविता, वरुण, अर्यमा, सूर्य हे ज्या मार्गानें यज्ञाप्रत (=ऋतं प्रति) येतात, तो 'ऋतस्य पन्थाः' अशी व्युत्पत्ति चांगली संभवते. शिवाय सू. १२३ मं. ८ यांत ' दीर्घं सचन्ते वरुणस्य धाम ' असें म्हटलें आहे त्याचेंहि तात्पर्य ' ऋतस्य पन्थाम् अनु एति साधु ' याच्या सारिखेंच आहे.

वृत्तासाठीं ' ऋतस्य पन्थामनु एति साधु ' असा तिसरा चरण वाचला पाहिजे.

---

४. या मंत्राचा पूर्वार्ध दुर्बोध आहे. उत्तरार्ध तर उघड आहे; पण पहिल्या आणि दुसऱ्या चरणांत ज्या उपमा दिल्या आहेत, त्या उघड नाहींत. आदित्याच्या वक्षःस्थलाप्रमाणें उषा प्रगट होत आहे हें नीट जुळत नाहीं; आणि नोधा कवि याजप्रमाणें आपलीं तेजें उषेनें प्रगट केलीं, हें तर अगदींच जुळत

पूर्वे अर्धे रजसो अप्त्यस्य गवां जनित्र्यकृत प्र केतुम्।
व्यु प्रथते वितरं वरीय ओभा पृणन्ती पित्रोरुपस्था ॥ ५ ॥ ७ ॥

पूर्वे । अर्धे । रजसः । अप्त्यस्य । गवाम् । जनित्री । अकृत । प्र । केतुम् ।
वि । ऊम् इति । प्रथते । विऽतरम् । वरीयः । आ । उभा । पृणन्ती । पित्रोः । उपऽस्था ॥ ५ ॥ ७ ॥

---

तस्य वक्षो वक्षःस्थानीयो रश्मिसमूहः । स यथा प्रकाशमानो दृश्यते तथेत्यर्थः। यद्वा शुन्ध्युरिति जलचरः श्वेतवर्णः पक्षिविशेषः । स यथा स्वकीयं वक्षः प्रकाशयन्दृश्यते तद्वदित्यर्थः । किं च । नोधा इव प्रियाण्याविरकृत । नवनं स्तोत्रं धारयतीति नोधाः । एतन्नामा महर्षिर्देवतास्तुतिव्याजेन नानाविधैर्मन्त्रैः प्रियाणि स्वमनीषितान्याविष्कृतवान् । तथैषापि स्वकीयानि सर्वलोकप्रियाणि तेजांस्याविरकरोत् । इति ॥

---

## भाषायाम्.

५. गवां जनित्री (=किरणानां माता ) [ एषोषा ] अप्त्यस्य रजसः ( =उदकसंबन्धिनो लोकस्य=अन्तरिक्षस्य ) पूर्वे ( =प्रथमे ) अर्धे ( =भागे ) केतुं ( =प्रकाशं ) प्र अकृत ( =प्रकटीकृतवती पश्य पश्य ) । पित्रोः ( =द्यावापृथिव्योः स्वभूतयोर्मातापित्रोर् ) उपस्था ( =उपस्थे=उदरे=अन्तरालप्रदेशे ) उभा ( =उभौ तौ मातापितरौ ) आ पृणन्ती ( =सर्वतः स्वतेजसा पूरयन्ती ) [ एषा ] वि उ ( =विविधमेव =विशेषेणैव ) वितरं वरीयः ( =विशिष्टतरम् उरुतरं विस्तीर्णं यथा भवति तथा ) प्रथते ( =विस्तृता भवति पश्य पश्य ) ॥

---

नाहीं. सायणानींहि कसा तरी निर्वाह केला आहे. ( भाषा पहा ). नोधा हें एका प्रसिद्ध ऋषीचें नांव आहे. तो सूक्तें ५८–६४ यांचा कर्ता होय. शिवाय ८. ८८; ९. ९३ यांचाहि तोच कर्ता होय.

५. उदकमय प्रदेशाच्या पूर्वार्धात [ ही ] कोमळ किरणांची जननी प्रकाश प्रगट करीत आहे. [ ही ] फारच दूरवर सर्व बाजूंनीं पसरत आहे, आणि आपल्या आईबापांच्या पोकळींत [ राहून ] [त्या ] दोघांलाहि भरून टाकीत आहे.

5. The mother of the early rays has put forth light in the eastern half of the watery region. She is spreading far and wide in all directions, filling both her parents with her light in their womb.

---

५. 'प्रभातकाळीं जे बालकिरण थोडथोडे फांकूं लागतात, त्यांची आईच अशी ही उषा पहा अंतरिक्षाच्या पूर्वभागीं अंधार होता तेथें प्रकाश पाडीत आहे. तिचे आईबाप जे भूलोक आणि द्युलोक, यांच्या मोठ्या पोकळींत उजेड फेकून त्या दोघांलाहि पहा ही कशी भरून टाकीत आहे, आणि सर्व बाजूंनीं पहा कशी ही दूरवर आपला प्रकाश पसरीत आहे!'

'उदकमय प्रदेशाच्या पूर्वार्धात '='पूर्वे अर्धे रजसो अप्त्यस्य.' 'रजः अप्त्यम्' म्हणजे ज्यामध्यें मेघोदकें बाष्परूपानें राहतात असा प्रदेश, म्हणजे अंतरिक्ष. त्याच्या पूर्वेकडील भागांत; म्हणजे पूर्व दिशेकडेस.

'आईबापांच्या पोकळींत '='पित्रोः उपस्था.' अक्षरार्थ आईबापांच्या उदरांत. भू आणि द्यू हे उषेचे आईबाप असें पूर्वी सांगितलेंच आहे. सू. ४८ मं. ८ इत्यादि पहा. 'उपस्था' ही आम्ही 'उपस्थे' याऐवजीं सप्तमी सायणांस अनुसरून घेत आहों. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् 'उभा उपस्था '='दोनहि उदरें' असा अन्वय करितात; पण तो चिन्त्य दिसतो. 'पोकळी' म्हणजे पृथिवीपासून अगदी द्यूच्या माथ्यापर्यंत जो अवकाश, तो विवक्षित आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'अप्तिअस्य,' दुसऱ्यांत 'जनित्री अकृत,' तिसऱ्यांत 'वि उ' आणि चवथ्यांत 'पितरो०' असें वाचावें लागतें.

**एवेदेषा पुरुतमा दृशे कं नाजामिं न परि वृणक्ति जामिम् ।**
**अरेपसा तन्वा३ शाशदाना नार्भादीषते न महो विभाती ॥ ६ ॥**

एव । इत् । एषा । पुरुऽतमा । दृशे । कम् । न । अजामिम् । न ।
परि । वृणक्ति । जामिम् ।
अरेपसा । तन्वा । शाशदाना । न । अर्भात् । ईषते । न । महः ।
विऽभाती ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. एवेत् ( =एवमेव=इदानीं भासमानप्रकारेणैव ) पुरुतमा ( =बहुलतमा=अत्यन्तं सर्वेषां गमनीया ) एषा [ उषा ] दृशे कं ( =द्रष्टुं=सर्वे यथा पश्यन्ति तथा ) [ विभाति ] । अजामिं (=विजातीयं कंचिदपि ) न [ परि वृणक्ति] जामिं (=सजातीयमपि ) न परि वृणक्ति ( =न वर्जयति ) । अरेपसा (=निर्मलया ) तन्वा ( =शरीरेण ) शाशदाना ( =" शाशद्यमाना=स्पष्टतां गच्छन्ती "=सुन्दरैः शरीरावयवैः शोभमाना ) विभाती ( =तेजस्विनी ) [ उषा ] न अर्भात् ईषते ( =नाल्पाल्पदार्थात् परमाण्वादेरपि गच्छति=परमाणुमपि न वर्जयति ) न महः [ ईषते ] ( =महतोपि पदार्थात्=पर्वतादेरपि न गच्छति=महतोपि पदार्थान् न वर्जयति )॥

पूर्वं लोकद्वयं प्रकाशत इत्युक्तम् । इदानीमस्मिँल्लोके परमाण्वादि पर्वतपर्यन्तं कृत्स्नं प्रकाशयतीत्यर्थः । इति सायणः ॥

६. या प्रकारेंकरूनच ही सर्वत्र जाणारी उषा सर्वांस दिसावें म्हणून प्रकाशते, अनाप्तांला वगळीत नाहीं आणि आप्तांलाहि वगळीत नाहीं. निर्मळ शरीरानें प्रगट होणारी तेजस्वी उषा लहानालाहि सोडीत नाहीं, आणि मोठ्यालाहि सोडीत नाहीं.

6. In this very manner most bounteous Ushas shines [ for all ] to see: she [ omits ] not the stranger, omits not [ her ] kindred. Proudly manifested in [ her ] stainless person, bright [ Ushas ] passes by neither the small nor the great.

---

६. 'उषा दूरवर आपलें तेज पसरिते इतकेंच नव्हे, तर ती सर्वांवर सारिखी प्रकाशते. आपल्या आप्तांवर जशी तशीच परक्यांवर प्रकाशते, आणि मोठ्यावर तशीच लहानावरहि प्रकाशते. कोणाचाच पक्षपात करीत नाही.'

'सर्वत्र जाणारी '=' पुरुतमा.' अक्षरशः 'अतिशयेंकरून विपुल' असा अर्थ आहे. म्हणजे, एकाला पुरून दुसऱ्याला न उरणारी अशी नव्हे, सर्वांस पुरून उरणारी, सर्वांला लाभणारी.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'तन्वा'-च्या ठिकाणीं 'तनुआ' असा पाठ म्हणावा लागतो.

अभ्रातेव पुंस एति प्रतीची गर्तारुगिव सनये धनानाम् ।
जायेव पत्य उशती सुवासा उषा हस्रेव नि रिणीते अप्सः ॥ ७॥

अभ्राताऽइव । पुंसः । एति । प्रतीची । गर्तऽआरुगिव । सनये । धनानाम् ।
जायाऽइव । पत्ये । उशती । सुऽवासाः । उषाः । हस्राऽइव । नि । रिणीते । अप्सः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. अभ्रातेव गर्तारुगिव (=अभ्राता=भ्रातृहीना न्यायाधिष्ठितस्थानमारूढा राज्ञीव) धनानां सनये (=द्रव्याणां दानाय=द्रव्यं दातुं ) प्रतीची पुंसः एति ( =स्वस्थानान्निवृत्ता परपुरुषाभिमुखा सत्यायाति) । सुवासाः (=शोभनवसना ) उशती (=कामयमाना ) जाया पत्ये इव ( =भार्या यथा पत्युः समक्षं तथा ) हस्रा इव (=हसन्ती सती ) अप्सः नि रिणीते ( =रूपं नितरां गमयति=स्वावयवान् प्रकाशयति ) ॥

सायणस्तु पूर्वार्धमस्या अन्यथा व्याख्यातवान् । तदेवम् । अभ्रातेव भ्रातृरहितेव पुंसः पित्रादीन्प्रतीची स्वकीयस्थानात्प्रतिनिवृत्तमुखी सत्येति । गच्छति । यथा लोके भ्रातृरहिता योषित्स्वोचितवासोऽलंकारादिलाभाय पितॄनेति । सति भ्रातरि स एवोचितप्रदानादिना सम्यक् तोषयति । तदभावात्पितरमेव प्राप्नोति । यद्वा । सति स्वभ्रातरि स एव पितुः पिण्डदानादिकं संतानकृत्यं करोति । तस्याभावात्स्वयमेव तत्कर्तुं पित्रादीन्गच्छति । तद्वदियमुषा अपि स्वोचितप्रकाशादिलाभाय स्वप्रकाशदानाय वा पितृभूतं सूर्यमाभिमुख्येन गच्छति । अयमेको दृष्टान्तः । तथा धनानां सनये गर्तारुगिवेत्यपरो दृष्टान्तः । गर्त इति गृहनाम । कृदरो गर्त इति तन्नामसु पाठात् । अत्रैषितव्येन राजपुरुषैर्न्यायनिर्णेतृभिश्चाधिष्ठितं स्थानमुच्यते । तदारोहतीति गर्तारुक् । यथा लोके काचिद्धतभर्तृका योषिद्धनानां स्वकीयरिक्थानां सनये लाभाय गर्तमागच्छति । तां तु सभ्या विचार्य यदीयं रिक्थं लभते चेदक्षैः संताड्य तदीयं धनं वितरन्ति । तथेयमपि धनानां प्रीणनसाधनानां प्रकाशानां सनये लाभाय गर्तमाकाशं सूर्यनिवासस्थानमारोहति । देशविशेषाचारमपेक्ष्यैवं दृष्टान्तितम् ।......अयं मन्त्रो निरुक्ते स्पष्टं व्याख्यातः । अभ्रातृकेव पुंसः पितॄनेत्यभिमुखी संतानकर्मणे पिण्डदानाय न पतिं गर्तारोहिणीव धनलाभाय दाक्षिणाजी । गर्तः सभस्थाणुर्गृणातेः सत्यसंगरो भवति तं तत्र याऽपुत्रा यापतिका सारोहति तां तत्राक्षैराघ्नन्ति सा रिक्थं लभत इति । जायेव पत्य उशत्यृतुकालेषु सुवासा कल्याणवासाः कामयमाना ऋतुकालेषूषा हसनेव दन्तान्विवृणुते । नि० ३. ५ । इति ॥

७. [एकाद्या] भ्रातृहीन [राणी]प्रमाणें [ही उषा] द्रव्यें देण्यासाठीं सिंहासनारूढ [होऊन] [पर] पुरुषांसमोर येत आहे. सुंदर वस्त्रें नेसलेली कामातुर जाया [आपल्या] नवऱ्यापुढें [आपले अवयव उघडे करिते, तशी] [ही] उषा हांसत हांसत [आपलें] रूप उघडें करीत आहे पहा.

7. Like a brotherless [queen] [Ushas] is coming into the presence of strangers mounted on the throne, to distribute wealth. Ushas is smilingly exhibiting [her] beauty as a welldressed loving wife before [her] husband.

---

७. 'जशी एकादी भाऊबंद नसलेली राणी सिंहासनावर बसून लोकांचे न्याय तोडून, ज्याला माल देणें योग्य असेल त्याला देण्याकरितां सभेंत येते, त्याप्रमाणें जनांला धन देण्याकरितां ही उषा येत आहे. अथवा जशी एकादी उत्तम वस्त्रालंकार घातलेली स्त्री आपले अवयव आपल्या पतीच्या पुढें थोडथोडे उघडे करीत येते, तशी ही उषा हांसत हांसत आपलें रूप उघडें करून येत आहे पहा.'

या ऋचेचा पूर्वार्ध जरा दुर्बोध आहे. फार जुन्या काळांच्या रीतिभातींला अनुलक्षून उपमा दिली आहे, आणि त्या रीतिभाती आतां बदलल्या आहेत त्यामुळें दुर्बोधत्व आलें आहे. सायणांनीं यास्कास अनुसरून निराळाच अर्थ केला आहे, तो भाषेखालीं पहा.

'सिंहासनारूढ'=' गर्तारुक्.' 'गर्त' शब्दाचा अर्थ सायणांनीं बहुतकरून सर्वत्र 'रथ' असा केला आहे. तेव्हां रथारूढ होऊन धनं मिळविण्याकरितां परपुरुषांसमोर लढाईत जाणाऱ्या स्त्रीप्रमाणें ही येत आहे, असा कदाचित् एक अर्थ संभवतो.

स्वसा स्वस्रे ज्यायस्यै योनिमारैगपैत्यस्याः प्रतिचक्ष्येव ।
व्युच्छन्ती रश्मिभिः सूर्यस्याञ्ज्यङ्क्ते समनगा इव व्राः ॥ ८ ॥

स्वसा । स्वस्रे । ज्यायस्यै । योनिम् । अरैक् । अप । एति । अस्याः ।
प्रतिचक्ष्यऽइव ।
विऽउच्छन्ती । रश्मिऽभिः । सूर्यस्य । अञ्जि । अङ्क्ते । समनगाःऽइव ।
व्राः ॥ ८ ॥

आसां पूर्वासामहसु स्वसृणामपरा पूर्वामभ्येति पश्चात् ।
ताः प्रत्नवन्नव्यसीर्नूनमस्मे रेवदुच्छन्तु सुदिना उषासः ॥ ९ ॥

आसाम् । पूर्वासाम् । अहऽसु । स्वसृणाम् । अपरा । पूर्वाम् । अभि ।
एति । पश्चात् ।
ताः । प्रत्नऽवत् । नव्यसीः । नूनम् । अस्मे इति । रेवत् । उच्छन्तु ।
सुऽदिनाः । उषसः ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. [ कनीयसी ] स्वसा ( =रात्रिरूपा ) ज्यायस्यै ( =ज्येष्ठायै ) स्वस्रे ( =भगिन्यै=उषसे ) योनिम् अरैक् ( =स्थानं प्ररेचितवती ) [ अपि च ] अस्याः प्रतिचक्ष्येव ( =इमाम् उषसं दृष्ट्वेव ) अप एति ( =अप गच्छति ) । सूर्यस्य रश्मिभिः ( =सूर्यस्य किरणैः सह ) व्युच्छन्ती ( =तमो निवारयन्ती=प्रकाशमाना ) व्राः ( =उषाः ) समनगाः इव ( =समनमवधारितं स्थानं तत्प्रति गन्त्रीव=अभिसारिकेव ) अञ्जि अङ्क्ते ( =तेजः प्रकाशयति ) ॥

एकस्मादेवान्तरिक्षादुत्पन्नत्वात्परस्परं स्वसृभावः । तथाप्युषः प्राथम्याच्चेत्यसितत्वाच्च ज्यायस्त्वम् । ...... । स्थानम्......प्रादात् । ......दत्त्वा चास्या उत्पन्नाया उषसः प्रतिचक्ष्येव ज्ञापयित्वेव स्वयमपसृत्यैव गच्छति । ज्यायस्यामागतायां तस्यै स्वस्थानं दत्त्वा स्वयं तत्संनिधौ स्थातुमनुचितमिति विज्ञायैवापगच्छतीति भावः । इति सायणः ॥

९. आसां पूर्वासाम् (=अतीतानां ) स्वसृणां (=स्वसृभूतानाम् उषसां मध्ये ) अपरा ( =अवरा=अद्यतनी उषा ) अहसु ( =अहःसु=प्रतिदिनं ) पूर्वाम् ( =अतीतां [illegible]नीमुषसं ) पश्चात् अभि एति ( =तस्याः पश्चादागच्छति ) । [illegible]




८. [ धाकटी ] बहीण थोरल्या [ बहिणी]करितां जागा मोकळी करीत आहे, आणि तिला पाहिल्याबरोबर जणुं आपण निघून जात आहे. सूर्याच्या किरणांबरोबर प्रकाशणारी उषा, संकेतस्थळीं जाणाऱ्या स्त्रीप्रमाणें, आपलें तेज प्रगट करीत आहे.

९. या येऊन गेलेल्या भगिनींतून प्रतिदिनीं पुढची [ बहीण ] पूर्वील [ बहिणी]च्या मागून येत असते. आतां ज्या नव्या उषा, त्या निरभ्रमुख [होऊन] पुराण [उषां]-प्रमाणें आम्हांकरितां संपत्ति आणून प्रकाशोत.

8. The [ younger ] sister has vacated the abode for her elder sister, and, as if seeing her, departs. Dawning with the rays of the sun, Ushas, like one going to a rendezvous, is decorating herself.

9. Of those past sisters each succeeding one has daily come after an elder one. Now may these future Ushases shine brightly for us with wealth like the old ones.

---

८. 'रात्र आणि उषा या दोघी बहिणी; त्यांतून रात्र धाकटी, उषा मोठी. मोठ्या बहिणीकरितां धाकटी जणुं अंतरिक्षस्थान सोडून जात आहे, आणि मोठी बहीण येतांच आपण तिला पाहिल्याबरोबर जणुं निघून जात आहे. आणि ही उषा सूर्याच्या किरणांबरोबर प्रकाशणारी, एकाद्या अभिसारिकेप्रमाणें, आपलें शरीर सुशोभित करून प्रगट करीत आहे.'

'जागा मोकळी करीत आहे'= 'योनिम् अरैक्.' सू. ११३ मं. १ आणि टीप पहा.

'संकेतस्थळीं जाणाऱ्या स्त्रीप्रमाणें'= 'समनगा इव.' या शब्दांचा अर्थ संदिग्ध आहे, आणि सायणांनीं तरी निश्चयानें केलेला नाहीं.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'अपैति अस्याः प्रतिचक्ष्यइव' असें, आणि तिसऱ्यांत 'वि उच्छन्ती रश्मिभिः सूरिअस्य' आणि चवथ्यांत 'अञ्जि अक्ते' असें वाचावें लागतें.

९. 'आजपर्यंत ज्या उषा होऊन गेल्या, त्यांतून प्रत्येक नवी उषा एका जुन्या उषेच्या मागून येऊन प्रतिदिनीं गेली. आतां यापुढें ज्या येणार आहेत, त्या सर्व उषा निर्मळ अंतरिक्षांत आम्हांकरितां जुन्या उषांप्रमाणेंच प्रकाशून आ-

प्र बोधयोषः पृणतो मघोन्यबुध्यमानाः पणयः ससन्तु ।
रेवदुच्छ मघवद्भ्यो मघोनि रेवत्स्तोत्रे सूनृते जारयन्ती ॥ १० ॥ ८ ॥

प्र । बोधय । उषः । पृणतः । मघोनि । अबुध्यमानाः । पणयः । ससन्तु ।
रेवत् । उच्छ । मघवत्ऽभ्यः । मघोनि । रेवत् । स्तोत्रे । सूनृते । जरयन्ती ॥ १० ॥ ८ ॥

(=अधुना) ता नव्यसीः उषसः (=ता नवीयस्य उषसः=या आगामिन्य उषसस्ताः) सुदिनाः (=शोभनदिनमुखाः सत्यः) प्रत्नवत् (=पुराणोषोवत्) अस्मे (=अस्मभ्यम्=अस्मदर्थं) रेवत् (=धनवद्यथा भवति तथा=धनैः सहितम्) उच्छन्तु (=उच्छन्तु)॥

अपरा पूर्वाम् अभि एति पश्चात् इत्यत्र अव्यवधानेन गच्छतीत्यर्थः। इति सायणः॥

## भाषायाम्.

१०. हे मघोनि उषः (=धनवति उषः), पृणतः प्रबोधय (=हविर्भिस्त्वां पूरयतः=हविर्दनवतो जनान् प्रतिबुद्धान् कुरु=प्रतिजागरय)। पणयः (=अदानशीलाः=लुब्धकाः=अनुपासका जना) अबुध्यमानाः ससन्तु (=त्वया अप्रतिबुध्यमाना एव स्वपन्तु=" दीर्घनिद्रा भवन्तु ")। हे मघोनि (=धनवति), मघवद्भ्यः (=हविर्दत्तवद्भ्यो=यजमानेभ्यो) रेवत् (=धनैः सहितं यथा तथा) उच्छ (=प्रकाशस्व) [तथैव] हे सूनृते (=मधुरवाचां प्रेरयित्रि), जरयन्ती (=सर्वेषां प्राणिनाम् आयुः क्षपयन्ती) [त्वं] स्तोत्रे (=मत्सदृशाय कवयेपि) रेवत् (=धनैः सहितं यथा भवति तथा) [व्युच्छ=विभाहि]॥

पणयो व्ययासहिष्णवो वणिजः। पणिर्वणिग्भवतीति यास्कः। पणय इति लुब्धका अबुध्यमाना यागादीन् अकुर्वाणा अदानशीला अस्मच्छत्रवः ससन्तु। स्वपन्तु। दीर्घनिद्रा भवन्तु। म्रियन्तामित्यर्थः। तथा च मन्त्रान्तरं 'ससन्तु त्या अरातयो बोधन्तु शूर रातयः'। ऋ॰ १. २९. ४। इति। इति सायणाचार्याः॥

---

म्हांस धनसंपत्ति घेऊन येओत.'

'भगिनींतून '=' स्वसॄणाम्.' दररोज येणाऱ्या उषा एकसारिख्याच असतात, आणि त्या एकमेकींशी प्रीतीनें जणुं वागल्याप्रमाणें निमूटपणें येऊन जातात म्हणून त्यांला 'भगिनी' म्हणणें यांत पुष्कळ स्वारस्य आहे.

'नव्या '=' नव्यसीः.' म्हणजे त्या

**१०. हे उदार उषे, तूं दात्यांला जागे कर. कृपण जन जागे न होतां तसेच निजोत. हे उदार [ उषे ], हविर्दात्या जनांसाठीं तूं धनसंपत्ति घेऊन ये आणि प्रकाश. हे मधुरवचने उषे, म्हातारपण आणणारी तूं स्तोत्यासाठींहि धनसंपत्तीनिशीं प्रकाश.**

10. Awaken the liberal sacrificers, O bounteous Ushas. Let the unsacrificing misers sleep unawakened. Shine thou, O bounteous one, with riches for the liberal givers of oblations, shine thou the cause of old age, with riches for the poet, O thou inspirer of sweet voices!

पुढें येणाऱ्या उषा त्या.

'संपत्ति आणून प्रकाशोत '=' रेवत् उच्छन्तु.' म्हणजे प्रकाशोत आणि आम्हांला संपत्ति आणोत. जेणेंकरून आमचें कल्याण होईल असें त्यांचें दर्शन आम्हांला होओ असें तात्पर्य.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'अभि एति' असें वाचावें लागतें.

१०. 'हे धनवती उषे, तुला जे उदारपणें हवि देऊन तृप्त करितात, त्यांस तूं जागे कर; जे हवि देत नाहींत आणि कृपण राहतात, ते तसेच निजूं दे, त्यांस तूं उठवूं नको. तूं यजमानांला आणि मजसारिख्या स्तोत्यांला धन घेऊन ये आणि प्रकाश' असा भावार्थ.

'निजोत '=' ससन्तु.' म्हणजे 'निजलेले तसेच मरोत' असा भावार्थ आहे असें सायण म्हणतात तें संभवतें.

'म्हातारपण आणणारी '=' जरयन्ती.' हें येथें केवळ सहजोक्तिदर्शक विशेषण आहे, हेतुदर्शक नाहीं.

'स्तोत्यासाठींहि '=' स्तोत्रे.' येथें हवि देणारे यजमान, आणि स्तोत्रें रचून यजमानासाठीं म्हणणारे कवि अथवा ऋषि, हे वेगळे जाणविले आहेत. हे जे ऋषि, त्यांचीच संतति मागाहून ब्राह्मणाची जात होऊन बसली.

वृत्तासाठीं 'मघोनि । अबुध्यमानाः' असें व्यस्त म्हणावें लागतें.

**अवेयमश्वैद्युवतिः पुरस्ताद्युङ्क्ते गवामरुणानामनीकम् ।**
**वि नूनमुच्छादसति प्र केतुर्गृहंगृहमुप तिष्ठाते अग्निः ॥ ११ ॥**

अव । इयम् । अश्वैत् । युवतिः । पुरस्तात् । युङ्क्ते । गवाम् । अरुणानाम् । अनीकम् ।
वि । नूनम् । उच्छात् । असति । प्र । केतुः । गृहम्ऽगृहम् । उप । तिष्ठाते । अग्निः ॥ ११ ॥

**उत्ते वयश्चिद्वसतेरपप्तन्नरश्च ये पितुभाजो व्युष्टौ ।**
**अमा सते वहसि भूरि वाममुषो देवि दाशुषे मर्त्याय ॥ १२ ॥**

उत् । ते । वयः । चित् । वसतेः । अपप्तन् । नरः । च । ये । पितुऽभाजः । विऽउष्टौ ।
अमा । सते । वहसि । भूरि । वामम् । उषः । देवि । दाशुषे । मर्त्याय ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. इयं युवतिः ( =तरुणी=नित्ययौवनोषाः ) पुरस्तात् ( =पूर्वस्यां दिशि ) अवाश्वैत् ( =अत्यर्थमागच्छति ) । [ सा ] अरुणानाम् ( =आरक्तवर्णानां ) गवाम् अनीकं ( =समूहं ) युङ्क्ते (=स्वरथे योजयति ) । नूनम् (=अधुना) [ सा ] वि (=विशिष्टं=सर्वत्र ) उच्छात् ( =प्रकाशताम् ) । केतुः ( =तस्यास्तेजः ) प्र असति ( =प्रास्तु=प्रकर्षेण भवतु ) । अग्निर्गृहंगृहं ( =प्रतिगृहं=सर्वेषु,गृहेषु ) उप तिष्ठाते ( =उपतिष्ठताम्=आगच्छतु ) ॥

१२. हे देवि उषः ( =द्योतमाने उषः ), ते व्युष्टौ (=तव व्युच्छने सति=त्वयि प्रकाशेन सह उदितायां सत्यां ) वयश्चित् ( =पक्षिणश्च ) पितुभाजः ( =अन्नार्थिनो ) ये नरः ( =मनुष्यास् ) [ ते ] च वसतेः ( =स्वस्वनिवासस्थानात् ) उद् अपप्तन् ( =उत्पतन्ति उत्थाय स्वस्वव्यापारं गच्छन्ति च ) । अमा सते ( =गृहे वर्तमानाय=गृहे एव तिष्ठते ) मर्त्याय दाशुषे ( =मर्त्याय यजमानाय ) [ तु ] [ त्वं ] भूरि वामं ( =विपुलं धनं ) वहसि ( =आनयसि ) ॥

पितुभाज इत्यत्र पितुभाजोऽन्नवन्तोऽन्नार्थिनः कृषिवाणिज्यादिकर्तारः स्वस्वव्यापारार्थम् उत् उन्मुखा अपप्तन् गच्छन्तीति सायणः ॥

११. ही तरुणी पूर्वदिशेकडे प्रकाशत आहे. ती आरक्त गाईंचा समुदाय आपल्या रथाला जोडीत आहे. ती आतां सर्वत्र प्रकाशो. हिचें तेज सर्वत्र पसरो. प्रत्येक घरीं अग्नि प्रवेश करो.

११. This young damsel has beamed forth in the east; she is yoking [ to her chariot ] her team of ruddy cows. Let her now shine far and wide. Let her effulgence come forth. Let the fire be kindled in every house.

१२. तूं प्रकाशूं लागतांच पक्षीहि [ आपल्या ] घरट्यांतून उडून जातात, आणि अन्नार्थी जे जन, [ ते ]हि [ उडून जातात]; आणि हे देवी उषे, घरीं राहणाऱ्या मर्त्य उपासकाला [ तर ] तूं विपुळ धन घेऊन येतेस.

12. Away fly both birds and men who are food-questant from their abodes at thy dawn. To the sacrificing mortal who stays at home thou, O bright Ushas, bringest plentiful wealth.

११. 'आरक्त गाईंचा समूह'='अरुणानां गवाम् अनीकम्.' म्हणजे आपल्या 'अनेक आरक्त वर्णाच्या गाई.' उषा आपल्या रथाला आरक्त वर्णाच्या गाई अथवा घोडे जोडिते असें वेदांत सांगितलें आहे. सू. ४९ मं. १, सू. ९२ मं. १५, सू. ९२ मं. २ आणि त्यांजवरील टिपा पहा. ऋ. ५. ८०. ४ यांत 'तांबडे बैल (अथवा गाई) रथाला जोडणारी उषा'='एषा गोभिररुणेभिर्युंजाना' असें म्हटलें आहे.

'हिचें तेज सर्वत्र प्रकाशो'='असति प्र केतुः.' अक्षरशः अर्थ 'प्रभा पुढें [ जाणो ] पसरो' असा आहे. 'असति' हें 'अस्तु' याचें आज्ञार्थी (लेट्चें) रूप आहे. प्रत्ययापूर्वी 'अ' जोडिला म्हणजे 'लेट्' काळ सिद्ध होण्याचा एक प्रकार आहे.

'प्रवेश करो'='उप तिष्ठाते.' म्हणजे 'प्रज्वलित केला जाओ.' उषा आली म्हणजे अग्नि पेटवून देवांला हवि देण्याची चाल असे, म्हणून आतां उषा उगवली, अग्नि प्रत्येक घरीं प्रदीप्त होओ, असें ऋषि म्हणतो.

१२. 'हे देवी उषे, तूं आपली प्रभा घेऊन उगवतांच सर्व पक्षी आपलीं घरटीं सोडून जातात, आणि मनुष्यें आपलीं घरें सोडून आपआपल्या कामाच्या पाठीमागें जातात. आणि तुला आणि इतर देवांला हवि देऊन तुमची

**अस्तोढ्वं स्तोम्या ब्रह्मणा मेऽवीवृधध्वमुशतीरुषासः ।**
**युष्माकं देवीरवसा सनेम सहस्रिणं च शतिनं च वाजम् १३॥९**

अस्तोढ्वम् । स्तोम्याः । ब्रह्मणा । मे । अवीवृधध्वम् । उशतीः । उषसः ।
युष्माकम् । देवीः । अवसा । सनेम । सहस्रिणम् । च । शतिनम् ।
च । वाजम् ॥ १३ ॥ ९ ॥

---

### भाषायाम्.

१३. हे स्तोम्याः (=स्तोत्रार्हा) उषसः, [ एवं प्रकारेण ] मे ब्रह्मणा (=मम स्तोत्रेण) [ यूयम् ] अस्तोढ्वम् (=अस्तूयध्वम्=स्तुता अभवत) [ अपि च ] उशतीः (=उशत्यः=कामयमाना यूयम्) अवीवृधध्वम् (=अवर्धयध्वं=वर्धिता अभवत=सप्रीति यथा तथा तुष्टा अभवत)। [ एवं सति ] हे देवीः (=देव्यः), युष्माकम् अवसा (=रक्षणेन=प्रसादेन) [ वयं ] सहस्रिणं च शतिनं च वाजं (=शतसंख्याकं सहस्रसंख्याकं च धनं) सनेम (=लभेमहि) ॥

---

सेवा करण्यासाठीं जो मर्त्य उपासक घरींच राहतो, त्याला तर तूंच पुष्कळ धन घेऊन येतेस–म्हणजे तसल्या प्रकारच्या मनुष्यांचा निर्वाह तूं उत्तम रीतीनें चालवितेस.'

'पक्षीहि' इ०. सू. ४८ मं. ५ आणि त्याजवरील टिपा पहा.

या ऋचेंत देवोपासक मर्त्यांचा निर्वाह कसा चालतो याविषयीं जी विश्वासाची उक्ति उत्तरार्धांत आहे, तिजवरून प्राचीन आर्यांची श्रद्धा दिसून येते. आणि असेंहि वाटतें कीं, यजनपूजन करण्यांत गुंतलेले जे लोक असत, ते कितीएक तरी व्यवहारांत न जाणारे असे असावेत; तसे असल्यामुळें कृषिकर्मादि उद्यम करणारे लोक त्यांचा निर्वाह चालवीत असतील.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'विउष्टौ' आणि चवथ्यांत 'मर्तिआय' असें म्हणावें लागतें.

१३. [ या प्रकारेंकरून ], हे स्तवनीय उषांनो, माझ्या स्तोत्रानें तुम्ही स्तविल्या आहां [ आणि] सप्रीति संतुष्ट झालां आहां. [तर] हे देवी हो, तुमच्या प्रसादेंकरून आम्हांला हजारो आणि शेकडो धन प्राप्त होओ.

13. [ Thus ], O praiseworthy Ushases, you have been praised by my hymn [ and ] refreshed with pleasure. May we, [ then ], through your favour obtain, O goddesses, a thousandfold and a hundredfold wealth.

---

१३. हें सूक्त येथें संपलें; आणि आतां ऋषीच्या मनांत मागावयाचा वर त्याणें या ऋचेंत मागितला आहे. ‘ हे उषांनो, या प्रकारेंकरून तुमचें मी स्तोत्र केलें आहे, आणि हवीनें तुम्हांला तृप्त केलें आहे, आणि तें हविहि तुम्ही प्रीतीनें ( उशतीः ) भक्षिलें आहे. तर आतां तुमच्या प्रसादेंकरून आम्हांला शतपट आणि सहस्रपट धन मिळो.’

‘सप्रीति’=‘उशतीः.’ अक्षरशः ‘प्रीति करणाऱ्या ज्या तुम्ही त्या.’ म्हणजे तुम्ही मोठ्या प्रीतीनें हवि सेवन करून संतुष्ट झाल्या आहां.

वृत्तसुखासाठीं पहिल्या चरणांत ‘ अस्तोढुअं स्तोमिआ ’ असें म्हणावें, आणि ‘ मे अवीवृधध्वम् ’ यांचा संधि पादांतीं करूं नये, म्हणजे ऋचा अंकाप्रमाणें म्हणतां येईल.

## सूक्तम् १२५.

इदं सूक्तं दानदेवताकम् । कक्षीवान् दैर्घतमस ऋषिः । त्रिष्टुप् छन्दः ।
चतुर्थीपञ्चम्यौ तु जगत्यौ ॥

**प्राता रत्नं प्रातरित्वा दधाति तं चिकित्वान्प्रतिगृह्या नि धत्ते ।**
**तेन प्रजां वर्धयमान आयू रायस्पोषेण सचते सुवीरः ॥ १ ॥**

प्रातरिति । रत्नम् । प्रातःऽइत्वा । दधाति । तम् । चिकित्वान् । प्रतिऽगृह्य । नि । धत्ते ।
तेन । प्रऽजाम् । वर्धयमानः । आयुः । रायः । पोषेण । सचते । सुऽवीरः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. प्रातरित्वा (=अतिथिः) प्रातः (=प्रातःकाले) रत्नम् (=उत्तमं धनं) दधाति (=ददाति) । तं [रत्नं] चिकित्वान् (=ज्ञातवान्) [अपरः] प्रतिगृह्य (=गृहीत्वा) नि धत्ते (=नि दधाति=स्वीकरोति) । तेन (=रत्नेन) प्रजां (=स्वकीयं संततिम्) आयुः (=आयुश्च=स्वकीयं शरीरं च) वर्धयमानः (=वर्धयन् सन्) सुवीरः (=शोभनपुत्रपौत्रादिभिर्युक्तः सन्) रायस्पोषेण (=धनस्य पुष्ट्या=वृद्ध्या) सचते (=संगच्छते=तेन सह युक्तो भवति) ॥

अत्र सायणः । अत्रेतिहासमाचक्षते । दैर्घतमसः कक्षीवान्नाम ऋषिर्ब्रह्मचर्यं चरिष्यन्वेदाभ्यासाय गुरुकुले चिरकालमुषित्वा वेदान्सम्यगधीत्य व्रतानि च चरित्वा तेनानुज्ञातः पुनः स्वगृहं प्रति प्रयास्यन् मध्ये मार्गे रात्रौ विश्रान्तः । प्रभाते भावयव्यस्य पुत्रः स्वनयो नाम राजानुचरैः संक्रीडमानोऽकस्मात्कक्षीवतोऽन्तिकमाससाद । स च रभसा प्रतिबुद्धः सहसोत्तस्थौ । तं च राजा पाणिं गृहीत्वा स्वकीये चासन उपवेश्यास्य सौन्दर्यमवगत्य स्वकन्याप्रदानमनाः पप्रच्छ भगवन् कस्य पुत्रः किंनामा त्वमिति । स च पृष्टो मातरं पितरं च स्ववृत्तान्तं चाचचक्षे । स च राजा संभाव्य इत्यवगत्य मुदितमनाः स्वगृहं प्राप्यास्मै मधुपर्कमारचय्य वस्त्रमाल्यादिभिः पूजयित्वा सुधा दश कन्याः शतं निष्कानश्वशतं पुंगवानां शतं गवां षष्ट्युत्तरसहस्रं पुनरेकादश रथांश्च प्रादात् । स च सर्वमनुक्रमेण प्रतिगृह्य दीर्घतमसोऽन्तिकमागत्य तस्मै प्रदर्शयत् ॥ ......स्वनयो नाम राजा प्रातरित्वा प्रातरेवागमनः सकाशमागतः सन् रत्नं रमणीयं निष्कादिकं प्रातः प्रभातकाले दधाति । अस्मत्संनिधौ स्थापयति ।

## सूक्त १२५.

ऋषि—कक्षीवान् (पूर्वसूक्ताचाच कर्ता). देवता—दान. वृत्त—त्रिष्टुभ्; मात्र चवथी आणि पांचवी ह्या जगती होत.

१. अतिथि पहांटेस उत्तम संपत्ति देतो. ती पाहून [हा] स्वीकारून घेऊन ठेवितो. आणि तिच्या योगानें आपली प्रजा आणि आपलें आयुष्य वाढवितो, आणि उत्तम शौर्यवान् अशा पुत्रपौत्रांसह धनाच्या उत्कर्षाप्रत पावतो.

## HYMN 125.

To *Largesses.* By *Kakshîvân*, son of *Dîrghatamas.* Metre-*Trishtubh*, except verses 4, 5 where it is *Jagatî.*

1. In the morning the morning-guest bestows excellent wealth, which the other sees and accepts and keeps. With it he nourishes [his] progeny and [his own] life; and blessed with good and brave progeny, he obtains the prosperity of wealth.

---

१. हें सूक्त दानाविषयीं आहे; म्हणजे यांत दानप्रशंसा केली आहे. सायणाचार्य म्हणतात कीं, कक्षीवान् ऋषि आपली विद्या संपादन करून गुरूच्या घरून आपल्या घरीं जात असतां मार्गांत निजला. तेथें 'भावयव्य' नांवाच्या राजाचा 'स्वनय' म्हणून पुत्र खेळत होता तो अकस्मात् त्याजवळ आला, आणि त्याचा वृत्तांत आणि कुळ गोत्र इत्यादि ऐकून घेऊन, त्याला आपल्या घरीं घेऊन जाऊन दहा कन्या आणि शंभर रथ, बैल, गाई, घोडे आणि शंभर निष्क (एक नाणें) हीं दिलीं. तें सर्व घेऊन कक्षीवान् आपल्या बापाजवळ निघून गेला, आणि त्याणें तें सर्व त्याला दाखविलें. आणि या आणि पुढच्या अशा दोन सूक्तांत 'स्वनय' राजपुत्राचें जें औदार्य त्याची प्रशंसा केली आहे.

या कथेला उद्देशूनच पहिल्या मंत्राचा अर्थ केला, तर 'स्वनय' पहांटेस आला, आणि त्याणें कक्षीवान् ऋषीला उत्तम संपत्ति दिली, ती कक्षीवान् याणें घेतली आणि बापाच्या पुढें नेऊन ठेविली. नंतर तिच्या योगानें तो उत्कर्षाप्रत पावला, आणि आपल्या पुत्रपौत्रांसहित सुखी झाला, असा भावार्थ समजावयाचा.

परंतु निदान ही पहिली ऋचा तरी तशा कथेला अनुलक्षून नसावी असें वाटतें. हें आणि पुढचें हीं दोन सूक्तें चमत्कारिक आहेत. प्रत्येकांत एकमे-

**सुगुरसत्सुहिरण्यः स्वश्वो बृहदस्मै वय इन्द्रो दधाति ।**
**यस्त्वायन्तं वसुना प्रातरित्वो मुक्षीजयेव पदिमुत्सिनाति ॥ २ ॥**

सुऽगुः । असत् । सुऽहिरण्यः । सुऽअश्वः । बृहत् । अस्मै । वयः । इन्द्रः । दधाति ।
यः । त्वा । आऽयन्तम् । वसुना । प्रातःऽइत्वः । मुक्षीजयाऽइव । पदिम् । उत्ऽसिनाति ॥ २ ॥

---

ददाति । तं स्थापितं सर्वं चिकित्वान् चेतनावान् अदुष्टमित्यवगतवान् प्रतिगृह्य स्वीकृत्य निधत्ते । पितुः समीपे स्थापयति । अनन्तरं तेन दत्तेन निष्कादिना प्रजां पुत्रभृत्यादिरूपां वर्धयमानः पोषयन् आयुर्जीवितं च वर्धयन् सुवीरः शोभनैर्वीरैः पुत्रभृत्यादिभिरुपेतः सन् रायस्पोषेण धनानां पुनःपुनर्वर्धनेन सचते । असौ राजा संगच्छतामिति तत्र दातुराशिषं प्रार्थयते ॥

---

## भाषायाम्.

२. हे प्रातरित्वः (=प्रातःकाल आगामिन्नतिथे), यो [ राजा ] आयन्तं त्वा (=गृहमागच्छन्तं त्वां) मुक्षीजया पदिमिव (=रज्जुना पक्षिणमिव) वसुना (=धनेन) उत्सिनाति (=प्रतिबध्नाति) [ स ] सुगुः (=शोभनगोभिस्तद्वान्) सुहिरण्यः (=शोभनसुवर्णेन युक्तः) स्वश्वः (=शोभनाश्वः=उत्कृष्टैरश्वैर्युक्तश्च) असत् (=भवतु) [ अपि च ] अस्मै (=तस्मै) इन्द्रो बृहत् (=प्रभूतं) वयः (=अन्नं) दधाति (=ददातु) ॥

"अत्र कक्षीवतः पितानीतेन धनेन संतुष्टो राजानं बहुप्रकारेणाशास्ते । असौ स्वनयो राजा सुगुरसत् । शोभनैर्बहुभिर्गोभिस्तद्वान् भवतु." इत्यादि सायणः ॥

---

काला असंबद्ध आणि अनन्वित असे मंत्र आहेत. १२५ व्या सूक्ताचे पहिले तीन मंत्र आणि शेवटचे चार यांचा संबंध वस्तुतः आहे असें म्हणण्यास कठिण पडतें. ४–७ हे मंत्र दक्षिणाप्रशंसापर आहेत खरे. पण १–३ हे तसे खरोखर दिसत नाहींत. हे तीन मंत्र प्रथम या सूक्ताचे नसतील, दुसरीकडचे असून संहिताकारांकडून येथें घातले गेले असावे. आणि दानप्रशंसेच्या सूक्तांत घातल्यामुळें त्यांचा ओढून ताणून अर्थ करावा लागत आहे. (१२६ व्या सूक्ताच्या शेवटच्या मंत्रावरील टीप पहा).

'आपली प्रजा आणि आपलें आयुष्य वाढवितो'='प्रजां वर्धयमानः', 'आयुः

२. हे पहांटेला येणाऱ्या, तूं येत असतां तुला, दोरीनें शिकार बांधिल्याप्रमाणें, द्रव्यानें ज्याणें बांधिलें, तो उत्तम गाईंनीं, उत्तम सुवर्णानें, [आणि] उत्तम घोड्यांनीं संपन्न होओ; त्याला इंद्र मोठें अन्न देओ.

2. May he be blessed with excellent cows, blessed with excellent gold, blessed with excellent horses, and may Indra bestow plentiful food on him, who tied thee, O thou who arrivest in the morning, to wealth, even as a bird to a string.

---

प्रवर्धयमानः.' म्हणजे आपला आणि आपल्या संततीचा सुखानें निर्वाह चालवितो.

'अतिथि '='प्रातरित्वा.' म्हणजे सायणाचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें स्वनय राजा, जो पहांटेस कक्षीवानाजवळ आला म्हणून त्याला 'प्रातरित्वा' असें म्हटलें आहे. पण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, या सूक्ताचा संबंध स्वनयाशीं अथवा भावयव्यार्शीं कांहींच नसेल. दोघांतून एकाचेंहि नांव या पहिल्या तीन ऋचांत आलेलें नाहीं. तेव्हां खरोखर ह्या तीन ऋचा कोणाला कोण बोलतो आहे हें समजण्यास मार्ग नाहीं.

---

२. सायणाचार्य म्हणतात, कक्षीवान् ऋषि याणें स्वनय राजानें दिलेली संपत्ति घेऊन बापाला (दीर्घतमसाला) दाखविली तेव्हां दीर्घतमसानें स्वनयाची केलेली प्रशंसा या मंत्रांत सांगितली आहे. त्याप्रमाणें या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, 'हे पहांटेला येऊन घरीं पोंहचणाऱ्या कक्षीवंता, तूं घरीं येत असतां, दोरीनें शिकार बांधिल्याप्रमाणें, तुला संपत्तीनें जणुं ज्या स्वनयानें बांधून टाकिलें तो स्वनय उत्तम गाई, घोडे इत्यादिकांनीं समृद्ध होओ आणि इंद्र त्याला उत्तम आणि पुष्कळ अन्नसंपत्ति देओ.' परंतु 'पहांटेला येणारा' या विशेषणाचें स्वारस्य काय? आणि शिकारीची उपमा दिली आहे तिचें तात्पर्य काय? याखेरीज बाकी मंत्र उघडच आहे.

ऋग्वेदासारिख्या अतिपुराण ग्रंथांत एकाद्या सूक्तांत कितीएक मंत्र अथवा मंत्रांचे भाग दृष्टांताच्या दुर्बोधतेमुळें वगैरे समजण्यास कठिण अथवा अशक्यहि असले तरी नवल नाहीं. अशा अत्यंत प्राचीन ग्रंथाचे बहुतेक भाग समजण्यासारिखे आहेत इतक्याविषयींच आपण प्राचीनविद्यारक्षक ब्राह्मणांचे आभार मानिले पाहिजेत.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'सुअश्वो' असें वाचावें लागतें.

आयमद्य सुकृतं प्रातरिच्छन्निष्टेः पुत्रं वसुमता रथेन ।
अंशोः सुतं पायय मत्सरस्य क्षयद्वीरं वर्धय सूनृताभिः ॥ ३ ॥

आयम् । अद्य । सुऽकृतम् । प्रातः । इच्छन् । इष्टेः । पुत्रम् । वसुऽमता । रथेन ।
अंशोः । सुतम् । पायय । मत्सरस्य । क्षयत्ऽवीरम् । वर्धय । सूनृताभिः ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. अद्य प्रातः ( =अस्मिन् दिने प्रातःकाले ) [ अहम् ] इष्टेः पुत्रम् ( =" इष्टेरिष्टस्येष्टसाधनस्य यागस्य वा पुत्रं......कर्तारम् ") इच्छन् ( =वाञ्छन् ) [ अहं ] वसुमता रथेन ( =धनयुक्तेन रथेन साधनेन ) सुकृतं ( =शोभनस्य कर्तारं प्रति ) [ त्वाम् ? ] आयम् ( =आगच्छम् ) । [ अतः कारणात् ] मत्सरस्य ( =मदकरस्य ) अंशोः ( =सोमवल्ल्याः ) सुतम् ( =अभिषुतं सोमरसं ) [ मां ? ] पायय [ अपि च ] सूनृताभिः ( =प्रियमधुराभिः स्तुतिरूपाभिर्वाग्भिः ) क्षयद्वीरं ( =शौर्योपेतपुत्रपौत्रादीनां पितृभूतं ) वर्धय (=तोषय ) ॥ इत्यक्षरार्थः ॥

सायणस्तु दुर्बोधाभिप्रायामिमामेवं व्याख्यातवान् । प्रातः पूर्वेद्युः प्रभातकालेऽयं धनं दत्तवान् तस्मिन्नेव काले सुकृतं शोभनस्य कर्तारं त्वामिच्छन् प्राप्तुमिच्छन् कदा द्रक्ष्यामीति कामयमानोऽहमद्यास्मिन्दिन इदानीमायम् । प्राप्तोस्मि । अत्र यद्यपि केवलं प्रातरित्येव श्रुतं न पूर्वेद्युरिति तथाप्यद्यायमित्युक्तत्वादर्थात्पूर्वेद्युः प्रातरिति गम्यते । कीदृशम् । इष्टेरिष्टस्येष्टसाधनस्य यागस्य वा पुत्रं पुरु त्रातारम् । पुत्रः पुरु त्रायत इति यास्कः । कर्तारमित्यर्थः । केन साधनेनेति तदुच्यते । वसुमता रथेन । समृद्धधनवता रथेन साधनेन । यद्वा तेन सहित इति सहार्थे तृतीया । किंच तदानीं तेन समृद्धेन धनेनांशोरंशुमतो वल्लीरूपस्य मत्सरस्य मादनसाधनस्य सोमस्य । मत्सरः सोमो मन्दतेस्तृप्तिकर्मण इति निरुक्तम् । तस्य सुतमभिषुतं रसं पायय । आत्मानं पायय । इष्टसाधनं सोमयागं कुर्वित्यर्थः । कृत्वा च क्षयद्वीरं क्षियन्तो निवसन्तो वीराः पुत्रभृत्यादयो यस्य तं तादृशं त्वदिष्टसाधनबहुधनप्रदातारं सूनृताभिः प्रियसत्यात्मिकाभिर्वाग्भिर्वर्धय । समृद्धं कुरु । पुत्रभृत्यादिवीरैर्यथा प्रवृद्धो भवति तथा कामयेत्यर्थः ॥

३. मी आज प्रातःकाळीं [तुज] इष्टिपुत्राची वांछा करून [ तुज ] पुण्यवंताप्रत धनानें भरलेल्या रथांत बसून आलों आहें. तर मादकारक वल्लीचा रस पाज, [आणि] शूर पुत्रांच्या पित्याला मधुर सूक्तांनीं संतुष्ट कर.

3. I have come today in the morning in a chariot filled with riches to the righteous man longing for the son of worship. Offer the juice of the exhilarating plant to drink, and delight the father of the brave sons with sweet hymns.

---

३. हाहि मंत्र वरच्या प्रमाणेंच कठिण आहे. यांत अवघड इतकें आहे कीं, कोण कोणाला बोलत आहे तें समजत नाहीं. शब्दांचा अर्थ सरळ अन्वयानें केला आहे त्याचा भावार्थ कोण कोणाला बोलत आहे तें समजल्याशिवाय कळणार नाहीं. रुद्र देव येऊन एकाद्या पुण्य आचरणाऱ्या उपासकाला बोलत आहे असें समजून या मंत्राची व्याख्या केली, तर भावार्थ असा होईलः—' आज प्रातःकाळीं तुझी पुण्यवंताची इच्छा करून मी तुज सत्कर्माच्या पुत्राजवळ धनानें भरलेल्या रथांत बसून आलों आहें. तर मला मदकारक सोमरस पाज आणि मज शूर मरुतांच्या बापाला मधुर स्तोत्रें म्हणून संतुष्ट कर.' असा हा मंत्र दुसऱ्या संदर्भाचा असतां संहिताकारांनीं या सूक्तांत घातला असें समजावयाचें कीं काय?

सायणाप्रमाणें पहातां कक्षीवान् आपल्या पित्याप्रत बोलतो आहे, आणि म्हणतो कीं, हें मी धन आणिलें आहे त्याच्या योगानें सोम काढून इंद्राला (अथवा रुद्राला ?=क्षयद्वीरम् ) अर्पण कर आणि मधुर स्तोत्रांनीं स्तव.

' इष्टिपुत्र '=' इष्टेः पुत्रम्. ' म्हणजे पुत्राप्रमाणें सत्कर्माला पाळणारा असें समजावयाचें काय?

**उप क्षरन्ति सिन्धवो मयोभुव ईजानं च यक्ष्यमाणं च धेनवः ।**
**पृणन्तं च पपुरिं च श्रवस्यवो घृतस्य धारा उप यन्ति विश्वतः ४**

उप । क्षरन्ति । सिन्धवः । मयःऽभुवः । ईजानम् । च । यक्ष्यमाणम् । च । धेनवः ।
पृणन्तम् । च । पपुरिम् । च । श्रवस्यवः । घृतस्य । धाराः । उप । यन्ति । विश्वतः ॥ ४ ॥

**नाकस्य पृष्ठे अधि तिष्ठति श्रितो यः पृणाति स ह देवेषु गच्छति ।**
**तस्मा आपो घृतमर्षन्ति सिन्धवस्तस्मा इयं दक्षिणा पिन्वते सदा ५**

नाकस्य । पृष्ठे । अधि । तिष्ठति । श्रितः । यः । पृणाति । सः । ह । देवेषु । गच्छति ।
तस्मै । आपः । घृतम् । अर्षन्ति । सिन्धवः । तस्मै । इयम् । दक्षिणा । पिन्वते । सदा ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

४. ईजानं (=सोमयागमनुतिष्ठन्तं) च यक्ष्यमाणं च (=यक्ष्य इति निश्चयं कुर्वन्तं च) मयोभुवः (=सुखोत्पादकाः) सिन्धवः (=नद्यः) धेनवः (=गावश्च) उप क्षरन्ति (=आगत्य स्रवन्ति=सोमयागमनुतिष्ठते यक्ष्य इति निश्चयं कुर्वते च पयो ददति)। [अपि च] पृणन्तं च पपुरिं च (=हविर्दत्तवन्तं च दानशीलं च) घृतस्य (=आज्यस्य) श्रवस्यवः (=अन्नसमृद्धिहेतवो) धाराः (=कुल्या) विश्वतः (=सर्वत) उप यन्ति (=आगम्य वहन्ति)॥

५. यः पृणाति (=दानेन जनान् पूरयति=दक्षिणां यो ददाति) [स] नाकस्य (=स्वर्गस्य) पृष्ठे श्रितः (=आश्रितः=आरूढः सन्) अधि तिष्ठति (=स्वामितया आस्ते)। स ह (=स खलु) देवेषु गच्छति (=स्वयमेव देवो भवति)। तस्मै आपः (=उदकानि मेघादेरुत्पन्नानि) [तथा] सिन्धवः (=नद्यो) घृतं (=घृतवद्रसम्) अर्षन्ति (=वाहयन्ति) [अपि च] तस्मै इयं दक्षिणा (=गोरूपं धनं) सदा (=नित्यं) पिन्वते (=पयसा पूरिता भवति=फलरूपेण दुग्धेन परिपूर्णा भवति)॥ इयं दक्षिणेत्यत्र किंचेयं भूमिरपि दक्षिणा सस्यादिफलसंपादनदक्षा सती सदा सर्वकालं पिन्वते। सेचयति। तोषयतीत्यर्थः। इति सायणः॥

४. जो यजन करितो, आणि जो यजन करीन असें मनांत आणितो, त्या दोघांहि जवळ सुखकारक नद्या [ आणि ] गाई दुभतात. हवि देणाऱ्याकडे आणि दान देणाऱ्याकडे घृताच्या समृद्धिकारक धारा चोहींकडून लोटतात.

4. To him who sacrifices, and to him who intends to sacrifice, blissful rivers [ and ] milch-cows send forth streams of milk. To him who sacrifices and to him who bestows largesses, plenteous streams of clarified butter flow from all sides.

५. जो [ कोणी ] दक्षिणा देतो, तो स्वर्गशिखराच्या पाठीवर चढून बसतो; [ आणि ] तो देवांमध्यें जाऊन मिळतो; त्यासाठीं उदकें [ आणि ] नद्या घृत वाहतात. त्यासाठीं ती दक्षिणा सदोदित रसभरित होत असते.

5. He who gives largesses stands on the top of heaven, ascended. He goes among the gods. To him the waters [ and ] the rivers flow in streams of fat. To him, the largess [ given by him ] is filled with milky reward.

---

४. 'जो कोणी यज्ञ करितो अथवा करावयाचा बेत करितो, त्याजकरितां मधुर नद्या वाहतात, आणि गाई पुष्कळ दूध देतात. जो कोणी हविर्दान करितो, आणि जो दान देतो, त्याजकडे पुष्टिकारक तुपाच्या धारा चारीहि बाजूंनीं वाहत येत असतात.' याप्रमाणें हविर्दानाची आणि दक्षिणेची प्रशंसा यांत आहे.

'सुखकारक नद्या '=' मयोभुवः सिन्धवः.' म्हणजे ज्यांपासून अन्नसमृद्धि होणार अशा नद्या. अथवा मेघोदकें असाहि अर्थ संभवतो. कारण मेघोदकांसहि 'सिन्धवः' असें नांव आहे.

या ऋचेचें वृत्त जगती आहे हें वर आरंभीं सांगितलेंच आहे.

५. यांत दानाची प्रशंसा आहे. 'जो दक्षिणा देतो, तो स्वर्गाच्या पाठीवर चढून तेथें मालक होऊन जणूं बसतो, आणि तो स्वतः देव होतो. त्याकारणें मेघोदकें आणि नद्या तुपाचे जणुं प्रवाह वाहवितात. त्याणें दिलेली जी दक्षिणा, म्हणजे दुभती गाय, ती नित्य दुधानें भरून राहते— म्हणजे तिजपासून त्याला नित्य विपुळ दुधाचा लाभ होत असतो.'

'स्वर्गशिखराच्या '=' नाकस्य.' सू. ३४ मं. ८ याजवरील टीप पहा.

'ही दक्षिणा '=' इयं दक्षिणा.' म्ह-

दक्षिणावतामिदिमानि चित्रा दक्षिणावतां दिवि सूर्यासः ।
दक्षिणावन्तो अमृतं भजन्ते दक्षिणावन्तः प्र तिरन्त आयुः ॥६॥

दक्षिणाऽवताम् । इत् । इमानि । चित्रा । दक्षिणाऽवताम् । दिवि ।
सूर्यासः ।
दक्षिणाऽवन्तः । अमृतम् । भजन्ते । दक्षिणाऽवन्तः । प्र । तिरन्ते ।
आयुः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. दक्षिणावताम् इत् (=दत्तदक्षिणानामेव) इमानि चित्रा (=इमानि दृश्यमानानि चित्राणि उत्तमानि "स्रक्चन्दनमणिमुक्तादिरूपाणि द्रव्याणि") [ भवन्ति ] । दक्षिणावतां (=दत्तदक्षिणानाम्) [ एव ] दिवि (=द्युलोके) सूर्यासः (=सूर्याः="सूर्यसंबन्धिनो लोका") [ भवन्ति ] । दक्षिणावन्तः (=दत्तदक्षिणा एव जना) अमृतं भजन्ते (=मरणरहितं स्थानं प्राप्नुवन्ति)। दक्षिणावन्तः (=दत्तदक्षिणा) [ एव ] आयुः (=स्वायुष्यकालं) प्रतिरन्ते (=वर्धयन्ति=दीर्घायुषो भवन्ति) ॥

---

णजे दात्यानें दिलेली जी 'दक्षिणा' ह्मणजे दान दिलेली गाय ती. त्या दानामुळें दात्याला अनेक गाईंचा लाभ होतो आणि त्यांजपासून तो नित्य समृद्ध होतो.

हीहि ऋचा जगतीच आहे.

६. दक्षिणा देणाऱ्यांचींच हीं सुंदर [द्रव्यें] [होत], दक्षिणा देणाऱ्यांचेच द्युलोकांतील सूर्य [होत]. दक्षिणा देणारेच अमरत्व पावतात. दक्षिणा देणारेचे दीर्घायु होतात.

6. To those who bestow largesses belongs this excellent creation. To those who bestow largesses belong the suns in heaven. Those who bestow largesses obtain immortality, those who bestow largesses prolong their lives.

६. यांतहि दानाची प्रशंसा आहे. 'या जगतांत चंदन, पुष्पें, फळें इत्यादि जीं सुंदर द्रव्यें आहेत, तीं दक्षिणा देणाऱ्यांसाठींच निर्माण केलेलीं आहेत. द्युलोकांत जे अनेक सूर्य आणि तारे इत्यादि तेजःपुञ्ज गोल प्रकाशतात, ते दक्षिणा देणाऱ्यांसाठींच निर्माण केलेले आहेत. दक्षिणा देणारे लोकच अमर होतात—तेच चिरंजीव होत असतात.'

'दक्षिणा' शब्दाचा मूळ अर्थ 'अनुकूळ.' त्यावरून अनुकूळ होऊन दूध देणारी जी गाय, ती 'दुभती गाय.' नंतर यज्ञ करणारे यजमान लोक ऋत्विजांला अथवा सूक्तें रचणाऱ्या कवींला जी 'गाय' देत ती. ऋग्वेदांत 'दक्षिणा' शब्दाचा हाच अर्थ पुष्कळ ठिकाणीं आला आहे. ऋत्विजांस दान द्यावयाचें तें बहुतकरून दुभती गाय हेंच देण्यांत येत असे, म्हणून त्याचें नांव 'दक्षिणा' असें पडलें. नंतर यज्ञ केल्यावर ऋत्विजांला कोणत्याहि प्रकारचें दिलेलें धन त्यास 'दक्षिणा' म्हणूं लागले. पण या अर्थी 'दक्षिणा' शब्द क्वचित्च योजिलेला आढळतो. वेदोत्तरकाळीं या अर्थाची चांगली प्रसिद्धि झाली. मात्र इंद्रादिक देवांनीं भजकांस द्यावयाचें जें धन (तें बहुतकरून गोरूपच असे) त्याला 'दक्षिणा' असें म्हणत.

आतां तरी ब्राह्मणांला याज्ञिक कर्माच्या संबंधानें जें धन द्यावयाचें, त्यालाच 'दक्षिणा' असें म्हणतात. शूद्रादिक जनाला दिलेल्या दानाला दक्षिणा म्हणत नाहींत.

या ऋचेचा पाठ विवाहांत 'दीर्घायुसूक्त' म्हणून म्हणतात त्या वेळीं करितात. परंतु आयुष्य वाढो अशा आशीर्वादाचे शब्द यांत नाहींत; केवळ 'प्र तिरन्ते आयुः' हे जे शब्द आहेत, त्यांजवरून पाठ म्हणण्याचा प्रघात भिक्षुकांनीं घातला आहे. सू. ९२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'सूरिआसः' असें म्हणावें लागतें.

**मा पृणन्तो दुरितमेन आरन्मा जारिषुः सूरयः सुव्रतासः।**
**अन्यस्तेषां परिधिरस्तु कश्चिदपृणन्तमभि सं यन्तु शोकाः ७॥१०**

मा। पृणन्तः। दुःऽइतम्। एनः। आ। अरन्। मा। जारिषुः।
सूरयः। सुऽव्रतासः।
अन्यः। तेषाम्। परिऽधिः। अस्तु। कः। चित्। अपृणन्तम्। अभि।
सम्। यन्तु। शोकाः॥ ७॥ १०॥

## भाषायाम्.

७. पृणन्तः (=हविर्दानेन देवान् दक्षिणया चेतरान् पूरयन्तो जना) दुरितं (=दुःखम्) एनः (=पापं च) मा आ अरन् (=मागच्छन्तु=मा प्राप्नुवन्तु)। सुव्रतासः (=सुव्रताः शोभनकर्माणः) सूरयः (=यजमाना) मा जारिषुः (=मा जीर्णा भवन्तु=मा वृद्धा भवन्तु)। अन्यः कश्चित् (=तेभ्योन्यः कोपि) तेषां परिधिरस्तु (=पापादेः परितो धारको निवारको भवतु)। शोकाः अपृणन्तम् (=अदातारम्=अभक्तम्) अभि सं यन्तु (=सम्यक् प्राप्नुवन्तु) [न तु दातारम्]॥

अन्य इत्यादौ तत्रैषामन्यो जनः क इति स उच्यते। तेषां दातॄणां स्तोतॄणां वान्यस्तेभ्योऽन्यो यः कोपि पुरुषः परिधिः पापस्य परितो धारकोस्तु। यद्वा। अन्यो यः कश्चन पापदेवस्तेषां परिधिस्थानीयो व्यवधायकोस्तु। यथाग्नेः परिधिः स्वयं रक्षःप्रभृतिभिर्बाध्यमानः स्वान्तर्हितमग्निं रक्षति तद्वत्। अथवा। अन्यो धर्मविशेषस्तेषां परिधिः परिधानमस्तु। कवचस्थानीयोस्तु। इति सायणः॥

७. उदार [ जन ] दुःखाप्रत [आणि] पापाप्रत न पावोत. सुकर्मकारी यजमान वृद्ध न होओत. दुसरा कोणी तरी त्यांचा रक्षक होओ. शोकप्रसंग [सर्व] अदात्यावर जाऊन पडोत.

7. May the givers [ of largesses ] never fall into sin [ or ] sorrow. May the righteous sacrificers never grow old. May some one else become their guard. May all griefs fall upon the miser.

---

७. हा येथें या सूक्ताचा उपसंहार आहे. यांत ऋषीनें आपल्या मनांतील वर प्रार्थिला आहे. भावार्थ उघडच आहे.

'उदार [ जन ] '=' पृणन्तः.' अक्षरशः 'देणारे.' म्हणजे देवांस हवि देणारे, आणि सूक्तें रचणाऱ्या कवींला दक्षिणा देणारे, असा उभयविध अर्थ विवक्षित आहे.

'वृद्ध न होओत '=' मा जारिषुः.' ही प्रार्थना चमत्कारिक आहे यांत संशय नाहीं. तारुण्याचा उपभोग पुष्कळ दिवस घेओत असा अभिप्राय. वैदिक युगांतील जन जशा प्रकारचे विरक्त आणि अव्यभिचारिभक्तिपरायण होते, असें पुराणादिकांपासून आपण ऐकितों, तसे जर खरोखर ते असते, तर ही वृद्धत्वपरिहाराविषयींची प्रार्थना या वेदांत आली नसती. मानवी स्वभाव सर्व देशांत आणि सर्व युगांत एकसारिखा असतो हेंच खरें आहे.

## सूक्तम् १२६.

आदितः पञ्चानां कक्षीवान् ऋषिः। षष्ठ्या भावयव्यः। सप्तम्या रोमशा नाम ब्रह्मवादिनी॥ आदितः पञ्चानां भावयव्यस्य स्तुतिरूपत्वात् स एव देवता। अन्त्ययोः षष्ठीसप्तम्योस्तु भावयव्यरोमशयोः संवादः। षष्ठ्या भावयव्यः। सप्तम्या रोमशा। आदितः पञ्च त्रिष्टुभः। अन्त्ये अनुष्टुभौ॥

**अमन्दान्स्तोमान्प्र भरे मनीषा सिन्धावधि क्षियतो भाव्यस्य।**
**यो मे सहस्रममिमीत सवानतूर्तो राजा श्रव इच्छमानः॥ १॥**

अमन्दान्। स्तोमान्। प्र। भरे। मनीषा। सिन्धौ। अधि। क्षियतः। भाव्यस्य।
यः। मे। सहस्रम्। अमिमीत। सवान्। अतूर्तः। राजा। श्रवः। इच्छमानः॥ १॥

---

### भाषायाम्.

१. [अहं] सिन्धौ अधि क्षियतः (=सिन्धुनाम्न्या नद्यास्तीरे वसतो) भाव्यस्य (=भावयव्यस्य नाम राज्ञो विषये) अमन्दान् (=अनल्पान्) स्तोमान् (=स्तोत्राणि) मनीषा (=मनीषया=प्रियातिशयबुद्ध्या) प्र भरे (=प्रकर्षेण संपादयामि=सम्यग् रचयामि)। यः अतूर्तः (=केनाप्यहिंसितः=अजितो) राजा श्रवः इच्छमानः (=कीर्तिम् आत्मने कामयमानो) मे (=मदर्थं) सहस्रं सवान् (=सहस्रसंख्याकान् सोमयज्ञान्) अमिमीत (=निर्मितवान्=अहं यथा सहस्रसंख्याकेषु सोमयागेषु लब्धव्यानि धनानि प्राप्नुयां तथा तान् अकरोत्)॥

सहस्रं तत्संख्याकान् सवान् सूयन्ते सोमा एष्विति सवाः सोमयागाः। तानमिमीत। संपूर्णधनप्रदानेन निर्मितवान्। इति सायणः॥

## सूक्त १२६.

ऋषि–पहिल्या पांच ऋचांचा, कक्षीवान्; सहावीचा भावयव्य नांवाचा राजा; आणि सातवीची कर्त्री रोमशा नांवाची त्याची ब्रह्मवादिनी (म्हणजे ब्रह्मज्ञान सांगणारी) स्त्री. देवता–पहिल्या पांच ऋचा भावयव्याविषयीं आहेत; सहावींत भावयव्याचें भाषण आहे, आणि सातवींत रोमशा इचें भाषण आहे. वृत्त–पहिल्या पांचांचें त्रिष्टुभ्, आणि शेवटच्या दोहोंचें अनुष्टुभ्.

१. मी सिंधुतीरीं राहणाऱ्या भाव्याविषयीं मोठीं स्तोत्रें प्रीतीनें रचितों; जो अजिंक्य राजा कीर्तीची वांछा करून मजकरितां सहस्र यज्ञ करिता झाला.

## HYMN 126.

To king *Bhâvayavya*, living on the banks of the Indus; except that the last two verses form a discourse between *Bhâvayavya* and *Romas'â*, his wife and a poetess. By *Kakshîvân* (the sixth, however, is said to be by *Bhâvayavya* and the seventh by *Romas'â*). Metre—*Trishṭubh*, except the last two verses, where it is *Anushṭubh*.

1. I compose with delight no mean hymns to *Bhâvya*, who lives on the Indus; which indomitable king, desiring renown, performed a thousand soma-sacrifices for my benefit.

---

१. या सूक्ताचे पहिले पांच मंत्र भावयव्याच्या औदार्याविषयीं आहेत. सहावी आणि सातवी या ऋचांत भावयव्य आणि रोमशा म्हणून त्याची ब्रह्मवादिनी स्त्री असे त्यांचा संवाद आहे.

'भावयव्य' अथवा 'भाव्य' हा राजा सिंधू नदीच्या तीरावर राज्य करीत असे असें या ऋचेवरून दिसून येतें तितकेंच. या सूक्तांत पुढें भावयव्याविषयीं कांहीं सांगितलेलें नाहीं, आणि ऋक्संहितेंत दुसऱ्या ठिकाणीं तर हें नांव सुद्धा आलेलें नाहीं. भावयव्य हा स्वनयाचा बाप असें कथापरंपरेला अनुसरून सायणाचार्य म्हणतात तें आम्हीं पूर्वील सूक्ताच्या पहिल्या मंत्रावरील टिपेंत सांगितलें आहे. परंतु या दोनहि सूक्तांत भावयव्य आणि स्वनय यांमध्यें कांहीं संबंध अथवा नातें असलेलें कोठें जाणविलेलें नाहीं. वस्तुतः भाव्य आणि स्वनय यांचा संबंधच नसेल, आणि ही

शतं राज्ञो नाधमानस्य निष्कान् शतमश्वान्प्रयतान्त्सद्य आदम् ।
शतं कक्षीवाँ असुरस्य गोनां दिवि श्रवोऽजरमा ततान ॥ २ ॥

शतम् । राज्ञः । नाधमानस्य । निष्कान् । शतम् । अश्वान् । प्रऽयतान् । सद्यः । आदम् ।
शतम् । कक्षीवान् । असुरस्य । गोनाम् । दिवि । श्रवः । अजरम् । आ । ततान ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. नाधमानस्य (=नाथमानस्य=स्वीकर्तव्यमिति प्रार्थयमानस्य) राज्ञः (="स्वनयस्य") शतं निष्कान् (=सुवर्णद्रव्याणि) शतं प्रयतान् (=दत्तान्) अश्वान् सद्यः (=एकस्मिन् दिने) आदम् (=अहं स्वीकृतवान्) । असुरस्य (=बलवतस्तस्य राज्ञो) गोनां शतं (=शतसंख्याकान् गा बलीवर्दान्) [अहं] कक्षीवान् [ आदम् ] । [ गृहीत्वा च ] [ तस्य ] अजरं श्रवः (=शाश्वतीं कीर्तिं) दिवि (=द्युलोके) आ ततान (=आसमन्तात्=सर्वत्र विस्तारितवानस्मि) ॥

पहिली ऋचा प्रथम या सूक्तांतील नसेल, आणि संहिताकारांकडून यांत मिसळली गेली असेल.

'मजकरितां सहस्र यज्ञ करिता झाला'=' मे सहस्रं सवान् अमिमीत.' म्हणजे मला सहस्र यज्ञसंबंधी जो लाभ व्हावयाचा, तो त्याणें तितके यज्ञ करून होऊं दिला. सहस्रसंख्य द्रव्य देता झाला असा पर्यवसानीं अर्थ आहे.

वृत्तसुखासाठीं 'भाविअस्य' असें पहिल्या चरणांत म्हणावें लागतें.

२. आग्रह करणाऱ्या राजानें दिलेले शंभर निष्क [आणि] शंभर घोडे एका दिवसांत मीं घेतले; कक्षीवान् मी बळवान् [राजा]नें दिलेले शंभर बैल घेता झालों [आणि] त्याची अखंड कीर्ति द्युलोकीं पसरिता झालों.

2. I accepted in one day one hundred gold coins [and] one hundred horses that were bestowed by the pressing king. [I] Kakshîvân accepted one hundred bulls of the great king. I spread his undecaying renown in heaven.

---

२. 'राजानें आग्रह करून शंभर निष्क आणि शंभर घोडे आणि शंभर बैल दिले, ते मीं स्वीकारिले, आणि त्याची शाश्वत कीर्ति माझ्या सूक्तांच्या द्वारें मीं स्वर्गी पसरिली.'

वरच्या मंत्रावरून पहातां या मंत्रांतील राजा म्हणजे भाव्य (अथवा भावयव्य) राजा असावा. पण सायणाचार्य पूर्वसूक्ताच्या पहिल्या मंत्रावर दिलेल्या कथेला अनुलक्षून भावयव्याचा पुत्र 'स्वनय' राजा विवक्षित आहे, असें म्हणतात.

'निष्क'=' निष्कान्.' निष्क म्हणून एक सोन्याचें नाणें आहे. सायणाचार्य येथें 'निष्कान्' म्हणजे अलंकार असा अर्थ करितात. पण शंभर घोडे आणि शंभर बैल जसे पदार्थविशेष आहेत, तसे येथें शंभर निष्क म्हणजे शंभर 'निष्क' नांवाचीं सुवर्णाचीं नाणीं (मोहरांसारखीं) असावीं, असें अनुमान साहजिक दिसतें. आणखी दोन मंत्रांत (ऋ. ८. ४७. १५ आणि २. ३३. १० यांत) 'निष्क'शब्द आला आहे तो गळ्यांतील हार या अर्थी आहे खरा, आणि त्याशिवाय 'निष्क' शब्द ऋक्संहितेंत व्यस्त आला नाहीं, हेंहि खरें; तथापि 'निष्क' याचा वेदोत्तर संस्कृतांत सोन्याचें एक नाणें या अर्थी प्रयोग प्रसिद्ध आहे. शिवाय, पुतळ्यांचे अथवा मोहरांचे व रुपयाचे हार घालण्याची चाल जशी आतां आहे, तशी पुरातन काळीं 'निष्क'नामक सोन्याच्या नाण्याचे हार घालण्याची चाल असेल; त्यामुळेंच 'निष्क' म्हणजे सोन्याचें नाणें हा एक, आणि गळ्यांत घालावयाचा हार हा एक, असे दोन अर्थ होत असतील.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'श्रवोअजरम्' असें वाचावें लागतें.

उप॑ मा श्या॒वाः स्व॒नये॑न द॒त्ता व॒धूम॑न्तो॒ दश॒ रथा॑सो अस्थुः ।
ष॒ष्टिः स॒हस्र॒मनु॒ गव्य॒मागा॒त्सन॑त्क॒क्षीवाँ॑ अभिपि॒त्वे अह्ना॑म् ॥ ३ ॥

उप॑ । मा॒ । श्या॒वाः । स्व॒नये॑न । द॒त्ताः । व॒धूऽम॑न्तः । दश॑ । रथा॑सः ।
अ॒स्थुः ।

ष॒ष्टिः । स॒हस्र॑म् । अनु॑ । गव्य॑म् । आ । अ॒गा॒त् । सन॑त् । क॒क्षीवा॑न् ।
अ॒भि॒ऽपि॒त्वे । अह्ना॑म् ॥ ३ ॥

च॒त्वा॒रिं॒शद्दश॑रथस्य॒ शोणाः॑ स॒हस्र॒स्याग्रे॒ श्रेणिं॑ नयन्ति ।
म॒द॒च्युतः॑ कृश॒नाव॑तो॒ अत्या॑न्क॒क्षीव॑न्त॒ उद॑मृक्षन्त प॒ज्राः ॥ ४ ॥

च॒त्वा॒रिं॒शत् । दश॑ऽरथस्य । शोणाः॑ । स॒हस्र॑स्य । अग्रे॑ । श्रेणि॑म् ।
न॒य॒न्ति॒ ।

म॒द॒ऽच्युतः॑ । कृ॒श॒न॒ऽव॑तः । अत्या॑न् । क॒क्षीव॑न्तः । उत् । अ॒मृ॒क्ष॒न्त॒ ।
प॒ज्राः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. स्वनयेन [ राज्ञा ] दत्ता वधूमन्तः श्यावा दश रथासः ( =वडवायुक्ताः श्याववर्णा दश रथाः=श्याववर्णाभिर्वडवाभिर्युक्ता दश रथाः ) उप मा अस्थुः ( =मत्समीपे तस्थुः ) । षष्टिः सहस्रं गव्यं ( =षष्ट्यधिकसहस्रसंख्याकं गवां वृन्दम् ) अनु आ अगात् ( =रथेभ्यः पश्चाद् आगच्छत् ) । [ तत् सर्वं ] कक्षीवान् अह्नाम् अभिपित्वे ( =अह्नाम् अभिपतने=सायंकाले ) सनत् ( =असनत्=अलभत=स्वीकृतवान् ) ॥

वधूमन्तः इत्यत्र षळश्वाँ आतिथिग्वे ( ऋ. ८. ६८. १७ ) इति मन्त्रव्याख्याने सायणेन वधूमतः वधूभिर्वडवाभिस्तद्वतः इति यदुक्तं तद्दृश्यताम् । तथैव अभिपित्वे अह्नामित्यत्र विषये आ वाजा यातोप ( ऋ. ४. ३४. ५ ) इति मन्त्रस्य भाष्ये सायणेन अह्नाम् अभिपित्वे अभिपतने समाप्तौ । तृतीयसवन इत्यर्थः । इति विवृतं तदनुसंधेयम् ॥

४. चत्वारिंशत् शोणाः ( =शोणवर्णा आरक्तवर्णा अश्वा ) दशरथस्य ( =दशसंख्याकरथयुक्तस्य ) सहस्रस्य ( =सहस्रसंख्याकस्य ) [ दत्तधनस्य ] श्रेणिं ( =पाङ्क्तिकाम् ) अग्रे नयन्ति ( =पुरतो वहन्ति ) । [ इदानीं ] पज्राः कक्षीवन्तः ( =पज्र-

३. स्वनयानें दिलेले कुमेत घोड्या जोडिलेले दहा रथ येऊन मजजवळ उभे राहिले. नंतर एक हजार साठ गाईंचें खिल्लार आलें. हें सर्व कक्षीवान् सायंकाळीं स्वीकारिता झाला.

४. दहा रथांची [ आणि ] सहस्र देणग्यांची माळ चाळीस तांबड्या घोड्यांनीं पुढें ओढून आणिली आहे. [ तर ] अत्यंत चलाख [ आणि ] मोत्यां[चे हार ] घातलेल्या वारूंला पज्रकुलोत्पन्न कक्षीवंताचे चाकर धुऊन पुसून स्वच्छ करोत.

3. Ten bay chariots drawn by mares, given by Svanaya stood near me. Then came a herd of one thousand and sixty cows. Kakshîvân accepted [ them ] towards the close of the day.

4. Forty tawny horses carry in front the line of the wealth consisting of ten chariots [ and ] a thousand presents. Let the followers of Kakshîvân, born in the family of Pajra, clean the coursers that are fiery [ and ] decorated with pearls.

---

३. ' स्वनय ' राजानें दिलेले दहा रथ, कीं ज्यांला कुमेत रंगाच्या घोड्या जोडिल्या होत्या, ते येऊन मजसमोर उभे राहिले; आणि एक हजार साठ गाई त्यानंतर आल्या त्या मी संध्याकाळीं घेतल्या.

' स्वनयानें. ' स्वनय हा भावयव्य राजाचा पुत्र असें पूर्व सूक्ताच्या पहिल्या मंत्रावर सांगितलेंच आहे. त्याविषयीं या दोन सूक्तांत जें कांहीं सांगितलें अथवा सुचविलें आहे, त्याशिवाय दुसरा इतिहास कांहीं ठाऊक नाहीं.

' कुमेत घोड्या जोडिलेले रथ '= 'श्यावा वधूमन्तो रथासः.' अक्षरशः अर्थ ' घोड्या जोडिलेले कुमेत रथ ' असा आहे, पण कुमेत (श्याव) हा रंग वस्तुतः रथांचा नव्हे, त्यांला जोडिलेल्या ज्या घोड्या, त्यांचा होय.

४. ' स्वनयानें दिलेली जी दहा रथांची आणि सहस्र दुसऱ्या वस्तूंची भेट, ती चाळीस आरक्त रंगाच्या घोड्यांनीं वाहून आणिली आहे. त्यामुळें ते अत्यंत चलाख आणि मोत्यांचे हार घातलेले घोडे थकून गेले आहेत. तर कक्षीवंताचे ( माझे ) अनुचर त्यांला धुऊन पुसून स्वच्छ करोत.'

' मोत्यांचे हार घातलेले '=' कृशनवतः.' सू. ३५ मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा. प्रस्तुत ऋचेंत सायणांनी ' कृशन ' म्हणजे ' सुवर्णाचे अलंकार ' असा अर्थ केला आहे.

पूर्वामनु प्रयतिमाददे वस्त्रीन्युक्ताँ अष्टावरिधायसो गाः ।
सुबन्धवो ये विश्या इव व्रा अनस्वन्तः श्रव ऐषन्त पज्राः ॥ ५॥
पूर्वाम् । अनु । प्रऽयतिम् । आ । ददे । वः । त्रीन् । युक्तान् । अष्टौ । अरिऽधायसः । गाः ।
सुऽबन्धवः । ये । विश्याःऽइव । व्राः । अनस्वन्तः । श्रवः । ऐषन्त । पज्राः ॥ ५ ॥

---

कुलोत्पन्नाः कक्षीवतो बन्धवो ) मदच्युतः ( =मदस्राविणः=उद्धृतान् ) कृशनवतः ( =मुक्ताहारवतः ) अत्यान् ( =शीघ्रान् अश्वान् ) उद् अमृक्षन्त ( =" अध्वश्रमजनितस्वेदापनयनायोत्कृष्टं " मार्जयन्तु ) ॥

---

## भाषायाम्.

५. पूर्वां प्रयतिम् अनु ( =पूर्वोक्तं दानम् अनु=पूर्वोक्तादानात्पश्चात् ) [ हे बन्धवः ], [ अहं ] वः ( =युष्मदर्थं ) युक्तान् ( =अनःसु युक्तान् ) त्रीन् अष्टौ ( =एकादश ) अरिधायसः ( =उपासकजनानां धारयितॄन्=उपासकजनानां पोषयितॄन् ) गाः ( =बलीवर्दान् ) आ ददे ( =स्वीकृतवान् अस्मि ) । सुबन्धवः ( =बन्धुवच्छोभनेन प्रेम्णा युक्ता ) ये [ गावो ] विश्या व्रा इव ( =विक्षु गृहेषु भवा व्राताः संघा इव=गृहे भवा जना इव ) अनस्वन्तः ( =अनःसु युक्ताः सन्तः ), हे पज्राः ( =हे पज्रकुलोत्पन्ना मम बन्धवः ), श्रवः ऐषन्त ( =अन्नं प्रेरितवन्तः=आनीतवन्तः ) ॥

अत्र स्वार्थलाभाय ऐषन्त पज्राः इति सर्वानुदात्तपज्रपदपाठः स्वीकर्तव्यः । सायणस्तु दुर्बोधम् उत्तरार्धमेवं व्याख्यातवान् । इदानीं परोक्षेणाह । सुबन्धवः शोभना विद्यायोनिसंबन्धिनो येषां ते तथोक्ताः । यद्वा शोभनबान्धवोपेताः परस्परमनुरागयुक्ता इत्यर्थः । विशः प्रजाः । तत्र भवा विश्याः । व्रियन्त इति व्रा व्राताः । तकारलोपश्छान्दसः । विशां व्राता यथा परस्परमनुरागवन्तस्तथैवैतेऽपीत्यर्थः । पज्राः पज्रगोत्रोऽङ्गिरसः संतानप्रभवा ये सन्ति ते सर्वे सुबन्धवोऽनस्वन्तः शकटवन्तो हविर्धानशकटोपलक्षितसोमयागवन्तः सन्तः श्रवः सर्वत्र श्रूयमाणां कीर्तिमैषन्त । इच्छन्ति । इच्छन्तु वा । तदर्थमादद इति शेषः । इति ॥

अस्मिन्पक्षे पुनरैषन्त इत्यत्रानिघाताभावे कारणं नाह ॥

५. पूर्वीच्या दानानंतर, [ हे बंधुजन हो ], उपासक [ जनां]चें पोषण करणारे [असे] तीन [आणि] आठ जोडिलेले बैल मी तुम्हांकरितां घेतले; जे [ बैल ], हे पज्रकुलोत्पन्न बंधू हो, घरच्या मायाळू माणसांप्रमाणें धान्य गाडींत घालून घेऊन आले आहेत.

5. After the gifts already spoken of I received for you, [O my brethren], three [and] eight yoked bulls that will give food to the pious; which [bulls], like an affectionate party of family members, have brought, O Pajras, food in carts.

'कक्षीवन्ताचे चाकर'='कक्षीवन्तः.' अक्षरशः 'कक्षीवन्त जे ते' असा अर्थ आहे. पज्रकुळ म्हणजे कक्षीवंताचेंच कुळ. तेव्हां आपल्याच कुळांतील अनुचर कक्षीवंतानें ठेविले होते, कीं पज्रकुलोत्पन्न असे कक्षीवंताचे मित्र अथवा बांधव, असा अर्थ करावयाचा आहे कीं काय?

वृत्तसुखार्थ दुसऱ्या चरणांत 'श्रेणि' याचे जागीं 'शरेणि' असें वाचावें.

५. कक्षीवान् ऋषि आपल्या घरच्या माणसांस म्हणतो, 'हे बन्धुजन हो, पूर्वी जीं दानें सांगितलीं, त्यांशिवाय आणखीहि मीं दान घेतलें; तें हें कीं, अकरा बैल गाड्यांला जोडिलेले स्वीकारिले. त्यांनीं गाड्यांत तुम्हां उपासकांकरितां पुष्टिकारक धान्य भरून आणिलें आहे.'

ही ऋचा कठिण आहे. इचा पूर्वार्ध बहुतकरून सोपा आहे. परंतु उत्तरार्धांत अडचण आहे. 'ऐषन्त' या क्रियापदाचा संबंध 'ये' शब्दाशीं घेतला तर 'पज्राः' आणि 'सुबन्धवः' याचा अन्वय आणि अर्थ जुळत नाहीं. 'ये' चा अन्वय 'ऐषन्त'शीं न घेतला, तर मग 'ऐषन्त' असा सर्वानुदात्त पाठ असावा. याकरितां अर्थलाभासाठीं आम्हीं 'पज्राः' असा सर्वानुदात्त संबोधनार्थी पाठ समजून भाषान्तर केलें आहे. सायणांचा अर्थ आम्हीं भाषेखालीं दिला आहे.

वृत्तानुरोधानें तिसऱ्या चरणांत 'विशिआ इव' असें वाचावें लागतें.

आगधिता परिगधिता या कशीकेव जङ्गहे ।
ददाति मह्यं यादुरी याशूनां भोज्या शता ॥ ६ ॥
आऽगधिता । परिऽगधिता । या । कशीकाऽइव । जङ्गहे ।
ददाति । मह्यम् । यादुरी । याशूनाम् । भोज्या । शता ॥ ६ ॥
उपोप मे परा मृश मा मे दभ्राणि मन्यथाः ।
सर्वाहमस्मि रोमशा गन्धारीणामिवाविका ॥ ७ ॥ ११ ॥ १८ ॥
उपऽउप । मे । परा । मृश । मा । मे । दभ्राणि । मन्यथाः ।
सर्वा । अहम् । अस्मि । रोमशा । गन्धारीणाम्ऽइव । अविका ॥
॥ ७ ॥ ११ ॥ १८ ॥

---

## भाषायाम्.

६. इमामवाच्यां सायण एवं व्याख्यातवान् । संभोगाय प्रार्थितो भावयव्यः स्वभार्यां रोमशामप्रौढेति बुद्ध्या परिहसन्नाह । भोज्या भोगयोग्यैषागधिता आ समन्ताद्गृहीता स्वीकृता । तथा परिगधिता परितो गृहीता...... । यद्वा आगधिता आ समन्तान्मिश्रयन्ती आन्तरं प्रजननेन बाह्यं भुजादिभिरित्यर्थः । ...... । पूर्वस्मिन् पक्षे पुरुषस्य प्राधान्यम् । उत्तरस्मिंस्तु योषित इति भेदः । कीदृशी सा । या जङ्गहे । अत्यर्थं गृह्णाति कदाचिदपि न मुञ्चति । अत्यागे दृष्टान्तः । कशीकेव । कशीका नाम सूतवत्सा नकुली । सा यथा पत्या सह चिरकालं क्रीडति न कदाचिदपि विमुञ्चति तथैषापि । किं च भोज्यैषा यादुरी । यादुरित्युदक नाम । रेतोलक्षणमुदकं प्रभूतं ददातीति यादुरी । बहुरेतोयुक्तेत्यर्थः । तादृशी सती याशूनां संभोगानाम् । यशु इति प्रजननाम । तत्संबन्धीनि कर्माणि याशूनि भोगाः । तेषां शता शतान्यसंख्यातानि मह्यं ददाति । इति ॥

७. इमामप्यश्लीलतरां सायण एवं व्याख्यातवान् । भो पते मे माम् । द्वितीयार्थे चतुर्थी । उपोप । द्वितीय उपशब्दः पादपूरणः । उपेत्य परामृश । सम्यक् स्पृश । भोगयोग्यामवगच्छेत्यर्थः । यद्वा मे मम गोपनीयमङ्गमुपोप परामृश । अत्यन्तमास्वरं स्पृश । परामर्शाभावशङ्कां निवारयति । मे मदङ्गानि रोमाणि दभ्राणि मा मन्यथाः । अल्पानि मा बुध्यस्व । ...... । अदभ्रत्वमेव विशदयति । अहं रोमशा बहुरोमयुक्तास्मि । यतोहमीदृशी अतः सर्वा संपूर्णावयवास्मि । रोमशत्वे दृष्टान्तः । गन्धारीणामविकेव । गन्धारा देशाः । तेषां संबन्धिन्यविजातिरिव । तद्देशस्था अवयो मेषा यथा रोमशाः । तथाहमस्मि । .........यतोहमीदृशी अतो मामप्रौढां मावबुध्यस्वेत्यर्थः । इति ॥

६. जिला धरिलें असतां [ आणि ] आलिंगन दिलें असतां जी मुंगुशीप्रमाणें गच्च धरून राहते, [ती] रेतानें बरबटलेली [ही] भोग्य स्त्री मला शंभर संभोग देत आहे !

6. This woman to be enjoyed ! who, clasped [and] embraced, holds fast like a she-mungoose, [and is] soiled with the semen, gives me a hundred embraces !

७. माझे अवयव गच्च धर; माझे अवयव लहान आहेत असें समजूं नको. मी गंधारी लोकांच्या मेंढीप्रमाणें केसांनीं सर्व भरली आहें.

7. Press my limbs close, Oh ! press them close; do not think my limbs are undeveloped. I am all hairy like a ewe of the Gandhâris.

---

६ या आणि पुढच्या ऋचांचा अर्थ सायणांस अनुसरूनच आम्हीं केला आहे. ते म्हणतात कीं, भावयव्याला त्याची स्त्री ब्रह्मवादिनी ‘ रोमशा ’ इणें संभोगासाठीं प्रार्थना केली, तेव्हां ती लहान आहे असें समजून तो तिचा उपहास या ऋचेंत करीत आहे. भाष्य पहा.

ही ऋचा जशी बीभत्स आहे तशीच ती कठीण आहे. म्हणजे तींत सहा मुख्य शब्द (आगधिता, परिगधिता, कशीका, जंगहे, यादुरी, याशूनाम्)हे आहेत. आणि ते सहाहि कठिण आणि अप्रसिद्ध आहेत. पण अर्थ सायणांनीं केल्याप्रमाणेंच असावा असें दिसतें खरें.

वृत्तासाठीं ‘ भोजिआ ’ असा पाठ म्हणावा लागतो.

७. तूं लहान आहेस असा परिहास केला तेव्हां, मी लहान नाहीं, मोठी झालेली आहें, माझे सर्व अवयव पूर्णपणें परिपक्व दशेला आलेले आहेत, असें स्त्री म्हणते तें यांत सांगितलें आहे म्हणून सायण म्हणतात. त्यांच्या भाष्यालाच अनुसरून याहि बीभत्स ऋचेचा आम्हीं अर्थ केला आहे.

सहावी ऋचा पुरुषाची आणि सातवी स्त्रीची वाणी आहे यांत संशय नाहीं; मग हा पुरुष आणि ही स्त्री कोणीहि असोत.

‘ रोमशा ’ हें या ऋचेंत पद आहे इतक्यावरूनच इची कर्त्री रोमशा नांवाची ब्रह्मवादिनी होय असें म्हणण्याचा प्रघात पडून गेला आहे. पण ‘ रोमशा ’ हें येथें विशेषनाम नव्हे, विशेषण आहे. आणि रोमशा नांव दुसऱ्या ठिकाणीं आलेलें नाहीं त्यापेक्षां रोमशा म्हणून भावयव्याची स्त्री इत्यादिक कथा निराधार दिसते.

दुसरी गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी ही कीं, सहावी आणि सातवी ह्या ऋचा पहिल्या पांच ऋचांशीं ताडून पाहिल्या तर त्यांचा यांचा कांहीं संबंध दिसत नाहीं इतकेंच नव्हे, पण त्यांचा विषय आणि यांचा विषय भिन्न असल्यामुळें, व वृत्त भिन्न असल्यामुळें ह्या शेवटच्या दोन ऋचा प्रथम या सूक्ताच्या नसाव्यात,

## सूक्तम् १२७.

दिवोदासपुत्रः परुच्छेप ऋषिः । अग्निर्देवता । स हि शर्ध इति षष्ठी षट्सप्तत्यक्षरा अतिधृतिः । शिष्टा अत्यष्टयः ॥

उत्कृत्यभिकृतिसंकृतिविकृत्याकृतिप्रकृतिकृत्यतिधृतिधृत्यत्यष्ट्यष्टिषु चतुरुत्तरशताक्षरमारभ्य चतुर्णां परित्यागेनैकैकमुक्तं छन्दो जायते ॥

प्रायः प्रथमौ द्वौ पादौ जागतौ तत एक आनुष्टुभः ततोपि द्वावानुष्टुभौ तत एकः पुनरपि जागतः ततोप्येक आनुष्टुभः इति सप्त पादा यत्र भवन्ति तत्रात्यष्टिर्जायते ॥

**अ॒ग्निं होता॑रं मन्ये॒ दास्व॑न्तं॒ वसुं॑ सू॒नुं सह॑सो जा॒तवे॑दसं॒ विप्रं॒ न जा॒तवे॑दसम् ।**
**य ऊ॒र्ध्वया॑ स्वध्व॒रो दे॒वो दे॒वाच्या॑ कृ॒पा ।**
**घृ॒तस्य॒ विभ्रा॑ष्टि॒मनु॑ वष्टि शो॒चिषा॒जुह्वा॑नस्य स॒र्पिषः॑ ॥ १ ॥**

अ॒ग्निम् । होता॑रम् । म॒न्ये॒ । दास्व॑न्तम् । वसु॑म् । सू॒नुम् । सह॑सः । जा॒तऽवे॑दसम् । विप्र॑म् । न । जा॒तऽवे॑दसम् ।
यः । ऊ॒र्ध्वया॑ । सु॒ऽअ॒ध्व॒रः । दे॒वः । दे॒वाच्या॑ । कृ॒पा ।
घृ॒तस्य॑ । वि॒ऽभ्रा॑ष्टिम् । अनु॑ । व॒ष्टि॒ । शो॒चिषा॑ । आ॒ऽजुह्वा॑नस्य । स॒र्पिषः॑ ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. दास्वन्तम् ( =अतिशयेन दानवन्तं ) वसुं ( =वासयितारं=दयालुं ) सहसः सूनुं ( =बलस्य पुत्रं ) जातवेदसं ( =जातप्रज्ञं )—विप्रं न जातवेदसं ( =कविमिव जातप्रज्ञं=जन्मत एव विशिष्टप्रज्ञम् )—अग्निं होतारं मन्ये ( =देवानाम् आह्वातारं बहुमन्ये)। देवः ( =दीप्तिमान् ) स्वध्वरः (=शोभनयज्ञः=शोभनं यज्ञं निर्वहन् ) यः [अग्निः] ऊर्ध्वया देवाच्या कृपा ( =उत्कृष्टया दैव्या दीप्त्या ) शोचिषा ( =तेजसा ) [ च ] आजुह्वानस्य सर्पिषः घृतस्य (=आ समन्ताद्धूयमानस्य सरणं प्राप्नुवतः आज्यस्य) विभ्राष्टिं ( =विशिष्टां कान्तिं=दर्शनम् ) अनु वष्टि ( =कामयते ) ॥

---

आणि संहिताकरणाच्या वेळीं या सूक्तांत त्या सिसळून गेल्या असतील असें वाटतें. भावयव्य जर कोणी राजा होऊन गेला असेल, तर त्याचा आणि त्याच्या

नायकोचा संबंध या दोन [illegible] वस्तुतः कांहीं नाहीं [illegible]
आणि कक्षीवानाच्या [illegible] णारी सर्व सूक्तें येथें संपतात ( [illegible]

## सूक्त १२७.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—अग्नि. वृत्त—अत्यष्टि, मात्र ६ वीचें अतिधृति. 'अत्यष्टि'यांत सात चरण, किंवा तीन चरण आणि चार पोटचरण असतात. पहिले दोन जगती छंदाचे, अक्षरें २४; तिसरा अनुष्टुभाचा, अक्षरें ८; चवथा आणि पांचवा अनुष्टुभाचे, अक्षरें १६; सहावा जगतीचा, अक्षरें १२; आणि सातवा अनुष्टुभाचा, अक्षरें ८: एकूण सर्व अक्षरें ६८.

१. महोदार, कृपाळु, बळाचा पुत्र, उपजत प्रज्ञावान्—कवीप्रमाणें उपजत प्रज्ञावान्—असा जो अग्नि, त्याला मी होता मानून पूजितों; जो सुयज्ञ देव [आपल्या] अत्युच्च दिव्य प्रभेनें [आणि] तेजानें, वितुळणाऱ्या तुपाच्या कांतीची इच्छा करितो.

## Hymn 127.

To *Agni*. By *Paruchchhepa*, son of *Divodâsa*. Metre—*Atyashṭi*, except in verse 6 where it is *Atidhṛiti*.

1. I honour as invoker Agni the great giver, the benevolent, the son of might, born to wisdom—born to wisdom like a poet; who, the brilliant performer of a successful sacrifice, loves with his high [and] divine splendor [and] brightness the bright appearance of the melting clarified butter as it is offered.

मंडलांत मात्र ७४ वें सूक्त तेवढें त्याचें आहे). पुढें दुसऱ्याचीं सूक्तें लागलीं. तेव्हां स्फुट ऋचा संहिताकारांच्या हातीं असतील आणि त्यांचा संबंध कोणत्या दुसऱ्या सूक्तांशीं चांगला जुळत नसेल म्हणून या शेवटच्या दोन सूक्तांत एकांत तीन (सू. १२५ मं. १–३) आणि एकांत (सू. १२६ मं. ६, ७) दोन अशा लावून दिल्या असतील. त्यामुळें या ऋचांचा पूर्वापर संबंध बरोबर न जुळल्यामुळें त्या दुर्बोध होतात यांत नवल नाहीं.

१ हें सूक्त दिवोदासाचा पुत्र परुच्छेप या ऋषीचें आहे. या ऋषीचीं या-

यजिष्ठं त्वा यजमाना हुवेम ज्येष्ठमङ्गिरसां विप्र मन्मभिर्विप्रेभिः शुक्र मन्मभिः।
परिज्मानमिव द्यां होतारं चर्षणीनाम्।
शोचिष्केशं वृषणं यमिमा विशः प्रावन्तु जूतये विशः॥ २॥

यजिष्ठम्। त्वा। यजमानाः। हुवेम। ज्येष्ठम्। अङ्गिरसाम्। विप्र। मन्मऽभिः। विप्रेभिः। शुक्र। मन्मऽभिः।
परिज्मानम्ऽइव। द्याम्। होतारम्। चर्षणीनाम्।
शोचिःऽकेशम्। वृषणम्। यम्। इमाः। विशः। प्र। अवन्तु। जूतयै। विशः॥ २॥

## भाषायाम्.

२. हे विप्र (=मेधाविन्), अङ्गिरसां ज्येष्ठं (=पितरं) यजिष्ठम् (=अतिशयेन यष्टव्यं) त्वा (=त्वां) यजमानाः (=यष्टारो) [वयं] मन्मभिः (=स्तोत्रैः) हुवेम (=आह्वयामः)—हे शुक्र (=दीप्तिमन्), विप्रेभिः (=विप्रैः=स्तोतृभिः) मन्मभिः (=स्तोत्रैश्च) [हुवेम=आह्वयामः]। शोचिष्केशं (=ज्वालारूपकेशं) वृषणं (=बलयुक्तं) परिज्मानमिव द्यां (=परिगन्तारं सूर्यमिव=परिगन्तृसूर्यवत्परिगन्तारं) चर्षणीनां होतारं (=मनुष्याणां हिताय देवानाम् आह्वातारं) [त्वां हुवेम]। यं [त्वाम्] इमा विशः [इमा अस्मद्रूपा] विशः (=जना) जूतये (=त्वरायै=सत्वगमनाय) प्रावन्तु (=प्रीणयन्तु=तोषयन्तु)॥

यजिष्ठं त्वा यजमाना वयं हुवेमेत्यत्र यतो वयं यजमाना यतश्च त्वं यजिष्ठः अतो हुवेमेत्यभिप्रायः। ......शोचिष्केशं केशवदत्यन्तायतज्वालोपेतम्। इति सायणः॥

---

सून १३९ पर्यंत तेरा सूक्तें आहेत. तरीं सूक्तें ऋग्वेदांत या ऋषीचीं नाहींत.
हें पहिलें सूक्त अग्नीविषयीं आहे. पहिल्या मंत्राचा भावार्थः—‘ तुपाची आहुति टाकिली म्हणजे ती पाहून ज्याला आनंद होतो, आणि जो आपल्या दिव्य कांतीनें आणि तेजानें प्रकाशून तो आपल्या प्रदर्शित करितो, तो महाडदार, ...क आणि कवीप्रमाणें उपजतच बुद्धिमान् बळाच्या योगानें मंथून उत्पन्न केलेला अग्नि, त्याला मी होता (देवांला बोलावून आणणारा) असें समजून त्याची पूजा करितो. ’

‘सुयज्ञ’=‘स्वध्वरः.’ म्हणजे चांगल्या रीतीनें यज्ञ सिद्धीस नेणारा, ज्याच्याकरून देव येऊन अर्पिलेलें हवि सेवन भक्षितील असा यज्ञ करणारा. हें विशेषण होता म्हणून जो ऋत्विज असतो,

२. अत्यंत यज्ञयोग्य असा जो अंगिरसांचा आदिपुरुष त्या तुला, हे प्रज्ञावान् अग्नी, आम्ही यज्ञ करणारे जन स्तोत्रांच्या योगानें हाक मारीत आहों—हे तेजस्वी अग्नी, स्तोत्यांच्या आणि स्तोत्रांच्या योगानें [ हाक मारीत आहों ]; जो सूर्याप्रमाणें प्रदक्षिणा करणारा आणि मनुष्यांचा ज्वालाशिख [आणि] प्रबळ होता [ होय ]. आणि तुला हे जन, [हे] जन तुला त्वरा करण्याविषयीं वळवोत.

2. Thee, the ancestor of the Angirases, most deserving to be honoured with sacrifices, we the sacrificers are invoking, O wise [Agni], with hymns,—through, O brilliant one, hymns [and] sages—thee the priest of men, like the revolving sun, bedecked with shaggy flames, endowed with strength: whom may these persons— [these] persons—induce to hasten hither.

त्याला खरोखर लावावयाचें; पण अग्नीला येथें ‘ होता ’ मानिला असल्यामुळें त्याला लाविलें आहे.

‘ प्रभेनें ’=‘ कृपा.’ सायणांनीं अर्थ ‘ सामर्थ्यानें ’ असा केला आहे. पण ऋ. ६. १५. ५; ७. ३. ९; आणि ८. २३. ५ आणि त्यांजवरील सायणभाष्य ह्यांचें प्रमाण आमच्या अर्थाला आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ‘ मनिए दासुअन्तं ’, चवथ्यांत ‘ सुअध्वरो ’ आणि पांचव्यांत ‘ देवाचिआ ’ असें वाचावें. सहावा चरण ‘ शोचिषा ’ या शब्दांतील ‘ चि ’ अक्षरावर संपतो आणि त्या शब्दाचा ‘ षा ’ इतका भाग पुढच्या पादांत घेऊन ‘ आजुह्वानस्य ’ याच्या ‘ आ ’ अक्षरांत नाहींसा करावा लागतो त्यापेक्षां सहाव्या चरणांत एक अक्षर कमी असतें तर बरें होतें.

२. ‘ हे अग्नी, अंगिरसांचा आदिपुरुष, मेधावी, सूर्याप्रमाणें जगताला प्रदक्षिणा करणारा, ज्वाला ह्याच ज्याच्या शिखा, जो बलवान्, असा मनुष्यांचा होता जो तूं, त्या अतिशयेंकरून पूजनीया तुला यज्ञेंकरून पूजा करणारे जे आम्ही, ते स्तोत्रें रचणाऱ्या कवींच्या द्वारा आणि स्तोत्यांच्या द्वारा बोलावीत आहों. तर तूं आम्हां जनांची हाक ऐकून तूं लवकर आम्हांपत ये.’

‘ अंगिरसांचा आदिपुरुष ’=‘ अङ्गिरसां ज्येष्ठम्.’ सू. ३१ मं. १ आणि त्याजवरील टीप पहा.

‘ सूर्याप्रमाणें प्रदक्षिणा करणारा ’= ‘ परिज्मानमिव द्याम्. ’ म्हणजे जसा सूर्य जगतासभोंतालीं नित्य फिरतो तसा फिरणारा.

‘ हे जन ’=‘ इमा विशः.’ म्हणजे

**स हि पुरू चिदोजसा विरुक्मता दीद्यानो भवति द्रुहंतरः परशुर्न द्रुहंतरः ।**
**वीळु चिद्यस्य समृतौ श्रुवद्वनेव यत्स्थिरम् ।**
**निष्षहमाणो यमते नायते धन्वासहा नायते ॥ ३ ॥**

सः । हि । पुरु । चित् । ओजसा । विरुक्मता । दीद्यानः । भवति । द्रुहम्ऽतरः । परशुः । न । द्रुहम्ऽतरः ।
वीळु । चित् । यस्य । सम्ऽऋतौ । श्रुवत् । वनाऽइव । यत् । स्थिरम् ।
निःऽसहमानः । यमते । न । अयते । धन्वऽसहा । न । अयते ॥३॥

## भाषायाम्.

३. हि (=यस्मात् कारणात्) सः (=अग्निः) विरुक्मता (=तेजस्विना) ओजसा (=सामर्थ्येन) पुरु चित् (=अत्यन्तमेव) दीद्यानः (=दीप्यमानः) द्रुहंतरः (=द्रोग्धृणां हिंसकः) भवति—परशुर्न द्रुहंतरः (=परशुरिव शत्रुहिंसकः) [भवति]। यस्य समृतौ (=संगमने सति) वीळु चित् [पदार्थजातं] (=यद्यद् दृढं लोहादिकं तदपि) यत् [च] स्थिरम् (=अचलं पर्वतादिकं) [तत्सर्वं] वनेव (=उदकानीव उदकानि यथा तथा) श्रुवत् (=स्रवेत्=द्रवति)। निःसहमानः (=निःशेषेण शत्रून् अभिभवन्) यमते (=तिष्ठति) न [तु] अयते (=शत्रुसकाशात् पलायते)—धन्वसहा (=धनुषा शत्रूणाम् अभिभविता) [स] न अयते (=न पलायते)॥

'आम्ही' जे स्तोत्रें म्हणत आहों, ते दिवोदासाचे पुत्र. 'हा जन' याचा उपयोग मराठी कवितेंतहि अशा प्रकारचा पुष्कळ येत असतो

३. कारण कीं आपल्या तेजस्वी सामर्थ्यानें अत्यंत प्रकाशणारा असा तो दुष्टांला मारणारा होतो—तो तरवारीप्रमाणें दुष्टांला मारणारा [ होतो ]; ज्याची भेट होतांच दृढ आणि स्थिर जे पदार्थ असतात, ते सुद्धा पाण्यांसारिखे वितळूं लागतात. तो शत्रूंला संहारून उभा राहतो, पळत नाहीं—धनुर्जयी [ अग्नि ] पळत नाहीं.

3. For shining splendidly with his brilliant power he becomes the destroyer of the haters—destroyer of the enemies, like a sword; at whose meeting even things, [ which are ] solid [ and those ] which [ are ] firm, melt like waters. Vanquishing the enemies he stands, and does not fly—the victorious archer does not fly.

३. 'अग्नि आपल्या तेजःपुंज बळानें तरवारीप्रमाणें शत्रूंला मारून टाकण्याविषयीं समर्थ आहे. अग्नि शत्रूला मारून टाकितो यांत नवल नाहीं; पण पाषाण आणि मोठमोठे पर्वत यांसारिखे जे प्रचंड आणि अति कठिण पदार्थ, ते सुद्धा अग्नीची गांठ पडतांच पाण्याप्रमाणें वितळून जातात. अग्नि हा जणुं काय मोठा धनुर्धर आहे, आणि मोठ्या शूराप्रमाणें शत्रूंला मारून समरांगणांत उभा राहतो, पळून जात नाहीं.'

'धनुर्जयी'='धन्वसहा.' म्हणजे धनुष्याच्या योगानें शत्रूंला जिंकणारा, शत्रूंचा पराभव करणारा. या विशेषणावरून आणि परशुशब्दावरून उघड होतें कीं, वेदकाळीं जीं शस्त्रें आणि अस्त्रें ठाऊक होतीं, त्यांत तरवार ( परशु ), आणि धनुष्यबाण हीं असत, आणि धनुष्याच्या योगानें शत्रूंला जिंकणें हें वीरांला मोठें भूषण मानिलेलें असे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांतील दुसऱ्या पोटचरणांत 'दीद्यानो'च्या स्थळीं 'दीदीइआनो' असें म्हणावें; आणि तिसऱ्या चरणांत दोनी ठिकाणीं 'नायते'च्या जागीं 'न अयते' असें म्हणावें.

दृह्ला चिदस्मा अनु दुर्यथा विदे तेजिष्ठाभिररणिभिर्दाष्ट्यवसेऽग्नये दाष्ट्यवसे ।
प्र यः पुरूणि गाहते तक्षद्वनेव शोचिषा ।
स्थिरा चिदन्ना नि रिणात्योजसा नि स्थिराणि चिदोजसा ॥४॥
दृह्ला । चित् । अस्मै । अनु । दुः । यथा । विदे । तेजिष्ठाभिः । अरणिऽभिः । दाष्टि । अवसे । अग्नये । दाष्टि । अवसे ।
प्र । यः । पुरूणि । गाहते । तक्षत् । वनाऽइव । शोचिषा ।
स्थिरा । चित् । अन्ना । नि । रिणाति । ओजसा । नि । स्थिराणि । चित् । ओजसा ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. अस्मै (=अग्नये) दृह्ला चित् (=दृढा चित्=दृढान्यपि) [वस्तूनि], यथा विदे [तथा] (=यथा विद्यते ज्ञायते तथा), [यजमाना] अनु दुः (=अनु ददुः =एकैकमिति क्रमेण ददति)। [उपासकजनस्] तेजिष्ठाभिः (=अत्यन्तं तेजस्विनीभिः) अरणिभिः (=अरणिनामकैः काष्ठैः) अवसे (=प्रसादाय=यथा स प्रसन्नो भवेत्तथा) दाष्टि (=पूजयति)—अग्नये [तुभ्यम्] अवसे (=प्रसादाय) दाष्टि (=पूजयति)। यः [अग्निः] पुरूणि (=बहूनि) [वस्तूनि] शोचिषा (=स्वकीयया ज्वालया) वनेव तक्षन् (=वनवृक्षसमूहानिव तक्षन्=काष्ठानीव च्छिन्दन्) [तानि] प्र गाहते (=प्रविशति) [अपि च] स्थिरा चित् अन्ना (=स्थिराण्यपि अन्नानि=काष्ठादीनि) ओजसा (=स्वतेजसा) नि रिणाति (=अवगमयति=स्वोदरे गमयति=भक्षयित्वा पचति)—स्थिराणि चिद् ओजसा नि [रिणाति] (=स्वतेजसा स्थिराण्यपि अन्नानि=दृढानि काष्ठदीनि अन्नान्यपि भक्षयित्वा पचति)॥

यथा विदे इत्यत्र यथा विदे विदुषे परमार्थदर्शिने यथोत्कृष्टानि धनानि वितरन्ति दानशीलाः। यद्वा अयमग्निर्यथा विदे। विन्दते। स्वातिरिक्तं हविर्देवेभ्यो दातुं लभते स्वीकरोति तथा दुरिति। इति सायणः॥

४. कठिण सुद्धा [हव्यें] याला देत असतात हें प्रसिद्धच आहे; याची कृपा व्हावी म्हणून अत्यंत तेजस्वी अरणींच्या योगानें याला [जन] भजतो—अग्नीला कृपेसाठीं [ जन ] भजतो; जो [ अग्नि ] [आपल्या] तेजानें अनेक [वस्तूंला] लांकडांप्रमाणें तोडीत त्यांच्या मधून चालतो, [ आणि आपल्या ] सामर्थ्यानें कठिण कठिण सुद्धा अन्नें खाऊन टाकितो—[आपल्या] सामर्थ्यानें कठिण कठिण सुद्धा [ अन्नें ] खाऊन टाकितो.

4. As is known, they give him even hard [ offerings ]; to propitiate him [ the worshipper ] honours [ him ] with the most brilliant pieces of wood—honours Agni to propitiate him; who penetrates many things, cutting them down like trees with [ his ] flame. He consumes even hard things as food with [ his ] flame—consumes even hard things with his flame.

४. 'अग्नीला अति कठिण अशीं अन्नें घालितात, आणि त्याला तेणेंकरून प्रसन्न करूं पाहतात. आणि तीं कठिण अन्नेंहि (लांकडें) खाऊन तो प्रसन्न होतो. अग्नि अरण्यांत शिरतो, आणि त्यांला तोडल्याप्रमाणें तोडून जणूं टाकितो. तो आपल्या सामर्थ्यानें अति कठिण असे पदार्थ खाऊन पचवून खाक करितो.'

'हें प्रसिद्धच आहे'=' यथा विदे.' 'यथा विदे' हे शब्द दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं आले आहेत, आणि तेथें सुद्धा आम्हीं येथें केलेला अर्थ जुळतो इतकेंच नव्हे, पण त्यांतून कितीएक ठिकाणीं सायणांनींहि याच्या जवळ जवळ अर्थ केला आहे.

'अत्यंत तेजस्वी अरणींच्या योगानें'=' तेजिष्ठाभिः अरणीभिः.' 'अरणि' म्हणजे ज्या लांकडांला एकमेकांवर घांसून अग्नि उत्पन्न करीत, तीं लांकडें. परंतु येथें जळणारीं लांकडें इतकेंच विवक्षित दिसतें. 'तेजिष्ठाभिः अरणिभिः' हे शब्द पुनः १२९ व्या सूक्ताच्या ५ व्या मंत्रांत आले आहेत.

तमस्य पृक्षमुपरासु धीमहि नक्तं यः सुदर्शतरो दिवातरादप्रायुषे दिवातरात् ।
आदस्यायुर्ग्रभणवद्वीळु शर्म न सूनवे ।
भक्तमभक्तमवो व्यन्तो अजरा अग्नयो व्यन्तो अजराः ॥५॥ १२॥

तम् । अस्य । पृक्षम् । उपरासु । धीमहि । नक्तम् । यः । सुदर्शऽतरः । दिवाऽतरात् । अप्रऽआयुषे । दिवाऽतरात् ।
आत् । अस्य । आयुः । ग्रभणऽवत् । वीळु । शर्म । न । सूनवे ।
भक्तम् । अभक्तम् । अवः । व्यन्तः । अजराः । अग्नयः । व्यन्तः । अजराः ॥ ५ ॥ १२ ॥

## भाषायाम्.

५. अस्य (=एतस्याग्नेस्) तम् (=एतं) पृक्षम् (=अन्नं हविर्लक्षणम्) उपरासु (=वेद्याः समीपभूतासु भूमिषु) धीमहि (=नि दधीमहि) यः [अग्निः] दिवातरात् (=अह्नः=यावद्दिने ततः सकाशात्) नक्तं (=रात्री) सुदर्शतरः (=विशेषेणाधिकं दर्शनीयो) [भवति]—दिवातरात् (=अह्नः सकाशाद्) [रात्री] अप्रायुषे (=अधिकतरं जीवते=अधिकतरं प्रकाशमानाय) [तस्मै] [पृक्षं धीमहि=अन्नं निदधीमहि]। आत् (=अतः कारणादेव=यतो रात्रावधिकं प्रकाशतेऽतः कारणाद्) अस्य [अग्नेः] आयुः (=आयुष्कालः=आयुःस्थितिः) वीळु शर्म सूनवे न (=दृढं पितुर्गृहं यथा पुत्राय ग्रभणवत्=अनुग्रहवत्=अनुग्राहकं=रक्षकं तथा), ग्रभणवत् (=ग्रहणवत्=अनुग्रहवत्=रक्षकं) [भवति]। भक्तम् अभक्तम् अवः (=इतरैः प्राप्तं यत् यच्चेतरैर्न प्राप्तं तादृशमपि रक्षणं) व्यन्तः (=आगमयन्तः=कुर्वन्तः) [अग्नयः] अजराः (=जरारहिता) [भवन्ति]—[अवो] व्यन्तः (=रक्षणं कुर्वन्तः) अग्नयः (=आहवनीयादयोग्नयः) अजराः (=जरारहिता) [भवन्ति]॥

५. तर ह्या [ अग्नी ]कारणें हें अन्न वेदीजवळ आपण ठेवूं; जो [ अग्नि ] दिवसापेक्षां रात्रीं अधिक सुंदर दिसतो—दिवसापेक्षां [रात्रीं] अधिक जीवंत असणाऱ्या [अग्नी]कारणें [ अन्न ठेवूं ]. कारण कीं त्याचें आयुष्य, पुत्राला [पित्याचें ] मजबूत घर [रक्षणकारक] [ असतें ] तसें, [ उपासकाला ] रक्षणकारक [ आहे ]. [इतरांला] प्राप्त झालेलें आणि प्राप्त न झालेलें [ असें ] रक्षण करणारे [ अग्नि ] अजर [होत]—[रक्षण] करणारे अग्नि अजर [होत].

5. Let us then place this his food near the altar, [ his ] who [ is ] more conspicuous in the night than in the day—to him who [ is ] more energetic [ at night ] than in the day. For then his life [ is ] as protecting as [ is ] the [ father's] fortified house to the son. Affording [ to his worshippers] support, [ such as is ] obtained [ and ] [ such as is ] not obtained [ by others], the [various] Agnis [ are ] ever youthful—the [ various ] Agnis giving support [ are ] ever youthful.

---

५. ही ऋचा किंचित् दुर्बोध आहे. भावार्थः— 'जो दिवसापेक्षां रात्रीच्या वेळीं अधिक प्रकाशमान दिसतो, आणि दिवसापेक्षां रात्रीं अधिक जीवंत जणुं दिसतो, त्या अग्नीला आपण या वेदीजवळ हवि ठेवूं. असें जर आपण करूं, तर जसा एकादा मुलगा आपल्या बापाच्या मजबूत घरांत राहिला तर सुरक्षित असतो, तसें अग्नीचें सगळें वर्तन त्याच्या भक्तांला रक्षणदायक होतें म्हणून आम्हांलाहि रक्षणदायक होईल.—अग्नि सर्व प्रकारचें रक्षण करितो, तरीहि तो कधीं वृद्ध होत नाहीं.'

'[ रात्रीं ] अधिक जीवंत...कारणें'= 'अप्रायुषे.' दिवसाचा अग्नि जणुं गुप्त असतो आणि रात्रीं त्याचें तेज विशेष लकलकीत दिसत असतें.

'रक्षण करणारे अग्नि' =' अवःयन्तः अग्नयः.' या अनेकवचनाचें तात्पर्य असें दिसतें कीं, अनेक ठिकाणचे आणि अनेक वेळीं प्रदीप्त होणारे जे अग्नि ते. उषा जी प्रभातकाळरूप देवी, तिला सुद्धा असेंच अनेकवचन लाविलेलं पूर्वी आलेलेंच आहे.

स हि शर्धो न मारुतं तुविष्वणिरप्नस्वतीषूर्वरास्विष्टनिरार्तनास्विष्टनिः ।
आदद्धव्यान्याददिर्यज्ञस्य केतुरर्हणा ।
अध स्मास्य हर्षतो हृषीवतो विश्वे जुषन्त पन्थां नरः शुभे न पन्थाम् ॥ ६ ॥

सः । हि । शर्धः । न । मारुतम् । तुविऽस्वनिः । अप्नस्वतीषु । उर्वरासु । इष्टनिः । आर्तनासु । इष्टनिः ।
आदत् । हव्यानि । आऽददिः । यज्ञस्य । केतुः । अर्हणा ।
अध । स्म । अस्य । हर्षतः । हृषीवतः । विश्वे । जुषन्त । पन्थाम् । नरः । शुभे । न । पन्थाम् ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. स हि ( =अग्निः खलु ) मारुतं शर्धो न ( =मरुतां गण इव ) तुविष्वणिः ( =प्रभूतनादः=प्रभूतध्वनियुक्तो ) [ भवति ] । अप्नस्वतीषु (=खननादिकर्मवतीषु=कृतोद्यमासु ) उर्वरासु ( =सस्याढ्यासु भूमिषु ) इष्टनिः ( =ध्वनियुक्तो ) [ भवति ] । [ अपि च ] आर्तनासु ( =पृतनासु ) इष्टनिः ( =ध्वनियुक्तो ) [ भवति ] । आददिः ( =हविषां स्वीकर्ता ) यज्ञस्य केतुः ( =अध्वरस्य ध्वजभूतः ) [ अग्निः ] अर्हणा ( =अर्हणया=पूजया सह ) हव्यानि ( =हवींषि ) आदत् ( =स्वीकरोति ) । अध स्म ( =अत एव ) हर्षतः हृषीवतः ( =हर्षयुक्तस्य आनन्दयुक्तस्य च ) अस्य [ अग्नेः ] पन्थां ( =पन्थानं=मार्गं ) विश्वे ( =सर्वेपि जना ) जुषन्त ( =अजुषन्त =असेवन्त=सेवन्ते )—नरः शुभे न पन्थां ( =यथा मनुष्याः शोभायै=शोभितुं=कल्याणाय ऋजुं पन्थानं भजन्ते तद्वत् ) [ अस्याग्नेः पन्थां=पन्थानं जुषन्त=सेवन्ते ] ॥

अप्नस्वतीषु उर्वरासु इष्टनिरित्यत्र अप्नस्वतीषु खननप्रोक्षणादिकर्मोपेतासु । अप्न इति कर्मनाम । अप्नो दंस इति तन्नामसु पाठात् । उर्वरासु उरुवरणयुक्तासु श्रेष्ठासु वेदिभूमिषु......इष्टनिः यष्टव्यः । ......किंच हर्षतो हविर्भक्षणादत्यन्तहर्षयुक्तस्य यद्वा अभिमतफलदानेन यजमानान् हर्षयतो हृषीवत आज्यस्वीकारेण हर्षयुक्तस्याग्नेः पन्थां पन्थानं मार्गं विश्वे सर्वे मनुष्या जुषन्त । अप्रीणयन् । असेवन्त वा । किमर्थम् । शुभे । शोभनाय । सुखप्राप्तये पन्थानं सर्वैर्गन्तव्यमैहिकामुष्मिकफलस्याग्नेरेव मार्गं सर्वे-

६. आणि तो मरुतांच्या गणाप्रमाणें प्रचंड नाद करणारा [होय], धान्यानें भरलेल्या समृद्ध शेतांत नाद करणारा [होय], आणि सेनांमध्यें नाद करणारा [होय]. पाहुणा [आणि] यज्ञाचा ध्वज [असा] अग्नि पूजेसहित हव्यें स्वीकारून घेत असतो. म्हणूनच आनंदी [ आणि ] संतोषवान् [असा जो] हा [अग्नि], त्याच्या मार्गाला सकळ जन भजतात— मनुष्य जसे कल्याणार्थ [चांगला] मार्ग [ भजतात, तसे सकळ जन याच्या मार्गाला भजतात].

6. He makes a loud noise like the troop of Maruts; he makes a noise in the rich corn-fields—makes a noise among the armies of the enemy. He the hearty guest, the banner of sacrifice, receives the oblations with the worship. It is therefore that all follow the path of the delighted [and] pleased Agni—follow his path as men follow a path for good.

---

६. ' अग्नि मरुद्गणाप्रमाणें जाईल तिकडे आवाज करीत असतोः तो, ज्यांत उत्तम श्रम केले आहेत आणि ज्यांत उत्तम धान्यें पिकलीं आहेत, अशा शेतांत शिरला म्हणजे तेथेंहि आवाज करितो, आणि शत्रूंचें सैन्य जाळावयाचें असलें म्हणजे तेथेंहि तसाच आवाज करितो. मनुष्यांनीं दिलेलीं हव्यें घेणारा असा जो यज्ञाचा जणुं ध्वजच अग्नि, तो आमचीं मर्त्यांचीं हव्यें स्वीकारून घेत असतो. म्हणूनच तर या आनंदमय अग्नीच्या उपासनेचा मार्ग, सकळ जन चांगला एकादा रस्ता शोधून त्याणें जातात तसे, जाणून बुजूनच अवलंबीत असतात.'

' प्रचंड नाद करणारा '=' तुविष्वणिः.' अग्नि जाऊं लागला आणि मार्गामधील वस्तु जाळूं लागला, म्हणजे जो भुग् भुग् असा आवाज होत असतो, तो येथें विवक्षित आहे.

' यज्ञाचा ध्वज '=' यज्ञस्य केतुः.' म्हणजे जेथें जेथें यज्ञ होतो तेथें तेथें ध्वजाप्रमाणें अग्नि पेटून प्रकाशत असतोच; जसें ध्वजाशिवाय सैन्य नाहीं, तसा अग्नीशिवाय यज्ञ नाहीं.

' याच्या मार्गाला '=' अस्य पन्थाम्.' अग्नीचा मार्ग म्हणजे अग्नीची उपासना करण्याची चाल.

पहिल्या चरणांत 'अप्नस्वतीषु उर्वरासु इष्टनिः । आर्तनासु इष्टनिः' असें म्हणून, दुसऱ्यांत 'हव्यानि आददिः' असें म्हणावें; आणि तिसऱ्यांत 'स्म अस्य' असें वाचून त्यांत शेवटीं दोन

**द्विता यदीं कीस्तासो अभिद्यवो नमस्यन्त उपवोचन्त भृगवो मथ्नन्तो दाशा भृगवः ।**
**अग्निरीशे वसूनां शुचिर्यो धर्णिरेषाम् ।**
**प्रियाँ अपिधीँर्वनिषीष्ट मेधिर आ वनिषीष्ट मेधिरः ॥ ७ ॥**

द्विता । यत् । ईम् । कीस्तासः । अभिऽद्यवः । नमस्यन्तः । उपऽवोचन्त । भृगवः । मथ्नन्तः । दाशा । भृगवः ।
अग्निः । ईशे । वसूनाम् । शुचिः । यः । धर्णिः । एषाम् ।
प्रियान् । अपिऽधीन् । वनिषीष्ट । मेधिरः । आ । वनिषीष्ट । मेधिरः ॥ ७ ॥

---

नुयच्छन्ति । अग्निमेव प्रीणयित्वा साधयन्ति । मार्गश्रयणे दृष्टान्तः । यथा लोके नरो मनुष्याः शुभे शोभनाय सुखप्राप्तये पन्थानं सर्वैर्गन्तव्यं निर्भयं प्रौढमार्गमिव । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

७. यद् ई ( =यम् इममग्निं ) कीस्तासः ( =स्तोतारः ) अभिद्यवः ( =अभिगतदीप्तिमन्तः=तेजस्विनो ) नमस्यन्तः (=नमस्कारेण नम्रीभवन्तो ) भृगवः (=भृगुकुलोत्पन्ना मनुष्या) द्विता (=द्विधा=द्वाभ्यां प्रकाराभ्याम्) उपवोचन्त (=उपासत)—दाशा (=हविर्दानेन निमित्तभूतेन=हविर्दानाय ) मथ्नन्तः (=अरण्यां मन्थनेन निष्पादयन्तो ) भृगवः [ उपवोचन्त=उपासत ] [ सोयं ] शुचिः ( =दीप्तिमान् ) अग्निः वसूनाम् ईशे (=धनानाम् ईष्टे=प्रभुर्भवति ) यः [ अग्निः ] एषां (=दृश्यमानानां सुवर्णमाणिक्यादीनां धनानां ) धर्णिः (=धारको ) [ भवति ] । [ स ] मेधिरः (=यष्टव्यः ) प्रियान् (=स्वप्रीतिहेतून्) अपिधीन् (=आज्यादीनि आवरणानि=हवींषि ) वनिषीष्ट (=कामयतां=प्रीत्या सह स्वीकरोतु )—मेधिरः (=यष्टव्यः ) [ प्रियान् अपिधीन्=आज्यादीनि ] आ वनिषीष्ट (=अत्यन्तं कामयताम् ) ॥

द्वितेति दुर्बोधम् । सायणेन तु व्याख्यातमेवम् । द्विता द्वित्वमापन्नं द्विप्रकारं श्रौतस्मार्तभेदेन द्वित्वमापन्नम् । यद्वा । उपलक्षणमेतत् । आहवनीयादिरूपेण नानाविधम् । यद्वा द्विता द्विविधायैहिकामुष्मिकफलायोभयाय । इति ॥

---

आनुष्टुभ चरण 'विश्वे जुषन्त पन्थआम्। नरः शुभेन पन्थआम् ' असे म्हणावे. | म्हणजे या ऋचेचें ७६ अक्षरांचें ' अतिधृति ' वृत्त सिद्ध होईल.

७. ज्या [अग्नी]ला स्तोत्रें करणारे, तेजःपुञ्ज [आणि] नमन करणारे भृगु जन दोन प्रकारांनीं भजते झाले—भृगुजन पूजेसाठीं मथून काढिते झाले—[तो हा] तेजस्वी अग्नि [सकल] वस्तूंचा धनी होय—जो त्यांचा धारणकर्ता [होय]. पूजनीय [अग्नि] त्याला प्रिय [अशा या] होमद्रव्यांवर प्रीति करो—पूजनीय [अग्नि] प्रीति करो.

7. He whom the praying, resplendent, [and] bowing Bhrigus worshipped in two ways—the Bhrigus [worshipped], churning him out for worship,—that Agni is the lord of things, who is their supporter. May sacred Agni love his dear oblations—may sacred [Agni] love [his oblations].

---

७. 'ज्या अग्नीला स्तोत्रपरायण, तेजस्वी, नमस्कार करून दैन्य दाखविणारे असे भृगुवंशांतील जन भजून अरणीतून निष्पन्न करून हवि देते झाले, तो हा अग्नि या पृथ्वींतील सकळ सुंदर द्रव्यांचा धनी होय. तर त्याला प्रिय असे जे घृतादिक पदार्थ आम्ही त्याजवर ओतीत आहों, ते तो आदरानें स्वीकारो.'

'भृगुजन'='भृगवः.' सू. ५८ मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

'दोन प्रकारांनीं'='द्विता.' म्हणजे मनुष्यांचा मित्र आणि देवांचा दूत होई अशा रीतीनें; मनुष्यांवर कृपा करून त्यांच्या मित्राप्रमाणें वागणें हा एक उद्देश, आणि मनुष्यांनीं दिलेलें हवि देवांकडे पोंहचविणें हा दुसरा उद्देश; या दोनी उद्देशांनीं, हे दोनोहि उद्देश जेणें-करून पूर्ण होतील अशा रीतीनें. ५८ व्या सूक्ताच्या ६ व्या मंत्रावरील टीपेंत हा दोन प्रकारचा उद्देश स्पष्ट करून दाखविला आहे.

'होमद्रव्यांवर'='अपिधीन्.' 'अपिधि' शब्द पुनः आलेला नाहीं; प्रस्तुत मंत्रांत सायणांस अनुसरून आम्हीं अर्थ केला आहे. तो केवळ निरुक्तीला अनुसरून आहे (कारण कीं 'अपिधि' म्हणजे कशाच्या तरी 'वर ठेविलेलें अथवा टाकिलेलें' जें तूप वगैरे, तें असा अक्षरार्थ आहे) तरी संभवतो खरा.

पहिल्या चरणांत 'अभिव्रवो'च्या ठिकाणीं 'अभिदीअवो,' आणि दुसऱ्यांत 'वसूनआम्' आणि 'एषआम्' असें म्हणावें म्हणजे वृत्ताला अक्षरांचा मेळ पडतो.

विश्वासां त्वा विशां पतिं हवामहे सर्वासां समानं दंपतिं भुजे सत्यगिर्वाहसं भुजे ।
अतिथिं मानुषाणां पितुर्न यस्यासया ।
अमी च विश्वे अमृतास आ वयो हव्या देवेष्वा वयः ॥ ८ ॥

विश्वासाम् । त्वा । विशाम् । पतिम् । हवामहे । सर्वासाम् । समानम् । दम्ऽपतिम् । भुजे । सत्यऽगिर्वाहसम् । भुजे ।
अतिथिम् । मानुषाणाम् । पितुः । न । यस्य । आसया ।
अमी इति । च । विश्वे । अमृतासः । आ । वयः । हव्या । देवेषु । आ । वयः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. विश्वासां विशां (=सर्वासां प्रजानां=सर्वेषां जनानां) पतिं (=प्रभुं) त्वा (=त्वां) [वयं] हवामहे (आह्वयामः)—सर्वासां [विशां] समानम् (=एकरूपं) दंपतिं (=गृहपतिं) भुजे (=भोजनाय)—सत्यगिर्वाहसं (=सत्यभूतं गिरां स्तोत्राणां वाहकं) [त्वां] भुजे (=भोजनाय)—मानुषाणां (=मनुष्याणाम्) अतिथिम् (=अतिथिवत्पूज्यं) [त्वां] [हवामहे=आह्वयामः]। यस्य आसया (=यस्य तव समीपे) पितुर्न (=पितुः समीपे पुत्रा यथा तथा) अमी च विश्वे अमृतासः (=अमी सर्वे देवा अपि) आ वयः (=हविरन्नमुद्दिश्य) [आगच्छन्ति]। वयः (=ऋत्विजः=उपासका) देवेषु आ (=तथागतेषु देवेषु मध्ये=तेषां संनिधौ) हव्या (=हव्यानि=हवींषि) (=निदधति=प्रत्यर्पयन्ति) ॥

पितुर्नेत्यादौ । किंचास्याग्नेरासया समीपे । आसेत्यन्तिकनाम । आसा अम्बरमिति तन्नामसु पाठात् । तत्समीपेऽमी विश्वेऽमृतासो हविर्भोक्तृत्वेन प्रसिद्धाः सर्वे देवा अप्यागच्छन्ति... । किमर्थम् । वयो हविर्लक्षणमन्नमुद्दिश्य । अग्निमुखाद्देवेतरेभ्यो दीयमानत्वात् । तत्र दृष्टान्तः । पितुर्न पितुरन्तिके पुत्रादयो यथान्नार्थं सेवन्ते तद्वत् । इति सायणः ॥

८. तुला सकळ जनांच्या प्रभूला [ आम्ही ] बोलावितों; सकळ जनांचा [ जो ] समान गृहप्रभु, [त्या] तुला जेवायाला—खरोखर स्तोत्रें वाहून नेणाऱ्या तुला जेवायाला [ आम्ही बोलावितों ], मनुष्यांचा पाहुणा [जो अग्नि, त्या]ला [ आम्ही बोलावितों ]; त्याच्या पुढें हे सर्व अमर, पित्याच्या पुढें [ पुत्र येतात ] तसे, हविरन्नासाठीं [ येतात ]—[ हे ] उपासक जन देवांसंनिध हविरन्नें [ अर्पीत आहेत ].

8. We invoke thee the lord of all men, [invoke thee] the common lord of the household of all, to eat the food—[thee] the true carrier of prayers, to eat the food, [thee] the guest of men; into whose presence, as [into that] of a father, even all those immortals [come] for the food.— The worshippers [place] the oblations before the gods.

८. 'हे अग्नी, सकळ जनांचा प्रभु, म्हणजे सकळांच्या घरीं प्रभूसारिखा सहणारा आणि घरांतील सर्व मनुष्यांकडून सेवा करून घेणारा, आणि स्तुति केलेली खरोखर देवांप्रत वाहून नेणारा, आणि मनुष्यांचे घरीं पाहुण्याप्रमाणें पक्वान्नें खाणारा, असा जो तूं, त्या तुला आम्ही जेवायास बोलावीत आहों. तर तूं ये, म्हणजे दुसरे देवहि, बापाच्या तोंडाद्वारें अन्न खाण्यास पुत्र येतात तसे, तुझ्या तोंडाद्वारें हविरन्न खाण्याकरितां येतील. आणि ते येऊन बसले म्हणजे त्यांच्या पुढें हे आमचे उपासक जन अनेक प्रकारचीं हव्यें ठेवितील' असा अभिप्राय आहे.

'समानं गृहप्रभु'=' समानं दंपतिम्.' म्हणजे सर्वांच्या घरांत घराच्या मालकाप्रमाणें असणारा. जशीं घरचीं सर्व माणसें एकाद्या वास्तविक घरधन्याला प्रसन्न राखण्याविषयीं तत्पर असतात आणि सर्व प्रकारें त्याची सेवा करितात, तशी अग्नीची करीत असतात, आणि त्याप्रमाणेंच त्याचा मान राखितात. आणि तोहि घरधन्याप्रमाणेंच घराचा संभाळ करितो असें मानीत, म्हणून 'दंपति' (=घरधनी) हें विशेषण अग्नीला लाविलें आहे. साधारण संस्कृतांत तरी 'दंपती' म्हणून जो शब्द प्रसिद्ध आहे, त्याचा अर्थ या मंत्रावरून स्पष्ट होतो. घरचा पुरुष आणि त्याची पत्नी ह्यांस घरचे मालक म्हणून 'दंपती' असें नांव आहे.

त्वम॑ग्ने सह॑सा सह॑न्तमः शु॒ष्मिन्त॑मो जायसे दे॒वता॑तये र॒यिर्न दे॒वता॑तये ।
शु॒ष्मिन्त॑मो॒ हि ते॒ मदो॑ द्यु॒म्निन्त॑म उ॒त क्रतु॑ः ।
अध॑ स्मा ते॒ परि॑ चर॒न्त्यजर श्रु॒ष्टीवा॑नो॒ नाज॑र ॥ ९ ॥

त्वम् । अ॒ग्ने॒ । सह॑सा । सह॑न्ऽतमः । शु॒ष्मिन्ऽत॑मः । जा॒य॒से॒ । दे॒वऽता॑तये । र॒यिः । न । दे॒वऽता॑तये ।
शु॒ष्मिन्ऽत॑मः । हि । ते॒ । मद॑ः । द्यु॒म्निन्ऽत॑मः । उ॒त । क्रतु॑ः ।
अध॑ । स्म॒ । ते॒ । परि॑ । च॒र॒न्ति॒ । अ॒ज॒र॒ । श्रु॒ष्टीऽवा॑नः । न । अ॒ज॒र॒ ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे अग्ने, त्वं देवतातये (=यज्ञाय) सहसा सहन्तमः (=बलेन अत्यन्तबलवान्) [अपि च) शुष्मिन्तमः (=अतिशयेन तेजस्वी) जायसे (जातोसि=निष्पन्नो भवसि)—रयिर्न देवतातये [जायसे] (=धनमिव यज्ञाय जातोसि)। हि (=यस्मात् कारणात्) ते (=तव) मदः (="आज्यस्वीकारजनितो हर्षः") द्युम्निन्तमः (=अतिशयेन तेजस्वी) उत (=अपि च) [ते] क्रतुः (=तव कर्म) [द्युम्निन्तमः=अतिशयेन तेजस्वी] [वर्तते]। अध स्म (=अतः कारणादेव) हे अजर (=जरारहित अग्ने), [जनास्] ते (="त्वां") परि चरन्ति (=सेवन्ते) —अजर (=हे जरारहिताग्ने), (=श्रुष्टीवानो न) (=दूता इव) [त्वां परिचरन्ति=त्वा सेवन्ते] ॥

---

'स्तोत्रें' इ० 'सत्यगिर्वाहसम्.' म्हणजे देवांप्रीत्यर्थ मनुष्यांनीं म्हटलेलीं जीं तीं देवांकडे नेणारा, मध्येंच टाकून देणारा नव्हे, खरोखर देवांजवळ नेऊन पोंहचविणारा.

वृत्तासाठीं 'सर्वासां'च्या ठिकाणीं 'सर्वासआं' असें पहिल्या चरणांत, 'मानुषाणआं' आणि 'यस्य आसया' असें दुसऱ्यांत, आणि तिसऱ्यांत 'देवेषु आ वयः' असें म्हणावें.

९. हे अग्नी, तूं यज्ञासाठीं सामर्थ्यानें अत्यंत विजयी आणि अत्यंत तेजस्वी [ असा ] निष्पन्न झाला आहेस—तूं यज्ञासाठीं द्रव्यच जणुं [ उत्पन्न झाला आहेस ]. कारण तुझा हर्ष अत्यंत तेजस्वी आणि तुझा पराक्रम अत्यंत प्रतापवान् [होय]. यास्तवच, हे अजर [ अग्नी ], तुला जन सेवितात—हे अजर [अग्नी], तुला जन दूतांप्रमाणें [ सेवितात].

9. Thou, O Agni, art born the mightiest with [ thy ] might [ and ] most fiery, for the sake of the sacrifice— [ born ] like a treasure for the sake of the sacrifice. For thy delight [ is ] most fiery, and most victorious [ is ] thy valour. It is therefore they wait upon thee, O ever youthful Agni—[wait upon thee], O ever youthful Agni, like messengers.

९. 'हे अग्नी, लोकांच्या हातून यज्ञ व्हावे म्हणून तूं आपल्या बळानें अतिशय बळवान्, आणि तेजस्वी, आणि जणुं काय संपत्तीची खाणच असा जन्मला आहेस. कारण तुला हविर्भक्षणानें जो आनंद होतो, तेणेंकरून तुझ्या आंगीं अत्यंत तेज (=बळ) येतें, आणि तूं मग जीं कृत्यें करूं लागतोस. तीं मोठ्या पराक्रमानें भरलेली असतात. म्हणूनच तर सकळ जन, एकाद्या राजासमोर दूतजन उभे असतात तसे, तुजसमोर उभे राहून तुझी सेवा करितात.'

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'त्वमग्ने'-च्या जागीं 'तुअमग्गने' असें, आणि तिसऱ्यांत 'चरन्ति अजर' आणि 'न अजर' असें म्हणावें.

प्र वो॑ म॒हे सह॑सा॒ सह॑स्वत उ॒षर्बुधे॑ पशु॒षे नाग्नये॒ स्तोमो॑ बभूत्व॒ग्नये॑।
प्रति॒ यदीं॑ ह॒विष्मा॒न्विश्वा॑सु॒ क्षासु॒ जोगु॑वे ।
अग्रे॑ रे॒भो न ज॑रत ऋषू॒णां जू॒र्णिर्होत॑ ऋषू॒णाम् ॥ १० ॥

प्र । वः॒ । म॒हे । सह॑सा । सह॑स्वते । उ॒षः॒ऽबुधे॑ । प॒शु॒ऽसे । न । अ॒ग्नये॑। स्तोमः॑ । ब॒भू॒तु॒ । अ॒ग्नये॑ ।
प्रति॑ । यत् । ई॒म् । ह॒विष्मा॑न् । विश्वा॑सु । क्षासु॑ । जोगु॑वे ।
अग्रे॑ । रे॒भः । न । ज॒र॒ते॒ । ऋ॒षू॒णाम् । जू॒र्णिः । होता॑ । ऋ॒षू॒णाम् ॥१०

## भाषायाम्.

१०. [ हे स्तोतारः], महे (=महते), सहसा सहस्वते (=बलेन बलवते ) उषर्बुधे (=उषःकाले प्रतिबुध्यमानाय) [एतादृशाय] वः ( =युष्माकम् ) अग्नये, पशुषे (=पशूनां दात्रे कस्मैचिद्राज्ञ इव), स्तोमः (=स्तोत्रं) प्र बभूतु (=प्रकर्षेण सिद्धो भवतु)— अग्नये [ स्तोमो प्र बभूतु ] ( स्तोत्रं प्रकर्षेण सिद्धं भवतु ) । यद् (=यस्मात् कारणाद् ) ई प्रति (=एनम् अग्निमुद्दिश्य ) हविष्मान् (=यजमानः ) विश्वासु क्षासु (=सर्वासु भूमिषु=सर्वेष्वपि देशेषु ) जोगुवे ( =स्तोत्रघोषं करोति ) । [अग्निः], ऋषूणामग्रे (=स्तोतृणामग्रभागे वर्तमानो ) रेभो न (=स्तोतेव ) जरते (=स्तौति सर्वेषामपि स्तोतृणां मध्ये प्रशस्तः स्तोता यथा तेषामग्रे स्थित्वा देवान् स्तौति अग्निरपि तथा स्तौति )—ऋषूणां जूर्णिः (=ऋषीणां मध्ये=स्तोतृणां मध्ये स्तोत्रकुशलो ) होता (=देवानाम् आह्वातायमग्निः ) [ जरते=देवान् स्तौति ] ॥

प्र बभूत्वित्यत्र प्रीणयितुं समर्थं भवतु । अग्रे इत्यादी च ऋषूणामागन्तृणां देवानां मध्ये श्रेष्ठमग्निं जूर्णिः स्तुतिकुशलो होताग्र इतर देवेभ्यः पूर्वं जरते । स्तौति । तत्र दृष्टान्तः । ऋषूणां महतां धनवतामग्रे रेभो न । वन्दीव । ...... । यद्वा ऋषूणामित्येतद्धोतृविशेषणम् ॥ ऋषूणां ज्ञानवतां मध्ये श्रेष्ठोयं होतेत्यर्थः । इति सायणः ॥

१०. सूक्तकर्ता आपल्या मित्रांस म्हणतो, ' मित्र हो, महान्, बलवान्, आणि प्रातःकाळीं पेटविला जाणारा जो अग्नि, त्याचें तुम्ही स्तोत्र गा; कारण जसा एखादा गाई देणारा उदार राजा स्तवनीय असतो, तसा हा स्तवनीय आहे. आणि

१०. [हे जन हो], मोठा, सामर्थ्यानें सामर्थ्यवान्, [ आणि ] प्रात:काळीं जागृत होणारा [ जो ] तुमचा अग्नि, [त्या]कारणें, गुरें देणाऱ्या दात्याकारणें [ जसें ] तसें, [ त्या ] अग्नीकारणें स्तोत्र सिद्ध होओ. कारण कीं त्याला उद्देशून सकळ देशांत [उपासकजन] हवि अर्पण करून स्तोत्रघोष करीत असतात. [अग्नि] स्तोत्यांच्या अग्रभागीं [ उभा राहून ] स्तोत्याप्रमाणें [ देवांचें ] स्तवन करितो—स्तोत्यांमध्यें [ हा ] स्तोत्रकुशल होता [ अग्नि, देवांचें स्तवन करितो ].

10. Let there be composed a hymn for your Agni [who is] great, mighty with might, awaking in the early dawn—a hymn for Agni as for a donor of cattle. For in his honour the sacrificer chants [ his hymns ] in all climes. Agni praises [ the gods ], like a poet at the head of poets—an adept invoker among the poets.

---

त्याला उद्देशून सर्व देशांतील लोक स्तोत्रें गातात आणि हव्यें अर्पण करीत असतात. आणि अग्नि हा उत्तम होता आहे; जसा एकादा उत्तम मानुष होता इतर गायकांच्या अग्रभागीं उभा राहून देवांचें स्तोत्र म्हणून आह्वान करितो, तसा हाहि करीत असतो.'

'सामर्थ्यानें सामर्थ्यवान्'=' सहसा सहस्वते.' 'सामर्थ्यानें' ( सहसा ) इतकी पुनरुक्ति आहे; पण असे प्रयोग वेदांत पुष्कळ येत असतात. वरच्याच मंत्र पहा ( 'सहसा सहन्तमः').

'गुरें देणाऱ्या दात्याकारणें'=' पशुषे न.' ही उपमा जरा चमत्कारिक दिसते. सायणाला सुद्धा या शब्दांविषयीं संशय आहे असें दिसतें. 'पशु' शब्द आणखी एकदाच संहितेंत आला आहे ( ऋ. ५. ४१. १); पण तेथें तरी अर्थाविषयीं अशीच अडचण आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'सहसा'-च्या जागीं 'सहसआ' आणि 'नाग्नये'च्या ठिकाणीं ' न अग्नये, ' आणि 'बभूतु अग्नये' असें, दुसऱ्यांत 'हविष्मान्' असें, आणि तिसऱ्यांत 'ऋभूणाम्'च्या ऐवजीं दोनी स्थळीं 'ऋभूणआम्' असें म्हणावें.

**स नो नेदिष्ठं ददृशान आ भराग्ने देवेभिः सचनाः सुचेतुना महो रायः सुचेतुना ।**
**महि शविष्ठ नस्कृधि संचक्षे भुजे अस्यै ।**
**महि स्तोतृभ्यो मघवन्त्सुवीर्यं मथीरुग्रो न शवसा ॥ ११ ॥ १३॥**

सः । नः । नेदिष्ठम् । ददृशानः । आ । भर । अग्ने । देवेभिः । सऽचनाः । सुऽचेतुना । महः । रायः । सुऽचेतुना ।
महि । शविष्ठ । नः । कृधि । सम्ऽचक्षे । भुजे । अस्यै ।
महि । स्तोतृऽभ्यः । मघऽवन् । सुऽवीर्यम् । मथीः । उग्रः । न । शवसा ॥ ११ ॥ १३ ॥

**भाषायाम्.**

११. हे अग्ने, नेदिष्ठं ददृशानः (=अत्यन्तसमीपं दृश्यमानो) देवेभिः सचनाः (=इतरैर्देवैः सह कृतहविरर्पणादिसंभाननः) स [त्वम्] (=अतः कारणात् तादृशस्त्वं) नः (=अस्मभ्यं) सुचेतुना (=अस्मदनुग्रहबुद्ध्या=कृपया) [महो रायः= महान्ति धनानि]—सुचेतुना महो रायः (=कृपया महान्ति धनानि)—आ भर (=आ वह)। हे शविष्ठ (=अतिशयेन बलवन्नग्ने), नः (=अस्मदर्थं) महि संचक्षे कृधि (=महद् धनं संद्रष्टुं कुरु=वयं महद् धनं यथा पश्यामस्तथा कुरु) भुजे च अस्यै [कृधि] (=अस्मै दृश्यमानाय भूसंबन्धिने भोगाय कुरु=अस्याः पृथिव्याः संबन्धिनो भोगान् वयं यथा लभेमहि तथा कुरु)। हे मघवन् (=धनवन्नग्ने), स्तोतृभ्यः (=तव स्तोतृभ्योपि) महि सुवीर्यं (=महत् सुवीर्योपेतसंततियुक्तं धनं) [कृधि =कुरु=प्रयच्छ]। [अपि च] उग्रो न (=कश्चित् क्रूरो मनुष्यो यथा तथा) शवसा (=बलेन) मथीः (=अस्माकं शत्रून् नाशय)॥

११. हा येथें या सूक्ताचा उपसंहार होतो. यांत ऋषीनें अभीष्ट वर शेवटीं मागावयाचा तो मागितला आहे. 'हे अग्नी, या प्रकारेंकरून तुझी स्तुति आम्हीं केली आहे, तर सकळ देवांमध्यें मनुष्यांला अगदी संनिध दृष्टीस पडणारा आणि दुसऱ्या देवांबरोबर ज्याची पूजा करितात असा जो तूं, तो कृपा करून आम्हां उपासकांला मोठी संपत्ति घेऊन ये; हे प्रबळ अग्नी, मोठा धनोत्कर्ष आम्हीं आपल्या दृष्टीनें पहावा, आणि या जगांतील उपभोग भोगावे, असें तूं कर. आणि तुझे स्तोते जे, त्यांला वीर्यवन्त पुत्रपौत्र आणि मोठी संपत्ति दे,

११. तर हे अग्नी, अत्यंत समीप दृष्टीस पडणारा आणि देवांबरोबर पूजा ग्रहण करणारा [जो तूं, तो] कृपा करून मोठ्या संपत्ति—कृपा करून [ मोठ्या संपत्ति ], आम्हांला आण. हे महाबळ [ अग्नी ], आम्ही मोठमोठें धन पाहूं [आणि] ह्या [पृथिवी]-चा उपभोग घेऊं असें कर. हे धनवान् [अग्नी], [तुझ्या] स्तोत्यांला उत्तमवीरांनीं युक्त अशी संपत्ति प्राप्त करून दे. [ आणि ] क्रूर [मनुष्या]प्रमाणें [ आपल्या ] प्रतापानें [आमच्या शत्रूंचा] नाश कर.

11. Bring, therefore, thou, O Agni, who art seen nearest [ of all gods ], [ and ] who receivest common worship with the gods, [ great riches ] unto us with [ thy ] benevolence—great riches with [ thy ] benevolence. Give us, O mightiest [ Agni ], great wealth to see [ and ] this [ world ] to enjoy. Give to [ thy ] praisers, O bounteous [ Agni ], great affluence accompanied by brave progeny. Destroy [ our enemies ] with [ thy ] might like a conqueror.

---

आणि दुष्टांचा संहार एकाद्या क्रूर मासाप्रमाणें करून टाक.'

'अत्यंत समीप दृष्टीस पडणारा '=नेदिष्ठं ददृशानः.' दुसरे देव मनुष्यांपासा जवळ आहेत असे दिसत नाहींत, पण अग्नि देव जणुं मनुष्यांच्या प्रत्यक्ष जवळ असणारा होय, असा अभिप्राय.

' ह्या पृथिवीचा उपभोग '=' अस्मै जे.' अक्षरशः ' ह्या उपभोग ' असा आहे. सायणांप्रमाणें आम्हीं भावार्थ केला आहे.

या सूक्ताचें वृत्त ' अत्यष्टि ' म्हणून प्रारंभीं सांगितलें आहे. या वृत्ताचें वास्तविक लक्षण असें आहे कीं, यांत ठोकळ जगती आणि अनुष्टुभ् या वृत्तांचा संकर झालेला असतो. याचे चार चरण आहेत असें न म्हणतां, तीनच आहेत असें समजावें. पहिल्या चरणांत पुनः तीन पोटचरण असतात, त्यांतून पहिले दोन पोटचरण जगती छंदाचे आणि तिसरा अनुष्टुभ् वृत्ताचा, १२+१२ + ८=३२ अक्षरें. दुसऱ्या चरणांत दोन अनुष्टुभाचे पोटचरण, ८ + ८= १६ अक्षरें. आणि तिसऱ्या चरणांत दोन पोटचरण, त्यांतून पहिला एक द्वादशाक्षरी जगतीचा, आणि दुसरा अष्टाक्षरी अनुष्टुभाचा, १२ + ८ = २०; मिळून सर्व अक्षरें ६८ असावीं.

या मानानें अकराव्या मंत्रांत पहिल्या चरणांत ' भराग्ने ' याबद्दल ' भर अग्ने ' असें व्यस्त म्हणावें लागतें; दुसऱ्या चरणाच्या दुसऱ्या पोटचरणांत ' अस्मै ' च्या ठिकाणीं ' असिऐ, ' आणि तिसऱ्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत ' सुवीरि-

## सूक्तम् १२८.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । अग्निर्देवता । अत्यष्टिश्छन्दः ॥

**अयं जायत मनुषो धरीमणि होता यजिष्ठ उशिजामनु व्रतमग्निः स्वमनु व्रतम् ।**
**विश्वश्रुष्टिः सखीयते रयिरिव श्रवस्यते ।**
**अदब्धो होता नि षददिळस्पदे परिवीत इळस्पदे ॥ १ ॥**

अयम् । जायत । मनुषः । धरीमणि । होता । यजिष्ठः । उशिजाम् । अनु । व्रतम् । अग्निः । स्वम् । अनु । व्रतम् ।
विश्वऽश्रुष्टिः । सखिऽयते । रयिःऽइव । श्रवस्यते ।
अदब्धः । होता । नि । सदत् । इळः । पदे । परिऽवीतः । इळः । पदे ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. अयम् [ अग्निः ] मनुषो धरीमणि (=मनोर्नाम सर्वेषां पितृभूतस्य पुरुषस्य वेद्याख्ये स्थाने ) [ अ]जायत ( =निष्पन्नोभूत् ) । उशिजाम् अनु व्रतं ( =फलस्य कामयितृणाम् उत्सुकानामुपासकानां कर्मानुलक्ष्य=तेषां कर्मार्थं )—स्वम् अनु व्रतं (=स्वकीयं कर्म चानुलक्ष्य=स्वकीयकर्मार्थं च ) अग्निः यजिष्ठो होता (=अतिशयेन यजनकुशलो देवानामाह्वाता) [ एतादृशः ] [ अजायत ] । सखीयते विश्वश्रुष्टिः (=सखित्वमिच्छते भक्ताय सकलकर्मकारी=सकलकर्मानुष्ठाता ) श्रवस्यते [ च ] रयिरिव (=अन्नादिधनं च आत्मन इच्छते भक्ताय साक्षाद्धनस्थानीयः ) अदब्धः (=अहिंसितः=केनाप्यप्रतिहतो ) होता (=देवानामाह्वाता ) [ अग्निः ] इळस्पदे (=भूम्याः स्थाने=वेद्यां) नि षदत् (=न्यषीदत्)—इळस्पदे (=वेद्याम्) [ऋत्विग्भिः] परिवीतः (=परिवेष्टितः सन् ) [ नि सदत्=न्यषीदत् ] ॥

सायणस्तु मनुषो मनुष्यस्याध्वर्योः सकाशाज्जायत । अरणिमन्थनेनोत्पन्नः ।... इळस्पद इडाया भूम्याः पदे । ... । धरीमणि सारभूते स्थाने वेदिरूपे... नि षदत् । निषीदति । इति ॥

## सूक्त १२८.

ऋषि—परुच्छेप ( पूर्वसूक्ताचा जो तोच ). देवता—अग्नि. वृत्त—अत्यष्टि. (पूर्वसूक्ताच्या शेवटील मंत्रावरची टीप पहा ).

१. हा अग्नि मनूच्या वेदींत जन्मला. उत्तम यज्ञसंपादक होता होऊन उत्कंठित उपासकांच्या कर्मासाठीं [आणि] आपल्या कर्मासाठीं [जन्मला]: [त्याचें] सख्य इच्छिणाऱ्याला सर्वकामी [आणि] धनाची इच्छा करणाऱ्या [उपासका]ला धनभांडारच [असा अग्नि]—[हा] निर्भय होता, वेदीवर बसला. ऋत्विजांनीं वेष्टिलेला [ हा अग्निरूप होता] वेदीवर [ बसला ].

## HYMN 128.

To *Agni*. By *Paruchchhepa* son of *Divodâsa*. Metre—*Atyashti*, which is a complex metre containing 68 letters arranged in pâdas of the *Jagatî* and *Anushtup* metres.

1. This [ Agni ] was born on the altar of Manu,—Agni [ was born] the invoker, the most efficient sacrificer, to promote the work of anxious worshippers and his own work—a friend doing all work for him who desires his friendship, [ and ] a treasure to him who desires wealth. The uninterrupted invoker sat down on the altar—[he sat down] on the altar, surrounded [ by the priests ].

---

ष्ट ' असें वाचावें लागतें.

आजपर्यंत ज्या सूक्तांचें भाषांतर झालें त्या सर्वांत या सूक्ताचें वृत्त फार अवघड आहे. हें एक मिश्रवृत्ताचें उदाहरण आहे, आणि उत्कृति, अभिकृति, संकृति, विकृति, आकृति, प्रकृति, कृति, अतिधृति, धृति, अत्यष्टि, आणि अष्टि म्हणून जीं मिश्रवृत्तें वेदाच्या संबंधानें सांगितलीं आहेत, त्यांतून प्रस्तुत सूक्ताचें एक वृत्त होय.

अशा प्रकारची अनेक मिश्रवृत्तें आणि त्याशिवाय पुष्कळ साधीं ( म्हणजे, अनुष्टुभ्, त्रिष्टुभ्, जगती इत्यादिक ) वृत्तें यांत वेदसंहिता रचिलेली आहे, यावरून वेदाच्या काळीं संस्कृत भाषा आणि संस्कृत भाषेंत रचिलेले विद्याग्रंथ हे मोठ्या परिपक्व दशेला आले होते असें अनुमान सहज होतें. केवळ अलीकडील संस्कृतांतच वृत्तांचें वैपुल्य आहे असें नाहीं, तर वेदकाळींहि तसेंच होतें असें स्पष्ट दिसून येतें.

हें जें ' अत्यष्टि ' वृत्त तें आधुनिक संस्कृतांत अथवा प्राकृत भाषांत आतां उपलब्ध नाहीं; म्हणजे या वृत्तांत रचिलेले ग्रंथ अथवा श्लोक संस्कृतांत प्रसिद्ध नाहींत.

---

१. हेंहि सूक्त दिवोदासाचा पुत्र परुच्छेप या ऋषीचेंच आहे, आणि देव-

तं यज्ञसाधमपि वातयामस्यृतस्य पथा नमसा हविष्मता देवताता
हविष्मता ।
स न ऊर्जामुपाभृत्यया कृपा न जूर्यति ।
यं मातरिश्वा मनवे परावतो देवं भाः परावतः ॥ २ ॥
तम् । यज्ञऽसाधम् । अपि । वातयामसि । ऋतस्य । पथा । नमसा ।
हविष्मता । देवऽताता । हविष्मता ।
सः । नः । ऊर्जाम् । उपऽआभृति । अया । कृपा । न । जूर्यति ।
यम् । मातरिश्वा । मनवे । पराऽवतः । देवम् । भारिति भाः । प-
राऽवतः ॥ २ ॥

---

**भाषायाम्.**

२. यज्ञसाधं (=यज्ञस्य साधयितारं) तम् [ अग्निं वयम् ] ऋतस्य पथा ( सत्य-भूतस्य यज्ञस्य मार्गेण साधनेन ) हविष्मता नमसा ( =हविर्युक्तेन स्तोत्रेण=हविषा स्तोत्रेण च ) अपि वातयामसि (=अपि वातयामः=सेवामहे )। देवताता (=देवतातौ=यज्ञे ) हविष्मता [ नमसा ] (=हविषा स्तोत्रेण च ) [ अपि वातयामः=सेवामहे ] । यं देवं (=यं द्योतमानम् ) [ अग्निं ] मातरिश्वा (=एतन्नामको देवस्वरूपभाक् कश्चि-त् प्रसिद्धतमः पुरुषो ) मनवे (=मनुष्याय=मनुष्याणां हिताय ) परावतो भाः (=दू-रस्थात्प्रदेशाद् आ जभार=आजहार )—परावतः ( =दूरस्थात्प्रदेशाद् ) [ भाः ] (=आ जभार=आजहार) सः [ अग्नि ] नः ऊर्जाम् (=अस्माकं हविर्लक्षणाना-मन्नानाम् ) उपाभृति (=" उपाहरणे तत्स्वीकारविषये "=उपाभृत्या=तत्स्वीकारेण ) अया कृपा न जूर्यति ( =अनया पुरोदृश्यमानया दीप्त्या=दीप्तिविषये न जीर्णो वृद्धो भवति ) ॥

यदा मातरिश्वाग्निं पृथिव्यामाजहार ततः प्रभृति सोयमग्निरस्माद्दृशानामुपासकानां हवींषि स्वीकरोति । तदपि स वृद्धो न भवति अपि त्वेतेन स्वतेजसा युवैव दृ-श्यते पश्य पश्येति भावः ॥

तम् अग्निं वेद्यां स्थापितम् अपि वातयामसि । अपिः संभावनार्थः। आ परितो-वा सेवामहे । ... यमग्निं देवं द्योतनशीलं मातरिश्वान्तरिक्षसंचारी वायुः पूर्वं मनवे मनोरथाय परावतोतिदूरं गतवत आदित्याद्वाः । ...... औचित्येन भूमौ स्थापि-तवानित्यर्थः । इति सायणः ॥

२. तो जो यज्ञसंपादक, त्याला आम्ही सत्याच्या मार्गानें आणि हवीसहित स्तोत्रानें—यज्ञांत हवीसहित [स्तोत्रानें]—भजतों. ज्या देदीप्यमान [अग्नी]ला मातरिश्वा दुरून आणून मनुष्यांसाठीं स्थापिता झाला—दुरून आणून स्थापिता झाला, तो आमचीं हव्यें घेऊन घेऊन आपल्या या तेजानें म्हातारा होत नाहीं.

2. Him, the accomplisher of the sacrifice, we serve by the path of Truth, with prayer and oblation—[with prayer] and oblation in sacrifice. That brilliant [Agni] whom Mâtaris'vâ brought from afar—from afar for the sake of man, does not become old in this [his] splendor by accepting our oblations.

ता अग्निच असून वृनहि वरच्या सूक्ताप्रमाणें अत्यष्टि हेंच आहे. या पहिल्या ऋचेंत ऋषि म्हणतो, ' अग्नि हा सर्व मनुष्यांचा आदिपुरुष मनु याच्या स्थंडिलावर प्रथम जन्मला; आणि तो जन्मला तो यज्ञ करण्याविषयीं अत्यंत कुशल असा होता जन्मला. जन्मण्याचा उद्देश हा कीं, उपासकांची यजनादिक कर्में चालावीं आणि मनुष्यांकडून देवांप्रीत्यर्थ हवि अर्पण करवून तें देवांप्रत घेऊन जाणें, हें जें अग्नीचें काम, तें होत रहावें. अग्नीचें मित्रत्व इच्छिणारे जे भक्त, त्यांचा सर्व कामें करणारा चाकरच जणुं, आणि धनाची इच्छा करणारे जे भक्त, त्याकारणें साक्षात् द्रव्याचें भांडारच जणु असा जो अग्नि, तो मनूच्या वेदीवर (स्थंडिलावर) होता होऊन बसला, आणि त्याच्या सभोंताली दुसरे ऋत्विज उभे राहिले.'

' मनूच्या वेदींत '=' मनुषो धरीमणि.' हा अर्थ आम्हीं सरळ अन्वयास धरून केला आहे. मनूच्या वेदींत अग्नि प्रथम होता जन्मला म्हणजे, मनुष्यांनीं देवांप्रीत्यर्थ यज्ञयाग करावे आणि अग्नीकडून हवि देवांप्रत नेववावे म्हणून अग्नीला मनूनें पेटवून अग्नीच्या द्वारें हवि अर्पण करण्याचा प्रघात मनूनें प्रथम घालून दिला. अग्नीची आराधना करण्याचा प्रचार प्रथम मनूनें पाडिला असें पूर्वीहि सांगितलें आहे. पृ. ३६, मं. १९.

' उत्कंठित उपासकांच्या कर्मासाठीं '= ' उशिजाम् अनु व्रतम्.' म्हणजे यज्ञयागादिक जीं उपासकांचीं कर्में, तीं सिद्धीस जावीं म्हणून.

वृत्तसुखासाठीं पहिल्या चरणाच्या तिसऱ्या पोटचरणांत, ' स्वम् 'च्या स्थळीं ' सुअम् ' असें वाचावें लागतें.

२. या ऋचेंत ऋषि म्हणतो, ' यज्ञसाधक अग्नीला मातरिश्वा याणें स्वर्गा-

एवेन सद्यः पर्येति पार्थिवं मुहुर्गी रेतो वृषभः कनिक्रदद्दधद्रेतः
कनिक्रदत् ।
शतं चक्षाणो अक्षभिर्देवो वनेषु तुर्वणिः ।
सदो दधान उपरेषु सानुष्वग्निः परेषु सानुषु ॥ ३ ॥

एवेन । सद्यः । परि । एति । पार्थिवम् । मुहुःऽगीः । रेतः । वृषभः ।
कनिक्रदत् । दधत् । रेतः । कनिक्रदत् ।
शतम् । चक्षाणः । अक्षऽभिः । देवः । वनेषु । तुर्वणिः ।
सदः । दधानः । उपरेषु । सानुषु । अग्निः । परेषु । सानुषु ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ स ] एवेन (=एकेनैव गमनेन ) सद्यः ( =एकस्मिन्नेव दिने ) पार्थिवं पर्येति (=पृथिवीसंबन्धि सकलं स्थलं=भूलोकं सूर्यरूपेण प्रदक्षिणीकरोति ) । मुहुर्गीः (=" सर्वदा गीयमानो") वृषभः (=वर्षिता=वीर्यवान् ) [अग्नी] रेतो [दधत्] (=रेतः सिञ्चन् ) कनिक्रदत् (=शब्दयन्) [ पर्येति ]—रेतो दधत् कनिक्रदत् (=रेतः सिञ्चन् शब्दयंश्च ) [पार्थिवं पर्येति=भूलोकं सूर्यरूपेण परितो गच्छति ] । देवः ( =द्योतमानः ) शतम् अक्षभिः ( =शतोपलक्षितासंख्यातैर्नेत्रैश् ) चक्षाणः ( =पश्यन् ) वनेषु तुर्वणिः (=अरण्येषु दावानलरूपेण शीघ्रगामी ) [ भवति ] (=वनवृक्षान् सत्वरं दहति ) । अग्निः उपरेषु सानुषु ( =समीपस्थेषु=पार्थिवेषु समुच्छ्रितेषु महापर्वतादीनां शिखरेषु ) [ तथा ] परेषु सानुषु ( =दूरस्थितेषु द्युलोकस्योच्चैःशिखरेषु ) सदो दधानः (=सूर्यतेजोरूपेण आसनं धारयमाणः=आसीनो ) [ भवति ] ॥

सायणस्त्वेवं व्याचष्टे । अयमग्निरेवेन गमनसाधनेन गमनेन वा सद्योऽस्मदाह्वानानन्तरं पार्थिवं पृथिवीसंबन्धि स्थानं वेदिलक्षणमेव परि परितः । यद्वाभिमुख्यार्थो वा पर्येति । गच्छति । कीदृशोऽग्निः । मुहुर्गीः । सर्वदा गीयमानः । रेतःशब्देन तत्कार्यं हवीरूपमन्नमुच्यते । तद्वान् ॥ मत्वर्थीयो लुप्यते ॥ वृषभः कामानां वर्षिता कनिक्रदत् शब्दयन् पर्येति । पुनः स एव विशेष्यते । रेतो दधत् । आज्यादिस्वीकारेणाधिकं सामर्थ्यं दधानः कनिक्रदत् शब्दयन् पर्येतीति शेषः । पुनः स एव विशेष्यते । अयमग्निर्देवो वनेषु संभजनेषु स्तोत्रेषु निमित्तभूतेष्वक्षभिरक्षस्थानीयाभिर्ज्वालाभिः शतं चक्षाणः सर्वतः प्रकाशमानः । यद्वा ज्वालोत्कर्षेण यजमानेन कृतं शतगुणितं प्रख्यापयन् । तथा तुर्वणिः शीघ्रगन्ता शत्रूणां हिंसको वा ॥ तुर्वणि-

३. [ अग्नि ] एक धांवेनें सकळ भूलोकाला प्रदक्षिणा करितो. नित्यस्तुत वीर्यवान् [अग्नि] पोळाप्रमाणें रेताचा [ वर्षाव करीत करीत ] डेंकतो—रेताचा वर्षाव करीत करीत डेंकतो. आणि देदीप्यमान [ अग्नि ] शेकडो डोळ्यांनीं पाहत पाहत अरण्यांमध्यें धांवतो. तो जवळच्या शिखरांवर आसन मांडून बसतो. अग्नि दूरच्याहि शिखरांवर [ आसन मांडून बसतो ].

3. In [ one ] course in a single day he goes round all earthly space, the ever praised bull bellows, [discharging] the semen—bellows, discharging the semen; brilliant Agni seeing with a hundred eyes hies through the forests, now taking his seat on precipices near, then Agni [ taking his seat ] on precipices distant.

---

पासून मानवांच्या हितासाठीं पृथिवीवर आणिलें, त्या दिवसापासून आपण मानव त्याला यज्ञमार्गानें, म्हणजे हवि आणि स्तोत्र अर्पण करून भजत असतों, आणि तो आमचीं हव्यें ग्रहण करून देवांपाशीं पोंहचविण्याचें काम करीत आहे, तथापि तो म्हातारा होतो आणि त्याचें तेज मंद झालें आहे असें नाहीं, तर हें पहा त्याचें तेज आरंभीं जसें अखंड होतें तसेंच अद्यापिहि दिसत आहे.'

'सत्याच्या मार्गानें'='ऋतस्य पथा.' हा अर्थ अक्षरशः आहे. सत्यस्वरूप असा जो यज्ञ, त्याच्याच मार्गानें असा अभिप्राय आहे. आर्यलोक यज्ञ करणें हाच धर्माचा खरा मार्ग असें समजत, म्हणून 'ऋत' शब्दाचा अर्थ 'यज्ञ' अथवा तद्रूप 'धर्म' असा होत असतो.

'मातरिश्वा.' हा कोण याविषयीं आणि त्यानें अग्नीला मनुष्यांच्या हितासाठीं पृथिवीवर कसें आणिलें, त्याविषयीं सू. ९३ मं. ६ आणि टीप पहा.

'आमचीं हव्यें घेऊन घेऊन आपल्या तेजानें म्हातारा होत नाहीं'='नः ऊर्जाम् उपाभृति अया कृपया न जूर्यति.' अक्षरशः अर्थ 'आमच्या हवींच्या स्वीकारानें तो या [ आपल्या ] तेजानें म्हातारा होत नाहीं.' म्हणजे हविरन्नें घेत घेत आला आहे, तथापि तो म्हातारा होत नाहीं इतकेंच नव्हे, पण उलटा उत्तरोत्तर अधिकच तरुणावस्थेंत येत आहे असें त्याच्या या देदीप्यमान कांतीवरून दिसतें.

'दुरून आणून स्थापिता झाला'='परावतो भाः.' अक्षरार्थ 'दुरून आणिता झाला' इतकाच आहे. 'भाः' हें 'भृ' धातूचें रूप 'आ अबिभः' ह्या अर्थी आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'वातयामसि । ऋतस्य' असें, दुसऱ्यांत 'उपाभृति । अया' असें आणि तिसऱ्यांत 'भाः'च्या ठिकाणीं 'भाअः' असें वाचावें लागतें.

स सुक्रतुः पुरोहितो दमेदमेऽग्निर्यज्ञस्याध्वरस्य चेतति क्रत्वा यज्ञस्य चेतति ।
क्रत्वा वेधा इषूयते विश्वा जातानि पस्पशे ।
यतो घृतश्रीरतिथिरजायत वह्निर्वेधा अजायत ॥ ४ ॥

सः । सुऽक्रतुः । पुरःऽहितः । दमेऽदमे । अग्निः । यज्ञस्य । अध्वरस्य । चेतति । क्रत्वा । यज्ञस्य । चेतति ।
क्रत्वा । वेधाः । इषुऽयते । विश्वा । जातानि । पस्पशे ।
यतः । घृतऽश्रीः । अतिथिः । अजायत । वह्निः । वेधाः । अजायत ॥ ४

स्तूर्णवनिरिति यास्कः । नि. ६. १४ ॥ किंच सानुषु समुच्छ्रितेषु सानु समुच्छ्रितं भवतीति यास्कः । नि० २. २४. ॥ तेषूपरेषु । उपरमन्त एष्वभ्रय इत्युपरा धिष्ण्या यजमानगृहा वा । तेषु सदो दधानः स्थानं धारयमाणोऽग्निः सत्रः पर्येतीति पूर्वत्रान्वयः । किमर्थम् । परेषूत्कृष्टेषु सानुषु समुच्छ्रितेषु कर्मसु हविःषु वा निमित्तभूतेषु ॥

## भाषायाम्.

४. स सुक्रतुः (=शोभनप्रज्ञः=महाप्रज्ञः) पुरोहितः (=यागनिर्वाहकः) अग्निः दमेदमे (=गृहेगृहे=सर्वेषु गृहेषु) यज्ञस्य अध्वरस्य [च] (=यागस्य च) चेतति (=पश्यति=यज्ञमध्वरं च पश्यति=सम्यग्यथा यज्ञोऽध्वरश्च भवति तथा करोति)—[अग्निः] क्रत्वा (=प्रज्ञया) यज्ञस्य चेतति (=यज्ञः सम्यग्यथा भवति तथा करोति)। वेधाः (=सर्वेषामपि वस्तूनां कर्ता=वत्सलः) [स] इषूयते (=अन्नमात्मन इच्छते=उपासकाय) क्रत्वा (=प्रज्ञया) विश्वा जातानि (=विश्वानि जातानि=सकलान्यपि वस्तूनि) पस्पशे (=पश्यति) यतः (=यतः कारणाद्) [अग्निः] घृतश्रीः अतिथिः (=घृतं श्रयन्=घृतमत्यर्थं सेवमानोतिथिः) अजायत (=उत्पन्नोस्ति)—[अग्निः] वेधाः (=वत्सलो) वह्निः (=हविषां वोढा) अजायत (=उत्पन्नोस्ति) ॥

अध्वरस्येत्यादौ अध्वरस्य नाशरहितस्य फलप्रदस्य यज्ञस्य तदर्थं चेतति । जानाति प्रबुध्यत इत्यर्थः । किंचायं यजमानोपि क्रत्वा शोभनेन कर्मणा यज्ञस्य चेतति । कर्तव्यतामवजानाति । किंचायमग्निरपि क्रत्वा प्रकृष्टेन कर्मणा वेधा विविधानां फलानां कर्ता सन् । इषूयते ... अन्नम् ... इच्छते यजमानार्थं विश्वा जातानि सर्वाणि संपादितानि हविरादीनि पस्पशे । अत्यर्थं स्पृशति । स्वीकरोति । इति सायणः ॥

३. हा अग्नि सूर्यरूपानें उगवून । एके धांवेसरशीं सगळ्या पृथ्वीला एका

४. महाप्रज्ञ पुरोहित [ असा जो ] अग्नि, [ तो ] घरोघर यज्ञाला [ आणि ] यागाला संभाळितो— [ आपल्या ] प्रज्ञेनें यज्ञाला संभाळितो. वत्सल अग्नि प्रज्ञेनें उपासकासाठीं सर्व वस्तु संभाळितो. कारण कीं [ अग्नि ] [ हा ] घृत पिणारा अतिथि जन्मलेला आहे— [अग्नि हा] वत्सल हविर्वाहक जन्मलेला आहे.

4. That wise priest—Agni, takes care of the sacrifice and of the ceremony in every house—he takes care of the sacrifice with [ his ] wisdom. With [ his ] wisdom gracious Agni sees all things for the worshipper, since he is born a guest to drink the clarified butter—[ Agni ] is born a gracious carrier [ of oblations ].

दिवसांत प्रदक्षिणा करितो; जसा एकादा बळकट पोळ वीर्योन्मत्त होऊन वीर्यस्राव करीत करीत ढेंकतो, आणि धांवत असतो, तसा अग्नि धांवत असतो. दावानलरूपानें अग्नि शेकडो डोळ्यांनीं जणुं पाहत पाहत मोठमोठ्या अरण्यांमध्यें धांवतो. आणि सूर्याचें जें तेज, तद्रूपानें अग्नि जसा पृथिवीवरील पर्वतादिकांच्या अत्युच्च शिखरीं जणुं आसन घालून बसतो, तसाच तो द्युलोकाचीं जीं निःसीम उंच शिखरें त्यांजवरहि आपलें आसन मांडून बसत असतो.'

'नित्यस्तुत'=' मुहुर्गीः' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. पण त्याला प्रयोगान्तरांची बळकटी नाहीं, कारण पुनः हा शब्द कोठें आलेला आढळत नाहीं. पाश्चिमात्य विद्वान् ' पुनः खाणारा ' असें म्हणतात. पण दोहोंतून एकाहि अर्थीं या विशेषणानें प्रयोजन व्यक्त नाहीं; आणि दुसरे प्रयोग नाहींत, म्हणून आम्हीं सायणांसच अनुसरलों आहों.

' ढेंकतो '=' कनिक्रदत्.' अक्षरशः ' मोठ्यानें ढेंकणारा.' जसे आपण आधुनिक काळीं बळ, मोठेपणा आणि प्रताप यांविषयीं बोलावयाचें असलें म्हणजे कोणाला तरी सिंहाची उपमा देत असतों, तसे वेदकाळींचे ऋषि पोळाची उपमा देत असत. याचीं उदाहरणें वेदांत सर्वत्र पसरलीं आहेत.

' पोळाप्रमाणें ' याच्या बदला मुळांत शब्द जरी नाहीं, तरी ' वीर्योन्मत्त पोळ ' या अर्थाचा जो ' वृषभ ' शब्द आहे, त्याजवरून आणि ' रेतो दधत् ' या शब्दांवरून उपमा गम्यमान आहे.

वृत्तसुखार्थ पहिल्या चरणांत 'परि-एति ' आणि तिसऱ्यांत ' सानुषु अग्निः' असें वेगळें म्हणावें लागतें.

४. ' अग्नि प्रत्येक घरीं ज्ञानी पुरोहितच जणुं होऊन बसतो, आणि यज्ञयाग यथासांग होतील असें करितो. प्रज्ञावान् अग्नि उपासकाकरितां सर्व कांहीं पाहत असतो; कारण तो मनुष्यांचा अतिथि आणि वत्सल हविर्वाहक

क्रत्वा यद॑स्य तवि॑षीषु पृ॒ञ्चते॒ऽग्नेर॑वेण म॒रुतां॒ न भो॒ज्ये॑षि॒राय॒ न भो॒ज्या॑ ।
स हि ष्मा॒ दान॒मिन्व॑ति॒ वसू॑नां च म॒ज्मना॑ ।
स न॑स्त्रासते दुरि॒ताद॑भि॒ह्रुत॒: शंसा॑द॒घाद॑भि॒ह्रुत॑: ॥ ५ ॥ १४ ॥

क्रत्वा॑ । यत् । अ॒स्य॒ । तवि॑षीषु । पृ॒ञ्चते॑ । अ॒ग्नेः॑ । अवे॑न । म॒रुता॑म् । न । भो॒ज्या॑ । इ॒षि॒राय॑ । न । भो॒ज्या॑ ।
सः॑ । हि । स्म॒ । दान॑म् । इन्व॑ति । वसू॑नाम् । च॒ । म॒ज्मना॑ ।
सः॑ । न॒: । त्रा॒स॒ते॒ । दु॒:ऽइ॒तात् । अ॒भि॒ऽह्रुत॑: । शंसा॑त् । अ॒घात् । अ॒भि॒ऽह्रुत॑: ॥ ५ ॥ १४ ॥

## भाषायाम्.

५. यद् (=यस्मात् कारणाद्) [उपासका] अस्य अग्नेस्तविषीषु (=बलेषु=प्रबलेऽग्नौ=प्रबलायामग्नये) क्रत्वा (=प्रज्ञया) अवेन (=प्रीत्या) [च], मरुतां [तविषीषु] न (=मरुतां बलेषु=प्रबलेषु मरुत्स्विव=प्रबलेभ्यो मरुद्भ्य इव), भोज्या पृञ्चते (भोज्यानि पूरयन्ति=हविरन्नानि आ तृप्तेः प्रददति)—इषिराय न भोज्या (=आर्द्रेऽन्नानीव) [पृञ्चते=प्रददति] । स हि स्म (=अतः कारणात् सः) [अग्निः] मज्मना (=स्वप्रभावेण) वसूनां च दानम् इन्वति (=धनानां दानमपि=प्रभूतानि धनान्यपि प्रेरयति=प्रयच्छति) । सः [अग्निः] (=अतः कारणात् सोऽग्निर्) नः (=अस्मान्) दुरितात् (=पापात्) अभिह्रुतः (=हिंसायाः सकाशाच्च) त्रासते (=त्रायताम्)—शंसात् (=शापात्) अघात् (=दारिद्र्याद्) अभिह्रुतः (=नाशाच्च) [त्रासते=त्रायतां=पालयताम्) ॥

सायणस्तु यद्यस्मात् कारणात् सर्वे यजमानाः क्रत्वा प्रकृष्टेन कर्मणा हविःप्रदानादिरूपेणास्याग्नेस्तविषीषु प्रबलासु ज्वालास्ववेन तृप्तिनिमित्तेन भोज्या भक्ष्याणि पुरोडाशादीनि पृञ्चते । मिश्रयन्ति ...... । तत्र दृष्टान्तः । मरुतां न भोज्या । वायूनां संबन्धीनि व्रीह्याद्यन्नानीव । वायुषु मेघं निर्भिद्य वृष्टिं जनयत्सु सत्सु सस्यादिद्वारा व्रीह्यादिभोज्यानि यथा पृञ्चते तथेत्यर्थः । इत्यादि ॥

५. ज्यापेक्षां [उपासक जन], [प्रबळ] मरुतांला [अर्पण केल्या]-प्रमाणें, या प्रबळ अग्नीला प्रज्ञेनें [आणि] आदरानें हव्यें अर्पण करितात—याचकाला [अर्पण केल्या]प्रमाणें हव्यें [अर्पण करितात], त्यापेक्षां तो [आपल्या] मोठेपणानें [उपासकांला] धनांचें दान देतो. तो आम्हांला पापापासून [आणि] उपद्रवापासून तारो—[आम्हांला] शापापासून, दारिद्र्यापासून [आणि] उपद्रवापासून [तारो].

5. Inasmuch as they with wisdom [and] pleasure lay plentiful oblations before the power of this Agni, as before [the power] of the Maruts—oblations as before a guest, so indeed he sends [to men] a present of riches with [his] greatness. May he preserve us from sin, from injury—[preserve us] from curses, from poverty, from injury.

असा जन्मलेला होय,' असा अभिप्राय आहे.

'यज्ञाला आणि यागाला'=' यज्ञस्य अध्वरस्य.' आम्हांला वाटतें येथें 'यज्ञ' आणि 'अध्वर' हे शब्द वस्तुतः एकाच अर्थी योजिले आहेत, केवळ अर्थदार्ढ्यासाठीं एकाच अर्थाचे दोन शब्द योजिले आहेत.

'हविर्वाहक'=' वह्निः.' म्हणजे मनुष्यांनीं अर्पिलेलें हवि देवांप्रत नेऊन पोंहचविणारा.

'सर्व वस्तु संभाळितो'=' विश्वा जातानि पस्पशे.' अक्षरशः 'सकल वस्तु पाहतो.' म्हणजे कशाचीच अडचण पडूं देत नाहीं.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'दमेदमे अग्निर्यज्ञस्य अध्वरस्य' असें वाचावें लागतें.

५. 'प्रबळ अग्नीला भक्तजन तृप्ति होईपर्यंत हव्यें खाऊं घालितात—अतिथीला खाऊं घातल्याप्रमाणें खाऊं घालितात, म्हणून तो आपल्या पराक्रमाच्या योगानें भक्तजनांला पुष्कळ संपत्ति पाठवितो. तर असा जो अग्नि, तो आम्हांला पापसंकटापासून, नाशापासून, शापापासून, आणि दारिद्र्यापासून रक्षो' असा भावार्थ आहे.

पण 'मरुतांप्रमाणें' ('मरुतां न') ही उपमा दुर्बोध आहे. मरुतांला हव्यें अर्पण केल्याप्रमाणें अग्नीला करितात म्हणजे काय? सायणाचार्यांकडून या प्रश्नाचें उत्तर मिळत नाहीं, कारण त्यांनीं

विश्वो विहाया अरतिर्वसुर्दधे हस्ते दक्षिणे तरणिर्न शिश्रथच्छ्रव-
स्यया न शिश्रथत् ।
विश्वस्मा इदिषुध्यते देवत्रा हव्यमोहिषे ।
विश्वस्मा इत्सुकृते वारमृण्वत्यग्निर्द्वारा व्यृण्वति ॥ ६ ॥
विश्वः । विऽहायाः । अरतिः । वसुः । दधे । हस्ते । दक्षिणे । तरणिः ।
न । शिश्रथत् । श्रवस्यया । न । शिश्रथत् ।
विश्वस्मै । इत् । इषुध्यते । देवऽत्रा । हव्यम् । आ । ऊहिषे ।
विश्वस्मै । इत् । सुऽकृते । वारम् । ऋण्वति । अग्निः । द्वारा । वि ।
ऋण्वति ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. विश्वः (=सर्वः=सकलस्थलव्यापी) विहायाः (=महान्) वसुः (=दयालुः) अरतिः (=गन्ता=दूतः) [ एतादृशोऽग्निर् ] दक्षिणे हस्ते (=वामेतरे करे) [ उपासकेभ्यो दातव्यं धनं ] दधे (=धत्ते=धारयति)। [ तं हस्तं च ] तरणिर्न शिश्रथत् (=दातेव श्लथयति=दातुं शिथिलीकरोति)—श्रवस्यया न शिश्रथत् (=हविरन्नेच्छयेव हस्तं पुरः प्रसारयति)। विश्वस्मै इत् (=सर्वस्मा अपि) इषुध्यते (=हविरन्नमिच्छते देवाय) [स त्वं हे अग्ने ], हव्यं देवत्रा (=देवेषु मध्ये) आ ऊहिषे (=वहसि=प्रापयसि)। [ अयमग्निः ] विश्वस्मै इत् सुकृते (=सर्वस्मा अपि सुकर्मचारिणे यजमानाय) वारं (=वरणीयं=धनम्) ऋण्वति (=गमयति=प्रयच्छति)—अग्निः [ धनस्य ] द्वारा (=द्वाराणि) वि ऋण्वति (=अपावृणुते=उद्घाटयति)

विश्वः सर्वैर्गन्तव्यः। यद्वा विश्वात्मकः। ......। अरतिः ईश्वर इति च सायणः॥

वेगळ्याच रीतीनें हा पहिला दुबार्थे चरण लावून निर्वाह केला आहे ( भाषा पहा ).

'प्रबळ अग्नीला'='अग्नेस्तविषीषु.' अक्षरशः अर्थ 'अग्नीच्या बळांपुढें' असा आहे; म्हणजे सामर्थ्यवान् जो अग्नि त्याच्या पुढें. दुसरा निर्वाह दिसत नाहीं.

एकंदरींत हा पहिला चरण कठिण आहे.

'देतो'='इन्वति.' अक्षरशः 'पाठवितो.' जरी 'इन्वति' शब्दाचा अर्थ सायणांनीं या स्थळीं निराळा केला आहे, तरी 'य इन्वति द्रविणानि प्रचेता विश्ववाराणि' ( ऋ. ६. ५. १ )=

६. सर्वव्यापी, मोठा, [आणि] दयाळू [असा जो हा] दूत, [तो] [आपल्या] उजव्या हातांत [धन] धरितो, [ आणि] दात्याप्रमाणें तो [आपला हात] उघडितो––हविरन्नाच्या इच्छेनें जणुं उघडितो. हे अग्नी, तूं देवांमध्यें प्रत्येक हविरिच्छू [देवा]करितां हव्य वाहून नेतोस. तो प्रत्येक सदाचारी उपासकाकरितां धन देतो––अग्नि [धनाचीं] द्वारें उघडितो.

6. The omnipresent, great [and] benevolent messenger holds [riches] in [his] right hand, he stretches forth [his hand]—stretches [it] forth as if with the desire of obtaining the sacrificial food.—Thou, [O Agni], bearest among the gods the sacrifice to every god whatsoever desiring food. To every pious worshipper whatsoever [Agni] brings riches—Agni opens the gates [of wealth] [to evey worshipper].

---

' जो प्रज्ञावान् अग्नि अत्युत्तम धनें देत असतो' याजवरील भाष्यांत त्यांनीं ' इन्वति 'चा अर्थ ' देतो ' असाच केला आहे, तो पहा.

वृत्तानुरोधेंकरून पहिल्या चरणांतील पहिल्या दोन पोटचरणांच्या संधीला 'पृक्षते अग्नेः' व दुसऱ्या आणि तिसऱ्या पोटचरणांच्या संधीला ' भोजिआ इषिराय ' व तिसऱ्या पोटचरणाच्या शेवटीं ' भोजिआ ' असें म्हटलें म्हणजे हे आधुनिक श्लोकवृत्ताला बरोबर मिळतात. आणि दुसऱ्या चरणांत ' वसूनआं ' असें म्हणावें.

---

६. 'अग्नि जेथें जेथें असेल तेथें तेथें तो मोठा आणि दयाळु असा देवांमनुष्यांचा दूत आहे. तो उपासकांकरितां द्रव्य आपल्या हातांत घेतो. आणि उपासकांला मोकळ्या हातानें धन देत असतो—आपणाला हविरन्न मिळेल अशा समजुतीनें जणुं उपासकांपुढें हात करितो. तो देवांकडे हवि घेऊन जातो. हविरन्नाची ज्या ज्या देवाला उत्कंठा असेल, त्या त्या देवाला तें देतो. आणि तो प्रत्येक हविरर्पक उपासकासाठीं संपत्तीचे दरवाजेच जणुं उघडून पाहिजे तितकें द्रव्य देतो.'

' सर्वव्यापी '=' विश्वः. ' हें पद कठिण आहे. अक्षरशः ' सगळा ' इतकाच अर्थ आहे. ' प्रत्येक ठिकाणचा ' अथवा प्रत्येक ठिकाणीं असणारा असा अर्थ समजून निर्वाह केला पाहिजे.

' दूत '=' अरतिः.' अरति शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणी आला आहे. तीं सर्व

**स मानुषे वृजने शंतमो हितो३ग्निर्यज्ञेषु जेन्यो न विश्पतिः प्रियो यज्ञेषु विश्पतिः ।**
**स हव्या मानुषाणामिळा कृतानि पत्यते ।**
**स नस्त्रासते वरुणस्य धूर्तेर्महो देवस्य धूर्तेः ॥ ७ ॥**

सः । मानुषे । वृजने । शम्ऽतमः । हितः । अग्निः । यज्ञेषु । जेन्यः । न । विश्पतिः । प्रियः । यज्ञेषु । विश्पतिः ।
सः । हव्या । मानुषाणाम् । इळा । कृतानि । पत्यते ।
सः । नः । त्रासते । वरुणस्य । धूर्तेः । महः । देवस्य । धूर्तेः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. स मानुषे वृजने (=मनुष्याणां संबन्धिनि वसतिस्थाने-गृहेषु ) शंतमः (=अतिशयेन सुखकारी ) [हितः=स्थापितः]—अग्निः यज्ञेषु जेन्यो विश्पतिर्न (=अभिजातः=महति कुले जातो गृहपतिरिव ) हितः (=स्थापितोस्ति )-यज्ञेषु प्रियो विश्पतिः (=प्रियो गृहपतिः ) [ हितः=स्थापितोस्ति ] । स मानुषाणां (=मनुष्याणाम् ) इळा कृतानि (=इळायां=वेद्यां स्थापितानि ) हव्या (=हव्यानि ) पत्यते (=ईष्टे= तेषां प्रभुर्भवति ) । सः [ अग्निः ] (=अतः सोग्निः ) नो वरुणस्य धूर्तेः (=वरुणस्य= पापदेवताया हिंसायाः सकाशात् ) त्रासते ( =त्रायताम्)—महो देवस्य धूर्तेः (=महतस्तस्य देवस्य वरुणस्य हिंसायाः सकाशात् ) [ त्रासते=त्रायतां=पालयताम् ] ॥

वृजने इत्यत्र मानुषे मनुष्यस्य यजमानस्य संबन्धिनि वृजने वर्जनीये पापे निमित्तभूते सति यज्ञेषु निमित्तेषु । ...... महो महतो देवस्य धूर्तेर्हिंसातस्त्रासते । पालयते । अयथ्वारमग्निर्हिनस्तीति प्रसिद्धम् । इति सायणः ॥

स्थळें पाहून हा अर्थ आम्हीं केला आहे. सायणाचार्य ' जाणारा ' अथवा 'स्वामी, धनी ' असे दोन अर्थ करितात. पण पुष्कळ ठिकाणीं दूत असा अर्थ जुळतो, आणि निर्वचनालाहि तो अनुसरून आहे.

' दयाळू '=' वसुः.' आम्हांला वाटतें कीं, मूळचा पाठ ' वसु दधे '=' धन धारण करितो ' असा असावा, नंतर गैरसमजुतीनें ' वसुर्दधे ' झाला असावा.

वृत्तानुरोधानें तिसऱ्या चरणाचा दुसरा पोटचरण पदपाठांत आहे तसा वाचला पाहिजे.





७. तो अत्यंत सुखकारक [ अग्नि ] मनुष्यांच्या वसतीमध्यें स्थापिला [ आहे ]—अग्नि यज्ञांत कुलीन घरधन्याप्रमाणें [ स्थापिला आहे ]— यज्ञांत प्रिय घरधनी [ स्थापिला आहे ]. तो वेदीवर ठेविलेलीं मनुष्यांचीं [ जीं ] हव्यें, त्यांचा धनी होय. तो वरुणाच्या उपद्रवापासून आम्हांला रक्षो—[त्या] महान् देवाच्या उपद्रवापासून [ आम्हांस रक्षो ].

7. He [ is ] established as the most auspicious in the houses of men—Agni as the noble host in sacrifices—the beloved host in sacrifices. He is the lord of the oblations of men placed on the altar. May he preserve us from injury by Varuṇa—from injury by [ that ] great god.

---

७. ' अग्नीला मानवांच्या घरीं जणुं अत्यंत आदरसत्कार करणारा असा सुखकारक गृहपति ( घरधनीच ) करून ठेविलें आहे; आणि यज्ञांत जे सर्व देव येतात, ते त्याचे जणुं पाहुणे होत. कारण तो एकाद्या कुलीन घरधन्याप्रमाणें आहे, आणि जसा कुलीन घरधनी आदरातिथ्य उत्तम करितो, तसा हा आहे. वेदीवर जीं अनेक प्रकारचीं हव्यें ठेवितात, तीं अग्नि घेऊन सकळ देवांप्रत पोंचवितो. तर असा जो अग्नि, तो आम्हांला महान् जो वरुण देव—की जो आज्ञादिक न करणाऱ्याला आणि पाप आचरणाऱ्याला दंडशासन करीत असतो —त्याच्या शिक्षेपासून आम्हांला रक्षो ' असा भावार्थ आहे.

' मनुष्यांच्या वसतीमध्यें '=' वृजने मानुषे. ' म्हणजे मनुष्यांचे घरीं. सू. १०१ मं. ८ याजवरील सायणभाष्य पहा.

' वरुणाच्या उपद्रवापासून '=' वरुणस्य धूर्तेः.' वरुण हा पाप करणाऱ्या मनुष्यांला शिक्षा करितो असें पूर्वी सांगितलेंच आहे. (सू. २५ मं. १ पहा.) तेव्हां आम्हां मानवांच्या हातून पाप घडलें असेल त्याची वरुणाकडून क्षमा करीव, अशी यांत प्रार्थना आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' अग्निः' याच्या 'अ'शीं आणि पूर्व शब्दाशीं संधि न करणें, 'जेन्यो'च्या ठिकाणीं 'जेनिओ' वाचणें, दुसऱ्या चरणात 'हव्या'च्या ठिकाणीं ' हविआ ' असें म्हणावें, आणि तिसऱ्या चरणांत ' धूर्तेः'च्या ठिकाणीं दोनदाहि ' धूरतेः' असें वाचणें हें अवश्य आहे.

अ॒ग्निं होता॑रमीळते॒ वसु॑धितिं प्रि॒यं चेति॑ष्ठमर॒तिं न्ये॑रिरे ह॒व्य॒वाहं॒ न्ये॑रिरे ।
वि॒श्वायुं॑ वि॒श्ववे॑दसं॒ होता॑रं यज॒तं क॒विम् ।
दे॒वासो॑ र॒ण्वमव॑से वसू॒यवो॑ गी॒र्भी र॒ण्वं व॑सू॒यवः॑ ॥ ८ ॥ १९ ॥

अ॒ग्निम् । होता॑रम् । ई॒ळ॒ते॒ । वसु॑ऽधितिम् । प्रि॒यम् । चेति॑ष्ठम् । अ॒र॒तिम् । नि । ए॒रि॒रे॒ । ह॒व्य॒ऽवाह॑म् । नि । ए॒रि॒रे॒ ।
वि॒श्वऽआ॑युम् । वि॒श्वऽवे॑दसम् । होता॑रम् । य॒ज॒तम् । क॒विम् ।
दे॒वासः॑ । र॒ण्वम् । अव॑से । व॒सु॒ऽयवः॑ । गी॒ःऽभिः । र॒ण्वम् । व॒सु॒ऽयवः॑ ॥ ८ ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

८. अग्निं वसुधितिं (=धनस्य दातारं) होतारं (=देवानाम् आह्वातारं कृत्वा) ईळते (=स्तुवन्ति)। [अग्निं] प्रियं चेतिष्ठम् (=अतिशयेन ज्ञातारं=ज्ञातृतमम्) अरतिं (=गन्तारं=दूतं) नि एरिरे (=व्यापारयन्ति=योजयन्ति)—[तं] हव्यवाहं (=हव्यानां वोढारं) नि एरिरे (=योजयन्ति=वोढृकर्मणि योजयन्ति)। [अग्निं] विश्वायुं (=सर्वान्नयुक्तं) विश्ववेदसं (=सर्वज्ञं) यजतं (=पूजनीयं) कविं (=प्रज्ञावन्तम्) [एतादृशं] होतारं (=देवानाम् आह्वातारं) [नि एरिरे=योजयन्ति]। वसूयवः (=धनेच्छवो) देवासः (=देवाः=देववत् पूज्या ऋत्विजो) रण्वम् (=अतिशयेन मधुरम् आशब्दयन्तं) [होतारं]—गीर्भिः (=स्वकृताभिः=स्तुतिभिः सूक्तरूपाभो) रण्वम् (=अतिमधुरवचनैः सुखयितारम्) [एतादृशमाह्वातारमग्निं] वसूयवः (=धनेच्छव) [ऋत्विजो नि एरिरे=योजयन्ति]॥

८. अग्नि [ हा ] धन देणारा होता [ आहे असें ] त्याचें स्तवन करितात, [अग्नीला] प्रिय [आणि] अत्यंत बुद्धिमान् दूत [ समजून ] योजितात—हव्यवाहकाच्या कामीं योजितात; [अग्नि] सकल अन्नसंपत्तीनें भरलेला, सर्वज्ञ, यजनीय, प्रज्ञावान् [ आणि ] मनोहर होता [ आहे असें समजून ] [देवांचा] प्रसाद व्हावा म्हणून त्याला पूज्य [ आणि ] धनेच्छु ऋत्विज लोक योजितात—[तो आपल्या] स्तोत्रांनीं रमणीय [ आहे असें समजून ] योजितात.

8. They praise Agni [as] the invoker that procures wealth. They use him as the dear [ and ] the most intelligent messenger—use him [ as ] the carrier of the sacrificial food ; [ as ] the invoker that is rich in all food, endowed with all knowledge, is a worshipful poet; the worshipful priests, desirous of wealth, [ use him as ] the agreeable invoker for propitiating [ the gods ]— [ the priests ] desirous of wealth [ use him as the invoker ] agreeable with [ his ] hymns.

८. भावार्थः–' अग्नि हा सकल संपत्ति देणारा, सकल अन्नें प्राप्त करून देणारा, सर्वज्ञ, पूज्य, कवित्व करण्याला समर्थ, आणि आपल्या कवितांनीं देवांला तृप्त करण्यास समर्थ असा होता ( म्हणजे देवांला बोलावून आणणारा पुरोहित) होय, असें समजून त्याला धनेच्छु ऋत्विज आणि उपासक जन होत्याच्या कामीं योजितात; आणि देव आणि मनुष्य हे त्याला अतिप्रिय वचनें बोलणारा आणि अतिबुद्धिमान् दूत समजून, देवांकडेस हवि पोंहचविण्याच्या कामीं लावितात.'

' [ आपल्या ] स्तोत्रांनीं रमणीय '= ' गीर्भिः रण्वम्.' म्हणजे जीं स्तोत्रें गाइल्यानें देव प्रसन्न होतील, आणि यजमानाचे अभीष्ट मनोरथ पूर्ण करितील, अशीं स्तोत्रें गाऊन देवांला तृप्त करणारा. यज्ञांत जे ऋत्विज् लागत, त्यांत स्तोत्रें म्हणणें हें होत्याचें काम असे; आणि त्याचीं स्तोत्रें जितकीं मनोवेधक आणि त्याची वाणी जितकी मनोहर असेल, तितक्या मानानें देव प्रसन्न होण्याचा संभव अधिक आहे असें मानणें हें स्वाभाविक होय.

वृत्तसुलासाठीं प्रथम चरणांत ' न्येरिरे 'च्या ठिकाणीं दोन्ही वेळ ' नि एरिरे ' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १२९.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । इन्द्रो देवता । अत्यष्टिश्छन्दः ॥

**यं त्वं रथमिन्द्र मेधसातयेऽपाका सन्तमिषिर प्रणयसि प्रानवद्य नयसि ।**
**सद्यश्चित्तमभिष्टये करो वशश्च वाजिनम् ।**
**सास्माकमनवद्य तूतुजान वेधसामिमां वाचं न वेधसाम् ॥ १ ॥**

यम् । त्वम् । रथम् । इन्द्र । मेधऽसातये । अपाका । सन्तम् । इषिर । प्रऽनयसि । प्र । अनवद्य । नयसि ।
सद्यः । चित् । तम् । अभिष्टये । करः । वशः । च । वाजिनम् ।
सः । अस्माकम् । अनवद्य । तूतुजान । वेधसाम् । इमाम् । वाचम् । न । वेधसाम् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इषिर (=गमनशील=यज्ञान्प्रति गन्तुं त्वराशील) इन्द्र, अपाका सन्तं (=दूरे सन्तमपि) यम् [उपासकं] मेधसातये (=यज्ञलाभाय=यज्ञे प्रत्तस्य हविषो लाभाय) त्वं [तव] रथं प्रणयसि (=प्रकृष्टं नयसि)—हे अनवद्य (=हे अनिन्दित) [अग्ने], प्र नयसि (=प्रकृष्टं नयसि), तम् [उपासकं] सद्यश्चित् (=तदानीमेव=तत्क्षणमेव) अभिष्टये करः (=अभीष्टं साधयितुं समर्थं करोषि=मनोरथान् लब्धुं समर्थं करोषि) वाजिनं च [तं] वशः (=हविरन्नवन्तं च तं कामयसे=तस्य हविरन्नं स्वीकृत्य तं कामयसे) । स [त्वम्] (=अतः कारणात् त्वं) हे अनवद्य (=दोषरहित) तूतुजान (="अस्मान् अनुग्रहीतुं त्वरमाण") [अग्ने], वेधसाम् (=उपासकानाम्) अस्माकं—वेधसाम् (=उपासकानामस्माकम्) इमां वाचं न (=स्तुतिं यथा तथैव=स्तुत्या सह) [हविः स्वीकुरु] ॥

करः इत्यादौ करः समर्थं करोषि । ... एवं कृत्वा च वाजिनं हविर्लक्षणमन्नं तद्वन्तं वा वशः । कामयसे च । ... । यजमानेनाहूतः सन् शीघ्रमेवागत्य हविः स्वीकृत्य यागं साधु निर्वर्त्य तं चाभिमतफलेन संयोज्य पुनर्हविः स्वीकरोषीत्यर्थः । इति सायणः ॥

अपाका सन्तमित्यत्र अपाका । अपाकमनल्पप्रज्ञयाधिकारवन्तम् । पाकः पक्त-

## सूक्त १२९.

ऋषि—पूर्ववत् दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—इंद्र. वृत्त—अत्यष्टि.

१. हे इंद्रा, हे यज्ञगामी [इंद्रा], तूं दूर असलेल्याहि ज्या [ उपासका]प्रत यज्ञासाठीं [ आपला ] रथ हाकून जातोस—ज्या उपासकाप्रत, हे निष्कलंक [इंद्रा], तूं रथ हाकून जातोस, त्याचा मनोरथ तूं सत्वर पूर्ण करितोस आणि त्याचें हविरन्न स्वीकारून त्याजवर प्रीति करितोस. तर हे निष्कलंक [आणि] चपलगामी [इंद्रा], तूं आम्हां उपासकांचें [ हवि ] आणि [ हें स्तोत्र—आम्हां ] उपासकांचें हें स्तोत्र तूं [ स्वीकारून घे ].

## HYMN 129.

To *Indra*. By *Paruchchhepa*, son of *Divodâsa*. Metre—*Atyashti*.

1. Him thou makest quickly to attain his desire, and accepting his sacrifice lovest him, to whom, O quick Indra, thou drivest thy chariot—[ thou drivest thy chariot], O stainless [Indra], for the sacrifice, though he be far. Accept then thou, O stainless, O quick [Indra], [ the oblations ] of us [ thy ] worshippers—[oblations] of [us thy] worshippers, together with this prayer.

---

१. हें सूक्त परुच्छेप ऋषीचेंच आहे. मात्र देवता इंद्र आहे. या पहिल्या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ' हे इंद्रा, एखादा उपासक फार दूर असला तरी, तूं जर आपला रथ जोडून त्याचे घरीं यज्ञाचें हवि भक्षण्याकरितां जाशील, तर तूं एकदम त्या उपासकाचे मनोरथ पूर्ण करिशील, आणि त्याचें हव्य स्वीकारून त्याजवर प्रीति करिशील. तर हे इंद्रा, तूं आम्हां उपासकांचीं हविरन्नें आणि हीं स्तोत्रें स्वीकारून घे.'

' यज्ञगामी '=' इषिर.' अक्षरशः ' चपल,' यज्ञादिकांकडे फार त्वरेनें जाणारा; रथांत बसून फार त्वरेनें जाणारा.

' दूर असलेल्याहि '=' अपाका सन्तम्. ' सायणाचार्यांचा अर्थ निराळा आहे, तो आम्हीं भाषेंत उतरून घेतला आहे तो पहा. जसा ' उपाक ' शब्दाचा अर्थ ( उप + अञ्च=जाणें यापासू-

स श्रुधि यः स्मा पृतनासु कासु चिद्दक्षाय्य इन्द्र भरहूतये नृभि-
रसि प्रतूर्तये नृभिः ।
यः शूरैः स्वः सनिता यो विप्रैर्वाजं तरुता ।
तमीशानास इरधन्त वाजिनं पृक्षमत्यं न वाजिनम् ॥ २ ॥

सः । श्रुधि । यः । स्म । पृतनासु । कासु । चित् । दक्षाय्यः । इन्द्र ।
भरऽहूतये । नृऽभिः । असि । प्रऽतूर्तये । नृऽभिः ।
यः । शूरैः । स्वरिति स्वः । सनिता । यः । विप्रैः । वाजम् । तरुता ।
तम् । ईशानासः । इरधन्त । वाजिनम् । पृक्षम् । अत्यम् । न । वा-
जिनम् ॥ २ ॥

व्यां भवतीति यास्कः । अत एव सन्तं पण्डितं सन्तं यजमानम् । इति विवरणमत्र चिन्त्यमेव । अपाकशब्दः उपाकः (=संनिहितः) उपाकचक्षाः (=संनिहितनेत्रः) इतिवद् दूरार्थक इति यत्पाश्चात्त्या विद्वांसो मन्यन्ते तदेव साधीय इति वयम् ॥

## भाषायाम्.

२. हे इन्द्र, यः स्म (=यः खलु) [ त्वं ] कासु चित् पृतनासु (=सर्वेषु संग्रामेषु) नृभिः (=वीर्योपेतैर्योद्धृभिः) भरहूतये (=संग्रामाह्वानाय=शत्रून् युद्धायाह्वातुं) दक्षाय्यः [असि] (=पूज्योसि=पूजया सह स्मरणीयोसि)—नृभिः (=वीर्योपेतैर्योद्धृभिः) प्रतूर्तये (=शत्रुसंहाराय) [ दक्षाय्योसि=पूजया सह स्मरणीयोसि ] यः (=यस्त्वं) शूरैः स्वः सनिता (=द्योतमानस्य विजयस्य लब्धा भवसि=शूरपुरुषान् संग्रामेषु विजयं प्रापयसि ) यः (= यस्त्वं ) विप्रैर्वाजं तरुता (=विद्वद्भिरुपासकैः संग्रामेषु धनं लम्भयसि=विदुष उपासकान् धनं प्रापयसि ) तं वाजिनं (=बलवन्तं) [ त्वाम् ] ईशानासः (=ईशानाः=प्रभवोपि=बलवन्तोपि मनुष्या ) इरधन्त (=आराधयन्ति )—पृक्षम् अत्यं वाजिनं न (=अन्नादिधनसंपादकं प्रबलं शीघ्रम् अश्वमिव) [ इरधन्त= आराधयन्ति ], स [ त्वं ] श्रुधि (=सत्वरमस्माकमाह्वानं शृणु ) ॥

न) ‘ जवळचा ’ असा होतो, तसा ‘ अपाक ’ शब्दाचा ‘ दूरचा ’ असा (‘अप,’ दूर + अञ्च् जाणें, यापासून ) होणें हें संभवतें. बहुतेक ठिकाणीं ‘ दूरचा ’ हा अर्थ चांगला जुळतो, आणि प्रस्तुत मंत्रांत तर उत्तम जुळतो यांत संशय नाही.

वृत्तानुरोधेंकरून पहिल्या चरणाच्या

२. हे इंद्रा, ज्या तुला प्रत्येक संग्रामांत शूर योद्धे शत्रूंचा धिक्कार करण्यासाठीं पूज्य समजून बोलावितात—योद्धे [ शत्रूंचा ] पराजय करण्यासाठीं [ बोलावितात ], जो तूं शूरांच्या हातून विजय संपादवितोस, जो तूं उपासक विद्वानांच्या हातून लूट मिळवितोस, त्या तुज पराक्रमवंताला महाबळवान् लोकहि आराधीत असतात—लूट मिळवून देणाऱ्या एकाद्या पराक्रमी वारूला जसे, [तसे भजत असतात; ] तो तूं [ आमचें हें आह्वान ] ऐक.

2. Hear thou, O Indra, [ our invocation ], who hast to be invoked worshipfully in all battles by heroes for challenging the enemy —[ hast to be invoked worshipfully ] by heroes for subjugating [ the enemy ]; who winnest glory through the brave, who seizest booty through the wise; thee the victorious even the mighty propitiate—[ propitiate ] like a swift war-horse that winneth spoil.

पहिल्या पोटचरणांत ‘ इन्द्र ’ याच्या ठिकाणीं ‘ इन्दर ’ असें, दुसऱ्या पोटचरणाच्या आरंभीं ‘ अपाका’ व्यस्त करून, आणि शेवटीं ‘ प्रानवदिअ ’ असें म्हणावें लागतें. तिसऱ्या चरणांत ‘०वदिअ ’ असें म्हटलें आणि ‘ इमां ’ शब्दापूर्वीं ‘ वेधसाम् ’ हीं तीन अधिक अक्षरें क्षणभर एकीकडे टेविलीं, तर मग तिसरा चरण बरोबर जुळतो.

२. भावार्थः—‘ हे इंद्रा, युद्धांत शूर जन लढूं लागले म्हणजे, शत्रूंला युद्धाला पाचारण्यापूर्वीं तुला हाक मारून तुला आराधितात, आणि शत्रूंचा पराजय करण्यास लागण्यापूर्वीं तसें करण्याचें सामर्थ्य येण्यासाठीं तुला आठवून तुला आराधितात. संग्रामांत शूर जनांला तूं साहाय्य केलेंस म्हणजेच ते यश्यप्राप्त पावतात, आणि तूं साहाय्य केलेंस म्हणजेच विद्वान् उपासकाला युद्धप्रसंगीं धन मिळतें, म्हणूनच तुला महाबळवान्हि पुरुष एकाद्या यशस्वी मोठ्या वारूला भजल्याप्रमाणें तुला भजतात. तर असा जो तूं, तो हें आमचें स्तोत्र ऐक.’

‘ ज्या तुला......पूज्य समजून बोलावितात ’=‘ यः दक्षाय्योसि.’ अक्षरशः जो तूं पूज्य आहेस. म्हणजे ज्या तुजला पूजितात. पूज्यबुद्धीनें स्मरतात.

दस्मो हि ष्मा वृषणं पिन्वसि त्वचं कं चिद्यावीररुं शूर मर्त्यं परिवृणक्षि मर्त्यम् ।
इन्द्रोत तुभ्यं तद्दिवे तद्रुद्राय स्वयशसे ।
मित्राय वोचं वरुणाय सप्रथः सुमृळीकाय सप्रथः ॥ ३ ॥

दस्मः । हि । स्म । वृषणम् । पिन्वसि । त्वचम् । कम् । चित् । यावीः । अररुम् । शूर । मर्त्यम् । परिऽवृणक्षि । मर्त्यम् ।
इन्द्र । उत । तुभ्यम् । तत् । दिवे । तत् । रुद्राय । स्वऽयशसे ।
मित्राय । वोचम् । वरुणाय । सऽप्रथः । सुऽमृळीकाय । सऽप्रथः ॥३

## भाषायाम्.

३. हि (=यस्मात् कारणात्) दस्मः स्म (=शत्रूणामुपक्षपयिता=महाबलस्त्वं) वृषणं त्वचं (=वर्षणशीलं=जलधारिणं मेघं) पिन्वसि (=सेचयसि=वर्षयसि) [ अपि च ] हे शूर, अररुं (=" गमनशीलं "=क्षणिकं) मर्त्यम् ( =अशाश्वतम्=अस्थिरं= निर्जलं) कंचित् (=सर्वं) [ मेघं ] यावीः (=पृथक्करोषि=जलधारिभ्यो मेघेभ्यो वियोजयसि=त्यजसि)—मर्त्यं (=मरणशीलम्=अशाश्वतं=जलरहितं) [मेघं] परिवृणक्षि (=वर्जयसि) । उत (=अपि च) हे इन्द्र, तत् (=तादृशं वर्षणरूपं तव कर्म) तुभ्यं, तद् दिवे (=द्युदेवाय), [तत्] स्वयशसे (=स्वकीययशोयुक्ताय) रुद्राय (=एतन्नामकाय देवाय), मित्राय, वरुणाय [च] सप्रथः (=सविस्तारं)—सुमृळीकाय (=अतिशयेन सुखकारिणे) [ वरुणाय ] सप्रथः (=सविस्तारं)—वोचं (=ब्रवीमि=कथयामि) ॥
वृषणं स्वतो वर्षणशीलं त्वचं संवरणवन्तं पुटबन्धनवदुदकवेष्टनवन्तं...जलधारिणं मेघं पिन्वसि । निर्भिद्य सेचयसि । इति सायणः ॥

---

पहिल्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत ' श्रुधि ' वाचलें तर सर्व चरण आधुनिक वृत्ताला मिळतो. दुसऱ्या चरणांत ' स्वः 'च्या ठिकाणीं ' सुअः ' असें म्हणावें लागतें.

---

३. ' हे इंद्रा, तूं ज्यांत पाणी असतें अशा मेघाला फोडून त्यांतून उदकस्राव करवितोस. आणि जे निर्जल मेघ असतील, त्यांस निराळे करून वगळतोस. तर हा जो तुझा मोठा पराक्रम, तो मी तुजपुढें आणि द्युदेवापुढें, रुद्रापुढें, मित्रापुढें आणि स्वयशःसंपन्न वरुणापुढें मोठ्यानें गाईन,' असा भावार्थ.

३. कारण [ हे इंद्रा ], महाप्रतापी असा जो तूं, तो वर्षाव करूं शकणाऱ्या मेघाकडून वर्षाव करवितोस, [ आणि ] हे शूर [इंद्रा], क्षणिक [आणि] नाशिवंत [अशा] प्रत्येक मेघाला हाकून देतोस—नाशिवंताला जाऊं देतोस. तर हे इंद्रा, हा [जो तुझा पराक्रम, तो] मी तुजपुढें, तो मी द्यूच्यापुढें, तो मी निजयशानें युक्त [ अशा ] रुद्रापुढें, मित्रापुढें [ आणि ] वरुणापुढें विस्तारानें वर्णितों—कृपाळू [वरुणा]पुढें विस्तारानें [वर्णितों].

3. For thou the mighty one makest the rain-cloud to rain, [and] thou, O brave Indra, drivest away every flitting [and] transient [cloud], passest by [every] transient [cloud]. And that [thy exploit] I will widely sing to thee, that to Dyaus, that to Rudra who is surrounded by his own glory, that to Mitra, that to Varuṇa—widely to gracious [Varuṇa].

'क्षणिक'='अररूम्.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. कितीएक पाश्चात्य विद्वान् 'द्वेषी,' 'द्वेष करणारा' मित्रभावानें न वागणारा, असा अर्थ करितात. पण त्याला प्रयोगान्तरांची अपेक्षा आहे. दुसऱ्या एकाच ठिकाणीं हा शब्द आला आहे तेथें ( ऋ. १०. ९९. १० यांत ) सायणांनीं एका असुराचें नांव असा अर्थ केला आहे आणि तेथें तोच जुळतो. दुसरे प्रयोग नाहींत; त्यामुळें अर्थान्तराची कल्पना साधत नाहीं, यास्तव 'जाणारा', 'क्षणिक' हा सायणानुसारी अर्थच घेणें योग्य दिसतें.

'द्यूच्या पुढें'='दिवे.' म्हणजे द्युलोकरूप जो देव, त्याजपुढें.

'निजयशानें युक्त अशा रुद्रापुढें'='स्वयशसे रुद्राय.' म्हणजे दुसऱ्याच्या योगानें जो कीर्तिमान् नव्हे, ज्याची कीर्ति स्वाधीनची आहे, दुसऱ्यांनीं केल्यामुळें झालेली नव्हे. हें विशेषण वेदांत अनेक देवांस लाविलेलें आढळतें.

'कृपाळू'='सुमृळीकाय.' हें विशेषण वरुणालाच लाविलेलें असतें असें नाहीं, इतर देवांसहि लाविलेलें आढळतें. सोम, इंद्र, अग्नि, आदित्य, अदिति यांसहि लाविलेले आहे. वरुणासच आणखी सू. १३६ मं. ६ यांत लाविलें आहे तें पहा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'मर्त्य' च्या ठिकाणीं दोहीं स्थळीं 'र्मर्तिअ' असें वाचावें लागतें.

अस्माकं वु इन्द्रमुश्मसीष्टये सखायं विश्वायुं प्रासहं युजं वाजेषु
प्रासहं युजम् ।
अस्माकं ब्रह्मोतयेऽवा पृत्सुषु कासु चित् ।
नहि त्वा शत्रुः स्तरते स्तृणोषि यं विश्वं शत्रुं स्तृणोषि यम् ॥४॥
अस्माकम् । वः । इन्द्रम् । उश्मसि । इष्टये । सखायम् । विश्वऽआ-
युम् । प्रऽसहम् । युजम् । वाजेषु । प्रऽसहम् । युजम् ।
अस्माकम् । ब्रह्म । ऊतये । अव । पृत्सुषु । कासु । चित् ।
नहि । त्वा । शत्रुः । स्तरते । स्तृणोषि । यम् । विश्वम् । शत्रुम् ।
स्तृणोषि । यम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. [हे ऋत्विजः], अस्माकं वः (=अस्माकं वश्च) इष्टये (=अभिलषितलाभाय) विश्वायुं (=सर्वान्नसंपद्युक्तं) प्रासहं युजं (=प्रकर्षेण शत्रूणामभिभवितारं सहायं)—वाजेषु प्रासहं युजं (=संग्रामेषु शत्रूणां प्रकर्षेणाभिभवितारं सहायम्) [एतादृशम्] इन्द्रम् [एव] सखायम् उश्मसि (=मित्रं कामयामहे=स एव नो मित्रं भवत्विति वाञ्छाम) ।—[एवं सति हे इन्द्र], कासु चित् पृत्सु (=सर्वेष्वपि संग्रामेषु) ऊतये (=अस्माकं साहाय्याय=साहाय्यं कर्तुम्) अस्माकं ब्रह्म (=इदं स्तोत्रम्) अव (=रक्ष=स्वीकृत्य हृष्टो भव) नहि त्वा शत्रुः स्तरते (=शत्रुर्हि त्वां न हिनस्ति) यं [शत्रुं] [त्वमेव] स्तृणोषि (=तर्हि त्वमेव तं घातयसि)—यं विश्वं शत्रुं स्तृणोषि (=तर्हि सर्वमपि शत्रुं त्वमेव जयसि=घातयसि) ॥

संग्रामेषु ...... त्वा त्वां नहि स्तरते । न हिनस्ति । न विरोधमाचरति यं स्तृणोषि । यं विश्वं शत्रुं स्तृणोषि वारयसि स कश्चिदपि शत्रुर्न हिनस्ति । तव महत्त्वेन सर्वे भीता विधेया भवन्ति शत्रुभावं न कोऽप्याचरति । अजातशत्रुत्वादित्यर्थः । इति सायणाचार्याः ॥

४. [ हे मित्र हो ], आमचे [आणि] तुमचे मनोरथ पूर्ण होण्यासाठीं, सकलान्नसंपन्न [आणि] महाप्रबळ साहाय्यकर्ता [ असा जो ] इंद्र, [ तो आपला ] मित्र [ व्हावा असें आपण ] इच्छूं— संग्रामांत महाप्रबळ साहाय्यकर्ता [ जो इंद्र, तो मित्र व्हावा असें ] [ इच्छूं ].—[तर हे इंद्रा ], तूं [सकल संग्रामांमध्यें आमचें] साहाय्य करण्याकरितां [ हें ] आमचें स्तोत्र मान्य करून घे. कारण कीं तुला कोणताहि शत्रु जिंकूं शकत नाहीं, तर तूंच त्याला जिंकितोस—तूंच प्रत्येक शत्रूला जिंकून टाकितोस.

4. For our good [and] for yours, [ O friends ], let us choose [ as our ] friend Indra, rich in all wealth, [and] a mighty ally—a mighty ally in battles. Love then, [ O Indra ], [ this ] our prayer that thou mayest protect [ us ] in all battles. For no enemy vanquisheth thee, but thou doest vanquish the enemy— thou doest thyself vanquish every enemy.

---

४. 'हे मित्र हो, तुमचें आमचें कल्याण व्हावें म्हणून, सकलसंपत्तिसंपन्न आणि महाबळ साहाय्यवान् जो इंद्र,-संग्रामांत मोठें साहाय्य करणारा जो इंद्र, त्याला आपण मित्र करूं.— तर आतां हे इंद्रा, ही आमची उपासना ग्रहण कर आणि सकळ युद्धप्रसंगीं तूं आमचें संरक्षण कर. कारण समरांगणांत तुला कोणताहि शत्रु पाडीत नाहीं, तूंच सगळ्या शत्रूंला पाडितोस' असा भावार्थ.

'आमचें साहाय्य करण्याकरितां हें आमचें स्तोत्र मान्य करून घे'=' अस्माकं ब्रह्म ऊतये अव.' आमचें भाषांतर अक्षरशः केलेलें आहे. आमचें तूं संग्रामांत रक्षण करावेंस म्हणून हें आम्हीं स्तोत्र केलें आहे, तें स्वीकारून घे आणि प्रसन्न हो, आणि प्रसंग येईल तेव्हां युद्धांत आम्हांला रक्ष, असा अभिप्राय आहे.

'जिंकूं शकत नाहीं'=' न स्तरते.' अक्षरशः पसरूं शकत नाहीं, म्हणजे भूमिगत करूं शकत नाहीं, जमीनदोस्त करूं शकत नाहीं=पाडूं शकत नाहीं.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'इन्दरम्,' 'विश्वआयुं' म्हणणं, आणि दुसरा चरण पदपाठाप्रमाणें वाचणें इतकें अवश्य आहे.

नि षू नमातिमतिं कयस्य चित्तेजिष्ठाभिररणिभिर्नोतिभिरुग्राभि-
रुग्रोतिभिः ।
नेषि णो यथा पुरानेनाः शूर मन्यसे ।
विश्वानि पूरोरप पर्षि वह्निरासा वह्निर्नो अच्छ ॥ ५ ॥ १६ ॥

नि । सु । नम । अतिऽमतिम् । कयस्य । चित् । तेजिष्ठाभिः । अर-
णिऽभिः । न । ऊतिऽभिः । उग्राभिः । उग्र । ऊतिऽभिः ।
नेषि । नः । यथा । पुरा । अनेनाः । शूर । मन्यसे ।
विश्वानि । पुरोः । अप । पर्षि । वह्निः । आसा । वह्निः । नः ।
अच्छ ॥ ५ ॥ १६ ॥

## भाषायाम्.

५. [ हे इन्द्र ], तेजिष्ठाभिः अरणिभिः न ऊतिभिः (=अत्यन्ततेजस्विभिरु-ल्काभिरिव रक्षाभिः=ज्वलत्तमकाष्ठवदतिशयेन शत्रून् दहद्भी रक्षणैः)—हे उग्र (=उद्गूर्णबल=अतिशयबलवन्निन्द्र ), उग्राभिः ऊतिभिः (=बलवद्भिः स्वोपासकानामर्थे कृतैः साहाय्यकर्मभिः) कयस्य चित् (=यस्य कस्यचिदपि=सर्वस्यापि नः शत्रोः) अतिमतिं (=विरुद्धमननं= गर्वं ) नि सु नम (=नितरामेव नमय=" अस्मत्प्रणतं कुरु ") । यथा पुरा (=पुरा काले यथास्माकं पूर्वजांस्तथा ) नः (=अस्मान् ) नेषि (=नय=अस्माकं मार्गदर्शी भव) । [ त्वं हि ] हे शूर, [ अधुनापि ] अनेनाः (=पापरहितो ) मन्यसे ( =अवबुध्यसे=ज्ञायसे ) । वह्निः ( =" अभिमतानां वोढा ") [ त्वं ] विश्वानि [ एनांसि ] (=सकलान्यपि किल्मिषाणि ) पूरोः ( =अस्मद्रूपजनसकाशात्) अप पर्षि (=अपनय )—वह्निः (=अभिमतवाहकस्त्वं) नः अच्छ (=अस्मान् प्रति ) [ आगत्य ] आसा (=अस्माकमन्तिकात् ) [ विश्वानि एनांसि अप पर्षि=सकलानि किल्मिषाणि अपनय ] ॥

तेजिष्ठाभिररणिभिर्न । अतिशयेन तेजस्विभिर्युद्धादिरूपैर्मार्गैरिव । ......वह्निर्वृष्ट्यादिप्रदानेन जगतां निर्वाहकः । इति सायणः ॥

आसा वह्निर्नो अच्छेति दुर्बोधम् । अस्माकमप्यासान्तिके देवयजनदेशेऽच्छाभिमुख्येनागत्य वह्निरभिमतानां वोढा सन् अप अनभिमतमपकृत्य पर्षि । अभिमतफलं पूरयसीति कथंकथमपि सायणोपि विवृणोति ॥

५. [ हे इंद्रा ], कोणत्याहि [ मनुष्या ]चा [ झाला ] तरी गर्व तूं अत्यंत प्रखर कोलितांसारिख्या साहाय्यांनीं—हे प्रखर [ इंद्रा ], प्रखर साहाय्यांनीं अगदी नमवून टाक. तूं आमचा प्राचीन काळाप्रमाणें पुढारी हो; हे शूरा, तुला [ सर्व लोक ] [ अजून ] निष्पाप जाणतात, इष्टवाहक [ असा जो तूं, तो ] [ या ] मानवांपासून सर्व [ पापें ] घेऊन जा—इष्टवाहक तूं आम्हांजवळ [ येऊन ] आम्हांसमक्ष [ पापें घेऊन जा ].

5. Humble thou deeply indeed the arrogance of every man [whatsoever] with helps [ given to thy worshippers ], as burning as firebrands—with mighty helps, O thou mighty one. Lead us as in ancient times. Thou art known, O brave [ Indra ], [ as ] sinless. Bringer [ of blessings ] do thou remove all [ sins ] from [ these ] men —bringer [ of blessings ] [ come ] to us [ and take away our sins ] from before [ our ] presence.

५. ' हे इंद्रा, आमचा कोणीहि शत्रु असेल त्याचा गर्व तूं आम्हांला जळणाऱ्या कोलितांसारिखें तुझें साहाय्य देऊन—म्हणजे शत्रुनाशक असें साहाय्य देऊन—हरण कर, अगदी भूमिगत करून टाक. आणि आमच्या वाडवडिलांचा प्राचीन काळीं जसा तूं पुढारी होत होतास, तसा आतां युद्धादिक प्रसंगीं आमचा पुढारी होत जा. कारण कीं तूं जसा प्राचीन काळीं निष्पाप होतास, तसाच आतांहि आहेस; यास्तव आम्हांजवळ येऊन आमच्या समक्षच जणुं आमचीं पापें आमच्या आंगांतून काढून नाहींशीं कर ' असा अभिप्राय.

' अत्यंत प्रखर कोलितांसारिख्या साहाय्यांनीं '=' तेजिष्ठाभिः अरणिभिः न ऊतिभिः '. म्हणजे तूं आमचें असें साहाय्य करीत जा, कीं जेणेंकरून जळत्या कोलितानें जळल्याप्रमाणें शत्रु जळून जातील. सायणांनीं केलेला अर्थ वेगळा आहे, तो भाषेंत उतरून घेतला आहे. ' अरणि 'शब्दाचा अग्नि उत्पन्न करावयाचीं लांकडें हा जो नित्याचा अर्थ, त्याला अनुसरून आणि ' तेजिष्ठाभिः ' याचा आणि ' न ' या अव्ययाचा चांगला अर्थ जुळावा म्हणून, आम्हीं वरच्याप्रमाणें भाषांतर केलें आहे.

' इष्टवाहक '=' वह्निः '. म्हणजे उपासकाला जें इष्ट असेल, तें घेऊन येणारा, इष्ट मनोरथ पूर्ण करणारा. हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे; पण ' वह्नि ' शब्द येथें कठिण आहे; तें इंद्राचें विशेषण आहे यांत संशय नाहीं, पण तें कोणत्या अर्थी आणि येथें कोणत्या प्रयोजनानें योजिलेलें आहे, तें समजत नाहीं.

'[ या ] मानवांपासून '=' पुरः '. या मानवांपासून म्हणजे आम्ही जे मानव

**प्र तद्वोचेयं भव्यायेन्दवे हव्यो न य इषवान्मन्म रेजति रक्षोहा मन्म रेजति ।**
**स्वयं सो अस्मदा निदो वधैरजेत दुर्मतिम् ।**
**अव स्रवेदघशंसोऽवतरमव क्षुद्रमिव स्रवेत् ॥ ६ ॥**

प्र । तत् । वोचेयम् । भव्याय । इन्दवे । हव्यः । न । यः । इषऽवान् । मन्म । रेजति । रक्षःऽहा । मन्म । रेजति ।
स्वयम् । सः । अस्मत् । आ । निदः । वधैः । अजेत । दुःऽमतिम् ।
अव । स्रवेत् । अघऽशंसः । अवऽतरम् । अव । क्षुद्रम्ऽइव । स्रवेत् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. य [ इन्दुः=सोमो ] हव्यो न (=" इन्द्र इव ") इषवान् (=एषणवान्=प्रेरणावान्=स्तोत्राणां प्रेरयिता ) मन्म रेजति (=स्तोत्रं=स्तोत्राणि उद् गमयति=स्फुरयति )—रक्षोहा (=राक्षसानां हन्ता ) [ सन् ] मन्म रेजति (=स्तोत्राणि स्फुरयति ) [ तस्मै ] भव्याय इन्दवे (=भवनशीलाय=महते ) इन्दवे (=सोमाय ) तत् (=वक्ष्यमाणं ) प्र वोचेयं (=याचे ) [ यत् ] सः अस्मत् (=अस्मत्तो ) निदः ( =निन्दकान् ) दुर्मतिं (=दुष्टमतिं जनं च ) वधैः (=घातकैः शस्त्रैः ) स्वयम् आ अजेत (=आक्षिपेत्=अपनयेत् ) [ अपि च ] अघशंसः (=पापानां शंसिता=दुर्जनः ) अव स्रवेत् ( =अवाङ्मुखो भूत्वा गच्छतु )—अवतरं [ स्रवेत्=अधिकमेवावाङ्मुखो भूत्वा गच्छतु ]—क्षुद्रमिव अव स्रवेत् (=दृढहिमरूपं जलं यथा द्रवज्जलरूपेण अवस्रवति नश्यति तथा नश्यतु ) ॥

हव्य इव इन्द्र इव । प्रायेणेन्द्र आगच्छेत्यादिनेन्द्र एवाहूयते । स इव ॥...... अघशंसः अघानां पापानां हिंसादीनां शंसिता स्तेनः । ... अघशंसः स्तेनः । अघशंसो वृक इति तन्नामसु पाठात् । इति सायणः ॥

---

जन, त्यांजपासून.

'तुला जाणतात '=' मन्यसे.' मन्यसे याचा संबंध 'यथा 'शब्दाशीं नसतां, 'मन्यसे ' असें आद्युदात्त आहे तें 'यथा'शीं संबद्ध आहे अशा समजुतीनें प्रथम झालें असावें. 'मन्यसे ' असें असणें इष्ट आहे.

तिसऱ्या चरणांतील दुसरा पोटचरण फार अवघड आहे. आम्हीं सायणांप्रमाणें अर्थ करून निर्वाह केला आहे.

६. जो इंद्राप्रमाणें प्रेरणाकर्ता [ असून ] स्तोत्राची प्रेरणा करितो—जो राक्षसांचा हंता [असून ] स्तोत्राची प्रेरणा करितो, त्या भव्य सोमाप्रत मी ही [ प्रार्थना] करितों [ कीं ], तो स्वतः मारक शस्त्रांनीं निंदकांला [आणि] दुष्टांला आम्हांपासून हाकून लावो, [आणि] दुर्जन वितळून—अगदी वितळून जाओ— पाण्याप्रमाणें वितळून जाओ.

6. Let me pray this to auspicious Soma, who, an inspirer like Indra, inspires the hymn—killer of fiends, inspires the hymn: [that] he may himself drive away from us with deadly weapons the scoffers [and] the wicked-minded; [that] the wicked man may melt away—far away—may melt away like a liquid.

मात्र हा पोटचरण पहिल्या पोटचरणांतील शेवटच्या शब्दांचाच कांहीं अंशी पुनः पाठ आहे त्याजमुळें नवीन स्वतंत्र कांहीं तरी अर्थ त्यांत नसेल, पहिल्या पोटचरणांतील अर्थाचीच पुनरुक्ति असावी असें आहे, त्यापेक्षां आम्हीं केलेल्या अर्थाहून दुसरा अर्थ असण्याचा फारसा संभव नाहीं. ' अच्छ 'शब्दाचा अर्थ ' कडे,' ' जवळ ' असा होतो, तो ' कडून,' ' जवळून' असा जर घेतला, तर ' आसा वह्निः नः अच्छ ' म्हणजे ' आम्हांसमक्ष ( आसा ) आणि आम्हांकडून ( नः अच्छ ) [ पापें ] वाहून नेणारा (वह्निः) [जो इंद्र, तो पापें घेऊन जाओ], असा अर्थ होऊं शकेल.

वृत्तासाठीं पहिला सगळा चरण पदपाठाप्रमाणें म्हणावा; दुसऱ्या चरणांत 'नेषि'च्या जागीं ' नएषि ' म्हणून 'पुरा। अने०' असें म्हणावें; तिसऱ्या चरणांत पहिल्या 'वह्निः'शब्दाचे ठिकाणीं 'वहनिः' आणि 'आसा'च्या ठिकाणीं ' आसआ ' असें वाचावें.

६. ही ऋचा जरी इंद्राविषयींच्या सूक्तांत आली आहे, तरी वस्तुतः सोमाविषयीं आहे. ऋषि सोमाविषयीं म्हणतो, ' जो सोम इंद्राप्रमाणें स्तोत्रें मनुष्यांच्या मनांत प्रेरितो, जो राक्षसांचा संहार करितो, तो स्वतः आपल्या हातांत शस्त्रें घेऊन निंदकांचा आणि दुष्टांचा नाश करो; व दुर्जन असेल तो पाण्याप्रमाणें वितळून जाओ, आणि नाहींसारिखा होओ.'

' इंद्राप्रमाणें '=' इन्यः न.' हा अर्थ सायणांप्रमाणें केला आहे, पण ' आह्वान

वनेम तद्धोत्रया चितन्त्या वनेम रयिं रयिवः सुवीर्यं रण्वं सन्तं सुवीर्यम् ।
दुर्मन्मानं सुमन्तुभिरेमिषा पृचीमहि ।
आ सत्याभिरिन्द्रं द्युम्नहूतिभिर्यजत्रं द्युम्नहूतिभिः ॥ ७ ॥

वनेम । तत् । होत्रया । चितन्त्या । वनेम । रयिम् । रयिऽवः । सुऽवीर्यम् । रण्वम् । सन्तम् । सुऽवीर्यम् ।
दुःऽमन्मानम् । सुमन्तुऽभिः । आ । ईम् । इषा । पृचीमहि ।
आ । सत्याभिः । इन्द्रम् । द्युम्नहूतिऽभिः । यजत्रम् । द्युम्नहूतिऽभिः ॥ ७

## भाषायाम्.

७. [ वयं ] चितन्त्या होत्रया (=पश्यन्त्या स्तुत्या=अवहितया स्तुतिरूपया वाचा) तत् ( =तादृशं=वक्ष्यमाणप्रकारं ) [ रयिं ] वनेम (=लभेमहि)—हे रयिवः (=मघवन्=धनवन्निन्द्र), सुवीर्यं (=सुवीर्योपेतपुत्रपौत्रादिसंतानयुक्तं ) रयिं (=धनं ) वनेम (=लभेमहि )—रण्वं (=मनोहरं) सन्तं (=शाश्वतं ) सुवीर्यं (=शोभनपुत्रपौत्रादिवीरोपेतं ) [ रयिं=धनं ] [ वनेम=लभेमहि ] । दुर्मन्मानं ( =दुर्मनस्कं=क्रुद्धम् ) ईम् (=एतमिन्द्रं ) सुमन्तुभिः ( =शोभनमननसाधनैः इन्द्रो यथास्माकं विषये सुमनाः स्यात्तथा कुर्वद्भिः स्तोत्रैः ) इषा (=हविरन्नेन च ) आ पृचीमहि (=आ पूरयाम=तर्पयाम ) । —इन्द्रं सत्याभिः द्युम्नहूतिभिः (=स्तुतिभिः)—यजत्रं (=यजनयोग्यम् ) [ इन्द्रं ] द्युम्नहूतिभिः (=स्तुतिभिः ) [आ पृचीमहि ] (=संतर्पयाम ) ॥

सन्तम् । सर्वदा वर्तमानम् । यज्ञादिद्वारा बहुशो दीयमानमपि प्रवर्धमानम् । ... द्युम्नहूतिभिः । हरिव आगच्छ मेधातिथिर्मेषेत्याह्वानैरित्यर्थः । इति सायणः ॥

करण्यास योग्य जो त्याप्रमाणें ' असा अक्षरार्थ आहे. ' हव्यः नः ' असा पाठ असता म्हणजे अर्थ अवघड झाला नसता. ' हव्यो नः ' असे शब्द ' आम्हांस आह्वानयोग्य, ' ' आम्ही लढाईत बोलाविण्यास योग्य ' अशा अर्थी चांगले संभवतात, अथवा ' हव्यो न य इषवान् ' म्हणजे ' जो युद्धांत साहाय्यास बोलाविण्यास जसा योग्य तसाच प्रेरणा करणाराहि होय तो ' असा अर्थ होईल.

' निंदकांला '=' निदः '. म्हणजे आम्ही जें देवभजन करितों आणि देवाप्रीत्यर्थ हवि वगैरे देऊन उपासना करितों, त्या सर्वांचा उपहास करणारे जे जन ते.

वृत्तसुखासाठीं पहिल्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत ' भविआय इन्दवे ' असें वाचावें, आणि तिसऱ्या चरणाचा पहिला पोटचरण पदपाठाप्रमाणें वाचावा.

७. हे धनसंपन्न [ इंद्रा ], आमच्या एकनिर्धारी स्तोत्राच्या योगानें आम्हांला अशी [संपत्ति] मिळो—[ अशी ] संपत्ति मिळो [कीं, जी] उत्तमवीर्यवान् [अशा] पुत्रपौत्रांनीं भरलेली [असेल]—[जी] रमणीय, शाश्वत [आणि ] उत्तमवीर्यवान् पुत्रपौत्रांनीं भरलेली [ असेल ].—रागावलेल्या त्याला आपण शांतविणाऱ्या सूक्तांनीं [आणि] हविरन्नानें तृप्त करूं; इंद्राला निष्कपट स्तोत्रांनीं—पूज्य [इंद्रा]ला स्तोत्रांनीं [ तृप्त करूं ].

7. May we obtain such [ wealth ] through [ our ] attentive prayer— obtain wealth, O Lord of wealth, [ that is ] accompanied by brave progeny— [ is ] delightful, permanent, [and] accompanied by brave progeny. Let us gratify him, who is angry, with pacifying hymns [ and ] with offering—gratify Indra with sincere praises—worshipful [ Indra ] with praises.

७. 'हे धनसंपन्न इंद्रा, आम्ही जी तुझी उपासना करीत आहों, तेणेंकरून शूर पुत्रपौत्रादिकांनीं युक्त, आणि मनोहर, आणि शाश्वत, अशी संपत्ति आम्हांस प्राप्त करून दे.— आणि मित्र हो, ज्याचें मन वळविण्यास कठिण, अशा इंद्राच्या मनाला द्रव आणणाऱ्या स्तोत्रांनीं, आणि हविरन्नानें, आणि निष्कपट स्तवनांनीं आपण त्याला तृप्त करूं' असा भावार्थ.

'एकनिर्धारी'= 'चितन्त्या.' म्हणजे एकमनानें केलेलें, मन लावून केलेलें, दुर्लक्ष्यानें दुष्ट झालेलें नव्हे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाच्या पहिल्या पोटचरणांत 'तद्योनरया चितन्तिआ,' दुसऱ्या आणि तिसऱ्या पोटचरणांत 'सुवीरिअम्' असें, दुसऱ्या चरणाच्या दुसऱ्या पोटचरणांत 'आ ईम्' असें, आणि तिसऱ्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत 'इन्दरं' असें वाचावें लागतें.

**प्रप्रा वो अस्मे स्वयंशोभिरूती परिवर्ग इन्द्रो दुर्मतीनां दरीमन्दुर्मतीनाम् ।**
**स्वयं सा रिषयध्यै या न उपेषे अत्रैः ।**
**हतेमसन्न वक्षति क्षिप्ता जूर्णिर्न वक्षति ॥ ८ ॥**

प्रऽप्र । वः । अस्मे इति । स्वयंशःऽभिः । ऊती । परिऽवर्गे । इन्द्रः । दुःऽमतीनाम् । दरीमन् । दुःऽमतीनाम् ।
स्वयम् । सा । रिषयध्यै । या । नः । उपऽईषे । अत्रैः ।
हता । ईम् । असत् । न । वक्षति । क्षिप्ता । जूर्णिः । न । वक्षति ॥८॥

## भाषायाम्.

८. [हे मित्राणि], वः अस्मे (=युष्मभ्यम् अस्मभ्यं च=युष्मदर्थम् अस्मदर्थं च) इन्द्रः दुर्मतीनां परिवर्गे (=दुर्मनसां विरोधिनां वर्जने)—दुर्मतीनां दरीमन् (=दुर्मनसां दरीमणि=शत्रूणां हनने ) स्वयशोभिः ऊती (=स्वायत्तयशोभिः संरक्षणैः) प्रप्र [ भवतु ] (=अतिशयेन प्रभवतु ) । या [ जूर्णिः=सेना ] नः उपेषे (=अस्मान् उपायातुम्=अस्मान् अभिभवितुम् ) अत्रैः (=असुरैः ) [ क्षिप्ता=प्रेरिता ] सा स्वयम् [ एव ] रिषयध्यै (=हता भवितुं प्रवृत्तास्तु=हतास्तु )—[क्षिप्ता जूर्णिः=प्रेरिता सेना ] हता ईम् असत् (=हतैवास्तु) न वक्षति (=न प्राप्ता भवतु)—क्षिप्ता जूर्णिः (=प्रेरिता सेना ) न वक्षति (=न प्राप्ता भवतु ) ॥

क्षिप्ता जूर्णरिति पदद्वयं वयं सायणमनुसृत्य व्यानक्ष्महे । साधीयसोऽर्थस्य लाभासंभवात् । यत्तु जूर्णिरुल्केति पाश्चात्याः केचिद्विद्वांस आहुस्तत्प्रमाणसापेक्षं भाति ॥

८. [हे मित्र हो], तुम्हांसाठीं [आणि] आम्हांसाठीं इंद्र दुष्टांचा परिहार करावयाविषयीं—दुष्टांचें निर्दलन करावयाविषयीं,[आपल्या] निजयशोयुक्त साहाय्यांनीं परिपूर्ण समर्थ [होओ]. आम्हांवर येण्यासाठीं म्हणून जी [सेना] असुरांनीं [पाठविली असेल], ती स्वताहाच नाहींशी होओ;—[ ती ] मरून जाओ, आम्हांप्रत न पोंहचो—[आम्हांवर] पाठवून दिलेली सेना न पोंहचो.

8. For your good, [ O friends ], [ and ] for ours, may Indra, with [ his ] self-famous protections, [ be ] all-[powerful] for avoiding the wicked—for destruction of the wicked. May that army be itself destroyed that [ may be sent ] by the fiends to attack us; may it be killed [and] never reach [ us ]—may the despatched army never reach [ us ].

---

८. 'हे मित्र हो, तुम्हां आम्हांला दुष्ट जनांचा परिहार आणि नाश करावयाचा असला म्हणजे इंद्र साहाय्य करो, आणि त्याच्या साहाय्यानें आपणांस जय मिळो. राक्षसांनीं जर आम्हांवर येण्यासाठीं सेना पाठविली, तर ती सेनाच मार्गांत नाहींशी होओ, आम्हांजवळ येऊन पोंहचण्यापूर्वींच नाहींशी होओ.'

'निजयशोयुक्त '=' स्वयशोभिः.' म्हणजे ज्या साहाय्यांची अथवा संरक्षणांची ख्याति दुसऱ्यांनीं करावयास नको, जीं स्वताहाच कीर्तिमान आहेत.

'पाठवून दिलेली सेना '=' क्षिप्ता जूर्णिः.' 'क्षिप्ता'चा अक्षरशः अर्थ 'फेकलेली' असा आहे. त्यावरून 'जूर्णि'शब्दाचा अर्थ कित्येक पाश्चात्त्य विद्वान् कोलीत असा कल्पितात; पण त्याला प्रयोगान्तरांचा आधार अमदी नाहीं. यास्तव सायणांच्या अर्थाला सोडून देणें हें ( तो अर्थ जरी नीट दिसत नाहीं तथापि ) योग्य वाटत नाहीं.

या ऋचेंत सांगितलेले राक्षस म्हणजे अनार्य लोकांपैकीं जे कोळी, सांथल इत्यादि मनुष्यमांसाहारी लोक, ते असावे असें दिसतें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाच्या पहिल्या पोटचरणांत 'ऊतिई', दुसऱ्या पोटचरणांत 'इन्दर दुर्मतीनआम्,' व तिसऱ्या पोटचरणांत 'दुर्मतीनआम्' असें वाचणें, आणि दुसरा चरण 'स्वयं सा रिषयध्यै । या न उपेषे अत्रैः' असा म्हणणें अवश्य आहे. तिसऱ्या चरणाचा पहिला पोटचरण द्वादशाक्षरी जगतीचा नसतां अष्टाक्षरी अनुष्टुभाचाच आहे !

त्वं नं इन्द्र राया परीणसा याहि पथाँ अनेहसा पुरो याह्य-
रक्षसा ।
सचस्व नः पराक आ सचस्वास्तमीक आ ।
पाहि नो दूरादारादभिष्टिभिः सदा पाह्यभिष्टिभिः ॥ ९ ॥
त्वम् । नः । इन्द्र । राया । परीणसा । याहि । पथा । अनेहसा । पुरः ।
याहि । अरक्षसा ।
सचस्व । नः । पराके । आ । सचस्व । अस्तम्ऽईके । आ ।
पाहि । नः । दूरात् । आरात् । अभिष्टिऽभिः । सदा । पाहि । अभि-
ष्टिऽभिः ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. हे इन्द्र, त्वं नः (=अस्मान् प्रति) परीणसा (=बहुना) राया (=धनेन) [ या-हि=आयाहि], अनेहसा पथा (=पापरहितेन मार्गेण) [आ]याहि (=आगच्छ )—अ-रक्षसा [ पथा ] पुरो याहि ( =राक्षसरहितेन मार्गेण अस्मान् नय ) । पराके आ (=दूरदेशे ) नः सचस्व (=अस्माभिः सह वर्तस्व ) [ तथा ] अस्तमीके आ (=गृहे) सचस्व ( =अस्माभिः संगच्छस्व=अस्माभिः सह वर्तस्व ) । नः ( =अस्मान् ) अभिष्टिभिः ( =संरक्षणैः ) दूरात् आरात् ( =दूरप्रदेशात् समीपवर्तिनः प्रदे-शाच्च ) पाहि ( =पालयस्व )—सदा अभिष्टिभिः पाहि ( =नित्यमेव संरक्षणैः सह पालयस्व ) ॥

सायणस्तु । हे इन्द्र त्वं नः पथास्मत्संबन्धिना मार्गेण पुरो याहि । आगच्छ । ......यद्वा नोऽस्मान् उद्दिश्य याहि । ...... । हे इन्द्र नोऽस्मान् पराकेऽत्यन्त-दूरदेशात् स्वर्गलक्षणादासचस्व । समवेतो भव । ......तथास्तमीकेऽत्यन्तान्तिके देवयजनदेशे सचस्व । अस्मत्प्रत्तं हविः सेवस्व । संगच्छस्व वा । इत्यादि ॥

**९. हे इंद्रा, तूं मोठ्या धनासहित आम्हांप्रत [ये], निष्पाप मार्गानें ये. राक्षसरहित [मार्गा]नें तूं आमचा पुढारी होऊन चल. आम्हांला घराबाहेर संभाळ [आणि] घरामध्यें संभाळ, आम्हांला दूरून संभाळ [आणि] आपल्या साहाय्यांनीं जवळून संभाळ—नित्य आपल्या साहाय्यांनीं संभाळ.**

9. Come thou, O Indra, to us with abundant wealth—come thou by a sinless path,—guide us by a path free from fiends. Preserve us abroad, preserve us at home. Protect us from afar and from near with thy helps—protect always with thy helps.

---

९. 'हे इंद्रा, तूं आम्हांप्रत ये, आणि येतांना आम्हांला मोठी संपत्ति आण. तूं आमचा पुढारी हो, आणि आम्हांस राक्षसहीन आणि पापहीन अशा मार्गानें ने. आम्हांला घरीं आणि बाहेर, जवळ आणि दूर सारिखेच राख, उपद्रव होऊं देऊं नको. आम्हांला आपलें साहाय्य अनेक प्रकारांनीं देऊन आमचें तूं पाठबळ हो'.

'मोठ्या'='परीणसा'. 'परीणस्' शब्दाचा अर्थ कितीएक विद्वान् वैभव असा नामार्थी करितात. पण आम्ही सायणांस अनुसरलों आहों. आम्हांस वाटतें, सायणांचा अर्थ सोडण्याची अवश्यकता नाहीं.

'राक्षसरहित'='अरक्षसा'. म्हणजे ज्यांत राक्षसादिकांचा उपद्रव होणार नाहीं अशा. 'रक्षस्' म्हणजे उपद्रव देणारे आणि आर्यजनांस प्रसंगवशात् खाऊनहि टाकणारे जे कोळी इत्यादिक अनार्य लोक ते; आणि त्यावरूनच रात्रीच्या वेळीं संचार करणारे असे कल्पिलेले दुसरे प्राणी असा अर्थ. वेदांत 'राक्षस' हा शब्द आलेला नाहीं. सू. ७६ मं. ३ याजवरील टीप भाग २ पृ. २०९ याजवर पहा.

या ऋचेच्या पहिल्या चरणांतील पोटचरण असे वाचावेः—

तुअं न इन्दर रॉया परीणसा ।
याहि पथा अनेहसा
पुरो याहि अरक्षसा ।

यावरून दिसेल की दुसरा पोटचरण अष्टाक्षरी अनुष्टुभाचाच आहे! दुसऱ्या चरणांत 'सचस्व अस्तमीक आ' असें म्हणावें, आणि तिसऱ्या चरणांत 'आरात्'च्या ठिकाणीं 'आरआत्' असें म्हणावें, आणि त्याचा दुसरा पोटचरण पदपाठाप्रमाणें म्हणावा.

**त्वं न इन्द्र राया तरूषसोग्रं चित्त्वा महिमा सक्षदवसे महे मित्रं नावसे ।**
**ओजिष्ठ त्रातरविता रथं कं चिदमर्त्य ।**
**अन्यमस्मद्रिरिषेः कं चिदद्रिवो रिरिक्षन्तं चिदद्रिवः ॥ १० ॥**

त्वम् । नः । इन्द्र । राया । तरूषसा । उग्रम् । चित् । त्वा । महिमा । सक्षत् । अवसे । महे । मित्रम् । न । अवसे ।
ओजिष्ठ । त्रातः । अवितरिति । रथम् । कम् । चित् । अमर्त्य ।
अन्यम् । अस्मत् । रिरिषेः । कम् । चित् । अद्रिऽवः । रिरिक्षन्तम् । चित् । अद्रिऽवः ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

१०. हे इन्द्र, त्वं तरूषसा (=शत्रूणामभिभवनसमर्थेन) राया (=धनेन) नः (=अस्मान्) [पाहि]। उग्रम् (=उद्गूर्णबलं=प्रबलं) त्वा चित् (=त्वामेव) महिमा (="महत्त्वम् अस्मत्स्तोत्रजनितः कश्चिदतिशयः") अवसे (=अनुग्रहाय=रक्षणाय) सक्षत् (=सचतां=संभजताम्)—मित्रं न (=सखायमिव) [त्वामेव] महे अवसे (=महते रक्षणाय) [सक्षत्=संभजताम्]। हे ओजिष्ठ (=अतिशयेन बलवन्) त्रातः (=रक्षितः), हे अमर्त्य अवितः (=मरणहीन पालयितः), कंचिद रथम् [आरुह्य आगच्छ]। हे अद्रिवः (=वज्रधर), अस्मद् अन्यं कंचित् (=अस्मत्तः कमपि पुरुषमन्यं) रिरिषेः (=बाधस्व=अस्मांस्तु मा बाधस्व)—हे अद्रिवः (=वज्रधर), रिरिक्षन्तं चित् (=अन्यान् बाधमानमेव पुरुषं) [रिरिषेः=बाधस्व] ॥

सक्षत्। सेवते संभजते उत्कर्षयतीत्यर्थः। ......। कंचिद्रथं वेगवन्तमारुह्यास्मदेवयजनं शीघ्रमागच्छेति शेषः। इति सायणः॥

१०. हे इंद्रा, तूं विजयकारी धनानें आम्हांला [संभाळ]. [स्तोत्रांतील] महिमा प्रसादलाभासाठीं तुज महाबळालाच भजो—मोठ्या प्रसादलाभासाठीं मित्राला [भजल्या]प्रमाणें [तुलाच भजो]. [तर] हे अतिबळवान् त्रात्या, हे रक्षित्या, हे अमरा, तूं कोणत्या तरी रथांत [बसून ये]. हे वज्रधारी [इंद्रा], तूं आम्हांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणाला तरी उपद्रव कर—हे वज्रधरा, तूं उपद्रव करणाऱ्यालाच [उपद्रव कर].

10. Protect us thou, O Indra, with wealth that shall conquer. Thee alone [who art] mighty let the greatness [of being praised] honour for help—honour for great help, like a friend. O most mighty saviour, O protector, O immortal [Indra], [mount thou] some chariot [and come to us]. O wielder of the thunderbolt, mayest thou injure any one else but ourselves—[injure] him alone, O wielder of the thunderbolt, who is injurious.

---

१०. 'हे इंद्रा, आमच्या शत्रूंस जेणेंकरून आम्हीं जिंकूं शकूं असें धन घेऊन तूं आम्हांप्रत ये. कृपा व्हावी, आणि अनुग्रहाचा लाभ व्हावा म्हणून, जन तुझ्याच प्रबळाला गाऊन तुझा महिमा वाढवोत—एकाद्या प्रबळ मित्राप्रमाणें तुझीच विनवणी करोत. हे त्रात्या, तूं एकाद्या कोणत्या तरी फार वेगवान रथांत बसून सत्वर ये. हे वज्रधरा इंद्रा, आम्ही कोणाला उपद्रव देत नाहीं त्यापेक्षां आम्हांला तूं उपद्रव देऊं नको, आम्हांशिवाय जे कोणी जनाला त्रास देणारे असतील, त्यांलाच तूं त्रास दे'.

वृत्तसुखार्थ पहिल्या चरणांतील पोटचरण 'तुअं न इन्दर राया तरूत्वसा' असा म्हणावा; तिसरा पोटचरण पदपाठाप्रमाणें म्हणावा; दुसऱ्या चरणांत 'मनिअ' म्हणावें.

पाहि नं इन्द्र सुष्टुत स्रिधोऽवयाता सदमिद्दुर्मतीनां देवः सन्दु-
र्मतीनाम् ।
हन्ता पापस्य रक्षसस्त्राता विप्रस्य मावतः ।
अधा हि त्वां जनिता जीजनद्वसो रक्षोहणं त्वा जीजनद्वसो ॥
॥ ११ ॥ १७ ॥

पाहि । नः । इन्द्र । सुऽस्तुत । स्रिधः । अवऽयाता । सदम् । इत् ।
दुःऽमतीनाम् । देवः । सन् । दुःऽमतीनाम् ।
हन्ता । पापस्य । रक्षसः । त्राता । विप्रस्य । माऽवतः ।
अध । हि । त्वा । जनिता । जीजनत् । वसो इति । रक्षःऽहनम् । त्वा ।
जीजनत् । वसो इति ॥ ११ ॥ १७ ॥

## भाषायाम्.

११. हे सुष्टुत (=शोभनं यथा तथा स्तुत) इन्द्र, [त्वं] नः (=अस्मान्) स्रिधः पाहि (=पापाद् अदेवयजकात्=अनार्यशत्रोः) पाहि (=संरक्ष), सदम् इत् (=सदैव) दुर्मतीनां (=दुर्जनानाम्) अवयाता (=अधो यापयिता=अपगमयिता)—दुर्मतीनां (=दुर्जनानां) देवः [अवयाता] (=दिव्योपगमयिता) सन् [अस्मान् पाहि]। [त्वं] पापस्य रक्षसः (=राक्षसस्य) हन्ता (=घातको) मावतो विप्रस्य [च] (मादृशस्य स्तोतुश्च) त्राता (=संरक्षिता) [भव]। अध हि (=अत एव कारणात्=तदर्थमेव हि) हे वसो (=दयालो), जनिता (=तव पिता) त्वा जीजनत् (=त्वाम् अजीजनत्)—हे वसो (=दयालो), त्वा (=त्वां) रक्षोहणं (=राक्षसानां हन्तारं) जीजनत् (=अजीजनत्=उदपादयत्)॥

स्रिधो दुःखात् तदुत्पादकात् पापाद्वा। इति सायणः॥

११. हा येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. यांत ऋषीनें आपल्या मनांतील वर मागितला आहे. तो हाः—'हे इंद्रा, याप्रमाणें आम्हीं तुझी इतरांप्रमाणें चांगली स्तुति केली आहे; तर तूं आम्हांला धर्मघातक शत्रूंपासून संभाळ, आणि दुर्जनांचा आमच्या हातून परिहार करीव. तूं पापी राक्षसांला मारणारा आणि म-

११. हे सुस्तुत इंद्रा, तूं आम्हांला द्वेष्ट्यापासून रक्ष, आणि दुर्जनांचा सदैव परिहर्ता—दुर्जनांचा देदीप्यमान परिहर्ता हो. पापी राक्षसांचा हननकर्ता [आणि] मजसारिख्या स्तोत्याचा त्राता [हो]. कांकीं त्या कारणास्तवच हे कृपाळू [इंद्रा], तुला तुझ्या पित्यानें निर्माण केलें—हे कृपाळू [ इंद्रा ], तुला राक्षसहननकर्ता निर्माण केलें.

11. Preserve us, O well-praised Indra, from the infidel, and be always the averter of the wicked—the divine averter of the wicked; [ be thou ] the killer of the unholy fiend, [ and ] the preserver of a worshipper like me. For, for this purpose did [ thy ] father beget Thee, O benevolent [ Indra ],— did O benevolent [ Indra ], beget Thee a killer of the fiends.

---

जसारिख्या उपासकातें तारणारा हो. कारण दुर्जनांला मारावें आणि सज्जनांला तारावें म्हणूनच तुला तुझ्या पित्यानें निर्माण केलें आहे '.

' द्वेष्ट्यापासून '=' स्रिधः'. म्हणजे यज्ञादि उपासनेचा जो मार्ग, त्याची निंदा करून आर्यजनांला उपद्रव देणारा जो अनार्य शत्रु त्याजपासून.

' [ तुझ्या ] पित्यानें '=' जनिता '. इंद्राचा बाप म्हणजे जगताचा कर्ता जो परमेश्वर तो असें सायणाचार्य म्हणतात; पण ऋषीचें हृद्य तसेंच आहे असें दिसत नाहीं. इतर ठिकाणीं इंद्राला त्याच्या बापानें प्रबळ असा निर्मिला असें सांगितलें आहे; पण तेथें तरी हा बाप कोण तें सांगितलेलें नाहीं. जशी इतर ठिकाणीं तशी प्रस्तुत स्थळीं तरी बापानें ' राक्षसहंता निर्माण केलें ' असें सांगितलें आहे तें केवळ इंद्राच्या बळाची प्रशंसा करण्यासाठीं सांगितलें आहे, इंद्राला बाप आहे, आणि तो अमुक आहे, इंद्र हा स्वतःसिद्ध नाहीं असें सांगण्याचा उद्देश नाहीं.

वृत्तासाटीं पहिल्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत 'पआहि न इन्दर' असें, आणि दुसऱ्यांत व तिसऱ्यांत 'दुर्मतीनआम्' असें वाचावें. तिसऱ्या चरणांत '०हणं त्वा जीजनद्वसो ' इतका अष्टाक्षरी पोटचरण जमून शिवाय ' रक्षो० ' हीं अक्षरें नियमाबाहेर अधिक राहतात. अथवा तो अकरा अक्षरांचा समजून खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावा काय ?

रक्षोहणं त्वा जीजनद्वसो ।

## सूक्तम् १३०.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । इन्द्रो देवता । अन्त्या त्रिष्टुप् ।
शिष्टं सूक्तम् आत्यष्टम् ॥

एन्द्रं याह्युप नः परावतो नायमच्छा विदथानीव सत्पतिरस्तं रा-
जेव सत्पतिः ।
हवामहे त्वा वयं प्रयस्वन्तः सुते सचा ।
पुत्रासो न पितरं वाजसातये मंहिष्ठं वाजसातये ॥ १ ॥

आ । इन्द्र । याहि । उप । नः । पराऽवतः । न । अयम् । अच्छ ।
विदथानिऽइव । सत्ऽपतिः । अस्तम् । राजाऽइव । सत्ऽपतिः ।
हवामहे । त्वा । वयम् । प्रयस्वन्तः । सुते । सचा ।
पुत्रासः । न । पितरम् । वाजऽसातये । मंहिष्ठम् । वाजऽसातये ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, [ त्वं ] परावतः ( =दूरदेशात्=" स्वर्गलक्षणात् ") नः उप आ याहि ( =अस्मान् प्रति आगच्छ ) । अयं ( =कश्चित् ) सत्पतिः ( =सतां पालको ) [ राजा ] न अच्छ विदथानीव (=कस्यचिद् गृहान् प्रति यथा)—सत्पती राजा अस्तमिव(=सतां पालको राजा कस्यचित् गृहं प्रति यथा आगच्छति तद्वत् ) [ उप नः आ याहि ] । वयं [ हि ] सुते सचा ( =सोमेऽभिषुते हि तत्क्षणं=सोमस्याभिषवणादनन्तरमेव ) प्रयस्वन्तः ( =हविरन्नयुक्ताः सन्तः), वाजसातये पुत्रासः पितरं न ( =अन्नभक्षणाय पुत्राः पितरं यथा तथा ),—मंहिष्ठं (=अतिशयेन दानशीलं ) त्वा ( =त्वां ) वाजसातये ( =अन्नभक्षणाय ) हवामहे ( =आह्वयामः ) ॥

नायमित्यादौ अयं न पुरोवर्तयभिरभिषुतः सोमो वा प्रस्तुतत्वान्निर्दिश्यते । स इव । ...यद्वा... । अयमिति विभक्तिव्यत्ययः । अमुं देवयजनदेशमच्छाभिप्राप्तुमायाहीति शेषः । इति सायणाचार्याः ॥

## सूक्त १३०.

ऋषि —दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—इंद्र. वृत्त—शेवटची एक ऋचा त्रिष्टुभ्, राहिलेल्या सर्व सूक्ताचें वृत्त अत्यष्टि.

१. हे इंद्रा, तूं दूरून आम्हांप्रत ये; एकादा सत्पालक [राजा] घरीं येतो तसा—सत्पालक राजा [कोणाच्या तरी] घरीं येतो तसा [ये]. आम्ही सोम काढून हविरन्न हातांत घेऊन तुला बोलावीत आहों; पित्याला [ जसे ] पुत्र जेवायास [ बोलावितात ] तसे तुज महादात्याला [आम्ही] जेवायास [ बोलावीत आहों ].

## HYMN 130.

To *Indra*. By *Paruchchhepa*, son of *Divodâsa*. Metre- *Atyashti*, except of the last verse in which it is *Trishtubh*.

1. Come, O Indra, unto us from afar, even as [ a king ], the protector of the good, [comes] to the house—as a king, the protector of the good, [ comes ] to one's home. The Soma being expressed we with sacrificial food are calling Thee, as sons [ call ] [ their ] father, to dinner—[ calling Thee ], the most bounteous, to dinner.

---

१. 'हे इंद्रा, एकादा राजा आपल्या घरीं येतो तसा, तूं दूर गुलोकीं असलास तरी तेथून आमच्या घरीं ये. एकादा राजा कोणातरी प्रजेच्या घरीं जसा येतो, तसा तूं आमचे घरीं ये. आम्ही तुजकरितां सोमरस काढून हविरन्नाची तयारी करून तुला भोजनास येण्यास बोलावीत आहों, जसे पुत्र पित्याला भोजनास बोलावितात तसे तुला आम्ही बोलावीत आहों; तर तूं ये ' असा भावार्थ.

'सत्पालक '=' सत्पतिः '. कितीएक पाश्चात्य विद्वान् ' बळवान् ' असा अर्थ कल्पितात, पण आम्हांस वाटतें कीं सायणांचा ' सत्पालक ' हा नित्याचा अर्थ टाकून देण्याला पुरतें कारण नाहीं.

' सोम काढून '=' सुते सचा. ' म्हणजे सोम काढितांच, सोम काढल्याबरोबर. सायणाचार्य ' सचा ' म्हणजे ' सह ' असा सर्वत्र अर्थ करितात. पण ' सुते सचा ' अथवा ' सचा सुते ' असें पुष्कळ मंत्रांत आलें आहे ते मंत्र पाहतां, ' सोम काढून ', ' सोम काढतांच ', 'सोम काढिल्याबरोबर ' असा अर्थ चांगला जुळतो.

वृत्तासाटीं पहिल्या चरणाचा पहिला पोटचरण पदपाठांत आहे तसा म्हणावा लागतो, आणि दुसऱ्या चरणांत 'त्वा'च्या ठिकाणीं ' तुआ ' असें म्हणावें लागतें.

**पिबा सोममिन्द्र सुवानमद्रिभिः कोशेन सिक्तमवतं न वंसगस्तातृषाणो न वंसगः ।**
**मदाय हर्यताय ते तुविष्टमाय धायसे ।**
**आ त्वा यच्छन्तु हरितो न सूर्यमहा विश्वेव सूर्यम् ॥ २ ॥**

पिब । सोमम् । इन्द्र । सुवानम् । अद्रिऽभिः । कोशेन । सिक्तम् । अवतम् । न । वंसगः । ततृषाणः । न । वंसगः ।
मदाय । हर्यताय । ते । तुविःऽतमाय । धायसे ।
आ । त्वा । यच्छन्तु । हरितः । न । सूर्यम् । अहा । विश्वाऽइव । सूर्यम् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हे इन्द्र, [इमम्] अद्रिभिः (=ग्रावभिः) सुवानं (=सूयमानम्=अभिषूयमाणं) सोमं पिब। कोशेन सिक्तं (=जलोद्धरणपात्रेण पूरितम्) अवतम् (=अवटं=द्रोणं) वंसगो न (=वृषभो यथा पिबति)—तातृषाणो वंसगो न (=अतिशयेन तृषाक्रान्तो वृषभो यथा पिबति तथा) [इमं सोमं पिब]। हरितः (=हरिद्वर्णाः सूर्यस्याश्वाः) सूर्यं न (=सूर्यं यथा) [आ यच्छन्ति=आनयन्ति तथा]—विश्वा अहा सूर्यमिव (=विश्वानि अहानि=नित्यं सूर्यं यथानयन्ति तद्वत्) ते हर्यताय मदाय (=सर्वैः स्पृहणीयाय तव मदाय=सोमपानजनिताय तव हर्षाय) [अपि च] तुविष्टमाय धायसे (=अतिशयेन बलवते सोमपानाय=प्रबलतमस्य सोमस्य पानाय) त्वा (=त्वाम्) आ यच्छन्तु (=आवहन्तु) ॥

२. हे इंद्रा, ग्राव्यांच्या योगानें पिळून काढिला जात आहे हा सोम तूं पी. पोहऱ्यानें भरलेली डोण बैल [पितो] तसा—अतिशय तान्हेलेला बैल [डोण पितो] तसा, [तूं सोम पी]. तुला सुंदर माद यावा म्हणून, तूं अत्यंत बळकट सोम प्यावास म्हणून [ तुझे घोडे ], सूर्याला [ त्याचे ] पिवळे घोडे [ आणितात ] तसे—प्रतिदिनीं सूर्याला [आणितात] तसे, तुला इकडे घेऊन येओत.

2. Drink [ this ] Soma, O Indra, [ that is ] being expressed by means of the stones, even as a bull [drinks] [ from ] a trough filled by means of a bucket —even as a most thirsty bull. For thy delightful exhilaration, for [ thee ] to drink this most powerful Soma may [ thy horses ] carry thee hither, even as the tawny horses bring the sun—even as [ the tawny horses bring] the sun daily.

---

२. 'हे इंद्रा, आम्हीं हा सोम काढून तुजकरितां मोठ्या पात्रांत भरून ठेविला आहे, तो तूं, एकादा फार तान्हेलेला बैल पोहरे ओतून ओतून भरलेली पाण्याची सगळी डोणीचीडोण पिऊन टाकितो तसा, पी. हे इंद्रा, सूर्याचे अरुण वर्णाचे घोडे जसे त्याला नित्य घेऊन येतात, तसे तुझे घोडे तुला हा आमचा अत्यंत बळकट सोम पिऊन मोठा आल्हाद पावण्याकरितां घेऊन येओत,' असा भावार्थ आहे.

'ग्राव्यांच्या योगानें'=' अद्रिभिः.' ज्या एक प्रकारच्या पाथ्यावरवंट्यासारिख्या पाषाणांनीं सोम तयार करून काढीत त्यांचें नांव 'ग्रावे' ( ग्रावाणः ) अथवा 'पाषाण' ( अद्रयः ). सू. ८८ मं. ३, आणि सू. २८ मं. १ आणि टिपा पहा.

'पोहऱ्यानें'=' कोशेन.' 'कोश' शब्दाचा हा अर्थ होतो अशाविषयीं ऋ. ४. १७. १६ याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तसुखासाठीं तिसऱ्या चरणांत दोनीहि ठिकाणीं 'सूर्यम्'च्या ठिकाणीं 'सूरिअम्' असें म्हणावें लागतें.

अविन्दद्दिवो निहितं गुहा निधिं वेर्न गर्भं परिवीतमश्मन्यनन्ते अन्तरश्मनि ।
व्रजं वज्री गवामिव सिषासन्नङ्गिरस्तमः ।
अपावृणोदिष इन्द्रः परीवृता द्वार इषः परीवृताः ॥ ३ ॥

अविन्दत् । दिवः । निऽहितम् । गुहा । निऽधिम् । वेः । न । गर्भम् । परिऽवीतम् । अश्मनि । अनन्ते । अन्तः । अश्मनि ।
व्रजम् । वज्री । गवाम्ऽइव । सिसासन् । अङ्गिरःऽतमः ।
अप । अवृणोत् । इषः । इन्द्रः । परिऽवृताः । द्वारः । इषः । परिऽवृताः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ इन्द्रः ] दिवो गुहा निहितं ( =द्युलोकस्य गुहायां स्थापितं ) निधिं ( =धनराशिम् ) अश्मनि परिवीतं वेर्गर्भं न ( =पर्वते परिवेष्टितं पक्षिण्याः शिशुमिव )—अनन्ते अश्मनि अन्तः ( =अपरिमिते पर्वते ) [ परिवीतं गर्भं न=परिवेष्टितं पक्षिण्याः शिशुमिव ] अविन्दत् ( =अन्विष्यालभत ) । अङ्गिरस्तमः ( =अङ्गिरसां श्रेष्ठः =अङ्गिरसां गुणैर्गुहायां निगूढवस्तूनामन्वेषणलाभरूपैरत्यन्तं तद्वान् ) वज्री ( =वज्रवान् ) गवां व्रजमिव ( =गवां गोष्ठमिव ) सिषासन् ( =लब्धुमिच्छन् ) इन्द्रः इषः ( =मेघोदकरूपस्य अन्नस्य ) परिवृताः ( =परितो वेष्टिता ) [ द्वारः ] अपावृणोत् ( =उद्घाटितवान् )—इषः परिवृताः (=परितो वेष्टिता=पिहिता ) द्वारः (=द्वाराणि ) [ अपावृणोत्=उद्घाटितवान् ] ॥

एषेन्द्रस्य मेघवृष्टिकर्मपरा । यथा कश्चिद्गवां गोष्ठमन्विष्यन् निगूढं तं कस्मिंश्चित्स्थले विन्दति तद्वदिन्द्रो द्युलोके निधिमिव निगूढं मेघोदकं लब्धवान् इति प्रशंसात्रेन्द्रस्य मेघोदकवर्षणकर्मणः ॥ सायणस्तु एवं व्याख्यातवान् । अयमिन्द्रो दिवो द्युलोकादानीतं सोममविन्दत् । अलभत लब्धवान् । द्युलोकाद्गायत्र्या पक्षिरूपयापहृतं भूमावानीतं स्वीकृतवानित्यर्थः । द्युलोकादानयनं तैत्तिरीये तृतीयस्यामितो दिवि सोम आसीत्तं गायत्र्याहरदित्यादिषु प्रसिद्धम् । स एव विशेष्यते । गुहा निहितम् । अतिगोप्ये प्रदेशे पर्वतादौ स्थापितम् । अत एव निधिं निधिस्थानीयम् । अनाश्यमित्यर्थः । आनयने दृष्टान्तः । वेः पक्षिणो गर्भं न । शिशुमिव । यथा कपोतादिस्त्री पक्षिणी स्वशिशुं व्याधादिभयात्कस्मिंश्चिद्दुर्गमे स्थापयित्वा तत्स्थानमजानती परि-

३. द्युलोकाच्या गुहेंत लपवून ठेविलेला निधि इंद्र शोधून काढिता झाला; पर्वतांत वेष्टून ठेविलेला—निःसीमपर्वतांत वेष्टून ठेविलेला पक्ष्याचा गर्भ [ शोधून काढावा ] तसा [ शोधून काढिता झाला ]. अंगिरसांमध्यें उत्तम अंगिरसच जणुं असा जो वज्रधारी इंद्र, तो गाईंचा गोठा जणुं शोधून काढण्याच्या इच्छेनें [मेघोदकरूप] अन्नाचीं झांकलेलीं कवाडें उघडिता झाला—झांकलेलीं अन्नाचीं कवाडें [उघडिता झाला ].

3. He discovered the treasure hidden in the recesses of heaven, like the brood of a bird hidden in a mountain—in the heart of an endless mountain. Indra, the holder of the thunderbolt, being the best of the Angirases, as if with the desire of finding the fold of the cows, broke open the closed [ gates ] of the water—the closed gates of the water.

३. हा मंत्र कांहींसा कठिण आहे. पण भावार्थ असा आहे कीं, 'जसा एकाद्या मोठ्या पर्वतावरील अरण्यांत लपविलेला पक्ष्याचा घरटा शोधून काढावा तसा, अथवा द्युलोकाच्या एका कोपऱ्यांत पुरून ठेविलेला द्रव्याचा हांडा हुडकून काढावा तसा, अथवा जसें कोणी एकाद्या मनुष्यानें चोरीस गेलेल्या गाईचें ठिकाण शोधून काढावें त्याप्रमाणें, वृत्रानें कोंडून ठेविलेली उदकें वज्रधर इंद्रानें बाहेर काढिलीं,' हा इंद्राचा पराक्रम यांत सांगितला आहे. सायणांनीं अर्थ वेगळा केला आहे, तो भाषेखालीं आम्हीं उतरून घेतला आहे.

'निधि'='निधिम्.' म्हणजे उदकानें भरलेला जो मेघ; तोच कोणी एक द्रव्याचा जणुं हांडा. सायणाचार्य 'सोम' विवक्षित आहे असें म्हणतात.

'गर्भ'='गर्भम्.' म्हणजे पिलूं असा अर्थ आहे.

'अङ्गिरसांमध्यें उत्तम अङ्गिरस'='अङ्गिरस्तमः'. म्हणजे अङ्गिरस ऋषि जे होऊन गेले त्यांचे पराक्रम ज्याजमध्ये फार आहेत तो, असा अक्षरार्थ आहे. अङ्गिरसांनीं केलेला मुख्य पराक्रम हा कीं, त्यांनीं अग्नि स्वर्गीं लपून राहिला असतां त्याला शोधून काढिलें; आणि मेघोदकरूप गाई पणींनीं चोरून नेऊन आकाशांत गुहेंत लपवून ठेविल्या असतां त्यांचा पत्ता लाविला, (ऋ. १०. ६२. २). तर 'अङ्गिरस्तम' म्हणजे हरवलेल्या अथवा चोरीस गेलेल्या किंवा

दादृहाणो वज्रमिन्द्रो गभस्त्योः क्षद्मेव तिग्ममसनाय सं श्यदहिहत्याय सं श्यत् ।
संविव्यान ओजसा शवोभिरिन्द्र मज्मना ।
तष्टेव वृक्षं वनिनो नि वृश्चसि परश्वेव नि वृश्चसि ॥ ४ ॥

दादृहाणः । वज्रम् । इन्द्रः । गभस्त्योः । क्षद्मऽइव । तिग्मम् । असनाय । सम् । श्यत् । अहिऽहत्याय । सम् । श्यत् ।
सम्ऽविव्यानः । ओजसा । शवःऽभिः । इन्द्र । मज्मना ।
तष्टाऽइव । वृक्षम् । वनिनः । नि । वृश्चसि । परश्वाऽइव । नि । वृश्चसि ॥ ४ ॥

ऽम्य विन्दते तद्वदित्यर्थः । पुनः कीदृशम् । अश्मनि पाषाणेऽतिमहति विस्तृतेऽनन्तेऽश्मन्यपरिमितपाषाणे पर्वतादौ परिवीतं लताकण्टकादिना परितो वेष्टितम् । सत्स्वपीतरेषु देवेषु कोऽस्यातिशय इति तत्राह । अयमिन्द्रो वज्री वज्रवान् गवां व्रजमिव पणिनासुरेणापहृतं भूमौ खनित्वा पाषाणेन पिहितद्वारं गवां व्रजं यथा तमसुरं जित्वा द्वारमुद्घाट्य लब्धवान् तद्वत्सोमं सिषासन् संभक्तुमिच्छन् ॥ सनीवन्तर्धेति विकल्पनादिडभावे जनसनेत्यात्वम् । अविन्दत् । अयमर्थः पणिनेव गाव इत्यादिश्रुतिषु प्रसिद्धः । तथायमिन्द्रः परीवृताः परितो मेघेनावृता इषोऽन्नहेतुभूतस्योदकस्य द्वारो द्वाराण्यपावृणोत् । अपवृतान्यकरोत् । उद्घाटितवानित्यर्थः । तथा कृत्वेष इष्यमाणानि व्रीह्याद्यन्नानि परीवृता भूमौ परितो व्याप्तान्यकरोत् । वज्रेण मेघं भित्त्वा जलवर्षणेन सस्यादिसमृद्धिं कृत्वा व्रीह्यादिकं भूमौ व्याप्तमकरोदित्यर्थः । यतोऽयमेवं कृतवान् अतः सोमस्वीकारो युक्तः ॥

## भाषायाम्.

४. इन्द्रः गभस्त्योः (=बाह्वोः=हस्तयोर्मध्ये) वज्रं दादृहाणः (=दृढं गृह्णन्) तिग्मं क्षद्मेव (=तीक्ष्णं खड्गमिव) असनाय (=शत्रोरुपरि प्रेरणाय) सं श्यत् (=सम् अश्यत्=सम्यक् अतीक्ष्णयत्=तीक्ष्णीकृतवान्]—अहिहत्याय सं श्यत् (=वृत्ररूपं सर्पं हन्तुं तीक्ष्णीकृतवान्) ।—हे इन्द्र, ओजसा (=बलेन) शवोभिः (=सामर्थ्यैः) [अपि च] मज्मना (=महत्त्वेन) सं विव्यानः (=संयुक्तः सन्) तष्टेव (=यथा कश्चित् तष्टा तथा) वृक्षं वनिनः (=तरूंश्च) नि वृश्चसि (=नितरां छिनत्सि)—परश्वेव नि वृश्चसि (=परशुना यथा तथा नितरां छिनत्सि) ॥

४. इंद्र [ आपल्या ] हातांत वज्र गच्च धरून तें तीक्ष्ण सुरीप्रमाणें मारण्यासाठीं पाजळितो—अहीला मारण्यासाठीं पाजळितो. हे इंद्रा, प्रतापानें, सामर्थ्यांनीं [ आणि ] मोठेपणानें भरलेला [ असा जो ] तूं, [ तो ] सुतार झाडाला [आणि] वृक्षांला [तोडून टाकितो] तसा [आपल्या शत्रूला] तोडून टाकितोस—कुऱ्हाडीनें [तोडिल्या] प्रमाणें तोडून टाकितोस.

4. Holding the thunderbolt fast in his hands, Indra sharpens it to strike, like a sharp knife—sharpens for killing the Serpent.—Clothed with might, powers [and] greatness thou, O Indra, cuttest down [thy enemy] even as a carpenter [cuts] wood [and] trees—thou cuttest down as with an axe.

लपविलेल्या वस्तूचा उत्तम रीतीनें शोध लावणारा असा अर्थ होतो असें आम्हास वाटतें. यान अभिप्रायानें अग्नीला 'अङ्गिराः' आणि 'अङ्गिरस्तमः' असें नांव येत असतें, कारण कीं तो आपल्या प्रकाशाच्या द्वारें कोनाकोपऱ्यांत लपून असलेल्या अथवा हरवलेल्या वस्तु प्रगट करितो. आणि उषा आपल्या प्रकाशानें कोनाकोपऱ्यांत लपून असलेल्या वस्तूंस हुडकून जणुं बाहेर काढिते म्हणून तिलाहि 'अङ्गिरस्तमा' हें विशेषण लाविलेलें आढळतें ( ऋ. ७. ७५. १; ७. ७९. ३ ).

'[ मेघोदकरूप ] अन्नाचीं '=' इषः'. मेघोदकापासून सर्व कांहीं उत्पन्न होतें, आणि त्याजवर आर्य लोकांची मोठी भक्ति असे म्हणून त्याला केवळ 'अन्न' ( इष् ) असें नांव दिलें आहे.

वृत्तसुखासाठीं 'गर्भे' शब्द असा उच्चारिला पाहिजे कीं, तो जणुं 'गरभे' असाच आहे; 'अश्मनि' आणि 'अनन्तें' यांचा संधि करूं नये; म्हणजे बाकी सर्व ऋचा वृत्ताला बरोबर जमते.

४. ज्यापासून वृष्टि करावयाची त्या मेघाचें स्थळ शोधून काढिल्यावर इंद्रानें काय केलें तें सांगतोः—'हे इंद्रा, मग तूं आपलें वज्र दोन्ही हातांत गच्च धरून एकाद्या तीक्ष्ण सुरीप्रमाणें तें शत्रूवर ( वृत्रावर ) मारण्यासाठीं पाजळिलेंस—त्या सर्पाप्रमाणें कपटी वृत्रावर मारण्यासाठीं पाजळिलेंस. आणि प्रताप, बळ आणि महिमा यांच्या योगानें परिपूर्ण होत्साता, जसा एकादा रानतोड्या झाडें आणि वृक्ष कुऱ्हाड घेऊन तोडून टाकितो, तसा तूं आपला शत्रु तोडून टाकिता झालास.'

'तीक्ष्ण सुरीप्रमाणें '='तिग्मं क्षद्मेव'.

**त्वं वृथा नद्य इन्द्र सर्तवेऽच्छा समुद्रमसृजो रथाँ इव वाजयतो रथाँ इव ।**
**उत ऊतीरयुञ्जत समानमर्थमक्षितम् ।**
**धेनूरिव मनवे विश्वदोहसो जनाय विश्वदोहसः ॥ ५ ॥ १८ ॥**

त्वम् । वृथा । नद्यः । इन्द्र । सर्तवे । अच्छ । समुद्रम् । असृजः । रथान्ऽइव । वाजऽयतः । रथान्ऽइव ।
उतः । ऊतीः । अयुञ्जत । समानम् । अर्थम् । अक्षितम् ।
धेनूःऽइव । मनवे । विश्वऽदोहसः । जनाय । विश्वऽदोहसः ॥५॥१८

क्षद्मेव तिग्मं सं श्यत् इत्यत्र । सम्यक् तीक्ष्णीकरोति । ......तत्र दृष्टान्तः क्षद्मेव । उदकमिव । उदकं यथा शत्रूणां निरसनायाभिमन्त्रणादिसंस्कारेण तीक्ष्णी क्रियते तद्वत् । क्षद्मेत्युदकनाम । क्षद्म नभ इति तन्नामसु पाठात् ॥ ......ओजस बलेन पराभिभवनसामर्थ्येन शवोभिः सेनालक्षणैर्बलैर्मज्मना शारीरेण च बलेन संवि व्यानः सम्यक् युक्तः सन् । इत्यादि सायणः ॥

### भाषायाम्.

५. हे इन्द्र, त्वं नद्यः (=नदीः) समुद्रम् अच्छ वृथा सर्तवे (=समुद्रं प्रति सुखेनैव गन्तुं) रथान् इव—वाजयतो रथान् इव (=वाजं धनमात्मन इच्छतः= आजौ धावतो रथान् इव) असृजः (=अन्तरिक्षान्मेघोदकरूपेण पातितवान्) ऊतीः (=ऊतयः=रक्षणकर्त्र्यस्ता नद्य) इतः (=अत्र=भूलोके) समानम् अक्षितम् अ (=सर्वा अपि संगत्य एकं क्षयरहितं मनोरथम्) अयुञ्जत (=योजितवत्यः=अस्मा योजितवत्यः=पूरितवत्यः) । [तदेवम्] । मनवे विश्वदोहसो धेनूरिव (=मनवे विश्व दोग्ध्यो धेन्व इव=मनुष्यजातार्थं सर्वप्रदा) [अभवन्]—जनाय विश्वदोहसः (=सर्वे भ्योपि जनेभ्यः सर्वदात्र्यः) [अभवन्] ॥

असृजः मेघं निर्भिद्योत्पादितवानसि । ...... । किंच । इतोऽस्मत्संनिधिदेशम् ...... अस्मान् प्रत्यूतीरूत्यो गमनवत्यो रक्षणवत्यो वा नद्यः समानमर्थं समा नप्रयोजनवदक्षितमुदकमयुञ्जत । योजितवत्यः । त्वत्प्रसादादिति भावः । अर्थश उदकविशेषणः सन् नपुंसकलिङ्गः । अक्षितमित्युदकनाम । अक्षितं बर्हिरिति तन्न (=पसु पाठात् । इति सायणः ॥
रित)-

५. हे इंद्रा, नद्यांनीं रथांप्रमाणें—शर्यत खेळणाऱ्या रथांप्रमाणें, सहज चालावें, आणि त्यांनीं समुद्राकडे जावें म्हणून तूं त्यांस खालीं सोडिता झालास. इकडे त्या आमच्या मैत्रिणींनीं सगळ्यांनीं एकसारिखा आमचा अक्षय मनोरथ साधिला: त्या मानवांला पाहिजे तें देणाऱ्या कामधेनु [ झाल्या ]—लोकांला पाहिजे तें देणाऱ्या [कामधेनु झाल्या ].

5. Thou, O Indra, didst send forth the rivers that they might easily roll towards the ocean, like chariots— [send forth] like racing chariots. [Those] helpers here accomplished an eternal common object: they [became] like all-milching cows to man—all milching cows for the people.

सायणाचार्यांनीं 'क्षद्म'शब्दाचा अर्थ 'उदक' असा करून निर्वाह केला आहे (भाषेखालीं पहा). पण 'क्षद्' तोडणें, कापणें (ऋ. १. ११६. १६. १. ११७. १८ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा) या धातूपासून 'कापणारी' सुरी अथवा 'खड्ग' असा अर्थ केला पाहिजे असें जे कितीएक पाश्चात्य विद्वान् समजतात, तें बरोबर आहे असें वाटतें. उदक असा अर्थ घेतला तर उपमा जुळत नाहीं, कां कीं वेदाच्या वेळीं पाणी सोडून शाप देणें (सायणभाष्यांतून घेतलेला उतारा भाषेखालीं पहा) हा प्रचार चालू नव्हता असें म्हणण्यास अडचण दिसत नाहीं. पण तसा अर्थ समजला तथापि उपमा नीट लागत नाहींच असें म्हटलें पाहिजे.

'अहीला मारण्यासाठीं'=' अहिहत्याय.' अहि म्हणजे सर्प. वृत्राला सर्प असें वेदांत म्हटलें आहे, कारण तो उदकवर्षाव न करणारा जो ढग, त्याच्या रूपानें सर्पासारिखा आकाशांत पडून राहिलेला असतो, आणि सर्पाप्रमाणें घातकी असतो, आणि एकाएकीं लपून नाहींसा होतो. सू. ३२ मं. १ आणि त्याजवरील टीप पहा.

'प्रतापानें, सामर्थ्यांनीं'=' ओजसा शवोभिः.' ओजस् आणि शवस् हे शब्द समानार्थकच आहेत. अर्थपुष्टीकरणासाठीं एकाच अर्थाचे दोन शब्द योजिले आहेत असें दिसतें. 'झाडाला [ आणि ] वृक्षांला' ('वृक्षं वनिनः') यांविषयीं सुद्धा तसेंच म्हटलें पाहिजे.

'तोडून टाकितोस'=' नि वृश्चसि.' म्हणजे 'तोडून टाकिता झालास.' भूतकाळार्थी वर्तमानकाळ.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'गभस्तिओः' आणि दोनी ठिकाणीं 'सं शिअत्;' दुसऱ्या चरणांत 'संविविआनः' असें वाचावें लागतें.

५. 'इंद्रानें मेघमण्डल फोडून उदकें खालीं भूलोकीं पाडिलीं, तीं शर्यतींत धां-

इमां ते वाचं वसूयन्त आयवो रथं न धीरः स्वपा अतक्षिषुः सु-
म्नाय त्वामतक्षिषुः ।
शुम्भन्तो जेन्यं यथा वाजेषु विप्र वाजिनम् ।
अत्यमिव शवसे सातये धना विश्वा धनानि सातये ॥ ६ ॥

इमाम् । ते । वाचम् । वसुऽयन्तः । आयवः । रथम् । न । धीरः ।
सुऽअपाः । अतक्षिषुः । सुम्नाय । त्वाम् । अतक्षिषुः ।
शुम्भन्तः । जेन्यम् । यथा । वाजेषु । विप्र । वाजिनम् ।
अत्यम्ऽइव । शवसे । सातये । धना । विश्वा । धनानि । सातये ॥६॥

## भाषायाम्.

६. [हे इन्द्र], [एतेऽस्मद्रूपा] वसूयन्तः (=धनमात्मन इच्छन्त) आयवः (=उपासका मनुष्या) इमां ते वाचम् (=एतां तव स्तुतिं) धीरः स्वपाः (=धीमान् सुकर्मा=कुशलः पुरुषो) रथं न (=रथं यथा तक्षति तथा) अतक्षिषुः (=उदपाद-यन्)—त्वां सुम्नाय अतक्षिषुः (=सुखाय त्वां स्तुत्या प्रीणयन्ति)। हे विप्र (=मेधाविन् इन्द्र), वाजेषु वाजिनं (=युद्धेषु बलवन्तं) जेन्यं (=प्रशस्तम्) [अश्वं यथा] शुम्भन्तः (=शोभयन्तस्) [तक्षन्ति]—अत्यं (=शीघ्रगामिनमश्वं) शवसे (=बलाय) धना सातये (=धनानि सनितुं=धनानि लब्धुं च)—विश्वा धनानि सातये (=विश्वानि धनानि सातये=लब्धुम्) इव (=यथा) [तक्षन्ति=उत्साहयन्ति तथा] [त्वाम् अतक्षिषुः=त्वां स्तुत्या अप्रीणयन्]॥

वणाऱ्या रथांप्रमाणें समुद्राकडे मोठ्या वेगानें नदीरूपेंकरून धांवूं लागलीं; आणि ह्या ज्या नद्या, त्याच कोणीएक सर्व मनुष्यांच्या मैत्रिणी झाल्या आहेत, आणि आपल्या दुधासारिख्या मिष्ट उदकाच्या रूपानें सर्व मनुष्यांस जें जें अन्नादि इष्ट असतें तें तें देणाऱ्या होऊन बसल्या आहेत,' असा भावार्थ.

'शर्यत खेळणाऱ्या रथांप्रमाणें '='वाजयतो रथान् इव.' यावरून आपले आर्य पूर्वज केवळ घोड्यांच्याच शर्यती खेळत असत असें नाहीं, परंतु घोड्यांच्या गाड्यांनींहि शर्यती खेळत असत. त्या वेळचे आर्य लोकांत आणि त्यांचे वंशज सांप्रतचे हिंदु यांत किती अंतर पडलें आहे पहा.

'अक्षय मनोरथ '=' अक्षितम् अर्थम्.' म्हणजे सर्वांस उदक मिळावें आणि त्यापासून जे धान्य उत्पन्न होण्याचे लाभ ते प्राप्त व्हावे हा मनोरथ, हें साधन,

६. [हे इंद्रा], हें तुझें स्तोत्र धनाची इच्छा करणाऱ्या [तुझ्या] उपासकांनीं, [एकाद्या ] बुद्धिमान् [ आणि ] कुशळ कारागिरानें रथ [करावा] तसें, रचिलें आहे;—त्वां कल्याण करावें म्हणून तुला उत्तेजन दिलें आहे. हे मेधावी [इंद्रा], युद्धांत अतिप्रबळ अशा एकाद्या उत्तम घोड्याला उत्साह उत्पन्न करावा तसें,—शीघ्रगामी वारूला बळ यावें म्हणून [ आणि ] त्याणें लुटी मिळवाव्या म्हणून—सकळ लुटी मिळवाव्या म्हणून, [ जसा उत्साह आणितात, तसें तुला उत्तेजन दिलें आहे ].

6. [ Thy ] worshippers, desirous of wealth, have fashioned this this hymn as a wise [and] skilled person [ fashions ] a chariot—have propitiated thee for protection, decorating thee, O wise [Indra], like a noble horse strong in battle, a quick horse, for winning spoils— for winning all spoils.

सर्वांस सर्व लाभ व्हावे ही गोष्ट सिद्ध करित्या झाल्या असा भावार्थ.

'पाहिजे तें देणाऱ्या कामधेनु '=' विश्वदोहसः धेनूः.' अक्षरशः अर्थ 'ज्यापासून सर्व वस्तु दोहून काढितां येतात अशा.'

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' तुअं ' आणि ' नदिओ ' असें म्हणावें लागतें.

६. भावार्थः' हे इंद्रा, आम्हीं उपासकांनीं तुझ्या प्रसादापासून प्राप्त होणाऱ्या संपत्तीची इच्छा करून, जसा एकादा कुशळ कारागीर रथ करितो, त्याप्रमाणें हें स्तोत्र रचून तयार केलें आहे. जसा एकादा युद्धांत जय मिळविणारा, आणि चपळ जाणारा उत्तम घोडा असावा, आणि त्याला स्फुरण येण्यासाठीं आणि स्फुरण येऊन त्यानें युद्धांत सर्व लुटी मिळवाव्या म्हणून त्याला सजवून प्रोत्साहित करावा, त्याप्रमाणें आम्ही तुला प्रोत्साहित करीत आहों.'

' उपासकांनीं '=' आयवः '. म्हणजे आम्ही जे उपासक त्यांहीं. या ऋचेंत जी युद्धांतील वारूची उपमा दिली आहे, ती चमत्कारिक आहे. युद्धाविषयीं जसे आपले लोक परायण असत, तसेच घोड्यावर बसणें, घोड्यांचे रथ हाकणें आणि

भिनत्पुरो नवतिमिन्द्र पूरवे दिवोदासाय महि दाशुषे नृतो वज्रेण दाशुषे नृतो ।
अतिथिग्वाय शम्बरं गिरेरुग्रो अवाभरत् ।
महो धनानि दयमान ओजसा विश्वा धनान्योजसा ॥ ७ ॥
भिनत् । पुरः । नवतिम् । इन्द्र । पूरवे । दिवःऽदासाय । महि । दाशुषे । नृतो इति । वज्रेण । दाशुषे । नृतो इति ।
अतिथिऽग्वाय । शम्बरम् । गिरेः । उग्रः । अव । अभरत् ।
महः । धनानि । दयमानः । ओजसा । विश्वा । धनानि । ओजसा ॥७

## भाषायाम्.

७. हे नृतो ( =रणे नर्तनशील ) इन्द्र, [ त्वं ] महि दाशुषे ( =अत्यधिकं हविरादिकं दत्तवते पूरवे दिवोदासाय=दिवोदासनाम्ने मनुष्याय ) नवतिं पुरः (=नवतिसंख्याकानि नगराणि ) भिनत् ( =अभिनत् )—हे नृतो (=रणे नर्तनशील=विजयिन् ), वज्रेण दाशुषे ( =भक्ताय ) [ भिनत्=भिन्नवानसि ] । उग्रः ( =उद्गूर्णबलः प्रबल ) [ इन्द्रः ] शम्बरं [ नामासुरं ] गिरेः ( =पर्वतात् ) अतिथिग्वाय ( =दिवोदासार्थम् ) अव अभरत् ( =अवाभरत्=अवाङ्मुखमवकृष्यमाणं हतवान् ), ओजसा ( =स्वबलेन ) महो धनानि (=महांसि=महान्ति धनानि )—ओजसा ( =स्वबलेन ) विश्वा धनानि ( =सर्वाणि धनानि ) दयमानः ( =ददत्=ददौ च ) ॥

गिरेः अवाभरत् इत्यत्र उग्र उद्गूर्णबल इन्द्रः पूर्वं पुरभेदनसमये विद्रमप्यम्रियमाणं गिरिमारूढं शम्बरमेतन्नामानमसुरं गिरेर्दुर्गमात्पर्वतादेः सकाशात् ओजसा स्वकीयेन बलेनावाभरत् । अवाङ्मुखमवकृष्यमाणं हतवान् । किं कुर्वन् । महो महान्ति धनानि तदीयगवाश्वादीनि दयमानो दिवोदासाय राज्ञे साधयन् । इति सायणः ॥

---

त्याची शर्यत करणें यांतहि तसेच निष्णात असत.

'रचिलें आहे'='अतक्षिषुः.' वेदाचे मंत्रकर्ते जे ऋषि, ते जरी केवळ सूक्तांचे द्रष्टे होते, कर्ते नव्हते, आणि त्यांनीं केलेलीं सूक्तें पौरुष नव्हत, ईश्वरप्रणीत होत असें जरी पुराणादिक ग्रंथ सांगतात आणि त्यांस अनुसरून लोकहि मानितात, तथापि ते ऋषि स्वतः तसें समजत नव्हते. 'आम्हीं हें सूक्त फार श्रम करून देवांस आवडे अशा रीतीनें रचिलें आहे' असें म्हणण्यास ते मागें सरत नव्हते, त्याचीं उदाहरणें जशीं मागें पुष्कळ आलीं आहेत तसेंच

७. हे विजयशाली इन्द्रा, तूं अत्यंत भक्तिमान् दिवोदास [ नांवाचा ] [जो] मनुष्य, [त्या]साठीं नव्वद नगरें फोडून टाकिता झालास—हे विजयशाली [ इन्द्रा ], भक्तिमान् [दिवोदासा]साठीं वज्रानें [ फोडून टाकिता झालास ].—महाबळवान् [ इंद्र ] अतिथिग्वासाठीं शंबराला पर्वतापासून खालीं ओढून काढिता झाला, आणि [अतिथिग्वाला] [ आपल्या ] पराक्रमानें मोठीं धनें—सर्व प्रकारचीं धनें, देता झाला.

7. Thou didst destroy, O victor Indra, the ninety cities for the' sake of the man Divodâsa [who was] highly pious—[didst destroy], O victor, with [thy] thunderbolt for the pious man. Mighty [Indra] hurled S'ambara down from the mountain for the sake of Atithigva, bestowing great riches through [his] prowess—all [kinds of] riches through [his] prowess.

आतांचें हें एक होय.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' स्वपाः' च्या ठिकाणीं ' सुअपाः ' असं म्हणावें; दुसऱ्या चरणात ' जनिअं ' असं म्हणावें.

७. ' हे इंद्रा, तूं अतिथि दिवोदास या नांवाच्या भक्ताला उपद्रव देणारा शंबर नांवाचा असुर मारण्यासाठीं त्याचीं नव्वद नगरें फोडून टाकिता झालास, आणि तो जेव्हां मरेना आणि पर्वतावर जाऊन लपून राहिला, तेव्हां त्याला पर्वतावरून तूं खालीं लोटून दिलास, आणि त्याची सर्व संपत्ति दिवोदासाला दिलीस ' असा भावार्थ.

' विजयशाली '= ' नृतो. ' ' नृतु ' शब्द वेदांत बऱ्याच मंत्रांत आला आहे. तो बहुतकरून इंद्राला विशेषणार्थी लाविलेला आढळतो. केव्हां केव्हां अश्वीनें आणि एकदा मरुतांचें विशेषण आहे. अक्षरशः जे सायणांनीं निरनिराळे अर्थ केले आहेत, त्यांपैकीं युद्धांत आवेशानें नाचणारा असा जो अर्थ केला आहे (प्रस्तुत मंत्रावरचें भाष्य पहा), तोच बरा दिसतो. कसाहि अक्षरार्थ असला तरी वीरश्रीनें भरलेला, 'विजयी' इतका पर्यवसानार्थ दिसतो.

' दिवोदास ' आणि ' शम्बर' आणि 'अतिथिग्व' याविषयीं सू. ११२ मं.१४ आणि त्याजवरील टीप पहा.

' नव्वद नगरें '=' नवतिं पुरः. ' सू. ५४ मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

इन्द्रः सुमत्सु यजमानमार्यं प्रावद्विश्वेषु शतमूतिराजिषु स्वर्मीह्ळ्हे-
ष्वाजिषु ।
मनवे शासदव्रतान्त्वचं कृष्णामरन्धयत् ।
दक्षन्न विश्वं ततृषाणमोषति न्यर्शसानमोषति ॥ ८ ॥

इन्द्रः । समत्ऽसु । यजमानम् । आर्यम् । प्र । आवत् । विश्वेषु । शत-
म्ऽऊतिः । आजिषु । स्वः॑ऽमीह्ळ्हेषु । आजिषु ।
मनवे । शासत् । अव्रतान् । त्वचम् । कृष्णाम् । अरन्धयत् ।
धक्षत् । न । विश्वम् । ततृषाणम् । ओषति । नि । अर्शसानम् ।
ओषति ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. विश्वेषु (=सर्वेषु) शतमूतिः (=शतसंख्याकरक्षण) इन्द्रः आर्यं यजमानम् (=आर्यमुपासकम्=उपासकान् आर्यान्) समत्सु (=युद्धेषु) प्रावत् (=प्रकर्षेणारक्षत=रक्षति)—आजिषु (=संग्रामेषु च) [आर्यं यजमानं प्रावत् प्रकर्षेण रक्षितवान्]—स्वर्मीह्ळ्हेषु (=उत्तमसुखोत्पादकेषु) आजिषु (=संग्रामेषु) [प्रावत्=रक्षितवान्]। अव्रतान् (=कर्मरहितान्=यज्ञयागादीनां द्वेष्टॄन् अनार्यान्) शासत् (=दण्डयन्=दण्डयित्वा) [स] कृष्णां त्वचं (=कृष्णं वर्णं=कृष्णवर्णान् अनार्यान् जनान्) [आर्याय] मनवे अरन्धयत् (=आर्याय जनाय वशमनयत्=आर्यजनस्य वशमनयत्)। विश्वं ततृषाणं (=सर्वमपि हिंसारूपतृषाक्रान्तमनार्यं शत्रुं) धक्षत् न ओषति (=दग्ध्वा भस्मसाच्चकारेव)—अर्शसानं (=हिंसारुचिं=बाधमानमनार्यजनं) नि ओषति (=नितरां दहति=नितरां दग्धवान्=भस्मसाच्चकार)॥

शतमूतिः स्वभक्तेषु अपरिमितरक्षणः। ......स्वर्मीह्ळ्हेषु स्वर्गदेशेषु सुखस्य सेचयत्सु वाजिषु महासंग्रामेषु प्रावत्। स्वर्गप्रदानेन रक्षति। ......अत्रेतिहासमाचक्षते। अंशुमती नाम नदी। तस्यास्तीरे कृष्णनामासुरो वर्णतश्च कृष्णो दशसहस्रैरनुचरैरुपेतस्तद्देशवर्तिनः पीडयन्नास्ते। तत्रेन्द्रो बृहस्पतिना प्रेरितः सन् मरुद्भिः सहितः कृष्णां तदीयत्वचमुत्कृत्य सानुचरमवधीत्। ......तदत्रोच्यते अयमिन्द्रो मनवे। इत्यादि सायणः॥

८. इन्द्र युद्धांमध्यें आर्य उपासकाचें रक्षण करीत असतो— शेकडो प्रकारांनीं रक्षण करणारा [ इंद्र ] सर्व समरांगणांत [ रक्षण करीत असतो], अत्यंत उत्तम सुख उत्पन्न करणाऱ्या समरांगणांत [रक्षण करीत असतो ]. कर्महीन जनाचें शासन करून तो काळ्या कातडी[च्या लोकां]ला [ आर्य ] लोकांच्या अधिकाराखालीं आणिता झाला. सर्व अधासी [शत्रूं]ला भस्म केल्याप्रमाणें जाळून टाकिता झाला—हिंसक शत्रूला जाळून खाक करिता झाला.

8. Indra preserved the Âryan sacrificer in battles--Indra, who protects [his worshippers] in a hundred ways, protects [ the Âryan sacrificer ] in all fights—in fights in which excellent spoil was to be won. Punishing the riteless he subjected the black skin to the [ Âryan ] man. He burned all greedy enemies as if he would burn them to ashes—he burned to ashes the devouring enemy.

या मंत्रांत प्रथम द्वितीय पुरुषीं सांगून मग तृतीय पुरुषी सांगितलें आहे. असा प्रकार वेदांत पुष्कळ ठिकाणीं आढळतो.

वृत्तसुखार्थ शेवटच्या चरणांत ' विश्वा धनानि ओजसा ' असा पाठ म्हणावा लागतो.

८. ' शेकडो प्रकारांनीं आपल्या उपासकांचें संरक्षण करणारा जो इंद्र, त्याणें आर्य लोकांला युद्धांत आणि संग्रामांत रक्षून अनार्य लोकांचीं धनें त्यांस दिलीं, आणि काळ्या वर्णाचे जे अनार्य लोक, त्यांला शिक्षा करून त्यांस आर्य लोकांच्या अमलाखालीं आणिलें. आणि आर्य लोकांच्या नाशाला प्रवृत्त झालेले जे अनार्य जन, त्यांला जाळून भस्म केल्याप्रमाणें त्यांचा नाश केला ' असा या मोठ्या महत्वाच्या ऋचेचा भावार्थ आहे.

' अत्यंत सुख उत्पन्न करणाऱ्या समरांगणांत '=' स्वर्मीह्ळेषु आजिषु.' म्हणजे ज्यांत शेवटीं पुष्कळ धन मिळावयाचें असतें, ज्यांत यश आल्यानें धनदौलत वगैरे पुष्कळ संपत्तीचा लाभ व्हावयाचा, अशा समरांगणांत. ' कर्महीन जन,' ' काळ्या कातडीचे लोक,' ' अधासी शत्रु,' ' हिंसक शत्रु ' (= ' अव्रताः,' ' कृष्णा त्वक्,' ' ततृषाणाः,' ' अर्शसानः' ) हे अनार्य जन होत, कीं जे आर्य लोकांला त्रास देत असत, त्यांला लु-

**सूर॑श्च॒क्रं प्र वृ॑हज्जा॒त ओज॑सा प्रपि॒त्वे वाच॑मरु॒णो मु॑षायतीशा॒न आ मु॑षायति ।**
**उ॒शना॒ यत्प॑रा॒वतोऽज॑गन्नू॒तये॑ कवे ।**
**सु॒म्नानि॒ विश्वा॒ मनु॑षेव तु॒र्वणि॒रहा॒ विश्वे॑व तु॒र्वणिः॑ ॥ ९ ॥**

सूरः॑ । च॒क्रम् । प्र । वृ॒ह॒त् । जा॒तः । ओज॑सा । प्र॒ऽपि॒त्वे । वाच॑म् । अ॒रु॒णः । मु॒षा॒य॒ति॒ । ई॒शा॒नः । आ । मु॒षा॒य॒ति॒ ।
उ॒शना॑ । यत् । प॒रा॒ऽवतः॑ । अज॑गन् । ऊ॒तये॑ । क॒वे॒ ।
सु॒म्नानि॑ । विश्वा॑ । मनु॑षाऽइव । तु॒र्वणिः॑ । अहा॑ । विश्वा॑ऽइव । तु॒र्वणिः॑ ॥ ९ ॥

**भाषायाम्.**

९. [ इन्द्रो ] जातः ( =जातमात्र एव ) ओजसा (=स्वकीयेन शारीरेण बलेन ) सूरश्चक्रं (=सूर्यस्य रथस्य चक्रं ) प्र वृहत् ( =प्रागमयत्=उदगमयत्=उत्क्षिप्तवान् ) [ अपि च ] अरुणः ( =आरक्तवर्णः स ) प्रपित्वे ( =दिनारम्भे ) वाचं मुषायति ( =तस्य चक्रस्य शब्दम् अपाहरत् )—ईशानः ( =प्रभुरिन्द्रश् ) [ चक्रवाचं=चक्रशब्दं ] मुषायति ( =अपाहरत् ) । यत् ( =यस्मात्कारणात् ) [ इन्द्रः ] उशना कवे ( =? उशनः कवेः=उशनः काव्यस्य ) ऊतये ( =रक्षणाय ) परावतः ( =दूरदेशाद्=द्युलक्षणात् ) अजगन् ( =आगच्छत् ) [ तस्मात्कारणात् ] विश्वा मनुषा सुम्नानि तुर्वणिरिव ( =मानुषाणि विश्वानि सुम्नानि=मनुष्यसंबन्धीनि सर्वाणि धनानि जयन्निव )—अहा विश्वा ( =अहानि विश्वानि=सर्वाणि दिनानि=सर्वेष्वपि दिनेषु=नित्यं ) तुर्वणिरिव ( =तानि सुम्नानि जयन्निव ) [ भवतु ] ॥

एषात्यधिकं दुर्बोधा । सायणाचार्यैरपि बहुभिः प्रकारैः कथं कथमपि व्याख्याता । तदेवम् । अत्रापीतिहासमाचक्षते । केचनासुराः पूर्वमिन्द्रवज्रेण वधो मा भूदिति ब्रह्मणो वरं लब्ध्वेन्द्रमगणयित्वोद्धृत्ता आसन् । तान् हन्तुमिन्द्रः सूर्यरथस्य चक्रमादायावधीदिति । तदिदमुच्यते । अयमिन्द्रः सूरः सूर्यस्य ॥ षष्ठ्यर्थे प्रथमा ॥ चक्रं रथस्य चक्रमादायौजसा शारीरेण बलेन जातः समृद्धः सन् प्रवृहत् । प्रक्षिप्तवान् ॥ वृहू उद्यमने । ......किंच । अरुणोऽरुणवर्णोऽत्यन्ततेजोयुक्तः सन् । यद्वा गमनशीलः सन् प्रपित्वे तेषां समीपे तत्समीपमागत्य वाचं वागुपलक्षितं प्राणं मुषायति । मुमोष मुष्णाति वा । प्रपित्व इत्यासन्ननाम ॥ यद्वा वाचं तेषां प्रहारध्वनिं मुषायति । तेषु हतेषु

९. [ इंद्र ] जन्मतांच [ आपल्या ] बळाच्या योगानें सूर्याचें चाक फेकून देता झाला; पहांटेला आरक्त [ इंद्र ] [ चक्राचा ] शब्द काढून घेता झाला—प्रभु [ इंद्र ] अगदी काढून घेता झाला. इंद्र जो उशना कवीच्या साहाय्याकरितां दुरून आला, तो सकळ मानवी सौख्यें जिंकून जणुं [ आम्हांस देओ ]— नित्य नित्य जिंकून जणुं [ देओ ].

9. As soon as born Indra with [his] puissance threw up a wheel of the Sun's [chariot], [and], ruddy [in his appearance], he withdrew the sound at the break of day—the Lord withdrew [the sound]. Inasmuch as he came from a distance to the succour of Us'anâ Kavi, [may he become] as if a conqueror of all human enjoyments [for us]—a conqueror [of human enjoyments] every day.

---

टीत असत, त्यांजबरोबर लढत असत, आणि त्यांच्या उपासनेला व्यत्यय आणीत असत. त्यांला कर्महीन म्हणण्याचें कारण असें कीं, ते देवांप्रीत्यर्थ कांहींच यज्ञयागादिक कर्म करीत नसत; 'काळ्या कातडीचे,' कारण कीं त्यांचा रंग काळा असे; 'अधासी,' कारण ते आर्य जनाची धुळधांडी करीत असत; 'हिंसक शत्रु', कारण कीं ते आर्य जनांला मारीत असत आणि प्रसंगवशात् खातहि असतील. ह्या अनार्यांचे जे सांप्रतचे वंशज भिल्ल, कोळी, खोंड अथवा थोंड, सांथल इत्यादि रानटी लोक, ते अजूनहि काळेच आहेत. आणि 'कर्महीन,' 'अधासी' आणि 'हिंसक'हि आहेत असें म्हटलें असतां चालेल. यावरून असें उघड होतें की, आर्य लोक (म्हणजे आम्हां हिंदु लोकांचे जे पूर्वज ते ) या देशांत प्रथमतः उत्तरेकडून आले तेव्हां अनार्य लोकांपेक्षां पुष्कळ गोरे असावे असें वाटतें.

'[ आर्य ] लोकांच्या अधिकाराखालीं आणिता झाला'=' मनवे अरन्धयत्.' 'मनु' म्हणजे मनुष्य इतकाच जरी अर्थ अक्षरशः आहे, तरी वेदांत मनु म्हणजे आर्य मनुष्य, आर्य जातींतील अथवा लोकांतील मनुष्य, अनार्यांपैकीं नव्हे, अशा अर्थी त्या शब्दाचा प्रयोग येत असतो. उदाहरणार्थ, 'हन्ता दस्योर्मनोर्वृधः पतिर्दिवः'='हे इंद्रा, तूं अनार्यांचा घातक आणि [ आर्य ] लोकांचा वर्धक असा द्युलोकाचा प्रभु होस.' ऋ. ८. ९८. ६.

वृत्तार्थ पहिल्या चरणांत 'आर्य'-च्या ठिकाणीं 'आरिअम्' आणि 'स्वर्मीह्ळेषु'च्या ठिकाणीं 'सुअर्मीह्ळेषु' आणि तिसऱ्यांत 'निअर्शसानमोषति' असें म्हणावें.

९. ही एक ऋचा फार कठिण आहे. वेदकाळीं प्रसिद्ध असलेल्या एक दोन पूर्व कथांला अनुलक्षून या ऋचेचा बहुतकरून सगळा अर्थ लावावयाचा असल्यामुळें, आणि त्या पूर्व कथा जशा आतां तशाच वेदोत्तरकाळां विसरल्या गेल्यामुळें ऋचा दुर्बोध झाली आहे. पहिल्या चरणांत इंद्र उपजतांच त्याणें सूर्याच्या रथाचें एक चाक काढून फेकून दिलें अशी कांहीं कथा असे तिला उद्देशून ऋषि बोलत आहे. दुसऱ्या चरणांत 'उशना काव्य' म्हणून कोण एक उपासक ऋषि होता त्याला साहाय्य करण्याकरितां इंद्र फार दुरून आला अशा एका अतिपुरातन कथेला उद्देशून ऋषीचें वचन आहे. तिसऱ्या चरणाचा संबंध पहिल्या दोन चरणांशीं कसा तरी करून लावावा लागतो, कारण तो स्वतंत्र वाक्य होय असें मानिलें तर त्यांत क्रियापद नाहीं ही अडचण आहे.

आम्हीं वर केलेल्या भाषांतराचा भावार्थ; 'इंद्र जन्मतांच त्याणें सूर्याचें एक चाक वर उडविलें आणि त्याच्या रथाचा ध्वनि नाहींसा केला. या प्रकारें तो सर्वांपेक्षां बळवान आहे. इंद्र उशना काव्य या उपासकाला साहाय्य करण्यासाठीं दुरून आला. त्यापेक्षां तो आमच्या रक्षणार्थ येओ आणि येतांना आम्हांला नित्य सर्व मानवी संपत्ति आणीत जाओ.'

'सूर्याचें चाक फेकून देता झाला'= 'सूरश्चक्रं प्र वृहत्.' सूर्याचें चाक काढिल्याविषयीं दुसऱ्या मंत्रांतहि उल्लेख आलेले आहेत. जसें: 'अध सूर्यस्य मुषायश्चक्रम्'='आणि हे इंद्रा, तूं सूर्याचें एक चाक काढून घेता झालास'(ऋ.६.३१.३); या ठिकाणीं सायण म्हणतात, "एतश "या नांवाच्या ऋषीबरोबर सूर्याचें युद्ध "होत असतां इंद्र एतशाच्या साहाय्याला "आला, आणि त्याणें सूर्याच्या रथाचें एक "चाक काढून टाकिलें; त्या दिवसापासून "सूर्याचा रथ एकचाकी झाला, तो आज"पर्यंत तसाच आहे.म्हणूनच 'सप्त युञ्ज"न्ति रथमेकचक्रम्'असें ऋ. १.१६४.२ यांत म्हटलें आहे." ऋ.५.२९.१० यांत 'प्र अन्यत् चक्रम् अवृहः सूर्यस्य'='हे इंद्रा, तूं सूर्याचें एक चाक काढून टाकिलेंस' असें म्हटलें आहे. ऋ. ४. १६.१२ यांत 'प्र सूरश्चक्रं वृहतात् अभीके'='हे इन्द्रा. तूं सूर्याचें एक चाक समरांगणांत (अथवा हातघाईमध्यें) हिसकावून घेतलेंस' असें आहे. ऋ.४.३०.४ यांत 'चक्रं कुत्साय युध्यते मुषायः इन्द्र सूर्यम्'='हे इंद्रा, कुत्स युद्ध करीत असतां त्याच्या साहाय्यार्थ तूं येऊन सूर्याचें एक चाक काढून घेता झालास' असें आहे.

पण ह्या सर्व मंत्रांमध्यें रथाचा ध्वनि नाहींसा केला असें कोठें सांगितलेलें नाहीं. त्यामुळें आणि 'वाक्' शब्दाचा अर्थ रथाचा ध्वनि असा होईल किंवा नाहीं याविषयीं संशय असल्यामुळें, 'वाचं मुषायति' याचा अर्थ नीट समजत नाहीं.

'उशना कवीच्या.' याच्या स्थळीं

'उशनः कवेः' असा पाठ, 'उशना...कवे' असे जे मुळांत शब्द आहेत त्या स्थळीं, अर्थलाभासाठीं आम्ही घेतों. 'उशना' हा कोण होता याविषयीं सू.५१ मं.१० आणि त्याजवरील टीप पहा. 'उशना काव्य' याला 'उशना कवि' असेंहि म्हणत याविषयीं 'अहं कविरुशना पश्यत या'(ऋ.४. २६.१.) हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'मानवी सौख्यें'—'सुम्नानि मनुषा.' 'मनुषा' याचा प्रयोग 'मानवी' अशा अर्थी विशेषणरूपानें होईल किंवा नाहीं याविषयीं आम्हांला संशय आहे. परंतु सायणांनी तसाहि एक निर्वाह केला आहे तो आम्हीं निरुपायासाठीं स्वीकारिला आहे. 'सौख्यें' (सुम्नानि) हें 'तुर्वणि' या क्रियासदृशपदाचें कर्म. ऋ. ४. २०. १ (तुर्वणिः पृतन्यून्) यावरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'परावतः' आणि 'अजगन्' यांजमध्यें संधि करूं नये.

**स नो नव्येभिर्वृषकर्मन्नुक्थैः पुरां दर्तः पायुभिः पाहि शग्मैः।**
**दिवोदासेभिरिन्द्र स्तवानो वावृधीथा अहोभिरिव द्यौः ॥१०॥१९**

सः । नः । नव्येभिः । वृषऽकर्मन् । उक्थैः । पुराम् । दर्तरिति दर्तः ।
पायुऽभिः । पाहि । शग्मैः ।
दिवःऽदासेभिः । इन्द्र । स्तवानः । ववृधीथाः । अहोभिःऽइव । द्यौः ।
॥ १० ॥ १९ ॥

---

ध्वनिः स्वयमेव विश्रान्तो भवति । अवधीदित्यर्थः । अथवा इन्द्र एव द्युस्थानः सन् आदित्यात्मना स्तूयते । सूरः सूर्यो जात उदितः सन् ओजसा स्वकीयेन तेजसा युक्तश्चक्रं प्रवृहत् । तमोनिवारणार्थमसुरजयाय वा चक्रोपलक्षितं रथं प्रकर्षेणोद्यतं ततः करोति पूर्वम् । अरुणस्तद्रथयन्ता प्रपित्वे मन्देहाद्यसुराणां प्रपित्वे समीपे वाचं तेषां जहि भिन्धीत्यादिध्वनिं मुषायति । मुष्णाति ॥ ......तदनन्तरं सूर्य ईशानः सर्वाणि तमांस्यसुरान्वा निराकर्तुं समर्थः सन् आमुषायति । समन्तान्मुष्णाति । अथ प्रत्यक्षकृतः । हे कवे क्रान्तदर्शिन् यत् यस्त्वमुशना उशनस एतन्नाम्नो महर्षेरूतये रक्षणाय परावतो दूरात्स्वर्गस्थानादजगन् । गतवानसि प्राप्तवानसि । ...... ॥ यद्वा उशना उशनसा युक्तः सन् अजगन् । आगच्छ । आगत्य च विश्वा विश्वानि सुम्नानि सुखसाधनानि धनान्यादायास्माकं तुर्वनिस्तूर्णवनिः क्षिप्रं संभक्ता भवेति शेषः । तुर्वणिस्तूर्णवनिरिति निरुक्तम् । तत्र दृष्टान्तः । मनुषेव मनुष्येणेव । यथा त्वोतेन परिवृढाय देशान्तरादभिमतं धनमानीयते तद्वत् । यद्वा मनुषेव मनुष्याणामिव इतरेषामृत्विजां विश्वा सुम्नानि सर्वाणि धनान्यादाय तुर्वणिर्भवसि । तद्वदस्माकमपि । न केवलमेकस्मिन्नेव यागदिने किन्त्वहा विश्वेव । विश्वान्यप्यहानि । सर्वेष्वप्यहःसु तुर्वणिर्भव । यद्वा तुर्वणिस्त्वमहा विश्वेव विश्वान्यहान्यतिदीर्घमायुष्यं यथा ददासि तथा सुम्नान्यपि । उभयमपि देहीत्यर्थः इति ॥

---

## भाषायाम्.

१०. स [ त्वम् ] ( =अतः कारणात्त्वं ) हे वृषकर्मन् ( =वृष्णः वीर्यवत इव कर्माणि चरितानि यस्य स ), हे पुरां दर्तः ( =असुरसंबन्धिनां नगराणां विदारयितः= पुरंदर ), [ एतैरस्माकं ] नव्येभिः उक्थैः ( =नूतनैः स्तोत्रैः ) [ संतुष्टः सन् ] नः ( =अस्मान् ) शग्मैः पायुभिः ( =सुखकरैः संरक्षणैः ) पाहि ( =पालय ) । हे इन्द्र, दिवोदासेभिः स्तवानः (=दिवोदासैः स्तूयमानः=दिवोदासगोत्रोत्पन्नैरस्माभिः स्तुत-

१०. तर हे पराक्रमकारी [इंद्रा], हे नगरें फोडून टाकणाऱ्या [इंद्रा], [या] नूतन स्तोत्रांनीं [तुष्ट होऊन] सुखकारक रक्षणांनीं आम्हांला रक्ष. हे इंद्रा, दिवोदासाच्या वंशजांनीं स्तविलेला तूं, द्यू जसा दिवसांनीं [समृद्ध होतो] तसा, समृद्ध हो.

10. Do thou, therefore, O performer of brave deeds, O destroyer of [the enemies] towns, protect us with thy blissful helps, [pleased] with [our] new hymns. Praised by the descendants of Divodâsa, be thou joyful as Dyaus with the days.

१०. हा या सूक्ताचा येथें उपसंहार झाला. यांत ऋषि अभीष्ट वर मागतोः— 'हे इंद्रा, या प्रकारेंकरून आम्हीं दिवोदासाच्या वंशजांनीं हीं नूतन स्तोत्रें रचून तुझी प्रार्थना आणि स्तुति केली आहे. तर तूं आपल्या सुखकारक रक्षणोपायांनीं आम्हांला रक्ष. आमच्या स्तोत्रांच्या योगानें तूं, द्यू जसा दिवसाच्या प्रकाशानें प्रसन्नमुख होतो तसा, आम्हांवर प्रसन्न हो.'

'नगरें फोडून टाकणाऱ्या '=' पुरां दर्तः'. म्हणजे शंबरादिक शत्रूंचीं नगरें फोडून टाकणारा—' पुरंदर.' 'पुरां दर्ता' यावरून ' पुरंदर' शब्दाचा अक्षरार्थ स्पष्ट दिसून येतो.

'नूतन स्तोत्रांनीं '='नव्येभिः उक्थैः.' वेदाचीं सूक्तें ज्या ऋषींचीं असतात, त्यांला 'हीं सूक्तें आम्हीं रचिलीं,' 'हीं नवीं आहेत,' 'हीं जुनीं नाहींत,' 'नवीं आहेत, म्हणून हीं तुम्हांला प्रिय होओत' असें म्हणण्यास संकोच वाटत नसे. 'हीं सूक्तें अनादि आणि अनंत काळपर्यंत राहणारीं होत' असें ते म्हणत नसत अथवा जाणवीत नसत.

' द्यू '=' द्यौः '. म्हणजे द्युलोक. प्रकाशानें व्याप्त जी आकाशाची पोकळी, जो निःसीम प्रदेश तो. त्यांत प्रकाश नसला म्हणजे तो लहान आणि महत्त्वहीन आणि रागावलेला जसा काय असा दिसतो; परंतु त्यांत सूर्याचा प्रकाश भरला म्हणजे तो जसा मोठा आणि प्रसन्न दिसतो, तसा इंद्र आपल्या स्तोत्रांनीं व्हावा अशी ऋषींची प्रार्थना.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत ' इन्द्र '-च्या ठिकाणीं ' इन्दर,' आणि चवथ्यांत ' द्यौः'च्या ठिकाणीं ' दीऔः' असें म्हणावें लागतें.

## सूक्तम् १२१.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः। इन्द्रो देवता। अत्यष्टिश्छन्दः॥

**इन्द्राय हि द्यौरसुरो अनम्नतेन्द्राय मही पृथिवी वरीमभिर्द्युम्नसाता वरीमभिः।**
**इन्द्रं विश्वे सजोषसो देवासो दधिरे पुरः।**
**इन्द्राय विश्वा सवनानि मानुषा रातानि सन्तु मानुषा॥ १॥**

इन्द्राय। हि। द्यौः। असुरः। अनम्नत। इन्द्राय। मही। पृथिवी। वरीमऽभिः। द्युम्नऽसाता। वरीमऽभिः।
इन्द्रम्। विश्वे। सऽजोषसः। देवासः। दधिरे। पुरः।
इन्द्राय। विश्वा। सवनानि। मानुषा। रातानि। सन्तु। मानुषा॥१॥

---

स्त्वम्) अहोभिर्द्यौरिव (=दिनप्रकाशैर्द्यौर्यथा प्रवृद्धो भवति=जातप्रसादो भवति तथा), ववृधीथाः (=प्रवृद्धो भव=प्रसन्नो भव)॥

वृषकर्मन् अभिमतवर्षणव्यापारवन्।......नूतनैरुक्थैः इदानीं प्रतिपादितप्रकारैः स्तोत्रैः।......अहोभिरिव द्यौः। द्योतनशील आदित्योहोभिः प्रसिद्धैर्यथा प्रवृद्धो भवति तथास्मत्स्तुत्यात्यन्तं प्रवृद्धो भवेत्यर्थः। इति सायणः॥

---

## भाषायाम्.

१. इन्द्राय हि (=इन्द्रायैव) असुरो द्यौः (=बलवान् द्यौष्पिता) अनम्नत (=अनमत्=प्रह्वोभवत्), इन्द्राय (=इन्द्रायैव) मही (=महती) पृथिवी वरीमभिः (=उरुत्वैः=विस्तीर्णैः प्रदेशैः सह)—द्युम्नसाता (=द्युम्नसातौ=यशःप्राप्ती निमित्ते सति) वरीमभिः (=विस्तीर्णैः प्रदेशैः सह) [अनम्नत=अनमत्]। इन्द्रम् (=इन्द्रमेव) विश्वे देवासः (=सर्वेपि देवाः) सजोषसः (=ऐकमत्यभाजः=संगता भूत्वा) पुरो दधिरे (=स्वपुरतः स्थापयामासुः=स्वनायकं चक्रुः)। [यस्मादेवम् अतः कारणात्] विश्वा मानुषा सवनानि (=विश्वानि मानुषाणि सवनानि=सर्वाणि मनुष्यसंबन्धीनि सोमाभिषवणानि)—मानुषा (=मानुषाणि) [सवनानि] इन्द्राय (=इन्द्रायैव) रातानि सन्तु (=प्रत्तानि सन्तु)॥

वरीमभिरित्यत्र केन साधनेनेति तदुच्यते। वरीमभिर्वरणीयैः स्तोत्रैर्हविर्भिर्वा।......पुरो दधिरे। पुरतः स्थापितवन्तः। इन्द्रमुखेनैवासुरान् जितवन्त इत्यर्थः। इति सायणः॥

## सूक्त १३१.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र (ह्मणजे दिवोदासाच्या कुळांत जन्मलेला) परुच्छेप. देवता—इन्द्र. वृत्त— अत्यष्टि.

१. महाबलवान् द्यू इन्द्रालाच नमन करिता झाला; विस्तीर्ण पृथिवी [आपल्या] अफाट प्रदेशांसहित इन्द्रालाच नमन करिती झाली—यश मिळावें म्हणून अफाट प्रदेशांसहित [इंद्रालाच नमन करिती झाली]. इंद्रालाच सकळ देव मिळून आपला पुढारी करिते झाले. तर इंद्रालाच मनुष्यांचीं सर्व सवनें—मनुष्यांचीं [ सर्व सवनें ] अर्पिलीं जाओत.

## Hymn 131.

To *Indra*. By *Paruchchhepa*, son of *Divodâsa*. Metre—*Atyashti*.

1. To Indra alone did mighty Dyaus bow, to Indra alone bowed great earth with [her] expanses—with [her] expanses to obtain glory. Indra alone did all the gods join in making their leader. To Indra [therefore] let all human honours of the soma—[all] human [honours of the soma] be offered.

---

१. 'द्यू (=द्यौष्पिता=द्युलोक जो तोच कोणी देव, जो सर्व देवांचा बाप) आणि जो बलवान् तोहि स्वतः इंद्रापुढें मात्र नमन करिता झाला; पृथिवी इतकी मोटी आहे आणि कोणापुढें नमन करणारी नव्हे, तथापि तीहि आपल्या अति विस्तीर्ण प्रदेशांसहित इन्द्रापुढें मात्र नमली, दुसऱ्या कोणापुढें नमली नाहीं; सर्व देवांनीं मिळून इंद्रालाच आपला पुढारी केला. तर असा जो इंद्र, त्यालाच सर्व मनुष्यें सोम काढून त्यासहित आपली उपासना अर्पण करोत.'

'द्यू इंद्रालाच नमन करिता झाला' =' इन्द्राय द्यौः अनम्नत.' इंद्राला द्यावापृथिवी अथवा द्युलोक आणि भूलोक हीं दोघेंहि नमन करितात असें पुष्कळ ठिकाणीं वेदांत सांगितलें आहे. उदाहरणार्थः—'द्यावा चिदस्मै पृथिवी नमेते......वज्रहस्तः स जनास इन्द्रः'= 'दुसऱ्याला नमन न करितां ज्या एकालाच द्यावापृथिवी नमन करितात, आणि ज्याच्या हातीं वज्र आहे तो, हे जन हो, इंद्र आहे.' ऋ. २. १२. १३. शिवाय ऋ. १०. ८२. १ हाहि मंत्र पहा. शि-

विश्वेषु हि त्वा सवनेषु तुञ्जते समानमेकं वृषमण्यवः पृथक् स्वः सनिष्यवः पृथक् ।
तं त्वा नावं न पर्षणिं शूषस्य धुरि धीमहि ।
इन्द्रं न यज्ञैश्चितयन्त आयवः स्तोमेभिरिन्द्रमायवः ॥ २ ॥

विश्वेषु । हि । त्वा । सवनेषु । तुञ्जते । समानम् । एकम् । वृषऽमन्यवः । पृथक् । स्वरिति स्वः । सनिष्यवः । पृथक् ।
तम् । त्वा । नावम् । न । पर्षणिम् । शूषस्य । धुरि । धीमहि ।
इन्द्रम् । न । यज्ञैः । चितयन्तः । आयवः । स्तोमेभिः । इन्द्रम् । आयवः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. विश्वेषु हि सवनेषु (=सर्वेष्वपि सोमयुक्तेषु यज्ञेषु) वृषमन्यवः (?=वीर्यवत्त्वत्परमनना उपासकाः) समानम् एकं त्वा (=सर्वेष्वपि स्थलेषु एकस्वरूपमेकमद्वितीयं त्वाम्=एकस्वरूपं त्वामेव) पृथक् (=स्वस्वस्थलेषु) तुञ्जते (=सोमदानेन संभजन्ते)—स्वः सनिष्यवः (=सुखं लब्धुमिच्छन्त उपासकाः) पृथक् (=स्वस्वस्थलेषु) [तुञ्जते=सोमदानेन संभजन्ते] । तं त्वा (=तादृशं त्वाम्=अतः कारणात्त्वामेव हे इन्द्र), पर्षणिं नावं न (=पारं प्रति नेत्रीं नावमिव) शूषस्य धुरि (=स्तोत्रस्याग्रभागे) धीमहि (=निदध्मः=स्थापयामः) । यज्ञैः (=यजनैर्) इन्द्रं न चितयन्तः (=इन्द्रमिव ज्ञापयन्तः=अयमेवेन्द्रोस्ति न कोप्यन्य इति कीर्तयन्त) आयवः (=उपासकाः)—स्तोमेभिः (=स्तोत्रैः) इन्द्रं [चितयन्तः] (=अयमेवेन्द्रोस्तीति कीर्तयन्त) आयवः (=उपासका) [वयं] [त्वां शूषस्य धुरि धीमहि=स्तोत्रस्याग्रभागे स्थापयामः) ॥

सवनेषु तद्वत्स्वेकाहीनसत्ररूपेषु सर्वेषु सोमयागेषु यजमानास्तुञ्जते । त्वरयन्ति । हविरादीनि ददते । ... वृषमण्यवः । अभिमतवर्षणाय त्वामेव मन्यमानाः । ... शूषस्य बलस्य सेनारूपस्य धुरि वहने तज्जयाय धीमहि । स्थापयामः । यद्वा शूषस्यास्मदीयशारीरबलस्य धुरि धीमहि । ... इन्द्रं न चितयन्तः । परमेश्वरमिव त्वां चेतयन्तः । परमेश्वरबुद्ध्या भावयन्त इत्यर्थः । यद्वा नशब्द एवकारार्थः । इन्द्रमेव त्वां जानन्तः । इति सायणः ॥

२. [हे इंद्रा], सकळ सवनांमध्यें तुजविषयीं अत्यंत उत्सुक असे [अनेक]उपासक वेगवेगळ्या ठिकाणीं तुला एकटयालाच भजतात— सुख प्राप्त करून घेऊं इच्छिणारे उपासक वेगवेगळ्या ठिकाणीं [तुलाच भजतात]. म्हणून पैल तीराप्रत नेणाऱ्या नावेप्रमाणें तुलाच [ आम्ही ] [आपल्या] स्तोत्राच्या अग्रभागीं ठेवितों. [तूंच] इन्द्र अशी कीर्ति यज्ञाच्या योगानें पसरणारे [ आम्ही ]. उपासक—स्तोत्रांच्या योगानें [तूंच] इन्द्र [ अशी कीर्ति पसरणारे आम्ही] उपासक, [ तुलाच स्तुतीच्या अग्रभागीं ठेवितों].

2. In all soma-festivities [ different ] [worshippers], fixing their minds on thee, the hero, honour with soma-libations thee alone—thy common self alone—separately— worshippers, desirous of happiness, [honour thy one common self] separately. We therefore place thee at the head of [ our ] song like a ship that carries [people] across ; [we] worshippers proclaiming [thee] as Indra with [ our ] sacrifices—[we] worshippers [proclaiming] [ thee as ] Indra with [ our ] hymns.

---

वाय सू. ५७ मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा.

'यश मिळावें म्हणून'=' द्युम्नसाता.' अक्षरशः यशाच्या प्राप्तीविषयीं. इंद्राशीं स्पर्धा केली तर आपल्याला यश मिळणार नाहीं, जर आपण त्याला नमन केलें तर आपणास यश येईल, आपणाला कीर्ति मिळेल अशा समजुतीनें, इतका भावार्थ आहे.

'सवनें '='सवनानि.' म्हणजे ज्यांत सोमरस काढिला जातो आणि त्यासहित हविरन्न अर्पिलें जातें अशा उपासना.

वृत्तासाठी पहिल्या चरणांत 'अनमन्त इन्द्राय' यांजमध्यें संधि न करणें अवश्य आहे.

---

२. भावार्थः 'हे इन्द्रा, तुझे उपासक जरी अनेक आहेत, तरी तूं एकच आहेस, आणि सर्व ठिकाणीं तूं एकच रूपानें आणि एकलाच असतोस. तुला तुजवर तत्पर असे उपासक प्रत्येक सोमपानाच्या वेळीं सोम अर्पण करून भजतात. सुखाची इच्छा करणारे जन तुलाच भजतात. म्हणूनच आम्हीहि, पैलतीरीं नेऊन पोंहचविणाऱ्या नौकेप्रमाणें, तुलाच उपास्य देवांच्या अग्रभागीं ठेवून

वि त्वा ततस्रे मिथुना अवस्यवो व्रजस्य साता गव्यस्य निःसृजः
सक्षन्त इन्द्र निःसृजः ।
यद्गव्यन्ता द्वा जना स्व१र्यन्ता समूहसि ।
आविष्करिक्रद्वृषणं सचाभुवं वज्रमिन्द्र सचाभुवम् ॥ ३ ॥
वि । त्वा । ततस्रे । मिथुनाः । अवस्यवः । व्रजस्य । साता । गव्यस्य । निःऽसृजः । सक्षन्तः । इन्द्र । निःऽसृजः ।
यत् । गव्यन्ता । द्वा । जना । स्वः । यन्ता । सम्ऽऊहसि ।
आविः । करिक्रत् । वृषणम् । सचाऽभुवम् । वज्रम् । इन्द्र । सचाऽभुवम् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. अवस्यवः (=रक्षणमिच्छन्तो) मिथुनाः (=मिथुनानि) गव्यस्य व्रजस्य (=गवां संबन्धिनः समूहस्य) साता (=सातौ लब्धौ निमित्ते सति) निःसृजः (=निःशेषेण हविरादीनि प्रयच्छन्तस्) त्वा (=त्वां) वि ततस्रे (=स्तोत्रैर्बाधन्ते=अत्यन्तमेव स्तोत्रैर्भजन्ते)—हे इन्द्र, सक्षन्तः (=संभजमानाः सन्तो) निःसृजः (=निःशेषेण हविरादीनि प्रयच्छन्तो) [वि ततस्रे=स्तोत्रैरत्यन्तं सेवन्ते] । यद् (=यस्मात् कारणात्) [त्वं] गव्यन्ता (=गव्यन्तौ=गा आत्मन इच्छन्तौ=गवोपलक्षितं धनमिच्छन्तौ) [अपि च] स्वः (=स्वर्गं) यान्ता (=यान्तौ=यातुमुद्यतौ) द्वा जना (=द्वौ जनौ =जायापतिरूपौ) समूहसि (=संयुक्तौ वहसि=संगतौ रक्षसि) । वृषणं (=वर्षणवन्तं=बलोपेतं) सचाभुवं (=तव सहायम्) आविष्करिक्रत् (=पुनःपुनरपि प्रकटयन्)—हे इन्द्र, सचाभुवं (=सहायभूतं) [तव] वज्रम् [आविष्करिक्रत्=पुनःपुनरपि प्रकटयन्] [समूहसि=संगतौ रक्षसि] ॥

अवस्यवः । इन्द्रायात्मने तृप्तिमिच्छन्तः । ... समूहसि । संयुक्तयोरेवाभिमतं स्वर्गादिकं प्रापयसि । इति सायणः ॥

तुझें स्तवन प्रथम करितों. आणि यज्ञांच्या आणि स्तोत्रांच्या योगानें तुझी कीर्ति पसरून तूंच इंद्र आहेस, दुसरा कोणी नाहीं असें प्रसिद्ध करितों.'

'सवनांमध्यें'=' सवनेषु.' म्हणजे ज्यांत सोम काढून अर्पण करावयाचा असे जे यज्ञोत्सव त्यांमध्यें.

'तुज वीराविषयीं अत्यंत उत्सुक'= 'वृषमन्यवः'. हा शब्द कठिण आहे. पण दुसऱ्या ठिकाणीं आलेला नाहीं.

३. [ हे इंद्रा ], रक्षणाची इच्छा करणारीं [ उपासकांचीं ] जोडपीं सोमाच्या मोठमोठ्या आहुति देऊन गाईंचा गोठा प्राप्त व्हावा म्हणून तुला भजतात—हे इंद्रा, आहुति देऊन [आणि] तत्पर [होऊन भजतात]. कारण कीं गाईंची इच्छा करणाऱ्या [ आणि ] स्वर्गी जाणाऱ्या दोघां जनांला तूं एकत्र राखितोस; [आणि] बळवान् [आणि] तुला साहाय्य करणारें [ वज्र ] तूं प्रगट करीत असतोस—हे इन्द्रा, तुला साहाय्य करणारें वज्र [ प्रगट करीत असतोस ].

3. Married couples, desirous of [thy] protection, to obtain herds of cows, importune thee with prayers, throwing plentiful libations,—devoted [ and ], O Indra, throwing plentiful libations; because thou joinest together two persons desirous of bovine wealth [and] seeking to go to heaven: thou, manifesting [thy] powerful ally,—[ thy ] ally, O Indra, the thunderbolt.

---

'सुख'='स्वः'. ऋ. ७. ९०. ६ आणि सायणभाष्य पहा. '

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'सुअः' असें 'स्वः'च्या स्थळीं म्हणावें. म्हणजे मग सर्व ऋचा याच वृत्तांत लिहिलेल्या एखाद्या आधुनिक श्लोकाप्रमाणें म्हणता येते.

---

३. 'हे इंद्रा, गाईची आणि तशीच जी दुसरी संपत्ति तिची इच्छा करून पुष्कळ स्त्रीपुरुषांचीं जोडपीं तुला सोमाच्या पुष्कळ आहुति देऊन एक मनानें तुला भजतात; कारण कीं गाईची वगैरे जी संपत्ति, तिची इच्छा करणारीं आणि स्वर्गास जाण्यांला प्रवृत्त झालेलीं जीं स्त्रीपुरुषें, त्यांला तूं आपल्या वज्राच्या साहाय्यानें—अतिबळवान् वज्राच्या साहाय्यानें—एकत्र राखितोस.'

'रक्षणाची इच्छा करणारीं'='अवस्यवः'. अथवा, 'इन्द्र तृप्त किंवा प्रसन्न व्हावा अशी इच्छा करून' असाहि अर्थ होऊं शकेल, आणि सायणांनीं या स्थळीं तोच अर्थ केला आहे.

'भजतात'='वि ततस्रे.' 'तंस्' धातूचा अर्थ 'त्रास, दुःख देणें,' 'नाश करणें' असा आहे. त्यावरून फार स्तोत्रें करून त्रास देतात असा अर्थ करावा असा कितीएक पाश्चिम विद्वानां-

**विदुष्टे अस्य वीर्यस्य पूरवः पुरो यदिन्द्र शारदीरवातिरः सासहानो अवातिरः ।**
**शासस्तमिन्द्र मर्त्यमयज्युं शवसस्पते ।**
**महीममुष्णाः पृथिवीमिमा अपो मन्दसान इमा अपः ॥ ४ ॥**

विदुः । ते । अस्य । वीर्यस्य । पूरवः । पुरः । यत् । इन्द्र । शारदीः । अवऽअतिरः । ससहानः । अवऽअतिरः ।
शासः । तम् । इन्द्र । मर्त्यम् । अयज्युम् । शवसः । पते ।
महीम् । अमुष्णाः । पृथिवीम् । इमाः । अपः । मन्दसानः । इमाः । अपः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. हे इन्द्र, [ त्वं ] शारदीः पुरः ( =शरत्संबन्धिनीः पुरीः=शरदि भवानि मेघरूपाणि वृत्रस्य शत्रोः पुराणि ) अवातिरः ( =अनाशयः )—सासहानः (=अतिशयेन अभिभविता सन् ) अवातिरः (=अनाशयः ) [ इति ] यत् अस्य (=तस्य ) ते (=तव ) वीर्यस्य ( =शौर्योपेतस्य चरितस्य ) पूरवः ( =मनुष्या ) विदुः ( =जानन्ति=तत्तव कर्म जानन्ति ) । हे इन्द्र, हे शवसस्पते (=बलस्य स्वामिन् ), तम् अयज्युं (=तम् अयष्टारं ) मर्त्यं (=मरणधर्माणं ) [ ? वृत्रं ] शासः ( =निगृहीतवानसि ) । [ त्वं ] महीं (=महतीं पृथिवीं ) [तथा] इमा अपः (=इमानि मेघोदकानि ) अमुष्णाः ( =तस्मात् अपहृतवानसि )—मन्दसानः (=हर्षयुक्तः सन् ) इमा अपः (=इमानि मेघोदकानि ) [ अपहृतवानसि ] [ इति यत् तव कर्म तत् पूरवो विदुः]॥
तं मर्त्यं मरणधर्माणमयज्युमयष्टारं यज्ञविघातिनं राक्षसादि । ...... इमा अपश्च समुद्रनद्यात्मकान्युदकानि चामुष्णाः । बलादपहृतवानसि । असुरैरन्यैर्वा यज्ञविघ्नेषिभिराक्रान्तां भूमिं तत्संबन्धिनीरपश्च तेषां पुराणि भित्त्वापहृतवानसीत्यर्थः । इति सायणः ॥

---

चा अभिप्राय आहे, तो सायणांनी केलेल्या पर्यवसानीं अर्थाला अनुसरूनच आहे.

'गाईची इच्छा करणाऱ्या'='गव्यन्ता.' हा अर्थ अक्षरशः आहे. गाई वगैरे संपत्तीची इच्छा करणारे असा भावार्थ आहे असें वाटतें.

'स्वर्गी जाणाऱ्या'='स्वर्यन्ता.' म्हणजे

४. हे इंद्रा, तूं शरदाचीं नगरें भंगिलींस—मोठा जय मिळवून भंगिलींस, हा जो तुझा पराक्रम, तो मनुष्यें जाणतात; हे बळाच्या प्रभो, तूं त्या यज्ञहीन मर्त्याला शासिता झालास; तूं ही विस्तीर्ण पृथिवी [ आणि ] हीं उदकें काढून घेता झालास—हर्षयुक्त होऊन हीं उदकें [ काढून घेता झालास ].

4. That exploit of thine all men have known, that thou didst destroy, O Indra, the autumnal fortresses: thou didst punish, O Lord of might, that unsacrificing mortal; thou didst snatch away the vast Earth [and] these waters—[thou that wast] exhilarated [ didst snatch away ] these waters.

स्वर्गास जाण्याविषयीं उद्योग करणारीं जीं स्त्रीपुरुषें तीं. स्वर्गाविषयीं अथवा स्वर्गीं जाण्याच्या इच्छेविषयीं यापूर्वी ऋग्वेदांत कोठें सांगितलेलें नाहीं, याच ठिकाणीं प्रथम उच्चार आलेला आहे. या संबंधानें ही ऋचा महत्त्वाची आहे.

'एकत्र राखितोस'=' समूहसि.' म्हणजे त्यांचा वियोग एकमेकाला होऊं देत नाहीस, पृथिवीवर गुरें ढोरें इत्यादिक धनाचा आणि मेल्यानंतर स्वर्गसुखाचा लाभ एकत्र करून देतोस असा अभिप्राय दिसतो.

वृत्तसुखासाठीं पहिल्या चरणांत 'गविअस्य' असें, आणि दुसऱ्यांत 'दुआ' असें 'द्वा'बद्दल आणि 'स्वर्यन्ता'बद्दल 'सुअर्यन्ता' असें म्हणावें.

४. 'हे इंद्रा, तूं वृत्राचीं नगरें फोडून त्याला जिंकिलेंस, आणि त्याजपासून ही विस्तीर्ण पृथिवी आणि हीं मेघोदकें हिरावून घेतलींस, हा जो तुझा मोठा पराक्रम, तो सर्व मनुष्यांस ठाऊक आहे' असा भावार्थ.

'शरदाचीं नगरें'=' पुरः शारदीः'. म्हणजे शरदृतूंतील जे ढग पाण्याचा अवरोध करितात आणि आकाशांत असतात, तींच कोणीएक नगरें अथवा किल्ले; ते इंद्रानें फोडिले असें तात्पर्य. अथवा 'दर वर्षास बांधलीं जाणारीं जीं मेघरूप नगरें तीं' असा अर्थ करावा. निर्वचन कसेंहि घेतलें तरी 'शारदीः पुरः' म्हणजे मेघरूप जीं नगरें तीं इतकें खरें.

'बळाच्या प्रभो'=' शवसः पते.' म्हणजे ज्याच्या आज्ञेखालीं सकळ सामर्थ्यें असतें तो. 'शवसः पति' हें जसें इंद्राला लाविलेलें आढळतें, तसेंच अग्नीला आणि सोमदेवाला लाविलेलें आढळतें.

आदित्ते अस्य वीर्यस्य चर्किरन्मदेषु वृषन्नुशिजो यदाविथ सखीयतो यदाविथ ।
चकर्थ कारमेभ्यः पृतनासु प्रवन्तवे ।
ते अन्यामन्यां नद्यं सनिष्णत श्रवस्यन्तः सनिष्णत ॥ ५ ॥

आत् । इत् । ते । अस्य । वीर्यस्य । चर्किरन् । मदेषु । वृषन् । उशिजः । यत् । आविथ । सखिऽयतः । यत् । आविथ ।
चकर्थ । कारम् । एभ्यः । पृतनासु । प्रऽवन्तवे ।
ते । अन्याम्ऽअन्याम् । नद्यम् । सनिष्णत । श्रवस्यन्तः । सनिष्णत ॥५

## भाषायाम्.

५. हे वृषन् (=सेचनसमर्थ=वीर) [इन्द्र], यत् (=यतो हेतोस्) [त्वं] मदेषु (=सोमजनितेषु हर्षेषु सत्सु) उशिजः (=त्वां कामयमानान् उपासकान्) आविथ (=रक्षसि)—यत् (=यतो हेतोः) सखीयतः (=त्वां सखायमात्मन इच्छत उपासकान्) आविथ (=रक्षसि) आद् इत् (=अतो हेतोरेव) ते (=तव) अस्य वीर्यस्य (=तद्रक्षणरूपस्य वीरकर्मणश्) चर्किरन् (=स्तुतिं कुर्वन्ति)। [त्वं] पृतनासु (=संग्रामेषु) एभ्यः प्रवन्तवे कारं चकर्थ (=तेभ्य उपासकेभ्यो जेतुं सिंहनादं करोषि=ते यथा विजयिनो भवन्ति तथा तेषां पक्षे सिंहनादं करोषि)। [तदनन्तरं] ते [भक्ता] अन्यामन्यां नद्यम् (=एकैकां नदीम्=एकैकक्रमेण सर्वा अपि नदीः) सनिष्णत (=संभजन्ते=शत्रुसकाशाल्लभन्ते)—श्रवस्यन्तः (=शत्रोर्धनं संग्रामजयेन लब्धुमिच्छन्त) [उपासका] [अन्यामन्यां नद्यं=क्रमेण सर्वा नदीः] सनिष्णत (=शत्रुसकाशाल्लभन्ते) ॥

नद्यं नदिं (?) संतोषम्...इति सायणः ॥

'यज्ञहीन मर्त्याला'=' मर्त्यम् अयज्युम्.' म्हणजे येथें वृत्ररूप असुर घेतला पाहिजे असें आम्हांस वाटतें. आणि वृत्राकडे न घेतलें तर 'मर्त्यम् अयज्युम्' म्हणजे इंद्राग्नीत्यर्थं यज्ञयागादिक आराधना न करणारे जे अनार्य जन ते असा अर्थ घ्यावा; आणि त्याच्यापासून ही पृथिवी आणि हीं उदकें हिसकावून घेतलीं याचा अर्थ, हा देश आणि या देशांतील या नद्या वगैरे त्या अनार्य जनांपासून हिसकावून घेऊन आमचे पूर्वज जे आर्य लोक, त्यांस दिलीं.

'हर्षयुक्त'=' मन्दसानः'. म्हणजे सोमपानानें आनंदित होऊन, आर्य उ-

५. हे वीर्यवान् [इन्द्रा], तुला [सोमपानापासून] हर्ष झाला म्हणजे तूं त्वत्परायण भक्तांला रक्षितोस—[तुझ्या] मित्रत्वाची इच्छा करणाऱ्या [ उपासकां]ला तूं रक्षितोस, म्हणूनच त्या तुझ्या पराक्रमाची [ ते भक्तजन ] स्तुति करितात. तूं त्यांला संग्रामांमध्यें जय येण्यासाठीं सिंहनाद करितोस. [नंतर ] ते एकीमागून एक नदीप्रत पावतात—लूट मिळावी अशी इच्छा करणारे जे भक्त, ते [एकीमागून एक नदीप्रत] पावतात.

5. As thou dost protect, O brave [ Indra ], [ thy ] loving worshippers, whenever exhilarated by the Soma—as thou dost protect [ thy worshippers ] who seek thy friendship, so indeed do they praise that exploit of thine: thou raisest a war-cry for them that they may conquer; they [then] obtain one river after another—they, desirous of the enemy's wealth, obtain [ one river after another ].

---

पासक जे त्यांणीं अर्पण केलेला सोम पिऊन आनंदित होऊन.

वृत्रासाठीं ' वीरिअस्य ' असें पहिल्या पादांत, आणि ' मांतिअम् ' असें दुसऱ्यांत म्हणावें लागतें.

---

५. ' हे इंद्रा, तुजवर प्रीति करणारे आणि तूं मित्र व्हावास अशी इच्छा करणारे जे तुझे भक्त, त्यांला तूं सोमरसाच्या भरांत रक्षितोस, आणि समरांगणांत त्यांजला जय यावा म्हणून त्यांच्या पक्षानें सिंहनाद करितोस, आणि मग ते विजयी होतात आणि शत्रूची भूमि आणि शत्रूच्या नद्या एकामागून एक हिसकावून घेतात, म्हणूनच तुझा हा जो पराक्रम, त्याची स्तुति भक्तजन करितात,' असा भावार्थ.

' हर्ष '=' मदेषु.' अनेकवचनाचें तात्पर्य इतकेंच कीं जेव्हां जेव्हां हर्ष होत असतो तेव्हां तेव्हां, त्या त्या प्रसंगीं.

' त्या तुझ्या पराक्रमाची '=' ते अस्य वीर्यस्य.' म्हणजे तूं रक्षितोस, आणि तुझ्या रक्षणाच्या योगानें शत्रूच्या अधिकारांतील प्रदेश आणि नद्या तुझ्या भक्तांच्या हातीं येतात, हा जो तुझा पराक्रम आणि प्रसाद, त्याची असें समजावयाचें.

' स्तुति करितात '=' चर्किरन्.' सायणाचार्य अर्थ निराळा करितात. पण ऋ. ४. ३९. ६ आणि ४. ३९. २ आणि ४. ३६. १ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. त्यावरून आमचा अर्थ सप्रमाण आहे असें होईल.

**उतो नो अस्या उषसो जुषेत ह्यर्कस्य बोधि हविषो हवीमभिः स्वर्षाता हवीमभिः ।**
**यदिन्द्र हन्तवे मृधो वृषा वज्रिन् चिकेतसि ।**
**आ मे अस्य वेधसो नवीयसो मन्म श्रुधि नवीयसः ॥ ६ ॥**

उतो इति । नः । अस्याः । उषसः । जुषेत । हि । अर्कस्य । बोधि । हविषः । हवीमऽभिः । स्वः॒ऽसाता । हवीमऽभिः ।
यत् । इन्द्र । हन्तवे । मृधः । वृषा । वज्रिन् । चिकेतसि ।
आ । मे । अस्य । वेधसः । नवीयसः । मन्म । श्रुधि । नवीयसः ॥६

## भाषायाम्.

६. अस्या उषसः ( =अस्याम् उषसि=अस्मिन्नुषःकाले ) नः (=अस्माकम्=अस्माकं यज्ञम् ) [ इन्द्र] उतो जुषेत हि (=अपि नाम सेवेतैव)— [ हे इन्द्र], हवीमभिः (=आह्वानैः=अस्माकमाह्वानद्वारा ) अर्कस्य हविषः (=स्तोत्रस्य हविषश्च) बोधि (=बुध्यस्व=इदं स्तोत्रं हविश्च जानीहि )—स्वर्षाता ( =स्वःसातौ=धनस्य लाभे निमित्ते सति क्रतौ ) हवीमभिः (=आह्वानैः) [ अर्कस्य हविषः=बोधि=स्तोत्रस्य हविषश्च जानीहि ] । हे वज्रिन् ( =वज्रधर ) इन्द्र, यत् (=यतः कारणात् ) [ त्वं ] मृधो हन्तवे (=शत्रून् हन्तुं=शत्रुहननाय) वृषा चिकेतसि (=वीरोवबुध्यसे=वीर्यवत्तमोसीति ज्ञायसे ) [ अतः कारणात् ] अस्य मे नवीयसो वेधसः ( =अस्य मम अत्यन्तनूतनस्य कवेः )—नवीयसः ( =अत्यन्तनूतनस्य कवेः ) मन्म ( =स्तोत्रम् ) आ श्रुधि (=आभिमुख्येन शृणु=आगत्य शृणु ) ॥

अयमिन्द्रो नोस्माकं संबन्धिनीमस्या उषसः । कर्मणि षष्ठी । एतामुषसं सुत्याहः-(?) संबन्धिनमुषःकालमुतो जुषेत । अपि नाम सेवेत । उषस्येवास्माकमयमिन्द्रो यज्ञं गच्छेदित्यर्थः । इति सायणाचार्याः ॥

: 'एकामागून एक नदीमत पावतात' =' अन्यामन्यां नद्यं सनिष्णत.' म्हणजे अमूच्या ताब्यांत असलेल्या ज्या नद्या, त्या इंद्रभक्तांच्या अधिकाराखालीं एक एक येऊं लागतात असा अभिप्राय आम्ही समजतों. कारण सर्व ऋचेचा जो श्लोक, त्याला तसला अभिप्राय चांगला जुळतो.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'वीरिअस', दुसऱ्यांत 'एभिअः', आणि तिसऱ्यांत 'नदिअं' असें म्हणावें लागतें.

६. [इंद्र] आज प्रभातकाळीं आमच्या यज्ञाचें सेवन करो. [ हे इंद्रा ], [ आम्ही ज्या ] हाका [ मारितों ] त्यांच्या योगेंकरून [आमचें] स्तोत्र [आणि] हवि हीं जाण—धनलाभासाठीं [ ज्या ] [आमच्या ] हाका, त्यांच्या योगें-करून [ आमचें स्तोत्र आणि हवि ] [ जाण ]. हे इंद्रा, हे व-ज्रधरा, ज्यापेक्षां शत्रूंला मारण्या-साठीं तूं वीर्यवान् आहेस असें लोक जाणतात, [ त्यापेक्षां ] अ-गदी नूतन कवि हा जो मी, त्या माझें स्तोत्र—मज अगदी नूतन कवीचें स्तोत्र तूं ऐक.

6. May [ Indra ] enjoy our [sacrifice] this morning.—Do thou, [O Indra], know our hymn [and our] sacrifice through [our] invocations—[our] invocations for the acquisition of wealth. Inasmuch as, O Indra, O wielder of the thunderbolt, thou art known [to be] the hero for destroying the enemies, [hear thou], therefore, [this] hymn of me, the newest poet—hear the hymn [of me] the newest [ poet ].

६. 'हे इंद्रा, तूं आज प्रभातकाळीं येऊन आमच्या यज्ञाचा उपभोग घे. आम्ही ज्या तुला धनलाभासाठीं हाका मारीत आहों, त्या ऐकून तूं ये आणि हें आमचें स्तोत्र आणि हवि घ्ह्या. हे इंद्रा, ज्यापेक्षां तूं वीर आहेस तो हिंसक शत्रूं-चा नाश करण्यासाठीं आहेस असें लोक जाणतात, त्यापेक्षां मी जो हा अगदी न-वीन कवि आहें, त्या माझें स्तोत्र तूं ऐक' असा अभिप्राय आहे.

या ऋचेंत प्रथम तृतीयपुरुषी निर्देश असून मग द्वितीयपुरुषीं वचन फिरलें आहे. पण याचीं उदाहरणें वेदांत जिक-डे तिकडे आहेतच.

'अगदी नूतन कवि जो मी, त्या माझें स्तोत्र'=' मे अस्य नवीयसः मेधसः मन्म.' परुच्छेप ऋषि आपणास अगदी नवीन कवि मानितो, आणि नूतन क-वीचें नूतन स्तोत्र इंद्रास मान्य होईल असें इच्छितो. कारण नवीन स्तोत्रांवर देवांची भक्ति विशेष असते.

वृत्तासाठीं 'हि' आणि 'अर्कस्य' यांजमध्यें संधि न करणें, 'स्वर्षाता'ब-द्दल 'सुअर्षाता' वाचणें, आणि तिस-न्या चरणांत 'अस्य'च्या ठिकाणीं 'अ-सिअ' असें वाचणें इतकें अवश्य आहे.

त्वं तामिन्द्र वावृधानो अस्मयुरमित्रयन्तं तुविजात मर्त्यं वज्रेण शूर मर्त्यम् ।
जहि यो नो अघायति शृणुष्व सुश्रवस्तमः ।
रिष्टं न यामन्नप भूतु दुर्मतिर्विश्वाप भूतु दुर्मतिः ॥ ७ ॥ २० ॥

त्वम् । तम् । इन्द्र । ववृधानः । अस्मऽयुः । अमित्रऽयन्तम् । तुविऽजात । मर्त्यम् । वज्रेण । शूर । मर्त्यम् ।
जहि । यः । नः । अघऽयति । शृणुष्व । सुश्रवःऽतमः ।
रिष्टम् । न । यामन् । अप । भूतु । दुःऽमतिः । विश्वा । अप । भूतु । दुःऽमतिः ॥ ७ ॥ २० ॥

## भाषायाम्.

७. हे इन्द्र, हे तुविजात ( =जातबलवन् ), वावृधानः (=अस्माकं स्तोत्रैरत्यन्तं वर्धितः ) अस्मयुः (=अस्मान् भक्तान् कामयमानस् ) त्वं तम् अमित्रयन्तं मर्त्यं (=तं वक्ष्यमाणं शत्रुत्वमाचरन्तं मरणधर्माणं पुरुषं )—हे शूर, [ तं ] मर्त्यं वज्रेण जहि (=मारय ) यः नः ( =अस्माकम् ) अघायति ( =पापमिच्छति=अस्मभ्यं दुःखमिच्छति ) । हे सुश्रवस्तम (=अत्यन्तं शोभनश्रवण ), शृणुष्व (=वक्ष्यमाणं वचनं शृणु ) । दुर्मतिः (=दुर्जनानां मतिः=शत्रूणां दुष्टा मती ) रिष्टं न (=हिंसितं भग्नम् अन इव) यामन् (=यामनि=मार्गे ) अप भूतु ( =अपभवतु=अस्मान् प्रति आयातुमुद्गता मार्ग एव तिष्ठतु मास्मान् प्राप्नोतु )—विश्वा दुर्मतिः (=सर्वापि शत्रूणां दुष्टा मतिः ) अप भूतु (=दूर एव तिष्ठतु मास्मान् प्रत्यायातु ) ॥

७. हा या सूक्ताचा येथें उपसंहार आहे. यांत ऋषि अभीष्ट वर मागत आहे. तो हा कीं, ' हे महाप्रबळ इंद्रा, या प्रकारेंकरून आमच्या स्तोत्रांनीं ज्याला उत्साह आणिला आहे असा जो तूं, तो आमचा मित्र होऊन आह्मांविषयीं वैर करणाऱ्या आणि आमचें वाईट करूं इच्छिणाऱ्या मनुष्याला आपल्या वज्रानें मारून टाक, तूं भक्तांची प्रार्थना ऐकून घेण्याविषयीं अत्यंत सादर असतोस, त्यापेक्षां ही आमची प्रार्थना तूं ऐक; कीं, आमचें वाईट व्हावें म्हणून जर कोणी शत्रूनें आपली वाईट इच्छा आह्मांवर प्रेरिली, तर ती गाड्याप्रमाणें रस्त्यावरच

७. तर हे प्रबळ इंद्रा, [आमच्या स्तोत्रांच्या योगेंकरून] अतिमहान् झालेला आणि आमच्यावर प्रीति करणारा जो तूं, तो [आमचें] वैर करणारे जे मर्त्य लोक त्यांला—हे शूरा, त्या मर्त्याला, वज्रानें [मार]. जो कोणी आमचें वाईट करूं इच्छितो, [त्याला] तूं मारून टाक. उत्तम रीतीनें ऐकून घेत असणारा जो तूं, तो [आमचें] ऐकून घे. मोडलेल्या [गाडी]प्रमाणें [आमच्या शत्रूंची] दुष्ट बुद्धि मार्गांतच राहो—सर्व दुष्ट बुद्धि दूर राहो.

7. Do thou, O mighty Indra, invigorated greatly [by our hymns], befriending us [strike] that mortal —strike, O brave Indra]. the mortal who bears enmity to us, who wishes evil unto us.. Hear thou, who hearest best. May the evil wish [of our enemies] stay away on the road like a broken [cart] may all evil wish stay away.

मोडून पडो, आम्हांजवळ येऊन न पोंहचो—सकळ दुर्मति म्हणून जेवढी असेल तेवढी आम्हांपासून दूर राहो' असा भावार्थ आहे.

'अतिमहान् झालेला'='वावृधानः'. अक्षरशः अतिशय वाढलेला. स्तोत्रांनीं देव वाढतात, म्हणजे त्यांस अधिक बळ येतें अशा समजुतीचे मंत्र अथवा उल्लेख वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलेच आहेत.

'मार्गांतच राहो'='यामन् अप भूतु.' ही उपमा चमत्कारिक, पण अर्थ चांगल्या स्पष्ट रीतीनें दर्शविणारी आहे. मार्गांत गाडी मोडून पडली म्हणजे जशी लवकर येत नाहीं, अथवा कधींहि येत नाहीं, तशी शत्रूची वाईट इच्छा आम्हांप्रत येऊन बाधा न करितां रस्त्यांत मोडून जणूं पडो, असा भावार्थ.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'त्वं'बद्दल 'तुअं,' आणि 'मर्त्य'च्या बद्दल दोन्ही ठिकाणीं 'मर्तिअं' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १३२.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । इन्द्रो देवता । अत्यष्टिश्छन्दः ।

**त्वया वयं मघवन्पूर्व्ये धन इन्द्रत्वोताः सासह्याम पृतन्यतो वनुयाम वनुष्यतः ।**
**नेदिष्ठे अस्मिन्नहन्यधि वोचा नु सुन्वते ।**
**अस्मिन्यज्ञे वि चयेमा भरे कृतं वाजयन्तो भरे कृतम् ॥ १ ॥**

त्वया । वयम् । मघऽवन् । पूर्व्ये । धने । इन्द्रत्वाऽऊताः । ससह्याम । पृतन्यतः । वनुयाम । वनुष्यतः ।
नेदिष्ठे । अस्मिन् । अहनि । अधि । वोच । नु । सुन्वते ।
अस्मिन् । यज्ञे । वि । चयेम । भरे । कृतम् । वाजऽयन्तः । भरे । कृतम् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे मघवन् ( =धनवन् ), इन्द्रत्वोताः ( =इन्द्रेण त्वया रक्षिता ) वयं पूर्व्ये धने (=अस्मिन् पुरोवर्तिनि समीपवर्तिनि युद्धे ) त्वया (=त्वया साधनेन=तव प्रसादात्=तव रक्षणेन ) पृतन्यतः (=शत्रून् ) सासह्याम (=अतिशयेन अभिभवेम )—वनुष्यतः ( =अस्मत्प्रहाराय अस्मज्जयायागच्छतः शत्रून् ) वनुयाम ( =जयेम ) । नेदिष्ठे (=अतिशयेन समीपवर्तिनि ) अस्मिन् अहनि ( =युद्धदिवसे=संग्रामप्रसङ्गे ) सुन्वते नु अधि वोच (=सोमम् अभिषुण्वते भक्तायैव अधिकं ब्रूहि=तव भक्तस्यैव पक्षपाती भव ) । अस्मिन् यज्ञे ( =इदानीं क्रियमाणेन यज्ञेन साधनेन ) [ वयं ] भरे (=संग्रामे ) कृतं (=संपादितं गवाश्वादिकं धनं) वि चयेम (=विविक्तं करवाम=शत्रुभ्योपहराम )—वाजयन्तः ( =शत्रोर्धनमात्मन इच्छन्तो ) [ वयं ] भरे कृतं [ वि चयेम ] (=संग्रामे शत्रोर्धनं तत्सकाशादपहरेम ) ॥

मघवन् । मघः सौख्यम् । तद्वन्निन्द्र । ...... पूर्व्ये धनेऽस्मिन् यज्ञे नेदिष्ठेऽत्यन्तसंनिहितेऽस्मिन्नहन्यभिषवयुक्तेऽयतनेऽहनि सुन्वते यजमानाय तदर्थमधिवोच । तं हविःप्रदं यजमानं यज्ञं वा नु क्षिप्रमधिकं ब्रूहि । इति सायणः ॥

## सूक्त १३२.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता— इंद्र. वृत्त— अत्यष्टि.

१. हे मघवन्, हे इन्द्रा, त्वां रक्षिलेले [ असे जे ] आम्ही, [ते] तुझ्या प्रसादानें ह्या जवळ आलेल्या युद्धांत [ आम्हांबरोबर ] लढूं इच्छिणाऱ्या शत्रूंला जिंकून टाकूं असें कर—वैर करणाऱ्यांचा पाडाव करूं असें कर. हा जो दिवस जवळ आला आहे, त्या दिवशीं तूं [ आपल्या ] सोमयाजी उपासकाचाच पक्ष घे. या यज्ञाच्या योगानें आम्ही युद्धामध्यें लूट मिळवूं—लूट मिळविण्याची इच्छा करणारे जे आम्ही, ते युद्धामध्यें लूट [ मिळवूं असें कर ].

## Hymn 132.

To *Indra*. By *Paruchchhepa* son of *Divodâsa*. Metre—*Atyashti*.

1. May we, protected by thee, O powerful Indra, overpower, under thy auspices, our enemies in the approaching battle—may we conquer those desirous of conquering [ us ]. On this impending day take thou the part of him who presses [the Soma for thee]. May we through [the means of] this sacrifice gather booty in the battle—[ may we] desirous of booty [ gather] booty in the battle.

---

१. हेंहि सूक्त परुच्छेप ऋषीनेंच असून इंद्राविषयींच आहे.

या पहिल्या मंत्राचा अर्थ नीट समजण्यासाठीं अशी कल्पना करणें अवश्य आहे कीं, कांहीं एक मोठा युद्धप्रसंग आला आहे, आणि त्यांत आपणाला जय मिळून शत्रूचा देश आणि धनदौलत आपणास मिळावी, असा हेतु धरून परुच्छेप आणि त्याचे इष्टमित्र युद्धाची तयारी करीत आहेत; आणि आपला हेतु सिद्धीस जावा म्हणून लढाईच्या पूर्वी इंद्रप्रीत्यर्थ यज्ञ करून त्याला हवि आणि

सोम अर्पण करून ऋषि हें सूक्त म्हणत आहे, आणि प्रार्थीत आहे.

'हे इन्द्रा, त्वां रक्षिलेले '=' इन्द्रत्वोताः'. हा समास फार चमत्कारिक आहे यांत संशय नाहीं. आणखी एकदा हा शब्द आला आहे (ऋ. ८. १९. १६ पहा).

'सोमयाजी उपासकाचाच पक्ष घे' =' अधि वोच नु सुन्वते.' म्हणजे आम्ही सोम काढून तुझी भक्ति करणारे जे भक्त त्यांचा. प्राचीन काळचे उपासक अथवा सोमयाजी आणि वीर हे एकच होते. आणि ते आधुनिक सोमयाजींपासून आणि वीरांपासून भिन्न असत असें या ऋचेवरून होतें. जे सोम काढून यज्ञ करीत, तेच लढत असत, आणि जे लढत असत ते यश यावें म्हणून सोम काढून यज्ञ करीत असत. आतां जसें ब्राह्मणांनीं मात्र यज्ञ करण्याचें पुण्य घ्यावें आणि लढण्याचें काम क्षत्रियांनींच करावें, क्षत्रियांचें काम ब्राह्मणांनीं अथवा ब्राह्मणांचें काम क्षत्रियांनीं करूं नये असें समजतात, तसें पूर्वी नसे; कारण आधुनिक काळाप्रमाणें वेदकाळीं अशा प्रकारचा जातिभेदच नव्हता. आधुनिक काळीं कोणता श्रोत्री, कोणता याज्ञिक, कोणता पुरोहित अथवा कोणता ऋषि (सूक्तें रचणारा कवि) असें प्रार्थील कीं, 'हे देवा इंद्रा, हा मी यज्ञ करीत आहें हा तूं मान्य करून घे, आणि आम्हांला लढाईत जय मिळे आणि शत्रूचा देश आणि त्याची संपत्ति आमचे हातीं लागे असें कर!'

'या यज्ञाच्या योगानें '=' अस्मिन् यज्ञे.' अक्षरशः अर्थ 'या यज्ञांत' इतकाच आहे. युद्धप्रसंग अगदी जवळ येऊन ठेपला आहे म्हणून या युद्धाच्या संबंधाच्या यज्ञांत अथवा या यज्ञाच्या पुढें येणाऱ्या युद्धांत असें म्हणावयाचें, तसें न म्हणतां 'या यज्ञांत' इतकेंच म्हटलें आहे असें आम्हांस वाटतें. अथवा 'यज्ञे' म्हणजे 'यज्ञिये' (भरे) असें रूप आणि असा संबंध घेऊन निर्वाह केला तर 'ज्याच्या संबंधानें यज्ञ करण्यास योग्य अशा या युद्धांत' असा अर्थ होऊं शकेल, तो घ्यावा कीं काय ?

'लूट '=' कृतम्.' ऋ. ९. ९७. ५८ 'भरे कृतं वि चिनुयाम शश्वत्' आणि ऋ. १०. १०२. २ 'भरे कृतं वि अचेत्' हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. ही लूट म्हणजे केवळ युद्धामध्यें शत्रूंनी आणिलेलीं शस्त्रें, आयुधें, धन, कपडेलत्ते, घोडे, रथ, अन्न हीच लूट समजावयाची नाहीं, तर शत्रूवर जय मिळाल्यानंतर त्याचा देश, त्याची घरची संपत्ति, गुरेंढोरें, घरें, बागबगीचे इत्यादिक जी संपत्ति तिचाहि समावेश होतो असें समजलें पाहिजे. जेथें जेथें

लूट' अशा अर्थाचे 'धन,' 'वाज,' रयि,' 'कृतम्' इत्यादिक शब्द वेदांत ातात, तेथें तेथें हाच अर्थ समजावयाचा भाहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'पूर्विए,' असें म्हणणें, आणि दुसरा चरण पदपाठांत आहे तसा वाचणें, इतकें अवश्य आहे.



**स्वर्जेषे भरे आप्रस्य वक्मन्युषर्बुधः स्वस्मिन्नञ्जसि क्राणस्य स्वस्मिन्नञ्जसि ।**
**अहन्निन्द्रो यथा विदे शीर्ष्णाशीर्ष्णोपवाच्यः ।**
**अस्मत्रा ते सध्र्यक् सन्तु रातयो भद्रा भद्रस्य रातयः ॥ २ ॥**

स्वःऽजेषे । भरे । आप्रस्य । वक्मनि । उषःऽबुधः । स्वस्मिन् । अञ्जसि । क्राणस्य । स्वस्मिन् । अञ्जसि ।
अहन् । इन्द्रः । यथा । विदे । शीर्ष्णाऽशीर्ष्णा । उपऽवाच्यः ।
अस्मऽत्रा । ते । सध्र्यक् । सन्तु । रातयः । भद्राः । भद्रस्य । रातयः ॥२

## भाषायाम्.

२. इन्द्रः स्वर्जेषे (=सुखसाधने ) आप्रस्य वक्मनि (=शूरस्य मार्गभूते ) उषर्बुधः स्वस्मिन् अञ्जसि ( =प्रातःकाले प्रबुध्यमानस्य भक्तस्य स्वभूते कपटरहिते)— क्राणस्य स्वस्मिन् अञ्जसि (=यजनकर्मकर्तुः स्वभूते कपटरहिते ) [ एतादृशे ] भरे (=संग्रामे ) [ शत्रून् ] यथा विदे अहन् (=येन प्रकारेण ज्ञायते तेन प्रकारेण हतवान्=हन्तीति ज्ञायत एव ) । [ इन्द्रः ] शीर्ष्णाशीर्ष्णा (=सर्वैः शीर्षभिः=सर्वैः पुरुषैः ) उपवाच्यः (=स्तवनीयो) [ भवति ] । [ हे इन्द्र ], ते रातयः (=तव दानानि=त्वद्दत्तानि धनानि ) अस्मत्रा (=अस्मासु ) सध्र्यक् सन्तु (=सध्रीचीनाः सन्तु=सहस्थिता भवन्तु )—भद्रस्य ( =कल्याणस्य ) [ तव ] भद्रा रातयः ( =कल्याणानि दानानि ) [ अस्मत्रा सध्र्यक् सन्तु=अस्मासु संहिता भवन्तु ] ॥

अस्याः प्रथमः पादो दुर्बोधः सायणेनैवं व्याख्यातः । अयमिन्द्रः स्वर्जेषे स्वर्गगमनसाधने भरे संग्रामे । युद्ध आभिमुख्येन हतस्य स्वर्गो द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डलभेदिनावित्यादिस्मृतिषु प्रसिद्धः । आप्रस्यापनशीलस्य शत्रुवधायेतस्ततो व्याप्तस्य......शूरस्य वक्मनि मार्गभूते स्वस्मिन् स्वभूतेऽञ्जस्यभिव्यक्तिमति कपटादिरहिते । पुनः स एव विशेष्यते । स्वस्मिन्नञ्जसि स्वकीयेऽञ्जसि मुखे (?) । महति संग्रामे । यद्वा स्वस्मिन्नञ्जसि शत्रौ स्वयमेवाप्रच्छन्नत्वेनागते सत्यहन् शत्रून् हिनस्ति । कस्य संग्राम इति तदुच्यते । आप्रस्यापनशीलस्य आ समन्तादिन्द्रस्य प्रीणयितुर्वा । उषर्बुध उषःकालेऽनुष्ठानाय प्रबुध्यमानस्य । क्राणस्य यागं कुर्वाणस्य । ...अस्य यजमानस्य शत्रूनहन् । हिनस्ति । अतः कारणादयमिन्द्रः शीर्ष्णाशीर्ष्णोपवाच्यः । सर्वेषां शिरसा प्रणम्यः स्तुत्यः । ...... तत्र दृष्टान्तः । यथा विदे सर्वज्ञाय शिरसा प्रणतिः

२. सुख मिळवून देणारा जो संग्राम, जो प्रभातकाळीं उठणाऱ्या [ आणि ] युद्ध करण्याविषयीं उद्युक्त अशा वीराचा जणुं निष्कपट मार्गच—उपासना करणाऱ्याचा जो स्वताहाचा निष्कपट मार्गच, त्या संग्रामांत इंद्र [शत्रूंला] मारीत असतो हें ठाऊकच आहे. इन्द्र प्रत्येक मनुष्यानें स्तवण्यास योग्य आहे.—[हे इन्द्रा], तूं दिलेलीं दानें आम्हांमध्यें एकत्र मिळून राहोत—तुज कल्याणकारकाचीं कल्याणकारक दानें [ एकत्र मिळून राहोत ].

2. In the battle, in which happiness is obtained through victory, which is the road of the hero, which is the proper straightforward road of the worshipper that rises in the early dawn—which is the proper straightforward road of the active worshipper. Indra kills [ the enemy ], as is well-known. He is worthy of being praised by each head.—May thy gifts, [ O Indra ], be collected together in us—the happy gifts of thee who art happy.

---

२. ह्या ऋचेचा पहिला चरण फार कठिण आहे. त्याचें भाषांतर आम्हीं सायणांस अनुसरून केलें आहे. सायणांनीं तरी निरुपायामुळें कसा तरी निर्वाह केला आहे असें उघड दिसतें, ( भाषेखालीं उतरून घेतलेला भाष्याचा उतारा पहा ).

केलेल्या भाषांतराचा भावार्थः—' शूराचा केवळ मार्ग, आणि इंद्रभक्ताचा निष्कपट मार्ग असा जो संग्राम, त्यांत इंद्र आपल्या भक्ताचे शत्रु मारून टाकीत असतो; हें सर्वांस ठाऊक आहे. यास्तव प्रत्येक मनुष्यानें त्याची स्तुति करण्यास योग्य होय. तर हे इंद्रा, त्वां दिलेल्या ज्या आमच्या संपत्ति, त्या आमच्या घरीं स्थिर राहून एकत्र राहोत, एक जाऊन एक राहील असें न होओ; कारण त्वां दिलेल्या संपत्तीच्या देणग्या कल्याणकारक आहेत.'

' आप्र,' ' वक्म,' ' अञ्जस् ' हे तीन शब्द कठिण आहेत, कारण त्यांचीं प्रयोगान्तरें मिळत नाहींत.

' एकत्र मिळून राहोत '=' सध्र्यक् सन्तु.' म्हणजे आमच्या एकट्याच्याच घरीं निवास करोत.

पहिला चरण जसा अर्थाला अवघड आहे, तसा तो वृत्तालाहि खडबडीत आहे. ' स्वर्जेषे ' इत्यादीच्या स्थळीं 'सुअर्जेषए भर आपरॅसिअ । वक्मन्युषर्बुधः सुअस्मिन्नञ्जसि' असें वाचलें तर अक्षर-

**तन्नु प्रयः प्रत्नथा ते शुशुक्वनं यस्मिन्यज्ञे वारमकृण्वत क्षयमृतस्य वारसि क्षयम् ।**
**वि तद्वोचेरध द्वितान्तः पश्यन्ति रश्मिभिः ।**
**स घा विदे अन्विन्द्रो गवेषणो बन्धुक्षिद्भ्यो गवेषणः ॥ ३ ॥**

तत् । नु । प्रयः । प्रत्नऽथा । ते । शुशुक्वनम् । यस्मिन् । यज्ञे । वारम् । अकृण्वत । क्षयम् । ऋतस्य । वाः । असि । क्षयम् ।
वि । तत् । वोचेः । अध । द्विता । अन्तरिति । पश्यन्ति । रश्मिऽभिः ।
सः । घ । विदे । अनु । इन्द्रः । गोऽएषणः । बन्धुक्षित्ऽभ्यः । गोऽएषणः ॥ ३ ॥

क्रियते स्तूयते च तर्थनमित्यर्थः । यद्वा यथा विदे । येन प्रकारेण हन्तव्यं शत्रुं जानासि तं तं प्रहंसि । ...... अथवा यथा विदे यं यं विन्दसे लभसे शत्रुं तं तं मारयसि । अतः कारणात्स्तुत्य इत्यर्थः इति ॥

## भाषायाम्.

३· [हे इन्द्र], यस्मिन्यज्ञे वारं (=सर्वैर्वरणीयं) क्षयं (=निवासस्थानम्=आवासस्थानम्=आसनम्) अकृण्वत (=कुर्वन्ति) तत् नु (=तत्र खलु) शुशुक्वनं (=दीप्तं) प्रयः (=प्रार्पणीयं हविः खलु) प्रत्नथा (=यथा पुरातनकाले तथा) ते (=तवैव) [भवति] ऋतस्य क्षयं (=यज्ञस्य स्थानं) वाः असि (=यज्ञस्थानस्य संभक्ता भवसि)। तत् वि वोचेः (=तव चरितम् अस्मभ्यं कथय)। अध (=अतः कारणादेव हि) द्विता अन्तः (=द्वयोर्द्यावापृथिव्योर्मध्ये) [वर्तमानं मेघजलवर्षणरूपं तव चरितं] रश्मिभिः (=सूर्यस्य किरणैः) पश्यन्ति (=प्रत्यक्षत ईक्षन्ते)। स घ (=स खलु) गवेषणः (=गवामन्वेषिता)—बन्धुक्षिद्भ्यो गवेषणः (=तेन सह बन्धुत्वम् आप्नवताम् उपासकानाम् अर्थे गवाम् अन्वेषिता) इन्द्रः अनु विदे (=अनुक्रमेणैव तत्सर्वं जानाति) ॥

१ भृशमेव दुर्बोधैषा प्रायः सायणमनुसृत्यैव व्याख्यातास्माभिः । सायणाचार्यैरपि कथं कथमपि व्याख्याता । तदेवम् । हे इन्द्र तन्नु खलु प्रसिद्धं प्रयो हविर्लक्षणमन्नं शुशुक्वनमाज्यादिसंयोगेन भृशं दीप्तम् । शुचेर्दीप्तिकर्मण एतद्रूपम् ॥ ते तव स्वभूतं प्रत्नथा ते तव स्वं भवति । तथाद्यतनमपि । सर्वदा त्वामेव यजन्त इति भावः ॥ ......कीदृशं तदिति उच्यते । यज्ञे यागे यस्मिन् हविषि दातव्ये सति वारं वरणीयं

३. [हे इंद्रा], ज्या यज्ञांत उत्तम आसन घालितात तेथें सुंदर हवि म्हणून जें असतें तें पुरातन काळाप्रमाणें तुझेंच असतें. धर्माचें आसन तूंच घेत असतोस. ही गोष्ट तूं सांग. या कारणासाठीं दोनी लोकांच्या मध्यें सूर्यकिरणांच्या योगेंकरून [ तुझें ] चरित्र [ सर्व लोक ] पाहतात.—तो गाई शोधणारा इंद्र, बंधुपणा पावलेल्या उपासकांसाठीं गाई शोधणारा इंद्र, [ तें सर्व ] अनु[क्रमानें ] जाणतो.

3. Wherever an excellent seat is prepared, [ O Indra ], in a sacrifice, there indeed, the splendid food [ is ] thine, as in times of yore. Thou dost enjoy the altar of the rite. Tell [ us ] this. For this reason [they] see [ thy exploit ] between [the two worlds] by means of the [ sun's ] rays.—He, Indra—the searcher of the cows,—the searcher of the cows for the sake of his worshippers who live like [ his ] brothers, knows [ it all ] in order.

भरती होते ! दुसऱ्या चरणांत '०वाच्यः'-च्या स्थळीं '०वाचिअः' असें आणि तिसऱ्यांत 'सध्रिअक्' असें वाचावें लागतें.

३. हा मंत्र तर इतका अवघड आहे, कीं तो केवळ अंधारमय आहे असें म्हटल्यास चालेल. आम्हीं निरूपायासाठीं पहिला चरण शिवाय करून सायणांस अनुसरून भाषांतर केलें आहे. पहिल्या चरणाचा भावार्थ असा दिसतो कीं, 'हे इंद्रा, जेथें जेथें यज्ञांत देवांला बसण्यासाठीं आसन घालीत असतात, तेथें तेथें उत्तम हवि म्हणून जें असतें, तें जसें पुरातन काळीं तसेंच आलीकडच्या काळींहि तुलाच अर्पण केलें जातें.' पुढचें भाषांतर सायणानुसारच आहे त्याचा भावार्थ असा दिसतो कीं, 'इंद्र वेदिस्थान सेवीत असतो. तो अंतरिक्षांतून मेघोदक पाडितो तें सर्व लोक पाहतात. आणि आकाशांतून पाण्याचा वर्षाव करणें हें काम अनुक्रमानें कसकसें करावें तें तो सर्व जाणतो. कारण त्याच्याशी बंधुप्रमाणें वागणारे जे उपासकजन, त्यांसाठीं तो मेघजलरूप गाई शोधून काढण्याविषयीं तत्पर असतो.'

पण 'ऋतस्य वा: असि क्षयम्,' 'वि तद् वोचेः', 'अध द्विता पश्यन्ति,' 'स घ विदे अनु इन्द्रः,' हे भाग अत्यंत दुर्बोध आहेत यांत संशय नाहीं. 'अध द्विता' म्हणजे 'आणि मुख्यत्वेंकरून' असा अर्थ होतो असें कितीएक पाश्चात्त्य विद्वान् 'अध द्विता' हे शब्द ज्यांत

नू इत्था ते पूर्वथां च प्रवाच्यं यदङ्गिरोभ्योऽवृंणोरप व्रजमिन्द्र शिक्षन्नप व्रजम् ।
ऐभ्यः समान्या दिशास्मभ्यं जेषि योत्सि च ।
सुन्वद्भ्यो रन्धया कं चिदव्रतं हृणायन्तं चिदव्रतम् ॥ ४ ॥

नु । इत्था । ते । पूर्वऽथा । च । प्रऽवाच्यम् । यत् । अङ्गिरःऽभ्यः । अवृणोः । अप । व्रजम् । इन्द्र । शिक्षन् । अप । व्रजम् ।
आ । एभ्यः । समान्या । दिशा । अस्मभ्यम् । जेषि । योत्सि । च ।
सुन्वत्ऽभ्यः । रन्धय । कम् । चित् । अव्रतम् । हृणायन्तम् । चित् । अव्रतम् ॥ ४ ॥

---

क्षयं स्थानं वेदिलक्षणमकृण्वत । कुर्वन्त्यृत्विजः । कस्तव विशेष इति चेत् उच्यते । ऋतस्य सत्यफलस्य यज्ञस्य वारसि क्षयम् । निवासस्थानं संभक्ताऽसि (?) । यद्वा । ऋतमित्युदकनाम । तस्य क्षयं स्थानं प्राप्ताऽसि । वृष्टिप्रदोऽसीत्यर्थः । अथवा ऋतस्यादित्यस्य क्षयं स्थानं द्युलोकाख्यं वारसि । यजमानं गमयितासि । तत्तादृशं वक्ष्यमाणं कर्म विवोचेः ॥ विब्रूहि । अथ अतःकारणात् क्षितान्तांद्वित्वोपेतयोर्द्यावापृथिव्योर्मध्येऽन्तरिक्षे रश्मिभिरादित्यकिरणैः पश्यन्ति । मेघं निर्भिद्य रश्मिद्वारा प्रवर्षणरूपं कर्म सर्वे जनाः प्रत्यक्षतः पश्यन्ति । अस्मद्दत्तं हविरादित्यं प्रापय्य तद्रश्मिद्वारा वृष्टिं जनयसीत्येतत्सर्वैर्दृश्यत इत्यर्थः । इदानीं परोक्षतया स्तौति । स घ स खल्विन्द्रो गवेषण उदकस्यान्वेषणशीलः । तथा बन्धुक्षिद्भ्यो हविःप्रदानादिना बन्धुभावं प्राप्तवद्भ्यो यजमानेभ्यो गवेषणो गवां प्रसिद्धानामेषणकर्ता ॥ इषेर्बाहुलकात्कर्तरि ल्युट् । यद्वा गवेष् मार्गणे । पूर्ववत् ल्युट् । यजमानफलस्य मृगयितेत्यर्थः । अनु उक्तक्रमेणैव कर्ता सन् विदे । विन्दते । उदकप्राप्तिप्रकारं जानाति ॥

---

## भाषायाम्.

४. हे इन्द्र, [ वक्ष्यमाणं ] ते (=तव ) [ चरितं ] पूर्वथा च (=यथा पुरातनकाले तथैव ) नु (=अधुनापि ) इत्था (=सत्यमेव ) प्रवाच्यं (=स्तवनीयं ) [भवति] यत् [ त्वम् ] अङ्गिरोभ्यः (=अङ्गिरोनामकानां पुरातनतमानां केषांचिदुपासकानामर्थे ) व्रजं (=गवां समूहं=मेघजलरूपाणां गवां गोष्ठम्) अप अवृणोः ( =उद्घाटितवानसि )—शिक्षन् व्रजम् अप [ अवृणोः ] ( =गास्तेभ्यो ददद्गोष्ठमुद्घाटितवान्=गोष्ठमुद्घाट्य गा ददवानसि ) । [ एवं सति ] एभ्यः समान्या दिशा ( =तेभ्योऽङ्गिरो-

४. [ हे इंद्रा ], [ हें ] तुझें [चरित] पुरातन काळाप्रमाणेंच आतांहि खरोखर वाखाणण्यास योग्य होय, कीं तूं अंगिरसांसाठीं [ गाईंचा ] गोठा उघडिता झालास—हे इंद्रा, तूं त्यांला गोठा उघडून गाई देता झालास. त्यांजप्रमाणेंच तूं आम्हांसाठीं धन मिळवून दे आणि युद्ध कर. उपासना न करणारा जो कोणी असेल त्या प्रत्येकाला—उपासना न करणाऱ्या प्रत्येक कुपित शत्रूला, सोमरसानें उपासना करणाऱ्या उपासकाच्या अधिकाराखालीं आण.

4. [ This ] thy [exploit] is truly praiseworthy now as it was in former times, that thou didst break open the cowfold for the sake of the Angirases— [ that thou didst break ] open the cowfold, O Indra, bestowing [ the cows upon them ]. As for their sake, even so for ours, do thou conquer and fight. Subject every riteless man to the Soma-sacrificing worshippers—every riteless angry man.

---

आले आहेत असे मंत्र एकमेकांशीं ताडून पाहून त्यावरून म्हणतात. पण तो अर्थ सायणांनीं कोठेंच दिलेला नाहीं हें एक, आणि प्रस्तुत स्थळीं जुळतहि नाहीं. ‘ द्विधा पश्यन्ति ’ याचा सायणानुसार आम्हीं केलेला अर्थ फार क्लिष्ट आहे, आणि संभवेल असं आम्हांला वाटत नाहीं. ‘ अनु विदे ’ हें कर्तरि क्रियापद सायणाचार्य घेतात. पण तसें घेतलें तर त्याला कर्म नाहीं. कर्मणि ‘ अनु विद्यते ’ अशा अर्थी घेतलें तर ‘ तो इन्द्र मेघजलरूप गाई शोधणारा असा लोकांनीं जाणिलेला आहे, अथवा लोकांत प्रसिद्ध आहे ’ असा अर्थ संभवतो.

या मंत्रावरील सायणांचें सगळें भाष्य भाषेखालीं उतरून घेतलें आहे तें पहा.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ‘ द्विता ’ आणि ‘ अन्तः ’ यांजमध्यें आणि तिसऱ्यांत ‘ अनु ’ आणि ‘ इन्द्रो ’ यांजमध्यें संधि न करणें हें अवश्य आहे.

---

४. हा मंत्र सोपा आहे. ‘ हे इंद्रा, तूं अंगिरसांकरितां वृत्राबरोबर लढून, त्याणें लपविलेल्या मेघोदकरूप गाईंचा गोठा उघडून, काढून त्यांतील गाई त्यां अंगिरसांला दिल्या हा जो तुझा पराक्रम, तो प्राचीन काळीं जसा स्तुत्य असे तसा अजूनहि तो स्तुत्य समजतात; लोक त्याविषयीं गात असतात. तर तूं

**सं यज्जनान् क्रतुभिः शूर ईक्षयद्धने हिते तरुषन्त श्रवस्यवः प्र यक्षन्त श्रवस्यवः ।**
**तस्मा आयुः प्रजावदिद्बाधे अर्चन्त्योजसा ।**
**इन्द्र ओक्यं दिधिषन्त धीतयो देवाँ अच्छा न धीतयः ॥ ५ ॥**

सम् । यत् । जनान् । क्रतुऽभिः । शूरः । ईक्षयत् । धने । हिते । तरुषन्त । श्रवस्यवः । प्र । यक्षन्त । श्रवस्यवः ।
तस्मै । आयुः । प्रजाऽवत् । इत् । बाधे । अर्चन्ति । ओजसा ।
इन्द्रे । ओक्यम् । दिधिषन्त । धीतयः । देवान् । अच्छ । न । धीतयः ॥ ५ ॥

---

भ्य एकयैव रीत्या=यया रीत्या तेषामर्थं तयैव रीत्या ) अस्मभ्यम् (=अस्माकमर्थे ) जेषि योत्सि च (=धनं जय युध्यस्व च=अस्माकं शत्रुभिः सह युध्यस्व तेषां धनमस्मदर्थं जय च ) । [ अपि च ] कंचिद् अव्रतं ( =सर्वमपि कर्मरहितम्=अयष्टारं सर्वमपि पुरुषं )—हणायन्तं चिद् अव्रतं ( =क्रुद्धं सर्वमपि अयष्टारं ) सुन्वद्भ्यो रन्धय (=अस्मादृशेभ्यः सोममभिषुण्वद्भ्यो बाधय=सोमाभिषवं कृत्वा त्वां सेवमानानामस्मादृशानां वशमानय ) ॥

---

## भाषायाम्.

५. यत् (=यस्माद्धेतोः ) शूरः (=विक्रान्त इन्द्रो ) जनान् क्रतुभिः सम् ईक्षयत् (=स्वप्रज्ञाभिः सम्यगीक्षयति=सर्वे जना वस्तूनि सम्यग्यथा पश्येयुस्तथा करोति) [ तस्माद्धेतोः ] धने हिते (=संग्रामे विहिते=संग्रामे प्रसक्ते सति ) श्रवस्यवः (=शत्रुजयाल्लब्धव्यधनेप्सवस्) तरुषन्त (=शत्रून् हिंसन्ति=जयन्ति)–[तस्माद्धेतोश्च] श्रवस्यवः (=जयाल्लब्धव्यं शत्रोर्धनमिच्छन्त ) [ उपासकाः ] प्र यक्षन्त ( =प्रयजन्ते=इन्द्राय यजनं कुर्वन्ति ) । तस्मै इत् (=तस्मा इन्द्रायैव ) बाधे (=बाधने=पीडायां सत्यां=दुःखे प्रसक्ते सति ) [ उपासका ] ओजसा (=स्वबलेन ) आयुः प्रजावत् अर्चन्ति (=आयुःप्रजावत्= आयुर्वत् प्रजावच्च स्तुवन्ति=आयुषा पुत्रपौत्रयुक्ताः सन्तो हविर्दानेन सह स्तुतिं गायन्ति ) । इन्द्रे (=इन्द्र एव ) धीतयः (=स्तुतय ) ओक्यं दिधिषन्त (=निवासस्थानं धारयन्ति=इन्द्र एव प्रेमयुक्ता भवन्ति )—धीतयः (=स्तुतयो) देवान् अच्छ न ( =सकलदेवान् अभिमुखा भूत्वेव=सकलदेवाना-

५. शूर [इंद्र आपल्या] प्रज्ञेच्या यागानें जनांकडून [सर्व वस्तु] चांगल्या पाहवितो म्हणून, युद्धप्रसंग आला म्हणजे, लूट मिळावी अशी इच्छा करणारे [भक्तजन] [आपल्या शत्रूंला] मारून टाकितात—[म्हणूनच] लूट मिळावी अशी इच्छा करणारे [भक्तजन] यजन करीत असतात. संकटसमयीं [सकळ] शक्तीसहित पुत्रपौत्र सुद्धा मिळून हविरन्न अर्पण करून त्याचेंच यश गात असतात. [सकळ] स्तुति इंद्राच्या ठायीं वास करितात—[सर्व] देवांच्या बद्दल जणुं [इंद्राच्याच ठायीं] [सकळ] स्तुति वास करितात.

5. Inasmuch as the hero causes people to see with his wisdom, those who desire booty conquer [their enemies] when battle is joined—those desirous of booty offer [him] sacrifices. To him alone they sing with [their] might with food [offered], and accompanied by their progeny. In Indra praises hold [their] seat—[In Indra] praises [hold their seat] as though instead of in [all] the gods.

---

अंगिरसांसाठीं जसा लढून त्यांला मेघजलरूप गाई हें धन देता झालास, तसाच तूं आतां आम्हांसाठीं लढ, आणि आमच्या शत्रूंचा पाडाव करून आम्हांला धनप्राप्ति करून दे; आणि आम्हांसारिखे जे उपासक सोम काढून तुला अर्पण करितात आणि तुझी सेवा करितात, त्यांच्या साठीं कर्महीन आणि क्रोधाविष्ट शत्रूंबरोबर लढून त्यांजला त्या उपासकांच्या अमलाखालीं आण.'

'अंगिरसांसाठीं गाईचा गोठा उघडिता झालास'='अङ्गिरोभ्यः अप व्रजम् अवृणोः.' सू. ५१, मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा. गाई म्हणजे मेघोदकरूप होत हें उघडच आहे.

उपासना न करणारे जे अनार्य जन आणि राक्षसादिक, त्यांचें वर्चस्व देवभक्तांवर होऊं नये, तर ते भक्तांच्या अधिकाराखालीं यावे अशी प्रार्थना आहे इजकडेस लक्ष्य द्यावें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'प्रवाचिअं,' आणि 'अङ्गिरोभ्यो अवृणोरप व्रजम्,' दुसऱ्यांत 'समानिआ दिशा अस्मभ्यं,' आणि तिसऱ्यांत 'सुन्वद्भिओ' असें म्हणावें लागतें.

५. 'शूर असा जो इन्द्र, तो आपल्या प्रज्ञेच्या योगानें लोकांला वस्तूंचें खरें

युवं तमिन्द्रापर्वता पुरोयुधा यो नः पृतन्यादप तंतमिद्धतं वज्रेण तंतमिद्धतम् ।
दूरे चत्ताय छन्त्सद्गहनं यदिनक्षत् ।
अस्माकं शत्रून्परि शूर विश्वतो दर्मा दर्षीष्ट विश्वतः ॥ ६॥२१॥

युवम् । तम् । इन्द्रापर्वता । पुरःऽयुधा । यः । नः । पृतन्यात् । अप । तम्ऽतम् । इत् । हतम् । वज्रेण । तम्ऽतम् । इत् । हतम् ।
दूरे । चत्ताय । छन्त्सत् । गहनम् । यत् । इनक्षत् ।
अस्माकम् । शत्रून् । परि । शूर । विश्वतः । दर्मा । दर्षीष्ट । विश्वतः ॥
॥ ६ ॥ २१ ॥

मिन्द्रमेव नायकं मत्वा ) [ तस्मिन् ओक्यं दिधिषन्ति=निवासस्थानं धारयन्ति=तस्मिन् प्रेम निदधति ] ॥

समीक्षयत् इत्यत्र जनान् सर्वान् प्राणिनः क्रतुभिः प्रज्ञाभिः समीक्षयत् । समीक्षयति तत्तद्विषयान् । अन्तर्यामिरूपेण सर्वेषां बुद्धिषु स्थित्वा तैर्विषयानुल्लेखयतीत्यर्थः । इति सायणः ॥

## भाषायाम्.

६. हे इन्द्रापर्वता (=इन्द्रापर्वतौ=हे इन्द्रयुक्तमेघाभिमानिन् देव), पुरोयुधा (=पुरोयुधौ=पुरतः स्थित्वा भक्तपक्षे युध्यन्तौ ) युवं (=युवां ) यो [ यो ] नः पृतन्यात् (=यः कोपि अस्माभिः सह योद्धुमिच्छेत्) तम्—तं तमित् (=तादृशं सर्वमपि पुरुषम् ) अप हतं (=हत्वा प्रणाशयतं )—वज्रेण तं तमित् हतं (=वज्रेण तं प्रत्येकं हतम् ) । यत् (=यस्मात्कारणात् ) [ स वज्रः ] दूरे चत्ताय (=दूरदेशे अपगूढाय=तादृशं पुरुषं ) छन्त्सत् ( =हन्तुं शक्नुयात् ) [ अपि च ] यत् ( =यस्मात् कारणात् ) गहनं ( =दुरवगाहस्थानम् ) इनक्षत् (=व्याप्नुयात्=व्याप्तुं शक्नोति ) । हे शूर [ इन्द्र ], [ तव ] [वज्रः] अस्माकं शत्रून् विश्वतः (=सर्वेभ्योपि दिग्भ्यः ) परि [ दर्षीष्ट ] (=विदारयतु )—दर्मा (=विदारयिता=शत्रूणां भेत्ता स ) [ तान् ] विश्वतः [ परि ] दर्षीष्ट (=विदारयतु ) ॥

पर्वतः पर्ववान् मेघः । तदभिमानी देवः । दूरे चत्तायात्यन्तदूरदेशे गताय । ... ...नष्टायादर्शनमापन्नायेत्यर्थः । ... तादृशं शत्रुं छन्त्सत् । छन्दयति कामयते हन्तुम् । इति सायणः ॥

६. हे इंद्र आणि पर्वत हो, पुढें लढणारे नायक जे तुम्ही ते, आम्हांशीं लढण्याला जो जो येईल त्याला त्याला मारून टाका— त्याला त्याला वज्रानें मारा; [ जें वज्र] दूर लपून राहिलेल्या मनुष्याला मारूं शकतें [आणि] जें गहन स्थळाप्रतहि पोंहचत असतें.— हे शूर [ इंद्रा ], [ तुझें वज्र ] आमच्या शत्रूंला सर्व बाजूंनीं विदारून टाको—विदारक [ असें जें वज्र, तें] सर्व बाजूंनीं [आमच्या शत्रूंला ] विदारून टाको.

6. Do you, O Indra and Parvata, who fight in front, strike off every one who may wish to fight us—strike every [ such ] one with the thunderbolt, [since it ] can kill even him who is hidden afar [ and ] since it can reach an abyss.—May it, O brave [ Indra ], [cut down ] our enemies on all sides—may it, the destroyer [ of the enemies ], cut down on all sides.

ज्ञान करून देतो—म्हणजे कोणत्या प्रसंगीं काय करावें हें शिकवितो म्हणून, योद्धे जन युद्धांत यश पावतात; आणि इंद्रालाच भजतात; आणि इंद्रालाच हवि अर्पण करून उपासक जन आपल्या पुत्रपौत्रांसहित आपल्या सर्व बळानें स्तवनें आणि स्तोत्रें अर्पण करितात— आणि त्याच कारणासाठीं सर्व जन इंद्राच्याच ठिकाणीं निवास करितात, म्हणजे इंद्राचेंच स्तोत्र करितात, सर्व देवांवरचें प्रेम काढून ते सर्व इंद्राचेच ठिकाणीं प्रीति करितात,' असा भावार्थ आहे.

'युद्धप्रसंग आला म्हणजे '=' धने हिते.' सू. ४० मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

'यजन करीत असतात '=' प्र यक्षन्त.' हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे. यापेक्षां चांगला अर्थ मिळाला असता तर बरें झालें असतें. कितीएक पाश्चात्य विद्वान् 'लोकांच्या अंगावर धांवून जातात,' 'संहार करितात,' 'प्रकर्षाप्रत पावतात' असा अर्थ करितात.

'पुत्रपौत्र सुद्धा हविरन्न अर्पण करून '=' आयुः प्रजावत्.' हे शब्द किंचित् कठिण आहेत, पण आम्ही केलेला अर्थ त्यांपासून निघतो असें आम्हांस वाटतें. 'आयुः प्रजावत् अर्चन्ति' म्हणजे 'आयुः-प्रजा-वत् अर्चन्ति= आयुर्वत् प्रजावत् च अर्चन्ति,' 'हविरन्नासहित म्ह० हविरन्न ( आयुः ) अर्पण करून गातात, आणि ते पुत्रपौत्रांला बरोबर घेऊन गातात ' असा अर्थ आहे. दोन शब्दांला 'वत्' लावावयाचें त्यांतून एकालाच लाविलें आहे. असे प्रयोग दुसऱ्या भाषांतहि येतात. उदाहरणें, तुकारामाच्या अभंगांत मिळतील.

## सूक्तम् १३३.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । इन्द्रो देवता । आद्या त्रिष्टुप् । अभिवुग्येत्या-द्यास्तिस्रोनुष्टुभः । पिशङ्गभृष्टिमित्येषा गायत्री । अवर्मह इत्येषा धृतिः । वनोतीत्येषात्यष्टिः ॥

**उभे पुनामि रोदसी ऋतेन द्रुहो दहामि सं महीरनिन्द्राः ।**
**अभिव्लग्य यत्र हता अमित्रा वैलस्थानं परि तृळ्हा अशेरन् ॥ १ ॥**

उभे इति । पुनामि । रोदसी इति । ऋतेन । द्रुहः । दहामि । सम् । महीः । अनिन्द्राः ।
अभिऽव्लग्य । यत्र । हताः । अमित्राः । वैलऽस्थानम् । परि । तृळ्हाः । अशेरन् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [अहम्] ऋतेन (=यज्ञेन=यज्ञहविर्दानाहुत्या) उभे रोदसी (=द्यावापृथिव्यौ) पुनामि (=पावयामि=हविषाग्निं प्रज्वाल्य प्रकाशयामि) [तथा कृत्वा च] अनिन्द्राः (=इन्द्ररहिता इन्द्रशत्रुत्वं कुर्वतीर्) महीः (=महतीर्) द्रुहः (=द्रोग्ध्रीः=अरातीः=शत्रून्=असुरान्) सं दहामि (=सम्यग्दहामि=भस्मसात् करोमि) । यत्र (=यस्मिन् यज्ञे कृते सति=यादृशे यज्ञहविषि प्राहुते सति) [प्राक्] अमित्राः (=मम शत्रवः) अभिव्लग्य (=अस्माभिः अभितः सर्वतः प्राप्य) हताः [सन्तो] वैलस्थानं परि (=श्मशानं परितस्) तृळ्हाः (=हिंसिताः शकलीकृता) अशेरन् (=पतिताः) ॥

सायणस्त्वेवमाह । हे इन्द्र ऋतेन त्वदुद्देश्येन यज्ञेन बलेनोभे रोदसी द्यावापृथिव्यौ पुनामि । लोकद्वयं हिंसकानां तवायष्टॄणां वापगमनेन पावयामि । किंच भूलोकेऽनिन्द्रा इन्द्रविरहितानामाश्रयभूता महीरुर्वीः । अत एव द्रुहो द्रोहिणामाधारभूतत्वात्स्वयमपि द्रोग्ध्रीः संदहामि । संभूयैकहेलया दहामि । पुनस्ता एव विशेष्यन्ते । यत्र यासु भूमिष्वमित्राः शत्रवोभिव्लग्याभितो गत्वा हताः सर्वतः प्राप्ता अस्माभिर्घातिता वा ......ते सर्वे परि तृळ्हा हिंसिताः...सन्तोऽशेरन् शयनं प्राप्ताः । ...वैलस्थानम् । विलशब्दो गर्तसमानार्थः । स च गर्तः श्मशानवचनः । अतोयमपि श्मशानवाची... । तत्र त्वया हता भूमिं श्मशानवत्कृत्वा सर्वत्र शेरते । तान्दहामीत्यर्थः । इति ॥

## सूक्त १३३.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—इंद्र. वृत्त—पहिली त्रिष्टुप्, २–४ ह्या तीन अनुष्टुभ्, ५वी गायत्री, ६वी धृति, ७वी अत्यष्टि.

१. मी द्युलोक आणि भूलोक या दोन्हींला यज्ञ[हवी]च्या योगानें प्रकाशवितों— मी इंद्रद्रोही मोठ्या असुरांला जाळून टाकितों; ज्याच्या योगानें [ माझे ] शत्रु [पूर्वी] सर्व ठिकाणीं हुडकून काढून मारिले [ गेले आणि ] मसणाच्या सभोंताली तुकडे तुकडे होऊन पडले.

## HYMN 133.

To *Indra*. By *Paruchchhepa*, son of *Divodâsa*. Metre—1 *Trishtubh*, 2–4 *Anushtubh*, 5 *Gâyatrî*, 6 *Dhriti*, and 7 *Atyashti*.

1. By the sacrifice I brighten both heaven and earth— I burn down the great demons, the enemies of Indra; whereby [ my ] enemies were pursued [ before ] on all sides, killed, [ and ] lay hacked around the burying place.

'इंद्राच्या ठायीं वास करितात'='इंद्रे ओक्यं दिधिषन्त.' म्हणजे इन्द्राचेच सेवेंत राहतात, इन्द्राचेंच यश गाण्यास सिद्ध असतात.

६. ही ऋचा 'इन्द्रापर्वतांला' उद्देशून आहे. इन्द्र हा कोण तें प्रसिद्धच आहे. पर्वत म्हणजे मेघरूप देव. हा जो मेघरूप देव, तो आणि इंद्र मिळून 'इंद्रापर्वत.' या 'पर्वत' देवाविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं उच्चार आलेला आहे. 'पर्वत' म्हणजे मेघरूपी देव हा अर्थ सायणांनीं सुद्धा केला आहे.

'दूर लपून राहिलेल्या मनुष्याला मारूं शकतें'='दूरे चत्ताय छन्त्सत्.' या वाक्यांत 'छन्त्सत्' हें क्रियापद कठिण

वृत्तामाठीं दुसऱ्या चरणांत 'अर्चन्ति' आणि 'ओजसा' यांजमध्यें संधि न करणें आणि तिसऱ्यांत 'ओकिअं' असें वाचणें इतकें अवश्य आहे.

आहे. त्याचा आम्हीं केलेला अर्थ सायणांस अनुसरून आहे, पण त्याविषयीं संशय आहे. पाश्चात्य विद्वान् 'दृष्टीस पडतें' अथवा 'दृष्टीस पडूं शकतें' असा अर्थ करितात, पण त्याला सायणांचा आधार कोठेंच सांपडत नसल्यामुळें, आणि दुसऱ्याहि एतद्देशीय व्याख्याकारांचा आधार असल्याप्रमाणें दिसत नसल्यामुळें, तो अर्थ येथें जुळेल तरी आम्ही घेण्यास धजत नाहीं.

हा या सूक्ताचा येथें उपसंहार झाला

**अभिव्लग्या चिदद्रिवः शीर्षा यातुमतीनाम् ।**
**छिन्धि वटूरिणा पदा महावटूरिणा पदा ॥ २ ॥**

अभिऽव्लग्य । चित् । अद्रिऽवः । शीर्षा । यातुऽमतीनाम् ।
छिन्धि । वटूरिणा । पदा । महाऽवटूरिणा । पदा ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हे अद्रिवः (=अद्रिमन्=वज्रिन्) [इन्द्र], [यातुमतीर्द्रुहः] अभिव्लग्य चित् (=अभितः प्राप्यैव यत्र यत्र ता भवेयुस्तत्र तत्र ताः प्राप्य) [तासां] यातुमतीनां (=यातुधानानां=रक्षसां) शीर्षा (=शीर्षाणि) वटूरिणा पदा (="वेष्टनशीलेन सर्वव्याप्तेन त्वदीयपादेन") छिन्धि (=चूर्णय)—महावटूरिणा पदा (=महावेष्टनवता तव पादेन) [छिन्धि] ॥

सायणस्तु यातुमतीनां हिंसावतीनां सेनानाम् । यद्वा यातनसाधनान्यायुधानि यातूनि तद्वतीनाम् । अथवा यातवो रक्षांसि तद्वतीनां सेनानाम् । ... शत्रूणां सेनाः । ... वटूरिणा पदा... अतिविस्तृतेनेत्यर्थः । इति ॥

---

म्हणून ऋषीच्या मनांतील अभीष्ट वर यांत मागितला आहे. 'जो शत्रु आम्हांवर चाल करून येईल त्याला तुम्ही आपल्या सर्वत्र पोंहचणाऱ्या वज्रानें मारून टाका' अशी प्रार्थना करणारे ऋषि गिरिगव्हरीं राहणारे नव्हेत, तर आम्हांप्रमाणेंच संसारांत निमग्न असलेले, शत्रूंपासून उपद्रव पावलेले, पण निष्कपटपणें उपासना करणारे, आणि प्रौढी कांहींच न मिरविणारे असे असावे असें स्पष्ट दिसून येतें.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'छन्त्सअत्' आणि 'इनक्षअत्' असा उच्चार करावा लागतो.

---

१. हेंहि सूक्त पूर्व ऋषीचेंच आहे. पण यांतील सर्व मंत्र जादू मंत्रांप्रमाणें दिसतात. म्हणजे जसा कोणी तरी एकादा जादुगार विस्तवांत कांहीं पदार्थ टाकून म्हणेल कीं, हें मी विस्तवांत जाळीत आहें त्याजबरोबर अमुक मनुष्य जळून मरो; तसा अर्थ प्रायः या सूक्ताच्या सर्व मंत्रांत आहे.

पहिल्या ऋचेंत कर्ता म्हणतो, 'मी द्यावापृथिवीला उद्देशून अग्नींत हविरन्न टाकीत आहें. आणि हें जसजसें जळेल तसतसे इंद्राचे महान् महान् शत्रु जळून भस्म होतील. कारण याप्रमाणेंच माझे शत्रु मी पूर्वी जाळून टाकिले आहेत; मी हवीची आहुति देऊन सर्व ठिकाणीं त्यांचा पाठलाग केला आणि मग त्यांस आम्हीं मारिलें, आणि मग त्यांचे तुकडे तुकडे होऊन ते श्मशानभूमीवर पडून राहिले.'

'प्रकाशवितों'=' पुनामि.' म्हणजे

२. सर्व ठिकाणीं हुडकून काढूनच, हे वज्रधरा, मायावी शत्रूंचीं शिरें तूं वेष्टनबद्ध पायानें चिरडून टाक—महावेष्टनबद्ध पायानें [चिरडून टाक ].

2. Yea, pursue [them], O wielder of the thunderbolt, and crush the heads of the demons, the practisers of sorcery, with thy well-shod foot—with thy highly shod foot.

अग्नीत हवि तूप इत्यादि टाकिल्यानंतर तें जळून जो उजेड पडतो, त्याला अनुलक्षून ऋषि म्हणतो आहे. ' पुनामि ' क्रियापदांचीं प्रयोगान्तरें पाहून आम्हीं येथें भाषांतर केलें आहे.

' इंद्रद्रोही '= ' अनिन्द्राः. ' अक्षरशः ' इन्द्ररहित. ' म्हणजे इन्द्राला न भजणारे, त्याला न मानणारे, तो जसा कीं नाहींच असें समजून वागणारे.

' ज्याच्या योगानें '=' यत्र. ' अक्षरशः ' ज्यांत.' म्हणजे ज्यासारिखी क्रिया पूर्वी केली होती तेव्हां. असा अर्थ केल्याशिवाय निर्वाह लागणार नाहीं असें वाटतें.

२. ' हे इन्द्रा, त्या तुझ्या मायाखोर असुरांला जिकडून तिकडून हुडकून काढून त्यांचीं शिरें आपल्या कठिण पायाखालीं चिरडून टाक ' असा भावार्थ.

' मायावी शत्रूंचीं शिरें '=' शीर्षा यातुमतीनाम्. ' म्हणजे माया प्रगट करणारे जे राक्षस त्यांचीं. ' यातु' म्हणजे माया, अथवा चेटक. हा शब्द फार महत्त्वाचा आहे. त्याचा अपभ्रंश ' जादु ' शब्द आलीकडील भाषेंत आबालवृद्धांच्या तोंडीं असतो त्यावरून सर्वांस ठाऊक आहे. शब्द कधीं मरत नाहींत असा जो वैय्याकरणांचा सिद्धांत, त्यानें एक उदाहरण हें चांगलें आहे. शब्दाचें रूप बदलतें, पण बदललेलें रूप तरी राहतें. ' यातु ' शब्द फार प्राचीन आहे इतकेंच नाहीं, पण तो अपभ्रंशरूपानें लोकांच्या तोंडीच जणुं हजारों वर्षेपर्यंत जगला आहे.

' वेष्टनबद्ध पायानें'='वटूरिणा पदा.' म्हणजे ज्या पायांत वाहणा वगैरे घातल्या होत्या अशा पायानें. शब्दशः अर्थ सायणानुसारी आहे. ' वटूरिन् ' अथवा 'महावटूरिन्' शब्द पुनः आलेला नाहीं, त्यावरून प्रमाणदार्ढ्याकरितां उदाहरणें देतां येत नाहींत.

वृत्तासाठीं ' यातुमतीनआम् ' असें म्हणावें लागतें.

**अवासां मघवञ्जहि शर्धो यातुमतीनाम् ।**

**वैलस्थानके अर्मके महावैलस्थे अर्मके ॥ ३ ॥**

अव । आसाम् । मघऽवन् । जहि । शर्धः । यातुऽमतीनाम् ।

वैलऽस्थानके । अर्मके । महाऽवैलस्थे । अर्मके ॥ ३ ॥

**यासां तिस्रः पञ्चाशतोऽभिव्लङ्गैरपावपः ।**

**तत्सु ते मनायति तकत्सु ते मनायति ॥ ४ ॥**

यासाम् । तिस्रः । पञ्चाशतः । अभिऽव्लङ्गैः । अपऽअवपः ।

तत् । सु । ते । मनायति । तकत् । सु । ते । मनायति ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. हे मघवन् (=धनवन्निन्द्र), आसां यातुमतीनां (=मायाविनीनां द्रुहां=यातुधानानां) शर्धः (=बलं=गणम्) अर्मके (=कुत्सिते) वैलस्थानके (=श्मशाने)—अर्मके (=कुत्सिते) महावैलस्थे (=महाश्मशाने) अव जहि (=अवचूर्णय) ॥

यातुमतीनां यातनसाधनान्यायुधानि यातूनि । तद्वतीनां यातुधानवतां वा सेनानाम्...... अव जहि । चूर्णय । तथा कृत्वा चार्मके कुत्सितं शवैरारणीये वैलस्थानके......क्षपयेति शेषः । इत्यादिकं सायणः ॥

४. यासाम् (=अपि च तासां मध्ये) तिस्रः पञ्चाशतः (=त्रिगुणितपञ्चाशत्संख्याका द्रुहः=असुरान्) अभिव्लङ्गैः (=अभिगमनैः=यत्र यत्र ता भवेयुस्तत्र तत्र ताः प्राप्य) अपावपः (=नाशितवानसि) तत् [तव चरितं] ते सु मनायति (=तुभ्यं सुष्ठु संभावयति=त्वां सुष्ठु तोषयति)—तकत् (=तत्) ते सु मनायति (=तुभ्यं=त्वां सुष्ठु तोषयति) ॥

तत् सु ते इत्यत्र किंच हे इन्द्र तवाध्यर्धशतशत्रुसेनाजयरूपं महदपि तकदिति सु मनायति । अत्यल्पमिदमिति सुष्ठु मन्यते । इति सायणः ॥

३. हे मघवन्, या मायावी शत्रूंचा गण तूं मारून टाक; नीच मसणांत, मोठ्या वाईट मसणांत, [मारून टाक ].

४. आणि [ हे इंद्रा ], त्यांजमधून जो तूं तिप्पट पंनास जण पाठीस लागून लागून मारून टाकिता झालास, तो [तुझा पराक्रम] तुला फार आनंदित करितो—तो [ तुझा पराक्रम ] तुला फार आनंदित करितो.

3. Strike down, O Maghavan, the troop of these demons, the practisers of sorcery, [ strike ] in a base burial ground—in a base burial ground of great magnitude.

4. And that thou didst cut down after pursuing three [times] fifty of these, pleases thee much— that pleases thee much.

---

३. हाहि मंत्र वरच्या दोन मंत्रांप्रमाणेंच जारणमारणसंबंधीच आहे. आणि वरील मंत्राप्रमाणेंच यांतहि असुरांचा नाश इंद्रानें करावा अशी प्रार्थना ऋषीनें केलेली आहे.

वृत्तासाठीं पुनः येथेंहि 'यातुमतीनआम् ' असें म्हणावें लागतें.

४. ' आणि हे इंद्रा, या राक्षसांमधून शेकडो तूं पूर्वी पाठीस लागून लागून मारून टाकिले, तो तुझा पराक्रम तुला आनंद उत्पन्न करीत असतो; म्हणजे, त्याची तुला आठवण झाली म्हणजे, तुला संतोष होत असतो. '

' आणि त्यांजमधून '=' यासाम्. ' म्हणजे वर जे राक्षस अथवा चेटक करणारे असुर सांगितले, त्यांतून.

वृत्तसुखार्थ 'पञ्चाशतः। अभिवृङ्क्ष्व०' असें म्हणावें; आणि तिसऱ्या चरणांत ' मनायति ' याचे ठिकाणीं ' मनआयति ' असें म्हणावें.

**पिशङ्गभृष्टिमम्भृणं पिशाचिमिन्द्र सं मृण ।**
**सर्वं रक्षो नि बर्हय ॥ ५ ॥**

पिशङ्गऽभृष्टिम् । अम्भृणम् । पिशाचिम् । इन्द्र । सम् । मृण ।
सर्वम् । रक्षः । नि । बर्हय ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. हे इन्द्र, पिशङ्गभृष्टिम् (=ईषद्रक्तवर्णम्) अम्भृणम् (=अतिशयेन भयंकरं शब्दायमानं) पिशाचिं (=पिशाचविशेषं) सं मृण (=सम्यक् नाशय)। [अपि च] सर्वं रक्षः (=सर्वाणि रक्षांसि) नि बर्हय (=नितरां जहि) ॥

पिशङ्गभृष्टिपदं वयमनुसायणं व्याख्यातवन्तः। पाश्चात्यास्तु केचित् सुवर्णवर्णशिखरार्थकमित्याहुः। अम्भृणमतिभयंकरं शब्दायमानम्। भ्रण शब्दे। ... यद्वा महान्तम्। अतिप्रवृद्धमित्यर्थः। अम्भृण इति महन्नाम। अम्भृणो माहिन इति तत्र पाठात्। ... पिशाचिं पिशाचविशेषम्। जरामित्येके। इत्यादि सायणः ॥

५. हे इंद्रा, किंचित् पिंगट रंगाचा [ आणि ] भयंकर रीतीनें ओरडणारा [जो] पिशाच [त्या]ला तूं मारून टाक. प्रत्येक राक्षसाला तोडून टाक.

5. Cut thou down, O Indra, the yellow [and] frightfully yelling goblin. Cut thou down every demon.

५. 'आणि हे इन्द्रा, पिवळ्या रंगाचा जो मोठा भयंकर ओरड मारणारा पिशाचविशेष, त्याला तूं मारून टाक—आणि दुसरेहि असुर असतील त्या प्रत्येकाला मारून टाक ' असा अभिप्राय.

यांत जो पिशाचविशेष, म्हणजे कोणी एक प्रसिद्ध पिशाच सांगितला आहे, तो वेदकाळींच्या लोकांत सर्वांस ठाऊक असलेला आणि सर्वांस भीति उत्पन्न करणारा असा कोणी तरी असावा. पिवळ्या रंगाचा आणि भयंकर शब्द करणारा कां? असें विचारल्यास उत्तर इतकेंच की, पिशाच, राक्षस, असुर इत्यादिक योनि या पृथिवीवर आहेत आणि त्या आम्हां मानवांला उपद्रव करितात असें एकदा मानूं लागलें म्हणजे, त्यांत वेगळे वेगळे प्रकार आहेत असें मानूं लागतात. कोंकणांत भूतांचें बंड फार आहे. तेथें आळवंत, समंध, देवचार, ब्रह्मराक्षस, झोटिंग, मुंज्या इत्यादिक अनेक प्रकार भूतांचे आहेत. त्यांतून आळवंतीला फुलें आवडतात, ती बहुतकरून तरुण स्त्रियांवर बसत असते. देवचार आणि झोटिंग हे फार दांडगे, अडाणी, अशिक्षित असतात, त्यांच्या अंगावर धोत्रें नसतात, तर घोंगड्या असतात, आणि ते बहुतकरून कुणब्यांला लागतात; समंध हा बहुतकरून ब्राह्मणांला लागतो, तो फार चतुर असतो, पुरुषांलाहि लागतो आणि बायकांलाहि लागतो, तो बहुतकरून आपल्या वंशजांला लागतो, अथवा त्याचें वित्तादिक हरण करणाऱ्याला लागतो, भलत्याच मनुष्याला आळवंतीसारिखा लागत नसतो. ब्रह्मराक्षस बहुतकरून पिंपळाच्या झाडावर वास करितो; मुंज्या फार पोरकट असतो. इत्यादिक त्यांचे विशेष गुण आहेत असें कां मानितात? तर आळवंत म्हणजे बहुतकरून तरुण स्त्री गरोदर अथवा बाळंतीण मेली म्हणजे होत असते, म्हणून ती तरुण स्त्रियांला लागते. झोटिंग आणि देवचार हे कुणबी मरून झालेले असतात, म्हणून ते घोंगडी पांघरतात. इत्यादि समजुती आहेत. त्याप्रमाणें प्रस्तुत मंत्रांत सांगितलेल्या पिंवळ्या रंगाच्या पिशाचाविषयीं समजलें पाहिजे. आर्य लोकांचे आसपास राहणारे जे काळे आणि तांबसर रंगाचे कोळी मांग वगैरे लोक

**अवर्मह इन्द्र दादृहि श्रुधी नः शुशोच हि द्यौः क्षा न भीषाँ अद्रिवो घृणान्न भीषाँ अद्रिवः ।**
**शुष्मिन्तमो हि शुष्मिभिर्वधैरुग्रेभिरीयसे ।**
**अपूरुषघ्नो अप्रतीत शूर सत्वभिस्त्रिसप्तैः शूर सत्वभिः ॥ ६ ॥**

अवः । महः । इन्द्र । ददृहि । श्रुधि । नः । शुशोच । हि । द्यौः । क्षाः । न । भीषा । अद्रिऽवः । घृणात् । न । भीषा । अद्रिऽवः ।
शुष्मिन्ऽतमः । हि । शुष्मिऽभिः । वधैः । उग्रेभिः । ईयसे ।
अपुरुषऽघ्नः । अप्रतिऽइत । शूर । सत्वऽभिः । त्रिऽसप्तैः । शूर । सत्वऽभिः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे इन्द्र, महः (=महतो) [वृत्रादीन् असुरान्] अवदादृहि (=अवदारय) [एतस्मिन् विषये] नः श्रुधि (=अस्मान् शृणु=अस्माकं वचनं शृणु)। हि (=यस्मात् कारणात्) हे अद्रिवः (=वज्रिन्), द्यौः क्षा न (=द्यौस्तथा पृथिव्यपि) भीषा (=भयेन) शुशोच (=दिदीपे=संतप्ताभूत्)—हे अद्रिवः (=वज्रिन्), घृणात् न भीषा (=अग्नेर्भीत्वेव) [शुशोच=संतप्ताभूत्] । शुष्मिन्तमः (=अतिशयेन बलवान्) [त्वं] हि शुष्मिभिः (=बलवद्भिर्) उग्रेभिः (=उग्रैः=उद्गूर्णैरतिक्रूरैर्) वधैः (=शस्त्रैर्) ईयसे (=शत्रुमभि गच्छसि) । हे सत्वभिः (=योद्धृभिर्) अप्रतीत (=अप्रतिगत) शूर (=विक्रान्त),—त्रिसप्तैः सत्वभिः (=त्रिगुणितसप्तसंख्याकैर्वीरैर्) [अप्रतीत] हे शूर (=विक्रान्त), अपुरुषघ्नः (=मनुष्याणामहननशीलस्त्वं) [वधैरीयसे=शस्त्रैः सह शत्रुमभि गच्छसि] ॥

सायणस्तु महो महतो मेघस्य ॥ कर्मणि षष्ठी । महान्तं जलधारिणं मेघं महान्तं वृत्रं वा ...... । ...... शुशोच शोचति वृष्ट्यभावेन हविराद्यभावादिति भावः । ...... असुरपक्षे लोकद्वयमावृत्य प्रवर्धमानं धर्तुमसहमाने द्यावापृथिव्यौ शोचत इत्यर्थः । तस्मात् श्रुधीति पूर्वेत्रान्वयः । ...... तादृशभीतिं वृष्टिप्रदानेन परिहरेत्यर्थः ...... ईयसे । शत्रून् मेघान्वा गच्छसि । इत्यादि ॥

६. हे इंद्रा, तूं मोठ्या [असुरां]ला विदारून टाक, आमची प्रार्थना ऐक. कारण कीं हे वज्रधरा, भूलोकाप्रमाणेंच द्यू [सुद्धां] भयानें संतप्त झाला आहे—हे वज्रधरा, अग्नीमुळें जणुं भीतीनें [संतप्त झाला आहे]. अतिशयेंकरून बळवान् [असा जो तूं, तो] प्रबळ [आणि] प्रतापी शस्त्रें घेऊन धांवत असतोस. मनुष्यांला न मारणारा [असा जो तूं,] तो हे योद्ध्यांनीं अप्रतिगत शूरा—हे तिप्पट सात योद्ध्यांनीं [अप्रतिगत] शूरा, [प्रबळ आणि प्रतापी शस्त्रें घेऊन धांवत असतोस].

6. Crush down, O Indra, the great [demons], hear us. For the heaven like the earth is, O wielder of the thunderbolt, burning through fear—[is burning], O wielder of the thunderbolt, through fear as if of fire. Thou, who art most powerful, runnest with powerful [and] strong weapons, thou who dost not kill men, O thou hero who art not resisted by heroes—O thou hero, [who art not resisted] by thrice seven heroes, [runnest with powerful and strong weapons].

---

राहत असत, त्यांतून कोणी तरी मेला म्हणजे त्याचा पिशाच होतो, तो त्या रंगाचा होतो आणि तो मोठ्यानें ओरडतो, अशी कांहीं तरी समजूत असावी असें वाटतें.

कौतुकबन्धन म्हणून जें कर्म करितात त्यांत, आणि श्राद्धांत, आणि 'शांतिपाठां'त आणि 'रात्रिसूक्तां'त या मंत्राचा पाठ म्हणतात. कारण 'पिशाचि' शब्द यांत आला आहे!

---

६. 'हे इंद्रा, अवर्षणामुळें प्रखर ताप पडला आहे, आणि तेणेंकरून पृथिवी आणि अंतरिक्षादि उपरिप्रदेश हे दोन्ही भयानें संतप्त झाले आहेत. आणि ही सर्व आपदा वृत्रादिक जे मोठे असुर, त्यांच्या योगानें झाली आहे. तर तूं त्यांला आपल्या प्रबळ शस्त्रांनीं मारून टाक, ही आमची प्रार्थना तूं ऐक. तूं त्या असुरांला सहज मारून टाकूं शकशील; कारण अनेक असुर जरी तुझ्या आंगावर आले, तरी ते तुला प्रतिबंध करूं शकत नाहींत' असा भावार्थ आहे.

'धांवत असतोस'=' ईयसे.' म्हणजे शत्रूच्या आंगावर चालून जात असतोस.

'अप्रतिगत'=' अप्रतीत.' म्हणजे ज्याजवर दुसरे वीर चाल करून जात

वनोति हि सुन्वन्क्षयं परीणसः सुन्वानो हि ष्मा यजत्यव द्विषो देवानामव द्विषः ।
सुन्वान इत्सिषासति सहस्रा वाज्यवृतः ।
सुन्वानायेन्द्रो ददात्याभुवं रयिं ददात्याभुवम् ॥ ७॥ २२ ॥ १९॥

वनोति । हि । सुन्वन् । क्षयम् । परीणसः । सुन्वानः । हि । स्म । यजति । अव । द्विषः । देवानाम् । अव । द्विषः ।
सुन्वानः । इत् । सिसासति । सहस्रा । वाजी । अवृतः ।
सुन्वानाय । इन्द्रः । ददाति । आऽभुवम् । रयिम् । ददाति । आऽभुवम् ॥ ७ ॥ २२ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

७. सुन्वन् हि (=सोमाभिषवणं कर्ता भक्त एव) क्षयं वनोति (=स्थानं=गृहं प्राप्नोति)। सुन्वानो हि स्म (=सोमाभिषवणं कर्ता भक्त एव) परीणसः (="परितो नद्धान् संवद्धान्"=बहून्) द्विषः (=शत्रून्) अव यजति (=नाशयति)—देवानां द्विषः (=देवानां द्वेष्टॄन्= शत्रून्) अव [यजति] (=नाशयति)। सुन्वानः इत् (=सोमाभिषवस्य कर्ता भक्त एव) वाजी (=बलवान् भूत्वा) अवृतः (=शत्रुभिः अवेष्टितः सन्) सहस्रा (=सहस्राणि) [धनानि] सिषासति (=युद्धे लभते)। सुन्वानाय (=सोमाभिषवस्य कर्त्रे भक्तायैव) इन्द्रः आभुवं (=प्रभूतं) [रयिं] ददाति—आभुवं रयिं (=प्रभूतं धनं) ददाति ॥

सुन्वन् हे इन्द्र त्वामुद्दिश्याभिषवं कुर्वन् यजमानः। ... अवृतः परैरनाक्रान्तः सन्। इति सायणः ॥

नाहींत, अथवा ज्याला दुसरे वीर जिंकू शकत नाहींत असा.

'तिप्पट सात योद्ध्यांनीं'=' त्रिसप्तैः सत्वभिः' म्हणजे एकवीस वीरांनीं. एकवीस ही परिमित संख्या अपरिमित संख्यार्थीं योजिली आहे असें वाटतें.

या ऋचेचें वृत्त धृति आहे. 'धृति' म्हणजे अत्यष्टीप्रमाणेंच असतें, मात्र चार अक्षरें अधिक असतात. प्रस्तुत ऋचेंत हीं चार अक्षरें एकत्र पादांत नसतां, पहिल्या चरणाच्या पहिल्या पोटचरणांत 'नः' हें एक, आणि तिसऱ्या चरणांतील पहिल्या पोटचरणांत 'सत्वभिः' हीं तीन अक्षरें मिळून चार अधिक समजावयाचीं आहेत. मग ऋचा खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावी लागते:—

७. कारण सोम काढणारा भक्तच गृहाप्रत पावतो, आणि सोम काढणारा भक्त अनेक द्वेष्ट्यांला [जिंकून] टाकितो. देवांच्या द्वेष्ट्यांला [जिंकून] टाकितो. सोम काढणारा भक्तच बळवान् [होऊन] [शत्रूंहीं] अवेष्टित होत्साता सहस्र धनांप्रत जिंकितो. सोम काढणाऱ्या भक्तालाच इंद्र विपुळ [संपत्ति] देतो—विपुळ संपत्ति देतो.

7. For the Soma-extractor obtains a house; the Soma-extractor alone overpowers the manifold enemies— [overpowers] the enemies of the gods. The Soma-extractor alone, endowed with power, wins a thousand booties, unsurrounded [by the enemy]. To the Soma-extractor alone Indra gives bounteous [wealth]—gives bounteous wealth.

अवर्महः इन्द्र दादृहि श्रुधी । नः ।
शुशोच हि द्यौः क्षा न भीषाँ अद्रिवो।
घृणान्न भीषाँ अद्रिवः । १
शुष्मिन्तमो हि शुष्मिभिर्
वधैरुग्रेभिरीयसे । २ ।
अपूरुषघ्नो अप्रतीतशूर । सत्वभिः ।
त्रिसप्तैः शूर सत्वभिः ॥ ३ ॥

७. या मंत्रांत सोम काढून इंद्राला अर्पण करणाऱ्या भक्ताचें श्रेष्ठत्व आणि भाग्य वर्णिलें आहे. 'सोमयाजीच गृहसंपन्न होतो. सोमयाजीच देवांला न भजणाऱ्या अनेक द्वेष्ट्यांला जिंकितो. सोमयाजीच युद्धांत प्रबळ ठरतो. आणि त्याला शत्रु घेरूं शकत नाहींत, तर तोच शत्रूंचीं हजारों धनें लुटून नेऊं शकतो. सोमयाजीलाच इंद्र पुष्कळ धन देतो—सोमयाजीलाच देतो, दुसऱ्याला देत नाहीं.'

'गृहाप्रत पावतो'=' वनोति क्षयम्.' म्हणजे त्यालाच घरदार प्राप्त होऊन तत्संबंधी सुख मिळतें; किंवा शत्रूचा देश मिळून त्याजवरील अधिकार प्राप्त होतो. कितीएक पश्चिमेकडील विद्वान् 'परीणसः क्षयम्' म्हणजे 'संपत्तीचें स्थान' असा अर्थ करितात. आणि 'परीणसः' या पदाच्या सरळ अन्वयाकडे पाहिलें तर तो त्यासारिखा एखादा अर्थ पाहिजे, असें दिसतें खरें; पण सायणांनीं 'परीणस्' म्हणजे संपत्ति हा अर्थ कठिण केल्याप्रमाणें दिसत नाहीं.

हा येथें सूक्ताचा उपसंहार झाला. आपल्यासारिखे जे सोमयाजी त्यांचें इंद्र कसें कल्याण करितो तें ऋषीनें यांत सांगितलें आहे.

या ऋचेचें वृत्त 'अत्यष्टि' आहे.

## सूक्तम् १३४.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । वायुर्देवता । अत्यष्टिश्छन्दः ॥

**आ त्वा जुवो रारहाणा अभि प्रयो वायो वहन्त्विह पूर्वपीतये सोमस्य पूर्वपीतये ।**
**ऊर्ध्वा ते अनु सूनृता मनस्तिष्ठतु जानती ।**
**नियुत्वता रथेना याहि दावने वायो मखस्य दावने ॥ १ ॥**

आ । त्वा । जुवः । ररहाणाः । अभि । प्रयः । वायो इति । वहन्तु । इह । पूर्वऽपीतये । सोमस्य । पूर्वऽपीतये ।
ऊर्ध्वा । ते । अनु । सूनृता । मनः । तिष्ठतु । जानती ।
नियुत्वता । रथेन । आ । याहि । दावने । वायो इति । मखस्य । दावने ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे वायो, जुवः (=जवशीलास्त्वरिता) रारहाणाः (=अतिशयेन गमनशीलाः=शीघ्रतमास्) [तवाश्वाः] अभि प्रयः (=एतद्धविरभिलक्ष्य) पूर्वपीतये (=पूर्वपानाय) त्वा (=त्वाम्) इह आ वहन्तु (=आनयन्तु)—सोमस्य पूर्वपीतये (=सोमस्य पूर्वपानाय-इतरदेवेभ्यः पुरा सोमं पातुम्) [आ वहन्तु] । जानती (=तव गुणान् विजानती) [अस्माकं] सूनृता (=स्तुतिरूपा वाक्) ते (=तव) मनः अनु (=मनोनुलक्ष्य=मनसोनुकूला भूत्वा) ऊर्ध्वा तिष्ठतु (=आज्ञाकरणाय सिद्धा सती तिष्ठतु) । [त्वं] नियुत्वता रथेन (=अश्वयुक्तेन रथेन=अश्वयुक्तं रथमारुह्य) दावने (=हविःस्वीकरणाय) आ याहि (=आगच्छ)—हे वायो, मखस्य दावने (=हविषः स्वीकरणाय) [आ याहि] ॥

मखस्य यज्ञस्य दावने दातव्याय हविषे तत्स्वीकारायेति सायणः ॥

---

पहिल्या चरणांतील दुसऱ्या पोटचरणांत 'यजति अव,' दुसऱ्यांत 'देवानाअम्,' दुसऱ्या चरणांतील दुसऱ्या पोटचरणांत 'वाजी अवृतः,' आणि तिसरा चरण 'सुन्वानाय इन्द्रो ददाति आभुवं । रयिं ददाति आभुवम्' असा म्हणावा लागतो.

## सूक्त १३४.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—वायु. वृत्त—अत्यष्टि.

१. हे वायू, [ तुझे ] चपळ, [ आणि ] वेगवंत [ घोडे ] प्रथम [ सोम ] पिण्यासाठीं तुला [ या ] हवीप्रत इकडे वाहून आणोत—सोम प्रथम पिण्यासाठीं [ वाहून आणोत ]. तुझ्या मनासमोर [ आमची ] जाणती स्तुति उभी राहून तें प्रसन्न करो. हे वायू, घोडे जोडिलेल्या रथांत बसून तूं हवीसाठीं ये—हवि स्वीकारण्यासाठीं ये.

## HYMN 134.

To *Vâyu* ( i. e. the god of wind ). By *Paruchchhepa*, the son of *Divodâsa*. Metre—*Atyashti*.

1. May [thy] swift [and] quickly-running [ horses ] bring thee hither, O Vâyu, to the oblation for drinking first—for drinking of the Soma first. May [ our ] knowing prayer stand obediently before thy mind. Come thou in [ thy ] car drawn by many horses to receive—O Vâyu, to receive the offering.

---

१. हें सूक्त ‘ वायु ’ या देवाविषयीं आहे. वायु देव म्हणजे कोण, तें सू. २ मं. १–३, सू. २३ मं. १, सू. १४ मं. १०, आणि त्यांजवरील टिपा यांत पहा.

‘ सोम प्रथम पिण्यासाठीं ’=‘ सोमस्य पूर्वपीतये. ’ म्हणजे सकळ देवांच्या पूर्वींच तूं प्यावास म्हणून, असा भावार्थ आहे, सकळ अन्नाच्या पूर्वी, असा नाहीं.

‘ जाणती ’=‘ जानती. ’ म्हणजे तुझे गुण काय आहेत, आणि तुला प्रसन्न कसें करावें तें जाणणारी.

‘ उभी राहून तें प्रसन्न करो ’=‘ ऊर्ध्वा अनु तिष्ठतु.’ म्हणजे तुझ्या मनातें प्रसन्न करूं शके अशा रीतीनें त्यासमोर ती उभी राहो. आमचें भाषांतर किंचित् अक्षरास सोडून आहे, तरी अर्थास सोडून नाहीं.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ‘ वहन्तु इह ’ असें व्यस्त म्हणावें लागतें.

**मन्दन्तु त्वा मन्दिनो वायविन्दवोऽस्मत्क्राणासः सुकृता अभिद्यवो**
**गोभिः क्राणा अभिद्यवः ।**
**यद्ध क्राणा इरध्यै दक्षं सचन्त ऊतयः ।**
**सध्रीचीना नियुतो दावने धिय उप ब्रुवत ईं धियः ॥ २ ॥**

मन्दन्तु । त्वा । मन्दिनः । वायो इति । इन्दवः । अस्मत् । क्राणासः ।
सुऽकृताः । अभिऽद्यवः । गोभिः । क्राणाः । अभिऽद्यवः ।
यत् । ह । क्राणाः । इरध्यै । दक्षम् । सचन्ते । ऊतयः ।
सध्रीचीनाः । निऽयुतः । दावने । धियः । उप । ब्रुवते । ईम् । धियः ॥२॥

## भाषायाम्.

२. हे वायो, मन्दिनः (=मादयितारः) क्राणासः (=क्राणाः=स्वकार्यं सम्यग्यथा तथा कुर्वाणाः) (=सुकृताः सुष्ठु कृताः=सम्यग्यथा तथा अभिषुता) अभिद्यवः (=अभिगतदीप्तयः=उत्कृष्टाः)—गोभिः (=पयआदिभिर्गोरसैः) क्राणाः (=वेगवन्तः) अभिद्यवः (=दीप्तिमन्तश्च) अस्मत् (=अस्मत्तो गता) इन्दवः (=सोमरसास्) त्वा मन्दन्तु (=त्वां मादयन्तु=हर्षयन्तु) । यत् ह (=यतः खलु) क्राणाः (=वेगवन्तः) ऊतयः (=तव सहायभूता) नियुतः (=तवाश्वाः) सध्रीचीनाः (=परस्परं संगच्छमानाः सन्तो) दक्षं (=बलवन्तं त्वाम्) इरध्यै (=परिचरितुं) दावने धियः (=उपासकानां कर्मणः स्वीकाराय=उपासकानां कर्म त्वं यथा स्वीकरोषि त्वां तथा) सचन्ते (=त्वया सह संगच्छन्ते)—धियः (=उपासकानां कर्मणो) [दावने=स्वीकाराय] उप ब्रुवते (=त्वां विज्ञापयन्ति) ॥

सायणस्त्वेवं व्याचष्टे । हे वायो, त्वा त्वामस्मदस्माकं संबन्धिन इन्दवः क्लेदयितारः सोमा मन्दन्तु मादयन्तु ॥ व्यत्ययेन परस्मैपदम् । कीदृशाः सोमाः । मन्दिनो मादयितारः क्राणासः कुर्वाणाः स्वकार्यं हर्षादिकं सुकृता अभिषवदशापवित्रशोधनग्रहणादिभिः सुष्ठु कृताः । अभिद्यवोऽभितो द्योतयन्तो गोभिर्वाग्भिर्मन्त्ररूपाभिः क्राणाः क्रियमाणा हूयमानाः । यद्वा गोभिर्गन्तृभिराहवनीयं प्रत्यानेतृभिः क्राणा हूयमानाः ॥ करोतेः शानच् । छान्दसः शपो लुक् । तथाभिद्यवोऽभिगन्तारः । हे वायो यत् यस्मात्कारणात् । हशब्दः प्रसिद्धौ । दक्षमस्मद्यागदेशं प्रतिगन्तुमुत्साहवन्तं समर्थयितारमीं त्वां नियुत एतत्संज्ञकास्तवाश्वा दावने दानाय हविःस्वीकारनिमित्तं धियः कर्माण्युद्दिश्य सचन्ते । त्वां संगच्छन्ते यागदेशं वा । किमर्थं । इर-

ध्यै ॥

२. हे वायू, आमचे आनंदकारक, वेगवंत, उत्तम रीतीनें सिद्ध केलेले [ आणि ] देदीप्यमान सोम—गोरसांच्या योगानें वेगवंत [आणि] देदीप्यमान [केलेले ] [ असे सोमरस ], तुला आनंदित करोत. कारण तुज उत्साहवंताची सेवा करण्यासाठीं वेगवंत [ आणि ] [तुला] साहाय्य करणारे तुझे घोडे सर्व एकत्र मिळून, [ तुजकडून ] उपासनेचा स्वीकार करविण्यासाठीं तुजबरोबर येतात—उपासनेचा [ तूं स्वीकार करावास म्हणून ] तुझी विनवणी करीत असतात.

2. O Vâyu, may our exhilarating, active, well-prepared [and] shining Somas,—active [and] shining with milk and things made of milk—exhilarate thee; because thy horses, [ thy ] active allies, all joined together, accompany thee who art powerful, to be on attendance on thee, that thou mayest accept [ the offering ]—they urge thee [ to the acceptance ] of the offering.

---

२. 'हे वायू, हे जे आम्हीं फार श्रम करून उत्कृष्ट रीतीनें काढिलेले, लवकर माद उत्पन्न करणारे, आणि चकचक प्रकाशणारे, आणि दूध इत्यादि गोरस मिसळल्यामुळें लखलखीत दिसणारे आमचे सोमरस, ते तुला लवकर माद आणोत—म्हणजे तुला लवकर हर्षयुक्त करोत. कारण कीं आम्हीं उपासकांनीं तुजप्रीत्यर्थ केलेली उपासना तूं स्वीकारावी आणि आमचा सोमरस तूं प्यावास म्हणून तुझे घोडे सुद्धा तुला प्रार्थीत आहेत ते पहा,' असा भावार्थ आहे. पण या ऋचेचे दुसरे दोन चरण किंचित् कठीण आहेत, आणि त्यांचा अर्थ जरा क्लिष्ट अशा रीतीनें करावा लागतो. पहिला चरण सोपा आहे.

'वेगवंत '=' क्राणासः. ' अक्षरशः अर्थ '[ आपलें काम ] करणारे ' असा आहे, म्हणजे माद उत्पन्न करणें हें जें त्यांचें काम, तें चांगल्या रीतीनें बजाविणारे.

'गोरसांच्या योगानें '=' गोभिः.' म्हणजे दूध इत्यादिक त्यांत मिसळल्यामुळें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'इन्दवः। अस्मत् ' असें व्यस्त म्हणावें, आणि दुसऱ्या चरणांत 'इरधिऐ' असें म्हणावें.

**वायुर्युङ्क्ते रोहिता वायुरुरुणा वायू रथे अजिरा धुरि वोळ्हवे वहिष्ठा धुरि वोळ्हवे ।**
**प्र बोधया पुरंधिं जार आ ससतीमिव ।**
**प्र चक्षय रोदसी वासयोषसः श्रवसे वासयोषसः ॥ ३ ॥**

वायुः । युङ्क्ते । रोहिता । वायुः । अरुणा । वायुः । रथे । अजिरा । धुरि । वोळ्हवे । वहिष्ठा । धुरि । वोळ्हवे ।
प्र । बोधय । पुरम्ऽधिम् । जारः । आ । ससतीम्ऽइव ।
प्र । चक्षय । रोदसी इति । वासय । उषसः । श्रवसे । वासय । उषसः ॥ ३ ॥

---

ध्यै । प्रापयितुं परिचरितुं वा । ईर गतौ । तुमर्थे कध्यैप्रत्ययः । ह्रस्वश्छान्दसः । इरध्यतिः परिचरणकर्मा । इरध्यति विधेमेति तन्नामसूक्तत्वात् ॥ कीदृशास्ताः । काणाः । स्वव्यापारं रथवाहनादिकं कुर्वाणाः ॥ काणा कुर्वाणाः इति यास्कः । ऊतयः । रक्षणवन्तः प्रीतियुक्ता वा तथा सध्रीचीनाः । त्वया सहाञ्चन्तो गच्छन्तः । ...... ॥ किंच धियः कर्मवन्तो बुद्धिमन्तो वा ऋत्विजो यजमाना वोपब्रुवते उपेत्य ब्रुवन्ति स्वाभिमतं विज्ञापयन्ति वा । इति ॥

---

## भाषायाम्.

३. वायुः रोहिता (=रोहितौ) [ अश्वौ ] [ कदाचित् ] युङ्क्ते ( =स्वरथे नियोजयति ) । वायुः अरुणा ( =अरुणौ=आरक्तवर्णावश्वौ ) [ युङ्क्ते ] वायुः अजिरा (=अजिरौ=गमनशीलौ=शीघ्रगमनावश्वौ ) वोळ्हवे (=वोढवे=रथं वोढुं ) धुरि (=धारणप्रदेशे ) रथे ( =स्वरथे ) [ युङ्क्ते=योजयति ]—वोळ्हवे ( =वोढवे=वोढुं ) धुरि (=धारणप्रदेशे=रथस्याग्रभागे ) वहिष्ठा (=अतिशयेन वोढारौ ) [ अश्वौ ] [ युङ्क्ते ] । [ हे वायो ], जारः आ ससतीम् इव (=कश्चिज्जारः स्वपन्तीमिव=स्वपन्तीं स्वकान्तां यथा जागरयति तथा ) पुरंधिं (=बहुप्रज्ञाम् ) [ उषसं ] प्र बोधय ( जागरय ) [ अपि च ] उषसः वासय (=ता यथा व्युच्छन्ति तथा कुरु ) रोदसी [ च ] प्र चक्षय (=द्यावापृथिव्यौ च प्रकाशय )—उषसः श्रवसे वासय (=उषसः उच्छित्वा यथा अस्मभ्यमन्नं ददति तथा कुरु ) ॥

वोळ्हवे । धुरं वोढुं भारवहनाय । ...... । तत्र दृष्टान्तः । जारः पारदारिक

३. वायु [आपल्या] रथाला [केव्हां केव्हां] तांबडे [घोडे] जोडितो, वायु आरक्त वर्णाचे [जोडितो]. वायु [केव्हां केव्हां] चपळ घोडे [रथ] वाहण्यासाठीं धुरेला [जोडितो]—धुरेला अतिशय चपळ असे घोडे [रथ] वाहण्यासाठीं जोडितो. हे वायू, जार [जसा] निजलेल्या [प्रिये]ला [उठवितो], तसा तूं प्रज्ञावती [उषे]ला निजेंतून उठीव. तूं उषांला उगवायास लाव [आणि] त्यांजकडून द्युलोक आणि भूलोक या दोन्हींवर प्रकाश पाडीव—उषांनीं [आम्हांला] अन्नसंपत्ति द्यावी म्हणून त्यांजला प्रकाशावयास लाव.

3. Vâyu harnesses a pair [of] red [horses], Vâyu [harnesses] a pair of tawny [horses], Vâyu harnesses a pair of swift [horses] to the chariot at the yoke, to draw—a pair of the swiftest [horses] to the yoke, to draw. Wake, O Vâyu, intelligent [Ushas], even as a lover [wakes his sleeping love. Make [the Ushases] shine on earth and heaven, make the Ushases to dawn —make the Ushases to dawn for [to give] [us] food.

---

३. 'वायु अनेक वेळीं अनेक रंगाचे घोडे आपल्या रथाला जोडितो, आणि त्यांजकडून आपला रथ ओढवितो; एक वेळ तांबडे, एक वेळ अरुण वर्णाचे, एक वेळ फार चपळ असे घोडे धुरेला जोडितो. ते अत्यंत चपळ असतात. तर हे वायू, तसले घोडे तूं आपल्या रथाला जोडून ये, आणि एखादा जार आपल्या प्रियेला उठवितो तसा तूं बुद्धिमान् उषेला उठीव, आणि तिजकडून द्युलोक आणि भूलोक या दोन्हींवर प्रकाश पाडून आम्हांला अन्नसंपन्नि देवीव,' असा भावार्थ.

'प्रज्ञावती [उषे]ला'='पुरंधिम्.' सायणांनीं येथें यजमान असा अर्थ केला आहे, पण सर्व मंत्राचा संदर्भ पाहतां आम्हीं दिलेला अर्थ अधिक संभवतो. ऋ. ३. ६१. १ यांत 'पुरंधि' विशेषण उषेला लाविलेलें आहे.

'जार जसा'='जारः इव.' या उपमेचा भावार्थ असा दिसतो कीं, जसा जार आपल्या प्रियेला उठवितो आणि ती किंचित् डुलकी घेत असल्यामुळें सहज उठते तसा तूं उषेला उठीव, मग

**तुभ्यमुषासः शुचयः परावति भद्रा वस्त्रा तन्वते दंसु रश्मिषु चित्रा नव्येषु रश्मिषु ।**
**तुभ्यं धेनुः सबर्दुघा विश्वा वसूनि दोहते ।**
**अजनयो मरुतो वक्षणाभ्यो दिव आ वक्षणाभ्यः ॥ ४ ॥**

तुभ्यम् । उषसः । शुचयः । पराऽवति । भद्रा । वस्त्रा । तन्वते । दम्ऽसु । रश्मिषु । चित्रा । नव्येषु । रश्मिषु ।
तुभ्यम् । धेनुः । सबःऽदुघा । विश्वा । वसूनि । दोहते ।
अजनयः । मरुतः । वक्षणाभ्यः । दिवः । आ । वक्षणाभ्यः ॥ ४ ॥

---

आ समतीमुपपत्यागमनध्यानेनेषत्स्वपन्तीं पुरंधिमिव प्रकृष्टशरीरधारिणीं योषितमिव । तां यथा स्वसंकेतेन स प्रबोधयति तद्वत्त्वमपि ...... । उषसो वासय । उषःकालानपि यथावत्स्थापय । प्रभातं कुर्वित्यर्थः । इति सायणः ॥

## भाषायाम्.

४. [हे वायो], शुचयः (=शुद्धा) उषासः (=उषसः) परावति (=दूरदेशे=अन्तरिक्षे) दंसु रश्मिषु (=कर्मवत्सु किरणेषु=आश्चर्यकारिषु किरणेषु) तुभ्यं (=त्वदर्थं) भद्रा वस्त्रा (=भद्राणि वस्त्राणि=कल्याणानि=सुखकराणि वासांसि) तन्वते (=कुर्वन्ति)—नव्येषु रश्मिषु (=नूतनेषु=प्रत्यग्रेषु किरणेषु) चित्रा (=चित्राणि=नानावर्णयुक्तानि) [ वस्त्राणि ] [तन्वते=कुर्वन्ति ] । तुभ्यं (=त्वदर्थं) सबर्दुघा धेनुः (=अमृतस्य दोग्ध्री गौः) विश्वा वसूनि (=सर्वाणि धनानि) दोहते (=दुग्धे) । [ त्वं ] वक्षणाभ्यः (=नदीनामर्थाय=वृष्टिभूतजलेन नद्यो यथा प्रवहन्ति तथा कर्तुं) मरुतः अजनयः (=उदपादयः)—दिव आ (=अन्तरिक्षात्=अन्तरिक्षसकाशात्) वक्षणाभ्यः (=नदीनामर्थाय=नद्यो यथा प्रहवन्ति तथा कर्तुम्) [ अजनयः=उदपादयः ] ॥

दंसु दंसेषु कर्मवत्सु । यद्वा गृहनामैतत् । अन्त्यलोपश्छान्दसः । गृहवदाच्छादकेषु रश्मिषु स्वकीयेषु...... । चित्राणि नानावर्णयुक्तान्याश्चर्यभूतानि तन्वते । उषःकाले रश्मीना नानावर्णत्वादिति भावः......। किंच हे वायो तुभ्यं त्वदर्थं त्वद्यागार्थमेव धेनुर्घृतादिना प्रीणयित्री गौः । जातावेकवचनम् । सबर्दुघा । सबरित्यमृतनाम । तस्य दोग्ध्री...सती विश्वा वसू सर्वाणि धनानि आज्यादिरूपाणि दोहते । स्वयमेव दुग्धे । प्रीणयतीत्यर्थः । इत्यादि सायणः ॥

---

ती सहज उठेल.
वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'पुरंधिम्' च्या ठिकाणीं 'पुरंधिइम्' असा उच्चार करावा लागतो.

४. [ हे वायू ], तुजसाठीं सुंदर उषा दूर अंतरावर आपल्या आश्चर्यकारक किरणांवर मनोहर वस्त्रें विणतात—[आपल्या] ताज्या किरणांवर विचित्र रंगांचीं वस्त्रें विणतात. तुजसाठीं अमृतदोही धेनु सकळ धनांचा पान्हा सोडिते. [ हे वायू], तूं नद्या वाहाव्या म्हणून मरुतांला उत्पन्न करिता झालास——द्युलोकापासून नद्यांसाठीं [ मरुतांला उत्पन्न करिता झालास ].

4. For thee, [O Vâyu], fair Ushases stretch in the long distance fine garments on their wonderful rays—variegated garments on [their] fresh rays. For thee the nectar-milching cow gives all comforts. Thou didst beget the Maruts for the rivers [ to flow ]—[ beget ] from heaven, for the rivers [ to flow ].

४. 'हे वायू, तुझा महिमा लहान नव्हे; पहांटेस उषा जिकडे तिकडे उगवून आपल्या सुंदर किरणरूपी तंतूंनीं जणुं अंतरिक्षांत जीं रमणीय आणि नानावर्णांचीं वस्त्रें पसरिते असें दिसतें, तीं तुजसाठींच होत. आणि पहांटेस देवांला पिण्यास योग्य असें दूध देणारी जी आमची गाय, ती पान्हा सोडून दूध देते, तें तुजसाठींच. तुझा पराक्रमहि मोठा आहे. कारण अंतरिक्षांत मरुत् तूंच उत्पन्न केलेस, आणि त्यांजकडून तूंच मेघोदकाची वृष्टि करवून तें नदीरूपानें सर्वत्र वाहवितोस,' असा भावार्थ.

'विणतात'='तन्वते.' अक्षरार्थ 'पसरितात' इतकाच आहे; म्हणजे वस्त्रें तुजसाठीं प्रदर्शित करितात, आपल्या किरणांच्या योगानें करितात, यांतली उत्प्रेक्षा फार सुंदर आहे, आधुनिक कवींच्या कल्पनेच्या मात्र पलीकडची आहे.

'अमृतदोही धेनु'='धेनुः सबर्दुघा.' म्हणजे जिच्या धारेंत अमृत, अथवा देवांनीं प्यावयाचें पेय असतें ती. म्हणजे जिचें दूध काढून देवांला अर्पावयाचें हवि करितात अशी गाय. देव स्वर्गी अमृत पितात तें गाईपासूनच उत्पन्न होतें, इत्यादिक ज्या पौराण कथा, त्यांचें बीज या मंत्रांत आणि याच सारिख्या इतर मंत्रांत आहे. आणि त्याप्रमाणेंच कामधेनूविषयीं सुद्धा समजलें पाहिजे. या मंत्रांत सांगितलेली जी अमृतदोही गाय, ती उपासकाचे घरची गाय समजावयाची आहे. आणि अमृत म्हणजे अति उत्तम जें हवि दुधापासून वगैरे निर्माण करून देवांस अर्पण करीत, तें होय. यावरून असें सिद्ध होतें कीं 'अमृता'चें प्रथम जन्म या मरणसंपन्न पृथिवीवरचेंच असून, नंतर कविजनांनीं त्याची जयन्ती स्वर्गीं करविली.

**तुभ्यं शुक्रासः शुचयस्तुरण्यवो मदेषूग्रा इषणन्त भुर्वण्यपामि-षन्त भुर्वणि ।**
**त्वां त्सारी दसमानो भगमीट्टे तक्ववीये ।**
**त्वं विश्वस्माद्भुवनात्पासि धर्मणासुर्यात्पासि धर्मणा ॥ ५ ॥**

तुभ्यम् । शुक्रासः । शुचयः । तुरण्यवः । मदेषु । उग्राः । इषणन्त । भुर्वणि । अपाम् । इषन्त । भुर्वणि ।
त्वाम् । त्सारी । दसमानः । भगम् । ईट्टे । तक्वऽवीये ।
त्वम् । विश्वस्मात् । भुवनात् । पासि । धर्मणा । असुर्यात् । पासि । धर्मणा ९

## भाषायाम्.

५. [ हे वायो ], तुभ्यं मदेषु (=तव मदेषु सत्सु=त्वयि मादिते सति ) शुक्रासः ( =शुक्राः=शुभ्राः ) शुचयः ( =दीप्तिमन्तस् ) तुरण्यवः ( =त्वरिताः=आशुमादकारिणः ) उग्राः (=प्रबलाः ) [ सोमा ] भुर्वणि इषणन्त (=मेघे प्रेरयन्ति=मेघवर्षणे प्रोत्साहयन्ति=त्वं यथा मेघोदकं वर्षयसि तथा कुर्वन्ति )—अपां भुर्वणि (=उदकानां वर्षणे ) इषन्त (=प्रेरयन्ति=त्वं मेघोदकं यथा वर्षयसि तथा कुर्वन्ति ) । दसमानः (=उपक्षीणः=जातोपद्रवो ) [ भक्तस् ] त्सारी (=अत्यन्तभीतः सन् ) तक्ववीये (=" तस्कराणां यज्ञविघातिनामन्यत्र गमनाय " ) भगं (=भजनीयम्=उदारं ) त्वाम् ईट्टे (=स्तौति ) । त्वं विश्वस्माद् भुवनात् (=सकलादपि लोकात् ) धर्मणा (=स्वभावेन ) पासि ( =रक्षसि )—असुर्यात् ( =असुरसंबन्धिनो भयाच्च ) धर्मणा (=स्वभावेनैव ) पासि (=रक्षसि ) ।

अत्र पूर्वार्धो दुर्बोधः । सायणस्तम् एवं व्याचष्टे । हे वायो तुभ्यं त्वदर्थं शुक्रासो दीप्ताः शुचयः शुद्धाः। सोमस्य पातारोत्यन्तं शुद्धा भवन्ति । किमु वक्तव्यं तेषां शुद्धत्वे। तुरण्यवस्त्वरणयुक्तास्त्वां प्राप्तुम् । उग्रा उद्गूर्णतेजसः सोमा मदेषु तव मदेषु निमित्तभूतेषु भुर्वणि भक्षणवति याग इषणन्त । आहवनीयं प्रति गच्छन्ति । इच्छन्ति वा । ...... किंचापां भुर्वणि मेघ इषन्त । उदकमिच्छन्त्युत्पादयितुम् । अग्नौ हूयमानस्याहुतेरादित्यद्वारा वृष्ट्युत्पादकत्वात् । यद्वा यजमानास्त्वामुद्दिश्याजुह्वाना अपां वर्षणमिषन्त । इच्छन्ति । ...... धर्मणास्मदीयहविषां धारणेन पासि । पालयसि । किंच । असुर्यात् असुरसंबन्धिनो भयाद्विशेषेण पासि धर्मणास्मद्धारणेन पोषणेन वा युक्तः सन् । यत एवं करोषि अतः स्तौमीत्यर्थः । इति ॥

५. [ हे वायू ], पांढरे, शुद्ध [ आणि ] वेगवन्त [आणि] प्रबळ [ असे सोम ] तुला माद उत्पन्न झाला म्हणजे [ तुजकडून ] वृष्टि पाठवितात—उदकांची वृष्टि पाठवितात. अत्यंत भ्यालेला [आणि ] त्रासलेला उपासक [ दुर्जनांचा ] उपद्रव दूर व्हावा म्हणून, तुज दयाळूला प्रार्थितो. तूं सकळ लोकांपासून सहज तारितोस—असुर लोकांपासून सहज तारितोस.

5. When thou art exhilarated, the pure, fair, quick [ and ] powerful [Somas ] urge thee to a downpour—urge to a downpour of the waters. The terror-struck [ worshipper ] [who is ] injured praises thee, the bounteous, for freedom from injury. Thou dost preserve, as is thy wont, from all the world—dost preserve, as is thy wont, from fear of the demons.

---

'सकळ धनांचा '=' विश्वा वसूनि.' म्हणजे, दूध, पायस, इत्यादिक जे मिष्ट पदार्थ करून देवांस अर्पावयाचे, ते असें सायण म्हणतात तें युक्त दिसतें.

'नद्या वाहाव्या म्हणून '='वक्षणाभ्यः.' अक्षरार्थ ' नद्यांसाठीं ' इतकाच आहे. म्हणजे मेघोदकाचा वर्षाव पृथिवीवर व्हावा आणि त्यापासून नद्यांचे प्रवाह वाहावे या हेतूनें. कितीएक पश्चिमेकडचे विद्वान् ' वक्षणाभ्यः ' म्हणजे ' उदरात् ' असा अर्थ करून ' दिवः ' याच्याशीं अन्वय करितात, आणि म्हणतात, वायूनें द्यूच्या उदरांतून मरुतांला जन्मविलें. परंतु ' वक्षणा ' शब्दाचा अर्थ ' उदर ' असा होत नाहीं इतकेंच नव्हे ( सायणांनीं कोठेंच तो अर्थ केलेला नाहीं ), पण त्यांच्याच म्हणण्याप्रमाणें ह्या अर्थाचे दुसरे प्रयोग आढळत नाहींत. आणि वायूनें मरुतांला द्यूच्या उदरीं जन्म दिलें असेंहि दुसऱ्या ठिकाणीं सांगितलेलें कोठें आढळत नाहीं.

कदाचित् अंतरिक्षीच्या नद्यांपासून असा ( दुसऱ्या कितीएकांनीं केलेला ) अर्थ संभवतो; पण त्या प्रकारचें मरुतांचें जन्म होय अशाविषयींहि प्रसिद्धि नाहीं.

मरुत मेघोदक देत असतात आणि ते जिकडे जिकडे जातात तिकडे तिकडे वृष्टि होत असते, अशाविषयीं तर पूर्वींहि पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. सू. ३७ मं. १०, सू. ३८ मं. ८, ९ इत्यादि स्थळें पहा.

वृत्तसुखासाठीं ' वक्षणाभिअः ' असें दोन्ही ठिकाणीं म्हटलें पाहिजे.

---

५. ' हे वायू, भक्तांनीं अर्पण केलेले जे तेजस्वी, शुद्ध, लवकर माद उत्पन्न करणारे आणि बळकटी आणणारे सोमरस, ते पिऊन तुला माद उत्पन्न झा-

त्वं नो वायवेषामपूर्व्यः सोमानां प्रथमः पीतिमर्हसि सुतानां पीतिमर्हसि ।
उतो विहुत्मतीनां विशां ववर्जुषीणाम् ।
विश्वा इत्ते धेनवो दुह्र आशिरं घृतं दुह्रत आशिरम् ॥ ६॥२३॥

त्वम् । नः । वायो इति । एषाम् । अपूर्व्यः । सोमानाम् । प्रथमः । पीतिम् । अर्हसि । सुतानाम् । पीतिम् । अर्हसि ।
उतो इति । विहुत्मतीनाम् । विशाम् । ववर्जुषीणाम् ।
विश्वाः । इत् । ते । धेनवः । दुह्रे । आऽशिरम् । घृतम् । दुह्रते । आऽशिरम् ॥ ६ ॥ २३ ॥

### भाषायाम्.

६. हे वायो, अपूर्व्यः ( =" न विद्यते पूर्वं यस्मात् तत्पानमपूर्वं तदर्हतीत्यपूर्व्यस्तादृश"स्त्वं ) प्रथमः ( =सर्वेभ्योऽपि देवेभ्यः पूर्वः ) एषां ( =पुरोवर्तिनां ) नः (=अस्माकं) सोमानां पीतिम् अर्हसि (=सोमानां पानं प्राप्तुं योग्योसि ) ।—सुतानां पीतिम् ( =अभिषुतानां सोमानां पानम् ) अर्हसि । उत ( =अपि च ) विहुत्मतीनां (=विशेषेण होमवतीनां) ववर्जुषीणां ( =वृक्तबर्हिषां ) विशां ( =प्रजानां ) [ सोमानां पीतिम् अर्हसि ] । ते ( =त्वदर्थं ) विश्वा इत् धेनवः ( =सर्वा एव गावः ) आशिरं ( =क्षीरं ) दुह्रे ( =दुहन्ति )—घृतम् आशिरम् ( =घृतवत् क्षीरं ) दुह्रते ( =स्वयं दुहन्ति ) ।

ववर्जुषीणाम् अनभिमतपापं वर्जयन्तीनाम् । इति सायणः ॥

---

ला म्हणजे मेघोदकांची वृष्टि करविण्याविषयीं तुला स्फुरण येतें. त्याप्रमाणेंच कोणा भक्ताला शत्रूंपासून उपद्रव होऊं लागला म्हणजे तो मोठा भयभीत होऊन उपद्रव दूर होण्यासाठीं तुला स्तवितो; आणि मग तूं त्याला सर्व जगापासून, किंबहुना सकळ असुरांपासूनहि सहज रक्षितोस;' असा या मंत्राचा भावार्थ आहे. पण पहिल्या चरणाचा अन्वय सरळ नसल्यामुळें आणि 'तुभ्यम्' हें विशेषेंकरून दुरन्वयी असल्यामुळें अर्थ क्लिष्ट होतो. त्यांत 'इषणन्त,' 'भुर्वणि' आणि 'इषन्त' हीं पदें कठीण आहेत.

'[ तुजकडून ] वृष्टि पाठवितात'= 'इषणन्त भुर्वणि.' अक्षरशः अर्थ [मेघोदकानीं सर्व अवकाश] भरून टाकण्याविषयीं प्रेरितात. 'भुर्वणि' अथवा 'भुर्वण' या शब्दाचे प्रयोग वेदांत

६. हे वायू, सर्वांच्या अगोदरचा असा जो तूं, तो हे आमचे सोम सर्वांअगोदर पिण्यास योग्य आहेस—पिळून काढलेले सोम पिण्यास योग्य आहेस. आणि जे लोक विशेषेंकरून हवि देतात [ आणि ] दर्भासनें घालितात, त्या सर्व लोकांचा सोम पिण्यास तूं योग्य आहेस. सर्वेहि गाई तुजकरितां सोमांत घालावयाचें ऊन दूध देतात—घृताप्रमाणें चिकट दूध देतात.

6. Thou, O Vâyu, the foremost of all, deservest to drink of these our Somas first—deservest to drink of the extracted Somas; nay, [ of the Somas ] of [ all ] men who give copious oblations [ and ] cut the [ Kus'a grass for a seat ]. All cows whatsoever give thee warm milk—give fat warm milk.

---

फार आले नसल्यामुळें त्याच्या अर्थाविषयीं निःसंशय निर्णय करण्याला साधनें अगदींच कमी आहेत.

‘ [ दुर्जनाचा ] उपद्रव दूर व्हावा म्हणून ’=‘ तकवीये. ’ हा शब्द तर पुनः कोठेंच आलेला नाहीं. आम्हीं सर्व तर्क टाकून देऊन सायणांला अनुसरून अर्थ केला आहे.

‘सहज ’=‘धर्मणा.’ हाहि शब्द कठीण आहे. सायणांनीं वेगळा अर्थ केला आहे तो भाषेखालीं पहा. आम्हीं ‘धर्म’शब्दाचा काहींसा वेदोत्तरकालीन अर्थ घेऊन निर्वाह केला आहे. कितीएक पाश्चात्त्य पंडित ‘नेहमींच्या रीतीस अनुसरून’ अथवा ‘सवईप्रमाणें’ असा अर्थ करितात.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ‘ त्वाम् ’-च्या टिकाणीं ‘ तुआम् ’ असें म्हणावें लागतें.

---

६. ‘ हे वायू, सर्व देवांपूर्वीं उपासकांनीं दिलेला सोम पिण्यास योग्य असा जो तूं, तो हा आम्हीं अर्पण केलेला सोम कृपा करून सर्वांअगोदर पी. तूं फार आहुति देणाऱ्या आणि देवांला दर्भासनें इत्यादि घालून भजणाऱ्या जनांनीं अर्पण केलेले सोम पिण्यास योग्य आहेस. जितक्या म्हणून गाई आहेत, तितक्या सर्व सोमांत मिसळावयाचें ऊन ऊन दूध देत असतात तें तुजकरितांच होय.—तुपानें जणुं भरून चिक्कण झालेलें दूध सर्व गाई देतात तें तुजकरितांच होय.’

‘ सर्वांच्या अगोदरचा ’=‘ अपूर्व्यः.’ म्हणजे ज्याच्या पूर्वीं हवि इत्यादिक अथवा सोमादिक अन्न कोणी भक्षण करीत नसतात.

## सूक्तम् १३५.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । वायुर्देवता । अत्यष्टिश्छन्दः ॥

**स्तीर्णं बर्हिरुप नो याहि वीतये सहस्रेण नियुता नियुत्वते शतिनीभिर्नियुत्वते ।**
**तुभ्यं हि पूर्वपीतये देवा देवाय येमिरे ।**
**प्र ते सुतासो मधुमन्तो अस्थिरन्मदाय क्रत्वे अस्थिरन् ॥ १ ॥**

स्तीर्णम् । बर्हिः । उप । नः । याहि । वीतये । सहस्रेण । निऽयुता । नियुत्वते । शतिनीभिः । नियुत्वते ।
तुभ्यम् । हि । पूर्वऽपीतये । देवाः । देवाय । येमिरे ।
प्र । ते । सुतासः । मधुऽमन्तः । अस्थिरन् । मदाय । क्रत्वे । अस्थिरन् १

### भाषायाम्.

१. [ हे वायो ], [ त्वदर्थं ] बर्हिः (=कुशासनं) स्तीर्णम् (=आस्तृतम्) [ अस्ति ] । उप नः (=अस्मान् प्रति) वीतये (=हविर्भक्षणार्थं) याहि (=आयाहि=आगच्छ) । नियुत्वते (?=अश्ववते=अश्ववद्बलवते) [ सोमायास्मै ] सहस्रेण नियुता (=सहस्रसंख्याकेन तवाश्वसंघेन)—शतिनीभिः (=शतसंख्याकाभिः) [ नियुद्भिः=तवाश्वैर् ] नियुत्वते (?=अश्ववद्बलवते) [ सोमाय ] [नः उप याहि=अस्मान् प्रति आगच्छ ] । हि (=यस्माद्) देवाय (=दीप्तिमते) तुभ्यं (=त्वदर्थं) देवाः (=दीप्तिमन्तः) [ सोमाः ] पूर्वपीतये (=सर्वेभ्योपि देवेभ्यः पुरा पानं कर्तुं) येमिरे (=प्रार्पिताः सन्ति) । ते [ मदाय ] (=तव मादाय=हर्षाय) मधुमन्तः सुतासः (=माधुर्योपेताः सुताः=अभिषुताः सोमाः) प्रास्थिरन् (=प्रतिष्ठन्ति=पानार्थं सिद्धाः सन्ति)—[ ते ] मदाय क्रत्वे (=तव मादाय बलाय च=त्वं तेषां पानेन मादयुक्तो बलयुक्तश्च यथा भवसि तथा) [ प्र ] अस्थिरन् (=प्रतिष्ठन्ति=सिद्धाः सन्ति) ॥

सायणस्तु नोऽस्मद्यज्ञार्थं स्तीर्णमास्तृतं बर्हिरभिलक्ष्योपयाहि । आगच्छ ।...... केन साधनेनेति तदुच्यते । सहस्रेण सहस्रसंख्याकेन. नियुता । ...... नियुत इति वायोरश्वानां नामधेयं नियुतो वायोरिति निरुक्त उक्तत्वात् । ...... तथा शतिनीभिः शतसंख्योपेताभिर्नियुद्भिरागच्छेति शेषः । यद्वा सहस्रेण नियुता शतिनीभिश्च नियुद्भिर्नियुत्वते तद्वते देवाय हविर्दीयत इति शेषः । यद्वा तुभ्यमित्यनेन संबन्धः । उक्तसंख्याकाभिर्नियुद्भिस्तद्वते देवाय द्योतमानाय तुभ्यम् इत्यादि ॥

## सूक्त १३५.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—वायु. वृत्त—अत्यष्टि.

१. [ हे वायू ], [ हें तुजकरितां ] दर्भासन घातलें [ आहे ]. [ तर तूं ] [ हवि ] भक्षण्यासाठीं आम्हांप्रत ये. आपल्या सहस्र घोड्यांसहित बळकट [ सोमा ]प्रत [ ये ]—[ आपल्या ] शेकडो [ घोड्यांसहित ] बळकट [ सोमा ]प्रत [ ये ]. कारण कीं सर्वांअगोदर तूं प्यावेस म्हणून तुज देदीप्यमानाला [ हे ] देदीप्यमान [ सोम ] अर्पण केले आहेत. तुला माद यावा म्हणून [ हे ] मधुर सोमरस तुझी वाट पाहत आहेत—[ तुला ] माद आणि बळ यावें म्हणून तुझी वाट पाहत आहेत.

## Hymn 135.

To *Vâyu*. By *Paruchchhepa*, the son of *Divodâsa*. Metre—*Atyashṭi*,

1. The Kus'a [ is.] spread; come to us for the feast; [ come ] with thy thousand horses to [ this Soma] mounted on a horse—with thy hundred horses to [ this Soma ] mounted on a horse. For that thou mayest drink first, the resplendent somas have been offered to thee the resplendent. For thy [ exhilaration] the sweet Somas are standing ready—are standing ready for [ thy ] exhilaration [and] invigoration.

---

वृत्तासाठीं पहिल्या चरणाचा प्रथम पोटचरण ‘ तुअं नों वायो एंषआमपूर्विअः ’ असा म्हणावा लागतो, दुसऱ्या पोटचरणांत ‘ सोमानआम्,’ दुसऱ्या चरणांत ‘ विहुत्मतीनआम् ’ आणि ‘ववर्जुषीणआम् ’ असें वाचावें लागतें.

---

१. हेंहि सूक्त वायूविषयींचेंच आहे. ‘ हे वायू, तुजसाठीं आम्हीं दर्भासन वगैरे घालून सर्व तयारी केली आहे. तर तूं हे सोम पिण्यास ये. आपल्या शेकडो आणि हजारो नियुत् नांवाच्या घोड्यांच्या रथांत बसून ये. कारण कीं देदीप्यमान जो तूं, त्या तुजप्रीत्यर्थ हे देदीप्यमान सोम तूं पूर्वी प्यावेस म्हणून अर्पण केले आहेत. हे सोमरस तूं प्यावेस आणि तुला हर्ष आणि बळ प्राप्त

**तुभ्यायं सोमः परिपूतो अद्रिभिः स्पार्हा वसानः परि कोशमर्षति शुक्रा वसानो अर्षति ।**
**तवायं भाग आयुषु सोमो देवेषु हूयते ।**
**वह वायो नियुतो याह्यस्मयुर्जुषाणो याह्यस्मयुः ॥ २ ॥**

तुभ्य । अयम् । सोमः । परिऽपूतः । अद्रिऽभिः । स्पार्हा । वसानः । परि । कोशम् । अर्षति । शुक्रा । वसानः । अर्षति ।
तव । अयम् । भागः । आयुषु । सोमः । देवेषु । हूयते ।
वह । वायो इति । निऽयुतः । याहि । अस्मऽयुः । जुषाणः । याहि । अस्मऽयुः ॥ २ ॥

असत्त उत्सो गृणते नियुत्वान् इत्यत्र ( ऋ. ९. ८९. ६ ) तथा शुक्रस्याद्यगवाशिर इन्द्रवायू नियुत्वतः । आ यातं पिबतं नरा इत्यत्र ( ऋ. २. ४१. ३ ) च नियुत्वान् इति विशेषणं सोमस्य प्रयुक्तं तद्दृश्यताम् ॥

## भाषायाम्.

२. [ हे वायो ], अद्रिभिः परिपूतः ( =ग्रावभिः परिशोधितः ) [ अपि च ] स्पार्हा वसानः ( =स्पार्हाणि तेजांसि वसानः=परिदधानः ) अयं सोमः ( =पुरोवर्ती सोमरसः ) तुभ्य ( =तुभ्यं=त्वत्प्रीत्यर्थं ) परि कोशम् अर्षति ( =पात्रं प्रति गच्छति )—शुक्रा वसानः अर्षति ( =शुक्राणि तेजांसि=श्वेतानि तेजांसि परिदधानो गच्छति ) । आयुषु देवेषु ( =मनुष्येषु देवेषु च मध्ये ) तव भागः ( =तव विभागः ) अयं सोमः हूयते ( =प्रार्थ्यते ) । हे वायो, [ त्वं ] नियुतः ( =तवाश्वान् ) वह ( =आवह=आनय ) [ अपि च ] अस्मयुः ( =अस्मान् कामयमानस्त्वं ) याहि ( =आयाहि )—जुषाणः अस्मयुः (=प्रीयमाणः सन् अस्मान् कामयमानस्त्वं ) याहि ( =आयाहि ) ॥

कोशं कोशस्थानीयं गृहमर्षति । गच्छति प्राप्नोति । कीदृशः सोमः । अद्रिभिः परिपूतः । अभिषवसाधनैरपगतऋजीषत्वेन शोधितः । यद्वा । अद्रिभिरभिषुतो दशापवित्रशोधनेन ग्रहणेन वा शोधितः । इति सायणः ॥

व्हावें म्हणून तुझी वाट पहात जणुं उभे राहिले आहेत. तर तूं आम्हांप्रत लवकर ये.'

'आपल्या सहस्र घोड्यांसहित'= 'सहस्रेण नियुता.' अक्षरशः 'हजार, नियुतांसहित.' 'नियुत्' हें वायूच्या

२. हे वायू, हा तुजसाठीं ग्राव्यांनीं शुद्ध केलेला सोम रमणीय [तेजांनीं] भरलेला होत्साता पात्रांत पडत आहे—शुद्ध [तेजां]नीं भरलेला होत्साता पडत आहे. मनुष्यांमध्यें [आणि] देवांमध्यें तुझा भाग [असा] हा सोम अर्पिला जात आहे. हे वायू, तूं आपले घोडे घेऊन ये, आमचा वत्सल तूं ये—आमचा वत्सल तूं प्रसन्न होऊन ये.

2. This Soma, purified with the stones [and] clad in delightful splendours, is running into the vessel for thee—is running clad in white shining splendours. This Soma, thy portion among men [and] gods, is being sacrificed. Bring, O Vâyu, thy horses, come thou our patron— come thou our delighted patron.

घोड्यांचें नांव होय. जसे इंद्राचे 'हरी' अथवा 'हरयः,' सूर्याचा 'एतश' तसे वायूचे 'नियुत्.' सहस्र हें येथें परिमितार्थी नाहीं, तर अपरिमितार्थी आहे. वायूसारिख्या अतिचपळ देवाचे घोडे असंख्य आहेत असें मानणें हें साहजिक आहे.

'बळकट [सोमा]प्रत [ये]'= 'नियुत्वते.' हा शब्द जरी उघड आहे आणि त्याच्या अर्थाविषयीं जरी संशय नाहीं, तरी वाक्यांत त्याचा अन्वय कोठें लावावयाचा, आणि तो शब्द कोणाकडे घ्यावयाचा याविषयीं संशय आहे. सायणांनींहि निश्चयानें अर्थ केलेला नाहीं. त्यांणीं दोन तीन रीतीनें निर्वाह केला आहे. अक्षरार्थ वायूचा घोडा अथवा वायूच्या घोड्यासारिखा घोडा ज्याला आहे तो, असा आहे. 'नियुत्वान्' हें विशेषण सोमाला वेदांत दुसऱ्या दोन ठिकाणीं लाविलेलें आहे. तीं वाक्यें भाषेखालीं उतरून घेतलीं आहेत, तीं पहा.

'माद आणि बळ यावें म्हणून'= 'मदाय क्रत्वे.' सोमपानापासून माद येतो यांत नवल नाहींच. पण बळ येतें असें वेदांत सर्वत्र सांगितलें आहे, त्याचीं उदाहरणें यापूर्वी पुष्कळ आलींच आहेत.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाच्या दुसऱ्या पोटचरणांत 'सहस्रेण'च्या ठिकाणीं 'सहस्सरेण' असें वाचावें लागतें.

२. 'हे वायू, हा ग्राव्यांतून काढून नंतर गाळून शुद्ध केलेला आणि लकलकीत तेजानें जणुं भरलेला सोम तुजकरितां पात्रांत गळत आहे. हा सोमरस मनुष्य आणि देव यांत तुझा जो भाग होय, तो तुजकरितां आम्ही

**आ नो॑ नि॒युद्भिः॑ श॒तिनी॑भिरध्व॒रं स॑ह॒स्रिणी॑भि॒रुप॑ याहि वी॒तये॑**
**वायो॑ ह॒व्यानि॑ वी॒तये॑ ।**
**तवा॒यं भा॒ग ऋ॒त्वियः॒ सर॑श्मिः॒ सूर्ये॒ सचा॑ ।**
**अ॒ध्व॒र्युभि॒र्भर॑माणा अयंसत॒ वायो॑ शु॒क्रा अ॑यंसत ॥ ३ ॥**

आ । नः॒ । नि॒युत्ऽभिः॑ । श॒तिनी॑भिः । अ॒ध्व॒रम् । स॒ह॒स्रिणी॑भिः ।
उप॑ । या॒हि॒ । वी॒तये॑ । वायो॒ इति॑ । ह॒व्यानि॑ । वी॒तये॑ ।
तव॑ । अ॒यम् । भा॒गः । ऋ॒त्वियः॑ । सऽर॑श्मिः । सूर्ये॑ । सचा॑ ।
अ॒ध्व॒र्युऽभिः॑ । भर॑माणाः । अ॒यं॒स॒त॒ । वायो॒ इति॑ । शु॒क्राः । अ॒यं॒स॒त॒
॥ ३ ॥

### भाषायाम्.

३. [हे वायो], शतिनीभिर्नियुद्भिः (=शतसंख्यकैस्तवाश्वैः) नः अध्वरम् आ [याहि] (=अस्माकं यज्ञं प्रत्यागच्छ)। सहस्रिणीभिः [नियुद्भिः] (=सहस्रैस्तवाश्वैः) वीतये (=भक्षणाय) उप याहि (=आगच्छ)—हे वायो, हव्यानि वीतये (=हव्यानि भक्षयितुम्) [आ याहि=आगच्छ]। ऋत्वियः (=अवसरे जातः=प्राप्तावसरः) [अपि च] सूर्ये सचा सरश्मिः (=सूर्योदये सत्येव सूर्यरश्मिवद्रश्मिवान् दीप्तिमान्) अयं भागः (=सोमस्यायं विभागस्) तव (=तवैव भवति)। अध्वर्युभिः भरमाणाः (=ऋत्विग्भिः भ्रियमाणा भ्रियमाणाः) [सोमा इमे] अयंसत (=नियताः=प्रार्पिता भवन्ति)—हे वायो, शुक्राः (=दीप्तिमन्तः) [सोमाः] अयंसत (=प्रार्पिता भवन्ति)॥

सरश्मिरित्यत्र। किंच सोमः सूर्ये उदिते सति तस्य रश्मिभिः सह सरश्मिर्भवति। समानदीप्तिर्भवति। यद्वा तैः सहितो भवति। यतः सूर्य उदिते सति रश्मिर्भवति अतः प्राप्तकाल इत्यर्थः। इति सायणः॥

अर्पीत आहों. तर हे वायू, तूं आपले घोडे रथास जोडून यें, आणि आम्हांवर प्रीति करणारा आणि आम्हांवर प्रसन्न होणारा जो तूं, तो हा सोम पी' असा भावार्थ आहे.'

'रमणीय तेजांनीं भरलेला '='स्पार्ह वसानः.' म्हणजे जो तेजामुळें लकलकीत दिसत आहे असा.

'तुझा भाग '='तव भागः.' म्हणजे देवांनीं आणि मनुष्यांनीं घ्यावयाचे जे निरनिराळे भाग,त्यांतून तुझा अंश अथवा तूं घ्यावयाचा जो भाग, तो; तुझा वांटा.

३. [ हे वायू ], तूं आपल्या शेकडो घोड्यांला आणि हजारो घोड्यांला घेऊन आमच्या यज्ञाप्रत [हवि] भक्षण करण्याकरितां ये— हे वायू, हव्यें भक्षण करण्याकरितां ये. सूर्य उगवतांच तेजोयुक्त झालेला, वेळावर अर्पण केलेला हा सोम तुझा भाग आहे. अध्वर्यूंनीं आणिलेले [ सोम ] अर्पण केले आहेत—हे वायू, शुद्ध सोम अर्पण केले आहेत.

3. Come with thy hundred horses to our sacrifice, come, O Vâyu, with thy thousand [horses] to eat—to eat, O Vâyu, our oblations. Thine is this portion prepared in season, glittering with the rise of the sun. Brought by the priests [the Somas] are offered—the bright Somas, O Vâyu, are offered.

वृत्तासाठीं 'याहि अस्मयुः' असें तिसऱ्या चरणांत दोन्ही ठिकाणीं म्हणावें लागतें.

३. ' हे वायू, सूर्य उगवतांच सिद्ध केलेला आणि सूर्यकिरणाप्रमाणें लकलकणारा जो हा तेजस्वी सोमरस आमच्या ऋत्विजांनीं हातांत धरून तुला अर्पण केला जात आहे, हा पिण्याकरितां आणि हवि भक्षण करण्याकरितां तूं आपले शेकडो आणि हजारो घोडे आपल्या रथास जोडून आम्हांप्रत ये. असें तात्पर्य.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांतील दुसऱ्या पोटचरणांत ' सूरिए ' असें म्हणावें लागतें.

**आ वां रथो नियुत्वान्वक्षदवसेऽभि प्रयांसि सुधितानि वीतये**
**वायो हव्यानि वीतये ।**
**पिबतं मध्वो अन्धसः पूर्वपेयं हि वां हितम् ।**
**वायवा चन्द्रेण राधसा गतमिन्द्रश्च राधसा गतम् ॥ ४ ॥**

आ । वाम् । रथः । नियुत्वान् । वक्षत् । अवसे । अभि । प्रयांसि ।
सुऽधितानि । वीतये । वायो इति । हव्यानि । वीतये ।
पिबतम् । मध्वः । अन्धसः । पूर्वऽपेयम् । हि । वाम् । हितम् ।
वायो इति । आ । चन्द्रेण । राधसा । आ । गतम् । इन्द्रः । च ।
राधसा । आ । गतम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे इन्द्रवायू ], नियुत्वान् रथः (=वाय्वश्वैर्युक्तो युवयो रथो ) वां ( =युवाम् ) [ इमानि ] सुधितानि प्रयांसि अभि ( =सुनिहितानि हवींषि प्रति ) वीतये अवसे ( =तानि भक्षयितुं प्रीतौ भवितुं च ) आ वक्षत् ( =आवहतु ) —हे वायो, हव्यानि वीतये ( =अस्माकं हवींषि भक्षयितुम् ) [ आवक्षत्=आ नयतु] । [युवां] मध्वो अन्धसः ( =मधुरस्य सोमलक्षणस्यान्नस्य ) [ अंशं ] पिबतम् । पूर्वपेयं (=सकलेभ्योपि देवेभ्यः पूर्वं पेयं सोमलक्षणमन्नं ) हि वां ( =युवयोरर्थे ) हितं ( =पुरो निहितं भवति ) । हे वायो, [त्वं च ] इन्द्रश्च चन्द्रेण राधसा ( =आह्लादकेन अस्मभ्यं दातव्येन धनेन सह ) —आ गतम् (=आगच्छतम् ) । राधसा (=धनेन सह ) गतम् ( =आगच्छतम् ) ॥

पूर्वपेयमित्यत्र यद्यपीन्द्रादपि वायोः पूर्वपानं त्वं हि पूर्वपा असि देव दधिषे पूर्वपेयमित्यादिषु सर्वत्र प्रसिद्धं तथापीन्द्रस्येतरदेवेभ्यः पूर्वं वायुना सह पानं चेन्द्रतुरीयार्थवादनब्राह्मणे देवा वै सोमस्य राज्ञोऽग्रपेयेन समपादयन्नित्यत्र प्रतिपादितम् । इति सायणः ॥

४. [हे इन्द्र आणि वायू हो], वायूचे घोडे जोडिलेला रथ तुम्हांला आनंद करण्यासाठीं या सुंदर रीतीनें ठेविलेल्या हव्यांकडेस [ तीं ] भक्षण्याकरितां घेऊन येओ—हे वायू, हव्यें भक्षण्याकरितां [ घेऊन येओ ]. [ हें ] मधुर सोमहवि तुम्ही प्या. कारण कीं पहिलें पेय तुम्हांकरितां [ हें पुढें] ठेविलें [आहे ]. हे वायू, तूं आणि इन्द्र [ मिळून ] आह्लादकारक धन [आम्हांकरितां] घेऊन या—[ तूं ] आणि इन्द्र [ मिळून ] धन घेऊन या.

4. May the chariot, drawn by Vâyu's horses, bring you hither, [O Indra and Vâyu], towards these well-placed offerings that you may eat [ and ] be delighted—that you may eat, O Vâyu, the offerings. Drink you, [ O Indra and Vâyu], of the sweet oblation; for you indeed is the first drink placed. Come, O Vâyu, with delightful wealth, and come Indra with wealth.

---

४. हा मंत्र इंद्र आणि वायु या दोघांविषयीं आहे. 'हे इंद्र आणि वायू हो, तुम्हां दोघांला सर्वांअगोदर सोम प्यावयास देणें योग्य आहे असें समजून तुम्हांप्रीत्यर्थ हा सोम आणि हीं हव्यें सुंदर रीतीनें ठेवून अर्पण केलीं आहेत. तर तुम्ही दोघेहि वायूचे चपळ अनेक घोडे जोडिलेल्या रथांत बसून या आणि हीं हव्यें खाऊन पिऊन संतृप्त व्हा. आणि येते वेळीं आम्हांकरितां सुंदर धनसंपत्ति घेऊन या' असा भावार्थ.

'पहिलें पेय'='पूर्वपेयम्.' म्हणजे सकळ देवांनीं पिण्यापूर्वीं प्यावयाचें पेय. आधुनिक काळीं तरी मद्य प्यावयास द्यावयाचें असलें म्हणजे सर्वांहून अगोदर ज्याला देतात त्याचा मान मोटा असतो, आणि ज्याला विशेष संमान द्यावयाचा त्याणें किंवा तिणें प्याल्यानंतर तेंच मद्य दुसऱ्यांनीं पिण्याचा प्रघात आहे.

या ऋचेच्या पहिल्या चरणाचा पहिला पोटचरण खरबडीत असल्याप्रमाणें जणुं आहे; पहिल्या आणि दुसऱ्या पोटचरणांमध्यें संधि करूं नये. तिसऱ्या चरणांत पहिला पोटचरण 'वायो आँ चन्द्रेण रॉधसॉ आ गतम्' असा म्हणावा लागतो.

**आ वां धियो ववृत्युरध्वराँ उपेममिन्दुं मर्मृजन्त वाजिनमाशुमत्यं न वाजिनम् ।**
**तेषां पिबतमस्मयू आ नो गन्तमिहोत्या ।**
**इन्द्रवायू सुतानामद्रिभिर्युवं मदाय वाजदा युवम् ॥ ५ ॥ २४ ॥**

आ । वाम् । धियः । ववृत्युः । अध्वरान् । उप । इमम् । इन्दुम् । मर्मृजन्त । वाजिनम् । आशुम् । अत्यम् । न । वाजिनम् ।
तेषाम् । पिबतम् । अस्मयू इत्यस्मऽयू । आ । नः । गन्तम् । इह । ऊत्या ।
इन्द्रवायू इति । सुतानाम् । अद्रिऽभिः । युवम् । मदाय । वाजऽदा । युवम् ॥ ५ ॥ २४ ॥

## भाषायाम्.

५. [ हे इन्द्रवायू ], धियः ( =अस्माभिः कृता युवयोः स्तुतयो ) वां ( =युवाम्) अध्वरान् उप (=यज्ञान् इमान् प्रति ) आ ववृत्युः (=अतिशयेन प्रवर्तयन्तु=सत्वरम् आगमयन्तु ) । इमं वाजिनं ( =बलवन्तम् ) इन्दुं ( =सोमम् ) [ ऋत्विजो ] मर्मृजन्त ( =विशेषेण संमार्जयन्ति )—आशुं ( =शीघ्रम् ) अत्यं ( =सततगामिनं ) वाजिनं न ( =अश्वमिव ) [ मर्मृजन्त=संमार्जयन्ति=परिशुद्धं कुर्वन्ति ] । अस्मयू ( =अस्मान् कामयमानौ ) [ युवां ] तेषां ( =वक्ष्यमाणानां सोमानाम् ) [ अंशं ] पिबतम् । ऊत्या ( =रक्षणेन सह ) नः ( =अस्मान् प्रति ) इह ( =अत्र ) आ गन्तम् ( =आगच्छतम् ) । हे इन्द्रवायू ( =हे इन्द्र हे वायो च ), अद्रिभिः सुतानां ( =ग्रावभिरभिषुतानां सोमानाम् ) [ अंशं ] युवं ( =युवां ) [ पिबतम् ]—हे वाजदा ( =वाजदौ=अन्नस्य दातारौ ), युवं ( =युवां ) मदाय ( =हर्षाय=हर्षभवनाय ) [ पिबतम् ] ॥

धियः कर्माणि स्तोत्रादिलक्षणानि ...... । मर्मृजन्त । अध्वर्यवो दशापवित्रेण संमार्जयन्ति । मार्जने दृष्टान्तः । आशुमतिशीघ्रगामिनमत्यं न । सततं गन्तारं वाजिनं वेजनवन्तमश्वमिव यथा स्वेदाद्यपनयनेन संमार्जयन्ति तद्वत् । इति सायणः ॥

५. [हे इन्द्र आणि वायू हो], आमच्या स्तुति तुम्हांला [आमच्या] यज्ञांप्रत वळवोत. ह्या बळकट सोमाला [ऋत्विज्] [स्वच्छ करीत आहेत]—चपळ [ आणि ] वेगवंत वारूप्रमाणें [ स्वच्छ करीत आहेत ]. तर आमचे कृपाकर्ते जे तुम्ही, ते हे सोम प्या, तुम्ही आपल्या कृपेसहित इकडे आम्हांप्रत या; हे इन्द्र आणि वायू हो, ग्राव्यांच्या योगानें काढिलेले सोम तुम्ही प्या—हे अन्नदाते हो, तुम्ही माद येण्यासाठीं [ प्या ].

5. May [our] prayers turn you towards our sacrifices. The priests are cleansing this strong Soma —like a courser, swift and speedy. Drink of these, you our patrons, come hither unto us with your help; drink you of [these] Somas extracted with the stones, O Indra and Vâyu, you, O givers of food, and be exhilarated.

५. 'हे इन्द्रा आणि वायू, आम्ही ज्या स्तुति गात आहों ह्या तुम्हांप्रत जाऊन तुम्हांला आमच्या हव्यांपत येण्याविषयीं वळवोत. हे ऋत्विज सोमरसाला गाळून धुऊन स्वच्छ करीत आहेत—एकाग्रा वारूला धुऊन पुसून स्वच्छ करितात तसा स्वच्छ करीत आहेत. तर तुम्ही आपल्या कृपेनिशीं या, आणि आम्हांवर कृपा करून हा ग्राव्यांनीं काढिलेला सोमरस प्या. कारण तुम्ही अन्नदाते असल्यामुळें, तुम्ही सोम पिऊन प्रसन्न झालां म्हणजे आम्हांस तुम्ही अन्न द्याल ' असें तात्पर्य.

'यज्ञांप्रत वळवोत '=' अध्वरान् उप ववृत्युः.' हा जरी अक्षरशः अर्थ आहे तरी, आम्हीं या कर्मांत तुम्हांस अर्पण करीत असलेल्या हव्यांप्रत वळवोत असा भावार्थ आहे. कारण ऋग्वेदसंहितेंत यज्ञ आणि अध्वर हे शब्द आधुनिक काळाप्रमाणें दीर्घकर्मवाचक नव्हत. सकाळीं उठून देवाचें भजन केलें, एक दोन सूक्तें म्हणून अथवा म्हटल्याशिवायच हवि अर्पण केलें तर, अथवा सोमाहुति दिली तर, त्याला ते यज्ञ अथवा अध्वर असें म्हणत असत. आतां यज्ञ म्हणजे मोठ्या खर्चाचें, मोठ्या विद्वत्तेचें, मोठ्या समारंभाचें, मोठ्या तयारीचें आणि फार दिवस करावयाचें असें कार्य होय असें लोक समजतात, आणि यज्ञ करणारे जनहि त्याचप्रमाणें आचरतात, पण वेदकाळींचा ' यज्ञ ' म्हणजे साधारण उपासना, मग तिजबरोबर हवि अ-

इमे वां सोमा अप्स्वा सुता इहाध्वर्युभिर्भरमाणा अयंसत वायो
शुक्रा अयंसत ।
एते वामभ्यसृक्षत तिरः पवित्रमाशवः ।
युवायवोऽति रोमाण्यव्यया सोमासो अत्यव्यया ॥ ६ ॥

इमे । वाम् । सोमाः । अप्ऽसु । आ । सुताः । इह । अध्वर्युऽभिः ।
भरमाणाः । अयंसत । वायो इति । शुक्राः । अयंसत ।
एते । वाम् । अभि । असृक्षत । तिरः । पवित्रम् । आशवः ।
युवाऽयवः । अति । रोमाणि । अव्यया । सोमासः । अति । अव्यया
॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. [ हे इन्द्रवायू ], अप्सु आ (=उदकेषु=वसतीवरीषु मध्ये ) सुताः (=अभिषुता ) अध्वर्युभिः भरमाणाः (=भ्रियमाणाः=ध्रियमाणा ) इमे सोमाः इह अयंसत (=प्रत्ताः सन्ति )—हे वायो, शुक्राः (=शुक्राः=तेजस्विनः सोमा ) अयंसत (=प्रत्ताः सन्ति ) । एते आशवः ( =शीघ्रमादकारिणः ) [ सोमा ] वाम् अभि (=युवामभिलक्ष्य ) तिरः पवित्रम् (=उर्णामयं पवित्रं नाम वस्त्रम् अन्तर्धायकं कृत्वा ) असृक्षत ( =असृज्यन्त=सृष्टा भवन्ति ) । युवायवः (=युवां कामयमानाः ) [ सोमा ] अति अव्ययानि रोमाणि ( =अविमयानि रोमाणि पवित्रघटकानि अतीत्य )—अव्यया (=अव्ययानि=अविमयानि रोमाणि ) अति[क्रम्य ] सोमासः ( =सोमा ) [ असृक्षत=सृष्टा भवन्ति ] ॥

अप्सु अस्मदीयेषु कर्मसु...इहास्मिन्नभिषवस्थाने सुता अध्वर्युभिर्भरमाणास्तैर्भ्रियमाणा गृहीता होतुं वा ह्रियमाणाः । ...... तिरः पवित्रं तिर्यग्भूतं सोमान्तर्धायकं वोर्णामयं पवित्रमभ्यसृक्षत । अभिलक्ष्यासृज्यन्त । सृष्टा भवन्ति । इति सायणः॥

---

पैग केलें जाओ अथवा न जाओ.

'बळकट '=' वाजिनम्. ' अक्षरशः 'घोडा ' अथवा ' बळ ज्याला आहे तो. ' सोमाला ' वाजी ' म्हणजे घोडा असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाच्या दुसऱ्या पोटचरणांत ' मर्मृजन्त ' च्या ठिकाणीं ' मरमृजन्त ' असें, आणि दुसऱ्या चरणांत ' गन्तमिहोतिआ ' असें वाचावें लागतें.

६. [हे इंद्र आणि वायू हो], पाण्यांत काढिलेले आणि अध्वर्यूंनीं धारण केलेले हे सोमरस तुम्हांला अर्पण केले आहेत—हे वायू, तेजस्वी सोमरस अर्पण केले आहेत. सत्वर माद आणणारे हे सोमरस पवित्रांतून तुम्हांसाठीं ओतले जात आहेत. तुमची इच्छा करणारे सोमरस, मेंढरांच्या लोंकरीमधून—मेंढरांच्या लोंकरीमधून सोमरस ओतले जात आहेत.

6. These Somas extracted in the waters [and] brought by the priests are here offered to you—are offered, O Vâyu, the bright Somas. These quick [Somas] are poured through the sieve towards you, [Somas] that love you are poured over the sheeps' wool— Somas over the sheeps' [wool].

६. 'हे इन्द्र आणि वायू हो, पाण्यांत मिसळलेले असे जे हे लखलखणारे सोम आमचे ऋत्विज् हातांत घेऊन अर्पण करीत आहेत, ते तुम्हांकरितांच होत. लवकर माद उत्पन्न करणारे जे हे सोम, ते पवित्रांतून तुम्हांसाठीं गाळले जात आहेत. तुम्ही आपणास प्यावें अशी इच्छा करणारे हे सोमरस पवित्राच्या लोंकरींतून तुम्हांसाठीं ओतले जात आहेत. तर तुम्ही या. आणि हे प्या.'

'पाण्यांत काढिलेले'=' अप्सु आ सुताः.' म्हणजे काढून अथवा काढतांना पाण्यांत मिसळलेले. सायणाचार्य 'अप्सु आ' म्हणजे आमच्या 'कर्मांमध्यें' असा अर्थ करितात. तो अक्षरशः अगदींच संभवणार नाहीं असें नाहीं, पण सोमरस पाण्यांत मिसळीत, आणि त्या पाण्यास 'वसतीवरी' म्हणत असें प्रसिद्ध आहे. मग सरळ अर्थ सोडून देण्याला विशेष कारण आहे असें आम्हांला वाटत नाहीं.

'पवित्रांतून तुम्हासाठीं ओतले जात आहेत'=' तिरः पवित्रम् अभि वाम् असृक्षत.' पवित्र म्हणजे मेंढ्याच्या लोकरीचें केलेले एक वस्त्र, अथवा धाबळीसारिखा एक फडका असे. त्यावर सोमरस घालून त्यांतून एक एक थेंबानें सोमरसाची धार गळवीत असत.

'मेंढराच्या लोंकरीमधून'=' अति रोमाणि अव्यया.' म्हणजे वर सांगितलेल्या पवित्रांतूनच असा अभिप्राय.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'अप्सु आ' असें म्हणावें, तसेंच 'इह अध्वर्युभिः' अशीं व्यस्त पदें म्हणावीं, आणि तिसऱ्या चरणाचे दोन्ही पोटचरण पदपाठाप्रमाणें म्हणावे लागतात.

**अति वायो ससतो याहि शश्वतो यत्र ग्रावा वदति तत्र गच्छतं गृहमिन्द्रश्च गच्छतम् ।**
**विसूनृता ददृशे रीयते घृतमा पूर्णया नियुता याथो अध्वरमिन्द्रश्च याथो अध्वरम् ॥ ७ ॥**

अति । वायो इति । ससतः । याहि । शश्वतः । यत्र । ग्रावा । वदति । तत्र । गच्छतम् । गृहम् । इन्द्रः । च । गच्छतम् ।
वि । सूनृता । ददृशे । रीयते । घृतम् । आ । पूर्णया । निऽयुता । याथः । अध्वरम् । इन्द्रः । च । याथः । अध्वरम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे वायो, ससतः (=स्वपतः=आलस्यादिना निद्रां कुर्वतः) शश्वतः (=बहून्) [पुरुषान्] अति याहि (=अतिक्रम्य आयाहि=आगच्छ)। यत्र [अस्मादृशानां गृहे] ग्रावा वदति (=अभिषवणसाधनभूतः प्रस्तरो नादं करोति) तत्र [गृहं] [युवां] गच्छतम्—[तत्र] गृहं [त्वं च] इन्द्रश्च गच्छतम्। [यत्र] सूनृता ददृशे (=युष्मद्विषयस्तुतिरूपा अस्मादृशानां वाग् दृष्टा भवति=यत्र युष्मद्विषयां स्तुतिं कुर्वन्तोस्मादृशाः पुरुषा दृश्यन्ते) घृतं [च] रीयते (=स्रूयते=हूयते) [तम् अस्मादृशानाम्] अध्वरं (=यज्ञं प्रति) पूर्णया नियुता (=संपूर्णेन युवयोरश्वसंघेन) आयाथः (=युवमागच्छतः=आगच्छतम्)—[त्वं च] इन्द्रश्च [तम्] अध्वरं (=यज्ञं प्रति) याथः (=गच्छथः=आगच्छथः=आगच्छतम्) ॥

७. हे वायू, निजून राहणाऱ्या अनेक जनांला तूं सोडून ये; जेथें ग्राव्याचा नाद होत आहे तेथें या—[ त्या ] घरीं [ तूं ] आणि इन्द्र या. ज्या घरीं तुमची स्तुति दृष्टीस पडत असेल, [ आणि ] घृताच्या धारा वाहत असतील, त्या यज्ञाप्रत आपले सर्व घोडे जोडिलेल्या रथांत बसून या—[ तूं ] आणि इन्द्र मिळून [ त्या ] यज्ञाप्रत या.

7. Pass, O Vâyu, by many persons that are asleep; proceed thither where the Soma-pressing stone sounds—proceed to [that] house [thou] and Indra. Where your praise is seen [chanted] [and] clarified butter is poured forth, you proceed to that sacrifice with all your horses—[thou Vâyu] and Indra go to that sacrifice.

७. ‘ हे इन्द्र आणि वायू हो, आम्ही पहांटेस उठून ग्राव्यांत तुम्हांसाठीं सोमरस काढीत आहोंत, आणि तुम्हांप्रीत्यर्थ स्तोत्रें गात आहोंत. दुसरे पुष्कळ लोक अजून निजूनच राहिलेले आहेत. तर तुम्ही त्या निजून राहिलेल्या लोकांचे घरीं जाऊं नका; आमच्या घरीं ग्राव्यांचा ध्वनि ऐकूं येत आहे आणि स्तोत्रांचा घोष होत आहे, तर तुम्ही आमचेच घरीं या, आमचेच घरीं आपले सर्व घोडे रथाला जोडून या आणि आम्हीं अर्पिलेलीं हव्यें स्वीकारा ’ असा अभिप्राय आहे.

‘ निजून राहणाऱ्या अनेक जनांला सोडून ’=‘ अति शश्वतः ससतः. ’ यावरून उघड होतें कीं, वेदकाळीं आपले आर्य पूर्वज मोठ्या पहांटेला उठून ग्राव्यांत सोमरस काढून आणि स्तोत्रें म्हणून देवांची उपासना करीत; आणि जो कोणी मोठ्या पहांटेस उठून उपासना करील तो विशेष दक्ष, त्याच्या यज्ञाप्रत ( म्हणजे उपासनेप्रत ) देव मोठ्या प्रेमानें येतात अशी समजूत असे. या मंत्रांतील जी प्रार्थना ती निष्कपट आणि साधी आहे, ती लक्ष्यांत ठेवण्याजोगी आहे. त्यांत दांभिकपणा अथवा खोटेपणा दिसत नाहीं. आम्ही सर्वांअगोदर उठून तुमची उपासना करीत आहों, दुसरे लोक अजून निजले आहेत, त्यास वगळून आमच्याच घरीं तुम्ही या, असें देवांस सांगणें, आणि देव त्याप्रमाणें करितील असें मानणें यांत किती सुंदर भोळेपणा आहे पहा.

या ऋचेचें वृत्त चमत्कारिक आहे. यांत दोनच चरण आहेत, आणि प्रत्येक चरणांत जगती छंदाचे दोन द्वादशाक्षरी पोटचरण असून, शेवटीं एक एक चरण अष्टाक्षरी आहे. इतर अत्यष्टि

**अत्राह तद्वहेथे मध्व आहुतिं यमश्वत्थमुपतिष्ठन्त जायवोऽस्मे ते सन्तु जायवः ।**
**साकं गावः सुवते पच्यते यवो न ते वाय उप दस्यन्ति धेनवो नाप दस्यन्ति धेनवः ॥ ८ ॥**

अत्र । अह । तत् । वहेथे इति । मध्वः । आऽहुतिम् । यम् । अश्वत्थम् । उपऽतिष्ठन्त । जायवः । अस्मे इति । ते । सन्तु । जायवः ।
साकम् । गावः । सुवते । पच्यते । यवः । न । ते । वायो इति । उप । दस्यन्ति । धेनवः । न । अप । दस्यन्ति । धेनवः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. [ हे इन्द्रवायू ], तत् मध्वः आहुतिं ( =तस्य मधुरस्य सोमस्याहुतिम् ) अत्राह (=अत्रैव ) वहेथे (=वहतं=स्वीकुरुतं ) यम् अश्वत्थं (= ? यं वाजिनं सोमं ) जायवः ( =जेतारः=विजयिनो वीरा ) उपतिष्ठन्त ( =उपतिष्ठन्ति=सेवन्ते )—ते जायवः (=तादृशा जेतारः प्राप्तविजया वीरा ) अस्मे सन्तु ( =अस्माकमेव सन्तु ) । हे वायो, [ ते=तव ] गावः साकं सुवते ( =युगपदेव· अपत्यमुत्पादयन्ति=दोग्ध्र्यो भवन्ति ) । [ ते ] यवः पच्यते ( =धान्यं परिणतं भवति ) । ते धेनवः ( =तव गावो ) नोप दस्यन्ति ( =नोपक्षीणा भवन्ति )— [ ते ] धेनवः ( =गावो ) नाप दस्यन्ति ( =न नष्टा भवन्ति ) ॥

इयं दुर्बोधपूर्वार्धा सायणेनैवं व्याख्याता । अत्राहास्मिन्नेव यज्ञे । अहेति विनिग्रहार्थीयः । मध्वो मधुरस्य मधुसदृशस्य वा तत् तस्याहुतिं प्रदेयद्रव्यं वहेथे । धारयतम् । यं सोममश्वत्थं पर्वतादिव्याप्तिप्रदेशे स्थितं जायवो जेतारो यजमाना उपतिष्ठन्ति । उपेत्य तिष्ठन्ति क्रयाद्यर्थम् । किंच । अस्मे अस्माकं संबन्धिनो जायवो जेतारः कर्मनिर्वहितारस्ते ऋत्विजः सन्तु । समर्था भवन्तु । यज्ञं निर्वहन्त्वित्यर्थः । यद्वा ते प्रसिद्धाः प्रयोगकुशला जायवो जेतार ऋत्विजोऽस्मे सन्तु नान्यस्य । अत्र वहेथे इत्युक्तम् । कोऽत्र विशेष इति तत्राह । हे इन्द्रवायू अस्मिन्यज्ञे गावो धेनवः साकं सहैव सुवते । युष्मदर्थमेव क्षीरमुत्पादयन्ति । दोग्ध्र्यो भवन्तीत्यर्थः । यद्वा गावः साकं सहैव सुवते । अपत्यमुत्पादयन्ति त्वद्दोहनार्थम् । आदादिकः । ...... । किंच यवः ॥ जातावेकवचनम् । उपलक्षणमेतत् । यवादिभिः पुरोडाशादिकं पच्यत इत्यर्थः । किंच हे वायो इन्द्र च यतो गाव एवं सुवते । अतस्ते त्वदर्था धेनवो नोपदस्यन्ति । नोपक्षीणा भवन्ति । रोगादिना कृशा न भ-

८. [ हे इन्द्र आणि वायू हो ], तुम्ही येथेंच त्या मधुर सोमाची आहुति ग्रहण करा, ज्या अश्वत्थ सोमाची वांछा विजयी योद्धे करीत असतात.—ते विजयी योद्धे आमचे होओत. [ हे वायू ], सर्व गाई एकदम वितात, धान्य पक्क होतें. हे वायू, तुझ्या धेनु क्षीण होत नाहींत—[तुझ्या] गाई नाश पावत नाहींत.

8. Receive, [O Indra and Vâyu], an oblation here of that sweet [Soma] which, standing on the horse, victors serve.—May those victors be ours. [Thy] cows, O Vâyu, all bear at the same time, [thy] corn is ripened; thy cows do not suffer—[thy] cows do not perish.

वृत्ताप्रमाणें नाहीं. त्यामुळें यांत चौसष्टच अक्षरें आहेत, अडुसष्ट असावीं तीं नाहींत; तथापि अनुक्रमणिकेवरून सायणांनीं उतरून घेतलेल्या वाक्यांत या ऋचेच्या वृत्ताविषयीं कांहींच सांगितलेलें नाहीं.

८. 'हे इन्द्र आणि वायू हो, ज्या सोमरसाची गोडी विजय पावणारे योद्धे घेतात, तशा सोमाची आहुति आम्ही आज सिद्ध करून तुम्हांला येथें अर्पण केली आहे; तर हा सोम तुम्ही प्या, आणि विजयी योद्धे जन आमच्या घरीं जन्मोत. हे वायू,तूं ज्यावर कृपा करितोस, त्याच्या सर्व गाई एकदम वितात, त्याचे घरीं धान्य शिजत असतें, त्याच्या गाई सुकतहि नाहींत, आणि नाशहि पावत नाहींत.'

परंतु या मंत्राचा पूर्वार्ध कठिण आहे. त्यांत 'तत्' आणि 'अश्वत्थम्' हे शब्द कठिण आहेत, इतर मंत्र सोपा आहे.

'येथेंच'=' अत्राह.' म्हणजे दुसऱ्या ठिकाणीं असल्या उंची सोमाची आहुति तुम्हांला मिळणार नाहीं, आम्हींच तुम्हांसाठीं तयार केली आहे. लढाईत जे योद्धे जिंकतात, ते योद्धे कांहींएक प्रकारचा सोमरस तयार करून देवांस अर्पण करून आपण पीत असतील असें वाटतें. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् 'जायवः' म्हणजे जय देणारे सोमरस आणि 'अश्वत्थ' म्हणजे अश्वत्थाचें ( पिंपळाचें ) केलेलें पात्र, असा अर्थ करितात. पण त्याला प्रयोगान्तरांचा आधार पाहिजे आहे तो मिळत नाहीं.

'अश्वत्थ [ सोमरस ]'=' अश्वत्थम्.' हा शब्द अतिदुर्बोध आहे. सायणाचार्य 'अश्वत्थ' शब्दाचा निर्वचनास अनुसरून पर्वतांत सांपडणारा असा अर्थ करितात, पण तो केवळ काल्पनिक शब्दव्युत्पत्तीवर अवलंबून केला आहे. 'अश्वत्थ' हें येथें सोमाचें विशेषण आहे हें निर्विवाद असून त्यांत संशय नाहीं; पाश्चात्त्यांच्या युक्तीला अ-

इमे ये ते सु वायो बाह्वोजसोऽन्तर्नदी ते पतयन्त्युक्षणो महि व्राधन्त उक्षणः ।
धन्वन् चिद्ये अनाशवो जीराश्चिदगिरौकसः ।
सूर्यस्येव रश्मयो दुर्नियन्तवो हस्तयोर्दुर्नियन्तवः ॥ ९ ॥ २५ ॥

इमे । ये । ते । सु । वायो इति । बाहुऽओजसः । अन्तः । नदी इति । ते । पतयन्ति । उक्षणः । महि । व्राधन्तः । उक्षणः ।
धन्वन् । चित् । ये । अनाशवः । जीराः । चित् । अगिराऽओकसः । सूर्यस्यऽइव । रश्मयः । दुःऽनियन्तवः । हस्तयोः । दुःऽनियन्तवः ॥ ९ ॥ २९ ॥

---

वन्ति । न केवलमनुपक्षीणाः किंतु धेनवो युष्मत्प्रीणयित्र्यो गावो नापदस्यन्ति । चौराद्युपहारैरुपक्षीणा नष्टा न भवन्ति । इति ॥

---

## भाषायाम्.

९. हे वायो, इमे (=पुरोवर्तिनो) ये ते (=तव) बाह्वोजसः (=बाहुषु स्थितबलवन्त) उक्षणः (=सेक्तारः=यौवनवन्तस्) ते (?=त्वां) नदी अन्तः (=अन्तरिक्षपृथिवीनद्योर्मध्ये) पतयन्ति (=उत्पातयन्ति=गमयन्ति)— महि व्राधन्तः (=अत्यन्तं प्रवृद्धा) उक्षणः (=युवानः) [अश्वास्] [त्वां] [पतयन्ति=गमयन्ति], ये धन्वन् चित् (=धन्वन्यपि=उदकरहितप्रदेशेपि= "उदकनिर्गमनापादानभूतेऽन्तरिक्षेपि निरालम्बे") अनाशवः (=नाशरहिता) जीराश्चित् (=सत्वरगामिन एव सन्तः) अगिरौकसः (=गिरा स्थितिमकुर्वन्तः=गिरं स्तोत्रं श्रोतुं न तिष्ठन्तो) [भवन्ति] [तेऽश्वाः] सूर्यस्य रश्मय इव (=किरणा इव) दुर्नियन्तवः (=दुःखेन नियन्तव्याः)—हस्तयोर्दुर्नियन्तवः (=सारथेर्हस्ताभ्यामपि दुर्नियन्तव्या) [भवन्ति] ॥

नदी नन्दने द्यावापृथिव्यावन्तस्तयोरन्तराले तं त्वां पतयन्ति पातयन्ति ...... । **बाह्वोजसः** । बाहुषु प्रकृष्टबलवन्तः । उपलक्षणमेतत् । सर्वाङ्गबला इत्यर्थः । ...... **अनाशवः** ...... आकाशे विलम्बमकुर्वाणा इत्यर्थः । ...... अगिरौकसः । गिरा **ओकः** स्थानं येषां नास्ति ते तादृशाः । भर्त्सनादिना स्थितिमलभमाना इत्यर्थः ।...... **दुर्नियन्तवः** दुःखेन नियन्तव्याः । ते यथा क्षणेन दश दिशो व्याप्नुवन्ति बहुवश तद्वदेतेपीत्यर्थः । पूर्वं गिरा निर्बाधत्वमुक्तम् । इदानीं हस्तेनाप्यनिर्बाधत्वमाह । हस्त-

९ हे वायू, हे जे तुझे प्रबळ खांद्यांचे जवान घोडे दोन्ही नद्यांचे मध्यें तुला सहज उडवून नेतात,—अति मोठे जवान [ घोडे उडवून नेतात ], जे उदकहीन प्रदेशांमध्येंहि नाश न पावणारे, तर वेगवंतच [ आणि ] स्तोत्रासाठींहि न थांबणारे [ होत ], ते सूर्याच्या किरणांप्रमाणें थांबविण्यास कठिण—दोन्ही हातांनीं थांबविण्यास कठिण होत.

9. These thy horses O Vâyu, which, strong-shouldered and young, easily bear thee on their wings between the two rivers —[ horses], immense and young; which do not suffer even in the waterless regions, are swift and do not stop to hear a hymn, are difficult to restrain like the sun's rays—difficult for both hands to restrain.

---

नुसरून 'पिंपळाच्या लांकडाचा केलेला' असा अर्थ करावा तर, ' आश्वत्थ ' असें रूप पाहिजे होतें. ' अश्वत्थ'शब्दाचा अक्षरार्थ ' घोड्यावरचा ' इतकाच आहे. जर युक्ति काढून अर्थ बसवावयाचा आहे ( आणि येथें असाच बसविला पाहिजे ), तर आम्हांस वाटतें कीं, सोम ठेवावयाचें जें भांडें अथवा प्याला असे त्याची आकृति घोड्यासारिखी असेल; अथवा त्याच्या आकृतींत असें कांहीं तरी असावें, कीं त्याला ' घोडा ' असें म्हणतां येईल. आणि सोमाला जो ' वाजी ' अथवा ' नियुत्वान् ' असें म्हणतात त्याचें कारण हेंच असेल तरी कोण जाणे ?

' पक्क होतें '=' पच्यते. ' म्हणजे शिजतें. त्याला धान्याची समृद्धि असते असा अभिप्राय दिसतो.

याहि ऋचेचें वृत्त पूर्वीच्याच ऋचेप्रमाणें आहे, आणि तींत चार अक्षरें कमी आहेत. वर टीप पहा.

---

९. ह्या मंत्राचा भावार्थः ' हे वायू, हे जे तुझे महाप्रबळ आणि जवान घोडे तुला घेऊन आकाशप्रदेशांतून पक्ष्याप्रमाणें उडतात, जे अत्यंत मोठे आहेत, जे उदकरहित प्रदेशांतहि न थकतां आणि न थांबतां एकसारिखे धांवत असतात, ते घोडे सूर्याच्या किरणांप्रमाणें एकदम धांवतात, आणि दोन्ही हातांनीं लगाम ओढला तरी थांबत नसतात, तर एकदम यज्ञाकडेस येत असतात. '

' प्रबळ खांद्यांचे '=' बाह्वोजसः. ' म्हणजे ज्यांचे बाहु अथवा खांदे बळकट आहेत असे, ज्यांचे पाय मजबुत आहेत ते, ज्यांच्या पायांत जोर आहे ते.

' दोन्ही नद्यांचे मध्यें '=' नदी अन्तः. ' भाषांतर अक्षरशः केलें आहे. दोन्ही नद्या म्हणजे पृथ्वी आणि द्युलोक

## सूक्तम् १३६.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । मित्रावरुणौ देवता । अन्त्ययोस्तु
तन्मन्त्रलिङ्गोक्तदेवता । अत्यष्टिश्छन्दः । अन्त्या तु त्रिष्टुप् ॥

**प्र सु ज्येष्ठं निचिराभ्यां बृहन्नमो हव्यं मतिं भरता मृळयद्भ्यां स्वादिष्ठं मृळयद्भ्याम् ।**
**ता सम्राजा घृतासुती यज्ञेयज्ञ उपस्तुता ।**
**अथैनोः क्षत्रं न कुतश्चनाधृषे देवत्वं नू चिदाधृषे ॥ १ ॥**

प्र । सु । ज्येष्ठम् । निऽचिराभ्याम् । बृहत् । नमः । हव्यम् । मतिम् । भरत । मृळयत्ऽभ्याम् । स्वादिष्ठम् । मृळयत्ऽभ्याम् ।
ता । सम्ऽराजा । घृतऽआसुती इति घृतऽआसुती । यज्ञेऽयज्ञे । उपऽस्तुता ।
अथ । एनोः । क्षत्रम् । न । कुतः । चन । आऽधृषे । देवऽत्वम् । नु । चित् । आऽधृषे ॥ १ ॥

---

योर्दुर्नियन्तवः । उभाभ्यामपि हस्ताभ्यां दुःखेन नियन्तव्याः । देवयजनगमनाय शीघ्रगामिन इत्यर्थः । इति सायणाचार्याः ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे ऋत्विजः ], निचिराभ्यां ( =नितरां चिरंतनाभ्यां ) मृळयद्भ्यां ( =सुखयद्भ्यां ) [ मित्रावरुणाभ्यां ] ज्येष्ठम् ( =अतिशयेन प्रशस्यं ) बृहत् ( =महच्च ) नमः ( =नमस्करणं ) हव्यं ( =हविर् ) मतिं ( =स्तोत्रं च ) सु ( =सुष्ठु ) प्र भरत ( =प्रार्पयत ) —मृळयद्भ्यां ( =सुखयद्भ्यां ) [ मित्रावरुणाभ्यां ) स्वादिष्ठम् ( =अतिशयेन स्वादु ) [ नमआदिकं ] [ प्र भरत ] । ता ( =तौ ) [ हि ] सम्राजा ( =सम्राजौ=राजाधिराजौ ) यज्ञेयज्ञे ( =सर्वेष्वपि यज्ञेषु ) घृतासुती ( =प्रत्तघृताहुती सन्तौ ) उपस्तुता ( =उपासकैः स्तुतौ ) [ भवतः ] । अथ (=अतः कारणादेव=यतः कारणात्तौ सम्राजौ भवतोतः कारणात् ) एनोः ( =एतयोः ) क्षत्रम् ( =अधिकारो ) न कुतश्चन आधृषे ( =केनापि पुरुषेण आधर्षितुं न शक्यम् )— [ एतयोर् ] देवत्वं ( =देवभावोपि ) नू चित् ( =नैव ) आधृषे ( =केनापि आधर्षितुं शक्यं ) [ भवति ] ॥

नमो नमस्कारोपलक्षितं स्तोत्रं तदुपलक्षितं हविर्लक्षणमन्नं वा...... । किंच हव्यं हव्यां मतिं तत्प्रदानविषयां बुद्धिं भरत । यद्वा मतिं पूज्यं हव्यं हविर्भरत । पूर्वत्र पु-

## सूक्त १३६.

ऋषि—दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—मित्रावरुण; शेवटच्या दोन ऋचांची देवता त्यांत सांगितलेली. वृत्त—अत्यष्टि; शेवटच्या ऋचेचें मात्र त्रिष्टुभ्.

१. [ हे ऋत्विजांनो ], अत्यंत चिरंतन [ आणि ] सुख देणारे जे [ मित्रावरुण ], त्यांला तुम्ही उत्कृष्ट [आणि] मोठें नमन, हव्य, [ आणि ] स्तोत्र अर्पण करा—सुख देणाऱ्या [ मित्रावरुणां]ला तुम्ही अत्यंत मधुर [नमन, हव्य आणि स्तोत्र अर्पण करा ]. त्या दोघांहि साम्राज्य कर्त्यांला घृताची आहुति देऊन प्रत्येक यज्ञांत [ भक्तजन ] स्तवीत असतात. आणि त्यांचा अधिकार कोणाच्यानेंहि हिसकावून घेववत नाहीं—त्यांचें देवत्व हिसकावून घेववत नाहीं.

## HYMN 136.

To *Mitra* and *Varuṇa*, except the last two verses, which are dedicated to the Gods therein mentioned. By *Paruchchhepa*, the son of *Divodâsa*. Mitre—*Atyashṭi*, except in the last verse, where it is *Trishṭubh*.

1. Offer well an excellent [and] great supplication, oblation [and] prayer to eternal [Mitra and Varuṇa], the givers of happiness—the sweetest [supplication, oblation and prayer] to the two givers of happiness. Those kings of kings [are] praised in every sacrifice [ and ] honoured with the oblation of clarified butter. And their authority is unassailable from any quarter—unassailable is their Godhead.

---

असें सायण म्हणतात. असा अर्थ कसाहि निघालेला असो, दोन्ही नद्यांचे मध्यें म्हणजे अंतरिक्षप्रदेशांतून असा अर्थ आहे यांत मात्र संशय नाहीं.

'स्तोत्रासाठींहि न थांबणारे '=' अगिरौकसः.' म्हणजे त्यांच्या मनांत थांबावयाचें नसतां त्यांनीं थांबावें असें क्रोणी स्तोत्र केलें तर, ते तें ऐकण्यासाठीं न थांबणारे, तर जेथें त्यांचें मनांत जावयाचें असेल त्या ठिकाणीं एकदम जाणारे असें तात्पर्य.

वृत्तासाठीं 'बाहुओजसो' असें पहिल्या पादाच्या पहिल्या पोटचरणांत म्हणावें, आणि 'अन्तर्नदी ते पतयन्ति उक्षणः' असा दुसरा पोटचरण म्हणावा लागतो.

---

१. 'हे ऋत्विजांनो, अति चिरंतन आणि अनाद्यंत जे मित्रावरुण, त्यांजला

**अदर्शि गातुरुरवे वरीयसी पन्था ऋतस्य समयंस्त रश्मिभिश्चक्षुर्भगस्य रश्मिभिः ।**
**द्युक्षं मित्रस्य सादनमर्यम्णो वरुणस्य च ।**
**अथा दधाते बृहदुक्थ्यं१ वय उपस्तुत्यं बृहद्वयः ॥ २ ॥**

अदर्शि । गातुः । उरवे । वरीयसी । पन्थाः । ऋतस्य । सम् । अयंस्त । रश्मिऽभिः । चक्षुः । भगस्य । रश्मिऽभिः ।
द्युक्षम् । मित्रस्य । सदनम् । अर्यम्णः । वरुणस्य । च ।
अथ । दधाते इति । बृहत् । उक्थ्यम् । वयः । उपऽस्तुत्यम् । बृहत् । वयः ॥ २ ॥

रोडाशाद्यदनीयमन्नम् इदानीं तु सोमाज्यादिरूपं निपेयं हविरिति विवेकः । ...... कुतश्चन कस्मादपि च शत्रो राक्षसादेः सकाशात् कस्मादप्युपायाद्वा नाधृषे । आधर्षितुं नाम शक्यं न भवति ॥ इति सायणः ॥

## भाषायाम्.

२. वरीयसी गातुः ( =अतिशयेन विस्तीर्णा उषोरूपा ऋतस्य पदवी ) उरवे ( =विस्तीर्णाय यज्ञाय=यज्ञसाधनार्थम् ) अदर्शि ( =सर्वैर्दृश्याभवत् ) । ऋतस्य पन्थाः ( =सत्यभूतस्य यज्ञस्य मार्गः=सूर्यो ) रश्मिभि समयंस्त ( =किरणैः संगतो भूतोस्ति) —भगस्य चक्षुः ( =भगदेवस्य नयनभूतः सूर्यो ) रश्मिभिः ( =किरणैः) [ समयंस्त= संगतोभूत् ] । मित्रस्य अर्यम्णः वरुणस्य च द्युक्षं ( =द्युलोकस्थं ) सदनं ( =स्थानम्) [ अदर्शि=दृष्टमभूत् ] । अथ ( =एवं सति ) [ मित्रावरुणौ ] बृहत् ( =प्रभूतम् ) उक्थ्यं ( =स्तुत्यं ) वयः ( =अन्नम् )—उपस्तुत्यं ( =कीर्तनीयं ) बृहत् ( =प्रभूतं च ) वयः ( =अन्नं ) दधाते ( =अस्मभ्यं दत्तां=प्रयच्छताम् ) ॥

गातुर्गमनशीला वरीयस्युरुतरोषा उरवे विस्तीर्णाय यागाय गमनादिव्यापारायादर्शि । सर्वैर्दृष्टत्वात् । तथा ऋतस्य गमनशीलस्यादित्यस्य पन्था मार्ग आकाशलक्षणो रश्मिभिः समयंस्त । प्रकाशैः संगतोभूत् । ...... मित्रस्य प्रकाशकारित्वात्सर्वजनमित्रस्य सदनं गृहमन्तरिक्षं द्युक्षं दीप्तानां निवासस्थानं रश्मिभिः समयंस्त । संगतमभूत् । तथार्यम्ण एतन्नामकस्य देवस्य ...... द्युक्षं सदनं रश्मिभिः समयंस्त । किंच वरुणस्य तमोनिवारकस्यैतन्नामकस्य देवस्य सदनं तथाभूत् । यद्यपि सूर्यस्यैकत्वेप्युपाधिभेदेन भेदात्पृथक् स्तुतिः । तथा यद्यपि त्रिभिरपि प्रकाश्यमप्यन्तरिक्षमेकं तथापि प्रकाश-

२. अतिशयेंकरून विस्तीर्ण [असा जो उषोरूप] मार्ग, [तो] [प्रकाशमान होऊन] विस्तीर्ण [यज्ञा]कारणें दृष्टीस पडत आहे; सत्याचा मार्ग किरणांनीं व्याप्त झाला आहे—भगाचा डोळा किरणांनीं [व्याप्त झाला आहे]. मित्राचें, अर्यमाचें आणि वरूणाचें स्वर्गातील स्थान प्रकाशूं लागलें आहे. तर आतां [मित्रावरूण] आम्हांला मोठें आणि स्तुत्य अन्न देओत—स्तुत्य आणि मोठें अन्न [देओत].

2. [Ushas] the very wide path [of devotion] has become visible for the wide [? sacrifice]; [the sun] the path of the rite has become united with the rays—the eye of Bhaga [has become united with the rays]. The heavenly seat of Mitra, of Aryman and of Varuna [has become visible]. May therefore [Mitra and Varuna] give us great [and] praiseworthy food—[give] renowned [and] great food.

अत्यंत उत्कृष्ट आणि अत्यंत मधुर असें हव्य आणि स्तोत्र अतिनम्रपणें अर्पण करा; कारण ते उपासकांला सुख देणारे होत. ते सर्व राजांवरहि राज्य करणारे होत; आणि सर्व यज्ञांत घृताच्या आहुति त्यांस अर्पण करून त्यांची स्तुति करीत असतात. त्यांचा जो सर्व त्रैलोक्यावरचा अंमल, तो कोणाच्यानेंहि काढून घेववत नाहीं, त्यांचें देवत्व कोणाच्यानेंहि काढून घेववत नाहीं.'

'नमन, हव्य आणि स्तोत्र अर्पण करा'='नमः हव्यं मतिं प्र भरत.' म्हणजे नम्रपणानें हव्य आणि स्तोत्र अर्पण करा असा भावार्थ आहे.

'देवत्व हिसकावून घेववत नाहीं'='देवत्वं नू चित् आधृषे.' यांत 'नू चित्' याचा अर्थ 'नैव' असा निषेधार्थी आहे. 'नू चित्'चा 'नाहीं' हा अर्थ वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलेला आहे. सू. ३९ मं. ४ आणि टीप पहा.

वृत्तासाटीं दोनी ठिकाणीं 'मृळयद्भिआम्' असें वाचावें.

२. ही ऋचा कठिण आहे. भावार्थः—'प्रभातकाळ झाला आहे, उषा उगवली आहे, आणि यज्ञरूप सत्याचा मार्गच जणुं असा जो सूर्य, अथवा 'भग' देवाचा डोळाच जणुं असा जो सूर्य, तो उगवला आहे आणि आपल्या किरणांनीं प्रकाशत आहे; आणि मित्र, अर्यमा आणि वरूण यांचें जें स्थान, तें अंतरिक्ष किरणांनीं व्याप्त झालें आहे. तर आतां मित्रावरूण हे आम्हांवर कृपा

**ज्योति॑ष्मती॒मदि॑तिं धार॒यत्क्षि॑तिं॒ स्व॑र्वती॒मा स॑चेते दि॒वेदि॑वे जा॒गृवांसा॑ दि॒वेदि॑वे ।**

**ज्योति॑ष्मत्क्ष॒त्रमा॑शाते आदि॒त्या दानु॑न॒स्पती॑ ।**

**मि॒त्रस्तयो॒र्वरु॑णो यात॒यज्ज॑नोऽर्य॒मा या॑त॒यज्ज॑नः ॥ ३ ॥**

ज्योति॑ष्मतीम् । अदि॑तिम् । धा॒रय॑त्ऽक्षितिम् । स्वः॑ऽवतीम् । आ । स॒चेते॒ इति॑ । दि॒वेऽदि॑वे । जा॒गृ॒ऽवांसा॑ । दि॒वेऽदि॑वे ।

ज्योति॑ष्मत् । क्ष॒त्रम् । आ॒शा॒ते॒ इति॑ । आ॒दि॒त्या । दानु॑नः । प॒ती इति॑ ।

मि॒त्रः । तयोः॑ । वरु॑णः । या॒त॒यत्ऽज॑नः । अ॒र्यमा । या॒त॒यत्ऽज॑नः ॥ ३

कानां भेदात् त्रिधा स्तूयते । उदयानन्तरं कर्मानुष्ठानाय प्रकाशोभवदित्यर्थः । इति सायणः ॥

## भाषायाम्.

३. [ मित्रावरुणौ ] ज्योतिष्मतीं ( =तेजःसंपूर्णा ) धारयत्क्षितिं (=पृथिवीं धारयन्तीं ) स्वर्वतीं (=द्युवतीं=द्युलोकं च धारयन्तीम् ) अदितिं दिवेदिवे (=प्रतिदिनम् ) आ सचेते ( =अनुगच्छेते )—जागृवांसा ( =जागृवांसौ=नित्यं जातप्रबोधौ ) दिवेदिवे (=प्रतिदिनम् ) [ आ सचेत=अनुगच्छेते=अदितेर्मार्गेण अन्तरिक्षे गच्छेते ] । आदित्या (=आदित्यौ=अदितेः पुत्रभूतौ ) दानुनस्पती ( =दानस्य पती= देयस्य धनस्य स्वामिनौ ) [ मित्रावरुणौ ] ज्योतिष्मत् क्षत्रं (=प्रकाशमयम् अधिकारस्थलम् ) आशाते ( =प्राप्नुतः ) । तयोः मित्रस् [ तथा ] वरुणः यातयज्जनः (=स्वस्वव्यापारेषु जनानां व्यापारयिता ) [ भवति ]—अर्यमा यातयज्जनः (=स्वस्वव्यापारेषु जनानां व्यापारयिता ) [ भवति ] ॥

करोत आणि आम्हांला विपुल आणि वाखाणण्यासारिखें असें धनधान्य देओत.’

‘ विस्तीर्ण [ असा जो उषोरूप ] मार्ग ’=‘ वरीयसी गातुः.’ म्हणजे उषा आणि सूर्य उगवल्यानंतर यज्ञादिक कर्माला आरंभ होतो, तोंपर्यंत तीं थांबलेलीं जणुं असतात. म्हणून उषेला आणि सूर्याला ‘ ऋतस्य पन्थाः ’ असें म्हटलें आहे असें आम्हांस वाटतें. कोणत्याहि कारणानें तसा अर्थ निघालेला असो, परंतु तोच अर्थ घ्यावयाचा आहे यांत संशय दिसत नाहीं.

३. प्रकाशानें व्यापून गेलेली [ आणि ] पृथिवीतें धारण करणारी [ आणि ] द्युलोकातेंहि धारण करणारी जी अदिति, तिच्या मार्गानें [ हे मित्रावरुण ] प्रत्यहीं जातात—जागरूक [मित्रावरुण] प्रत्यहीं जातात. ते तेजःपुञ्ज अधिकारस्थळाप्रत पावले आहेत—अदितीचे पुत्र [ आणि ] धनाचे स्वामी [जे मित्र आणि वरुण, ते] [तेजःपुंज अधिकारस्थळाप्रत पावले आहेत ]. त्यांतून मित्र [आणि ] वरुण सर्व जनांला आपआपल्या कामीं गुंतवितात—अर्यमा[हि] सकळ जनांला आपआपल्या कामीं गुंतवितो.

3. [ Mitra and Varuṇa] follow day after day Aditi who is filled with light, who supports the earth, who supports the heaven —the watchful [Mitra and Varuṇa] follow [Aditi] day after day. They the sons of Aditi, and lords of bounty, have attained to the sovereignty of light. Of them Mitra [as well as] Varuṇa employs people in their respective callings—Aryaman employs people in their respective callings.

---

' सत्याचा मार्ग '=' ऋतस्य पन्थाः. ' म्हणजे सूर्य असा अभिप्राय. सू. ११५. मं. १ आणि टीप पहा. शिवाय ऋ. ७. ६३. १ यांत ' चक्षुर्मित्रस्य वरुणस्य देवः ' असें सूर्याला म्हटलें आहे. यावरून आणि इतर मंत्रांवरूनहि ' चक्षुर्भगस्य ' म्हणजे येथें सूर्य समजावयाचा आहे, आणि ' ऋतस्य पन्थाः सम् अयंस्त रश्मिभिः । चक्षुर्भगस्य रश्मिभिः ' असे शब्द आहेत त्यावरून ' ऋतस्य पन्थाः ' म्हणजे सूर्य समजावयाचा आहे असें उघड सिद्ध होतें.

' स्वर्गातील स्थान '=' द्युक्षं सदनम्. ' म्हणजे अंतरिक्ष असें सायण म्हणतात तें युक्त दिसतें.

मात्र या ऋचेंत ' विस्तीर्ण [ यज्ञा ] कारणें '=' उरवे' असें आहे, त्याच्या अर्थाविषयीं संशय दिसतो. निरुपायासाठीं आम्हीं सायणांसच अनुसरून त्यांचा किंचित् ओढाताणीचा अर्थ दिला आहे.

वृत्तासाठीं ' उक्थिअं ' असें वाचावें लागतें.

---

३. 'प्रकाशानें भरलेली अशी, आणि जिच्या पोटांत सगळी पृथिवी आणि सगळा द्युलोक हे मावतात, आणि सदैव राहतात अशी जी अदिति, म्हणजे प्र-

अयं मित्राय वरुणाय शंतमः सोमो भूत्ववपानेष्वाभगो देवो देवेष्वाभगः ।
तं देवासो जुषेरत विश्वे अद्य सजोषसः ।
तथा राजाना करथो यदीमह ऋतावाना यदीमहे ॥ ४ ॥

अयम् । मित्राय । वरुणाय । शम्ऽतमः । सोमः । भूतु । अवऽपानेषु । आऽभगः । देवः । देवेषु । आऽभगः ।
तम् । देवासः । जुषेरत । विश्वे । अद्य । सऽजोषसः ।
तथा । राजाना । करथः । यत् । ईमहे । ऋतऽवाना । यत् । ईमहे ।
॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. अयम् (=अस्माभिः प्रदीयमानः) सोमो मित्राय वरुणाय [च] शंतमः (=पीयमानः सन् अतिशयेन सुखकरो) भूतु (=भवतु)। —अवपानेषु (=चमसेषु) आभगः (=संभजनीयो) [भवतु]—देवेषु देवः (=देवभूतः सन्) आभगः (=संभजनीयः=उपभोगयोग्यो) [भवतु]। तं [सोमं] विश्वे देवासः (=सकला देवाः) सजोषसः (=संगताः सन्तः) अद्य (=अस्मिन् देशे) जुषेरत (=सेवेरन्)। हे राजाना (=राजानौ) [मित्रावरुणौ], यदीमहे (=यथा वयं याचामहे) तथा करथः (=कुरुतम्)—हे ऋतावाना (=ऋतावानौ=यज्ञियौ) [मित्रावरुणौ], यदीमहे (=यथा वयं याचामहे) [तथा करथः=तथा कुरुतम्] ॥

अवपानेषु अवाङ्मुखचमसपानेषु विषयेषु आ सर्वतो भगो भजनीयस्ताभ्याम्। किंच देवो दीप्यमानो देवेषु मित्रावरुणानुचरेष्वितरदेवेषु तैराभग आभजनीयः। यद्वा देवेषु स्तोतृषु यजमानेषु मध्ये देवो दीप्यमानः। इति सायणः ॥

काशानें भरलेला जो निःसीम अवकाश, तो पूर्वेपासून पश्चिमेकडे जणुं नित्य जात असतो. तर त्या अदितीच्या मार्गानें तिचे पुत्र जे उदार मित्रावरुण, ते नित्य जागृत राहून चालत असतात, कधींहि निजून राहत नाहीत. मित्रावरुण हे प्रकाशमय देशांत आपलें राज्य चालवितात, आणि सकळ जनांला नित्य आपआपल्या कामीं लावीत असतात' असा अभिप्राय आहे.

'अदिति' म्हणजे जिजमध्यें सूर्य, चंद्र, इत्यादि असंख्य प्रकाशमान गोल फिरत आहेत असा जो निःसीम आणि निरवधि अवकाश, अथवा आकाशाची

४. हा सोम मित्राला [आणि] वरूणाला अत्यन्त सुखकारक होओ, चमसांमध्यें उपभोग्य होओ—देवांमध्यें देव [ जो सोम, तो ] उपभोग्य [ होओ ]. तो [ सोम ] सर्व देव मिळून आज सेवन करोत.—हे राजे [ मित्रावरूण ] हो, आम्ही जसें प्रार्थीत आहों तसें तुम्ही करा—हे पूज्य [ मित्रावरूण ] हो, जसें आम्ही प्रार्थीत आहों तसें तुम्ही करा.

4. May this Soma be most delectable to Mitra and to Varuṇa, [may it be] enjoyable in the cups—enjoyable, a god among the gods. May all the gods, united together, enjoy it. Do, O kings, as we pray—as we pray, O adorable [ Mitra and Varuṇa ].

पोकळी ती. इजविषयीं सूक्त ७२ मं. ९ आणि त्याजवरील टीप पहा.

'तेजःपुञ्ज अधिकारस्थळाप्रत पावले आहेत '=' ज्योतिष्मत् क्षत्रम् आशाते.' म्हणजे ज्या आकाशस्थळीं ते सर्व लोकांचें राज्य करितात तें स्थळ प्रकाशानें भरलेलें आहे, अंधारानें नाहीं.

'आपआपल्या कामीं गुंतवितात '=' यातयज्जनः.' अक्षरशः अर्थ, 'जनांला काम करावयास लावणारा [होय].' म्हणजे पहांटेस वरूण रात्रिरूपानें जाऊन, मित्र आणि अर्यमा हे जे सूर्यरूप देव, ते उगवून लोकांला आपआपल्या कामीं पाठवितात, निजून राहूं देत नाहींत. मित्र आणि अर्यमा हे पर्यवसानीं एकच आहेत, म्हणून अर्यमाचें नांव येथें आलें आहे, आणि म्हणूनच तो मित्राप्रमाणें लोकांला आपआपल्या कामीं पाठवितो असें सांगितलें आहे.

वृत्तासाठीं 'स्वर्वतीम्'चे ठिकाणीं 'सुअर्वतीम्' असें म्हणावें. आणि तिसऱ्या चरणांत दोन्ही पादचरणांमध्यें संधि करूं नये.

४. 'हा जो आम्ही सोम अर्पण करीत आहों, तो मित्र आणि वरूण पिओत, आणि त्यांला त्यापासून अत्यंत मोठा आनंद होओ. चमसांत हा घातला आहे, तो त्यांस उपभोग्य होओ. आणि त्यांजबरोबर दुसरे देवहि सर्व जण मिळून तो पिओत. आणि मित्रावरूण जे सर्व लोकांचे पूज्य राजे, ते आमची मनकामना पूर्ण करोत' असा अभिप्राय आहे.

'चमसांमध्यें उपभोग्य [ होओ ]'= 'अवपानेषु आभगः.' चमस म्हणजे ज्यांत सोम प्यावयाचा तें पात्र अथवा प्याला, तो बहुतकरून लांकडाचा केले-

यो मित्राय वरुणायाविधज्जनोऽनर्वाणं तं परि पातो अंहसो दाश्वांसं मर्तमंहसः ।
तमर्यमाभि रक्षत्यृजूयन्तमनु व्रतम् ।
उक्थैर्य एनोः परिभूषति व्रतं स्तोमैराभूषति व्रतम् ॥ ५ ॥

यः । मित्राय । वरुणाय । अविधत् । जनः । अनर्वाणम् । तम् । परि । पातः । अंहसः । दाश्वांसम् । मर्तम् । अंहसः ।
तम् । अर्यमा । अभि । रक्षति । ऋजुऽयन्तम् । अनु । व्रतम् ।
उक्थैः । यः । एनोः । परिऽभूषति । व्रतम् । स्तोमैः । आऽभूषति । व्रतम् ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. यो जनः मित्राय वरुणाय [ च ] अविधत् (=पर्यचरत् तौ परिचरति ) तम् अनर्वाणं ( =निःशत्रुं कृत्वा ) अंहसः (=पापात्=दुःखात् ) [तौ] परि पातः (=परितः पातः=रक्षतः )—दाश्वांसं (=हविर्दत्तवन्तं तं ) मर्तं (=मर्त्यम् ) अंहसः (=दुःखात् ) [ परि पातः=परितो रक्षतः ] । ऋजूयन्तं (= देवेष्वार्जवमाचरन्तं ) तं [ जनम् ] अनु व्रतं (=तस्य कर्मानुलक्ष्य=तस्य कर्मानुकूलः प्रसन्नो भूत्वा ) अर्यमा अभि रक्षति (=अभितः पाति ) । यो [ जनः ] एनोः (=एतयोः=मित्रावरुणयोर् ) व्रतम् (=परिचरणम् ) उक्थैः (=स्तोत्रैः ) परिभूषति (=अलंकरोति )—व्रतं (=परिचरणं ) स्तोमैः (=सूक्तैर् ) आभूषति (=अलंकरोति ) [ तं मित्रावरुणौ परि पातः ] ॥

अनर्वाणम् अद्वेषिणम् । भ्रातृव्यो वा अर्वेति श्रुतेः । इति सायणः ॥

---

ला असे. देशी दारूचीं जीं दुकानें असतात, त्यांत काचीचे प्याले अथवा सोन्यारूप्याचीं भांडीं थोडींच, परंतु नारळीच्या करटीचे अथवा लांकडाचे प्यालेच अजून पुष्कळ असतात.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाचा दुसरा पोटचरण ‘सोमो भूंतु अवपॉनेषु आ भुवः’ असें म्हणावें लागतें.

५. जो जन मित्राला [आणि] वरुणाला,हवि अर्पण करून भजतो, त्याला [मित्रावरुण] निःशत्रु [करून] दुःखापासून रक्षितात—हवि देऊन भजणाऱ्या मर्त्याला दुःखापासून [रक्षितात]. देवांशीं सरळ रीतीनें वागणारा जो जन, त्याला त्याचे उपासनेला प्रसन्न होऊन अर्यमा रक्षितो. जो जन यांची उपासना स्तोत्रांनीं अलंकृत करितो—उपासना स्तुतींनीं अलंकृत करितो, [त्याला मित्रावरुण रक्षितात].

5. That man who worships Mitra [and] Varuṇa, these render free from enemies and preserve from danger—save the sacrificing mortal from danger. Him who behaves righteously [towards the gods] Aryaman protects, pleased with [his] worship. Him who adorns the worship of these with hymns—who adorns [their] worship with songs [Mitra and Varuṇa] [preserve].

५. 'जो जन मित्रावरुणांची उपासना करितो आणि त्यांला हवि अर्पण करितो, जो जन देवांशीं आर्जवानें म्हणजे सरळ रीतीनें वागतो, जो जन मित्रावरुणांची उपासना करून तिजमध्यें अनेक प्रकारचीं स्तोत्रें गात असतो, त्याची ती उपासना पाहून मित्रावरुण आणि अर्यमा प्रसन्न होतात, आणि त्याचें ते सकळ संकटापासून संरक्षण करितात, आणि त्याला शत्रूची बाधा होऊं देत नाहींत,' असा अभिप्राय.

'सरळ रीतीनें वागणाऱ्या '=' ऋजूयन्तम्.' म्हणजे कपट न करणाऱ्या, निष्पाप बुद्धीनें वर्तणाऱ्या.

वृत्तासाठीं, पहिल्या व दुसऱ्या चरणांतील दोन्ही पोटचरणांमध्यें संधि न करणें अवश्य आहे.

नमो॑ दि॒वे बृ॑ह॒ते रोद॑सीभ्यां मि॒त्राय॑ वोचं॒ वरु॑णाय मी॒ळ्हुषे॑ सुमृ-
ळी॒काय॑ मी॒ळ्हुषे॑ ।
इन्द्र॑म॒ग्निमुप॑ स्तुहि द्यु॒क्षम॑र्य॒मणं॒ भग॑म् ।
ज्योग्जीव॑न्तः प्र॒जया॑ सचेमहि॒ सोम॑स्यो॒ती स॑चेमहि ॥ ६ ॥
नमः॑ । दि॒वे । बृ॒ह॒ते । रोद॑सीभ्याम् । मि॒त्राय॑ । वो॒च॒म् । वरु॑णाय । मी-
ळ्हुषे॑ । सु॒ऽमृ॒ळी॒काय॑ । मी॒ळ्हुषे॑ ।
इन्द्र॑म् । अ॒ग्निम् । उप॑ । स्तु॒हि॒ । द्यु॒क्षम् । अ॒र्य॒मण॑म् । भग॑म् ।
ज्योक् । जीव॑न्तः । प्र॒ऽजया॑ । स॒चे॒म॒हि॒ । सोम॑स्य । ऊ॒ती । स॒चे॒म॒हि॒ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. बृहते दिवे ( =महते द्युदेवाय ) रोदसीभ्यां ( =द्यावापृथिवीभ्यां ) मित्राय [ तथा ] मीळ्हुषे (=दानशीलाय ) वरुणाय—सुमृळीकाय (=सुष्ठु सुखयते ) मीळ्हुषे (=दानशीलाय च ) [ वरुणाय ] नमो वोचं (=स्तोत्रं वदामि ) । [ हे सखिन् ], [ त्वम् ] इन्द्रम् अग्निं द्युक्षम् अर्यमणं ( =द्युस्थितमर्यमणं ) भगं [ च ] उपस्तुहि (=उपेत्य बुद्ध्या प्राप्य स्तुतिं कुरु ) । [ वयं ] ज्योक् (=चिरं ) जीवन्तः [ सन्तः ] प्रजया सचेमहि ( =पुत्रपौत्रादिभिः संगता भवेम )—सोमस्य ऊती ( =सोमदेवस्य रक्षणेन साधनेन ) [ प्रजया ] सचेमहि (=पुत्रपौत्रादिभिः संगता युक्ता भवेम ) ॥

दिवे द्योतमानाय सूर्याय नमो वोचम् । नमस्कारोपलक्षितं स्तोत्रं वोचं ब्रवीमि । स्तौमीत्यर्थः । इति सायणः ॥



६. महान् द्यूला, द्यावापृथिवींला, मित्राला [आणि] उदार वरुणाला—सुखदायक [आणि] उदार [ वरुणाला ], मी स्तोत्र म्हणतों. तूं इन्द्राला, अग्नीला [आणि] द्युलोकांत राहणाऱ्या अर्यमाला [आणि ] भगाला स्तव. आम्ही चिरकाळ जीवंत राहून संततीनें संपन्न होऊं—सोम[देवा]च्या प्रसादेकरून [ संततीनें संपन्न होऊं ] असें घडो.

6. Let me sing a hymn to vast Dyaus, to Earth and Heaven, to Mitra, to bounteous [ Varuṇa ] the giver of happiness. Praise thou Indra, Agni, Aryaman who lives in heaven, [ and ] Bhaga. May we, living long, be blessed with progeny—be blessed [with progeny] by the grace of Soma.

---

६. 'महान् द्यू देव, द्यावापृथिवी, मित्र, आणि वरुण यांस मी स्तवितों. हे सख्या, तूंहि इंद्र, अग्नि, अर्यमा आणि भग यांला स्तव. सोमदेवाला आपण स्तवूं, आणि सोमाच्या कृपेनें आपण फार दिवस जगूं आणि पुत्रपौत्रादिकांनी संपन्न होऊं.'

'महान् द्यूला'='महते दिवे.' द्यू म्हणजे प्रकाशमय जो आकाशप्रदेश, कीं ज्यांत सूर्यचंद्रादिक तारे असतात, तो प्रदेश, आणि तद्रूप देव. त्याला 'महान्' हें विशेषण चांगलें शोभतें यांत संशय नाहीं.

वृत्तसुखासाठीं 'रोदसीभिआम्' आणि 'ज्योक्'च्या ठिकाणीं 'जिओक्' असें म्हणणें अवश्य आहे.

ऊती देवानां वयमिन्द्रवन्तो मंसीमहि स्वयशसो मरुद्भिः ।
अग्निर्मित्रो वरुणः शर्म यंसन् तदश्याम मघवानो वयं च ॥ ७
॥ २६ ॥ १ ॥

ऊती । देवानाम् । वयम् । इन्द्रऽवन्तः । मंसीमहि । स्वऽयशसः । मरुत्ऽभिः ।
अग्निः । मित्रः । वरुणः । शर्म । यंसन् । तत् । अश्याम । मघऽवानः । वयम् । च ॥ ७ ॥ २६ ॥ १ ॥

इति द्वितीयाष्टके प्रथमोध्यायः ।

## भाषायाम्.

७. इन्द्रवन्तः (=इन्द्रेण तद्वन्तः=इन्द्रेण रक्षिता ) वयं देवानाम् ऊती (=देवानामूत्या=प्रसादेन ) [ अपि च ] मरुद्भिः (=मरुताम् ऊत्या=मरुतां प्रसादेन ) स्वयशसो मंसीमहि (=स्वायत्तयशस्का मन्यामहे जनैर्मता भवेम ) । अग्निः, मित्रः, वरुणः [ इत्येते ] [ अस्मभ्यं ] शर्म (=सुखं ) यंसन् (=प्रयच्छन्तु ) वयं च मघवानः (=धनवन्तः सन्तस्) तत् [ शर्म ] अश्याम (=व्याप्नुयाम=संभजेमहि) ॥

इन्द्रवन्तः प्रीतेनेन्द्रेण तद्वन्तः । ... मरुद्भिः स्तुत्या हृष्टैर्मरुद्देवैरनुगृहीताः । इति सायणः ॥

७. इंद्रानें कृपा केली म्हणजे देवांच्या प्रसादेंकरून [ आणि ] मरुतां[च्या प्रसादें]करून आपण स्वाधीनकीर्तिमंत मानिले जाऊं असें होओ. अग्नि, मित्र [आणि] वरुण हे आम्हांला सुख देओत. आणि आम्ही श्रीमंत [ होऊन ] तें [ सुख ] आम्हांस लाभो.

7. Favoured by Indra may we by the grace of the gods [and] by [ the grace of ] the Maruts be renowned as possessed of self-made renown. May Agni, Mitra [and] Varuṇa grant [us] happiness, and may we blessed with wealth enjoy that [ happiness ].

---

७. हें सूक्त येथें संपलें. या ऋचेंत ऋषीनें अभीष्ट वर मागितला आहे. तो म्हणतोः—‘ इन्द्र, मरुत् आणि इतर देव यांचा आपणावर अनुग्रह होओ, आणि त्यांच्या प्रसादेंकरून आम्ही स्वतः संपादित कीर्तीनें संपन्न आहों असें लोक आम्हांविषयीं म्हणोत. इन्द्र, मित्र आणि वरुण हे आम्हांला सुख देओत, आणि आम्ही श्रीमंत होऊन तें सुख चिरकाळ-पर्यंत भोगूं असें घडो. ’

‘ इन्द्रानें कृपा केली म्हणजे ’=‘ इन्द्रवन्तः. ’ अक्षरशः अर्थ ‘ इंद्र ज्यांस आहे असे [ आम्ही ]. ’ म्हणजे प्रसन्न झालेला इंद्र ज्यांचा आहे असे आम्ही.

‘स्वाधीनकीर्तिमन्त मानिले जाऊं’= ‘ स्वयशसः मंसीमहि. ’ ‘ मन् ’ धातूच्या या अर्थाचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. ऋ. ८. ६१. ११ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

ह्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे.

## सूक्तम् १३७.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । मित्रावरुणौ देवता । अतिशक्वरी छन्दः ।

**सुषुमा यातमद्रिभिर्गोश्रीता मत्सरा इमे सोमासो मत्सरा इमे ।**
**आ राजाना दिविस्पृशास्मत्रा गन्तमुप नः ।**
**इमे वां मित्रावरुणा गवाशिरः सोमाः शुक्रा गवाशिरः ॥ १ ॥**

सुसुम । आ । यातम् । अद्रिऽभिः । गोऽश्रीताः । मत्सराः । इमे । सोमासः । मत्सराः । इमे ।
आ । राजाना । दिविऽस्पृशा । अस्मऽत्रा । गन्तम् । उप । नः ।
इमे । वाम् । मित्रावरुणा । गोऽआशिरः । सोमाः । शुक्राः । गोऽआशिरः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे मित्रावरुणौ ], आ यातं (=युवामागच्छतम् ) । अद्रिभिः (=ग्रावभिः) सुषुम (=सोमाभिषवं चक्रम ) । इमे (=अस्माभिः प्राप्यमाणा ) गोश्रीताः (=पयोभिर्मिश्रिताः ) [ सोमा ] मत्सराः (=मादकारिणः ) [ सन्ति ]—इमे सोमासः (=सोमा) मत्सराः (=मादकारिणः ) [ सन्ति ] । हे दिविस्पृशा (=दिविस्पृशौ=द्युलोकनिवासिनौ ) राजाना (=राजानौ ), [ युवाम् ] अस्मत्रा (=अस्मासु मध्ये ) नः उप (=अस्माकं यज्ञमुपलक्ष्य=अस्माकं यज्ञं प्रति ) आ गन्तम् (=आगच्छतम् ) । हे मित्रावरुणा (=मित्रावरुणौ ), इमे गवाशिरः (=पयआदिगोरसमिश्रिता ) वां (=युवयोः )—[ इमे ] गवाशिरः (=पयआदिगोरसमिश्रिताः ) शुक्राः (=शुद्धाः=तेजस्विनः ) सोमाः [ वां=युवयोः सन्ति ] ॥

गोश्रीताः । ...... । पयोभिर्मिश्रिताः । तस्मान्मैत्रावरुणं पयसा श्रीणातीति हि ब्राह्मणम् । मत्सरास्तृप्तिहेतवः सोमाः । मत्सरः सोमो मन्दतेस्तृप्तिकर्मण इति यास्कः । ...... गवाशिरः । पूर्ववद्विकारे प्रकृतिशब्दः । गोभिः क्षीरैराशिरो मिश्रिताः संजाताः । किं च गवाशिरो गोभिरुदकैर्मिश्रिताः संजाताः । इति सायणः ॥

## सूक्त १३७.

ऋषि–दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता–मित्रावरुण (म्हणजे मित्र आणि वरुण). वृत्त–अतिशक्करी.

१. हे मित्रावरुण हो, तुम्ही या, आम्हीं ग्राव्यांच्या योगानें सोमरस काढिले आहेत. हे मादकारी सोमरस गोरसानें मिश्रित केले आहेत—हे सोम मादकारी [आहेत]. हे द्युलोकनिवासी राजे हो, तुम्ही आम्हांजवळ आमच्या यज्ञाप्रत या. हे मित्रावरुण हो, हे गोरसयुक्त सोम तुमचे [होत]—[हे] तेजस्वी [आणि] गोरसयुक्त सोम [तुमचे होत].

## Hymn 137.

To *Mitra* and *Varuṇa*. By *Paruchchhepa*, the son of *Divodâsa*. Metre—*Atis'akvarî*.

1. We have expressed [the Somas] by means of the stones, come [ye, O Mitra and Varuṇa]. These [Somas] mixed with milk [are] exhilarating—these Somas are exhilarating. Come ye, O heavenly kings, among us for our sacrifice. Yours, O Mitra and Varuṇa, are these, mixed with milk—bright Somas mixed with milk.

---

१. हेंहि सूक्त परुच्छेप ऋषीचेंच असून मित्र आणि वरुण या देवांविषयीं आहे.

'हे मित्रावरुण हो, तुम्हांसाठीं आम्हीं हे सोमरस काढून त्यांत दूध मिसळून तुम्हांला प्राप्य केले आहेत, आणि हे तुम्हांला तृप्त करून माद आणणारे आहेत, तर तुम्ही सत्वर या आणि ते प्या.'

'गोरसानें मिश्र केले आहेत'=' गोश्रीताः.' म्हणजे 'दुधानें' असें सायणाचार्य म्हणतात. ते आणखी असें म्हणतात कीं, मित्रावरुणांला अर्पण करावयाचा जो सोम, त्यांत दूध मिसळण्याची चाल असे. भाषेखालीं घेतलेला उतारा पहा.

'राजे'=' राजाना.' मित्रावरुणांस 'राजे' असें वेदांत म्हणण्याचा प्रघात आहे. सू. २४ मं. १४ आणि टीप पहा. ऋ. ३. ५९. ४ यांत 'अयं मित्रः नमस्यः सुशेवः राजा सुक्षत्रः '=' हा मित्र देव पूज्य, सुगम्य आणि चांगल्या रीतीनें अधिकार चालविणारा राजा होय' असें म्हटलें आहे तें पहा.

या सूक्ताचें वृत्त 'अतिशक्करी.' अतिशक्करी म्हणजे साठ अक्षरांचा मिश्र श्लोक. अत्यष्टीत अडुसष्ठ अक्षरें असतात, तशीं

**इम आ यातमिन्दवः सोमासो दध्याशिरः सुतासो दध्याशिरः ।**
**उत वामुषसो बुधि साकं सूर्यस्य रश्मिभिः ।**
**सुतो मित्राय वरुणाय पीतये चारुर्ऋताय पीतये ॥ २ ॥**

इमे । आ । यातम् । इन्दवः । सोमासः । दधिऽआशिरः । सुतासः । दधिऽआशिरः ।
उत । वाम् । उषसः । बुधि । साकम् । सूर्यस्य । रश्मिऽभिः ।
सुतः । मित्राय । वरुणाय । पीतये । चारुः । ऋताय । पीतये ॥२॥

## भाषायाम्.

२. [हे मित्रावरुणौ], आ यातम् (=आगच्छतम्) इमे इन्दवः सोमासः (=क्लेदनसमर्थाः सोमाः=सोमरसा) दध्याशिरः (=दधिमिश्रिताः) [सन्ति]—सुतासः दध्याशिरः (=अभिषुतसोमा दधिमिश्रिताः) [सन्ति] । उत (=अपि च) उषसो बुधि (=उषसः संबन्धिनि बोधे=उषस उदयकाले) [तथा] सूर्यस्य रश्मिभिः साकं (=सूर्योदये सति) [सोमो] मित्राय वरुणाय [च] पीतये सुतः (=पातुम् अभिषुतोस्ति)—चारुः (=सुन्दरः=तेजोयुक्तः) [सोम] ऋताय (=सत्यभूताय) [वरुणाय] पीतये (=पातुं) [सुतः=अभिषुतोस्ति] ॥

चारुश्चरणीयो भक्षणीयः सोम इति सायणः ॥

यांत नसतां केवळ साठच असतात. रचनेचा प्रकार असाः—पहिल्या पादांतील तीन पोटचरण अनुष्टुभाचे, अक्षरें २४; दुसऱ्या पादांतील दोन्ही पोटचरण अनुष्टुभाचे, अक्षरें १६; तिसऱ्यांतील पहिला पोटचरण जगतीचा, आणि दुसरा अनुष्टुभाचा, अक्षरें २०; एकूण ६०. अथवा सात चरणांचा श्लोक असून साहावा चरण मात्र द्वादशाक्षरी जगतीचा, बाकी सर्व अष्टाक्षरी अनुष्टुभाचे असावे.

वृत्तसुखार्थ दुसऱ्या चरणांत ‘दिविस्पृशा’ । ‘अस्मत्रा’ असें व्यस्त वाचावें.

२. [ हे मित्रावरुण हो ], [ तुम्ही ] या, हे सोमरस दह्यांत मिसंळलेले [ आहेत ], गाळून काढिलेले सोम दह्यांत मिसळलेले [आहेत]. आणि उषा जागी झाल्याबरोबर, [आणि] सूर्याचे किरण येतांच मित्राकारणें [ आणि] वरुणाकारणें प्यावयासाठीं सोम काढिला [आहे]—सत्यरूप [वरुणा]कारणें पिण्यासाठीं सुंदर सोम काढिला [ आहे ].

2. Come, [ O Mitra and Varuṇa]; these Soma juices are mixed with curds—the extracted Somas are mixed with curds. And at the awakening of Ushas and at the [appearance of] the sun's rays the Soma is extracted for Mitra [ and ] for Varuṇa to drink—the glittering [Soma] [extracted ] for just [ Varuṇa ] to drink.

२. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं सोमरस काढून ते दुधांत मिसळले आहेत; आतां म्हणतो, ' हे मित्रावरुण हो, हे तुम्हांकरितां आम्हीं सोम काढून दह्यांत मिसळले आहेत; तर तुम्ही येऊन ते प्या. मित्राला आणि न्यायी वरुणाला पिण्याला लखलखीत असा सोम काढिला आहे. '

' उषा जागी झाल्याबरोबर '=' उषसो बुधि.' म्हणजे पहांटेला, उषेचा उदय होतांच, अरुणोदयीं.

वृत्तासाठीं 'दधिआशिरः' असं दोन्ही ठिकाणीं वाचावें लागतं. बाकीचे चरण सर्व बरोबर लागतात.

तां वां धेनुं न वासरीमंशुं दुहन्त्यद्रिभिः सोमं दुहन्त्यद्रिभिः ।
अस्मत्रा गन्तमुप नोऽर्वाञ्चा सोमपीतये ।
अयं वां मित्रावरुणा नृभिः सुतः सोम आ पीतये सुतः ॥३॥१॥

ताम् । वाम् । धेनुम् । न । वासरीम् । अंशुम् । दुहन्ति । अद्रिऽभिः । सोमम् । दुहन्ति । अद्रिऽभिः ।
अस्मऽत्रा । गन्तम् । उप । नः । अर्वाञ्चा । सोमऽपीतये ।
अयम् । वाम् । मित्रावरुणा । नृऽभिः । सुतः । सोमः । आ । पीतये । सुतः ॥ ३ ॥ १ ॥

## भाषायाम्.

३. [ हे मित्रावरुणौ ], तां वां वासरीं धेनुं न (=तां प्रसिद्धां युवयोर्बहुदुग्धां गामिव ) [ इमे नरः=उपासका ] अंशुं (=सोमवल्लीम् ) अद्रिभिः (=ग्रावभिर् ) दुहन्ति (=अभिषुण्वन्ति )—सोमम् अद्रिभिः (=ग्रावभिर् ) दुहन्ति (=अभिषुण्वन्ति ) । [ तस्मात् कारणाद् ] अर्वाञ्चा (=अर्वाञ्चौ=अस्मदभिमुखौ सन्तौ ) [ युवाम् ] अस्मत्रा (=अस्मासु मध्ये ) नः [ यज्ञम् ] (=अस्माकं यज्ञं प्रति ) उप गन्तम् (=आगच्छतम् ) । हे मित्रावरुणा (=मित्रावरुणौ ), अयं नृभिः (=उपासकैर् ) वां (=युवयोरर्थं ) सुतः (=अभिषुतः )—[ अयं ] सोमः पीतये (=पानाय ) सुतः (=अभिषुतोऽस्ति ) ॥

वां युवयोः संबन्धिनमंशुं वल्लीरूपं सोमम् । ...... तां प्रसिद्धामग्निहोत्राद्यर्थां वासरीं सर्वाङ्गाच्छादितपयस्काम् । बहुक्षीरामित्यर्थः । यद्वा पयआदिनाच्छादयित्रीम् ...... धेनुं न । प्रीणयित्री गामिव । इति सायणः ॥

३. [हे मित्रावरुण हो], ती जी तुमची पुष्कळ दूध देणारी धेनु, तिजप्रमाणें सोमवल्लीला ग्राव्यांच्या योगानें दोहत आहेत— सोमवल्लीला ग्राव्यांच्या योगानें दोहत आहेत. [तर] तुम्ही आम्हांप्रत आमच्या [यज्ञाला] सोम पिण्यासाठीं या. हे मित्रावरुण हो, हा सोम तुम्हांसाठीं [या] ऋत्विजांनीं काढिला आहे—पिण्यासाठीं सोम काढिला आहे.

3. Like that bounteous cow of yours they are milking the soma-plant with the stones—milking with the stones the soma-plant. Come among us to our sacrifice driving hither to drink the Soma. This has been, O Mitra and Varuṇa, extracted for you by the worshippers —[this] Soma extracted [for you] to drink.

३. 'हे मित्रावरुण हो, हा जो सोम आम्ही अर्पीत आहों, तो तुम्हांला या उपासकांनीं सोमवल्लीपासून, तुमच्या गाईचें दूध पिळून काढितात तसा पिळून काढिला आहे. तर तुम्ही आम्हांकडे वळा, आणि आम्हांजवळ येऊन तो प्या, कारण तो तुम्ही प्यावा म्हणून काढिला आहे.'

'तुमची पुष्कळ दूध देणारी धेनु तिजप्रमाणें'='वां धेनुं न वासरीम्.' 'तुमची धेनु' म्हणजे कोणती? 'वां धेनुम्' असा अन्वय घेऊन आम्हीं केल्याप्रमाणेंच ऋषीचा अर्थ विवक्षित आहे यांत संशय दिसत नाहीं. पण मित्रावरुणांची गाय ती कोणती? मित्रावरुणांसाठीं जिचें दूध प्रतिदिनीं ऋषि काढीत असेल आणि जी पुष्कळ दूध देणारी असेल अशी ऋषीला चांगली ठाऊक असलेली गाय असावी असें दिसतें.

'सोमवल्लीला ग्राव्यांच्या योगानें दोहत आहेत'='अंशुं दुहन्ति अद्रिभिः.' म्हणजे सोमवल्लीचे तुकडे चेचून त्याचा रस काढीत आहेत.

वृत्तासाठीं 'दुहन्ति' आणि 'अद्रिभिः' यांजमध्यें उभय ठिकाणीहि संधि न करणें, हें अवश्य आहे.

## सूक्तम् १३८.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । पूषा देवता । अत्यष्टिश्छन्दः ॥

**प्रप्र॑ पू॒ष्णस्तु॑वि॒जा॒तस्य॑ शस्यते महि॒त्वम॑स्य त॒वसो॒ न त॑न्दते स्तो॒त्रम॑स्य॒ न त॑न्दते ।**

**अर्चा॑मि सु॒म्नय॑न्न॒हम॒न्त्यू॑तिं मयो॒भुव॑म् ।**

**विश्व॑स्य॒ यो मन॑ आयुयु॒वे म॒खो दे॒व आ॑युयु॒वे म॒खः ॥ १ ॥**

प्रऽप्र॑ । पू॒ष्णः । तु॒वि॒ऽजा॒तस्य॑ । श॒स्य॒ते॒ । म॒हि॒ऽत्वम् । अ॒स्य॒ । त॒वसः॑ । न । त॒न्द॒ते॒ । स्तो॒त्रम् । अ॒स्य॒ । न । त॒न्द॒ते॒ ।

अर्चा॑मि । सु॒म्नऽयन् । अ॒हम् । अन्ति॑ऽऊतिम् । म॒यः॒ऽभुव॑म् ।

विश्व॑स्य । यः । मनः॑ । आ॒ऽयु॒यु॒वे । म॒खः । दे॒वः । आ॒ऽयु॒यु॒वे । म॒खः ॥ १

## भाषायाम्.

१. तुविजातस्य ( =आजन्म बलवतः ) पूष्णो [ महित्वं=महत्त्वं ] प्रप्र शस्यते ( =अतिशयप्रकर्षेण स्तूयते सर्वैः ) । तवसः ( =बलवतः ) अस्य महित्वं ( =महत्त्वं ) न तन्दते ( =न हिंस्यते=केनापि न विरमति)—अस्य स्तोत्रं न तन्दते (=न विरमति=सदैव क्रियते ) । [ अतः कारणात् ] सुम्नयन् ( सुखमिच्छन् ) अहम् अन्त्यूतिम् ( =आसन्नरक्षणं ) मयोभुवं ( =सुखस्य संपादकं ) [ तम् ] अर्चामि (=स्तौमि ) यो मखः ( =मंहनीयः पूजनीयः ) [ पूषा ] विश्वस्य मनः ( =सर्वस्य प्राणिजातस्य मन ) आयुयुवे ( =स्वसमीपम् आकर्षति )—[ यो ] मखो देवः ( =पूजनीयो देवः) [ पूषा ] [ विश्वस्य मन ] आयुयुवे ( =स्वसमीपम् आकर्षति ) ॥

तुविजातस्य बहुयजमानार्थमुत्पन्नस्य ...... । न तन्दते । न हिनस्ति कश्चिदपि ...... । स्तोत्रं न तन्दते । न हिनस्ति । न विरमति । सर्वोपि जन एनं स्तौतीत्यर्थः । जगत्पोषकत्वादिति भावः । ...... । विश्वस्य सर्वस्य स्तोतुर्ऋत्विजो मन आयुयुवे । समन्तान्मिश्रयति । शीघ्रवरप्रदानादिति भावः । ...... सामर्थ्याद्यजमानस्य मन इति लभ्यते ॥

## सूक्त १३८.

ऋषि–दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता–पूषा. वृत्त–अत्यष्टि.

१. जातबलवान् पूषाचें महत्त्व मोठ्यानें स्तविलें जातें, या प्रबळ [ देवा]चें महत्त्व कुंठित होत नाहीं—याचें स्तोत्र कुंठित होत नाहीं. सुखाची इच्छा करणारा जो मी, तो रक्षण करण्यास जवळ असलेल्या [ आणि ] सुख देणाऱ्या पूषाला स्तवितों; जो पूजनीय [ पूषा ] सकल विश्वाचें मन आपणाकडेस आकर्षून घेत असतो—[ जो ] पूजनीय देव [ विश्वाचें मन ] आकर्षून घेतो.

## Hymn 138.

To *Pûshan*. By *Paruchchhepa* the son of *Divodâsa*. Metre—*Atyashṭi*.

1. [ The greatness ] of Pûshan, born mighty, is declared loudly; the greatness of that mighty [ god ] is not exhausted—his praise does not become exhausted. Desirous of happiness I praise him who is ready at hand to protect [and] who is the giver of happiness: Adorable [ Pûshan ] who attracts to himself the mind of the universe—the adorable god [ who ] attracts to himself [ the mind of the universe ].

१. हेंहि सूक्त परुच्छेप ऋषीचेंच आहे. देवता मात्र ' पूषा ' होय. पूषा म्हणजे सूर्याचीच अथवा सूर्यप्रकाशाची एक विभूति होय. पूषा देवाविषयीं सूक्त ४२ ( आणि विशेषेंकरून त्या सूक्ताचा मं. १ यावरील टीप ) पहा.

' जो जन्मला तोच बळवान् जन्मला, आणि सदैव बळवान्, असा जो पूषा देव, त्याचें महत्त्व मी गात आहें. त्याचें महत्त्व गाऊन संपलें, आतां गावयास कांहीं उरलें नाहीं असें कधी होणें नाहीं, कारण त्याचें महत्त्व आणि त्या महत्त्वाची स्तोतव्यता ही कधींहि कुंठित होत नाहीत. म्हणून सुखाची इच्छा करून मी त्याला स्तवीत आहें; कारण तो रक्षण करण्यास नेहमीं तयार असतो, आणि सुख देणारा असा आहे. आणि याच गुणांमुळें त्याणें सर्व लोकांची मनें आपल्याकडे ओढून जणूं घेतलीं आहेत, ' असा भावार्थ.

' पूजनीय '=' मखः.' हा शब्द कठिण आहे. त्याच्या अर्थाविषयीं वाद आहेत. पण सायणाचार्य ' पूजनीय, ' ' ज्याप्रीत्यर्थ यज्ञ करणें योग्य होय तो'

प्र हि त्वा पूषन्नजिरं न यामनि स्तोमेभिः कृण्व ऋणवो यथा
मृध उष्ट्रो न पीपरो मृधः ।
हुवे यत्त्वा मयोभुवं देवं सख्याय मर्त्यः ।
अस्माकमाङ्गूषान्द्युम्निनस्कृधि वाजेषु द्युम्निनस्कृधि ॥ २ ॥
प्र । हि । त्वा । पूषन् । अजिरम् । न । यामनि । स्तोमेभिः । कृण्वे ।
ऋणवः । यथा । मृधः । उष्ट्रः । न । पीपरः । मृधः ।
हुवे । यत् । त्वा । मयःऽभुवम् । देवम् । सख्याय । मर्त्यः ।
अस्माकम् । आङ्गूषान् । द्युम्निनः । कृधि । वाजेषु । द्युम्निनः । कृधि॥२

---

## भाषायाम्.

२. हे पूषन्, यामनि अजिरं न (=आजिधावने शीघ्रगामिनमश्वमिव) त्वा (=त्वां) स्तोमेभिः (स्तोत्रैः) प्र कृण्वे (=प्रोत्साहयामि) यथा [त्वं] मृधः (=समराङ्गणानि) ऋणवः (=अतिक्रमय्यास्मान् नयेः)—उष्ट्रो न (=भारस्य वोढा पशुविशेषो यथा पारं नयति तथा) मृधः पीपरः (=संग्रामान् अस्मान् पारयसि=संग्रामेषु अस्मान् विजयिनः कुर्याः) । मर्त्यः (=मरणधर्माहं) मयोभुवं देवं (=सुखस्य दातारं मरणरहितं) त्वा (=त्वां) यत् (=यस्मात् कारणात्) सख्याय हुवे (=मित्रत्वाय आह्वयामि) [तस्मात्] अस्माकम् [इदानीं प्रोच्यमानान्] आङ्गूषान् (=स्तोत्रघोषान्) द्युम्निनः (=अन्नादिसंपद्युक्तान्) कृधि (=कुरु)—वाजेषु (=संग्रामेषु) द्युम्निनः (=शत्रोर्लब्धान्नादिसंपद्युक्तान्) कृधि (=कुरु) ॥

सायणस्तु हे पूषन् अजिरं यज्ञदेशं प्रति गमनवन्तं त्वा त्वां यामनि गमने निमित्तभूते सति......प्रकृण्वे । प्रकृष्टं करोमि । तत्र दृष्टान्तः । यामनि शीघ्रगमनेऽजिरं न शीघ्रगामिनमश्वमिव । स यथा प्रस्तूयते तद्वत् । इति ॥

---

असा अर्थ करितात तो घेतल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं. सू. ६४ मं.११ आणि भाषा पहा.

वृत्तासाठीं 'अन्त्यूतिम्' या ठिकाणीं 'अन्तिऊतिम्' असें वाचावें लागतें.

२. हे पूषा, धांवण्याविषयीं चपळ वारूला [ प्रोत्साहन द्यावें ] त्याप्रमाणें, तूं आम्हांला संग्रामांमधून पार पाडावेंस म्हणून—सांडणीप्रमाणें समरांगणांतून पार पाडावेंस म्हणून, तुला स्तोत्रांनीं मी चळवीत आहें. [ हे पूषा ], सुख देणाऱ्या तुज देवाला मर्त्य मी ज्यापेक्षां मित्रत्वासाठीं बोलावीत आहें, [ त्यापेक्षां ] आमचीं स्तोत्रें तूं धनसंपन्न कर—संग्रामामध्यें धनसंपन्न कर.

2. I prompt thee, O Pûshan, like a courser in a race, with hymns that thou mayest carry [ us ] safely through the battle fields— mayest carry [us] through the battle fields like a dromedary. Inasmuch as I, a mortal, am imploring for help thee a god that givest happiness, cause our loud prayers [ to be ] crowned with wealth— cause [our loud prayers to be] crowned with wealth in battles.

२. ' हे पूषा, एखाद्या वारूला जसें शर्यतींत सत्वर धांवण्यासाठीं प्रोत्साहित करावें तसा मी तुला या स्तोत्रांनीं प्रोत्साहित करीत आहें; तर तूं ये आणि आम्हांला या युद्धप्रसंगांतून पार पाड, एखादी सांडणी पार पाडिते तसा पार पाड. कारण मी दीन मर्त्य तुज कृपाळू देवापाशीं प्रार्थना करीत आहें, यास्तव तूं ये आणि आमचीं हीं स्तोत्रें सफळ कर आणि या युद्धांत आम्हांला यशस्वी करून आमच्या हातून शत्रूंचा पराजय करीव, आणि त्यांचें धन आमच्या हातीं लूट मिळे असें कर ' असा भावार्थ आहे.

' सांडणीप्रमाणें '=' उष्ट्रो न.' अक्षरशः ' उंटाप्रमाणें.' उंटाला वेदकाळींहि ओझें न्यावयास लावीत असत असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. या ठिकाणीं बसण्याच्या कामीं वापरलेला उंट अथवा सांडणी विवक्षित आहे असें दिसतें.

' मित्रत्वासाठीं '=' सख्याय.' म्हणजे तूं येऊन आमच्या मित्राप्रमाणें आम्हांला साहाय्य करावेंस म्हणून.

' स्तोत्रें धनसंपन्न कर '=' अर्कान् द्युम्निनः कृधि.' म्हणजे आमचीं हीं स्तोत्रें ऐकून प्रसन्न हो, आणि आम्हांला धन म्हणजे शत्रूची संपत्ति लूट मिळवून दे.

या ऋचेवरून हें सूक्त, निदान ही ऋचा तरी कांहीं युद्धप्रसंगास अनुसरून रचिली आहे असें समजलें पाहिजे.

यस्य ते पूषन्सख्ये विपन्यवः क्रत्वा चित्सन्तोऽवसा बुभुज्रिर इति क्रत्वा बुभुज्रिरे ।
तामनु त्वा नवीयसीं नियुतं राय ईमहे ।
अहेळमान उरुशंस सरी भव वाजेवाजे सरी भव ॥ ३ ॥
यस्य । ते । पूषन् । सख्ये । विपन्यवः । क्रत्वा । चित् । सन्तः । अवसा । बुभुज्रिरे । इति । क्रत्वा । बुभुज्रिरे ।
ताम् । अनु । त्वा । नवीयसीम् । निऽयुतम् । रायः । ईमहे ।
अहेळमानः । उरुऽशंस । सरी । भव । वाजेऽवाजे । सरी । भव ॥३॥

## भाषायाम्.

३. हे पूषन्, विपन्यवः (=स्तोतारो) यस्य ते (=तव) सख्ये सन्तः (=मित्रत्वे तिष्ठन्तस्) [तव] क्रत्वा चित् (=तव प्रकृष्टेन कर्मणैव) [तव] अवसा (=रक्षणेन च) [यां नियुतं रायः=या नियुत्संख्याकाः संपदो] बुभुज्रिरे (=भुञ्जते)—इति क्रत्वा बुभुज्रिरे (=तव प्रकृष्टकर्मद्वारैव भुञ्जते) तां नव्यसीं नियुतं रायः (=तां नूतनतरां नियुतं संपदः=ता अत्यन्तनूतना नियुत्संख्याकाः संपदस्) [तं] त्वा (=त्वाम्) ईमहे (=याचामहे)। [अतः कारणात्] हे उरुशंस (=बहुभिः स्तुत), अहेळमानः (=अक्रुध्यन्=अस्मासु सुमनाः सन्) सरी भव (=अस्माकं नायको भव)—वाजे वाजे सरी भव (=सर्वेष्वपि संग्रामेषु नो नायको भव)॥

तव सख्ये तिष्ठन्तः स्तोतारस्तव कर्मणा तव रक्षणेन च यानि असंख्यातानि नूतनतराणि धनानि भुञ्जते तानि त्वां वयं याचामहे। अतस्त्वम् अस्मभ्यमक्रुद्धो भूत्वा सर्वेष्वपि संग्रामेष्वस्माकं नायको भवेत्यभिप्रायः॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान्। हे पूषन् देव यस्य ते रक्षकत्वेन प्रसिद्धस्य तव सख्ये सखित्वे हितकरणे सति क्रत्वा चित् क्रतुना प्रकृष्टेन कर्मणैव ॥...... सन्तो भवन्तं प्रीणयितारः सन्तो विपन्यवो विशेषेण स्तोत्रशीलाः। यद्वा मेधाविनामैतत्। मेधाविनो यजमाना अवसा त्वत्कृतेन रक्षणेन रक्षिताः सन्तो बुभुज्रिरे। भुञ्जते भोगान्। इति एवमेव सर्वदा क्रत्वा कर्मणा बुभुज्रिरे। भुञ्जते सर्वे पाल्यन्त इति वा॥ ...... तां तादृशीं नवीयसीं नवतरां स्तुत्यां वा रक्षामनु अनुसृत्य रक्षाया अनन्तरं त्वां नियुतं

३. हे पूषा, तुझ्या मैत्रींत राहून स्तोते जन [ तुझ्या ] पराक्रमाच्याच योगानें [ आणि ] [ तुझ्या ] रक्षणाच्या योगानें ज्या [ कोट्यावधि संपत्तींचा ] उपभोग घेतात—होय, [तुझ्या] पराक्रमाच्या योगानें उपभोग घेतात, त्या अगदी नूतन कोट्यावधि संपत्ति आम्ही तुजपाशीं मागतों. [तर] हे बहुस्तुत [ पूषा ], [ तूं आम्हांवर ] क्रोध न करितां [आमचा] पुढारी हो, प्रत्येक लढाईंत [ आमचा ] पुढारी हो.

3. We pray thee for those thy most recent countless riches which pious men, being in thy friend-ship, O Pûshan, have enjoyed through [ thy] valour alone [and] through [thy] favour—have enjoyed, yea through [thy] valour. Not displeased [with us] [therefore], O thou praised by many, be [our] leader—be thou [ our ] leader in every battle.

३. 'हे पूषा, स्तोते जन तुझ्या मैत्रींत राहून तुझ्या पराक्रमाच्या आणि तुझ्या कृपेच्या योगानें ज्या असंख्य संपत्तींचा उपभोग घेतात, त्या असंख्य नूतन संपत्ति आम्ही तुजपाशीं मागतों. तर ज्या तुझें स्तवन करणारे असंख्य लोक आहेत असा जो तूं, तो आम्हांवर क्रोध न करितां प्रत्येक संग्रामांत आमचा कैवारी हो' असा भावार्थ आहे.

या ऋचेंत 'यस्य' आणि 'ताम्' यांचा अन्वय सरळ नसल्यामुळें अर्थ समजण्यास प्रथम अडचण पडते, पण भावार्थ आम्हीं सांगितल्याप्रमाणें आहे यांत संशय नाही. 'आम्ही भाषेंत केल्याप्रमाणें अन्वय लाविला म्हणजे अर्थ सरळ लागतो.

'कोट्यावधि'—'नियुतम्.' अयुत, नियुत् ह्या संख्या प्रसिद्धच आहेत. पण या ठिकाणीं परिमितार्थ इष्ट नाहीं, अपरिमित संख्येच्या ठिकाणीं परिमित संख्येचा प्रयोग केला आहे.

'अगदी नूतन'='नवीयसीम्.' म्हणजे प्राचीन काळीं ज्या ज्या संपत्ति तुझ्या योगानें तुझ्या भक्तांला प्राप्त झाल्या म्हणून ऐकितों त्या नव्हत, तर अगदी आलीकडेहि उपभोग घेतात असें आपण प्रत्यक्ष पाहतों अशा संपत्ति.

'बहुस्तुत'='उरुशंस.' म्हणजे ज्याची स्तुति करणारे जन पुष्कळ आहेत असा. हें विशेषण 'पुरुहूत' यासारिखें आहे, आणि तें दुसऱ्या देवांस लाविलेलें आढळतें.

अस्या ऊ षू ण उप सातये भुवोऽहेळमानो ररिवाँ अजाश्व श्रवस्यतामजाश्व ।
ओ षू त्वा ववृतीमहि स्तोमेभिर्दस्म साधुभिः ।
नहि त्वा पूषन्नतिमन्य आघृणे न ते सख्यमपह्नुवे ॥ ४ ॥ २ ॥

अस्याः । ऊं इति । सु । नः । उप । सातये । भुवः । अहेळमानः । ररिऽवान् । अजऽअश्व । श्रवस्यताम् । अजऽअश्व ।
ओ इति । सु । त्वा । ववृतीमहि । स्तोमेभिः । दस्म । साधुऽभिः ।
नहि । त्वा । पूषन् । अतिऽमन्ये । आघृणे । न । ते । सख्यम् । अपऽह्नुवे ॥ ४ ॥ २ ॥

राय एतत्संख्याकान्धनानीमहे । याचामहे । किंच हे उरुशंस बहुधा स्तुत्य त्वमहेळमानोऽक्रुध्यन् । अस्मासु सुमनाः सन् सरी भव । अस्माभिर्गन्तव्यो भव ।......। किंच त्वं वाजे वाजे सर्वेष्वपि संग्रामेषु सरी भव । गमनशीलो भव । पुरतो गन्ता भवेत्यर्थः ॥

## भाषायाम्.

४. अहेळमानः ( =अस्मभ्यमक्रुद्धो ) ररिवान् (=दाता ) [ च सन् ] हे अजाश्व ( =अजा एव अश्वा यस्य तादृश ) [ पूषन् ], अस्याः ( =पूर्वोक्ताया नियुतः संपदः) सातये ( =लाभाय ) [ त्वं ] नः उप भुवः ( =अस्माकं साहाय्यकर्ता भव )—हे अजाश्व ( =अजा एव अश्वा यस्य तादृश ), श्रवस्यतां ( =धनमिच्छतामस्माकम् ) [ उप भुवः=सहायो भव ] । हे दस्म ( =शत्रूणामुपक्षपयितः ), त्वा ( =त्वां ) साधुभिः स्तोमेभिः ( =सम्यग्रचितैः स्तोत्रैः) ओ षु ववृतीमहि (=अत्रास्मान् प्रति सुष्ठु प्रवर्तयेम=अन्ययज्ञांस्त्यक्त्वास्माकं यज्ञं प्रत्यागमयेम ) । हे आघृणे ( =दीप्तिमन् ) पूषन्, [ अहं ] त्वा ( =त्वाम् ) अतिमन्ये नहि ( =न खल्वतिक्रमामि )—ते ( =तव ) सख्यं ( =मित्रत्वं ) न अपह्नुवे ( =नैवापनयामि=नैवावगणयामि ) ॥

सायणस्तु । नोऽस्माकमस्या अस्यै । चतुर्थ्यर्थे षष्ठी । सातये लाभायाहेळमानोऽक्रुध्यन् अनादरमकुर्वन् । ......ओ षु ववृतीमहि । सर्वत एव सुतरां वर्तयेमहि...... यज्ञान्तरगमनान्निवर्तयाम इत्यर्थः...... । ते तव सखित्वं हितकर्तृत्वं न अपह्नुवे । नैवापनयामि । न त्यजामि सर्वतः प्रख्यापयामीत्यर्थः । इति ॥

४. हे अजाश्वा, [ तूं आम्हांवर ] क्रोध न करितां [ आणि ] आम्हांवर उदार होऊन, [ कोट्यावधि संपत्ति ] आम्हांला मिळवून देण्यास चांगलें साहाय्य कर—लूट मिळावी अशी इच्छा करणाऱ्या [ आम्हांला मिळवून देण्याविषयीं ], हे अजाश्व [पूषा], [ साहाय्य कर ]. हे पराक्रमकारी [ पूषा ], कुशळ स्तोत्रांनीं तुला आम्ही इकडे फार वळवीत आहों, तर तूं ये. हे देदीप्यमान पूषा, मी तुझी अवगणना करीत नाहीं—तुझें मित्रत्व मी तुच्छ मानीत नाहीं.

4. Help us well to obtain those [riches], O thou whose car is drawn by goats, [and] be not angry [with us] [ but be ] liberal [unto us]—to [us] who are desirous of winning booty, O thou whose car is drawn by goats. May we successfully turn thee, O victorious [Pûshan], hitherwards by means of well-composed hymns. For I do not, O resplendent Pûshan, neglect thee—nor do I despise thy friendship.

वृत्तासाठीं ‘ सख्ये ’च्या ठिकाणीं ‘सखिए,’ ‘ सन्तः अवसा ’ असें म्हणावें लागतें, आणि तिसऱ्या चरणांत ‘ अहेळमान उरुशंस ’ याच्या ठिकाणीं ‘ अहेळमानोरुशंस’ असें म्हणावें लागतें. तेरा अक्षरांची बारा अक्षरें करावीं लागतात.

४. ‘ हे पूषा, वर ज्या असंख्य संपत्ति तुझ्या प्रसादेंकरून तुझ्या स्तोत्यांला प्राप्त होतात म्हणून सांगितलें, त्या आम्हांला प्राप्त होण्याविषयीं तूं आमचा अनादर न करितां आणि आम्हांविषयीं उदार होऊन आम्हाला साहाय्य कर. आम्हीं चांगलीं स्तोत्रें रचून तुजप्रीत्यर्थ म्हणत आहों, आणि तूं दुसऱ्या यज्ञांप्रत न जातां आमच्याच यज्ञाप्रत यावें असें विनवीत आहों, तर तूं त्याप्रमाणें ये; कारण मी तुला टाकून दुसऱ्या देवाला भजत नसतों, आणि तुझी मैत्री तुच्छ आहे असें मी मानीत नाहीं ’ असा भावार्थ आहे.

‘ अजाश्व ’ =‘ अजाश्व.’ म्हणजे बकरे हेच ज्याचे घोडे होत, ज्याच्या रथाला घोड्याऐवजी मेंढे जोडिलेले असतात. हें पूषा देवाचें विशेषण वेदांत येत असतें. कारण पूषा हा मेंढपाळांचा, गुराख्यांचा आणि धनगरांचा देव ( ऋ. ६. ३. ७ ) असल्यामुळें त्याच्या रथाला बकरे जोडिलेले असतात असें मानिलें

## सूक्तम् १३९.

दिवोदासस्य पुत्रः परुच्छेप ऋषिः । कृत्स्नं सूक्तं वैश्वदेवम् । तत्राद्याया विश्वे देवा देवता । द्वितीयाया मित्रावरुणौ । अथ तिस्रोऽश्विदेवताकाः । ऐन्द्री षष्ठी । सप्तम्याग्नेयी । अष्टमी मारुती । नवम्यैन्द्राग्नी । दशमी बार्हस्पत्या । एकादशी वैश्वदेवी ॥ अन्त्या त्रिष्टुप् । पञ्चमी बृहती । अन्या अत्यष्टयः ॥

**अस्तु श्रौषट् पुरो अग्निं धिया दध आ नु तच्छर्धो दिव्यं वृणीमह इन्द्रवायू वृणीमहे ।**
**यद्ध क्राणा विवस्वति नाभा संदायि नव्यसी ।**
**अध प्र सू न उप यन्तु धीतयो देवाँ अच्छा न धीतयः ॥ १ ॥**

अस्तु । श्रौषट् । पुरः । अग्निम् । धिया । दधे । आ । नु । तत् । शर्धः । दिव्यम् । वृणीमहे । इन्द्रवायू इति । वृणीमहे ।
यत् । ह । क्राणा । विवस्वति । नाभा । सम्ऽदायि । नव्यसी ।
अध । प्र । सु । नः । उप । यन्तु । धीतयः । देवान् । अच्छ । न । धीतयः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. अस्तु श्रौषट् ( =श्रवणमस्तु=श्रूयताम् ) । [ अहं ] धिया ( ="प्रणयनादिकर्मणा" ) अग्निं पुरो दधे ( ="आहवनीयाख्यम्" अग्निं पुरतो धारयामि=स्थापयामि ) । नु ( =अधुना ) तद् दिव्यं शर्धः ( =तं प्रसिद्धं द्युलोकनिवासिनं मरुतां संघम् ) आ वृणीमहे ( =आभिमुख्येन संभजामहे=आवाह्य परिचरामः )—इन्द्रवायू ( =इन्द्रं च वायुमपि च ) वृणीमहे ( =परिचरामः=आवाह्य परिचरामः ) । यद्ध ( =यस्मात्कारणात् खलु ) क्राणा ( ?=अस्माभिः क्रियमाणा ) नव्यसी ( =नूतनतरा ) [ धीः=कर्म ] विवस्वति नाभा ( =दीप्तिमति नाभौ=वेद्यां) संदायि (=संबध्यते=अस्माभिः कृतं कर्म वेदिसमीप उपतिष्ठति ) अध ( =अथ=अतः कारणात्) नः ( =अस्माकं ) धीतयः ( =स्तुतयः ) प्र सु उप यन्तु ( =देवानां समीपं प्रकर्षेण सुष्ठु गच्छन्तु )—देवान् अच्छ न धीतयः [ यन्तु ] ( =देवानां पुरत इव गत्वा तिष्ठन्तु=प्रत्यक्षागतानां देवानां पुरतः सेवाकारिण्य इव तिष्ठन्तु ) ॥

## सूक्त १३९.

ऋषि-*दिवोदासाचा पुत्र परुच्छेप. देवता—१ विश्वे देव, २ मित्रावरुण, ३–५ अश्वी, ६ इंद्र, ७ अग्नि, ८ मरुत्, ९ इन्द्राग्नी, १० बृहस्पति, ११ विश्वे देव, वृत्त— ५ बृहती आणि शेवटची त्रिष्टुभ्, ह्या दोन शिवाय करून बाकी उरलेल्या ऋचांचें वृत्त अत्यष्टि.

१. श्रवण करा. मी भक्तिपुरस्सर अग्नीला पुढें ठेवितों. [मरुतांच्या] त्या दिव्य वृन्दाला आम्ही भजतों. इंद्र आणि वायु यांला आम्ही भजतों. ज्यापेक्षां देदीप्यमान वेदीकडे [ आम्हीं ] केलेली अति नूतन उपासना सादर झाली आहे, त्यापेक्षां आमच्या प्रार्थना अगदी जवळ प्राप्त होओत. देवांसमक्ष जणुं आमच्या प्रार्थना उभ्या राहोत.

## Hymn 139.

To—The *Vis've Devâs* (1,11), *Mitra* and *Varuṇa* (2), the *As'vins* (3-5), *Indra* (6), *Agni* (7), The *Maruts* (8), *Indra* and *Agni* (9), *Brihaspati* (10). By *Paruchchhepa* the son of *Divodâsa*. Metre—*Atyashṭi*, except in verse 5 where it is *Brihatî*, and Verse 11 which is a *Trishṭubh*.

1. Hearken ye. I have placed forward Agni with piety. We now worship that heavenly troop [of the Maruts]. We worship Indra and Vâyu. Inasmuch as the freshest service offered [by us] has approached the brilliant altar, so may our prayers stand near [the gods] —[our] prayers [stand] as though in the presence of the gods.

---

आहे हें साहजिक आहे. सू. ४२ पहा, आणि विशेषेंकरून त्याचा मं. १ याजवरील टीप पहा.

'कुशळ स्तोत्रांनीं'=' साधुभिः स्तोमेभिः.' म्हणजे ज्यांत कौशल्य खर्च केलें आहे, ज्यांत चातुर्याचा उपयोग केला आहे, आणि जीं मधुर असून पूषाला प्रसन्न करूं शकतील, अशीं स्तोत्रें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणाचा दुसरा पोटचरण 'अहेळमानो ररिवाँ अजाश्व' असा म्हणावा, आणि तिसऱ्या पोटचरणांतहि 'अजाश्व' असें म्हणावें.

---

*१. हेंहि सूक्त परुच्छेप ऋषीचेंच आहे. देवता मात्र एक नाहीं. निरनिराळे मंत्र निरनिराळ्या देवांविषयीं आहेत. म्हणूनच सूक्त विश्वे देव यांविषयीं आहे

**यद्ध त्यन्मित्रावरुणावृतादध्याददाथे अनृतं स्वेन मन्युना दक्षस्य स्वेन मन्युना ।**
**युवोरित्थाधि सद्मस्वपश्याम हिरण्ययम् ।**
**धीभिश्चन मनसा स्वेभिरक्षभिः सोमस्य स्वेभिरक्षभिः ॥ २ ॥**

यत् । ह । त्यत् । मित्रावरुणौ । ऋतात् । अधि । आददाथे इत्या-ऽददाथे । अनृतम् । स्वेन । मन्युना । दक्षस्य । स्वेन । मन्युना ।
युवोः । इत्था । अधि । सद्मऽसु । अपश्याम । हिरण्ययम् ।
धीभिः । चन । मनसा । स्वेभिः । अक्षऽभिः । सोमस्य । स्वेभिः । अ-क्षऽभिः ॥ २ ॥

यद्धेत्यादौ यद्यस्मात्कारणाद्विवस्वति दीप्तिमति नाभा नाभौ भूम्या नाभिस्थाने देवयजने वेदिरूपे । यद्वा नाभौ सर्वफलस्य संबन्धके यज्ञे । यज्ञमाहुर्भुवनस्य नाभिमिति श्रुतेः । ऋाणा कुर्वाणा स्वार्थप्रकाशनं नव्यसी नवतरा स्तुतिरूपा वाक् संदायि । संबध्यते । ... । अस्माभिः प्रयुज्यत इत्यर्थः । यस्मात्स्तुतिः क्रियते तस्मादस्तु श्रौषट् । अस्याः स्तुतेः श्रवणं भवतु । श्रोता भवतु वा मरुतां गणोऽग्निर्वा । इन्द्रवायुपक्षे प्रत्येकापेक्षयैकवचनम् । अध अनन्तरेण धीतयोऽस्मदीयानि कर्माणि स्तुत्यादिरूपाणि प्ररूपयन्तु । प्रकर्षेण सुष्ठु युष्मानुपगच्छन्तु । किंच देवान् अच्छा न । अभ्यादिदेवान् आभिमुख्येन प्राप्तुमिव धीतयोऽस्मदीयानि कर्माण्युपयन्तु । तेषां समीपं प्राप्नुवन्तु ॥ इति सायणः ॥

## भाषायाम्.

२. हे मित्रावरुणौ, यद्ध (=यस्मात् खलु) [युवां] स्वेन मन्युना (=युवयोः स्वकीयेन मनसा)—दक्षस्य स्वेन मनसा (=युवयोर्बलस्य स्वकीयेन मनसा=प्रभाववतोर्युवयोः स्वकीयेन मनसा) त्यत् अनृतं (=तत् प्रसिद्धम् असत्यं=यद्यदनृतमिति प्रसिद्धं तत् तत्सर्वम्) ऋतात् अधि (=सत्यात्=सत्यस्य सकाशाद्) आददाथे (=विविक्तं कुर्वाथे) इत्था (=अतः कारणात्) [वयम्] अधि सद्मसु (=यज्ञगृहेषु) युवोर्हिरण्ययं (=युवयोर्हिरण्मयं) [रूपं] धीभिश्चन (=अस्माकं बुद्धिभिश्च) मनसा (=मनोद्वारा च) स्वेभिरक्षभिः (=अस्मदीयैर्नेत्रैः)—सोमस्य स्वेभिरक्षभिः (=सोमस्य स्वकीयैर्नेत्रैः)—अपश्याम (=पश्येम=यथा पश्यामस्तथा कुरुतम्) ॥

२. हे मित्र आणि वरुण हो, ज्यापेक्षां तुम्ही आपल्या मनानें, प्रभावाच्या निज मनानें, खऱ्यापासून खोटें जें जें तें निवडितां, त्यापेक्षां यज्ञशाळेंत तुमचें सुवर्णमय [रूप] आम्ही पाहूं,— [आपल्या] बुद्धींनीं, मनानें, [आणि] स्वत: आमच्या डोळयांनीं,— सोमाच्या स्वताहाच्या डोळयांनीं, [पाहूं] असें करा.

2. Inasmuch, O Mitra and Varuṇa, as you discern every thing that is false from that which is true with your own mind—with the own mind of [your] power, so may we see in the [sacrificial] houses your golden [form] with [our] thoughts, with [our] mind, with our own eyes—with the Soma's own eyes.

असें अनुक्रमणिकेंत सांगितलें आहे.

ह्या पहिल्या मंत्राचा भावार्थः—'मी अग्नीला पेटवून वेदीवर स्थापिला आहे. आतां मरुत्, इन्द्र आणि वायु यांस मी बोलावितों, कारण त्यांची उपासना करण्याविषयीं माझी इच्छा झाली आहे. आम्हीं केलेली उपासनेची सिद्धता वेदीजवळ सादर केली आहे. तर आमच्या स्तुति वेदीजवळ प्राप्त झालेल्या देवांसमक्ष जणुं जाऊन उभ्या राहोत.'

'ज्यापेक्षां देदीप्यमान वेदीकडे आम्हीं केलेली अतिनूतन उपासना सादर केली आहे'=' यत् ह काणा विवस्वति नाभा संदायि नव्यसी.' हा चरण कठिण आहे. आम्हीं सायणाच्या अर्थास अनुसरून निर्वाह केला आहे. पण 'काणा' 'विवस्वति' आणि 'नाभा' हे शब्द दुर्बोध आहेत. 'नाभि' म्हणजे येथें वस्तुतः काय समजावयाचें आहे? वेदी असा 'नाभि'शब्दाचा अर्थ वेदांत होतो तो येथें घेतल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं.

'श्रवण करा'=' अस्तु श्रौषट्.' हें देवांस म्हटलें आहे असें सायण म्हणतात, तरी आम्हांस वाटतें कीं जवळ असलेल्या ऋत्विजांस वगैरे ऋषि म्हणत आहे असें समजणें अधिक योग्य दिसतें. 'वषट्' आणि 'वौषट्' हे शब्द जसे आहुत्या देण्याचे वेळीं उच्चारावयाचे उद्गार होत, तसाच श्रौषट् हाहि आहे.

वृत्तासाठीं 'दिव्यं'च्या ठिकाणीं 'दिविअं' असें म्हणावें.

२. ही ऋचा मित्रावरुणाविषयीं आहे. 'हे मित्र आणि वरुण हो, तुम्ही ज्यापेक्षां आपल्या मनोनेत्रांनीं खरें कोणतें आणि खोटें कोणतें, म्हणजे खरा भक्त कोणता आणि खोटा भक्त कोणता हें जाणीत असतां, त्यापेक्षां आम्ही ज्या तुमच्या स्तुति ध्यानपूर्वक गात आहों, तुमचे कडेस जे मन लावून बसलों आहों, तुम्हांला सोम अर्पण करून मन लावून जे बसलों आहों, याच्या योगानें तुमचें सुवर्णमय स्वरूप आमच्या दृष्टीस या यज्ञमंडपांत पडे असें तुम्हीं करा, कारण

युवां स्तोमेभिर्देवयन्तो अश्विनाश्रावयन्तइव श्लोकमायवो युवां हव्याभ्या३यवः ।
युवोर्विश्वा अधि श्रियः पृक्षश्च विश्ववेदसा ।
प्रुषायन्ते वां पवयो हिरण्यये रथे दस्रा हिरण्यये ॥ ३ ॥

युवाम् । स्तोमेभिः । देवऽयन्तः । अश्विना । आश्रवयन्तःऽइव । श्लोकम् । आयवः । युवाम् । हव्या । अभि । आयवः ।
युवोः । विश्वाः । अधि । श्रियः । पृक्षः । च । विश्वऽवेदसा ।
प्रुषायन्ते । वाम् । पवयः । हिरण्यये । रथे । दस्रा । हिरण्यये ॥ ३ ॥

धीभिः । त्वदुद्देश्यैः [ ?=युष्मदुद्देश्यैः ] कर्मभिर्यज्ञादिरूपैः । मनसा च न । त्वदासक्तेन [ ? युवयोरासक्तेन ] चेतसा च । स्वेभिरक्षभिः आत्मीयैरनन्यैश्चक्षुरादीन्द्रियैः । किंच सोमस्य सोमं स्वेभिरक्षभिरस्मदीयैरिन्द्रियैः । नासाद्यपेक्षया बहुवचनम् । इति सायणाचार्याः ॥

---

## भाषायाम्.

३. हे अश्विना ( =अश्विनौ ), स्तोमेभिः ( =स्तोत्रैर् ) युवां देवयन्तः ( =युवामात्मने देवाविच्छन्तः=सकामं पूजयन्तः ) [ अपि च ] श्लोकम् आश्रवयन्त इव ( =युवयोः कीर्तिं प्रख्यापयन्त इव ) आयवः ( =इमे भक्ता ) [ युवामाह्वयन्ति ]—युवाम् [ इमानि पुरःस्थापितानि ] हव्या अभि ( =हव्यान्यभिलक्ष्य हविषां समीपम् ) आयवः ( =इमे भक्ता ) [ आह्वयन्ति ] । युवोः ( =युवयोर् ) विश्वाः श्रियः ( =सर्वा अपि लक्ष्म्यः ) पृक्षश्च ( =अन्नसंपच्च ), हे विश्ववेदसा ( =सर्वज्ञावश्विनौ ), [ युवयो रथे ] अधि[रूढाः सन्ति ] । वां हिरण्यये [ रथे ] ( =युवयोर्हिरण्मये रथे ) पवयः ( =चक्रनेमयः ) प्रुषायन्ते ( =मधूनि स्रवन्ति )—हे दस्रा ( =दस्रौ=शत्रूणामुपक्षपयितारावश्विनौ ), [ युवयोर् ] हिरण्यये रथे ( =हिरण्मये रथे ) [ पवयः प्रुषायन्ते=मधूनि स्रवन्ति ] ॥

श्लोकं युष्मदीयस्तुतिरूपां वाचमाश्रावयन्त इव सर्वतः श्रवणविषयां कुर्वन्त इव ...... । विश्ववेदसा सर्वधनौ ...... । वां हिरण्यये रथे हिरण्मये मधुपूर्णे रथे पवयस्तन्नेमयः प्रुषायन्ते । क्षरन्ति । स्रवन्ति । ......मधुपूर्णपात्रोपेतत्वात् शीघ्रगमनेन चक्रेषु मधूनि स्रवन्तीति भावः । ...... अश्विनो रथस्य मधुपूर्णत्वं त्रयः पवयो मधुवाहने रथ इत्यादिषु प्रसिद्धम् । इति सायणः ॥

३. हे अश्वी हो, स्तोत्रांनीं तुम्हांला भजणारे [ आणि ] तुमची कीर्ति जणुं [ लोकांकडून ] ऐकविणारे [हे भक्त]जन तुम्हांला [ बोलावीत आहेत]— हविरन्नांजवळ [हे भक्त]जन तुम्हांला [बोलावीत आहेत ]. हे सर्वज्ञ हो, तुमच्या सकळ संपत्ति आणि [तुमचें] अन्न हीं [ तुमच्या रथांत भरलेलीं आहेत]. तुमच्या सुवर्णमय [रथा]चे पाटे मधानें थबथबत असतात— हे पराक्रमकारी [अश्वी] हो, सुवर्णमय रथाचे [पाटे थबथबत असतात].

3. [These] worshippers serving you with praises, O As'vins, [and] spreading as it were [your] fame, [are invoking you]—the worshippers [are invoking] you towards the oblations. All your glories and your affluence are, O omniscient [Asvins], on [your chariot]. The fellies of your golden [chariot] are dropping honey— [the fellies] of [your] golden chariot, O mighty [As'vins].

---

आम्ही तुमचे खरे भक्त आहोंत, दांभिक नव्हत.'

'प्रभावाच्या निज मनानें'=' दक्षस्य स्वेन मन्युना.' म्हणजे प्रभावसंपन्न जे तुम्ही, त्या तुमच्या स्वहाताच्या मनानें. 'मन्युना' म्हणजे 'क्रोधानें' असा कितीएक पाश्चात्य विद्वान् येथें अर्थ करितात.

'सुवर्णमय [ रूप ].' 'रूप' ह्या ऐवजीं मूळांत शब्द नाहीं, तो सायणांस अनुसरून आम्हीं अध्याहृत घेतला आहे. पण 'रूप' शब्द अध्याहृत घेण्यापेक्षां 'रथ' शब्दाचा अध्याहार केला तर बरें असें दिसतें. पुढच्या ऋचेंतच अश्वींच्या 'हिरण्मय रथा' विषयीं निर्देश आहे, तो पहा.

'सोमाच्या स्वताहाच्या डोळ्यांनीं'= 'सोमस्य स्वेभिरक्षभिः.' आमचें भाषांतर अक्षरशः आहे. पण तुम्हांला अर्पण केलेला जो सोम, त्याजकडे लाविलेल्या आमच्या डोळ्यांनीं, तुम्हीं सोम पितां कीं नाहीं असें पाहत बसलेल्या आमच्या स्वताहाच्या डोळ्यांनीं,. असा भावार्थ आहे असें दिसतें.

वृत्तासाठीं, 'अधि' आणि 'आददाथे' यांजमध्यें संधि न करणें, आणि 'सद्मसु' आणि 'अपश्याम' यांजमध्यें संधि न करणें, इतकें अवश्य आहे.

---

३. ही आणि पुढच्या दोन ऋचा अश्वी देवांविषयीं आहेत. ह्या ऋचेचा भावार्थः 'हे अश्वी हो, आम्ही जे भक्त जन, ते स्तोत्रें गाऊन तुमची सेवा करीत

**अचेति दस्रा व्यू१ नाकमृण्वथो युञ्जते वां रथयुजो दिविष्टिष्वध्वस्मानो दिविष्टिषु ।**
**अधि वां स्थाम वन्धुरे रथे दस्रा हिरण्यये ।**
**पथेव यन्तावनुशासता रजोऽञ्जसा शासता रजः ॥ ४ ॥**

अचेति । दस्रा । वि । ऊं इति । नाकम् । ऋण्वथः । युञ्जते । वाम् । रथऽयुजः । दिविष्टिषु । अध्वस्मानः । दिविष्टिषु ।
अधि । वाम् । स्थाम । वन्धुरे । रथे । दस्रा । हिरण्यये ।
पथाऽइव । यन्तौ । अनुऽशासता । रजः । अञ्जसा । शासता । रजः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. हे दस्रा ( =दस्रौ=शत्रूणामुपक्षपयितारौ ), [ इदम् ] अचेति ( =ज्ञायते ) [ यद् ] [ युवां ] नाकं वि ऋण्वथः ( =स्वर्गम् अपावृणुथः=स्वर्गस्य द्वाराणि उद्घाटयथः ) [ अपि च ] दिविष्टिषु (=यज्ञेषु गन्तव्येषु सत्सु ) वां रथयुजः ( =रथे युक्ता युवयोरश्वा रथाश्वा ) युञ्जते ( =रथे युज्यन्ते )—दिविष्टिषु ( =यज्ञेषु गन्तव्येषु सत्सु ) अध्वस्मानः ( =ध्वंसनरहिता=ध्वंसमकुर्वाणा ) [ अश्वा ] [ रथे युज्यन्ते ] । हे दस्रा ( =दस्रौ=पराक्रमकारिणावश्विनौ ), वां वन्धुरे हिरण्यये रथे ( =युवयोः सारथिस्थाने हिरण्मये रथे च=युवयोर्हिरण्मयस्य रथस्य सारथिस्थानीये काष्ठविशेषे) [ वयम् ] अधि स्थाम ( =अधिरूढा भवेम=अस्मान् आरोहयतम् ), पथेव यन्तौ ( =सुपथेन भूम्यां गच्छन्ताविव ) रजः अनुशासता ( =निरालम्बाकाशप्रदेशेऽश्वान् गमयन्तौ )—अञ्जसा ( =ऋजुना मार्गेण ) रजः ( =निरालम्बाकाशप्रदेशे ) [ अनु ] शासता ( =अश्वान्गमयन्तौ ) [ युवामस्मानारोहयतम् ] ॥

अचेति वक्ष्यमाणं युष्मच्चेष्टितं ज्ञायते सर्वैः । किं तदिति तदुच्यते । नाकं स्वर्गं व्यृण्वथः । विशेषेण गच्छथः । ......। यज्ञसंपूर्त्यनन्तरमिति यावत् । ...... दिविष्टिषु दिवो गमनेषु निरालम्बाकाशगमनेष्वध्वस्मानो रथस्य तदाश्रितस्य च ध्वंसमकुर्वाणाः । किंच हे दस्रा अश्विनौ वां युवयोर्वन्धुरे बन्धुरत्रययुक्ते । युगबन्धनाधारः काष्ठविशेषो बन्धुरम् । तादृशत्रययुक्तत्वं रथो यो वां त्रिवन्धुर इत्यादिषु प्रसिद्धम् । हिरण्यये हिरण्मये रथेऽधि तादृशस्य रथस्योपरि स्थाम । अरथापयाम । इति सायणः ॥

४. हे पराक्रमकारी [अश्वी]हो, हें प्रसिद्ध आहे [ कीं ] तुम्ही स्वर्गा[चें दार ] उघडितां, [आणि ] रथास जोडावयाचे तुमचे घोडे यज्ञां[स येण्या]साठीं [तुमच्या रथाला] जोडिले जातात—सुरक्षितपणें आणणारे [ घोडे] यज्ञां[स येण्या]साठीं [ जोडिले जातात]. हे पराक्रमकारी [ अश्वी]हो, तुमच्या सुवर्णमय रथाच्या सारथिस्थानीं आम्हांस तुम्ही बसावयाला द्या; मार्गानें गेल्याप्रमाणें आकाशप्रदेशांतून [ अश्वांला ] मार्ग दाखवीत जाणारे— आकाशप्रदेशांतून सरळ मार्ग दाखवीत जाणारे [ जे तुम्ही, ते] [तुमच्या रथाच्या सारथिस्थानीं आम्हांस बसावयाला द्या ].

4. This, O mighty [As'vins], is known: you throw open the [gates of] heaven, [ and ] your chariot-horses are yoked [to your chariot] when you have to go to sacrifices—your safe [chariot-horses][are yoked] when you have to go to sacrifices. O mighty [ As'vins ], permit us to stand on the pole [of] your golden chariot–you, who direct [ your horses ] through space as though going by a road—direct [ them ] by the right path through space.

आहों, आणि तुमची कीर्ति जणुं सर्वांकडून ऐकवोत आहों, आणि हें येथें हव्य अर्पण करून त्याजपाशीं तुम्हांला बोलावीत आहों. तर तुम्ही ज्या आपल्या रथांत आपल्या सर्व संपत्ति घालून आणि आपली सर्व अन्नसंपत्ति घालून फिरतां, आणि ज्यांत मधानें भरलेलीं भांडीं ठेविलेलीं असल्यामुळें तीं डुचमळून त्यांतील मध चाकावर गळून त्या चाकांचे पाटे भिजून जातात, आणि मधानें गळत असतात, त्या रथांत तुम्ही बसून या, आणि हीं हव्यें ग्रहण करा.'

[ बोलावीत आहेत ]. हें अध्याहृत घेतलें आहे, त्याऐवजी मुळांत शब्द नाहीं. पण तसाच कांहीं तरी अध्याहार केल्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं. पुढच्या चरणांतहि तुमच्या ' रथांत भरलेलीं आहेत ' याचा अध्याहार करावा लागतो. असे अध्याहार वेदांत पुष्कळ येतात.

अश्वी देव रथांत बसून जाऊं लागले म्हणजे त्यांत संपत्ति, विपुळ धनधान्य

शचीभिर्नः शचीवसू दिवा नक्तं दशस्यतम् ।
मा वां रातिरुप दसत्कदा चनास्मद्रातिः कदा चन ॥ ५ ॥३॥

शचीभिः । नः । शचीवसू इति शचीऽवसू । दिवा । नक्तम् । दशस्यतम् ।
मा । वाम् । रातिः । उप । दसत् । कदा । चन । अस्मत् । रातिः । कदा । चन ॥ ५ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

५. हे शचीवसू (=शौर्यकर्मधनौ) [अश्विनौ], [युवां] दिवा नक्तं (=दिवा रात्रौ च) शचीभिः (=युवयोः शौर्यकर्मभिर्) नः (=अस्मभ्यं) दशस्यतं (=साहाय्यं कुरुतम्) । वां रातिः (=युवयोर्दानादिरनुग्रहः) कदा चन (=कदापि) मोप दसत् (=मा क्षीणा भूत्)—[युवयो] रातिः (=दानादिरनुग्रहः) कदा चन (=कदापि) अस्मत् (=अस्माकं सकाशात्) [मोप दसत्=उपक्षीणा भूत्वा मा गच्छतु] ॥

आणि मध हीं भरून घेऊन फिरतात असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलेलें आहे.

वृत्तासाठीं 'अश्विना' आणि 'आश्वयन्तः' यांजमध्यें संधि न करणें, आणि दुसऱ्या चरणांतील तिसरा पोटचरण 'युवां हव्याभि आयवः' असा म्हणणें इतकें अवश्य आहे.

४. 'हे अश्वी हो, ही गोष्ट सर्वास ठाऊक आहे कीं, तुम्हांला यज्ञास जावयाचें असलें म्हणजे, तुम्ही स्वर्गाचे दरवाजे उघडून निघतां, आणि रथाश्व रथाला जोडून आधाररहित आकाशांतून जमिनीवरील सरळ मार्गानें चालल्याप्रमाणें चालत असतां. तर त्या तुमच्या रथावरचें जें सारथिस्थान, त्याजवर तुम्ही आम्हांला बसवा,' असा भावार्थ आहे; पण सायणांनीं अर्थ निराळा केला आहे. ते म्हणतात त्याचें तात्पर्य असें कीं, आकाशांतून सरळ मार्गानें चालल्याप्रमाणें चालणारे जे तुम्ही, अश्वी त्यांला आम्हीं तुमच्या सुवर्णमय रथांत स्तोत्राच्या योगानें बसविलें आहे, तर त्या रथांत बसून तुम्ही लवकर या.

'स्वर्गाचें दार उघडितां'=' नाकं वि ऋण्वथः.' स्वर्गभर फिरत असतां असाहि अर्थ संभवतो.

'रथास जोडावयाचे घोडे'=' रथयुजः.' ऋ. ८. ३३.१४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

५. हे पराक्रमपूर्ण [अश्वी] हो, तुम्ही [ आपल्या ] पराक्रमांनीं आम्हांला दिवसा [ आणि ] रात्रीं साहाय्य करा. तुमची कृपा कदापि नष्ट न होओ—आम्हांपासून [तुमची ] कृपा कदापि [नष्ट न होओ].

5. With your valorous deeds, O As'vins rich in valorous deeds, do you help us by day [ and ] by night. May your favour never perish away—[ may your] favour never [perish away ] from us.

' सरळ मार्ग दाखवीत जाणारे '= ' अञ्जसा अनुशासता रजः.' ऋ. ६. ५४. १ आणि त्यावरील सायणभाष्य पहा. ' यः अञ्जसा अनुशासति ' याचें भाष्य त्यांनीं "ऋजुमार्गेण अनुशासति" असें केलें आहे.

५. ' नष्ट न होओ '=' मा उप दसत्. ' म्हणजे नाहींशी न होओ, कमी न होओ.

या ऋचेचें वृत्त बृहती. म्हणजे अनुष्टुभ्‌चें वृत्त, पण तिसरा चरण अष्टाक्षरी नसतां द्वादशाक्षरी जगती छंदाचा असतो.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांतील पहिला पोटचरण ' अचेति दस्रा वि उ नाकमृण्वथः' असा वाचावा. आणि तिसऱ्या चरणांतील दोन्ही पोटचरणांमध्यें संधि करूं नये.

वृषन्निन्द्र वृषपाणास इन्दव इमे सुता अद्रिषुतास उद्भिदस्तुभ्यं सुतास उद्भिदः ।
ते त्वा मन्दन्तु दावने महे चित्राय राधसे ।
गीर्भिर्गिर्वाहः स्तवमान आ गहि सुमृळीको न आ गहि ॥ ६ ॥

वृषन् । इन्द्र । वृषऽपानासः । इन्दवः । इमे । सुताः । अद्रिऽसुतासः । उत्ऽभिदः । तुभ्यम् । सुतासः । उत्ऽभिदः ।
ते । त्वा । मन्दन्तु । दावने । महे । चित्राय । राधसे ।
गीःऽभिः । गिर्वाहः । स्तवमानः । आ । गहि । सुऽमृळीकः । नः । आ । गहि ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे वृषन् ( =सेचनसमर्थ=वीर्योपेत ) इन्द्र, वृषपानासः (=त्वया वीरेण पातुं योग्या ) अद्रिसुतासः ( =ग्रावभिरभिषुता ) उद्भिदः ( =उद्भिन्दन्तः=पीयमानाः सन्तो हर्षरूपेण शरीरमुद्भिद्येव गच्छन्तः ) इमे इन्दवः ( =एते सोमाः ) सुताः ( =अभिषवणेन सिद्धाः ) [ सन्ति ]—तुभ्यं ( =त्वदर्थम् ) उद्भिदः ( =उद्भेदकाः ) [ सोमाः ] सुतासः ( =अभिषुताः ) [ सन्ति ] । ते महे चित्राय राधसे दावने (=महत् चित्रं राधः दातुं=प्रभूतमुत्कृष्टं च धनमस्मभ्यं दातुं=तादृशं धनं त्वं यथा ददासि तथा कर्तुं ) त्वा मन्दन्तु ( =त्वां मादयन्तु ) । हे गिर्वाहः ( =गिर एव वाहनस्थानीया यस्य=गीर्भिरुह्यमान ) [इन्द्र ], गीर्भिः स्तवमानः ( =अस्माकं स्तोत्रैः स्तूयमानः सन् ) [ त्वम् ] आ गहि ( =आगच्छ )—सुमृळीकः ( =सुष्ठु सुखयिता त्वं ) नः ( =अस्मान्प्रति ) आ गहि ( =आगच्छ ) ॥

अद्रिषुतासः । अद्रिभिर्दृढैः पाषाणैरभिषवसाधनैः सुताः । उद्भिदः । उद्भेदका वर्षस्य । ......उद्भिदो बलस्योद्भेदका उद्भिन्ना वा पर्वतादौ तादृशाः । इति सायणः ॥

६. हे वीरा इंद्रा, तूं वीरानें पिण्यास योग्य असे हे उद्भेदक सोमरस ग्राव्यांच्या योगानें आम्हीं काढिले आहेत—तुजकरितां उद्भेदक [सोमरस] काढिले [आहेत]. ते [आम्हांला] मोठें [आणि] रमणीय धन देण्यासाठीं तुला माद आणोत. हे स्तोत्रवाहन [इंद्रा], [आमच्या] स्तोत्रांनीं स्तविलेला जो तूं, तो ये—कृपाळु तूं आम्हांप्रत ये.

6. O hero, O Indra, here are these Soma-juices fit to be drank by a hero [and] extracted with the stones, that rise to the top—extracted for thee, Somas that rise to the top. May they exhilarate thee that thou mayest give us great [and] delightful wealth. Praised by [our] hymns come thou, O [Indra], who art borne on hymns—thou kind one, come unto us.

६. ही ऋचा इन्द्राविषयीं आहे. इन्द्राकरितां सोम अर्पण करून ऋषि म्हणतो, 'हे वीरा इन्द्रा, त्वां वीरानें पिण्यास योग्य असे, आणि पीतांच आनंद आणि हर्ष उत्पन्न करून शरीरांतून आवेशाच्या द्वारें जणुं बाहेर पडणारे, असे हे सोमरस तुजकरितां ह्या पाषाणांच्या योगानें आम्हीं काढिले आहेत; तर हे तूं पी, आणि आनंदित होऊन आम्हांला मोठी आणि सुंदर अशी संपत्ति दे. हे इंद्रा, उपासकांची स्तोत्रें ऐकतांच घोड्यावर अथवा घोडे जोडिलेल्या रथांत न बसतां, त्या स्तोत्रांवरच जणुं बसून येणारा असा जो तूं, तो हीं आमचीं स्तोत्रें ऐकून ये—कारण कीं, तूं कृपाळु आहेस; तर तूं आम्हांप्रत लवकर ये.'

'उद्भेदक'='उद्भिदः.' सायणांनीं अर्थ निराळा केला आहे (भाषा पहा). 'मेघाला फोडून पाण्याचा वर्षाव करविणारा' हा अर्थ संभवतो खरा.

'धन देण्यासाठीं'='राधसे दावने.' 'दावने' ही तुमर्थी चतुर्थी आहे. 'दातुम्' या अर्थी आणि 'राधसे' याजबद्दल 'राधः' अशी द्वितीया असावयाची होती, पण 'दावने' याच्या साहचर्याकर्षणामुळें 'राधस्' हेंहि पद चतुर्थ्यन्त झालें आहे.

'स्तोत्रवाहन'='गिर्वाहः.' सू. ६१ मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा. सायणांनीं 'स्तोत्रें वाहून नेणारा' असें भाष्य केलें आहे.

**ओ षू णो अग्ने शृणुहि त्वमीळितो देवेभ्यो ब्रवसि यज्ञियेभ्यो राजभ्यो यज्ञियेभ्यः ।**
**यद्ध त्यामङ्गिरोभ्यो धेनुं देवा अदत्तन ।**
**वि तां दुह्रे अर्यमा कर्तरी सचाँ एष तां वेद मे सचा ॥ ७ ॥**

ओ इति । सु । नः । अग्ने । शृणुहि । त्वम् । ईळितः । देवेभ्यः । ब्रवसि । यज्ञियेभ्यः । राजऽभ्यः । यज्ञियेभ्यः ।
यत् । ह । त्याम् । अङ्गिरःऽभ्यः । धेनुम् । देवाः । अदत्तन ।
वि । ताम् । दुह्रे । अर्यमा । कर्तरि । सचा । एषः । ताम् । वेद । मे । सचा ॥ ७ ॥

---

### भाषायाम्.

७. हे अग्ने, नः (=अस्माकमाह्वानम्) ओ षु शृणु (=आगम्य शोभनं यथा तथा शृण्वेव) । [अस्माभिर्] ईळितः (=स्तुतस्त्वं) यज्ञियेभ्यः (=यज्ञार्हेभ्यो) देवेभ्यो ब्रवसि (=अस्मत्कर्म अस्मत्पक्षे वा ब्रूयाः=वद)—यज्ञियेभ्यः (=यज्ञार्हेभ्यो) राजभ्यः (=राजभूतेभ्यो) [देवेभ्यो] [ब्रवसि=ब्रूयाः] । हे देवाः, यत् ह त्यां (=यां प्रसिद्धां) धेनुं (=गां) [यूयम्] अङ्गिरोभ्यो अदत्तन (=दत्तवन्तः) तां (=यां च) कर्तरि सचा अर्यमा दुह्रे (=यजमानेन सह अर्यमा देवो दुदोह) तां (=तादृशीं) [धेनुं] मे सचा एष (=मत्समवाय एषोऽर्यमा) वेद (=जानाति=" अर्यमाहमपि जानामि ") ॥

इदानीं देवाः प्रत्यक्षेणोच्यन्ते । अत्रेतिहासमाहुः । अङ्गिरसो नाम महर्षयः पूर्वं यज्ञार्थं देवान् स्तुत्या प्रीणयित्वा गा अयाचन्त । ते प्रीताः कामदुघां प्रादुः । लब्धां च तां धेनुं क्षीरं दोग्धुमशक्नुवाना अर्यमणं देवं प्रार्थयन् । स च प्रार्थितोऽग्निहोत्राद्यर्थं क्षीरं दुदोहेति । तदिदमत्रोच्यते । ...... एष एवार्यमा तां धेनुं मे सचा मत्समवायेन वेद । जानाति । अर्यमाहमपि जानामीत्यर्थः । ईदृशी धेनुस्त्वदर्थमेव दुह्यत इत्यग्नेः स्तुतिः । इति सायणः ॥

७. हे अग्नी, तूं येऊन आमचें आह्वान ऐक. आम्हीं स्तविलेला जो तूं, तो यजनीय देवांप्रत [ आम्हांविषयीं ] [सांग].—यजनीय देवराजांप्रत [ आम्हांविषयीं ] [ सांग ]. हे देव हो, तुम्हीं जी ती गाय अंगिरसांला देते झालां, आणि जिचें अर्यमा आणि यजमान यांनीं मिळून दूध काढिलें—त्या [गाई]ला त्यानें आणि मी शोधून काढिलें आहे.

7. Do come and hear our [ hymn ], O Agni. Praised by us, thou shalt speak [ in our behalf ] to the adorable gods—to the adorable kings [of heaven]. For that cow which you gave, O gods, to the Angirases, and which Aryaman milked in company with the sacrificer,—that cow he (Aryaman) and I have found out.

७. ही ऋचा अग्नीविषयीं आणि दुसऱ्या देवांविषयीं आहे. ‘ हे अग्नी, तूं ये, आणि आम्ही कसें यजन करितों आहों आणि कशी स्तुति करीत आहों तें पाहून दुसऱ्या देवांला सांगून त्यांसहि इकडे घेऊन ये.—हे देव हो, तुम्ही पूर्वीं अंगिरस नांवाच्या ऋषींला जशा प्रकारची गाय दिली, आणि तिचें दूध अर्यमा देवानें अंगिरसाबरोबर काढिलें, तसलीच गाय आतां आम्हीं आणिली आहे, आणि तशा गाईचें दूध काढून तुम्हांकरितां हवि सिद्ध केलें आहे. तर तुम्ही या, आणि हें ग्रहण करा’ असा अभिप्राय.

पण शेवटच्या म्हणजे तिसऱ्या चरणाचा अर्थ स्पष्ट समजत नाहीं. आम्हीं सायणांस अनुसरून अर्थ केला आहे. ते म्हणतात, पूर्वीं अंगिरसांला देवांनीं एक गाय ‘ कामधेनु ’ दिली. तिचें दूध त्यांस काढावयाला येईना तेव्हां तें अर्यमा देवानें काढिलें. तसलीच गाय आतां अर्यमा याणें संपादन केली आहे. आणि तिच्या दुधापासून आजचें हें आमचें हवि तयार केलें आहे इत्यादि.

कसेंहि असो ( म्हणजे अर्यमा यानें प्रस्तुत मंत्र म्हणणाऱ्या उपासकासहित दुसरी अथवा तसली गाय कशीहि संपादन केलेली असो ), पण इतकें निःसंशय खरें दिसतें कीं, अंगिरसांनीं पूर्वीं देवांनीं दिलेल्या ज्या गाईचें दूध काढून देवांस हवि अर्पण केलें, तसल्या अथवा त्याच गाईचें दूध काढून त्याचें हवि आज सिद्ध केलें आहे, यास्तव सर्व देवांनीं यावें; असा ऋषीचा अभिप्राय आहे; आणि अंगिरसांला देवांनीं एक चमत्कारिक गाय दिली होती अशा

मो षु वो अस्मदभि तानि पौंस्या सना भूवन्द्युम्नानि मोत जारि-
षुरस्मत्पुरोत जारिषुः ।
यद्वश्चित्रं युगेयुगे नव्यं घोषादमर्त्यम् ।
अस्मासु तन्मरुतो यच्च दुष्टरं दिधृता यच्च दुष्टरम् ॥ ८ ॥

मो इति । सु । वः । अस्मत् । अभि । तानि । पौंस्या । सना । भू-
वन् । द्युम्नानि । मा । उत । जारिषुः । अस्मत् । पुरा । उत । जारिषुः ।
यत् । वः । चित्रम् । युगेऽयुगे । नव्यम् । घोषात् । अमर्त्यम् ।
अस्मासु । तत् । मरुतः । यत् । च । दुस्तरम् । दिधृत । यत् । च ।
दुस्तरम् ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. [ हे मरुतः ], तानि (=प्रसिद्धानि ) सना (=सनातनानि=पुरातनानि ) पौंस्या ( =पौंस्यानि=प्रबलानि साहाय्यानि ) मो षु [ अस्मत् ] अभि भुवने ( =अस्मत्सकाशात् मैवापगच्छन्तु ) उत ( =अपि च ) द्युम्नानि ( =युष्मद्दत्तानि यशांसि) मा जारिषुः ( =मा जीर्णानि भवन्तु )—अस्मत् पुरा ( =अस्मभ्यं पूर्वमेव=अस्माकं मरणात्पूर्वमेव ) मा जारिषुः ( =मा जीर्णानि नष्टानि भवन्तु ) । [ अपि च ] यत् ( =यद्यद् ) वः ( =युष्माकं ) चित्रं ( =मनोहरं ) [ धनं ] युगेयुगे ( =प्रत्येकस्मिन् युगे=मनुष्याणां सर्वस्मिन्नायुष्यकाले ) नव्यम् अमर्त्यं ( =नूतनं मरणरहितं ) [ चेति ] घोषात् ( =घोष्येत=कीर्त्येत=प्रसिद्धं स्यात् ) यच्च ( =यद्यच्च ) दुष्टरं ( =शत्रुभिर्जेतुं दुःखेन शक्यं )—यच्च दुष्टरं ( =यद्यच्च शत्रुभिस्तरीतुं जेतुम् अशक्यं ) [ धनं ] दिधृत ( =धारयत=प्रयच्छत ) तत् ( =तत्तत्सर्वं ) हे मरुतः, [ यूयम् ] अस्मासु ( =अस्मास्वेव ) [ दिधृत=धारयत=प्रयच्छत ] ॥

पौंस्या पौंस्यानि बलानि । इति सायणः । अस्मत् पुरा पुराणि लक्षणया तत्रस्थाः प्राणिनः इति घोषात् घोषाः । व्यत्ययेन पञ्चमी । शब्दोपेता गवादयो घोषोपलक्षिता ग्रामनगरादयो वेति च तस्य चिन्त्यतरम् ॥

---

कांहीं कथेला उद्देशून ऋषि बोलतो आहे हेंहि निर्विवाद दिसतें.

'आणि जिचें '=' ताम्. ' अक्षरशः ' तिला ' अथवा 'तिचें ' इतकाच आहे, पण ' यत् त्यां ' याचा ' तच्छब्द ' खरोखर ' एष तां वेद मे सचा ' यांतच आहे, त्यापूर्वी नाहीं.

' यजमान '=' कर्तरि.' ऋ. ६. १९.

८. [ हे मरुतांनो ], तुमचीं [ जीं ] तीं जुनीं पाठबळें, [ तीं ] [आम्हांपासून] न जाओत; आणि [तुम्हीं दिलेलीं] यशें नष्ट न होओत —आम्ही [मरण्या]पूर्वींच नष्ट [न] होओत. जो जो तुमचा उत्तम [ अनुग्रह ] प्रत्येक पिढींत नवा [ आणि ] अमर्त्य [ असा ] गाजतो, [ आणि ] जें [ शत्रूंनीं ] जिंकण्यास कठीण [असें ],—जें [जें] [शत्रूंनीं] जिंकण्यास कठीण [ असें ] [ धन ] तुम्ही देत असतां, तें [तें] हे मरुतांनो, तुम्ही आम्हांला द्या.

8. May those your ancient strong helps never depart [from us]; and may the splendors [given by you] never perish—[never] perish before we [die]. Whatever [favours of] yours are renowned [as] new [and] immortal in every generation, [and] whatever [is] unassailable —whatever unassailable [good] you confer, bestow all that upon us, O Maruts.

१ आणि भाष्य पहा.

'त्यानें आणि मी '=' एष मे सचा.' ' एष मयि सचा ' असें असावें. 'मयि'-च्या ठिकाणीं ' मे ' आहे अथवा ' मयि 'चाच अपभ्रंश वृत्ताकरितां ' मे ' असा झाला असें समजावयाचें कीं काय ? ' सचा ' आलें म्हणजे तृतीया किंवा सप्तमी येते.

वृत्तासाठीं 'देवेभिओ ' आणि दोन्ही ठिकाणीं ' यज्ञियेभिओ, ' ' अङ्गिरोभिओ ' असें म्हणावें लागतें.

८. ही ऋचा मरुतांविषयीं आहे. भावार्थः—' हे मरुतांनो, तुमचें जें सामर्थ्यवान् पाठबळ फार दिवसांपासून आम्ही उपभोगीत आहों, तें आम्हांला सोडून न जाओ; आणि तुम्ही जें अनेक प्रकारचें वैभव आम्हांस दिलें आहे, तें आम्ही मरण्यापूर्वीं नष्ट न होओ, तर आम्ही जीवंत असेपर्यंत आम्हांपाशींच स्थिर राहो. आणि पिढीदरपिढींत जें जें म्हणून तुम्ही उत्तम ऐश्वर्य देतां, आणि जें नवें आणि अमर होय असें गाजतें, आणि जें जें वैभव शत्रूंहीं अजिंक्य असें देत असतां, तें तें सर्व तुम्ही आम्हांला द्या.'

' आम्ही मरण्यापूर्वीं '=' अस्मत् पुरा.' अक्षरशः ' आम्हांपूर्वीं, ' ' आमच्या अगोदर. ' हा अर्थ उघड असतां सायणांनीं ' आमचीं नगरें ' असें भाष्य केलें आहे.

**दध्यङ् ह मे जनुषं पूर्वो अङ्गिराः प्रियमेधः कण्वो अत्रिर्मनुर्विदु-**
**स्ते मे पूर्वे मनुर्विदुः ।**
**तेषां देवेष्वायतिरस्माकं तेषु नाभयः ।**
**तेषां पदेन मह्या नमे गिरेन्द्राग्नी आ नमे गिरा ॥ ९ ॥**

दध्यङ् । ह । मे । जनुषम् । पूर्वः । अङ्गिराः । प्रियऽमेधः । कण्वः । अत्रिः । मनुः । विदुः । ते । मे । पूर्वे । मनुः । विदुः ।
तेषाम् । देवेषु । आऽयतिः । अस्माकम् । तेषु । नाभयः ।
तेषाम् । पदेन । महि । आ । नमे । गिरा । इन्द्राग्नी इति । आ । नमे । गिरा ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. दध्यङ् (=अथर्वगोत्रोत्पन्न एतन्नामा महर्षिः) पूर्वः अङ्गिराः (=पुरातनः अङ्गिरा नाम महर्षिः) प्रियमेधः कण्वः अत्रिः मनुर्ह [ इत्येते ] मे जनुषं (=मम जन्म) विदुः (=जानन्ति)—मनुस् ते [ चान्ये ] पूर्वे (=पूर्वपुरुषा) मे [ जनुषं ] (=मम जन्म) विदुः (=जानन्ति)। तेषाम् आयतिः (=दीर्घकालसंबन्धो) देवेषु (=इन्द्रादिषु) [ आसीत् ] अस्माकं नाभयः (=पूर्वबन्धवस्) तेषु (=मन्वादिषु पूर्वेषु) [ आसन् ]। तेषां (=मन्वादीनां) पदेन (=मार्गेण) गिरा (=स्तुत्या) महि (=अत्यधिकम्) आ नमे (=नमामि)—गिरा (=स्तुत्या) इन्द्राग्नी (=इन्द्रमग्निं च) आ नमे (=संभजे)॥

सायणस्त्वेवमाख्यातवान् । दध्यङ् अथर्वगोत्रोत्पन्न एतन्नामको महर्षिः स च पूर्वः पूरकः सर्वस्य पुरातनो वा। अङ्गिरा अङ्गारः। तद्वत्तेजस्वीत्यर्थः। यद्वा अङ्गारा एवाङ्गिरसोऽभवन् येऽङ्गारा आसंस्तेऽङ्गिरसोऽभवन्निति श्रुतेः। अङ्गिरा अङ्गारा अङ्कना अञ्चना इति निरुक्तम्। एतन्नामा महर्षिश्च प्रियमेधो मेधाप्रियः। प्रियमेधः प्रिया अस्य मेधाः। नि० ३. १७। इति यास्कः। स च कण्वो मेधावी स चात्रिर्दुःखत्रयरहितः। अत्रिर्न त्रय इति निरुक्तम् । ३. १७। मनुर्मननवान् एतन्नामा महर्षिः। एते सर्वे महात्मानो महर्षयो मे जनुषं दिवोदासपुत्रस्य परुच्छेपस्य जन्म विदुः। जानन्ति ॥ ...... किंच ते पूर्वोक्ताः पूर्वकालीना मे अस्मत्पित्रादीञ्जानन्त इत्यर्थः। मनुर्मनवो ज्ञानवन्तो यतस्ते पूर्वे मनवश्च अतो विदुरिति भावः॥ तेषां ज्ञान उपपत्तिमाह। तेषां दध्यगादीनां देवेष्वितरेषु देवनशीलेषु महर्षिषु मध्य आ-

९. दध्यङ्, पुरातन अङ्गिरा, प्रियमेध, कण्व, अत्रि [ आणि ] मनु [हे] माझी उत्पत्ति जाणतात— मनु [इत्यादिक] ते प्राचीन [ऋषि] माझी [ उत्पत्ति ] जाणतात. त्यांचा संबंध देवांशीं [ असे ]; आमचे पूर्व बन्धुजन त्यांजमध्यें [ असत ]. त्यांच्या रीतीनें स्तुति म्हणून मी फार विनवितों—स्तुति म्हणून इंद्राग्नींला फार विनवितों.

9. Dadhyanch, ancient Angiras, Priyamedha, Kaṇva, Atri [and] Manu know my origin—Manu [and] those [other] ancients know my [origin]. They had very ancient relation with the gods, our forefathers were among them. In their footsteps I humbly propitiate with prayer—propitiate Indra and Agni with prayer.

---

'प्रत्येक पिढींत '='युगेयुगे.' 'युग' शब्दाचा पिढी हा जो अर्थ येथें केला आहे, तो लक्ष्यांत ठेवावा. वेदांत 'युग' म्हणजे 'कलियुग,' 'द्वापरयुग' इत्यादि लांबलांब युगें विवक्षित नाहींत; तर 'पिढी,' 'डोई' असा अर्थ असतो. सू. ९२ मं. ११ सू. १०३ मं. ४ याजवरील टीप पहा.

'गाजतो '=' घोषात्. ' ' घोषात् ' हें 'घुष्' धातूपासून झालेलें कर्मणि लेट्चें रूप आहे. प्रत्यय कर्तरि, पण अर्थ कर्मणि आहे. ' घोषात् ' असें क्रियापदीं रूप ऋक्संहितेंत पुनःहि आलेलें आहे. ऋ. ५. ३७. ३ यांत ' आस्य श्रवस्यात् रथ आ च घोषात् ' असं आहे तें पहा. सायणांनीं 'घोषात्' म्हणजे '' घोषोपलक्षिता ग्रामनगरादयः '' असा अगदीच क्लिष्ट अर्थ केला आहे.

वृत्तासाठीं 'पौंसिआ ' आणि 'अमर्तिअम् ' असें म्हणावें लागतें.

---

९.भावार्थः—'पुरातन असे दध्यङ्, अंगिरा, प्रियमेध, कण्व, अत्रि, मनु, हे जे ऋषि, त्यांस माझें जन्म कोणापासून झालें तें ठाऊक आहे. त्यांचा संबंध देवांशीं प्रत्यक्ष असे, आणि आमचे मूळ पुरुष मन्वादिकांमध्यें असत. यास्तव मी मन्वादिकांच्याच पद्धतीनें इन्द्राग्नींला भजतों.'

'दध्यङ्.' सू. ८० मं. १६, सू. ११६ मं. १२ इत्यादि पहा.

'अङ्गिरस.' सू. ३१ मं. १७, सू. ६२ मं. २ इत्यादि पहा.

'प्रियमेध.' सू. ४५ मं. ३, ४ पहा.

'कण्व.' सू. ३६ मं. १०, सू. ४७ मं. ५ इत्यादि पहा.

'अत्रि.' सू. ५१ मं. ३, सू. ११२ मं. ७ इत्यादि पहा.

'मनु.' सू. ३६ मं. १९, सू. ३१ मं. ४ इत्यादि पहा.

आपलें जन्म कोणापासून प्रथमतः

**होता यक्षद्वनिनो वन्त वार्यं बृहस्पतिर्यजति वेन उक्षभिः पुरुवारेभिरुक्षभिः ।**
**जगृभ्मा दूरआदिशं श्लोकमद्रेरध त्मना ।**
**अधारयदररिन्दानि सुक्रतुः पुरू सद्मानि सुक्रतुः ॥ १० ॥**

होता । यक्षत् । वनिनः । वन्त । वार्यम् । बृहस्पतिः । यजति । वेनः । उक्षऽभिः । पुरुऽवारेभिः । उक्षऽभिः ।
जगृभ्म । दूरेऽआदिशम् । श्लोकम् । अद्रेः । अध । त्मना ।
अधारयत् । अररिन्दानि । सुऽक्रतुः । पुरु । सद्मानि । सुऽक्रतुः ॥ १० ॥

---

यतिर्दीर्घकालसंबन्धोऽस्ति । अतो विदुरित्यर्थः । ततश्च किमित्याह । अस्माकं नाभयो जीवेन सह संबन्धवन्तः प्राणाः फलेन संबद्धा यागा वा तेषु तेष्वेव वर्तन्ते । असौ विशिष्टजन्मा वो यज्ञयोग्य इति तैर्वक्तव्यत्वेन तदधीनत्वम् । तेषां दध्यगादीनां पदेनास्पदेन महत्त्वेन निमित्तेन गिरा स्तुतिरूपया वाचा महि महदत्यधिकं नमे । नमामि । सर्वो जनः । किंच तेषामनुग्रहाद्यज्ञयोग्यः सन् इन्द्राग्नी गिरा स्तुतिरूपया वाचा युक्तः सन्ना नमे । आभिमुख्येन नमामि स्तौमि । नमामि चेत्यर्थः । नमेर्व्यत्ययेनात्मनेपदम् । यद्वा कर्मकर्तरि न दुहस्नुनमामिति यकः प्रतिषेधः । स्वयमेव नतोस्मि ॥

---

## भाषायाम्.

१०. होता ( =बृहस्पतिरूपो देवानामाह्वाता ) यक्षत् ( =यजतु ) । [ तथा कृते सति ] वनिनः ( =दानशीला देवा ) वार्यं ( =सर्वैर्वरणीयं धनं ) वन्त ( =अस्मभ्यं दद्युः=दास्यन्ति ) । वेनः ( =अस्मान् कामयमानः=अस्मदनुग्रहीता ) बृहस्पतिः ( =दैव्यो होता ) उक्षभिः ( =सेचनसमर्थैर्वीर्यवद्भिः=प्रबलैः सोमैर् ) यजति ( =देवान् पूजयति )—पुरुवारेभिः उक्षभिः ( =बहुभिर्वरणीयैः समर्थैः सोमैर् ) [ यजति ] । अध ( =अथ=इदानीं ) [ तेन प्रयुक्तस्य ] अद्रेः ( =ग्राव्णो ) दूरआदिशं ( =दूरप्रदेशं==दूरगामिनं ) श्लोकं (=नादं ) त्मना (=आयासं विना ) जगृभ्म ( =गृह्णीमः=शृणुमः ) । [ अनन्तरं ] सुक्रतुः ( =शोभनप्रज्ञो ) [ बृहस्पतिः ] अररिन्दानि ( =मेघोदकानि ) अधारयत् (=धारयति=उपासकानामर्थं लब्ध्वा तेभ्यो ददाति )—सुक्रतुः ( =शोभनप्रज्ञो ) [ बृहस्पतिः ] पुरू सद्मानि ( =पुरूणि निवासस्थानानि ) [ यजमानानामर्थम् ] [ अधारयत्=लब्ध्वा ददौ ] ॥

१०. [ बृहस्पतिरूप ] होता यजन करो, [मग] उदार देव इष्ट धन देतील. कृपाळु बृहस्पति प्रबळ [ सोमांनीं ] यजन करितो— सर्वांनीं ज्यांची वांछा करावी अशा प्रबळ सोमांनीं यजन करितो. मग आपणाला पाषाणाचा दूर पोंहचणारा आवाज आपले आपण ऐकूं येत असतो. उत्तम बुद्धिमान् बृहस्पति [ मेघांतील ] उदकें घेतो—पुष्कळ घरें घेतो.

10. May [ Brihaspati ] the invoker conduct the sacrifice: the bounteous [ gods ] shall bestow the wished for [wealth]. Loving Brihaspati conducts the sacrifice with the strong [Somas]—with the strong [ Somas ] that are desired by many. We then hear the noise of the [ Soma-pressing ] stone, reaching afar. Wise Brihaspati has obtained the waters—the wise one [has obtained ] numerous habitations.

झालें तें कांहीं ठाऊक नाहीं, पण आपले वाडवडील दध्यङ्, अङ्गिरा, मनु इत्यादि जे पुरातन ऋषि, त्यांपैकीं होते, आणि ते ( मन्वादिक ) जसे देवांस भजत तसे इन्द्राग्नींला वगैरे आम्ही आतां भजतों, ती रीत कशीहि असो, वाडवडिलांपासून चालत आलेली आहे; ती देवांस मान्य होओ, असा ऋषीचा अभिप्राय आहे.

या ऋचेवरून हें सूक्त जेव्हां रचिलें गेलें तेव्हां दध्यङ्, अङ्गिरा, प्रियमेध, कण्व, अत्रि, आणि मनु हे अति प्राचीन काळीं होऊन गेलेले ऋषि होत असें मानीत असत, आणि परुच्छेप, अथवा प्रस्तुत सूक्ताचा जो कोण कर्ता असेल तो, त्या प्राचीन ऋषींच्या मागून फार दिवसांनीं झाला असें अनुमान केलें पाहिजे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांतील दोन्ही पोटचरण पदपाठाप्रमाणें म्हणावे लागतात. त्याप्रमाणेंच तिसऱ्या चरणांतील पहिला पोटचरणहि पदपाठांत आहे तसा म्हणावा.

१०. हा मंत्र दुर्बोध आहे. मुळांतील निर्देश फार संक्षिप्त असल्यामुळें कोणता भाग कोणाविषयीं आहे तें स्पष्ट समजण्यास अडचण आहे. 'बृहस्पति' हा देवांला आणण्याविषयीं आणि त्यांस हवि आणि सोम अर्पण करून प्रसन्न करण्याविषयीं फार कुशल आहे, यासाठीं तो येऊन आमचा आजचा यज्ञ

**ये देवासो दिव्येकादश स्थ पृथिव्यामध्येकादश स्थ ।**
**अप्सुक्षितो महिनैकादश स्थ ते देवासो यज्ञमिमं जुषध्वम्**
**॥ ११ ॥ ४ ॥ २० ॥**

ये । देवासः । दिवि । एकादश । स्थ । पृथिव्याम् । अधि । एकादश । स्थ ।
अप्सुऽक्षितः । महिना । एकादश । स्थ । ते । देवासः । यज्ञम् । इमम् । जुषध्वम् ॥ ११ ॥ ४ ॥ २० ॥

---

बृहस्पतिरूपो होतास्माकं यज्ञं निष्पाद्य देवांस्तर्पयतु । ते च तस्य सोमपानेन प्रसादिताः सन्त उदारा देवा अस्मभ्यं मेघोदकानि तथा गृहादीनि धनानि ददत्विति भावः ॥

अररिन्दानि । उदकनामैतत् । ...... । वृष्टिलक्षणान्युदकानि त्मना आत्मना धारयत् । धारयति । इत्यादि सायणाचार्याः ॥

---

## भाषायाम्.

११. हे देवासः (=देवाः), ये [ यूयं ] दिवि (=द्युलोके ) [महिना=महिम्ना] एकादश स्थ, [ ये ] पृथिव्याम् अधि (=भूलोके ) [ महिना=महिम्ना ] एकादश स्थ, [ अपि च ] [ ये ] महिना ( =महिम्ना=महत्त्वेन ) अप्सुक्षितः ( =अन्तरिक्षनिवासिन ) एकादश स्थ, ते [ सर्वे मिलित्वा ] इमम् [ अस्माकं ] यज्ञं जुषध्वं ( =सेवध्वं=संभजध्वम् ) ॥

---

चालवो. त्याणें यज्ञ चालविला म्हणजे देव आम्हांला धनसंपत्ति देतील. बृहस्पति येओ आणि यज्ञ चालवो असें आम्ही म्हणतों, यांत कांहीं विशेष नाहीं; कारण तो देव तें काम नित्य करीत असतोच, तें असें:-तो फार मादकारी सोम काढितो आणि यजन करीत असतो. तो असें करूं लागला म्हणजे त्याच्यांचा ध्वनि दूरपर्यंत पोंहचतो आणि जनांच्या कानांवर पडतो. आणि मग तो मेघोदकें आणि अनेक घरें मनुष्यांकरितां आपल्या यजनाच्या योगानें संपादन करून देतो' असा भावार्थ दिसतो.

'बृहस्पति.' स्तोत्र आणि स्तोत्र उच्चारून जें यजनकर्म करावयाचें असतें, त्याची अभिमानिनी जी देवता, म्हणजे तद्रूपच जो देव, तो 'बृहस्पति.' तेव्हां त्याणें येऊन यज्ञ चालवावा, मग देव प्रसन्न होतील अशी प्रार्थना करणें साहजिक

११. हे देव हो, तुम्ही जे द्युलोकीं अकराजण [ मोठेपणानें ] राहत आहां, [आणि] पृथिवीवर अकराजण [ मोठेपणानें ] राहत आहां, [आणि ] अंतरिक्षांत वास करणारे अकराजण मोठेपणानें राहत आहां, ते तुम्ही, हे देव हो, हा [आमचा] यज्ञ मान्य करून घ्या.

11. Ye, O gods, that are eleven [ with majesty ] in heaven, are eleven [ with majesty ] on earth, [ and ] live eleven [of you] with majesty in the firmament, do ye, O gods, enjoy this sacrifice.

आहे. सू. १४ मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

'पुष्कळ घरें घेतो '=' पुरू सद्मानि अधारयत्.' म्हणजे उपासकांकरितां पुष्कळ घरें मिळवून देतो, असा भावार्थ दिसतो.

वृत्राकरितां 'वार्य 'च्या ठिकाणी 'वारिअं ' असें म्हणावें.

११. हा येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. ' हे देव हो, तुम्ही सर्व मोठे आहां; तुम्हांतून जे अकराजण द्युलोकीं राहतात, जे अकराजण पृथिवीवर राहतात, आणि जे अकराजण अंतरिक्षांत वास करितात, ते सर्वजण मिळून तुम्ही आज हा आमचा यज्ञ मान्य करून घ्या'.

याप्रमाणें तेहतीस देवांविषयीं ही ऋचा आहे. आणि त्यांतून तीन भाग असून अकरा पृथिवीवर, अकरा अंतरिक्षांत, आणि अकरा द्युलोकांत याप्रमाणें राहतात.

सू. ३४ मं. ११ यांतहि देव तेहतीस आहेत असें सांगितलें आहे ( आ नासत्या त्रिभिरेकादशैरिह देवेभिर्यातं मधुपेयमश्विना ).

सू. ४५ मं. २ यांतहि देव तेहतीस आहेत असें सांगितलें आहे. ( त्याजवरील टीप पहा ).

ऋ. ३. ६. ९ यांत 'पत्नीवन्तस्त्रिंशतं त्रींश्च देवान्...आ वह'(='हे अग्नी, तेहतीस देवाला त्यांच्या पत्न्यांसहित आण )' असें म्हटलें आहे.

ऋ. ८.२८. १ यांत 'ये त्रिंशति त्रयस्परो देवासो बर्हिरासदन् '=' जे तीस आणि तीन देव आमच्या कुशासनावर बसले ' असें म्हटलें आहे. शिवाय ऋ. ८. ३०. २ ( ये स्थ त्रयश्च त्रिंशच्च ), ऋ. ८. ३५. ३, ९. ९२. ४, हेहि मंत्र पहा.

हे मूळचे तेहतीस देव प्रथम असतां त्यांचे वेदोत्तरकालीन ग्रंथांत, म्हणजे पुराणादिकांत तेहतीस कोटी केले, तेव्हां या अशा संबंधानें पाहिलें असतांहि पुराणांच्या अत्यंत अतिशयोक्तीचेंहि बीज

## सूक्तम् १४०.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । अन्त्ये त्रिष्टुभौ । दशमी त्रिष्टुब् जगती वा । शिष्टं सूक्तं जागतम् ।

**वेदिषदे प्रियधामाय सुद्युते धासिमिव प्र भरा योनिमग्नये ।**
**वस्त्रेणेव वासया मन्मना शुचिं ज्योतीरथं शुक्रवर्णं तमोहनम् ॥ १**

वेदिऽसदे । प्रियऽधामाय । सुऽद्युते । धासिम्ऽइव । प्र । भर । योनिम् । अग्नये ।
वस्त्रेणऽइव । वासय । मन्मना । शुचिम् । ज्योतिःऽरथम् । शुक्रऽवर्णम् । तमःऽहनम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे अध्वर्यो ], वेदिषदे ( =वेद्यां सीदते ) प्रियधामाय ( =प्रियधाम्ने=नित्यं प्रियस्थानासीनाय ) सुद्युते ( =शोभनं यथा तथा द्योतमानाय ) अग्नये धासिमिव ( =हविर्लक्षणमन्नमिव ) योनिं ( =वेद्याख्यं स्थानम् ) आ भर ( =प्रहर=प्रयच्छ ) । [ अपि च ] शुचिं ( =शुद्धं ) ज्योतीरथं ( =ज्योतिरेव रथो यस्य तं ) शुक्रवर्णं ( =दीप्तवर्णं ) तमोहनम् ( =अन्धकारस्य हन्तारं ) [ तमग्निं ] वस्त्रेणेव मन्मना वासय ( =स्तोत्रेणाच्छादय ) ॥

प्रियधामाय प्रियधाम्ने प्रियस्थानायोत्तरवेदिलक्षणप्रियाय......वासय ।...वस्त्रेण यथा गोपनीयं वस्तु गोपयन्ति तद्वत्तमग्निं वासय । निवासय स्थापय । मन्मना मननीयेन हृद्येन वस्त्रसदृशेन मृदुकाष्ठादिनाच्छादय वा । कीदृशम् । ज्योतीरथम् । दीप्तिरथोपेतम् । इति सायणः ॥

---

वेदांत आहे असें म्हटल्यास चिंता नाहीं. सू. ३४ मं. ११ याजवरील टीप पहा.

‘ अंतरिक्षांत वास करणारे ’=‘ अप्सुक्षितः.’ अक्षरशः ‘उदकांत वास करणारे.’ मेघोदकें बाष्परूपानें ज्यांत असतात ते प्रदेश, म्हणजे अंतरिक्ष प्रदेश, अथवा अंतरिक्षच; त्यालाहि ‘ अपः ’ अथवा ‘उदकें’ अशीच संज्ञा वेदांत आहे. आधुनिक काळीं स्वर्ग, पृथिवी आणि पाताळ असें जें त्रैलोक्य प्रसिद्ध आहे, त्यांतून उदकमय जें पाताळ म्हणजे भूमीखालचा लोक, तो वेदांत नाहीं. वेदांत सांगितलेला जो उदकबाष्पमय अंतरिक्षलोक, त्यापासून आधुनिक पाताळ, पुराणकर्त्यांनीं रचिला असावा.

हा शेवटचा मंत्र श्राद्धसंकल्पांत अ-

## सूक्त १४०.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—जगती, मात्र शेवटच्या दोन ऋचा त्रिष्टुभ्, दहावी त्रिष्टुभ् अथवा जगती.

१. वेदीवर बसणारा, त्याला जें प्रिय स्थान तसल्या स्थानावर आरूढ होणारा, [आणि] फार प्रकाशणारा [जो] अग्नि, [त्या]ला हवीप्रमाणें आसन आणून दे. शुचिर्भूत, ज्योतीरथ, शुभ्रवर्णाचा, [आणि] अंधकाराचा नाश करणारा [जो अग्नि, त्या]ला वस्त्रानें [आच्छादिल्या]प्रमाणें स्तोत्रानें आच्छाद.

## HYMN 140.

To *Agni*. By *Dîrghatamas*, the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*, except verses 12 and 13 where it is *Trishṭubh*; verse 10 is either in the *Jagatî* or the *Trishṭubh*.

1. Offer a seat as well as oblation to Agni, who sits on the altar, who is given the seat that he loves, who is very brilliant. Clothe him with a hymn as with a garment—[him] who is bright, whose chariot is his flame, who is of brilliant colour, [and] who destroys darkness.

ग्निवेदनाच्या वेळीं म्हणतात.

या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे. दुसऱ्या पादांत 'पृथिविआम् अधि एकादश' असें वाचावें लागतें.

१. आतां परुच्छेपाचीं सूक्तें संपून दीर्घतमा या ऋषीचीं लागलीं. तीं पुढें १६४ व्या सूक्तापर्यंत चालतील.

या पहिल्या मंत्रांत ऋषि आपल्या जवळ उभा असलेल्या अध्वर्यूला अथवा त्यासारिख्याच दुसऱ्या कोणा तरी मनुष्याला बोलत आहे. 'हे मित्रा, ज्या अग्नीला, आवडतें तेंच वेदिरूप स्थान नित्य जन देत असतात, त्याला तूं हवि आणि वेदिरूप आसन दे. आणि ज्योति हाच ज्याचा रथ, आणि जो तेजःपुञ्ज असा होय त्या अग्नीला, वस्त्रानें प्रावरण घातल्याप्रमाणें स्तोत्रानें प्रावरण घाल.'

'हवीप्रमाणें आसन'='धासिमिव योनिम्.' म्हणजे हवि आणि आसन असें समजलें पाहिजे.

या आणि पुढल्या चोवीस सूक्तांचा ऋषि जो 'दीर्घतमा' ऋषि, तो उचथ्याचा पुत्र असें अनुक्रमणिकेस अनुसरून वर सांगितलें आहे; पण पुत्र म्हणजे मुलगाच असें समजणें अवश्य नाहीं, अपत्य अथवा त्या कुळांत जन्मलेला इ-

अभि द्विजन्मा त्रिवृदन्नमृज्यते संवत्सरे वावृधे जग्धमी पुनः ।
अन्यस्यासा जिह्वया जेन्यो वृषा न्य१न्येन वनिनो मृष्ट वारणः २

अभि । द्विऽजन्मा । त्रिऽवृत् । अन्नम् । ऋज्यते । संवत्सरे । ववृधे । जग्धम् । ईम् इति । पुनरिति ।
अन्यस्य । आसा । जिह्वया । जेन्यः । वृषा । नि । अन्येन । वनिनः । मृष्ट । वारणः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. द्विजन्मा ( =द्वयोर्द्यावापृथिव्योर्जातं ) त्रिवृत् ( त्रिप्रकारम् ) अन्नम् अभि ऋज्यते ( =प्राप्नोति ) । संवत्सरे ( =संवत्सरे पूर्णे ) जग्धं ( =भक्षितम् ) ईम् (=एतदन्नं ) पुनः ( =पुनरपि ) वावृधे ( =वर्धयति ) । अन्यस्य ( =अग्नेः=एकस्याग्नेः ) आसा ( =आस्ना=मुखेन ) जिह्वया [ च ] जेन्यो वृषा ( =श्रेष्ठो वीरो ) [ भवति ] अन्येन ( =दावाग्निना च=दावाग्निरूपेण च ) वारणः ( =प्रबलः सोऽग्निः ) वनिनः ( =वृक्षान् ) नि मृष्ट ( =निमार्ष्टि=दहति ) ॥

द्विजन्मा । द्वाभ्यामरणीभ्यां जायमानत्वात् । यद्वा मथनेनाधानसंस्कारेण चोत्पन्नत्वाद् द्विजन्मत्वम् । ...... त्रिवृदन्नमाज्यपुरोडाशसोमरूपेण त्रिप्रकारमन्नमदनीयमभि ऋज्यते । प्राप्नोति । ...... पुनर्ववृधे । अग्निर्वर्धयति । जीर्णस्य पुनर्वृद्ध्यभावाद्यजमानं हविर्वृद्ध्या प्रतिसंवत्सरं यागसमर्थं करोतीत्यर्थः । ...... किंचायमग्निर्वृषा वर्षकः सन् अन्यस्य हविष आसा आस्येन जिह्वया जेन्यः प्रभूतो भवतीति शेषः । यद्वा वर्षिता सन् एकेन रूपेणान्यस्य यज्ञे होत्रादेर्जिह्वया तदुपलक्षितया स्रुचा जेन्यो प्रवृद्धो भवति । तथान्येन दावाग्निरूपेण वारणः सर्वेषां वारकः सन् वनिनो वनसंबन्धिनो वृक्षान्निमृष्ट । निमार्ष्टि । दहतीत्यर्थः । इति सायणः ॥

तर्केंच विवक्षित असेल. 'दीर्घतमा' यात्रें आडनांव 'औचथ्य' म्हणजे 'उचथ्या'चा पुत्र अथवा वंशज, असें आहे. या दीर्घतमा ऋषीचीं येथें सांगितलेली पंचवीस सूक्तें ऋग्वेदांत आहेत, त्याशिवाय दुसरीं नाहींत. पूर्वी जो कक्षीवान् ऋषि सांगितला आहे (सू. ११६-१२५), तो याच दीर्घतमा ऋषीचा पुत्र असावा. दीर्घतमा ऋषीला 'मामतेय' म्हणजे 'ममता' या नांवाचा स्त्रीचा पुत्र असेंहि नांव आहे.(सू. १५८ मं. ६ ).

२. दोघांपासून जन्मलेल्या अग्नीला त्रिगुण अन्न प्राप्त होतें. खाल्लेलें अन्न एक वर्षांत पुनः तो वाढवितो. तो एका [विस्तवा]च्या तोंडानें आणि जिभेनें उत्तम सामर्थ्यवान् होतो, आणि तो प्रबळ अग्नि दुसऱ्या विस्तवाच्या योगेंकरून वनवृक्ष जाळून टाकितो.

2. Agni born of the two obtains the three-fold food. He augments again in a year the food eaten. He becomes a noble hero through the mouth and tongue of one [fire]—and powerful [Agni] burns down the forest-trees through another.

---

२. 'विजेच्या रूपानें द्युलोकीं जन्मणारा, आणि विस्तवाच्या रूपानें पृथिवीवर जन्मणारा जो अग्नि, त्याला तीन प्रकारचें अन्न प्राप्त होतें तें तो खातो, आणि तें खाल्लेलें अन्न पुनः एक वर्षांत तो वाढवितो. तो एका रूपानें (म्हणजे यज्ञांत पेटविला जातो त्या रूपानें) हविरन्न भक्षून भजकांला साहाय्य करणारा सामर्थ्यवान् वीर होतो; आणि दुसऱ्या रूपानें, म्हणजे दावानलरूपानें अरण्यांतील वृक्ष जाळून टाकितो.'

'दोघांपासून जन्मलेल्या'=' द्विजन्मा.' म्हणजे आकाश आणि पृथिवी या दोहोंत जन्मलेला. म्हणजे विजेच्या रूपानें आकाशांत आणि विस्तवाच्या रूपानें पृथिवीवर. सू. ६० मं. १ व टीप पहा. अथवा 'अरणी' नांवाच्या ज्या लांकडांत अग्नि मंथून काढीत, त्या दोघींपासून उत्पन्न झालेला. हाच अर्थ अधिक संभाव्य दिसतो. पुढच्या ऋचेंत जें अग्नीच्या दोघां आईबापांविषयीं सांगितलें आहे, त्यावरून 'दोघांपासून जन्मलेला' म्हणजे 'दोन्ही अरणींपासून जन्मलेला' हाच अर्थ येथें विशेष ग्रहणीय दिसतो.

'त्रिगुण अन्न'=' त्रिवृत् अन्नम्.' म्हणजे तीन प्रकारचें अन्न. सायण म्हणतात, पुरोडाश, आज्य (तूप) आणि सोम हीं जीं तीन प्रकारचीं अन्नें, तीं त्रिगुण अन्नें होत.

'खाल्लेलें अन्न पुनः तो वाढवितो'= 'ववृधे जग्धं पुनः.' याचा अभिप्राय नीट समजत नाहीं. अग्नीला जसजसें हवीच्या रूपानें अन्न खावयाला घालावें, तसतसें तो वार्षिक पिकाच्या रूपानें वाढवून यजमानाला देतो, असा भावार्थ असावा.

वृनासाठीं 'जेन्यों'च्या ठिकाणीं 'जेनिओ' असें म्हणावें, आणि चवथा चरण पदपाठांत आहे तसा म्हणावा.

कृष्णप्रुतौ वेविजे अस्य सक्षिता उभा तरेते अभि मातरा शिशुम् ।
प्राचाजिह्वं ध्वसयन्तं तृषुच्युतमा साच्यं कुपयं वर्धनं पितुः ॥ ३ ॥

कृष्णऽप्रुतौ । वेविजे इति । अस्य । सऽक्षितौ । उभा । तरेते इति । अभि । मातरा । शिशुम् ।
प्राचाऽजिह्वम् । ध्वसयन्तम् । तृषुऽच्युतम् । आ । साच्यम् । कुपयम् । वर्धनम् । पितुः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. अस्य [ अग्निरूपस्य शिशोः ] कृष्णप्रुतौ (=मथनोपक्रमेऽग्निसंपर्कात्कृष्णवर्णतां प्राप्नुवत्यौ ) वेविजे ( =भीते ) सक्षितौ ( =समाननिवासे ) उभा ( ?=उभे ) मातरा ( =मातरौ=उभे अप्यरण्यौ ) प्राचाजिह्वं ( =प्राग्देशस्थितं जिह्वास्थानीयज्वालं ) ध्वसयन्तं ( =तमो निवारयन्तं ) तृषुच्युतम् ( =अरणीभ्यां क्षिप्रं निर्गच्छन्तम् ) आ साच्यं ( =समवेतव्यं च ) कुपयं ( =गोपनीयं ) पितुर्वर्धनं ( =पितृस्थानीयस्य यजमानस्य वर्धयितारं ) शिशुं ( =बालम्=एतम् अग्निम् ) अभि तरेते ( =आभिमुख्येन प्राप्नुतः ) ॥

इमां प्रायोदुर्बोधामृचं सायण एवं व्याख्यातवान् । अस्याग्नेर्मातरा मातृस्थानीये उत्पादयित्र्यावुभा उभे अरण्याख्ये मातरौ वेविजे । चलतः । ओविजी भयचालनयोः । अस्माद्यङ्लुगन्तात् व्यत्ययेनात्मनेपदमेकवचनं च । लोपस्त आत्मनेपदेष्विति तलोपः । चादिलोपे विभाषेति निघाताभावः । मथनोपक्रमे कृष्णप्रुतावग्निसंपर्कात्कृष्णवर्णतां प्राप्नुवत्यौ प्रापयन्त्यौ वा भूमिम् । तथा सक्षितौ समानकार्यमग्न्युत्पादनं गच्छन्त्यौ । एवंभूते मातरौ शिशुं शिशुवदुत्पत्तिसमयेऽत्यल्पमग्निमभितरेते । आभिमुख्येन प्राप्नुतश्च । कीदृशं शिशुम् । प्राचाजिह्वम् । प्राग्देशस्थितजिह्वास्थानीयज्वालम् । ध्वसयन्तम् । तमो नाशयन्तम् । तृषुच्युतम् । अरणीभ्यां क्षिप्रं निर्गच्छन्तम् । अक्लेशेन योनेः सकाशात् शीघ्रमुत्पद्यमानम् । आ ईषत् साच्यं समवेतव्यं मृदुकाष्ठचूर्णादिना । कुपयं गोपनीयं पितुः पालकस्य यजमानस्य वर्धनं प्रवर्धनं प्रवर्धयितारम् । उक्तप्रकारैर्लौकिकशिशुसाधारणैरूपेतं शिशुमग्निं मातरावुत्पादयत इत्यर्थः । इति

३. याचे काळे झालेले, भ्यालेले, एकमेकांस चिकटून राहणारे दोघेहि आईबाप या मुलाजवळ येतात; जो पूर्वेकडेस जिह्वा टाकणारा, चपळ उड्या मारणारा, आणि सहवासाला योग्य, गोपन करण्यास योग्य, [आणि] पित्याचा उत्कर्ष करणारा [आहे].

3. Both the parents of this boy,—both darkened, frightened, living close to each other, approach him,— the boy who throws out his tongue towards the east, removes darkness, bounds about quickly, sociable, fit to be protected and a bringer of joy to his father.

---

३. हीहि ऋचा फार दुर्बोध आहे. इजमध्यें तात्पर्य इतकें दिसतें कीं, 'अग्नीचीं आईबापें होत अशा ज्या अरणी त्यांच्या पोटांतून अग्नि झटकन् उडी मारून बाहेर पडल्याबरोबर त्यांस त्याची भीति उत्पन्न होते, तथापि त्याची काळजी घेण्याकरितां म्हणून आणि त्याचें लालन करण्याकरितां म्हणून त्या त्याजजवळ येतात.' परंतु यांतील बहुतेक अग्नीचीं आणि अरणींची विशेषणें दुर्बोध आहेत. त्यांविषयीं पुढें पहा.

'काळे झालेले'=' कृष्णप्रुतौ.' म्हणजे सायणाचार्य म्हणतात कीं, अग्नीच्या जन्मामुळें ज्यांत रंग काळा झाला आहे. दुसरे प्रयोग नाहींत.

'भ्यालेले'=' वेविजे.' 'वेविजे' हें 'वेविज' शब्दाचें स्त्रीलिंगी प्रथमेचें द्विवचन समजून अर्थ केला आहे. सायणांनीं द्विवचनी क्रियापद घेतलें आहे. क्रियापद घ्यावें तर तें एकवचनी आहे. विशेषण घ्यावें तर तें स्त्रीलिंगी होऊन 'उभा' हें पुंल्लिंगी आहे. अशा रीतीनें दोहींकडून अडचणच आहे.

'एकमेकांस चिकटून राहणारे'= 'सक्षितौ.' याचींहि प्रयोगान्तरें नाहींत. अरणी ह्या स्वभावतः एकत्र राहणाऱ्या होत. कारण जसा पाटा वरवंटा, तशा अरण्या परस्पर संबद्ध होत.

'पूर्वेकडेस जिव्हा टाकणारा'='प्राचाजिह्वम्.' याविषयींहि दुसरे प्रयोग नाहींत. पूर्वेकडे अग्नीला पेटविल्यामुळें हें विशेषण लाविलें आहे.

'गोपन करण्यास योग्य'= 'कुपयम्.' हा शब्द वेदांत पुनः आलेला नाहीं. आम्हीं सायणानुसारें अर्थ केला आहे. 'ज्याचें प्रतिपालन केलें पाहिजे तो' असा भावार्थ दिसतो.

'पित्याचा उत्कर्ष करणारा'=' पितुर्वर्धनम्.' म्हणजे यजमान अग्नीला खावयास आणि प्यावयास देतो म्हणून तो त्याचा बाप होय; आणि अग्नि त्याचें कल्याण करितो म्हणून तो त्याचा उ-

**मुमुक्ष्वो३ मनवे मानवस्यते रघुद्रुवः कृष्णसीतास ऊ जुवः ।**
**असमना अजिरासो रघुष्यदो वातजूता उप युज्यन्त आशवः ॥४॥**

मुमुक्ष्वः । मनवे । मानवस्यते । रघुऽद्रुवः । कृष्णऽसीतासः । ऊं इति । जुवः ।
असमनाः । अजिरासः । रघुऽस्यदः । वातऽजूताः । उप । युज्यन्ते । आशवः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. मुमुक्ष्वः ( बन्धनान्मुक्तिम् इच्छन्तो ) रघुद्रुवः ( =क्षिप्रं गच्छन्तः ) कृष्णसीतासः ( =कृष्णसीताः=कृष्णमार्गा ) ऊ ( =उत=अपि च ) जुवः ( =जवनशीला ) असमनाः ( =भिन्नभिन्नदिङ्मुखा ) अजिरासः ( =अजिराः=गमनशीला ) रघुष्यदः ( =क्षिप्रगमना ) वातजूताः ( =वायुप्रेरिता ) आशवः ( =अश्वा ) मानवस्यते मनवे (=मनुष्यान् आत्मन इच्छते भक्ताय=तदर्थम्) उप युज्यन्ते (=अग्निरथे नियुज्यन्ते)॥

असमनाः । असमानमनस्काः । काश्चन [ ज्वालाः ] प्राङ्मुख्यो गच्छन्ति । काश्चन प्रत्यङ्मुख्य इति विविधमनस्काः । व्यत्ययेनैकवचनम् । यद्वा असमना भिन्नवर्णाः । भिन्नवर्णत्वं च तत्रैव श्रूयते । काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सधूम्रवर्णा स्फुलिङ्गिनी विश्वभुवी च देवी लेलायमाना इति सप्त जिह्वा इति । इति सायणः॥

४. मोकळे होण्याविषयीं इच्छा करणारे, सहज धांवणारे, काळ्या मार्गानें चालणारे, आणि वेगवंत, अनेक दिशांकडे तोंडें असलेले, चपळ, सत्वर धांवणारे, [आणि] वातवेगी [असे] [अग्नीचे] वारू मनुष्यप्रिय यजमानासाठीं रथाला जोडिले जातात.

4. Agni's horses, desirous of being let go, running swiftly, leaving a dark track behind them as they go, swift, with faces turned in different directions, quick in motion, lightly flying, [and] propelled by the wind, are harnessed [to the chariot] for the sake of the worshipper, who loves men.

त्कर्ष करणारा होय असें म्हटलें आहे असें जें सायणांनीं सांगितलें आहे. त्याप्रमाणें समजणें अवश्य आहे.

एकंदरींत ही ऋचा अति कठिण आहे.

छंदासाठीं चवथ्या चरणांत 'साच्यं'च्या ठिकाणीं 'साचिअं' असें वाचावें लागतें.

४. अग्नीच्या ज्या ज्वाला, अथवा त्याचे जे स्फुलिंग, तेच कोणीएक घोडे कल्पून ते घोडे अग्नीला भक्ताकडेस घेऊन येतात असें या ऋचेंत सांगितलें आहे. वरच्या मंत्राप्रमाणेंच यांत पुष्कळ विशेषणें आहेत. आणि तीं 'चपळ' आणि 'सत्वर धांवणारे' या अर्थाचीं प्रायः आहेत.

'मोकळे होण्यासाठीं इच्छा करणारे'='मुमुक्ष्वः.' म्हणजे, उंचा घोडा असला म्हणजे त्याला रथाला जोडिल्याबरोबर तो धांवण्यास पाहतो, तसे हे अग्नीचे घोडे रथास जोडिले जाऊन सत्वर धांवण्याविषयीं उतावीळ होणारे असें तात्पर्य आहे.

'काळ्या मार्गानें चालणारे'='कृष्णसीतासः.' म्हणजे अग्नि अथवा अग्नीचे घोडे—म्हणजे त्याच्या ज्वाळा, ज्या मार्गानें जातील तेथील गवत वगैरे जळून जातें, आणि तितका मार्ग काळा होत असतो. म्हणून अग्नीला 'कृष्णपथ' असें नांव पडलें आहे.

'अनेक दिशांकडे तोंडें असलेले'—'असमनाः.' म्हणजे अग्नीच्या कितीएक ज्वाळा अथवा त्याचे स्फुलिंग पूर्वाभिमुख असतात, कितीएक पश्चिमाभिमुख असतात, आणि कितीएक दुसरीकडेस तोंड असल्याप्रमाणें दिसतात, असा अभिप्राय.

'वातवेगी'='वातजूताः.' म्हणजे वाऱ्याप्रमाणें वेगवंत. अक्षरशः अर्थ 'वायूनें प्रेरित,' वारा ज्यांस ढकलून देतो अथवा हाकतो असे.

'मनुष्यप्रिय यजमानासाठीं'='मानवश्रुते मनवे.' अक्षरशः 'मनुष्यांचा

**आदस्य ते ध्वसयन्तो वृथेरते कृष्णमभ्वं महि वर्पः करिक्रतः ।**
**यत्सीं महीमवनिं प्राभि मर्मृशदभिश्वसन्स्तनयन्नेति नानदत् ॥५॥५**

आत् । अस्य । ते । ध्वसयन्तः । वृथा । ईरते । कृष्णम् । अभ्वम् । महि । वर्पः । करिक्रतः ।

यत् । सीम् । महीम् । अवनिम् । प्र । अभि । मर्मृशत् । अभिऽश्वसन् । स्तनयन् । एति । नानदत् ॥ ९ ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. यत् सा (=यदा खलु) [अग्निर्] महीम् अवनिं (=महतीं पृथिवीम्) अभि मर्मृशत् (=अभितः पुनःपुनरामृशत्) अभिश्वसन् (=अभितः श्वासध्वनिं कुर्वन्) स्तनयन् (=भुगुभुगुध्वनिं कुर्वन्) नानदत् (=ततोपि च महान्तं ध्वनिं कुर्वन्) एति (=गच्छति), आत् (=तदानीम्) अस्य (=तस्य) ध्वसयन्तः (?="तमांसि ध्वसयन्तस्") ते (=अश्वाः) कृष्णं (=कृष्णवर्णम्) अभ्वम् (=अभिभवद्गमनमार्गे) महि (=महत्) वर्पः (=रूपं) करिक्रतः (=अतिशयेन प्रादुर्भावयन्तः सन्तो) वृथा ईरते (=अनायासेनेतस्ततो गच्छन्ति) ॥

आदनन्तरमस्य स्तूयमानस्याग्नेस्ते प्रसिद्धा विस्फुलिङ्गा वृथा सहैवेरते । सर्वतो गच्छन्ति । ...... अभिश्वसन् सर्वतश्चेष्टमानः । ...... यदेतस्ततो जिह्वाभिर्लेलिहानो भुगुभुगुध्वनिं कुर्वन् ज्वलति तदैव विस्फुलिङ्गा उद्भवन्तीत्यर्थः । इति सायणः॥

---

इच्छा करणारा जो मानवी यजमान, त्यासाठीं ' असा अर्थ. हें विशेषण ऋषि आपल्या यजमानविशेषाला, म्हणजे एका व्यक्तीला अनुलक्षून जर लावीत असेल, तर ' ज्याला मनुष्यांची आवड आहे अशा ह्या आमच्या यजमानासाठीं ' अशा अर्थी विशेषण चांगलें जुळतें, पण जर तसें नसून साधारण यजमानाविषयीं असेल, तर मात्र या विशेषणाचें प्रयोजन स्पष्ट समजत नाहीं.

वृत्नासाठीं ' मुमुक्षवो ' असें वाचावें.

५. जेव्हां तो पृथिवीला चाटीत चाटीत [ आणि ] फुसफुसत [ आणि ] भुगुभुगु असा ध्वनि करीत [ आणि ] गर्जना करीत करीत जातो, तेव्हां त्याचे ते तमोनाशक [ घोडे ] [ आपलें ] काळें, भयंकर [आणि] मोठें रूप प्रगट करीत करीत सहज उडून जात असतात.

5. When [ Agni ] goes touching [ and ] licking the great earth, [and] hissing, rattling, [and] rumbling, then those his [horses], the destroyers of darkness, easily fly about, exhibiting their black, terrific [ and ] great form.

५. 'जेव्हां अग्नि मार्गाला चाटीत चाटीत जणुं जातो, आणि जातांना प्रथम थोडा, मग जरा अधिक, मग त्याहून अधिक असा नाद करीत करीत चालतो, तेव्हां त्याचे विस्फुलिंगरूप घोडे आपलें मोठें आणि भयंकर स्वरूप प्रगट करीत करीत इकडे तिकडे उडतात, आणि अंधकार नाहींसा करितात' असा भावार्थ आहे.

'पृथिवीला'='महीम् अवनिम्.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. कितीएक विद्वान् 'प्रवाह' असा अर्थ करितात. त्यावरून 'मार्ग' असा अर्थ संभवतो.

'तमोनाशक'='ध्वसयन्तः.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. परंतु 'तमः' शब्द यांत नाहीं त्यावरून अर्थाविषयीं संशय आहे. कितीएक (पाश्चात्य विद्वान् 'फेकणारे' अथवा 'फेकल्याप्रमाणें उडणारे') असा अर्थ करितात.

**भूषन्न योऽधि बभ्रूषु नम्नते वृषेव पत्नीरभ्येति रोरुवत् ।**
**ओजायमानस्तन्वश्च शुम्भते भीमो न शृङ्गा दविधाव दुर्गृभिः॥६॥**

भूषन् । न । यः । अधि । बभ्रूषु । नम्नते । वृषाऽइव । पत्नीः ।
अभि । एति । रोरुवत् ।
ओजायमानः । तन्वः । च । शुम्भते । भीमः । न । शृङ्गा । दविधाव ।
दुःऽगृभिः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. यः [ अग्निर् ] भूषन् न ( =? आत्मानमलंकुर्वन्निव ) अधि बभ्रूषु (=बभ्रुवर्णास्वोषधीषु=काष्ठेषु ) नम्नते ( =प्रविशति ) । वृषेव पत्नीः ( =वृषा पत्नीर्यथा=वीर्यसेचनसमर्थो बलीवर्दो गाः प्रति यथा अभ्येति तथा) रोरुवद् अभि एति (=अत्यन्तं शब्दयन् ओषधीः प्रति गच्छति) । च (=अपि च) ओजायमानः (=स्वयं बलमिवाचरन्=स्वकीयं बलमाविष्कुर्वन्) तन्वः शुम्भते (=तनूः शोभयति स्वकीया ज्वालारूपा विभूतीरलंकरोति ) । भीमो [ मृगो ] न ( =भयंकरो मृग इव ) दुर्गृभिः ( =दुर्ग्रहः सन् ) शृङ्गा दविधाव ( =शृङ्गाणि अत्यन्तं चालयति ) ॥

यथा कश्चित्स्त्रीकामो वृषभोत्यन्तं शब्दयन् गाः प्रति गच्छति स्वकीये शृङ्गे च चालयन् ताभ्यां स्वबलमाविष्कुर्वन् दुर्ग्रहो भाति तथैवायं स्त्रीकाम इव बभ्रुवर्णा ओषधीः प्रति दुर्ग्रहः सन् गच्छतीति भावः ॥

सायण एवं व्याख्यातवान् । योग्निर्बभ्रूषु बभ्रुवर्णास्वोषधीषु भरणकुशलासु वा जगताम् अधि अधिकं नम्नते । नमति । काष्ठानि प्रविशति । ...... भूषन्न । भूतान्येव स्वतेजसा भूषयन्निव । ...... तन्वश्च शुम्भते । स्वशरीरभूता ज्वाला अपि दीपयति । पोषयतीत्यर्थः । किंच प्रवृद्धज्वालो दुर्गृभिः केनचिदपि ग्रहीतुमशक्यः सन् भीमो न भयंकरो मृग इव स यथा दुर्ग्रहः सन् शृङ्गं चालयति तद्वदयमपि शृङ्गाणि शृङ्गवदुन्नता ज्वाला दविधाव । अत्यर्थं चालयति । इति ॥

६. जो [अग्नि] [आपणास] अलंकृत जणुं करून सांवळ्या रंगाच्या [ओषधींच्या] आंगीं शिरतो. वांगर बैल गाईकडेस [धांवतो] तसा तो मोठ्यानें डुरकत धांवतो. तो आपलें मोठें बळ प्रगट करीत करीत आपलें शरीर शोभवितो. कोणींहि धरण्यास कठिण [असा हा अग्नि], भयंकर [सावजा] प्रमाणें, [आपलीं] शिंगें हालवितो.

6. And he, as if decorating himself, enters into the brown plants. He runs even as a bull towards the cows, lowing loudly. And proudly manifesting his strength he adorns his person. Like a terrific beast he violently shakes his horns.

---

६. हा मंत्र कठिण आहे. पण भावार्थ बहुतकरून उघड दिसतो. तो असाः—' जसा एकादा माजलेला पोळ मोठ्यानें डुरकत गाईंच्या आंगावर धांवतो, आणि आंगची मस्ती दाखविण्याकरितां शिंगें इकडून तिकडे जोरानें हालवितो, आणि त्याला कोणी धरूं म्हटलें तर कोणाच्याहि हातीं सांपडण्याजोगा नसतो, तसा अग्नि समिधांच्या आंगावर धांवतो आणि कोणासच जुमानीत नाहीं, तर एकदम माजलेल्या पोळाप्रमाणें त्यांच्या आंगावर जाऊन पडतो.' अग्नि लांकडें जाळतो त्याचें हें वर्णन आहे.

'[आपणास] अलंकृत जणुं करून'=' भूषन्न.' हें विशेषण कठीण आहे. सायणाचार्य 'भुवनाला शोभविणारा' अथवा 'शोभविणारा' असा अर्थ करितात. भूषन् याचें कर्म उक्त नाहीं, तें कोणतें अध्याहृत घ्यावयाचें इतकेंच विचार्य आहे.

' आपलें शरीर शोभवितो '=' तन्वः शुम्भते.' अक्षरशः अर्थ ' शरीरें शोभवितो.' म्हणजे शरीराच्या ठिकाणीं असणाऱ्या ज्या अग्नीच्या ज्वाळा, त्या शोभवितो.

' आपलीं शिंगें '=' शृङ्गा.' म्हणजे ज्वालांचे जे शेंडे वर दिसतात आणि शिंगांप्रमाणें हालतात, ते.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'बभुरूषु' आणि ' अभि एति ' असें दुसऱ्या पादांत आणि ' तनुअश्व ' असें तिसऱ्यांत म्हणावें लागतें.

**स संस्तिरो विष्टिरः सं गृभायति जानन्नेव जानतीर्नित्य आ शये ।**
**पुनर्वर्धन्ते अपि यन्ति देव्यमन्यद्वर्पः पित्रोः कृण्वते सचा ॥ ७ ॥**

सः । सम्ऽस्तिरः । विऽस्तिरः । सम् । गृभायति । जानन् । एव । जानतीः । नित्यः । आ । शये ।
पुनः । वर्धन्ते । अपि । यन्ति । देव्यम् । अन्यत् । वर्पः । पित्रोः । कृण्वते । सचा ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. सः (=अग्निः) संस्तिरः (=सहैव स्तीर्णाः=सहैव स्थिता) विस्तिरः (=विविधं स्तीर्णाः=भिन्नत्वेन स्थिता) [ज्वालाः] सं गृभायति (=संगृह्णाति)। जानन् एव (=ज्वाला जानन्नेव) जानतीः (=अग्निं जानतीर्) नित्यः (=अविच्छिन्नः सन्) आ शये (=आ शेते=ताभिः सह स्वपिति=शान्तो भवति)। [ताः] पुनर्वर्धन्ते (=मृताः सत्योपि परस्मिन्दिने पुनरपि वर्धन्ते) [अपि च] देव्यम् अपि यन्ति (=देवत्वं प्राप्नुवन्ति)। [तदनन्तरं] पित्रोः सचा (=पितृभ्यां सह=अग्नेः पित्रोर्द्यावापृथिव्योरुदितयोः सत्योर्) अन्यत् वर्पः (=तेजस्वि रूपम्=अन्यद्रूपं) कृण्वते (=आविष्कुर्वते)॥

पुनर्वर्धन्त इत्यादौ एवंभूतज्वालाः पुनः पूर्वं प्रवृद्धा एव पुनरपि यागयोग्या यथा भवन्ति तथा वर्धन्ते। देव्यं यागादिव्यवहारयोग्यं स्तुत्यं वा अग्निमपि यन्ति। प्राप्नुवन्ति। यद्यप्यग्निज्वालयोरेकत्वं तथापि राहोः शिर इतिवदौपचारिको गन्तृगन्तव्यभावः। किंच एवं प्रवृद्धा ज्वाला ओषधयो वा सचा अग्निना सह पित्रोर्जगत्पालयित्रोस्ताभ्यां संभूय द्यावापृथिव्योरन्यत्पूर्वमविद्यमानं तेजोमयं वर्पो रूपं कृण्वते। कुर्वन्ति। लोकद्वयं स्पृशन्तीत्यर्थः। इति सायणः॥

७. तो एकत्र पडून राहिलेल्या [आणि] निरनिराळ्या पडून राहिलेल्या [ज्वाळां]ला एकाच ठिकाणीं घेतो. ओळखीचा [अग्नि] ओळखीच्या [ज्वाळां]वर नित्य निजतो. त्या पुनः वाढतात. त्या देवत्वाप्रत पावतात. त्या आईबापांबरोबर दुसरें रूप प्रगट करितात.

7. He takes together [the flames]—that lie together [and the flames] that lie separate. He continually lies on them, an acquaintance with acquaintances. They grow again. They attain to divinity. They exhibit another form in company with the two parents.

७. ही सुद्धा ऋचा गूढार्थ आहे. भावार्थ असा दिसतो कीं, 'अग्नि ज्वाळांला, म्हणजे काष्ठांला, आपल्या हातांमध्यें घेतो आणि त्यांजवळ निजतो, मग त्या एकत्र असोत अथवा एकमेकींपासून दूर दूर निजलेल्या असोत. हा त्यांच्या ओळखीचा असतो आणि त्या ह्याच्या ओळखीच्या असतात. त्या ज्वाळा शांत झाल्यानंतर ज्वालारूपानेंच पुनः दुसऱ्या दिवशीं वृद्धिंगत होतात, आणि देवत्वाप्रत पावून अग्नीने आईबाप जे द्यावापृथिवी, त्यांजमध्यें आपलें तेजःपुंज स्वरूप प्रगट करितात.'

या ऋचेंत प्रथम अर्धांत ज्वाला ह्या अग्नीच्या स्त्रिया होत असें जाणविलें आहे. परंतु उत्तरार्धामध्यें ज्वालांविषयीं तसला निर्देश नसून त्या केवळ ज्वाळा होत असें जाणविलें आहे. आणि त्या अग्नि विझाल्यावर शांत होतात अथवा मरतात, आणि दुसरे दिवशीं अग्नीला पेटविलें म्हणजे त्याहि पुनः वाढतात, आणि पहांटेस पृथिवी आणि द्युलोक यांचा उदय होतांच आपलें दिव्यरूप प्रगट करितात. 'पित्रोः' यांजबरोबर 'अग्नीने' (अग्नेः) अशा अर्थाचा कांहींच शब्द नसतां 'द्यावापृथिवी' असा अर्थ घ्यावा लागतो ही अडचण आहे असें नाहीं. सर्व विश्वाचे आईबाप म्हणून द्यावापृथिवींस 'अमुकाचे' असें न म्हणतां) केवळ 'आईबाप' असें म्हणण्याची चाल वेदांत आहे. ऋ. १. १६४. ८ आणि त्याजवरील भाष्य पहा. पण ती अडचण दुर्निवार्य दिसत नाहीं.

'निरनिराळ्या पडून राहिलेल्या'= 'विष्टिरः.' सायणांनीं येथें 'संस्तिरः' आणि 'विष्टिरः' हीं अग्निशब्दाचीं पुंल्लिंगी एकवचनी विशेषणें केलीं आहेत, पण ऋ. २. १३. १० याजवरचें सायणभाष्य पाहिल्यावर आमचा अर्थ सप्रमाण आहे असें दिसून येईल.

'देवत्वाप्रत'='देव्यम्.' ऋ. ४.३६. १ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

एकंदरींत ही ऋचा दुर्बोध आहे यांत संशय नाहीं. परंतु पुढच्या ऋचे-

**तम॒ग्रुव॑: के॒शिनी॒: सं हि रे॑भि॒र ऊ॒र्ध्वास्त॑स्थुर्म॒म्रुषी॒: प्राय॑वे॒ पुन॑: ।**
**तासां॑ ज॒रां प्र॑मु॒ञ्चन्ने॑ति॒ नान॑दद॒सुं॒ परं॑ ज॒नय॑ञ्जी॒वमस्तृ॑तम् ॥८॥**

तम् । अ॒ग्रुव॑: । के॒शिनी॑: । सम् । हि । रे॒भि॒रे । ऊ॒र्ध्वा॑: । त॒स्थु॒: । म॒म्रु॒षी॑: । प्र । आ॒यवे॑ । पु॒नरिति॑ ।
तासा॑म् । ज॒राम् । प्र॒ऽमु॒ञ्चन् । ए॒ति॒ । नान॑दत् । असु॑म् । पर॑म् । ज॒नय॑न् । जी॒वम् । अस्तृ॑तम् ॥ ८ ॥

---

**भाषायाम्.**

८. केशिनीः (=केशिन्यः=दीर्घकेशोपेता ) अग्रुवः (=ज्वालारूपा युवतयस् तं सं रेभिरे हि (=अग्निमालिङ्गितवत्यो हि) । [ तदनन्तरं ] मम्रुषीः (=मम्रुष्यः=अङ्गारभावमापन्नास्) [ ता ] आयवे (=अग्नेरर्थं ) पुनः (=पुनरपि) ऊर्ध्वाः प्र तस्थुः (=ऊर्ध्वमुखा उन्नताः प्रतस्थिरे=उत्थाय तस्थुः ) । [ सोपि ] तासां जरां प्रमुञ्चन् (=तासां ज्वालानां वयोहानिमपहरन् ) [ अपि च ] परम् (=उत्कृष्टं ) जीवं (=जीवधारणसमर्थम् ) अस्तृतम् (=अहिंसितम्=अहिंसितव्यम्) असुं (=प्राणं) जनयन् (=पुनरपि तासूत्पादयन् ) नानदत् एति (=ध्वनिं पुनःपुनः कुर्वन्नेति=आगच्छति=भुगुभुगुध्वनिं कुर्वाणः पुनरप्यागत्य मृतासु तासु ज्वालारूपासु युवतिषु प्राणमुत्पाद्य ता अजराः करोति ) ॥

केशिनीः केशस्थानीयोर्ध्वभाविकार्ष्ण्योपेता ज्वालाः सं रेभिरे हि । परिरम्भं कुर्वन्ति खलु ।...... आयव आगच्छतेग्नये भर्त्रे पुनः स्वोपद्रवमजानत्य ऊर्ध्वाः प्रतस्थुः। ऊर्ध्वमुखा उन्नताः प्रतस्थिरे । मृतप्राया अपि प्रत्युत्थानं कृतवत्य इत्यर्थः । एवं कृतवतीषु सतीषु स भर्ताग्निस्तासां ज्वालानां जरां वयोहानिं प्रमुञ्चन् प्रकर्षेण मोचयन् नानदत् जरापरिहाराय मन्त्रयन्निवात्यर्थं शब्दयन् । ...... एति । गच्छति । तासां ज्वालानां संनिधिं प्राप्नोति । यथा लोके काश्चन रमण्यो रमणेन सह निर्भरं क्रीडित्वा पश्चात्प्रोषिते तस्मिन्विरहेण जीर्णा म्रियमाणाः पश्चात्तस्मिन्नागते सति स्वदौर्बल्यमगणयित्वा संतोषेण परिष्वङ्गाय चेष्टन्ते स भर्ता मन्त्रोच्चारणेन जरामपनीयोपचितप्रदानेन प्राणयन् रक्षतीत्ययं भावोत्रानुसंधेयः । इति सायणः ॥

---

वरून इचा भावार्थ उघड होतो.

वृत्तसुखार्थ ' देव्यं 'च्या ठिकाणी 'देविअं ' आणि ' पित्रोः'च्या स्थळीं 'पितरोः ' असें वाचलें पाहिजे.

८. त्याला त्या लंबकेशी तरुण स्त्रिया आलिंगन देतात. [आणि] त्या मेलेल्या स्त्रिया अग्नीकरितां पुन: उठून उभ्या राहतात. त्यांचें म्हातारपण घालवून [आणि] त्यांजमध्यें उत्तम, अक्षत, आणि सजीव प्राण उत्पन्न करून हा अग्नि ध्वनि करीत करीत येतो.

8. The long-haired damsels embraced him. [Then though] dead they stood erect again for Agni. Rumbling he comes, ridding them of [their] old age [and] creating [in them] an excellent, lively, [and] invincible breath.

८. 'अग्नीच्या ज्या ज्वाला, त्याच कोणीएक सुंदर आणि लांब केशांच्या स्त्रिया, त्या अग्नीला आलिंगन देतात, आणि म्हाताऱ्या होऊन मग मरतात. म्हणजे अग्नि शांत झाल्यावर मेल्यासारिख्या होतात. दुसऱ्या दिवशीं अग्नीला समिद्ध केलें म्हणजे तो त्यांला पुन: जीवंत करून त्यांस पुन: तरुण करितो' असा भावार्थ.

'पुन: उठून उभ्या राहतात'='पुन: ऊर्ध्वाः प्र तस्थुः.' म्हणजे अग्नि विझून गेला म्हणजे, ज्वाळा नाहींशा होऊन त्यांचे केवळ निखारे अथवा ऊन ऊन कोळसे किंवा राख राहते. त्याच अग्नीला दुसरे दिवशीं प्रदीप्त केलें म्हणजे त्याच ज्वाळा जणुं पुन: उठून उभ्या राहिल्याप्रमाणें दिसतात.

'ध्वनि करीत करीत येतो'='नानदत् एति.' सायणाचार्य मेलेल्या ज्या ज्वालारूप स्त्रिया, त्यांस उठविण्याकरितां मन्त्रध्वनि करीत करीत, असा अर्थ करितात. तो भाषेखालीं उतरून घेतलेला पहा.

**अधीवासं परि मातू रिहन्नह तुविग्रेभिः सत्वभिर्याति वि ज्रयः ।**
**वयो दधत्पद्वते रेरिहत्सदानु श्येनी सचते वर्तनीरह ॥ ९ ॥**

अधीवासम् । परि । मातुः । रिहन् । अह । तुविऽग्रेभिः । सत्वऽभिः ।
याति । वि । ज्रयः ।
वयः । दधत् । पत्ऽवते । रेरिहत् । सदा । अनु । श्येनी । सचते ।
वर्तनिः । अह ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. मातुः (=पृथिव्या) अधीवासम् (=उपर्याच्छादनस्थानीयं तृणगुल्मौषध्यादिकं) परि रिहन् (=परितो लिहन्) तुविग्रेभिः सत्वभिः (=प्रभूतं शब्दयद्भिः प्राणिभिः) [सह] ज्रयः वि याति अह (=आरण्यं स्थानं विभिद्य गच्छति=अरण्यसंबन्धिषु स्थानेषु मध्ये गच्छतीति प्रसिद्धम्)—सदा (=नित्यं) रेरिहत् (=अत्यर्थं लिहन्=दहन्) [तथा कृत्वा च] वयः पद्वते दधत् (=पादचारिभ्यः प्राणिभ्योऽन्नं ददत्) [याति] । श्येनी वर्तनिः (=कृष्णा पदवी) [तम्] अनु सचते अह (=अग्निमनुगच्छति=अग्नेः पश्चात्कृष्णपथस्तिष्ठतीति प्रसिद्धम्) ॥

दावाग्निः स्तूयते । ...... पद्वते पादवते द्विपदे चतुष्पदे च वयोन्नं तत्तदुचितं दधत् ददत् । विवने दावानले भीत्या पलायमानान् प्राणिनो व्याघ्रादयो भक्षयन्तीति प्रसिद्धम् । किं कुर्वन् । सदा सर्वदा तृणादिकं रेरिहत् दहन् । किंच श्येनी श्यामवर्णा वर्तनिर्मार्गो वियान्तमनु अनुक्रमेण सचते सेवते । यत्र यत्राग्निर्गच्छति तत्र तत्र मार्गोपि कृष्णो भवति । अहेति प्रसिद्धौ । इति सायणः ॥

९. आईचें प्रावरण चाटीत चाटीत [अग्नि] मोठ्यानें ओरडणाऱ्या प्राण्यांसह [अरण्य]प्रदेशामधून चालतो. [तो] नित्य चाटीत चाटीत जाऊन पादचारी [प्राण्यां]-ला अन्न देत देत [चालतो]. काळा मार्ग [ अग्नीच्या ] पाठीमागें नित्य राहतो.

9. He passes through tracts, as is well known, licking the garment of [ his ] mother [ and ] [ accompanied] by the loudly crying animals ; [ passes ] always licking violently [ and ] giving food to creatures moving on feet. A dark track, as is well known, follows [ him ].

९. वरच्या मंत्रांत वेदीवर घरीं नित्य पेटविला जाणाऱ्या अग्नीविषयीं सांगितलें. यांत दावाग्नीविषयीं, म्हणजे अरण्यांत जो वणवा पेटतो, त्याजविषयीं स्तुति आहे.

'अग्नीची आई जी पृथिवी, तिच्या आंगावरचें वस्त्र, म्हणजे गवत, झुडपें वगैरे जीं आहेत तीं जाळीत जाळीत तो जातो, आणि मोठ्या अरण्यप्रदेशांस विभागून जणुं चालतो. तो जसजसा जातो, तसतशीं अरण्यांतील श्वापदेंहि पळतात. तेव्हां व्याघ्रादिक प्राण्यांला अन्न पुष्कळ मिळतें. अग्नि ज्या ज्या मार्गानें जातो, तो तो मार्ग काळा होत असतो हें तर प्रसिद्ध आहे.'

'आईचें'=' मातुः.' द्यावापृथिवींला, म्हणजे द्युला आणि पृथिवीला अग्नीचीं आईबापें असें वेदांत म्हणतात. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् येथें आई म्हणजे 'अरणी,' कीं ज्यांत अग्नीला मंथून उत्पन्न करितात ती, असें समजतात; पण येथें सायणाचाच अर्थ अधिक योग्य दिसतो.

'चाटीत चाटीत'=' रिहन्.' म्हणजे जाळीत जाळीत.

'[ अरण्य]प्रदेशामधून' = ' विव्रयः.' 'व्रयः' शब्दाचा असा अर्थ सप्रमाण आहे अशाविषयीं ऋ. ६. ६. ६ आणि त्याजवरील सायणांचें भाष्य पहा.

'पादचारी प्राण्यांला'=' पद्वते.' म्हणजे व्याघ्रादिकांला असें सायणानुसारें समजणें आहे.

'उत्सर्जन' आणि 'उपाकर्म' अथवा 'श्रावणी' म्हणून जी करितात, त्यांत हा मंत्र म्हणतात.

**अस्माकमग्ने मघवत्सु दीदिह्यध श्वसीवान्वृषभो दमूनाः ।**
**अवास्या शिशुमतीरदीदेर्वर्मेव युत्सु परिजर्भुराणः ॥ १० ॥ ६ ॥**

अस्माकम् । अग्ने । मघवत्ऽसु । दीदिहि । अध । श्वसीवान् । वृषभः । दमूनाः ।
अवऽअस्य । शिशुऽमतीः । अदीदेः । वर्मऽइव । युत्ऽसु । परिऽजर्भुराणः ॥ १० ॥ ६ ॥

## भाषायाम्.

१०. हे अग्ने, अस्माकं मघवत्सु ( =यजमानेषु मध्ये=यजमानानां गृहेषु ) दीदिहि ( =प्रकाशस्व ) । अध ( =अथ=अनन्तरं ) श्वसीवान् ( =श्वसनवान्=ज्वालाभिश्चेष्टावान् ) वृषभः ( =सेचनसमर्थः=शौर्योपेतो ) दमूनाः (=गृहमित्रो) [भव] । शिशुमतीः ( =वत्सवतीर् ) [ गा ] अवास्य ( =अवक्षिप्य=दत्त्वा ) अदीदेः (=विशेषेण प्रकाशस्व ) । [ अपि च ] युत्सु वर्मेव ( =संग्रामेषु यथा कवचं परिजर्भुराणं भवति तथा ) परिजर्भुराणः ( =अतिशयेन शत्रूणां पुनः पुनः परिहर्ता ) [भव] ॥

मघवत्सु अस्माकं संबन्धिषु अन्नवत्सु यागेषु गृहेषु वा ...... । शिशुमतीरवास्य । शिशुशब्देन तदवस्था लक्ष्यते । शैशववतीर्ज्वाला अपक्षेप्य विहायादीदेः । भृशं दीप्यस्व । इति सायणः ॥

आणि त्याप्रमाणें ' अन्त्येष्टि ' अथवा मेलेल्या मनुष्याचे दिवस करितात त्यांतहि ' हतवस्त्रधारण ' म्हणजे तोडलेलें वस्त्र नेसणें म्हणून भाग असतो तो करिते वेळेस हा मंत्र म्हणतात. त्याचें कारण ' वास ' हीं अक्षरें यांत आलीं आहेत, आणि ' वासस् ' म्हणजे वस्त्र !

वृत्तासाठीं ' सदा । अनु ' असें वाचावें.

१०. हे अग्नी, तूं आमच्या यजमानांच्या घरीं प्रकाश आणि फुसफुसणारा [आणि] प्रबळ असा गृहमित्र [हो]. तूं वत्सांसहित [गाई] देऊन प्रकाश [ आणि] युद्धांमध्यें कवचाप्रमाणें शत्रुनिवारक [हो].

10. Shine, O Agni, in [the houses of] our patrons and be a crackling, powerful friend of the family. Giving [cows] accompanied by calves, shine thou brilliantly. [Be thou] a warder off of enemies like a coat of mail in battles.

१०. 'हे अग्नी, तूं आमच्या या यजमानांच्या घरीं प्रकाश, आणि सामर्थ्यवान् गृहमित्र होऊन राहा. तूं वासरांसहित गाई दे; आणि युद्धांत जसें कवच रक्षण करितें, तसा तूं सर्व संकटांपासून रक्षण करणारा हो.'

'आमच्या यजमानांच्या घरीं '=' अस्माकं मघवत्सु.' म्हणजे आम्ही स्तोते ज्या यजमानांसाठीं तुझी स्तुति करीत आहों, त्यांच्या घरीं. सायणाचार्य 'आमच्या हविरन्नसमृद्ध घरीं' अथवा यज्ञांत इतकाच अर्थ करितात.

'फुसफुसणारा '=' श्वसीवान्.' अग्नीचा जो स्वभावतः ध्वनि जळतांना होत असतो, त्याला अनुलक्षून हें विशेषण लाविलेलें आहे.

'[ गाई ].' हें अध्याहृत घेतलें पाहिजे. सायणांचा अर्थ भाषेखालीं उतरून घेतला आहे, तो पहा.

या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे अथवा जगतीहि आहे ( सूक्तारंभीं पहा ). त्रिष्टुभाप्रमाणेंच म्हणावयाची असली, तर 'अत्रास'च्या ठिकाणीं 'अत्रासिआ' असें वाचावें लागतें. जगतीप्रमाणें म्हणावयाची असली तर 'दीदिह्यध'च्या ठिकाणीं 'दीदिहि। अध', 'दमूनाः'च्या ठिकाणीं 'दमून आः', 'अतासा'च्या ठिकाणीं 'अत्रासिआ', 'अदीदेः'च्या ठिकाणीं 'अदीदएः' आणि 'परिजर्भुराणः' बद्दल 'परिजर्भुराअणः' असें वाचावें.

**इदमग्ने सुधितं दुर्धितादधि प्रियादु चिन्मन्मनः प्रेयो अस्तु ते ।**
**यत्ते शुक्रं तन्वो३ रोचते शुचि तेनास्मभ्यं वनसे रत्नमा त्वम् ११**

इदम् । अग्ने । सुऽधितम् । दुःऽधितात् । अधि । प्रियात् । ऊं इति ।
चित् । मन्मनः । प्रेयः । अस्तु । ते ।
यत् । ते । शुक्रम् । तन्वः । रोचते । शुचि । तेन । अस्मभ्यम् । व-
नसे । रत्नम् । आ । त्वम् ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. हे अग्ने, इदम् (=इदानीमस्माभिरुच्चार्यमाणं) सुधितं (=सुहितं=सुष्ठु विहितं=शोभनं यथा तथा रचितं) [ मन्म=स्तोत्रं ] दुर्धिताद् (=दुर्हितात्=दुर्विहितात्=असम्यग्रचितात् मन्मनः) अधि ( =अधिकं ) [ प्रियं ]—प्रियाद् उ चित् मन्मनः ( =प्रियादपि स्तोत्रात् ) ते प्रेयः अस्तु ( =तुभ्यं प्रियतरं भवतु ) । [ अपि च ] ते तन्वः ( =तव शरीरस्य ) यत् शुचि शुक्रं ( =दीप्तं तेजो ) रोचते ( =शोभते ) तेन [ शुक्रेण=तेजसा ] त्वम् अस्मभ्यं रत्नम् आ वनसे ( =रमणीयं धनं दद्याः=प्रयच्छ ) ॥

सायणस्तु इदमस्मदीयं सोमादिरूपं हविः । कीदृशं तत् । दुर्धिताद्दुष्टं स्थापितात्कठिनात्काष्ठादेरधि उपरि सुधितं सुहितं सुष्ठु दत्तम् । मन्मनो मननीयात् प्रियादु चित् तव दद्यादपि......ते तव प्रेयोऽतिप्रियतममस्तु । इत्यादि ॥

११. हे अग्नी, हें चांगलें रचिलेलें स्तोत्र वाईट रचिलेल्या स्तोत्रापेक्षां, आणि प्रिय स्तोत्रापेक्षांहि तुला अधिक प्रियकर होओ. तुझ्या शरीराचें जें देदीप्यमान तेज प्रकाशत आहे, त्याच्या योगेंकरून तूं आम्हांला उत्तम संपत्ति दे.

11. May this well-composed hymn be more agreeable to thee, O Agni, than an ill-composed one, nay more even than an agreeable one. By that resplendent brightness of thy person which is shining, mayest thou give us excellent wealth.

११. सूक्त संपत येत आहे, तसतसा ऋषि अग्नीपाशीं अभीष्ट वर मागावयास लागत आहे. 'हे अग्नी, हें तुजसाठीं आम्हीं उत्तम प्रकारें स्तोत्र केलें आहे; तर इतर भक्तांचीं जीं वाईट स्तोत्रें त्यांपेक्षां, किंबहुना इतरांचीं जितकीं तुला प्रिय असतील त्यांपेक्षांहि हें स्तोत्र तुला अधिक प्रिय होओ; आणि तूं हा प्रकाशत आहेस तो दयाळू होऊन अशी कृपादृष्टि आम्हांवर कर कीं, तेणेंकरून आम्हांला उत्तम संपत्ति प्राप्त होईल.'

'चांगलें रचिलेलें'—'सुधितम्.' हें विशेषण याच अर्थी 'मन्म' शब्दास लावावयाचें याविषयीं ऋ. ७, ३२. १३ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं 'तन्वः'च्या ठिकाणीं 'तनुअः' आणि 'त्वम्,'च्या स्थळीं 'तुअम्' असें वाचावें लागतें.

**रथा॑य॒ नाव॑मु॒त नो॑ गृ॒हाय॒ नित्या॑रित्रां प॒द्वतीं॑ रास्यग्ने ।
अ॒स्माकं॑ वी॒राँ उ॒त नो॑ म॒घोनो॒ जनाँ॑श्च॒ या पा॒रया॒च्छर्म॒ या च॑ ॥१२**

रथा॑य । नाव॑म् । उ॒त । नः॒ । गृ॒हाय॑ । नित्य॑ऽअरित्राम् । प॒त्ऽवती॑म् ।
रा॒सि । अ॒ग्ने॒ ।
अ॒स्माक॑म् । वी॒रान् । उ॒त । नः॒ । म॒घोन॑ः । जना॑न् । च॒ । या । पा॒-
रया॑त् । शर्म॑ । या । च॒ ॥ १२ ॥

## भाषायाम्.

१२. हे अग्ने, [अस्माकं] रथाय उत नो गृहाय (=अस्माकं गृहाय च=अस्माकं कुटुम्बाय च) नित्यारित्रां (=सदोदकाकर्षणकाष्ठसाधनोपेतां) पद्वतीं (=पादयुक्तां=पादैर्गच्छन्तीं) नावं रासि (=नौकां ददासि=प्रयच्छ) या [नौः] अस्माकं वीरान् (=पुत्रपौत्रादीन्) उत नो मघोनः (=अपि च अस्माकं यजमानान् पुरुषान्) जनांश्च (=इतरान् जनांश्च) पारयात् (=पारयितुं शक्नुयात्) या च शर्म (=सुखं) [प्रति नयेत्] ॥

सायणस्तु हे अग्ने उत अपि च रथाय रंहणाय गृहाय सर्वस्यायतनभूताय नोऽस्माकं यजमानाय नावं संसारोत्तारिकां सोमयागात्मिकां नावम् । यज्ञो वै सुतर्मा नौरित्यादिषु श्रुतिषु नौरूपत्वेन स्तुतत्वात् । कीदृशीं ताम् । नित्यारित्राम् । नियतऋत्विग्रूपोदकाकर्षणकाष्ठसाधनोपेताम् । पद्वतीं......द्रव्यदेवतामन्त्रादिरूपपादोपेताम् । ईदृशीं यज्ञात्मिकां नावं रासि । देहि संपादय ।...... पारयात् पारयेत् उत्तारयेत् ।...... जननमरणादिबहुदुःखात्मकस्य पारं निरतिशयसुखास्पदं ब्रह्मलोकं प्रापयेत् ।......एवं प्रापय्य च या नौः शर्म सुखं निरतिशयं ब्रह्म प्रापयेत् । इत्यादि व्याचष्टे ॥

१२. हे अग्नी, [आमच्या] रथाला आणि घराला नेहमीं वल्हीं असलेली [आणि] पायांनीं चालणारी नौका दे, [कीं] जी आमच्या पुत्रपौत्रादिकांला आणि आमच्या यजमानांला आणि लोकांला पार पाडील आणि जी कल्याणाप्रत [पोंहचवील].

12. To our chariot, O Agni, and to our family give thou a ship that shall always have oars and shall go on feet,—that shall save our heroes and our sacrificers and our people, and that [shall lead them] to happiness.

१२. यांतहि अभीष्टवरयाचनाच आहे. मात्र रूपकानें वर मागितला असल्यामुळें मनांतील भावार्थ सर्व अंशीं उघड समजत नाहीं. पण तात्पर्य असें दिसतें कीं, 'हे अग्नी, आमचे रथ, घरदार इत्यादिक जी संपत्ति, तिचा निभाव या जगामध्यें अशा रीतीनें पाड कीं, तिच्या योगानें आम्हीं, आमचे पुत्रादिक घरांतील पुरुष, आमचे यजमान, आणि आमचे दुसरे जन हे सर्व दुःखांतून, संकटांतून, आणि पापांतून पार पडतील आणि सुखाप्रत पोंहचतील.' परंतु रूपक झालें तरी आमच्या रथाला आणि घराला नौका दे असें म्हणणें म्हटलें म्हणजे सुबोध नाहीं. सायणाचार्य म्हणतात, ही नौका म्हणजे यज्ञरूप होय, 'वल्हीं असलेली' म्हणजे जिला ऋत्विज हींच वल्हीं आहेत ती, आणि 'पायांनीं चालणारी' म्हणजे ज्यांत हवि दिलें जातें आणि ज्यांत देवता, मंत्र इत्यादि असतात असा जो यज्ञ, तद्रूप. परंतु ही मोठी ओढाताण दिसते.

कसेंहि असलें तरी 'पद्वती' (पायांनीं चालणारी) असें विशेषण दिलें आहे यावरून ही नौका म्हणजे रूपकसिद्ध समजावयाची आहे, खरी भौतिक नव्हे, हें मात्र उघड आहे.

ह्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे. दुसऱ्या चरणांत 'रासि अग्ने' असें वाचावें लागतें.

अभी नो अग्न उक्थमिज्जुगुर्या द्यावाक्षामा सिन्धवश्च स्वगूर्ताः ।
गव्यं यव्यं यन्तो दीर्घाहेषं वरमरुण्यो वरन्त ॥ १३ ॥ ७ ॥

अभि । नः । अग्ने । उक्थम् । इत् । जुगुर्याः । द्यावाक्षामा । सिन्धवः । च । स्वऽगूर्ताः ।
गव्यम् । यव्यम् । यन्तः । दीर्घा । अहा । इषम् । वरम् । अरुण्यः । वरन्त ॥ १३ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

१३. हे अग्ने, [ त्वं ] नः इत् उक्थम् (=अस्माकमेव स्तोत्रम् ) अभि जुगुर्याः (=आभिमुख्येन स्तुहि=प्रोत्साहय=सम्यक्स्तुतमित्यङ्गीकुरु) । [ अपि च तव प्रमादेन ] स्वगूर्ताः ( =स्वयमेवोद्गीर्णाः=स्वयमेव कीर्तिमापन्नाः सिन्धवश्च) द्यावाक्षामा (=द्यावापृथिव्यौ अन्तरिक्षं चेत्येते ) गव्यं यव्यं यन्तः (=गोसंभवं क्षीरादिकं यवादिधान्यकृतं च हविः प्राप्नुवन्तस्) [ तथैव ] अरुण्यः ( =अरुणवर्णा उषसश्च ) इषम् (=अन्नं ) वरम् (=इष्टं धनं च ) वरन्त (=अस्मान्प्रापयन्तु ) ॥

सायणस्तु । ...... तथा द्यावाक्षामा ... अपि यज्ञसाधनसंपादनेन प्रोत्साहयताम् । तथा सिन्धवः स्यन्दनशीला नद्यश्च ...... गव्यं गोसंभवं क्षीरादिकं ...यव्यं यवव्रीह्यादिजन्यं पुरोडाशादिकं यन्तः प्रापयन्तः प्रोत्साहयन्तु । इत्यादि व्याचष्टे ॥





१३. हे अग्नी, आमच्याच स्तोत्राची [तूं] प्रशंसा कर. [आणि] स्वस्तुत द्यावापृथिवी आणि अंतरिक्ष [हीं] गोरसापासून केलेलें [आणि] यवांपासून केलेलें हवि ग्रहण करून, [तीं] [आणि] उषा [ज्या, त्या ह्या सर्व मिळून] [आम्हांला] नित्य अन्न [आणि] वांछिलेलें धन प्राप्त करून देओत.

13, Mayest thou, O Agni, applaud our hymn alone. [And] may the self-renowned Heaven and Earth and the Firmament, accepting the oblation made of milk [and] the oblation made of barley, [and] [also] the ruddy dawns, bestow ever and ever food [and] [other] wished for wealth [upon us].

१३. ही ऋचा सूक्ताचा उपसंहार होय. भावार्थः —' हे अग्नी, याप्रमाणें आम्हीं तुझी स्तुति केली आहे, तर ही चांगली झाली अशी आम्हांस शाबासकी देऊन तूं ग्रहण कर, आणि इतर देवांस आम्हांवर प्रसन्न कर. तूं जर प्रसन्न करिशील, तर द्यावापृथिवी, अंतरिक्ष आणि उषा ह्या सर्व आम्हीं आज दिलेलें हवि स्वीकारून घेऊन आम्हांला अन्न आणि आम्हांस पाहिजे असलेली दुसरी संपत्ति नित्य देत जातील.'

' आमच्याच '=' नः इत्. ' सर्व उपासकांत आम्हीच उत्तम भक्त असें मानून आम्हांसच शाबासकी दे, असा अभिप्राय.

' अंतरिक्ष '=' सिन्धवः. ' अक्षरशः ' नद्या;' म्हणजे मेघोदकांचे प्रवाह बाष्परूपानें ज्या प्रदेशांत राहतात, ते प्रदेश, अर्थात् अंतरिक्ष. सू. ३५ मं. ८ याजवरील टिपेंत ' सप्त सिन्धु ' याचा अर्थ अंतरिक्ष असा कसा होतो तें ज्या कारणांनीं दाखविलें आहे, तींच या ठिकाणी लागू पडतात.

'स्वस्तुत '=' स्वगूर्ताः. ' हें द्यावापृथिवी आणि अंतरिक्ष या सर्वांचें विशेषण आहे. आम्हांसारिख्यांनीं स्तुति करून प्रख्यात झालेले नव्हे, तर स्वताहानेच प्रख्यात असा भावार्थ ऋ. ४. १९. १० ( यथायथा वृष्ण्यानि स्वगूर्ता इ०) याजवरील सायणभाष्य पहा.

' गोरसापासून आणि यवांपासून केलेलें हवि '=' गव्यं यव्यम्.' म्हणजे दुधाचें, आणि सातू वगैरे जें धान्य, त्याचें केलेलें. यावरून कदाचित् दिसून येईल कीं, प्राचीन आर्य (ते जरी मांसाहारी होते, आणि गाईचें वगैरे मांस देवांस केव्हां केव्हां यज्ञांत म्हणजे उपासनेंत अर्पण करीत असत तरी) देवांला नित्य मांस अर्पण करीत नसत; तर दुधाचा पायस आणि सातूचा भात वगैरे करून तो अर्पण करीत. यावरून त्यांचा नेहमीचा आहार मांस नसावें, तर दूध आणि

## सूक्तम् १४१.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः। अग्निर्देवता। अन्त्ये द्वे त्रिष्टुभौ। शिष्टं सूक्तं जागतम्॥

**बळित्था तद्वपुषे धायि दर्शतं देवस्य भर्गः सहसो यतो जनि।**
**यदीमुप ह्वरते साधते मतिर्ऋतस्य धेना अनयन्त सस्रुतः॥ १॥**

बट्। इत्था। तत्। वपुषे। धायि। दर्शतम्। देवस्य। भर्गः। सहसः। यतः। जनि।
यत्। ईम्। उप। ह्वरते। साधते। मतिः। ऋतस्य। धेनाः। अनयन्त। सऽस्रुतः॥ १॥

### भाषायाम्.

१. देवस्य (=द्योतमानस्य) [अग्नेर्] दर्शतं (=रमणीयं) भर्गः (=तेजो) यतः सहसः जनि (=यतः बलात् अजनि=यत् तेजः बलान्मथनप्रयुक्ताद् उत्पाद्यते) तत् [भर्गो] बळित्था (=सत्यमेव) वपुषे धायि (=सौन्दर्याय धार्यते=सुन्दरं यथा तथा धार्यतेग्निना)। यत् (=यस्मात् कारणात्=तत एव हेतोर्) ईम् [भर्गः] (=तत्तेजः प्रति) मतिः (=मम बुद्धिः) उप ह्वरते (=उपगच्छति) साधते (=तत् पूजयति च)। ऋतस्य धेनाः (=सत्यभूतस्य यज्ञस्य गोभूताः स्तुतिरूपा वाचः) सस्रुतः (=सहैव प्रवर्तमाना) अनयन्त (=अनीयन्त=नीयन्ते) [तत् तेजः प्रति]॥

अरण्योः सकाशात् मथनेन तेजस्विनं यमग्निं वयमुत्पादयामः स शोभनं विभाति। अतः कारणादेव मम मतिस्तं प्रत्येव स्तुत्या सह धावति। सर्वेषां स्तुतयः संमिलिताः सत्यस्तमेव गच्छन्ति चेति भावः॥

देवस्य द्योतनशीलस्यादित्यस्य दर्शतं सर्वैर्दर्शनीयं तत् प्रसिद्धं भर्गस्तेज इत्था इत्थं सर्वैर्दृश्यमानप्रकारेण वपुषे शरीरव्यवहाराय दार्ढ्याय धायि। धार्यते सर्वैः। बळित्थेत्युभे अपि सत्यनामनी बट् श्रत् सत्रा इत्थेति तन्नामसु पाठात्। जाठराग्निना भुक्तानां जरणेन शरीरधारणं प्रसिद्धम्। ...... साधते च। तेनैव तेजसा [मतिः] साधयति स्वाभीष्टम्। किंच यज्ञस्य यज्ञसाधकस्याग्नेस्तेजसा धेनाः सर्वप्राणिनां वाचः सस्रुतः समानं गच्छन्त्यः सहैव प्रवर्तमानाः। ...... अनयन्त। नयन्ति। अग्नेः स्तोत्रं निर्वहन्ति। इति सायणः॥

धान्य यांपासून केलेले पदार्थ हे असावेत. कारण कीं, जें ते खात तेंच ते आपल्या देवतांस अर्पण करीत.

वृत्रासाठीं तिसरा आणि चवथा [illegible]

चरण खालीं दाखविल्याप्रमाणें म्हणावे लागतातः—

गवीयं यव्यं यन्तो दीर्घा अहा।
इषं वरमरुणिओ वरन्त॥

## सूक्त १४१.

ऋषि—**दीर्घतमा** (पूर्वसूक्ताचाच कर्ता). देवता—**अग्नि**. वृत्त—**जगती**; मात्र शेवटच्या दोन ऋचा **त्रिष्टुभ्** वृत्ताच्या.

१. देदीप्यमान [अग्नी]चें जें तेज बळापासून उत्पन्न केलें जातें, तें सुंदर तेज खरोखरच शोभतें; म्हणूनच [माझी] मति त्याजप्रत धांवते; [ आणि] [त्यालाच] भजते; स्तुति सर्व मिळून त्याजकडे धांव घेतात.

## HYMN 141.

To *Agni*. By *Dîrghatamas* (Author of the previous hymn). Metre—*Jagatî*, except in the last two verses, where it is *Trishṭubh*.

1. That beautiful effulgence of brilliant Agni, which is produced by force, truly shines beautifully; and that is why my mind runs to it and propitiates it: all prayers are carried to it in numbers.

---

१. हेंहि सूक्त 'दीर्घतमा' या ऋषीचेंच असून वरील सूक्ताप्रमाणेंच अग्नीविषयीं आहे; आणि वरील सूक्ताप्रमाणेंच याच्याहि आरंभींच्या ऋचा कठिण आहेत.

या पहिल्या ऋचेचा भावार्थ असा दिसतो कीं, 'अरणीमध्यें घर्षण करून जो तेजस्वी अग्नि मथून काढिला जातो, तो फारच सुंदर होय. म्हणूनच तर माझी बुद्धि त्याची स्तुति करण्याला पुढें सरसावते, आणि त्यालाच पुजूं इच्छिते; आणि सर्व लोकांच्या ज्या स्तुति, त्या, एकदम त्याजकडेसच धांव घेतात.'

'जें तेज बळापासून उत्पन्न केलें जातें'='भर्गः सहसो यतो जनि.' अक्षरशः 'ज्या बळापासून तेज उत्पन्न केलें जातें अथवा जन्मतें,' म्हणजे बळापासून जें अरणींच्या योगेंकरून तेज जन्मास येतें तें तेज. 'यतः' या शब्दाचा संबंध अक्षरशः जरी 'सहसः'शब्दाशीं आहे, तरी अर्थसंबंधानें 'भर्गः'-शब्दाशीं अन्वय आहे असें घेऊन 'देवस्य भर्गः सहसो यत् जनि' असें असल्याप्रमाणें अर्थ केला पाहिजे.

'शोभतें'='वपुषे धायते.' अक्षरशः अर्थ 'शोभेसाठीं धरिलें जातें;' जेणेंकरून शोभा येईल त्या रीतीनें धरिलें जातें. 'वपुः'शब्दाचा अर्थ 'शोभा' असा होतो, आणि 'वपुषे' म्हणजे सुंदर रीतीनें' असें होतें याविषयीं ऋ. ५. ७३. ३ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'म्हणूनच माझी मति त्याजप्रत धांवते'='यद् ईम् उप ह्वरते.' 'यद् ईम्' म्हणजे 'यद् ईं भर्गः'='ज्या ह्या तेजाप्रत' असा अर्थ घ्यावयाचा आहे.

'स्तुति'='ऋतस्य धेनाः.' अक्षरशः 'सत्यरूप यज्ञाच्या गाई.' म्हणजे यज्ञातें गाईच्या दुधाप्रमाणें पुष्ट करणाऱ्या ज्या ऋचा त्या.

**पृक्षो वपुः पितुमान्नित्य आ शये द्वितीयमा सप्तशिवासु मातृषु ।**
**तृतीयमस्य वृषभस्य दोहसे दशप्रमतिं जनयन्त योषणः ॥ २ ॥**

पृक्षः । वपुः । पितुऽमान् । नित्यः । आ । शये । द्वितीयम् । आ । सप्तऽशिवासु । मातृषु ।
तृतीयम् । अस्य । वृषभस्य । दोहसे । दशऽप्रमतिम् । जनयन्त । योषणः ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. एषाऽत्यन्तं दुर्बोधा । तदपि यथामति व्याख्यास्यामः । तदेवम् । [अग्नेः प्रथमं ] वपुः (=स्वरूपम्) [एतद्भवति] [यत्] पृक्षः (=अन्नवान्) पितुमान् (=हविर्लक्षणान्नवांश्च) नित्यः (=सदैव वर्तमानः सन्) [स] [यज्ञगृहे] आ शये (=गार्हपत्याहवनीयादिरूपेण तिष्ठति) । द्वितीयम् [अस्य] [वपुः] सप्त (=सप्तसंख्याकासु) शिवासु (=कल्याणासु) मातृषु (=मातृस्थानीयासु वृष्टिषु) [वर्तते] । अस्य वृषभस्य (=अग्निरूपस्यास्य वीरस्य) तृतीयं [वपुः स्वरूपं] दोहसे (=दोहनाय=क्षीरादानाय) [वर्तते] । [एवंरूपं] प्रमतिं (=प्रकर्षेण मनयितारम् अग्निं) दश योषणः (=अङ्गुलिरूपा दश युवतयो] जनयन्त (=जनयन्ति=मथनेनोत्पादयन्ति) ॥

अत्राग्नेस्त्रीणि रूपाणि प्रतिपादितानि । तत्रैकं यज्ञगृहे स्थितम् । द्वितीयं मेघवृष्टिष्विति सायण आह । तृतीयं सूर्यकिरणेष्विति स एव । तमग्निं भक्तस्याङ्गुलिरूपा दश युवतयो मथनकालेऽरणिभ्यामुत्पादयन्तीति भावगतम् । उक्तानां पुनरग्नेस्त्रयाणां रूपाणां स्थानानि न स्पष्टानि । अर्थलाभाय सप्तशिवासु इति पदं सप्त शिवासु इति दशप्रमतिमिति पदं च दश प्रमतिम् इति व्यस्तं वाचनीयम् ॥

सायण एवं व्याचष्टे । अयमग्निः पृक्षोऽन्नसाधकः पाकादिना । वपुर्वपुष्मान् शरीराभिवृद्धिहेतुः पितुमान् हविर्लक्षणान्नयुक्तो नित्यः शाश्वतः । ईदृशः सन् प्रथमं पृथिवीस्थानः सन् आशये । आशेते । दाहपाकादि लौकिकं कर्म यज्ञादि वैदिकं कर्म च निवर्तयन् भुवो भूमौ वर्तत इत्यर्थः । तथा सप्तशिवासु मातृषु सप्तलोकशिवकरीषु मातृस्थानीयासु हितकरीषु वृष्टिषु द्वितीयमाशेते । मध्यमस्थानो विद्युद्रूपो वा वर्तते । अस्य वृषभस्य वर्षितुरस्यैव वैद्युताग्नेः सहायत्वेन संबन्धिने दोहसे दोग्ध्रे आदित्यस्योदकस्य वर्षयित्रे आदित्यरश्मये ॥ दुहेः कर्तर्यसुप्रत्ययः ॥ तत्प्रवृत्तये तृतीयमाशेते । द्युस्थानो वर्तते । यद्वा अस्य वृषभस्य वर्षितुः प्रसिद्धस्यादित्यस्य

२. [ याचें पहिलें ] स्वरूप [हें कीं], [हा] अन्नवान् [आणि] हव्यवान् [ असून] [यज्ञशाळेमध्यें] नित्य निजून राहतो. दुसरें [ स्वरूप ] कल्याणकारक [ज्या] सात आया, त्यांत [होय]. या महापुरुषाचें तिसरें [ स्वरूप ] दूध काढण्यासाठीं [ आहे ]. [ असा जो हा सर्वांचा ] पालक, त्याला दहा युवति जन्म देतात.

2. [His first] form [is], [ that ], possessed of food [ and ] honoured with oblations, he always lies [ in the sacrificial hall ]. [His] second [ form ] [ is ] in the seven blessed mothers. The third [ form ] of this hero [ is ] for the milking. [ This ] guardian the ten young damsels bring forth.

---

'बळापासून उत्पन्न केलें जातें'='सहसः जनि.' अग्नीला 'बळाचा पुत्र' असें नांव वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. सू. २६ मं. १०, सू. ७४ मं. ५, सू. ७९ मं. ४ इत्यादि पहा.

'देदीप्यमान [अग्नी]चें...तेज'= 'देवस्य भर्गः.' म्हणजे 'देदीप्यमान अग्नि.'

---

२. ही ऋचा फार कठिण आहे. शब्दार्थ कठिण नाहीं, पण रूपक उघड नाहीं, त्यामुळें ऋषीचें हृद्ग समजत नाहीं. इतका भावार्थ दिसतो कीं, 'अग्नीचीं तीन स्वरूपें आहेत, म्हणजे तो तीन ठिकाणीं असतो आणि वेगवेगळीं कार्यें करितो. तर त्या तीन ठिकाणीं असणाऱ्या अग्नीला भजकाच्या ज्या दहा अंगुलि त्याच कोणी एक दहा तरुण स्त्रिया, त्या त्याला मथन करून अरणींत उत्पन्न करितात.'

पण तीन स्वरूपें कोणतीं? याविषयींच मोठा संशय आहे. सायण म्हणतात, मनुष्यांनीं खाल्लेलें अन्न पचविणारा आणि यज्ञांत दिलेलें हवि घेणारा जो पृथिवीवरचा अग्नि, तें एक स्वरूप; सर्वांला मातेप्रमाणें पोसणाऱ्या ज्या मेघोदकांच्या वृष्टि, त्यांत विजेच्या रूपानें असलेला जो अग्नि, तें दुसरें स्वरूप; आणि अंतरिक्षाच्या वरील जो अत्युच्च प्रदेश, त्यांत सूर्यकिरणांच्या रूपानें राहणारा जो अग्नि, तें तिसरें स्वरूप. हा अर्थ निरूपायासाठीं क्षणभर घेतला तरी त्यांत अडचणी पुष्कळ आहेत. ऋग्वेदांत कितीएक जे अत्यंत दुर्बोध मंत्र आहेत, त्यांतीलच हा एक आहे, असें समजून तूर्त त्याच्या अर्थलाभाची विशेष आशा नाहीं असें म्हणावें.

'अन्नवान्'='पृक्षः.' म्हणजे उपासकांला खावयाचें अन्न ज्याजवळ आहे असा.

'कल्याणकारक ज्या सात आया त्यांत'='सप्त शिवासु मातृषु.' यांत अशी अडचण आहे कीं 'सप्त शिवासु मातृषु' असें म्हणावें असें वाटतें त्याब-

निर्यदीं बुध्नान्महिषस्य वर्पस ईशानासः शवसा क्रन्त सूरयः ।
यदीमनु प्रदिवो मध्व आधवे गुहा सन्तं मातरिश्वा मथायति ॥३॥
निः । यत् । ईम् । बुध्नात् । महिषस्य । वर्पसः । ईशानासः । शवसा । क्रन्त । सूरयः ।
यत् । ईम् । अनु । प्रऽदिवः । मध्वः । आऽधवे । गुहा । सन्तम् । मातरिश्वा । मथायति ॥ ३ ॥

---

संबन्धिने दोग्ध्रे रश्मये तत्प्रवृत्त्यर्थम् । आदित्यरश्मयो घर्मकाले भूमिस्थमुदकमाकृष्य सूर्यं प्रापय्य तत्र चिरकालं धृत्वा पुनरन्तरिक्षं प्राप्य मेघेषु स्थित्वा वर्षकाले प्रवर्षन्तीति प्रसिद्धम् । अतो रश्मेर्दोग्धृत्वम् । ईदृशं त्रिस्थानमग्निं महाभागं योषणो मिश्रणशीलाः सर्वा दिशो जनयन्त । उत्पादयन्ति । सर्वासु दिक्षु प्रसृत इत्यर्थः । कीदृशं तम् । दशप्रमतिम् । दशसु दिक्षु प्रकृष्टमननवन्तं पूज्यत्वाय । यद्वा मथनकाले दशभिरङ्गुलिभिरुत्पन्नं लोकत्रये दश दिक्षु च व्याप्तमित्यर्थः ॥

---

## भाषायाम्.

३. ४. यद् (=यदा ) महिषस्य वर्पसः ईशानासः (=? महतो रूपस्य प्रभवः=स्वयं स्थूलरूपाः ) सूरयः (=उपासका ) ईम् (=एतम् अग्निं ) शवसा (=बलेन मथनप्रयुक्तेन ) बुध्नात् (=? अरणिमूलात् ) निष्क्रन्त (=निष्कुर्वन्ति=उत्पादयन्ति ) यत् (=यदा च ) मातरिश्वा [ यथा तथा यजमानः ] प्रदिवः (=पूर्वकाल इव ) ईम् ( =एतमग्निं ) गुहा सन्तं ( =निगूढं सन्तमपि=अरण्योर्विलीनं सन्तमपि ) मध्वः आधवे (=मधुरस्य सोमस्य प्रक्षेपणे निमित्ते सति ) अनु मथायति ( =मथ्नाति=मथनेनारणिभ्यामुत्पादयति ) [ तथा च ] यत् (=यदा ) [ स ] परमात् पितुः (=श्रेष्ठात् गार्हपत्यरूपात् पितुः=गार्हपत्यस्याग्नेः सकाशात् ) प्र परि नीयते ( =आहवनीयं प्रति नीयते ) [ यदा च स ] पृक्षुधः (=? प्रक्षुधोः=विशेषेण क्षुधायुक्ताः=अग्निमिच्छन्तीर् ) वीरुधो (=ओषधीः=समिधः ) दंसु ( =? दमनपरं सुष्ठु च यथा भवति तथा=शान्तं रमणीयं च यथा भवति तथा आरोहति ) [ अपि च ] यत् (=यदा ) उभा (=? उभे ) [ अरणी ] अस्य जनुषम् इन्वतः ( =अग्नेर्जन्म व्याप्नुतः=[illegible]=स्वीकुरुतः ) आदित् (=तदानीमेव=तत्क्षणमेव ) [ स ] घृणा (=घृ[illegible] ) शुचिः ( =तेजस्वी ) यविष्ठः ( =अत्यन्तं यौवनोपेतः ) अभवत् [illegible] ) ॥

३. जेव्हां मोठ्या आकाराचे प्रभु [ असे ] भक्तजन याला बळाच्या योगेंकरून [ अरणींच्या ] बुंधामधून उत्पन्न करितात; जेव्हां प्राचीन काळाप्रमाणें सोमाची आहुति देण्यासाठीं मातरिश्व्या[प्रमाणें उपासक ] त्याला, लपून राहिला असतांहि, मथन करून उत्पन्न करितो;

3. When the wise sacrificers, the lords of great shapes, produce him with force from the bottom [ of the wood ]; when, as in ancient times, for the offering of sweet Soma, [ the worshipper like ] Mâtaris'vâ churns him out though he lies concealed ;

---

द्दल 'सप्तशिवासु मातृषु' असें आहे.
७ दुसरें असें कीं, 'सप्त माता' म्हणजे काय? सात माता हें नांव वृष्टींला दिलेलें वेदांत प्रसिद्ध नाही. ( सायण अन्यथाच निर्वाह करितात, भाषेखालीं पहा).

'दूध काढण्यासाठीं [ आहे ]'= 'दोहसे.' हा अर्थ अक्षरशः केला आहे, पण कशाचें 'दोहन' आणि भावार्थ काय आहे तें कळत नाहीं.

---

३, ४. ह्या दोन्ही ऋचा वरच्या प्रमाणेंच कठिण आहेत. मात्र दोहींचा अन्वय एकत्र आहे इतकें स्पष्ट आहे. त्यामुळें आम्हीं त्यांचा भावार्थ एकत्र सांगतों:—

'जेव्हां मोठ्या आकृतीचे उपासकजन अग्नीला अरणींच्या बुंधापासून उत्पन्न करितात; जेव्हां देवांला सोमाहुति देण्यासाठीं, मातरिश्वा याणें पूर्वी अग्नीला मथून काढिला तसा, यजमान अरणींत चिकटून राहिलेल्या अग्नीला मथून काढितो ( ३ ); जेव्हां घरांत नित्य प्रदीप्त ठेवावयाचा जो 'गार्हपत्य' या नांवाचा अग्नि असतो, त्यापासून या अग्नीला दुसऱ्या जागीं ('आहवनीय'-नांवाचा अग्नि पेटवावयाचा त्या स्थलीं ) नेतात, आणि जेव्हां तो भुकेलेल्या सारिख्या जणुं त्याची वाट पाहत राहिलेल्या समिधांवर शांत आणि सुंदर रीतीनें चढतो; आणि जेव्हां दोन्ही अरणि अग्नीला उत्पन्न करण्याचा पत्कर घेतात, तेव्हां लागलाच, म्हणजे अरणींतून निघून समिधांवर चढल्याबरोबर, तो आपल्या मोठ्या कांतीनें अतितरुण आणि टवटवीत दिसूं लागतो; ( ४ ) म्हणजे, अरणीच्या योगानें अग्नीला उत्पन्न करून त्याला समिधा घालतांच तो पूर्व दिवशीं संध्याकाळीं म्हातारा जणुं होऊन नाहींसा झाला होता, तो दुसऱ्या दिवशीं पुनः अतितरुण आणि टवटवीत दिसूं लागतो.'

हा जरी भावार्थ साधारणपणें उघड आहे, तथापि या दोन्ही ऋचेंत अवघड अर्थाचे शब्द बरेच आहेत.

'मोठ्या आकाराचे प्रभु' = 'महतो वर्पसः ईशानासः' म्हणजे ज्यांचीं शरीरें धिप्पाड आहेत ते, असा [illegible] सतो. कारण ज्याला जोर नाहीं [illegible]

प्र यत्पितुः परमान्नीयते पर्या पृक्षुधो वीरुधो दंसु रोहति ।
उभा यदस्य जनुषं यदिन्वत आदिद्यविष्ठो अभवद्घृणा शुचिः ॥४॥

प्र । यत् । पितुः । परमात् । नीयते । परि । आ । पृक्षुधः । वीरुधः । दम्ऽसु । रोहति ।
उभा । यत् । अस्य । जनुषम् । यत् । इन्वतः । आत् । इत् । यविष्ठः । अभवत् । घृणा । शुचिः ॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

एते उभे अप्यसुलभार्थे सायणेनैवं व्याख्याते । ईमेनमग्निं यद्यस्मात्कारणान्महिषस्य । महन्नामैतत् । महिषोऽभ्व ऋभुक्षा इति तन्नामसु पाठात् । महतो यज्ञस्य बुध्नान्मूलादधानादारभ्य वर्पसः । रूपनामैतत् । रूपस्योपक्रमोपसंहारात्मकस्य सिद्धय ईशानासः स्वकीयव्यापारसमर्थाः सूरयो मेधाविन ऋत्विजः शवसा बलेन मन्त्रादिरूपेण शारीरेण वा निष्कृन्त निष्कुर्वन्ति साधयन्ति । उत्पादयन्ति काष्ठात् । यद्वा एनमग्निं बुध्नादादितो मथनादारभ्य महिषस्य वर्पसो महतो रूपस्याहुतिस्वीकारसमर्थस्य सिद्धये निष्कुर्वन्ति । करोतेश्छान्दसे लुङि मन्त्रे घसेति च्लेर्लुक् । व्यत्ययेनान्तादेशः ॥ किंच यत् ईमेनमेवाग्निं प्रदिवः पुराणात् अनादिकालमारभ्य न केवलमिदानीमेवेत्यर्थः । पूर्ववदिदानीं मध्वो मधुनो मधुसदृशस्याधव आधवने प्रक्षेपे निमित्ते सति गुहा सन्तं गुहायां वेद्यां काष्ठेषु निगूढं सन्तं मातरिश्वान्तरिक्षे चेष्टमानो वायुरनुक्रमेण मथायति । चालयति । उद्बोधयतीत्यर्थः यद्वा मातरि फलस्य मातरि यागे श्वसति चेष्टत इति मातरिश्वा यजमानो गुहा सन्तमरण्योर्निगूढं सन्तं प्रादुर्भावायानुक्रमेण मथायति । मथ्नाति । उत्पादयतीत्यर्थः । यस्मादेवंरूपस्तस्मात्स्तोतव्य इत्यर्थः ॥

यद्यस्मात्पितुरन्नस्य पशुलक्षणस्य । षष्ठीस्थाने प्रथमा । तस्य परमात् परमत्वाद्धेतोः । उत्कृष्टत्वायेत्यर्थः । तदर्थं प्रपरिणीयते । प्रकर्षेण परितो नीयते । पर्यग्नि क्रियत इत्यर्थः । यद्वा पितुरुत्पादकात्परमादुत्कृष्टाद्गार्हपत्यलक्षणस्याग्नेः सकाशादाहवनीयं प्रति प्रपरिणीयते । प्रकर्षेण नीयते । पर्यनर्थकः । किंच पृक्षुधः पशुपुरोडाशादिषु दाहमध्ये धीयमानाः । यद्वा प्रशब्दस्य संप्रसारणम् । क्षुध बुभुक्षायाम् । क्विप् । प्रक्षुध्वाः । प्रकर्षेण बुभुक्षिता भोक्तुमिष्यमाणा वीरुधो दंसु दन्तेषु मध्य आरोहति । आरोहति । प्रविशन्तीत्यर्थः । यद्यस्मादुभा उभावध्वर्युयजमानौ उभे अरणी वाग्निं जनुषं जन्मोत्पत्तिमिन्वतः । व्याप्नुतः । स्वीकुरुत इत्यर्थः । इवि

४. जेव्हां उत्तम पित्यापासून तो इकडे तिकडे नेला जातो, [ आणि जेव्हां ] तो भुकेलेल्या वनस्पतींवर शांतपणें आणि सुंदर रीतीनें चढतो; जेव्हां दोन्ही [अरणी ]—जेव्हां [दोन्ही अरणी ] त्याच्या जन्माचा पत्कर घेतात: तेव्हां लागलाच तो प्रतापानें तेजस्वी असा अतितरुण पुरुष होतो;

4. When he is carried around from [ his ] excellent father, [ and when ] he mounts quietly and beautifully the hungry pieces of fuel; when the two [ Aranis]—when they, promote his birth: then he instantly becomes most youthful, brilliant with effulgence.

---

हातून अग्निमथन होणार नाहीं. अग्नि मथून काढण्यांत विशेष बळ लागे असें 'सहसः पुत्रः,' 'सहस्पुत्रः,' 'सहसो युवा' इत्यादिक जीं अग्नीचीं नांवें, त्यांजवरून उघड होतें. आम्हीं घेतल्याप्रमाणें अन्वय घेतल्याशिवाय दुसरा चांगला निर्वाह दिसत नाहीं.

'सोमाच्या आहुति देण्यासाठीं'='मध्वः आधवे.' म्हणजे 'सोम [ अग्नींत ] फेकावयाचा असला म्हणजे, असा अक्षरार्थ आहे.

'मातरिश्व्या[प्रमाणें]'='मातरिश्वा.' मातरिश्वा याणें अग्नीला पृथिवीवर प्रथम आणिलें, त्याणेंच त्याला अरणींतून प्रथम मथन करून बाहेर काढिलें, त्यापूर्वी अग्नि पृथिवीवर नव्हता असें वेदांत सांगितलें आहे. सू. ३१ मं. ३ आणि टिपा पहा.

'लपून राहिला असतांहि'='गुहा सन्तम्.' म्हणजे घर्षण करून अरणींतून काढण्याच्या पूर्वी अग्नि अरणीच्या पोटांत लपून राहिलेला असतो अशी कल्पना करणें हें स्वाभाविक आहे.

'उत्तम पित्यापासून'='परमात् पितुः.' हा उत्तम पिता म्हणजे कोण? सायण म्हणतात, गार्हपत्य जो अग्नि, म्हणजे घरांत नित्य जागृत ठेवावयाचा विस्तव, तो होय. पण खरें काय असेल कळत नाहीं.

'शांतपणें आणि सुंदर रीतीनें'='दंसु.' हा अर्थ सायणांनीं अन्यत्र (ऋ. ६. ३. ७) दिलेल्या केवळ निर्वचनावरूनच केला आहे. 'दंसु'शब्द दोनदाच आला आहे त्याशिवाय एक दोन ठिकाणीं समासस्थ आढळतो, त्याजवरून अर्थनिर्णयाविषयीं समाधान होत नाहीं.

'वनस्पतींवर ......चढतो'='आ वीरुधः रोहति.' म्हणजे समिधा जेव्हां हळु हळू पेट घेऊं लागतात तेव्हां.

'अरणी.' म्हणजे दोन काष्ठें अथवा लांकडाचे तुकडे असत. ते एकमेकांवर

आदिन्मातॄराविशद्यास्वा शुचिरहिंस्यमान उर्विया वि वावृधे ।
अनु यत्पूर्वा अरुहत्सनाजुवो नि नव्यसीष्ववरासु धावते ॥५॥८॥

आत् । इत् । मातॄः । आ । अविशत् । यासु । आ । शुचिः । अहिंस्यमानः । उर्विया । वि । ववृधे ।
अनु । यत् । पूर्वाः । अरुहत् । सनाऽजुवः । नि । नव्यसीषु । अवरासु । धावते ॥ ५ ॥ ८॥

व्याप्तौ । इदित्वान्नुम् । आदित् अत एव कारणाच्छुचिः शुद्धोऽयमग्निर्घृणा यजमानेष्वनुग्रहेण । यद्वा घृणा घृणो दीप्तिमान् । मत्वर्थो लुप्यते । दीप्त्या वा यविष्ठो युवतमोऽभवत् । संपन्नः । स्वीकारसमर्थोऽभवदित्यर्थः ॥

## भाषायाम्.

५. आदित् (=यदा यविष्ठोभवत् तत्क्षणमेव) [स] मातॄः (=मातृस्थानीया ओषधीः=समिधः) आ अविशत् (=तासां मध्ये प्रविशति) यासु आ (=यासां मध्ये=तासां मध्ये च) शुचिः (=दीप्तिमान्) [सः] अहिंस्यमानः (=केनाप्यपीड्यमानः सन्) उर्विया (=उरु यथा भवति तथा=अत्यन्तं) वि ववृधे (=विशेषेण प्रवृद्धो भवति)। [स] यत् (=यदा) सनाजुवः (="दीर्घकालवियोगिनीः") पूर्वाः (=पूर्वकालीनाः पूर्वाह्णे प्रज्वलनानन्तरं शमिता) [मातॄः] अनु अरुहत् (=अनुक्रमेण आरूढवान् भवति) [तदनन्तरं स] नव्यसीषु (=अतिशयेन नवासु=अपूर्वज्वलितासु) अवरासु (=पूर्वापेक्षया निकृष्टासु) [मातृषु] नि धावते (=नितरां धावति) ॥

सायणस्तु मातॄरुत्पादयित्रीर्मातृस्थानीया दश दिश आ अविशत् । सर्वतः प्रविशति।......दिक्षु प्रकाशेन व्याप्त इत्यर्थः। मातरो विशेष्यन्ते । यासु मातृष्वहिंस्यमानः परैरपीड्यमान उर्विया उर्वतिप्रभूतं विवावृधे । विविधं प्रवृद्धोभवत् । तास्वाविशत्। यथा लोके कश्चित्तेजस्वी जनन्याः स्तनपानपरिपीडादिभिः सम्यक्पोषितो लोके प्रकाश्य पुनरागत्य मातरमालिङ्गति तद्वदिति भावः। कस्मिन्काल इति तत्राह।...।सनाजुवो दीर्घकालवियोगिन्यः (?नीः) स्थापनकाल एव प्रक्षिप्ताः अतएव पूर्वाः प्रथमभाविनीरोषधीरनुक्रमेणारुहत् । आरोहति । ...... । उपरि प्रज्वलति । तथा नव्यसीषु नवतरासु अतएवावरासु अत एव पूर्वापेक्षया निकृष्टासु पश्चाद्भाविनीष्वोषधीषु नि धावते । नितरां नीचैर्वा गच्छति। अन्तः प्रविशतीत्यर्थः। यदा काष्ठानामधस्तादुपरिष्टाच्च प्रविश्य ज्वलति । तदा दिक्षु प्रकाशितोऽभवदित्यर्थः। इति ॥

५. तेव्हां लागलाच तो प्रभावान् [अग्नि] आयांमध्यें प्रवेश करितो [आणि] त्यांजमध्यें तो उपद्रवरहित [होऊन] विस्तीर्णपणें वाढतो. [तो] जेव्हां चिरकाळ वियोग झालेल्या पूर्वींच्या [आयां]वर चढतो, [तेव्हां] [मग] नवीन [आणि] कनिष्ठ [ज्या माता], त्यांजवर तो धांवतो.

5. Then he shining brilliantly instantly enters [his] mothers, in whom he grows far and wide without injury; when he has mounted on the elder ones, long separated [from him], he runs down to the newest [and] youngest [mothers].

---

घांसून त्यांजपासून अग्नि उत्पन्न करीत, त्या दोन्ही अरणींला अग्नीचे आईबाप असें म्हणतात.

'प्रतापानें'=' घृणा=घृणया.' म्हणजे समिधांनीं पेट घेतल्याबरोबर अग्नीचें तेज वाढतें, आणि तो फार तरुण आणि प्रभावान् दिसूं लागतो.

वृत्तासाठीं चवथ्या ऋचेंत 'परि। आ' असें वाचावें.

---

५. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं, अग्नि एकाएकीं तरुण होतो. आतां म्हणतो, 'त्या क्षणींच तो आपल्या आयांच्या ठिकाणीं प्रवेश करितो, आणि त्यांच्या आंगावर चढून त्या ठिकाणीं मोठा होतो; त्याला कोणीहि उपद्रव करीत नाहीं. तो प्रथम जुन्या आयांच्या आंगावर चढतो, आणि नंतर नव्या आयांच्या आंगावर चढतो.'

या आया म्हणजे अग्नि पेटावा म्हणून जीं लांकडें घालितात, तीं. त्यांतून कितीएक नवीं असतात आणि कितीएक पूर्व दिवसाचीं विझवून ठेविलेलीं असतात. जीं पूर्व दिवसाचीं असतात, तीं आधीं पेट घेतात, आणि नवीं असतात तीं मागून जळतात, म्हणून नव्या आयांकडे अग्नि मागाहून धावतो असें ऋषि म्हणतो आहे.

'विस्तीर्णपणें'=' उर्विया.' म्हणजे त्याचें तेज आसमन्तात् पसरतें.

'पूर्वींच्या आयांवर'=' पूर्वाः.' म्हणजे पूर्व दिवशीं पेटलेलीं, नंतर विझवून ठेविलेलीं लांकडें, असा अर्थ.

'नवीन आणि कनिष्ठ ज्या माता त्यांजवर'=' नव्यसीषु अवरासु.' म्हणजे नवीन जीं लांकडें त्यांवर.

सायणांनीं 'आया' म्हणजे दिशा असा अर्थ केला आहे, पण तसें करणें अवश्य नाहीं.

आदिद्धोतारं वृणते दिविष्टिषु भगमिव पपृचानास ऋञ्जते ।
देवान्यत्क्रत्वा मज्मना पुरुष्टुतो मर्तं शंसं विश्वधा वेति धायसे ६

आत् । इत् । होतारम् । वृणते । दिविष्टिषु । भगम्ऽइव । पपृचानासः । ऋञ्जते ।

देवान् । यत् । क्रत्वा । मज्मना । पुरुऽस्तुतः । मर्तम् । शंसम् । विश्वधा । वेति । धायसे ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. आदित् (=तदानीमेव) [तमग्निं] दिविष्टिषु (=यज्ञेषु) होतारं (=देवानामाह्वातारं) वृणते (=संभजन्ते मनुष्याः) [अपि च] पपृचानासः (=स्तुत्यादिना पूरयन्तः=तोषयन्तो) भगमिव (=" महान्तं राजानमिव ") ऋञ्जते (=प्रसाधयन्ति) (=प्रसादयन्ति) । यत् (=यस्मात् कारणात्) पुरुष्टुतः (=बहुभिः स्तुतः) [स] क्रत्वा मज्मना (=स्वकीयया प्रज्ञया महत्त्वेन) [च] देवान् (=इन्द्रादीन्) मर्तं शंसं (=मर्त्यं जनं प्रति तस्य स्तोत्रं प्रति च) धायसे (=हविरन्नाय=हविरन्नस्वीकाराय) विश्वधा वेति (=सर्वदा गमयति) ॥

६. तेव्हां लागलाच [अग्नीला] यज्ञामध्यें होत्याच्या ठायीं स्थापितात; [आणि] [एकाद्या] मोठ्या राजाला [प्रसन्न करावें] तसें, [स्तुति इत्यादिकेंकरून] मोठ्या प्रेमानें [त्याला] भजून प्रसन्न करितात. कारण कीं बहुतांनीं स्तविलेला [असा जो अग्नि, तो] [आपल्या] प्रज्ञेनें [आणि] मोठेपणानें देवांला मर्त्य [उपासका]प्रत [आणि] [त्याच्या] स्तोत्राप्रत हविरन्नासाठीं नित्य घेऊन येतो.

6. Then do worshippers choose [him] [as their] invoker in sacrifices; [and] gratifying [him] [with praises] like a great king, propitiate [him]. For praised by many he, with [his] wisdom [and] greatness, always brings the Gods to the mortal [and] to [his] prayer for [receiving his] oblation.

६. 'वर सांगितल्याप्रमाणें अग्नि सिद्ध झाला म्हणजे, तत्क्षणींच त्याला भक्तजन होत्याच्या कामीं, म्हणजे यज्ञसंपादकाच्या कामीं योजितात; म्हणजे तो यज्ञसंपादक आहे असें समजून त्याची एकाद्या मोठ्या राजाची स्तुति केल्याप्रमाणें स्तुति करून त्याला प्रसन्न करितात. कारण कीं, बहुत ज्याला भजतात असा जो हा अग्नि, तो आपल्या प्रज्ञेच्या योगेंकरून आणि प्रभावाच्या योगेंकरून देवांला नित्य मर्त्य उपासकाचे घरीं घेऊन येतो आणि त्याचें स्तोत्र आणि हविरन्न हीं त्यांजकडून स्वीकारवितो' असा याचा भावार्थ आहे. हा मंत्र उघड आहे, पूर्वीच्या मंत्रांसारिखा दुर्बोध आणि क्लिष्टार्थ नाहीं.

'एकाद्या मोठ्या राजाला'=' भगम् इव.' हा अर्थ सायणानुसार केला आहे आणि आम्हांस वाटतें, तो बरोबर आहे. दुसऱ्याहि कितीएक ठिकाणीं 'भग'शब्दाचा अर्थ सायणांनीं असाच केला आहे.

'नित्य'='विश्वधा.' या ठिकाणीं जरी सायणांनीं निराळा अर्थ केला आहे ('सर्वधनवान्' अथवा 'विश्वात्मक' असा), तरी ऋ. २. ८९. २ आणि त्याजवरील त्यांचें भाष्य पहा.

'घेऊन येतो'='वेति'. अक्षरशः 'जाववितो' अथवा 'येववितो' असा अर्थ आहे, तथापि 'गमयति' असा अर्थ 'वेति' क्रियापदाचा होत असतो, आणि स्वतः सायणांनींच ऋ. ६. २. ११ (वीहि स्वस्ति सुक्षितिं दिवः नॄन्) या ठिकाणीं तसा केला आहे. सांप्रतच्या मंत्रांत मात्र त्यांणीं 'इच्छितो' असा अर्थ केला आहे, तो येथें जुळत नाहीं.

**वि यदस्थाद्यजतो वातचोदितो ह्वारो न वक्वा जरणा अनाकृतः।**
**तस्य पत्मन्दक्षुषः कृष्णजंहसः शुचिजन्मनो रज आ व्यध्वनः ७**

वि । यत् । अस्थात् । यजतः । वातऽचोदितः । ह्वारः । न । वक्वा ।
जरणाः । अनाकृतः ।
तस्य । पत्मन् । धक्षुषः । कृष्णऽजंहसः । शुचिऽजन्मनः । रजः ।
आ । विऽअध्वनः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. यत् (=यदा) यजतः (=यजनीयः) [अग्निः] वातचोदितः (=वातप्रेरितः सन्) वक्वा ह्वारो जरणा न (=कश्चिद् वाग्मी कुटिलपुरुषो यथा स्तुतीर्वितिष्ठते= " विविधं कुर्वन् वर्तते तद्वत् ") अनाकृतः (=अनिवारितः=अप्रतिहतप्रसरः) वि अस्थात् (=वितिष्ठते=सर्वतो व्याप्तो भवति) [तदानीं] तस्य धक्षुषः (=दहतः) कृष्णजंहसः (=कृष्णमार्गस्य) शुचिजन्मनः (=शुद्धजननस्य) व्यध्वनः (=विविधमार्गस्य=" विविधज्वालस्यानियतमार्गस्य ") [अग्नेः] पत्मन् (=पत्मनि=मार्गे) रजः आ (=अन्तरिक्षप्रदेशा आसमन्तात्) [भवन्ति] ॥

वातप्रेरित इवाग्निर्यदा प्रसरति तदा सोऽन्तरिक्षप्रदेशेषु व्याप्तो भवति न केवलं भूमौ तिष्ठतीति भावः ॥

ह्वारो न वक्वा जरणा इत्यत्यन्तदुर्बोधम् ।

सायण इमामृचमेवं व्याचष्टे । यत् यदायमग्निर्वातचोदितो वायुना प्रेरितः । तृतीया कर्मणीति पूर्वपदप्रकृतिस्वरत्वम् । यजतः सर्वैर्यष्टव्यो यष्टुं योग्यः सन् व्यस्थात् । वितिष्ठते सर्वतो व्याप्तो भवति । तत्र दृष्टान्तः । अनाकृतोऽनिवारितोऽप्रतिहतप्रसरो वक्वा बहुवक्ता । वचेरन्येभ्योऽपि दृश्यन्त इति वनिप् । दृशिग्रहणात्कुत्वम् । ह्वारो न कुटिल इव विदूषणकादिरिव । ह्वरतेर्ण्यन्तात्पचाद्यच् । स यथा जरणाः स्तुतीर्वितिष्ठते । विविधं कुर्वन् वर्तते । तद्वदयमप्यनाकृतोऽप्रतिबद्धप्रसरो व्यवस्थितः । तदा तस्याग्नेः पत्मन् पतने मार्गे यज्ञरूपे रजो रञ्जनात्मको लोक आस्थात् । आतिष्ठति । सर्वत आश्रयति । अग्नौ बहुधा यजतीत्यर्थः । कीदृशस्य तस्य । धक्षुषो दहतः । दहेर्लिटः क्वसुः । कृष्णजंहसः । कृष्णमार्गस्य । पुनः पुनर्गम्यत इति जंहो मार्गः । हन्तेर्यङ्लुगन्तात्कर्मण्यसुन् । कुत्वाभावश्छान्दसः । शुचिजन्मनः मन्त्रसहितारण्योरुत्पन्नत्वात् । व्यध्वनः । विविधज्वालस्यानियतमार्गस्य । इति ॥

७. जेव्हां पूज्य [ आणि ] वातप्रेरित होत्साता [ अग्नि ], जसा एकादा बोलका कुटिल मनुष्य स्तुतींच्या मधून अनावर होऊन पसरतो, तसा पसरतो, तेव्हां त्या दाहक, कृष्णमार्ग, शुद्धजन्म [आणि] विविधमार्ग अग्नीच्या मार्गांत अंतरिक्षलोक येतो.

7. When adorable [Agni], propelled by the wind, extends himself unresisted, even as [ does] an eloquent satirist through praises, then on the path of burning [ Agni ] whose path is black, whose birth is pure [ and ] who travels in all various directions, there lies the firmament.

---

७. ही एक ऋचा पुनः फार दुर्बोध आहे. प्रथमार्धांत एक उपमा दुर्बोध आहे. आणि उत्तरार्धांत क्रियापद नाहीं. पण भावार्थ असा दिसतो कीं, 'अग्नि वाढूं लागला म्हणजे केवळ पृथिवीवरच वाढतो असें नाहीं, तर तो सर्व अंतरिक्षभर पसरतो; आणि तो हळुहळू पसरतो असेंहि नाहीं, तर वायूनें जणुं लोटून दिलेला असा होत्साता फार सपाट्यानें पसरतो.'

'जसा एकादा बोलका कुटिल मनुष्य स्तुतींच्या मधून अनावर होऊन पसरतो तसा'='ह्वारो न वक्वा जरणा अनाकृतः' ह्याचा अर्थ कांहीं उघड नाहीं. आम्हीं सायणांस अनुसरून अक्षरशः भाषांतर केलें आहे; पण कवीच्या मनांत खरोखर काय आहे तें कळत नाहीं. 'ह्वार' शब्द तीनदा वेदांत आला आहे, पण तिन्ही ठिकाणीं सायणांनीं तीन निरनिराळे अर्थ केले आहेत, आणि ते बहुतकरून निर्वचनावलंबी आहेत. त्यावरून अर्थनिर्णयाला आधार नाहीं.

'कृष्णमार्ग'='कृष्णजंहसः.' म्हणजे जो जाऊं लागला म्हणजे, त्याच्या मागें काळा मार्ग राहतो.

'विविधमार्ग'='व्यध्वनः.' हाहि शब्द कठिण आहे, दुसरे प्रयोग नाहींत; त्यामुळें केवळ सायणांस अनुसरून निर्वचनास अवलंबून अर्थ केला आहे. भाषा पहा.

वृत्तासाठीं 'व्यध्वनः' हा शब्द पदपाठांत लिहिल्याप्रमाणें वाचावा.

रथो न यातः शिक्वभिः कृतो द्यामङ्गेभिररुषेभिरीयते ।
आदस्य ते कृष्णासो दक्षि सूरयः शूरस्येव त्वेषथादीषते वयः ॥८

रथः । न । यातः । शिक्वऽभिः । कृतः । द्याम् । अङ्गेभिः । अरुषेभिः । ईयते ।
आत् । अस्य । ते । कृष्णासः । धक्षि । सूरयः । शूरस्यऽइव । त्वेषथात् । ईषते । वयः ॥ ८ ॥

भाषायाम्.

८. शिक्वभिः (=शक्तिमद्भिः) [पुरुषैः] कृतः (=निर्मितो) यातः (=यापितः प्रेरितश्च) रथो न (=रथ इव) [अयमग्निः] अरुषेभिरङ्गेभिः (=आरक्तवर्णैरङ्गैर्) द्यां (=द्युलोकं प्रति) ईयते (=गच्छति) । आत् (=तदानीम्) अस्य (=तस्याग्नेस्) ते (=प्रसिद्धाः) कृष्णासः (=कृष्णाः=कृष्णवर्णाः) सूरयः (=दीप्तयः=धूममिश्रितानि तेजांसि) धक्षि (?=दहन्ति यत्रन्मार्गे तिष्ठति तत्तद्दहन्ति) [एवं सति] शूरस्येव त्वेषथात् (=कस्यचिद्विक्रान्तस्य पुरुषस्य तेजसः सकाशादिव) वयः (=पक्षिजातम्) ईषते (=पलायते) ॥

सायणस्तु अयमग्निः शिक्वभी रज्जुभिः कृतो बद्धो रथो न रथ इव । स यथा स्वीयैश्चक्रादिभिरङ्गैरीयते तद्वत् यातः स्थापितः सन् अरुषेभिर्गमनशीलैरङ्गैभिर्ज्वालादिरूपैरवयवैर्द्यामन्तरिक्षमाज्येन हृष्टः सन् ईयते । गच्छति ।......आत्...... ते सूरयः सरणयो मार्गाः कृष्णासः कृष्णवर्णा भवन्ति ।...... अन्तरिक्षं स्पृशन् सर्वतो दहतीति सर्वदा दावाग्निरूपेण स्तूयते । इति ॥

८. सामर्थ्यवान् [पुरुषां]नीं केलेला [आणि] चालविलेला रथ [जसा] [जातो], तसा [अग्नि] [आपल्या] आरक्त अंगांनीं द्युलोकाप्रत जातो. त्या वेळीं त्याच्या त्या काळ्या प्रदीप्ति जाळीत जातात. शूराच्या [भयानें पळाल्या]-प्रमाणें पक्षी भयानें पळून जातात.

8. Like a chariot, made [and] set in motion by [men] of powers, he rolls on towards heaven with [his] ruddy limbs. Then those his black splendors burn. All birds fly away as from fear of a hero.

---

८. 'जसा एकादा रथ जातो, तसा अग्नि आपल्या लाल ज्वालारूप चक्रांनीं आकाशीं चढतो. तेव्हां धुरानें काळ्या झालेल्या त्याच्या ज्वाला आसपासच्या आणि मधें येणाऱ्या सर्वांस जाळून भस्म करितात. आणि एकाद्या काळपुरुषाला भिऊन जसे पळतात तसे पक्षी त्याला भिऊन पळतात.

हा मंत्र एकंदरींत सोपा आहे; पण यांत रथाच्या संबंधाचीं केलेलीं जीं विशेषणें तीं, आणि अग्नीच्या काळ्या दीप्ति जाळतात म्हणून सांगितलें आहे तो भाग, इतकें कठिण आहे.

'सामर्थ्यवान् [पुरुषां]नीं'=' शिक्वभिः.' हा शब्द इतर ठिकाणीं आला आहे ते प्रयोग पाहून आम्हीं येथें भाषांतर केलें आहे.

'आरक्त अंगांनीं'='अरुषेभिरङ्गेभिः.' म्हणजे तांबड्या ज्या अग्नीच्या ज्वाळा, त्यांसहित किंवा त्यांच्या योगानें, असा भावार्थ.

'काळ्या प्रदीप्ति जाळीत जातात'='कृष्णासो दक्षि सूरयः." अक्षरशः काळे प्रवाह.' काळे प्रवाह म्हणजे धुरानें काळे झालेले जे अग्नीचे प्रवाह, अथवा निखाऱ्यांनीं धगधगीत असलेले अग्नीचे भाग, अथवा त्याच्या ज्वाळा, हें उघड आहे. परंतु 'जाळितात' या अर्थाचें जें 'दक्षि' (पदपाठांत 'धक्षि') असें क्रियापद आहे, तें द्वितीय पुरुषीं आहे इतकेंच नव्हे, पण एकवचनीं आहे. त्यावरून या वाक्यामध्यें पाठाविषयीं कांहीं तरी प्रमाद झाला असावा असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

'पक्षी'='वयः.' 'वयः' हें येथें 'वि' शब्दाचें अनेकवचन नव्हे, तर 'पक्षिसमूह' अथवा 'पक्षिजन' या अर्थी समुदायवाचक शब्द आहे.

वृत्तासाठीं 'द्याम्'च्या ठिकाणी 'दिआम्' असें पहिल्या पादांत म्हणावें; दुसऱ्यांत दोन अक्षरें कमी आहेत, त्यांच्या भरतीस 'अग्निः' असा शब्द 'अङ्गेभिः' या शब्दाच्या मागून असता तर बरें झालें असतें. तसें नसल्यामुळें दुसरा पाद खालीं लिहिल्याप्रमाणें वाचला पाहिजे.

अङ्गे एभिरुरुषेभिरिईयते ।

त्वया ह्यग्ने वरुणो धृतव्रतो मित्रः शाशद्रे अर्यमा सुदानवः ।
यत्सीमनु क्रतुना विश्वथा विभुरराञ्न नेमिः परिभूरजायथाः ॥ ९

त्वया । हि । अग्ने । वरुणः । धृतऽव्रतः । मित्रः । शाशद्रे । अर्यमा । सुऽदानवः ।
यत् । सीम् । अनु । क्रतुना । विश्वऽथा । विऽभुः । अरान् । न । नेमिः । परिऽभूः । अजायथाः ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. हि (=यस्मात् कारणात्) हे अग्ने, वरुणः मित्रः अर्यमा [च] [प्रत्येकं] धृतव्रतः [सन्] (=धृतव्रताः सन्तः=धारितकर्माणः सन्तः=येषां शासनं सर्वे धारयन्ति पालयन्ति तादृशाः सन्तः) शाशद्रे (=शत्रून् वृत्रादीन् हिंसन्ति) सुदानवः (=शोभनदानाश्च) [भवन्ति] । यद् (=यस्मात् कारणात्) क्रतुना (=तव कर्मणा=शौर्यकर्मणा) अरान् न नेमिः (=अरान् नेमिरिव) (=अरान् यथा नेमिर्बाह्यवलयः परिभूर्भवति=परितो वेष्टते तथा) सीम् अनु (=एतान्=वरुणमित्रार्यमण उद्दिश्य) विश्वथा (=सर्वेण प्रकारेण) विभुः परिभूरजायथाः (=महान् परिवेष्टनकर्ता जातोसि=तान् परिवेष्ट्य तेषां रक्षको जातोसि) ॥

सायणस्तु धृतव्रतः स्वीकृतवर्षणादिकर्मा भवति । ...... परिभूः स्वतेजसा सर्वतः परिभाविता सन् अनुक्रमेणाजायथाः । ...... तत्र दृष्टान्तः । अरान् रथस्य चक्रान् नेमिर्न बाह्यवलय इव । स यथा व्याप्य तिष्ठति तद्वदयमग्निर्वरुणादीन्व्याप्य तिष्ठति । इति ॥

९. कारण कीं हे अग्नी, तुझ्या मुळेंच वरुण, मित्र, [आणि] अर्यमा यांचीं शासनें सर्व जग पाळितें, [आणि] ते [शत्रूंचा] पराभव करितात, [ आणि ] मोठे दाते होतात; कारण कीं तूं [आपल्या] पराक्रमानें सर्व प्रकारेंकरून, अरां[चें संरक्षण ] पाटा [करितो] तसें, त्यांचें संरक्षण करणारा महापुरुष जन्मला आहेस.

9. For through thy aid, O Agni, do Varuṇa, Mitra, [ and ] Aryaman hold their laws intact, destroy the enemy, [and become ] bounteous givers [to men]; for thou with [ thy ] valour hast been a great protector of them in all ways, even as a felly [protects ] the spokes.

९. 'हे अग्नी, त्रिभुवनाचे राजे असे जे वरुण, मित्र आणि अर्यमा हे देव, त्यांची आज्ञा सर्व लोक पाळितात, ते वृत्रादिक शत्रूंचा नाश करितात आणि मनुष्यांला संपत्ति देतात, हा तुझाच पराक्रम आहे. कारण जसा रथाच्या अऱ्यांला वेष्टून पाटा राहतो, आणि त्यांचें संरक्षण करितो, तसा तूं वरुणादिकांला सर्व प्रकारांनीं व्यापून त्यांचें सर्व प्रकारेंकरून संरक्षण करीत असतोस ' असा भावार्थ.

' वरुण......यांचीं शासनें सर्व जग पाळितें '=' धृतव्रतः. ' सू. ४४ मं. १४ आणि त्याजवरील टीप पहा. सायणाचार्य ' जो वृष्ट्यादिक आपलीं कामें बजावितो ' असा अर्थ करितात. हा ' धृतव्रत ' शब्द ऋक्संहितेंत बरेच वेळ आला आहे. तो ' वरुणादिक ' जे त्रैलोक्याचे ' राजे, ' त्यांस विशेषणार्थी लाविला आहे. तेव्हां ज्यांचें शासन सर्व लोक मानितात ते, असा अर्थ चांगला संभवतो. सायणाचार्य ' वृष्टि करण इत्यादि कामें जे बजावितात ते ' असें बहुतकरून भाष्य करीत असतात.

' शत्रूंचा पराभव करितात '=' शाशद्रे. ' शद् धातूचीं रूपें इतर मंत्रांत आलीं आहेत तीं स्थळें पाहून आम्ही येथें अर्थ केला आहे.

या मंत्रांत ऋषि अग्नीची योग्यता वरुण, मित्र आणि अर्यमा इत्यादि मोठ्या देवांपेक्षांहि मोठी समजतो हें लक्ष्यांत ठेवावें. अग्नि म्हणजे केवळ भौतिक अग्नि घ्यावयाचा नाहीं, तर पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक यांचा जो निःसीम अवकाश त्यांत उजेडाच्या आणि तेजाच्या रूपानें वर्तणारा जो अग्नि, तद्रूप देव समजावयाचा आहे.

**त्वमग्ने शशमानाय सुन्वते रत्नं यविष्ठ देवतातिमिन्वसि ।**
**तं त्वा नु नव्यं सहसो युवन्वयं भगं न कारे महिरत्न धीमहि ॥ १०**

त्वम् । अग्ने । शशमानाय । सुन्वते । रत्नम् । यविष्ठ । देवऽतातिम् ।
इन्वसि ।
तम् । त्वा । नु । नव्यम् । सहसः । युवन् । वयम् । भगम् । न । कारे ।
महिऽरत्न । धीमहि ॥ १० ॥

**अस्मे रयिं न स्वर्थं दमूनसं भगं दक्षं न पपृचासि धर्णसिम् ।**
**रश्मींरिव यो यमति जन्मनी उभे देवानां शंसमृत आ च सुक्रतुः ॥ ११ ॥**

अस्मे इति । रयिम् । न । सुऽअर्थम् । दमूनसम् । भगम् । दक्षम् ।
न । पपृचासि । धर्णसिम् ।
रश्मीन्ऽइव । यः । यमति । जन्मनी इति । उभे इति । देवानाम् ।
शंसम् । ऋते । आ । च । सुऽक्रतुः ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

१०. हे यविष्ठ अग्ने (=अतिशयेन यौवनोपेत अग्ने), त्वं शशमानाय (=स्तुवते भक्ताय) सुन्वते (=सोमाभिषवं कुर्वते च) रत्नम् (=उत्तमां संपदं) देवतातिं (=देवसमूहं च) इन्वसि (=प्रेरयसि=आगमयसि) । नव्यं (=स्तवनीयं) तं त्वा (=तं त्वाम्=अतः कारणात् त्वां) हे महिरत्न (=महाधन) सहसो युवन् (=बलस्य यौवनोपेत पुत्र), भगं न (=महान्तं राजानमिव) नु (=क्षिप्रं) कारे (=स्तोत्रे) धीमहि (=स्थापयामः=त्वां स्तुमः)॥ यस्मात् कारणात् त्वं देवान् उपासकं प्रति आवहसि तेभ्यश्च तं धनं प्रापयसि अतः कारणाद् वयं त्वां महान्तं राजानमिव नः स्तोत्रे स्तुम इति भावः ॥

११. [हे अग्ने], स्वर्थं (=शोभनप्रयोजनं) दमूनसं (=गृहसंबन्धिनं) रयिं न (=धनं यथा तथैव=धनं च) भगं धर्णसिं दक्षं न (=भाग्यं धारणसमर्थं=प्रबलं बलं च) अस्मे पपृचासि (=अस्मासु संपृणक्षि=अस्मभ्यं देहि) । यः [अग्नी] रश्मीनिव उभे जन्मनी (=देवजातमनुष्यजाते=देवान् मनुष्यांश्च प्रग्रहानिव) यमति (=नियमयति=तेषां नियामको भवति) । च (=अपि च) सुक्रतुः (=शोभनप्रज्ञोभिर्) देवानां शंसं (=देवानां स्तोत्रम्) ऋते आ (=यज्ञे) [यमति=नियमयति] ॥

१०. हे अति तरुण अग्नी, तूं स्तोत्र करणाऱ्याला आणि सोम काढून अर्पण करणाऱ्याला उत्तम संपत्ति [ आणि ] देवसमूह घेऊन येतोस. म्हणून हे बळाच्या पुत्रा, स्तवनीय जो तूं त्या तुला, हे महाधनसंपन्न [अग्नी], आम्ही, मोठ्या राजाला स्तविल्याप्रमाणें, आमच्या स्तोत्रांत स्तवितों.

१०. Thou, O ever youthful Agni, bringest wealth and the gods to the person who praises [thee], [ and ] to the person who extracts the Soma [for thee]. We, therefore, place thee who art praiseworthy, youthful son of might, in our hymn like a great king, O thou possessed of excellent wealth !

११. [ हे अग्नी ], तूं आम्हांला चांगल्या उपयोगीं पडणारी घरसंबंधी संपत्ति आणि भाग्य, आणि प्रबळ सामर्थ्य दे. जो [अग्नि] लगाम चालविल्याप्रमाणें [देवसंबंधी आणि मानवी या] दोहीं योनींवर आपली सत्ता चालवितो. सुप्रज्ञ [ अग्नि ] यज्ञांत देवांविषयींच्या स्तोत्रावर [ आपली सत्ता चालवितो].

11. Grant us, [O Agni], useful [ and ] household wealth and good fortune and powerful strength,—[ Agni ], who governs the two races [ of gods and of men ], like the reins; wise [ Agni ] [ governs ] the praise of the gods in the sacrifice.

---

१०. 'हे अग्नी, तूं देवांस भक्ताकारणें घेऊन येत असतोस, यास्तव आम्ही तुला एकाद्या महाराजाची स्तुति केल्याप्रमाणें स्तवितों' असा भावार्थ आहे.

'अतितरुण'='यविष्ठ.' सू. २२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

'स्तोत्र करणाऱ्याला आणि सोम काढून अर्पण करणाऱ्याला'='शशमानाय सुन्वते.' यांत स्तोत्रकर्ता ऋषि अथवा कवि, आणि यज्ञ करणारा यजमान, असे दोन निरनिराळे पुरुष दर्शविले आहेत.

'उत्तम संपत्ति [ आणि ] देव घेऊन येतोस'='रत्नं देवतातिम् इन्वसि.' म्हणजे देवांस घेऊन येतोस आणि त्यांजकडून भक्ताला उत्तम संपत्ति देववितोस असें तात्पर्य. सायणाचार्य 'आम्हीं दिलेलें हवि देवांप्रत पोंहचवितोस' असा अर्थ करितात.

'आमच्या स्तोत्रांत स्तवितों'='कारे

उत नः सुद्योत्मा जीराश्वो होता मन्द्रः शृणवच्चन्द्ररथः ।
स नो नेषन्नेषतमैरमूरोऽग्निर्वामं सुवितं वस्यो अच्छ ॥ १२ ॥

उत । नः । सुऽद्योत्मा । जीरऽअश्वः । होता । मन्द्रः । शृणवत् । चन्द्रऽरथः ।

सः । नः । नेषत् । नेषऽतमैः । अमूरः । अग्निः । वामम् । सुवितम् । वस्यः । अच्छ ॥ १२ ॥

---

### भाषायाम्.

१२. उत (=अपि नाम ) सुद्योत्मा (=सुद्योतमानो ) जीराश्वः (=शीघ्रगमनाश्वो ) मन्द्रः (=मदनशीलः=आनन्दकारी ) चन्द्ररथः (=आह्लादकारिरथो ) होता (=अयमग्निरूपो देवानामाह्वाता ) नः श्रवणत् (=अस्मान् शृणुयात् ? =अस्माकं प्रार्थनां शृणुयात् किम् ) ? सः अमूरः (=अमूढः=सुप्रज्ञः ) अग्निर्नः (=अस्मान् ) नेषतमैः (=अत्यन्तं नेतृभिः=अत्यन्तं सुखं यथा तथा नेतृभिः ) [ स्वकीयैरश्वैः ] वामं सुवितं (=वननीयं=काम्यं सुखं ) वस्यः अच्छ (=वसीयः=अतिशयेन साधु धनम्=अतिशयवसुमत्त्वं प्रति ) नेषत् [ उत ] (=नयेत् किम् ) ?

उतशब्दोपिशब्दार्थः । स च संभावनायाम् । ...... उत शृणवत् । अपि नाम शृणुयात् । ...... उत नेषत् । अपि नाम नयेत् । इति सायणाचार्याः ॥

---

धीमहि.' अक्षरशः अर्थ, 'स्तोत्रांत ठेवितों' अथवा स्थापितों.' असा आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'त्वम्'-च्या ठिकाणीं 'तुअम्' असें म्हणावें.

११. 'हे अग्नी, तूं देव आणि मनुष्य या उभय लोकांचा नियन्ता आहेस; तूं यज्ञांत मनुष्यांच्या हातून चांगली देवांविषयीं स्तुति करवितोस, आणि ती देवांला पोंहचे असें करितोस; तर तूं आम्हाला घरीं उपयोगीं पडणारी अशी आणि जिचा चांगला उपयोग होईल अशी संपत्ति, आणि भाग्य, आणि बळ आणि सामर्थ्य हीं आम्हांस मिळतील असें कर' असा भावार्थ आहे.

'प्रबळ सामर्थ्य'=' धर्णसिं दक्षम्.' म्हणजे जें सामर्थ्य टिकाव धरील असें, जें थोडक्या संकटानें नष्ट होणारें नव्हे असें.

या ठिकाणीं अग्नीची सत्ता देवांवर आणि मनुष्यांवर चालते आणि तो देवांची सेवा मनुष्यांकडून करवून मनुष्यांचें कल्याण देवांकडून करवितो असें म्हटलें आहे त्याजकडेस लक्ष्य द्यावें.

या ऋचेंत प्रथम द्वितीय पुरुषीं नि-

१२. सुप्रभावान्,शीघ्राश्व, आनंदकारी, [ आणि ] सुरथवान् होता [ जो अग्नि, तो ] आमचें ऐकेल काय ? तो प्रज्ञावान् अग्नि उत्तम तऱ्हेनें वाहून नेणाऱ्या [घोड्यां]च्या योगानें आम्हांला सुंदर सुखाप्रत [ आणि ] भाग्याप्रत नेईल काय ?

12. May the brilliant [and] delightful invoker [of the gods], who has quick horses [and] who has a beautiful chariot, hear us? May that wise Agni take us, with the excellent guides, [his horses], to delightful happiness [and] blessedness?

देश असून नंतर तृतीय पुरुषी आहे. आणि हें पुरुषांतर वृत्तासाठीं झालेलें नाहीं, कारण ' यमति 'च्या बद्दल ' यमसि ' घातलें असतें तर वृत्तसंबंधी कांहीं अडचण आली नसती; पण वैदिक युगांत अशा प्रकारचें पुरुषांतर करणें यांत कांहीं वाईट आहे असें मानीत नव्हते. कशीहि भाषा असली तरी बोलणाऱ्याच्या मनांतील अर्थ उत्तम रीतीनें ऐकणाऱ्यांस समजला म्हणजे पुरे अशीच समजूत असे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' स्वर्थ'-च्या ऐवजीं ' सुअर्थ ' असें म्हणून तिसरा चरण ' रश्मींवे यो यमति जन्मनी उभे ' असा म्हटला पाहिजे. म्हणजे ' रि ' अक्षराचा अपभ्रंश होऊन त्याचा केवळ रेफच राहतो.

१२. ' उत्तम रीतीनें प्रकाशणारा, उत्तम घोडे ज्याच्या रथाला जोडिलेले असतात, जो आनंदकारक, ज्याचा रथ मनोहर होय, असा जो अग्निरूप होता, तो आमची प्रार्थना ऐकेल काय ? अग्नि आपल्या अतिचपल घोड्यांच्या योगानें आम्हांस उत्तम सुखाप्रत आणि मोठ्या भाग्याप्रत पोंहचवील काय ?' असें ऋषि आपल्या मित्रांस अथवा जवळ असलेल्यांस अथवा आपणालाच विचारीत आहे.

' भाग्याप्रत '='वस्यः.' ऋ. ८. २७. २२ आणि त्यावरील सायणाचें भाष्य पहा.

वृत्तासाठीं पहिला चरण ' उत नः सुद्योतमा जीरअश्वः ' असा वाचला पाहिजे.

**अस्तांव्यग्निः शिमीवद्भिरर्कैः साम्राज्याय प्रतरं दधानः ।**
**अमी च ये मघवानो वयं च मिहं न सूरो अति निष्टतन्युः ॥ १३ ॥ ९ ॥**

अस्तावि । अग्निः । शिमीवत्ऽभिः । अर्कैः । साम्ऽराज्याय । प्रऽतरम् । दधानः ।
अमी इति । च । ये । मघऽवानः । वयम् । च । मिहम् । न । सूरः । अति । निः । ततन्युः ॥ १३ ॥ ९ ॥

---

**भाषायाम्.**

१३. [अनेन प्रकारेण] साम्राज्याय (=सम्राड् यथा प्रकाशते तथा) प्रकाशनाय प्रतरं दधानः (=प्रकृष्टतरं धृतः=पुरतः स्थापितः) अग्निः शिमीवद्भिः अर्कैः (=कर्मयुक्तैः स्तोत्रैः) अस्तावि (=स्तुतोभूत्)। अमी च ये मघवानः (=हविर्द्रव्यवन्तः =यजमानास्ते) वयं च मिहं न सूरः (=मेघं सूर्यो यथा नादयति तथा) अति निः ततन्युः (=अत्यर्थं शब्दयन्तु=अत्यर्थं स्तोत्रैर्ध्वनिं कुर्याम) ॥

सायणस्तु साम्राज्याय साम्राज्यस्येति कर्मणि षष्ठीस्थाने चतुर्थी । सम्यग्राजमानं त्वं प्रतरं प्रकृष्टतरमत्यर्थं दधानः । इति ॥

अति अत्यर्थं निष्टतन्युः । शब्दयन्तु । निष्पूर्वः स्तनतिः शब्दकर्मेति सम्यक्स एव ॥

---

**१३. [या प्रकारेंकरून] अग्नीला पुढें ठेवून साम्राज्यानें त्याणें शोभावें म्हणून कर्मयुक्त स्तोत्रांनीं त्याला स्तविलें आहे. हे जे यजमान, त्यांहीं आणि आम्ही जे त्यांहीं, सूर्य जसा मेघाला गर्जवितो त्याप्रमाणें, स्तोत्राच्या योगानें गर्जत राहावें असें होओ.**

13. [Thus] has Agni, put before us for to shine as the king of all, been praised with hymns accompanied by rites. May these [men] who [are] sacrificers, as well as we, ever reverberate with [his praises] loudly even as the sun [makes the cloud [rumble].

---

१३. येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. ऋषि म्हणतोः 'या प्रकारेंकरून आम्हीं अग्नीनें साम्राज्यानें प्रकाशावें म्हणून त्याला अगदी आपल्या समोर ठेवून यजन करून स्तोत्रांनीं त्याला पूजिलें आहे. तर आम्ही आणि हे यजमान लोक ह्यांनीं, सूर्य जसा मेघाला गर्जवितो, तशी अग्नीविषयींच्या स्तोत्रांनीं गर्जना करावी ही आमची इच्छा आहे.'

'साम्राज्यानें शोभण्यासाठीं '=' साम्राज्याय.' म्हणजे राजाधिराजाप्रमाणें शोभावें म्हणून.

'कर्मयुक्त स्तोत्रांनीं '=' शिमीवद्भिः अर्कैः.' म्हणजे यजनकर्मांनीं आणि स्तोत्रांनीं.

'सूर्य जसा मेघाला गाजवितो तसा' =' मिहं न सूरः.' यांतील उपमा चमत्कारिक आहे. सूर्य मेघाला गाजवितो असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं प्रसिद्ध नाहीं.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'अस्तावि अग्निः' असें, आणि दुसऱ्यांत 'साम्राजिआय' असें म्हणावें लागतें.

## सूक्तम् १४२.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । प्रथमायाः समिद्धोग्निर्देवता । द्वितीयायास्तनूनपात् । तृतीयाया नराशंसः । चतुर्थ्या ईळितोग्निः । पञ्चम्या बर्हिः । षष्ठ्या देव्यो द्वारः । सप्तम्या उषासानक्ता । अष्टम्या दैव्यौ होतारौ । नवम्याः सरस्वतीळाभारत्यस्तिस्रो देव्यः । दशम्यास्त्वष्टा । एकादश्या वनस्पतिः । द्वादश्याः स्वाहाकृतिः । त्रयोदश्या इन्द्रः । अनुष्टुप् छन्दः ॥

**समिद्धो अग्न आ वह देवाँ अद्य यतस्रुचे ।**
**तन्तुं तनुष्व पूर्व्यं सुतसोमाय दाशुषे ॥ १ ॥**

सम्ऽइद्धः । अग्ने । आ । वह । देवान् । अद्य । यतऽस्रुचे ।
तन्तुम् । तनुष्व । पूर्व्यम् । सुतऽसोमाय । दाशुषे ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अग्ने, समिद्धः (=अस्माभिः सम्यक् प्रदीप्तस्त्वम् ) अद्य यतस्रुचे (=यागायोद्यतस्रुचे यजमानाय ) देवान् आ वह (=आनय ) । [ अपि च ] सुतसोमाय दाशुषे (=अभिषुतसोमाय हविर्दत्तवते यजमानाय ) पूर्व्यं तन्तुं तनुष्व (=पूर्वैः कृतं तन्तुं यज्ञावयवान् विस्तारय=यजमानार्थं यज्ञं विस्तारय=कुरु ) ॥

## सूक्त १४२.

ऋषि–उचथ्याचा पुत्र दीर्घतमा (पूर्व सूक्ताचा जो कर्ता तोच). देवता– १ली समिद्ध नांवाच्या, म्हणजे पेटविलेल्या, अग्नीविषयीं; २री तनूनपात् या नांवाच्या अग्नीविषयीं; ३री नराशंस अग्नीविषयीं; ४थी इळ याविषयींची, म्हणजे स्तविलेला ( ईळित ) जो अग्नि त्याविषयींची; ५वी बर्हिविषयींची; ६वी द्वारांविषयींची; ७वी उषासानक्ता ( म्हणजे उषा आणि रात्र ); ८वी दैव्यौ होतारौ प्रचेतसौ यांविषयींची; ९वी तीन देवी म्हणजे सरस्वती, इला, भारती यांविषयीं; १०वी त्वष्टा याविषयीं; ११वी वनस्पति, म्हणजे यूप अथवा यज्ञस्तंभ, याविषयीं; १२वी स्वाहाकृति याविषयीं; पण वास्तविकपणें पूषा, मरुत्, वायु, विश्वे देव आणि इंद्र यांविषयीं; १३वी इंद्राविषयीं. वृत्त–अनुष्टुभ्.

१. हे अग्नी, पेटविलेला [जो तूं, तो ] देवांला आज पळी पुढें करणाऱ्या [ उपासका]प्रत घेऊन ये. [ तूं ] सोम काढून अर्पण करणाऱ्या [ या ] भक्ताकारणें पुरातन तंतु ताण.

## Hymn 142.

To *Samiddha Agni*, i.e., The *Fire kindled* ( 1 ); *Tanûnapât* i. e. *Agni* born of himself ( 2 ); *Narâs'aṁsa* i. e. *Agni* praised by men ( 3 ); *Îlita Agni*, i. e., *Agni praised* (4); the *Barhih*, i. e., the sacrificial grass ( 5 ); *Dvârah* i. e. the *Doors* ( 6 ); *Ushâsânaktâ* i. e. *Ushas* and *Night* ( 7 ); *Daivyau Hotârau* i. e. *Agni* in the form of the two invokers, the Earthly and the Heavenly ( 8 ); the three Goddesses *Sarasvatî*, *Ilâ* and *Bhâratî* ( 9 ); *Tvashṭâ* ( 10 ); *Vanaspati* i. e. the sacrificial post ( 11 ); the exclamation *Svâhâ* ( but in reality about an offering to *Pûshan*, the *Maruts*, *Vâyu*, the *Vis've Devas* and *Indra* ( 12 ); *Indra* ( 13 ). By *Dîrghatamas* son of *Uchathya* ( author of the previous hymn ). Metre—*Anushṭubh*.

1. Kindled do thou, O Agni, bring this day the gods for the sacrificer who stretches forth his ladle; [ and ] spread thou the ancient thread for the giver of oblation who has extracted the Soma.

घृतवन्तमुप मासि मधुमन्तं तनूनपात् ।
यज्ञं विप्रस्य मावतः शशमानस्य दाशुषः ॥ २ ॥

घृतऽवन्तम् । उप । । मासि । मधुऽमन्तम् । तनूऽनपात् ।
यज्ञम् । विप्रस्य । माऽवतः । शशमानस्य । दाशुषः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हे तनूनपात् (=एतन्नामकाग्ने), मावतो विप्रस्य शशमानस्य दाशुषः (=मत्सदृशो यो विप्रः कविः शशमानः स्तोता दाश्वान् हविर्दत्तवान् यजमानस्तस्य पुरुषस्य) यज्ञं [ त्वं ] घृतवन्तं ( =घृतसमृद्धं ) मधुमन्तं ( =मधुसमृद्धं ) [ च ] उप मासि (=उपेत्य निर्मिमीषे=करोषि=कुरु) ॥

१. हें सूक्त 'आप्री' सूक्त आहे. यांतील कितीएक मंत्र अग्नीविषयींच आहेत. अनुक्रमणिकेवरून वर उतरून घेतलेल्या सदरांत ज्या वेगवेगळ्या देवता अथवा विषय लिहिले आहेत, त्यांतून पहिल्या चार ऋचा तर अग्निरूप देवतांविषयींच आहेत. दुसऱ्यांविषयीं त्या त्या ऋचेवरील टीप पहा. हें सूक्त आप्री सूक्त असल्यावरून ह्यांतील मंत्र सू. १३ याशीं मंत्रवार जमतात. देवताशब्द इत्यादिकांविषयीं ऐक्य मोठें आहे.

'पेटविलेला जो तूं तो '='समिद्धः'. म्हणजे, आम्हीं तुला पेटविलें आहे यास्तव तूं इ० असा अर्थ आहे.

'पळी पुढें करणाऱ्या '=' यतस्रुचे.' म्हणजे आहुति देण्यास पळी पुढें सरसाविली आहे ज्याणें, जो सिद्ध आहे त्याप्रत. सू. ८३ मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

'पुरातन तंतु ताण '=' पूर्व्यं तन्तुं तनुष्व.' आम्हीं भाषांतर अक्षरशः केलें आहे. पण पुरातन भक्त जसा यज्ञ करीत तसला यज्ञ आम्हांकरितां संपाद असा भावार्थ आहे. 'तन्तु' म्हणजे यज्ञरूप वस्त्राचा तन्तु अथवा अवयव. या रीतीचे प्रयोग वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत. उदाहरणार्थ, ऋ. ८. १३. १४ 'आ तु गहि प्र तु द्रव मत्स्वा सुतस्य गोमतः'. । 'तन्तुं तनुष्व पूर्व्यम्' असें आहे तें पहा.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत ' पूर्व्यं '-च्या ठिकाणीं ' पूर्विअं ' असें वाचलें पाहिजे. सू. १३ मं. १ पहा.

२. हे तनूनपात्, मजसारिखा जो कवि, स्तोता [ आणि ] यजमान, त्याचा यज्ञ तूं घृतयुक्त [आणि ] मधुयुक्त कर.

2. Mayest thou, O Tanûnapât, render the sacrifice of a poet, suppliant [ and ] sacrificer like me, rich in clarified butter [ and ] rich in honey.

२. 'हे अग्नी, मजसारिखा जो कोणी कवि स्तोत्र करणारा अथवा यज्ञ करणारा असेल, त्याला तूं प्रसन्न होतोस आणि त्याचा यज्ञ तुपानें आणि मदानें परिपूर्ण करितोस.'

'तनूनपात्.' हें अग्नीचें एक नांव आहे. पण तें कशावरून पडलें याविषयीं वाद आहे. ज्या ज्या ऋग्मन्त्रांत हा शब्द आला आहे, तेते सर्व वाचून पाहतां आणि त्यांजवरील भाष्याचा विचार करितां सायणाचार्य बहुतकरून दोन अर्थ सांगतात, आणि त्यांतून एक घ्यावा म्हणतातः १ला, 'तनू' म्हणजे मेघोदकें (कारण तीं अंतरिक्षांत पसरलेलीं असतात, (तन्=पसरणें!) त्यांचीं अपत्यें काष्ठें, आणि काष्ठांपासून (म्ह० अरणीपासून) अग्नि होतो म्हणून तो 'तनूनपात्'=' मेघोदकांचा नातू;' २रा, 'तनू' म्हणजे गाई (कारण कीं ज्यांजमध्यें गोरस पसरलेले असतात. 'तन्'(=पसरणें) आणि गाईचा रस तूप, आणि तुपापासून अग्नि उत्पन्न होतो अथवा समृद्ध होतो, म्हणून तो 'तनूनपात्'=' गाईचा नातू.' पण हे दोनी अर्थ अतिशय क्लिष्ट आहेत यांत संशय नाहीं. पाश्चात्त्य विद्वान् (ग्रासमनप्रमुख) सुचवितात कीं, 'तनू' म्हणजे स्वताहाचें शरीर त्यापासून झालेला म्हणून 'तनूनपात्;' कारण कीं अग्नीपासून अग्नि उत्पन्न होतो, जसा गार्हपत्यापासून 'आहवनीय.' हा अर्थ संभवतो. पण याला संहितेंत अथवा भाष्यांत प्रमाण दिसत नाहीं.

ऋ. ३. २९. ११ यांत म्हटलें आहे कीं 'तनूनपात् उच्यते गर्भः'=' अरणींच्या पोटांत असणारा जो गर्भरूप अग्नि, त्याला तनूनपात् म्हणतात.' यावरून सायणांनीं दिलेल्या एका अर्थास बीजरूपानें प्रमाण मिळतें पण, इतक्यावरून निर्वचनाविषयीं पुरता खुलासा होत नाहीं. सू. १३ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

शुचिः पावको अद्भुतो मध्वा यज्ञं मिमिक्षति ।
नराशंसस्त्रिरा दिवो देवो देवेषु यज्ञियः ॥ ३ ॥

शुचिः । पावकः । अद्भुतः । मध्वा । यज्ञम् । मिमिक्षति ।
नराशंसः । त्रिः । आ । दिवः । देवः । देवेषु । यज्ञियः ॥ ३ ॥

ईळितो अग्न आ वहेन्द्रं चित्रमिह प्रियम् ।
इयं हि त्वा मतिर्ममाच्छा सुजिह्व वच्यते ॥ ४ ॥

ईळितः । अग्ने । आ । वह । इन्द्रम् । चित्रम् । इह । प्रियम् ।
इयम् । हि । त्वा । मतिः । मम । अच्छ । सुऽजिह्व । वच्यते ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. शुचिः ( =दीप्तिमान् ) पावकः ( =शोधयिता ) अद्भुतः ( =आश्चर्यकारी ) [ अपि च ] देवेषु [ मध्ये ] यज्ञियः ( =यज्ञार्हो ) देवः [ एतादृशो ] नराशंसः (=एतन्नामा अग्निस् ) त्रिरा दिवः (=प्रतिदिवसं त्रिवारं ) मध्वा (=मधुना=मधुरेण रसेन ) यज्ञं मिमिक्षति (=सिञ्चति=स्वादयति ) ॥

नराशंसो नरैः कर्मनेतृभिर्ऋत्विग्भिः शंसनीयः इति सायणाचार्याः ॥

४. हे अग्ने, ईळितः ( =अस्माभिः स्तुतस्त्वं ) चित्रं ( =चायनीयं=तेजस्विनं ) प्रियं [ च ] इन्द्रम् इहावह ( =अत्रानय ) । हि ( =यस्मात् कारणात् ) हे सुजिह्व (=शोभनजिह्वोपेत=शोभनवचनसामर्थ्य), इयं मम मतिः (=स्तोत्रं) त्वा अच्छ (=त्वां प्रति ) वच्यते (=उच्यते ) ॥

३. देदीप्यमान, पवित्र करणारा, आश्चर्यकारक [आणि] देवांमध्यें यजनार्ह देव असा नराशंस दिवसाला तीन वेळ मधानें यज्ञ गोड करितो.

४. हे अग्नी, स्तविलेला [असा जो तूं, तो] सुंदर [आणि] प्रिय इंद्राला इकडे घेऊन ये. कारण कीं, हे सुजिह्व [अग्नी], हें माझें स्तोत्र तुजप्रत गाइलें जात आहे.

3. The brilliant, purifying [and] wonderful Narâs'aṁsa— the adorable god among the gods— sweetens the sacrifice with honey three times a day.

4. Praised [by us] do thou, O Agni, bring hither resplendent [and] dear Indra. For this my hymn is, O sweet-tongued [Agni], being chanted towards thee.

---

३. ही ऋचा 'नराशंस' अग्नीविषयीं आहे. 'नराशंस'. हें अग्नीचें एक नांव आहे. तें कशावरून पडलें तें निश्चयानें सांगवत नाहीं; पण नरांनीं ज्याचें शंसन म्हणजे स्तोत्र करण्यास योग्य होय, तो, असा अर्थ सायणाचार्य बहुतकरून करितात. सू. १३ मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

'पवित्र करणारा'='पावकः.' वस्तुतः हेंहि अग्नीचें एक नांवच आहे. येथें दिलेला अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. कितीएक पाश्चात्य विद्वान् 'देदीप्यमान,' 'लखलखीत' असा अर्थ करितात. पण 'पावक' हें विशेषनाम असल्याप्रमाणें अग्नीला लाविलेलें असतें, त्याचा अर्थ सायणांस सोडून करण्यास पुरता आधार दिसत नाहीं. 'पावक' शब्दाविषयीं आम्हीं पूर्वीं एकदा सांगितलें आहे.

'दिवसाला तीन वेळ'='त्रिः आ दिवः.' ऋ. ३. ५६. ५ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. प्रभातकाळचें, मध्याह्नीचें, आणि संध्याकाळचें अशीं जीं तीन सवनें अथवा समर्पणकाळ त्या त्या वेळीं असें तात्पर्य आहे. सू. १३ मं. ३ पहा.

४. 'हे अग्नी, तुझी आम्ही स्तुति करीत आहों, तर तूं इंद्राला येथें घेऊन ये. कारण तूं चांगला बोलका आहेस. तूं इकडे येण्याविषयीं इंद्रानें मन वळवूं शकशील. तर आम्ही तुझी स्तुति करीत आहों, ती ऐकून इंद्राला आम्हांजवळ आण'.

'स्तविलेला'='ईळितः.' याच शब्दावरून हा मंत्र 'इळनामक' अग्नीविषयीं आहे असें समजतात. म्हणजे स्तुति अथवा हवि (=इळा) तीच जी अग्नी-

स्तृणानासो यतस्रुचो बर्हिर्यज्ञे स्वध्वरे ।
वृञ्जे देवव्यचस्तममिन्द्राय शर्म सप्रथः ॥ ५ ॥

स्तृणानासः । यतऽस्रुचः । बर्हिः । यज्ञे । सुऽअध्वरे ।
वृञ्जे । देवव्यचःऽतमम् । इन्द्राय । शर्म । सऽप्रथः ॥ ५ ॥

वि श्रयन्तामृतावृधः प्रयै देवेभ्यो महीः ।
पावकासः पुरुस्पृहो द्वारो देवीरसश्चतः ॥ ६ ॥ १० ॥

वि । श्रयन्ताम् । ऋतऽवृधः । प्रयै । देवेभ्यः । महीः ।
पावकासः । पुरुऽस्पृहः । द्वारः । देवीः । असश्चतः ॥ ६ ॥ १० ॥

## भाषायाम्.

५. [ अस्मिन् ] स्वध्वरे यज्ञे (=केनाप्यतिशयेनाहिंस्ये) यज्ञे यतस्रुचः (=उद्यतजुह्वादिपात्रा ), बर्हिः स्तृणानासः (=दर्भान् आस्तरन्तो ) [ भक्ता ] इन्द्राय देवव्यचस्तमम् (=अतिशयेन देवव्यापनयोग्यं ) सप्रथः (=विस्तीर्णं च ) शर्म (=आसनं ) वृञ्जे (=वृञ्जते=संपादयन्ति ) ॥

६. ऋतावृधः (=सत्यभूतस्य यज्ञस्य वर्धका ) महीः (=मह्यः=महत्यः ) पावकाः (=शोधयन्त्यः ) पुरुस्पृहः (=बहुभिः स्पृहणीया ) देवीः (=देव्यः=द्योतमाना ) द्वारः (="द्वाराभिमानिन्यो देवता ") देवेभ्यः प्रयै ( =देवेभ्यः प्रयातुं=प्रगन्तुं=देवा यथा प्रविशन्ति तथा ) असश्चतः वि श्रयन्ताम् (=परस्परविप्रकृष्टा विवृता भवन्तु=विवृता भूत्वा परस्परं विकृष्टास्तिष्ठन्तु ) ॥

ची विभूति, तिजविषयीं ? सू. १३ मं. ४ पहा.

वृत्तासाठीं 'वह । इन्द्रं' आणि 'मम । अच्छा ' असें म्हणावें.

५. अत्यंत विघ्नरहित [अशा या] यज्ञांत [हे] उपासक पळ्या पुढें करून, [आणि] दर्भ पसरून, देवांनीं बसण्यास अत्यंत योग्य [आणि] विस्तीर्ण [असें] आसन इंद्राकरितां घालीत आहेत.

5. In [this] sacrifice, entirely free from obstruction, the worshippers, ready with the ladles, and having spread the grass, are cutting for Indra a seat most suited to be occupied by a god, and spacious.

६. यज्ञांचा प्रकर्ष करणारीं, पावन करणारीं, [आणि] बहुतांस आवडणारीं, [अशीं जीं] मोठीं दिव्य द्वारें, [तीं], देवांनीं आंत यावें म्हणून, एकमेकांस न लागत अशा रीतीनें उघडोत.

6. Let the great divine doors, the promoters of worship, holy, [and] dear to many, stand open, without touching each other, for the gods to enter.

---

५. अनुक्रमणिकेप्रमाणें ही ऋचा 'बर्हि' म्हणजे दर्भ याविषयीं आहे. याचें कारण हें कीं, सू. १३वें हें जें 'आप्री' सूक्त यांतील ५वी ऋचाहि दर्भाविषयींच आहे, ती पहा.

'अत्यंत विघ्नरहित'='स्वध्वरे.' इतर ठिकाणीं 'स्वध्वर'शब्दाचे प्रयोग पाहून आम्हीं येथें भाषांतर केलें आहे.

'घालीत आहेत'='वृञ्जे.' हें 'वृञ्जते' या अनेकवचनाऐवजीं एकवचन आहे असें समजून आम्हीं भाषांतर केलें आहे. कितीएक विद्वान् 'वृञ्जे' म्हणजे 'वृज्यते' या अर्थी कर्मणि घेऊन 'शर्म' याशीं अन्वय करितात.

६. ही ऋचा द्वाररूप ज्या देवी, म्हणजे यज्ञशाळेचीं जीं दारें, त्याच कोणीएक देवी, त्यांविषयीं आहे. 'आप्री' सूक्त १३ मं. ६ पहा.

'यज्ञाचा प्रकर्ष करणारी'='ऋतावृधः.' म्हणजे यज्ञाला साहाय्य करून त्याचा उत्कर्ष जेणेंकरून होईल तसें करणारीं.

'एकमेकांस इ०' म्हणजे उघडोत आणि एकमेकाला न चिकटतां उघडीं राहोत.

वृत्तासाठीं 'देवेभिओ' असें वाचावें लागतें.

**आ भन्दमाने उपाके नक्तोषासा सुपेशसा ।**
**यह्वी ऋतस्य मातरा सीदतां बर्हिरा सुमत् ॥ ७ ॥**
आ भन्दमाने इति । उपाके इति । नक्तोषसा । सुऽपेशसा ।
यह्वी इति । ऋतस्य । मातरा । सीदताम् । बर्हिः । आ । सुऽमत् ॥७
**मन्द्रजिह्वा जुगुर्वणी होतारा दैव्या कवी ।**
**यज्ञं नो यक्षतामिमं सिध्रमद्य दिविस्पृशम् ॥ ८ ॥**
मन्द्रऽजिह्वा । जुगुर्वणी इति । होतारा । दैव्या । कवी इति ।
यज्ञम् । नः । यक्षताम् । इमम् । सिध्रम् । अद्य । दिविऽस्पृशम् ॥ ८॥

## भाषायाम्.

७. भन्दमाने (=सर्वैः स्तूयमाने ) उपाके (=परस्परं संनिहिते ) सुपेशसा (=सुपेशसौ=शोभनरूपे ) ऋतस्य (=सत्यरूपस्य यज्ञस्य ) यह्वी मातरा ( =यह्व्यौ महत्यौ मातरौ ) [ एतादृशे ] नक्तोषसा (=नक्तोषसौ ) बर्हिः (=कुशासनं=कुशोपरि) सुमत् (=सुष्ठु=शोभनं यथा तथा ) आ सीदताम् (=आगत्य निषीदताम् ) ॥

ऋतस्य मातरा यज्ञस्य निर्मात्र्यौ । ताभ्यामागमनाद्यज्ञस्य संपूर्तेर्यज्ञमातृत्वमुपचर्यते । यद्वा अतिरात्रादीनामहोरात्रसाध्यत्वात् । इति सायणः ॥

८. मन्द्रजिह्वा (=मन्द्रजिह्वौ=मादकजिह्वौ=आनन्दकारिवचनसामर्थ्यौ) जुगुर्वणी (=अतिशयेन स्तोतारौ ) कवी (=प्रज्ञावन्तौ ) [ एतादृशौ ] दैव्या होतारा (=दैव्यौ होतारौ=देवसंबन्धिनौ यज्ञसंपादकौ ) अद्य नः ( =अस्माकम् ) इमं (=पुरोवर्तिनं ) सिध्रं (=स्वर्गादिफलस्य साधकं ) दिविस्पृशं (=द्युलोकं स्पृशन्तं=देवान्प्रति गन्तारं ) यज्ञं यक्षतां ( =यजतां=संपादयताम् ) ॥

मन्द्रजिह्वा देवानां मादनज्वालौ जुगुर्वणी भृशं गृणतां स्तुवतां यजमानानां संभक्तारौ ।...... दैव्या होतारौ देवसंबन्धिनौ होतारौ अयं च मध्यमस्थानश्चेत्युभौ । इति सायणः ॥

७. [ सर्वांनीं ] स्तविल्या जाणाऱ्या, एकमेकींच्या संनिध असणाऱ्या, [ आणि ] सुशोभिवंत, [ आणि ] यज्ञाच्या मोठ्या आई [ अशा ज्या ] रात्र आणि उषा, [ त्या ] येऊन सुंदर रीतीनें दर्भावर बसोत.

८. सुजिह्व, स्तुतिप्रिय, [ आणि ] प्रज्ञावंत [असे जे] दोघे दिव्य यज्ञकर्ते, [ ते ] आज हा आमचा इष्टसाधक [ आणि ] स्वर्गी जाणारा यज्ञ संपादोत.

7. May Night and Ushas, praised [ by the world ], closely joined to each other, beautiful, the great mothers of the sacred rite, come and sit beautifully on the Kus'a-[grass].

8. May the two divine invokers, possessed of a good tongue, fond of praising, [ and ] wise, accomplish this day this our sacrifice that shall touch the heaven and fulfil our desires.

---

७. ही ऋचा रात्र आणि उषा या दोघींविषयीं आहे. आप्री सूक्त १३,याची ऋचा ७ पहा. दुसरें आप्री सूक्त ऋ. ३. ४ याचाहि सातवाच मंत्र उषा आणि रात्र यांविषयीं आहे. दुसरीं आप्री सूक्तें पहा ( सूक्त १३ मं. १ याजवरच्या टिपेंत आप्रीसूक्तें सांगितलीं आहेत ).

' स्तविल्या जाणाऱ्या '=' भन्दमाने. ' किंवा 'आम्ही ज्यांला स्तवीत आहों त्या' असेंहि होईल.

' एकमेकींच्या संनिध असलेल्या '= ' उपाके. ' म्हणजे रात्र आणि उषा ह्या एकमेकींच्या मागूनच येतात म्हणून.

' यज्ञाच्या आई '=' ऋतस्य मातरा. ' उषा आली म्हणजे प्रातःकाळची उपासना होत असे, आणि रात्र आली म्हणजे सायंकाळची उपासना होत असे.

' सुंदर रीतीनें '=' सुमत्. ' आम्हांस वाटतें कीं ' सु ' याला ' मत् ' हा प्रत्यय लागून हें अव्यय झालें आहे. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् ' एकत्र ' असा अर्थ करितात, पण ' सुमत् ' हें पद समस्त अथवा व्यस्त जेथें जेथें आलें आहे ते सर्व मंत्र पाहिल्यावर सायणांनीं बहुतेक ठिकाणीं केलेला ' सुंदर रीतीनें ' हाच अर्थ चांगला दिसतो. यास्कांनीं ' स्वयमेव '=' स्वतः,' ' आपणाहून ' असा अर्थ केला आहे.

८. देव होत असे जे दोन ' होते ' म्हणजे यज्ञसंपादक, त्यांविषयीं ही ऋचा, आहे. सायणाचार्य म्हणतात, हे दोन होते म्हणजे पृथिवीवरील जो अग्नि, तो

**शुचि॑र्दे॒वेष्वर्पि॑ता होत्रा॑ म॒रुत्सु॒ भार॑ती ।**
**इळा॒ सर॑स्वती म॒ही ब॒र्हिः सी॑दन्तु य॒ज्ञिया॑: ॥ ९ ॥**

शुचि॑: । दे॒वेषु॑ । अर्पि॑ता । होत्रा॑ । म॒रुत्ऽसु॑ । भार॑ती ।
इळा॑ । सर॑स्वती । म॒ही । ब॒र्हिः । सी॒द॒न्तु॒ । य॒ज्ञिया॑: ॥ ९ ॥

---

### भाषायाम्.

९. शुचिः (=शुद्धा) देवेषु मरुत्सु (=? देवेषु मर्त्येषु यजमानेषु च=देवमनुष्याणां मध्ये) होत्रा अर्पिता (=होमनिष्पादिका सती स्थापिता) [एतादृशी] भारती (=एतन्नाम्नी देवी) [अपि च] इळा [नाम देवी] मही सरस्वती (=महती सरस्वती) [च] [इत्येतास्तिस्रो] यज्ञिया (=यज्ञार्हा) [देव्यो] बर्हिः सीदन्तु (=कुशासनमुपविशन्तु) ॥

भारती भरतस्यादित्यस्य संबन्धिनो द्युस्थाना वाक् । तथेळा पार्थिवी प्रैषादिरूपा मही महती सरस्वती । सर इत्युदकनाम तद्वती स्तनितादिरूपा माध्यमिका च वाक् । एतास्तिस्रस्त्रिस्थानवागभिमानिदेवताः । इति सायणः ॥

---

एक, आणि विद्युद्रूपानें अंतरिक्षांत राहणारा जो तो दुसरा असे जे दोन अग्नि तेच होत. दुसरीं 'आप्री'सूक्तें (सू. १३ मं. १ याजवरील टीप पहा) पाहतां त्या त्या ठिकाणींहि सायणांनीं तोच अर्थ केला आहे; मात्र ऋ. ५. ५ या 'आप्री'सूक्तांत आणि ऋ. १०. ११० मं. ७ यांत हे दोघे 'होते' याचा निराळा अर्थ केला आहे. ऋ. ५. ५ यांत अग्नीपासून झालेला एक आणि आदित्यापासून (=सूर्यापासून?) झालेला एक, असे दोघे असें ते म्हणतात. आणि ऋ. १०.११०. ७ यांत ते म्हणतात, अग्नि आणि आदित्य हेच दोघे होते होत. यावरून स्वतः भाष्यकारांचाहि याविषयीं निश्चय दिसत नाहीं. कदाचित् सायणांनीं सांप्रत ऋचेवर दिलेला जो अर्थ आम्हीं घेतला आहे, तोच घ्यावा हें उत्तम होय. सू. १३ मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा.

'सुजिह्व' = 'मन्द्रजिह्वा.' म्हणजे ज्यांची वाणी गोड, आणि जिला भुलून देव येतील असे.

'स्तुतिप्रिय' = 'जुगुर्वणी.' म्हणजे देवांची स्तुति करण्याविषयीं ज्यांस आवड आहे असे.

वृत्तासाठीं 'देविआ' असें वाचलें पाहिजे.

९. देदीप्यमान, [आणि] देव [आणि] मर्त्य [उपासक यां] मध्यें होमनिष्पादक [करून] स्थापिलेली [अशी जी] भारती, [ती] [आणि] इळा [आणि] मोठी [जी] सरस्वती, [त्या तिघी] यज्ञयोग्य देवी [आमच्या] दर्भासनावर बसोत.

9. May pure Bhâratî established [as] the invoker between the gods [and] the mortals, [and also] Ilâ, [and] the great Sarasvatî— [the three] adorable [goddesses]—sit on the Kus'a-[grass].

---

९. प्रत्येक आप्रीसूक्ताच्या ८व्या किंवा ९व्या ऋचेंत येत असणाऱ्या ज्या भारती, इळा आणि सरस्वती अशा तीन देवी, त्यांविषयीं ही ऋचा आहे. प्रस्तुत मंत्रावरील भाष्यांत सायण म्हणतात कीं, भारती म्हणजे द्युलोकसंबंधी वाणी, इळा म्हणजे पृथिवीवरची वाणी (म्हणजे देवांला बोलाविण्यांत वगैरे जी योजिली जाते ती,) आणि सरस्वती म्हणजे माध्यमिका वाक्, म्हणजे मेघोदकरूप नद्यांचा, मेघांचा, वगैरे जो ध्वनि आकाशांत मेघगर्जनादिरूपेंकरून होत असतो तो; मिळून ह्या तीन देवी म्हणजे त्रिस्थळींच्या तीन वाचा होत. ऋ. १. १८८. ८ यांत तर ते म्हणतात कीं, भारती म्हणजे द्युलोकदेवता, सरस्वती म्हणजे अंतरिक्षदेवता, आणि इळा म्हणजे पृथिवीदेवता. आणि सर्व आप्रीसूक्तांतहि या तीनहि देवींविषयीं ते असेंच अथवा याच्या जवळ जवळच सांगतात. कसेंहि असो, यज्ञांत जिचा उपयोग होतो अशी जी स्तुतिरूप अथवा आह्वानरूप वाणी, तिच्याच ह्या वेगवेगळ्या मानिलेल्या विभूति होत असें दिसतें.

'मर्त्य'='मरुत्सु.' हा अर्थ सायणांस अनुसरून केला आहे. 'मरुत्' हें प्रायः मरुत् नांवाचे जे देव, तद्वाचक होय. पण या ठिकाणीं सायणांनीं केलेल्या आम्हीं घेतलेल्या ह्या अर्थाशिवाय चांगला निर्वाह दिसत नाहीं. आतां या अर्थाविषयीं प्रयोगान्तरें अवश्य आहेत, तीं जरी उपलब्ध दिसत नाहींत, तरी तो अर्थ येथें केल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं. धात्वर्थावरून (=मृ मरणें यावरून मरुत् शब्द झाला आहे असें कितीएकांचें मत आहेच त्यावरून) पाहिलें तर 'मर्त्य' 'मनुष्य' असा अर्थ करण्यास अडचण दिसत नाहींच. शिवाय वेदांत कितीएक शब्द असे आढळतात कीं, त्यांचा सायणांनीं केलेला अर्थ प्रथम जरी संशयास्पद दिसतो तरी तो व्याख्यानाच्या परंपरेला अनुसरून असल्यामुळें जुळतो इतकेंच नव्हे, पण वेदार्थाविषयीं शोध लावतां लावतां

**तन्नस्तुरीपमद्भुतं पुरु वारं पुरु त्मना ।**
**त्वष्टा पोषाय वि ष्यतु राये नाभा नो अस्मयुः ॥ १० ॥**

तत् । नः । तुरीपम् । अद्भुतम् । पुरु । वा । अरम् । पुरु । त्मना ।
त्वष्टा । पोषाय । वि । स्यतु । राये । नाभा । नः । अस्मऽयुः ॥ १० ॥

## भाषायाम्.

१०. अस्मयुः ( =अस्मान् कामयमानस् ) त्वष्टा ( =एतन्नामको विश्वनिर्माता देवो ) नाभा (=पृथिव्या नाभौ=उत्तरवेद्यां ) [स्थितः सन्] नः पोषाय राये (=अस्माकं पोषणाय=पुत्रपौत्रादिभिरुत्कर्षाय धनप्राप्तये च ) तत् ( =प्रसिद्धं=यन्त्वष्टा विष्यति तत् ) तुरीपं (=रेतो) नः (=अस्मदर्थं ) पुरु वा अरं (=पर्याप्तं यथा भवेत्तथा प्रभूतं) त्मना पुरु (=आत्मनैव प्रभूतम्=अनायासेन यथा प्रभूतं स्यात्तथा ) वि ष्यतु (=मोचयतु=प्रापयतु ) ॥

अत्र तन्नस्तुरीपम् अध पोषयित्नु देव त्वष्टः वि रराणः स्यस्व । यतो वीरः कर्मण्यः सुदक्षः युक्तग्रावा जायते देवकामः ( ऋ. ३. ४. ९ ) इत्यत्र यदुक्तं तद्द्रष्टव्यताम् ॥

तो शेवटीं खरा ठरतो.

'होमनिष्पादक करून स्थापिलेली '=' होत्रा अर्पिता. ' म्हणजे स्तुतिरूप जी देवता, ती देव आणि मनुष्य यांजमध्यें अग्नीप्रमाणें दूतपणा करणारी होय, असें यांत जाणविलें आहे.

' मोठी '=' मही. ' हें जरी ' सरस्वती 'चें विशेषण आहे, तथापि तिघींलाहि तें लावावें असें विवक्षित आहे.

वृत्तासाठीं ' देवेषु अर्पिता ' असें पहिल्या पादांत वाचावें.

१०. आमचें कल्याण करूं इच्छिणारा त्वष्टा उत्तरवेदीवर [ बसून ], तें [ जें ] आश्चर्यकारक बहु विपुल, सहजच विपुळ वीर्य, [तें] आमच्या उत्कर्षासाठीं [ आणि ] संपत्तीसाठीं आम्हांला प्राप्त करो.

10. May Tvashṭâ, loving us, [standing] on the northern altar, create in us that wonderful semen in plenty—plentiful naturally, for our prosperity [and our] wealth.

१०. प्रत्येक आप्रीसूक्ताच्या ९व्या अथवा १०व्या मंत्रांत अवश्य आलाच पाहिजे असा जो त्वष्टा देव, त्याजविषयीं ही ऋचा आहे.

भावार्थः—'प्रजेची उत्पत्ति ज्यापासून होते असें जें वीर्य, तें त्वष्टा देव आम्हांवर कृपा करून उत्तरवेदीवर बसून आमच्या आंगीं पुष्कळ उत्पन्न करो, कीं जेणेंकरून आम्हांला शूर पुत्र होऊन आम्हांस संपत्ति वगैरे मिळेल आणि आमचा उत्कर्ष होईल.'

वेदांत 'त्वष्टा' या देवाविषयीं जें सांगितलें आहे, त्यांत हें एक आहे कीं, तो स्त्रियांचे पोटीं गर्भ राहे असें करितो. उदाहरणार्थ, 'आ यत् नः पत्नीः गमन्ति अच्छ त्वष्टा स्वपाणिर्दधातु वीरान्' (ऋ. ७. ३४. २०)=जेव्हां पत्नी आम्हांजवळ येतात, तेव्हां त्वष्टा आम्हांला पुत्र देओ.' ऋ. १. १८८. ९ यांत त्वष्टा रेतापासून गर्भ होई असें करितो=' त्वष्टा रूपाणि हि प्रभुः' इ०. ऋ. १०. १८४. १ यांत 'विष्णु गर्भस्थान उत्पन्न करो, त्वष्टा गर्भ उत्पन्न करो'='विष्णुर्योनिं कल्पयतु त्वष्टा रूपाणि पिंशतु' असें म्हटलें आहे. या प्रकारचीं अनेक वाक्यें यजुर्वेदांत आणि अथर्ववेदांतहि आलीं आहेत.

'उत्तरवेदीवर [ बसून ]'='नाभा.' अक्षरशः 'नाभीवर.' यज्ञांत जें उत्तरदिशेकडे अग्निस्थान करित असतात, त्याला 'उत्तरवेदि' अथवा 'हविर्धान' असें म्हणतात. त्यालाच ऋग्वेदांत 'नाभि' अथवा 'पृथिव्या नाभिः' असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे. तेथें त्वष्ट्यानें येऊन बसावें आणि प्रार्थिलेला वर द्यावा असें ऋषीचें मनोगत आहे.

'वीर्य'=तुरीपम्.' ऋ. ३. ४. ९ आणि ऋ. ७. २. ९, आणि त्यांजवरील भाष्य पहा.

'प्राप्त करो'='विष्यतु.' अक्षरशः अर्थ 'गळवो,' 'वाहवो;' आमच्या आंगातून वाहे अथवा पडे असें करो, असा भावार्थ.

**अवसृजन्नुप त्मना देवान्यक्षि वनस्पते ।**
**अग्निर्हव्या सुषूदाति देवो देवेषु मेधिरः ॥ ११ ॥**

अवऽसृजन् । उप । त्मना । देवान् । यक्षि । वनस्पते ।
अग्निः । हव्या । सुसूदति । देवः । देवेषु । मेधिरः ॥ ११ ॥

**पूषण्वते मरुत्वते विश्वदेवाय वायवे ।**
**स्वाहा गायत्रवेपसे हव्यमिन्द्राय कर्तन ॥ १२ ॥**

पूषण्ऽवते । मरुत्वते । विश्वदेवाय । वायवे ।
स्वाहा । गायत्रऽवेपसे । हव्यम् । इन्द्राय । कर्तन ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

११. हे वनस्पते ( =वनानां प्रभो=यूपरूप वृक्षविकार=यूपाभिमानिदेव ), त्मना [ हव्यानि ] अवसृजन् ( =आत्मना स्वयमेव हवींषि अवगमयन् ) [ त्वं ] देवान् उप यक्षि (=देवान् उपेत्य यज ) । देवेषु मेधिरो देवः (=देवानां मध्ये मेधावी देवभूतः ) अग्निः (=स्वयमग्निरपि ) हव्या सुषूदति (=हव्यानि हवींषि क्षारयति=देवान्प्रति सृजति ) ॥

१२. [ हे ऋत्विजः ], पूषण्वते (=पूष्णा युक्ताय ) मरुत्वते (=मरुद्भिर्युक्ताय ) विश्वदेवाय (=विश्वैर्देवैर्युक्ताय ) वायवे [ तथा ] गायत्रवेपसे इन्द्राय (=गायत्रच्छन्दस्कस्तोत्ररूपायेन्द्राय=यत्रयत्र गायत्रं तत्रतत्र स्थितायेन्द्राय ) स्वाहा हव्यं कर्तन (=स्वाहाशब्देन हविष्कुरुत=प्रार्पयत ) ॥

विश्वदेवाय विश्वदेवसंघाय ...... गायत्रवेपसे । वेप इति रूपनाम । गायत्रशब्द इतरसामोपलक्षणः । गायत्रं वेपो रूपं यस्य तादृशायेन्द्राय । इति सायणः ॥

११. हे वनाधिपती, तूं स्वत: हव्यें होमून देवां प्रीत्यर्थ यजन कर. देवांमध्यें बुद्धिमान् देव जो अग्नि, तो हव्यांच्या आहुति देतो.

11. Letting down the offerings personally, do thou, O Lord of the forest, worship the gods. Agni, the wise god among the gods, pours forth the oblations.

१२. [हे मित्रहो], पूषा ज्याजबरोबर आहे, मरुत् ज्याजबरोबर आहेत, [आणि] विश्वे देव हे ज्याजबरोबर आहेत, [अशा] वायूसाठीं [आणि] गायत्ररूप इंद्रासाठीं [तुम्ही] स्वाहा [म्हणून] हवि अर्पा.

12. Offer, [ye friends], with [the exclamation] *Swâhâ*, an oblation to Vâyu accompanied by Pûshan, the Maruts, [and] the Vis've Devas, [and] to Indra who is recognized in the *Gâyatra* metre.

---

११. आप्रीसूक्तांत १०व्या अथवा ११व्या ऋचेंत येत असतो असा जो 'यूप' म्हणजे यज्ञस्तंभ, त्याविषयीं हा मंत्र आहे.

ऋषि म्हणतो, 'हे यूपा, तूं स्वतः होम करून देवांचें आज यजन कर, तूं हवि देऊन यजन केलेंस म्हणून नवल नाहीं; कारण कीं सकल देवांमध्यें बुद्धिमान् असा जो देव अग्नि, तोहि हवि देऊन यजन करीत असतो.'

'वनाधिपती'=' वनस्पते.' म्हणजे वनाचा प्रभुच जणुं असा जो वृक्ष, त्यापासून केलेला. यज्ञांत बलि द्यावयाचा पशु ज्याला बांधीत, त्या लाकडाच्या खांबाला 'यूप' असें म्हणत. तो खैराचा (खदिराचा) करीत असतात.

१२. आप्रीसूक्तांत ११व्या किंवा १२व्या मंत्रांत 'स्वाहा' शब्द यावयाचा, त्याप्रमाणें यांत आला आहे, आणि सर्व देवांविषयीं निर्देश असावयाचा त्याप्रमाणें यांत झाला आहे. 'पूषा, मरुत्, विश्वेदेव, वायु आणि इंद्र यासाठीं स्वाहा! असा उच्चार करून हवि सिद्ध करून अर्पण करा' इतकेंच या ऋचेचें तात्पर्य आहे.

'गायत्ररूप इंद्रासाठीं'='गायत्रवेपसे इन्द्राय.' हे शब्द कठिण आहेत. गायत्र वृत्तांत केलेलीं सूक्तें ज्यास आवडतात त्या इंद्राला, जेथें जेथें गायत्र वृत्तांत रचिलेलीं सूक्तें म्हणण्यांत येतात, तेथें तेथें दृष्टीस पडणारा जो इंद्र, त्याकारणें, असा अर्थ समजून आम्हीं निर्वाह केला

स्वाहाकृतान्या गह्युप हव्यानि वीतये ।
इन्द्रा गहि श्रुधी हवं त्वां हवन्ते अध्वरे ॥ १३ ॥ ११ ॥

स्वाहाऽकृतानि । आ । गहि । उप । हव्यानि । वीतये ।
इन्द्र । आ । गहि । श्रुधि । हवम् । त्वाम् । हवन्ते । अध्वरे ॥१३॥११॥

## भाषायाम्.

१३. [ हे इन्द्र, ] स्वाहाकृतानि (=येषु विषये स्वाहेत्युच्चारणं कृतमस्ति तादृशानि ) [ इमानि ] हव्यानि (=हवींषि ) वीतये (=भक्षयितुम् ) उप आ गहि (=आगच्छ ) । हे इन्द्र, आ गहि (=आगच्छ ) । [ अपि च ] हवम् (=अस्माभिः क्रियमाणमिदमाह्वानं ) श्रुधि ( =शृणु ) । अध्वरे ( =अस्मिन् यज्ञे ) त्वा ( =त्वां ) हवन्ते (=ऋत्विज आह्वयन्ति ) ॥

स्वाहाकृतानि । स्वाहेत्येवंपूर्वा कृतिः कारणमुच्चारणं यक्ष्यमाणदेवतानां ताः स्वाहाकृतयः । तद्वन्ति हव्यानि हवींषि । अत्र प्रयाजेषु वषट्कारप्रदानात् स्वाहाकृतं हविरित्यर्थः । इति सायणः ॥

---

आहे. पण याविषयीं आम्हांला अगदी संशय नाहीं असें नाहीं. तरी सू. १० मं. १ आणि टीप पहा. शिवाय सू. २१ मं. २. पहा.

१३. [ हे इंद्रा ], स्वाहा म्हणून अर्पिलेलीं जीं हव्यें, तीं भक्षण्याकरितां तूं ये. हे इंद्रा, तूं ये [आणि [आमचें] आह्वान ऐक. [या] यज्ञांत तुला [ हे जन ] बोलावीत आहेत.

13. Come, [ O Indra ], to eat the offerings, given with the exclamation *Swáhá*. Come, Indra, [ and ] hear [ our ] call. They are invoking Thee in [ this ] sacrifice.

१३. ही ऋचा इंद्राविषयींच आहे, तथापि 'स्वाहा' या शब्दाच्या संबंधाचीच आहे.

वृत्तासाठीं पहिला चरण ' स्वाहाकृतानि आ गहि ' असा म्हणावा.

हें सूक्त येथें संपलें. ऋग्वेदांत जीं दहा आप्रीसूक्तें आहेत त्यांतील हें दुसरें होय. सू. १३ मं. १ याजवरील टिंपत हीं सूक्तें कोणतीं आणि त्यांस ' आप्री ' कां म्हणतात तें सांगितलें आहे. या आप्री सूक्तांतील प्रत्येक ऋचेंत एक एक निरनिराळी देवता असते, आणि ती यज्ञांत जे मुख्य मुख्य पदार्थ असतात, अथवा देवता असतात, तद्रूप असते. कितीएकांचें म्हणणें असें आहे, आणि तें बहुत अंशीं खरें आहे, कीं, इतर वेदांतील ( म्हणजे यजुर्वेद आणि सामवेद यांतील ) सर्व भाग यज्ञाला अनुलक्षन, यज्ञसंबंधानें, यज्ञासाठीं, यज्ञाच्या वेळीं म्हणण्यासाठीं आणि यज्ञाच्या संबंधानेंच अर्थ करण्यास योग्य असे जरी आहेत तरी ऋग्वेदांतील सूक्तें तशीं नाहींत, तर तीं यज्ञाच्या संबंधानें न रचितां भक्तिभावानें स्तुतिपर रचिलेलीं अशीं आहेत. त्या म्हणण्याला हीं आप्रीसूक्तें बाधक होत; साधकें पुष्कळ आहेत, पण हें एक बाधक होय.

## सूक्तम् १४३.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः। अग्निर्देवता। अन्त्या त्रिष्टुप्।
शिष्टं सूक्तं जागतम्॥

प्र तव्यसीं नव्यसीं धीतिमग्नये वाचो मतिं सहसः सूनवे भरे।
अपां नपाद्यो वसुभिः सह प्रियो होता पृथिव्यां न्यसीददृत्वियः॥ १

प्र। तव्यसीम्। नव्यसीम्। धीतिम्। अग्नये। वाचः। मतिम्। सहसः। सूनवे। भरे।
अपाम्। नपात्। यः। वसुऽभिः। सह। प्रियः। होता। पृथिव्याम्। नि। असीदत्। ऋत्वियः॥ १॥

---

### भाषायाम्.

१. [अहं] सहसः सूनवे (=बलस्य पुत्राय) अग्नये तव्यसीम् (=अतिशयेन प्रवर्धयित्रीं) नव्यसीम् (=अतिशयेनाभिनवां) धीतिं (=स्तुतिं) वाचो मतिं (=वाचः स्तोत्रं=वाग्बद्धं स्तोत्रं च) प्र भरे (=प्रकर्षेण संपादयामि)। यः अपां नपात् (=यो मेघोदकानाम्=अन्तरिक्षस्य पुत्रभूतोग्निः) वसुभिः सह (=धनैः सह) प्रिय ऋत्वियो होता (=यजमानस्य प्रीणयिता यथाकालं प्राप्तः आगच्छंश्चैतादृशो देवानाम् आह्वाता भूत्वा) पृथिव्यां नि असीदत् (=भूलोके निषण्णोस्ति)॥

वाचो मतिमित्यत्र वाचो मतिं स्तुतिरूपं कर्म।...... पृथिव्यां वेदिलक्षणायां वसुभिः...... गवादिधनैः सहितः। इति सायणः॥

## सूक्त १४३.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा ( पूर्व सूक्ताचा जो तोच). देवता—अग्नि. वृत्त—जगती; शेवटची ऋचा मात्र त्रिष्टुप् छंदाची.

१. बळाचा पुत्र [ जो ] अग्नि, [ त्या]कारणें मी महा प्रबळ [ आणि ] अत्यंत नवी [ अशी ] स्तुति [ आणि स्तोत्र करितों. जो उदकांचा पुत्र, प्रिय [आणि ] समयीं प्राप्त होणारा [ असा ] होता [ होऊन ] संपत्तीसहित पृथिवीवर बसला आहे.

## Hymn 143.

To *Agni*. By *Dîrghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*, except in the last verse where it is *Trishṭubh*.

1. I compose to Agni, the son of might, a most invigorating [and] entirely new hymn, [and] a prayer expressed in words. For he, the offspring of the waters, has sat down on earth, with riches, [as] a dear [and] punctual invoker [ of the gods ].

---

१. 'बळकट जोरानें अरणीच्या पोटीं घांसून घांसून उत्पन्न केलेला जो अग्नि, त्या कारणें मी अतिशय बळ आणणारें आणि पूर्वीं कोणी कधीं न केलेलें आणि न ऐकिलेलें असें स्तोत्र रचितों. कारण कीं उदकांचा पुत्र असा जो अग्नि,तो भक्तजनांला आणि देवाला प्रिय असा आणि वेळावर प्राप्त होणारा असा होता होऊन, धनसंपत्ति भक्तजनांला देण्यासाठीं आपल्या बरोबर घेऊन स्वर्गलोकांतून येऊन या भूलोकीं बसला आहे.'

'महा प्रबळ'=' तव्यसीम्.' स्तोत्राच्या योगानें देवाला बळ प्राप्त होतें असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे. तर जेणेंकरून अग्नीला मोठें बळ येईल असें स्तोत्र.

'स्तुति'=' धीतिम्.' 'धीति' शब्दाचा हा अर्थ सप्रमाण आहे अशाविषयीं ऋ. ८. १२. १० आणि ६. १५. ११ यांजवरील सायणांचें भाष्य पहा.

'स्तोत्र'='वाचो मतिम्.' अक्षरशः 'वाणीचें अथवा वाचेचें मनन.' म्हणजे मनन करून शब्दांनीं प्रदर्शित केलें जें स्तोत्र तें, केवळ मनांतले मनांत केलेलें ध्यान नव्हे. अथवा 'वाचः' ही द्वितीया घेऊन 'सूक्तें आणि स्तोत्र' असा अर्थ करावा.

'उदकांचा पुत्र'=' अपां नपात्.' म्हणजे बाष्परूपानें ज्यांत उदकें राहतात ते प्रदेश=' अंतरिक्ष,' ज्याला वेदांत 'आपः' अथवा उदकें असें म्हणतात. त्यावरून 'अपां नपात्' म्हणजे

**स जायमानः परमे व्योमन्याविरग्निरभवन्मातरिश्वने ।**
**अस्य क्रत्वा समिधानस्य मज्मना प्र द्यावा शोचिः पृथिवी अरोचयत् ॥ २ ॥**

सः । जायमानः । परमे । विऽओमनि । आविः । अग्निः । अभवत् । मातरिश्वने ।
अस्य । क्रत्वा । सम्ऽइधानस्य । मज्मना । प्र । द्यावा । शोचिः । पृथिवी इति । अरोचयत् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. सोग्निः परमे व्योमनि (=उत्कृष्टे=उत्तुङ्गतमे स्वर्गे) जायमानः (=यदा जातोस्ति तदानीमेव) मातरिश्वने (=एतन्नामकाय कस्मैचिद्) आविरभवत् (=प्रत्यक्षोभूत्)। समिधानस्य अस्य (=यदा स मातरिश्वना समिद्धोभवत्तदानीमेव तस्य) क्रत्वा मज्मना (=कर्मणा महत्त्वेन च) [तस्य] शोचिः (=प्रभा) द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ=द्युलोकभूलोकावुभावपि) प्रारोचयत् (=प्रकर्षेण अदीपयत्) ॥

सायणस्त्वन्यथा। तदेवम्। जायमानोऽरणीभ्यामुत्पद्यमानः काष्ठेषु वा प्रादुर्भूतः सन् तदानीमेव परम उत्कृष्टे व्योमनि विविधरक्षणवति वेदिदेशे मातरिश्वनेन्तरिक्षसंचारिणे वायवे प्रथममाविरभवत्। प्रत्यक्षोभूत् ...... अथवा ...... मातरिश्वा यजमानः। तदर्थम्। किंच समिधानस्येन्धनैः सम्यग् वर्धमानस्याग्नेर्मज्मना। इत्यादि ॥

'अंतरिक्षाचा पुत्र' म्हणजे अंतरिक्षांत विद्युद्रूपानें उत्पन्न होणारा जो तो. हें अग्नीचें नांव आहे. सू. २२ मं. ६ याजवरील टीप पहा. सू. १२२ मं. ४ याजवरीलहि टीप पहा.

'संपत्तीं सहित......बसला आहे'= 'वसुभिः सह न्यसीदत्.' म्हणजे बसलेला असतो, आणि संपत्ति देत असतो.

वृत्तासाठीं 'नि असीदद्दृत्वियः' असें चवथ्या पादांत वाचावें.

२. तो अग्नि अत्यंत उंच स्वर्गीं उत्पन्न होतांच मातरिश्व्याच्या दृष्टीस पडला. तो पेटविल्यानंतर त्याच्या पराक्रमानें [ आणि ] मोठेपणानें त्याची प्रभा द्युलोक आणि भूलोक यांला प्रकाशानें भरिती झाली.

2. That Agni, [ so soon as he was ] born in the highest heaven, became visible to Mâtaris'vâ. Through his power [and ] through [ his ] greatness, [ his ] splendor when he was kindled illuminated heaven and earth.

२. अग्नि प्रथम आकाशांत असून पृथिवीवर तेथून येऊन मनुष्यहितासाठीं होता होऊन बसला आहे म्हणून वर सांगितलें; आतां ऋषि म्हणतो, 'हा जेव्हां आकाशांत प्रथम उत्पन्न झाला, तेव्हां तो मातरिश्वा याला दृष्टिगोचर झाला. मातरिश्व्यानें त्याला भूमीवर आणून पेटविलें, तेव्हां त्याच्या पराक्रमाच्या योगानें आणि मोठेपणाच्या योगानें त्याची प्रभा इतकी पसरली, कीं तिणें भूलोक आणि द्युलोक हे दोन्हीहि अगदी भरून गेले.'

'मातरिश्व्याच्या दृष्टीस पडला.' मातरिश्वा कोण, आणि त्याच्या दृष्टीस अग्नि कसा पडला, आणि त्यानें तो पृथिवीवर कसा आणिला याविषयीं सू. ६० मं. १, सू. ७१ मं. ४ आणि सू. ९६ मं. ४ आणि त्यांजवरील टीपा पहा.

'पेटविल्यानंतर त्याच्या'='समिधानस्य अस्य.' म्हणजे भूलोकीं आणून पेटविल्यानंतर असें तात्पर्य दिसतें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'विओमनि' असें म्हणावें.

अस्य त्वेषा अजरा अस्य भानवः सुसंदृशः सुप्रतीकस्य सुद्युतः ।
भात्वक्षसो अत्यक्तुर्न सिन्धवोऽग्ने रेजन्ते अससन्तो अजराः ॥३॥
अस्य । त्वेषाः । अजराः । अस्य । भानवः । सुऽसंदृशः । सुऽप्रतीकस्य । सुऽद्युतः ।
भाऽत्वक्षसः । अति । अक्तुः । न । सिन्धवः । अग्नेः । रेजन्ते । अससन्तः । अजराः ॥ ३ ॥

यमेरिरे भृगवो विश्ववेदसं नाभा पृथिव्या भुवनस्य मज्मना ।
अग्निं तं गीर्भिर्हिनुहि स्व आ दमे य एको वस्वो वरुणो न राजति ॥ ४ ॥
यम् । आऽईरिरे । भृगवः । विश्वऽवेदसम् । नाभा । पृथिव्याः । भुवनस्य । मज्मना ।
अग्निम् । तम् । गीःऽभिः । हिनुहि । स्वे । आ । दमे । यः । एकः । वस्वः । वरुणः । न । राजति ॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

३. अस्य भानवः (=दीप्तयस्) त्वेषाः (=तेजस्विनो) [ भवन्ति ] । सुसंदृशः (=सुसम्यग्द्रष्टुः) सुप्रतीकस्य (=शोभनमुखस्य) सुद्युतः (=सर्वतो द्योतमानस्य) अस्य (=तस्याग्नेर्) [ भानवः ] अजराः (=सदैव यौवनोपेता इव प्रखरा) [ भवन्ति] । भात्वक्षसः न (=भा एव त्वक्षो बलं यस्य तस्य=प्रखरतेजसः सूर्यस्येव अग्नेः) सिन्धवः (=तेजःप्रवाहाः) अससन्तः (=अस्वपन्तः=सदैव स्वकार्ये व्याप्ता) अजराः (=जरारहिताश्च) [सन्तः] अक्तुः (=?अक्तुम्) अति रेजन्ते (=नैशं तमोतिक्रम्य व्याप्नुवन्ति ) ॥

ते च [ भानवः ] सुसंदृशः सुष्ठु सम्यग्द्रष्टारः सर्वतो व्याप्ता इत्यर्थः । सुद्युतः सुष्ठु सुद्युतो द्योतमानाः । ...... अक्तुरिति रात्रिनामैतत् ...... द्वितीयार्थे प्रथमा ।... ... नैशं तमोति अतिक्रम्य इत्यादि सायणाचार्याः ॥

४. यं विश्ववेदसं (=सर्वधनम्) [ अग्निं ] भृगवः (=एतन्नामान ऋषयो) भुवनस्य मज्मना (=भूतजातस्य बलेन) पृथिव्या नाभा (पृथिव्या नाभौ=उत्तरवेदिरूपे मध्यस्थाने) एरिरे (=स्थापितवन्तः) यः (=यश्च) वरुणो न (=वरुण इव) एकः (=एकाकी=अद्वितीयो) वस्वः राजति (=वसुनः राजति=वसुनो धनस्य राजा




३. याचे—या सुंदर शोभायमान [आणि] देदीप्यमान [अग्नी]-चे किरण देदीप्यमान आणि अजर होत. प्रखर सूर्याच्या दीप्ति जशा [अंधकाराला भेदून पसरतात] तशा अग्नीच्या दीप्ति न निजतां [ आणि ] न म्हाताऱ्या होतां अंधकाराला भेदून पसरत असतात.

४. ज्या सर्वसंपन्न [ अग्नी]-ला भृगु, जगाच्या बळानें पृथिवीच्या नाभीवर स्थापिते झाले, त्या अग्नीला तूं आपल्या घरीं स्तुतींनीं प्रसन्न कर; जो [ अग्नि ] वरुणाप्रमाणें एकटाच संपत्तीचा राजा होय.

3. His flames [ are ] bright,—the flames of him who is beautiful, handsome, [ and ] brilliant, are ever young. The beamy streams of Agni, like [ those ] of the resplendent [sun], penetrate, ever active, ever young, beyond darkness.

4. Propitiate with praises in thy own house that Agni whom, the possessor of all riches, the Bhrigus, by the strength of the world, established on the navel of the earth ( the altar ), [ and ] who, like Varuṇa, is the sole master of wealth.

---

३. 'अग्नीची प्रभा तेजःपुञ्ज आणि कधींहि ऱ्हास न पावणारी होय. आणि प्रखर सूर्याची प्रभा जशी अंधकाराला फोडून त्याच्या पलीकडे जाऊन पोंहचते, तशीच अग्नीची प्रभा अंधकाराला फोडून त्याचा नाश करून त्याच्या पलीकडे जाऊन फांकते, आणि ती कधींहि आळशी न राहणारी आणि निजून न राहणारी होय.'

'अजर'='अजराः.' म्हणजे 'जरारहित,' म्हातारे न होणारे. अग्नीला 'यविष्ठ'='अतिशयें करून तरुण' सदैव तरुण राहणारा, असें वेदांत म्हणतात त्यालाच अनुलक्षून हें विशेषण त्याच्या प्रभेला येथें लाविलें आहे.

'अंधकाराला भेदून'='अक्तुः अति.' अक्षरशः अंधकाराच्या पलीकडे. पण 'अक्तुः' हें प्रथमेचें एकवचन आहे, तें द्वितीयेचें एकवचन समजून अर्थ सायणप्रमाणें करावा लागतो. कितीएक विद्वान् 'अक्तुः' म्हणजे तेज, प्रभा असा अर्थ करून ( ऋ. २. १९. ३ याजवरील सायण भाष्यावरून 'अक्तु' शब्दाचा अर्थ तेज असा होतो हें उघड आहे ) भात्वक्षसः [ सूर्यस्य ] अक्तुर्न अग्नेः सिन्धवः अति रेजन्ते=प्रखर सू-

न यो वरा॑य म॒रुता॑मिव स्व॒नः सेने॑व सृ॒ष्टा दि॒व्या यथा॒शनिः॑ ।
अ॒ग्निर्जम्भै॑स्तिगि॒तैर॑त्ति॒ भर्व॑ति यो॒धो न शत्रू॒न्त्स वना॒ न्यृ॑ञ्जते ॥५॥
न । यः । वरा॑य । म॒रुता॑म्ऽइव । स्व॒नः । सेना॑ऽइव । सृ॒ष्टा । दि॒व्या । यथा॑ ।
अ॒शनिः॑ ।
अ॒ग्निः । जम्भैः॑ । ति॒गि॒तैः । अ॒त्ति॒ । भर्व॑ति । यो॒धः । न । शत्रू॑न् । सः ।
वना॑ । नि । ऋ॒ञ्ज॒ते ॥ ५ ॥

---

भवति ) तम् अग्निं स्वे दमे (=स्वकीये गृहे ) गीर्भिः हिनुहि (=स्तोत्रैः प्रीणय ) ॥

भृगवो भृगुगोत्रोत्पन्नाः ...... पृथिव्या वेशाः । एकदेशे कृत्स्नशब्दः । यद्वा एतावती वै पृथिवीत्यादिश्रुतेर्वेशाः पृथिवीत्वम् । तस्या नाभावुत्तरवेद्यां भुवनस्य भूतजातस्य मज्मना बलेन निमित्तेन । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

५. यो मरुतामिव स्वनः (=मरुतां गर्जनमिव ) [ अथवा ] सृष्टा सेनेव ( =क्षिप्तो बाण इव ) [ अथवा ] अशनिर्दिव्या यथा ( =दिव्या द्युसंबन्धिनी अशनिः वज्र इव ) वराय न ( =वारणाय न=निग्रहाय शक्यो न ) [ भवति ] स तिगितैर्जम्भैः (=तीक्ष्णैर्दन्तैः ) अत्ति (=भक्ष्यान् भक्षयति ) भर्वति ( =हिनस्ति ) स योधः शत्रून् ( =योद्धा कश्चिच्छत्रूनिव ) वना ( =वनानि=वृक्षान् ) नि ऋञ्जते ( =नितरां प्रसाधयति=स्ववशमानयति=अभिभवति ) ॥

सायणस्तु सृष्टा वैरिक्षयार्थं प्रबलेनाभिसृष्टा सेनेव । सा यथान्यैरनिरोध्या तद्वत् । ...... अत्ति । अस्मद्विरोधिनो भक्षयति । इत्यादि ॥

---

यांचें तेज जसें तसे अग्नीचे तेजःप्रवाह अतिशयें करून जिकडे तिकडे पसरतात, असा अर्थ करितात.

'न निजतां '=' अससन्तः'. म्हणजे रात्रंदिवस आळशी न राहणारे असे.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत ' अति अक्तुर्ने ' असें म्हणावें, आणि तिसरा आणि चवथा चरण यांजमध्यें संधि करूं नये.

४. 'ज्या सर्वधनसंपन्न अग्नीला सर्व जगाच्या बळाच्या योगानें भृगुकुळांतील जनांनीं पृथिवीप्रत आणून वेदीवर स्थापिलें, आणि जो वरुणाप्रमाणें सकल संपत्तीचा एकला राजा होय, त्या अग्नीला, हे मित्रा, तूं स्तोत्रें म्हणून आपल्या घरीं प्रसन्न कर ' असें ऋषि जवळ असलेल्या भक्ताला अथवा यजमानाला सांगतो आहे.

५. जो मरुतांच्या गर्जनेप्रमाणें, सोडिलेल्या बाणाप्रमाणें [ अथवा ] दिव्य वज्राप्रमाणें अनिवार्य [होय], तो अग्नि तीक्ष्ण दाढांनीं [ वृक्षादिकांला ] भक्षितो [ आणि ] खाऊन टाकितो. योद्धा जसा शत्रूंला जेर करितो, तसा तो वृक्षांला जेर करितो.

5. Agni who, like the roaring of the Maruts, like an arrow that is shot, like the celestial thunderbolt, is not to be warded off, eats [ and ] consumes with his sharp jaws; he subdues the trees even as does a hero [ his ] enemies.

---

'भृगु'='भृगवः.' भृगु म्हणजे कोण, आणि त्यांनीं अग्नीला पृथिवीवर आणि वेदीवर त्याची कशी स्थापना केली याविषयीं सू. ५८ मं. ६ पहा.

'जगाच्या बळानें'='भुवनस्य मज्मना.' म्हणजे जगाला बळ येण्यासाठीं असें सायणाचार्य म्हणतात. जगाचें जितकें बळ होतें तें सर्व अग्नीला पृथिवीवर आणावयाच्या कामीं खर्च करावें लागलें, असें असेल काय ?

'प्रसन्न कर'='हिनुहि.' ऋ. १. १५३. ३ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा.

---

५. 'वादळाचा सोसाटा चालूं लागला म्हणजे तो जसा निवारण्यास शक्य नसतो, अथवा एकादा बाण जोरानें सोडिला म्हणजे तो जसा अनिवार्य असतो, अथवा आकाशांतून विजेचा झपाटा आला म्हणजे तो जसा निवारितां येत नाहीं, तसा हा अग्नि जाऊं लागला म्हणजे अनिवार्य होय. तो आपल्या ज्वाळांनीं वृक्षादिक सर्व जेर करून खाऊन टाकितो, नाहींसे करितो, कीं जसा काय एकादा महा योद्धा आपल्या शत्रूंस जेर करून टाकितो.'

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'दिव्याच्या जागीं 'दिविआ' असें वाचावें, आणि चवथ्या चरणांत नि ऋञ्जते' असें म्हणावें.

**कुविन्नो अग्निरुचथ॑स्य वीरस॑द्वसुष्कुविद्वसु॑भिः कामं॑मावर॑त् ।**
**चोद॑ः कुविन्तु॑तुज्यात्सातये॑ धियः॑ शुचिप्रती॑कं तमया॑ धिया॑ गृणे ॥६॥**

कुवित् । नः । अग्निः । उचथ॑स्य । वीः । अस॑त् । वसुः । कुवित् । वसु॑ऽभिः । काम॑म् । आऽवर॑त् ।
चोद॑ः । कुवित् । तुतुज्यात् । सातये॑ । धिय॑ः । शुचि॑ऽप्रतीकम् । तम् । अया । धिया । गृणे ॥ ६ ॥

**घृतप्र॑तीकं व ऋतस्य॑ धूर्षद॑मग्निं मित्रं न स॑मिधान ऋ॑ञ्जते ।**
**इन्धा॑नो अक्रो विदथे॑षु दीद्य॑च्छुक्रव॑र्णामुदु नो यंसते धिय॑म् ॥७॥**

घृत॑ऽप्रतीकम् । वः । ऋतस्य॑ । धूःऽसद॑म् । अग्निम् । मित्रम् । न । सम्ऽइधानः । ऋञ्जते ।
इन्धा॑नः । अक्रः । विदथे॑षु । दीद्य॑त् । शुक्रऽव॑र्णाम् । उत् । ऊं इति॑ । नः । यंसते । धिय॑म् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. अग्निः नः उचथस्य (=अस्माकं स्तोत्रस्य) कुवित् वीः असत् (=बहुवारं कामयिता अस्तु) । वसुः (=कल्याणकारी) [स] कुविद् वसुभिः कामम् आवरत् (=बहुवारं धनैरस्माकं मनोरथं साधयतु) । चोदः (=प्रेरकः) [सः] [अस्माकं] धियः (=उपासनाः) सातये कुवित् तुतुज्यात् (=बहुवारं फलप्राप्तये त्वरयतु=यथा ताः सफला भवेयुस्तास्तथा प्रेरयतु) । शुचिप्रतीकं (=शोभनमुखं) तम् [अग्निम्] अया धिया (=अनया स्तुत्या) [अहं] गृणे (=स्तौमि) ॥

कुविदिति पदं किमर्थकं प्रश्नद्योतकमिति पाश्चात्यपण्डिताः । सायणस्तु तद् अनुयास्कं बहुवारं प्रभूतमिति वा नित्यं विवृणोति । सति तु प्रश्नद्योतकत्वे कुविच्छब्दस्य तस्याज्ञानं सायणे यास्के वा न संभवतीति कृत्वा वयं तावेवानुसरामः । अपि च बहुवारं प्रभूतमिति यद् व्याख्यानं ताभ्यां कृतमस्ति तत् तत्तन्मन्त्रेषु न युज्यत इति न ॥

७. घृतप्रतीकं (=घृतेन प्रज्वलिताङ्गं) वः ऋतस्य धूर्षदं (=युष्माकं यज्ञस्य निर्वाहकम्) अग्निं समिधानः (=समिद्भिर्दीप्यमान) [उपासको] मित्रं न ऋञ्जते (=मित्रदेवमिव प्रसाधयति=प्रसादयति) । इन्धानः (=दीप्यमानः सन्) अक्रः

६. अग्नि आमच्या स्तोत्राचा नित्य भोक्ता होओ. कल्याणकारक [अग्नि] संपत्तींच्या योगानें [आमचा] मनोरथ नित्य पूर्ण करो. प्रेरक [अग्नि] [आमच्या] उपासनांला नित्य सफळतेप्रत नेओ. त्या शोभायमान [अग्नी]ला या [माझ्या] स्तोत्रानें मी स्तवितों.

७. घृतानें ज्याचें अंग सतेज [होत असतें], [आणि] जो अग्नि तुमच्या उपासनेचा निर्वाह चालविणारा [होय], त्याला पेटवून मित्राप्रमाणें [उपासक] भजतात. पेटविल्यावर विक्राळ [होऊन] यज्ञांत अतिशयेंकरून प्रकाशणारा [जो अग्नि, तो] आमच्या शुद्ध उपासनेचा उत्कर्ष करो.

6. May Agni ever be the lover of our hymn. May benevolent [Agni] ever gratify [our] desire with riches. May that inspirer ever promote our prayers to the attainment of [our] wishes. I praise that effulgent [Agni] with this hymn.

7. [The worshipper], kindling Agni of features glowing with clarified butter, [and] the leader of your rite, propitiates him like Mitra. May he, who [when] kindled becomes impetuous [and] resplendent in sacrifices, promote our pure worship.

---

६. 'आमचें स्तोत्र अग्नीला नित्य आवडो; अग्नि आमची द्रव्याविषयींची मनकामना नित्य पूर्ण करो; अग्नि आमच्या उपासना नित्य सफळ होतील अशा रीतीनें त्यांस प्रेरणा करो. हें सर्व अग्नि करील अशा आशेनें मी त्यास या माझ्या स्तोत्रानें स्तवीत आहें.'

'नित्य'='कुवित्.' कितीएक पाश्चात्य विद्वान् 'काय' अशा अर्थानें प्रश्नदर्शक हें अव्यय आहे असें म्हणतात; पण सायणाचार्य आणि यास्काचार्य तो अर्थ कोठेंच देत नाहींत; म्हणून आम्हीं त्यांसच अनुसरलों आहों. पुनर्विचाराअंतीं सू. ३३ मं. १ यांतहि सायणांसच अनुसरणें योग्य होतें असें आम्हांस आतां वाटतें.

७. 'ज्या अग्नीवर तूप ओतल्यामुळें तो प्रज्वलित झालेला असतो, जो उपासना सफळ करणारा, त्या अग्नीला उपासक जन पेटवून प्रसन्न करितात. ज्याला य-

**अप्रयुच्छन्नप्रयुच्छद्भिरग्ने शिवेभिर्नः पायुभिः पाहि शग्मैः ।**
**अदब्धेभिरदृपितेभिरिष्टेऽनिमिषद्भिः परि पाहि नो जाः॥८॥१२॥**

अप्रऽयुच्छन् । अप्रयुच्छत्ऽभिः । अग्ने । शिवेभिः । नः । पायुऽभिः ।
पाहि । शग्मैः ।
अदब्धेभिः । अदृपितेभिः । इष्टे । अनिमिषत्ऽभिः । परि । पाहि ।
नः । जाः ॥ ८ ॥ १२ ॥

( ? परेषाम् आक्रमिता) विदथेषु दीद्यत् (=यज्ञेषु दीप्यमानः सन् ) नः (=अस्माकं) शुक्रवर्णां धियं (=शुद्धवर्णां=शुद्धाम् उपासनाम् ) उद् उ यंसते ( =उद्गमयत्वेव=उत्कर्षयत्वेव ) ॥

## भाषायाम्.

८. हे अग्ने, अप्रयुच्छन् ( =अप्रमाद्यन् अस्मासु विषयेवहितः सन् ) [ त्वम् ] अप्रयुच्छद्भिः (=अप्रमाद्यद्भिः=अवहितैः) शिवेभिः (=शिवैः=कल्याणैः) शग्मैः (=सुखकरैः ) पायुभिः (=संरक्षणप्रकारैर् ) नः ( =अस्मान् ) पाहि ( =रक्ष ) । [ अपि च ] हे इष्टे (=सर्वैर्यष्टव्य=पूज्य ), अदब्धेभिः (=अहिंसितैर् ) अदृपितेभिः (=अपरिभूतैर् ) अनिमिषद्भिः (=निमिषरहितैः सदैवजागरूकैः) [ पायुभिः ] नो जाः (=नः प्रजाः=अस्माकं पुत्रपौत्रादीन् ) परि पाहि (=परितो रक्ष ) ॥

अप्रयुच्छद्भिः अनवधानरहितैः । ...... अनिमिषद्भिर्निमेषरहितैरनलसस्वभावैः । इत्यादि सायणाचार्यः ॥

ज्ञांत समिद्ध केल्यावर तेजानें देदीप्यमान होऊन अनिवार्य होतो, तो अग्नि आमची उपासना उत्कृष्ट होऊन सफल होई असें करो,' असा भावार्थ.

ही ऋचा किंचित् कठिण आहे. 'ऋञ्जते' ह्याचा कर्ता दिलेला नाहीं. हें क्रियापद एकवचनी आहे, आणि 'वः' हें बहुवचनीं आहे. तेव्हां 'ऋञ्जते'चा कर्ता 'वः' पैकीच आहे, कीं त्याशिवाय आहे, तें स्पष्ट समजत नाहीं.

'मित्राप्रमाणें'='मित्रं न.' म्हणजे मित्र या देवाप्रमाणें असा अभिप्राय आहे.

'विकाळ'='अक्रः' हा शब्द कठिण आहे. आम्ही येथें इतर ठिकाणच्या सायणभाष्यास अनुसरलों आहों. पाश्चात्त्यांतून निरनिराळे विद्वान् निरनिराळा अर्थ सुचवितात. सायण तरी सर्वत्र एकच अर्थ करीत नाहींत. तात्पर्य, या शब्दाच्या अर्थाविषयीं निर्णय नाहीं.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'दीदिअत्' असें म्हणावें.

८. हे अग्नी, तूं हेळसांड न करितां, हेळसांड न करणाऱ्या, कल्याणकारक [ आणि ] सुखकारक [ अशा ] रक्षणांच्या योगानें आमचें रक्षण कर. हे पूज्य [ अग्नी ], अप्रतिहत, अविघ्नित [आणि] सदैव जागरूक [ अशा ] [ रक्षणां ]च्या योगानें तूं आमच्या मुलांबाळांचें सर्व प्रकारेंकरून र-क्षण कर.

8. Without neglect do thou, O Agni, preserve us with protections that are free from neglect, that are holy [and] blissful. And with uninjured, unresisted and ever watchful [protections] do thou, O adorable [one], preserve our children from all sides.

८. हा येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. यांत ऋषि शेवटीं आपल्या मनांतील वर मागतोः—' हे अग्नी, तूं सर्व-प्रकारांनीं आमचें संरक्षण करून आम्हांस शत्रूंपासून वगैरे उपद्रव होऊं न देतां, जेणेंकरून सुख होईल, तसें कर. आणि त्याप्रमाणेंच आमच्या मुलांबाळांचेंहि संरक्षण तूं कर. '

' सर्व प्रकारें करून '=' परि. ' अक्षरशः सर्व बाजूंनीं, चोहींकडून.

## सूक्तम् १४४.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । जगती च्छन्दः ॥

**एति प्र होता व्रतमस्य माययोर्ध्वां दधानः शुचिपेशसं धियम् ।**
**अभि स्रुचः क्रमते दक्षिणावृतो या अस्य धाम प्रथमं ह निंसते ॥ १**

एति । प्र । होता । व्रतम् । अस्य । मायया । ऊर्ध्वाम् । दधानः । शुचिऽपेशसम् । धियम् ।
अभि । स्रुचः । क्रमते । दक्षिणाऽआवृतः । याः । अस्य । धाम । प्रथमम् । ह । निंसते ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. ऊर्ध्वाम् (=उत्कृष्टां) शुचिपेशसं (=शोभनरूपोपेतां) धियं (=प्रज्ञां) दधानः (=धारयन्) होता (=होमनिष्पादकोऽध्वर्युः) अस्य (=अग्नेर्) व्रतं मायया प्रैति (=चातुर्येण कर्म कर्तुमारभते)। [तदनन्तरं] दक्षिणावृतः (=दाक्षिण्येन वर्तमानाः) स्रुचः (=जुह्वादीः) अभि क्रमते (=आभिमुख्येन गच्छति=ताः प्रति गच्छति)। याः [स्रुचः] अस्य (=अग्नेर्) धाम (=स्थानं) प्रथमं निंसते ह (=चुम्बन्ति=प्रथमं भजन्ते खलु) ॥

प्रथममनुष्ठेयकर्म बुद्ध्या प्रैति पश्चात्स्रुचः क्रमत इत्यर्थः । हशब्दः प्रसिद्धौ । इति सायणः ॥

## सूक्त १४४

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—जगती.

१. कौशल्यानें होमनिष्पादक अध्वर्यु, उंच [आणि] सुंदररूपवती प्रज्ञा धारण करून, या [अग्नी]ची उपासना करावयाला पुढें सरसावतो. हा दक्षिणेकडे वळणाऱ्या पळ्यांकडेस जातो; ज्या पळ्या प्रथम या [अग्नी]च्या स्थानाचें चुंबन घेतात.

## HYMN 144.

To *Agni*. By *Dīrghatamas*, the son of *Uchathya*. Metre—*Jagatī*.

1. The priest, possessed of high [ and ] beautiful intelligence, proceeds to perform his [ Agni's ] rite with skill. He then walks towards the ladles that turn to the south; which first kiss the home of this [ Agni ].

---

१. हेंहि सूक्त अग्नीविषयींच आहे. या पहिल्या ऋचेचा भावार्थ—'उत्तम बुद्धिमान् जो होता ऋत्विज्, तो मोठ्या प्रज्ञेनें या अग्नीचें परिचरण, म्हणजे त्या प्रीत्यर्थ होमादिक उपासना, करण्याची सिद्धता करितो. आणि दक्षिणेकडेस असणाऱ्या ज्या आहुति घालण्याच्या पळ्या, त्या हातांत घ्यावयास लागतो. कारण दुसऱ्या उपकरणांच्या पूर्वीच पळ्या अग्नीचें स्थान प्रथम चुंबितात, म्हणजे पळ्या अगोदर अग्नीची सेवा ( आहुति ओतून वगैरे ) करितात, मग इतर पदार्थ.'

'हा.' म्हणजे अध्वर्यु. 'दक्षिणेकडे वळणाऱ्या '='दक्षिणावृतः' वेदीच्या, म्हणजे आहवनीय अग्नि जेथें असतो त्याच्या, दक्षिणेकडे असा अभिप्राय दिसतो. कारण ऋ.३.६.१ यांतहि दक्षिणेकडे 'नेली जाणारी पळी तुपानें भरलेली अशी हवि घेऊन अग्नीसाठीं पूर्वेकडे जाते ( दक्षिणावाट् वाजिनी प्राची एति हविर्भरन्ती अग्नये घृताची)' असें म्हटलें आहे.

'प्रथम '=' प्रथमम्.' म्हणजे पळ्यांच्या योगानें तूप अग्नींत प्रथम ओतीत, दुसऱ्या उपकरणांचा उपयोग मागाहून होत असे.

वृत्तासाठीं 'मायया । ऊर्ध्वा' असें वाचावें.

अभीमृतस्य दोहना अनूषत योनौ देवस्य सदने परीवृताः ।
अपामुपस्थे विभृतो यदावसदध स्वधा अधयद्याभिरीयते ॥ २ ॥
अभि । ईम् । ऋतस्य । दोहनाः । अनूषत । योनौ । देवस्य । सदने । परिऽवृताः ।
अपाम् । उपऽस्थे । विऽभृतः । यत् । आ । अवसत् । अध । स्वधाः । अधयत् । याभिः । ईयते ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. ऋतस्य दोहनाः (=सत्यभूतस्य मेघोदकस्य धाराः) परीवृताः (=तमग्निं परिवेष्टमाना) देवस्य सदने योनौ (=तस्य जन्मस्थानभूते देवगृहे=तस्य जन्मस्थानभूतेऽन्तरिक्षे) ईम् अभि अनूषत (=तमग्निमाभिमुख्येन स्तुतवत्यः) । [अपि च] यद् (=यदा) विभृतः अपामुपस्थे आ अवसत् (=बालवत् इतस्ततो नीतः अब्रूपाणां मातॄणामुत्सङ्गे=अन्तरिक्षे वासमकरोत्) अध (=तदानीं) स्वधाः अधयत् (=अमृतोपममेघोदकद्वारा आहुतीः पीतवान्) याभिः ईयते (=याभिः स्वधाभिरिदानीं भूलोकेऽस्मत्सदृशैः प्रार्थ्यते=पूज्यते) ॥

अत्रेदमुक्तं भवति । यदाग्निरपामुदरान्निर्गत्य बालवन्नासामुत्सङ्गे स्थितः इतस्ततश्च बालवन्नीत आसीत् तदा कंचिद्बालं प्रति युवतयो गीतं गायन्ति दुग्धं च तं पाययन्ति तथैव उदकस्य धारा अग्निं प्रति गीतमगायन् याश्च स्वधा अस्मादृशा उपासकास्तमत्र लोके पाययामस्ता एव तदानीं स मेघोदकद्वारापिबदिति ॥

२. उदकाच्या धारा अग्नीचें जन्मस्थान जें देवांचें घर, तेथें त्याला वेष्टून त्याला गीत गात्या झाल्या. जेव्हां त्याला उदकांच्या मांडीवर घेऊन फिरवीत आणि तो तेथें राहत असे, तेव्हां, आतां ज्यांहीं करून तो [ येथें ] पूजिला जातो, त्या अमृताहुति तो पीत असे.

2. The streams of water, surrounding him at his place of birth— in the home of the gods, sang to him. When he lived on the lap of the waters carried about in arms, he then drank the same oblations with which he is honoured here.

२. 'अग्नि हा जेव्हां आपोदेवींपासून अन्तरिक्षांत जन्मला आणि त्यांच्या मांडीवर खेळूं लागला, आणि इकडे तिकडे लहान मुलाप्रमाणें त्याला नेऊन खेळवीत, तेव्हां, लहान मुलाला जशा स्त्रिया गाणीं गातात, तशा मेघापासून झालेल्या उदकांच्या धारा - त्याच कोणी स्त्रिया, त्या त्याला गाणीं गात असत. आणि या मर्त्यलोकीं आपण उपासक जें अमृतासमान हव्य त्याला पाजतों, तें तो मेघोदकरूपानें तेथें पीत असे,' असा या ऋचेचा भावार्थ दिसतो.

'वेष्टून'=' परीवृताः.' पाळण्यासभोंतालीं बायका जमून जशा गीत गातात त्याप्रमाणें.

'उदकांच्या धारा'=' ऋतस्य दोहनाः.' हा अर्थ येथें कसाहि निघालेला असो, पण येथें हात्र घ्यावयाचा याविषयीं संशयाला जागा दिसत नाहीं. 'ऋत' शब्दाचा अर्थ ' उदक ' असा केला पाहिजे याविषयीं सू. १०५ मं. १२ याजवरील टीप आणि भाषा पहा.

' देवांचें घर '=' देवस्य सदने. ' म्हणजे, देव जेथें राहातात, तें स्थळ म्हणजे आकाश.

' जन्मस्थान '=' योनौ. ' अग्नि विजेच्या रूपानें अंतरिक्षांत उत्पन्न होतो म्हणून तें त्याचें जन्मस्थान होय.

'अमृताहुति'=स्वधाः.' म्हणजे आम्हीं जें सोमाचें पाणी अथवा पायसादिक अग्नीला येथें पाजितों, तें सर्व तो आपल्या जन्मप्रदेशीं मेघोदकरूपानें पीत असे.

युयूषतः सवयसा तदिद्वपुः समानमर्थं वितरित्रता मिथः ।
आदीं भगो न हव्यः समस्मदा वोळ्हुर्न रश्मीन्त्समयंस्त सारथिः॥ ३

युयूषतः । सऽवयसा । तत् । इत् । वपुः । समानम् । अर्थम् । विऽतरित्रता । मिथः ।
आत् । ईम् । भगः । न । हव्यः । सम् । अस्मत् । आ । वोळ्हुः। न । रश्मीन् । सम् । अयंस्त । सारथिः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. सवयसा (=सवयसौ=समानवयस्कौ ) समानम् अर्थं मिथः वितरित्रता (=एकमेव प्रयोजनं परस्परमतिशयेन तरीतुमिच्छन्तौ=संपादयितुमिच्छन्तौ ) तद् इत् (=यद् इत्=यदानीमेव ) वपुः युयूषतः (=स्वकीयं शरीरं जननार्थं मिश्रयितुमिच्छतः=अग्निजननार्थं व्यवसायं कर्तुमिच्छतः=आयासेनारणिभ्यामग्निं जनयतः) आत् ईम् (=तदानीमेव ) भगो न हव्यः (=भग इव पूजनीयः=भगनामको देव इव पूजनीयः ) सारथिः (=अग्निरूपः ) वोळ्हुर्न [ ऋतस्य ] रश्मीन् (=रथवाहसाश्वस्य प्रग्रहानिव कर्मणः प्रग्रहान् ) अस्मत् ( =अस्माकं सकाशात् स्वहस्ते ) सम् अयंस्त (=स्वीकरोति ) ॥

"तदित्" इति दुर्बोधकल्पम् । सायण इमामेवं व्याख्यातवान् । सवयसा समानवयस्कौ । वयःशब्देन सामर्थ्यं लक्ष्यते । समानसामर्थ्यौ तदित् तदानीमेव यदा प्रवृत्तो भवति तदानीमेव समानमर्थं समानं प्रयोजनं निष्पत्तिं मिथः प्रत्येकं वितरित्रता भृशं तरन्तौ होत्रध्वर्यू वपुरग्नेः शरीरं युयूषतः स्वस्वव्यापारेण मिश्रयितुमिच्छतः । प्रैषानन्तरं याज्यादिपाठो होतुर्व्यापारः वषट्कारानन्तरं होमोऽध्वर्योरिति विभागः । अत्रेदमनुसंधेयम् । सवयसा समानवयस्कौ मिथः प्रत्येकं समानं प्रयोजनं सुखप्राप्तिं वितरित्रा विशेषेण तरितुमिच्छन्तौ । तरते र्यङ्लुगन्ताच्छतरि दाधर्त्यादौ निपात्यते । द्विवचनस्याकारः । जायापती तद्वपुस्तदेव परस्परं शरीरं युयूषतो मिश्रयितुमिच्छतः परस्परमालिङ्गतः । तद्वदग्निं साकं होत्रध्वर्यू युयूषतः । आदीं अनन्तरमेव हव्य आहवनीयोग्निः सारथिः सरणशीलः सारथिवग्न्यात्मकस्य रथस्य निर्वाहको वा सन् अस्मत् अस्माकं संबन्धिनो रश्मीन् रश्मिवदायता घृतधारा आ सर्वतः समयंस्त । सम्यक् स्वीकरोति । तत्र दृष्टान्तद्वयमुच्यते । भगो न सर्वैः सेवनीय आदित्यः स यथा सर्वतः पूजामादत्ते तद्वत् । सारथी रथस्य यन्ता वोढुर्वाहकस्याश्वादे रश्मीन् । प्रतिग्रहानिव । तान्यथा स्वीकरोति तद्वदयमग्निरपि हवींषि समयंस्त ॥ इति ॥

३. एकाच वयाचे दोघे [ऋत्विज] परस्पर एकच काम करून ज्यावेळीं आंगाला आंग घांसतात, त्याबरोबर भगाप्रमाणें पूजनीय [असा जो हा] सारथि, [तो] घोड्याचा लगाम घेतल्याप्रमाणें आम्हांकडून [कर्मांचा] लगाम [आपल्या हातीं] घेत असतो.

3. When the two [priests] of the same age, mutually endeavouring to accomplish the same object, join their limbs together, the charioteer Agni, adorable like Bhaga, instantly takes to himself from us the reins [of worship] as [those] of a horse.

३. 'स्त्रीपुरुष समानवयस्क होत्साते जसे पुत्रोत्पादनासाठीं आयास करितात, तसे समानवयस्क दोघे ऋत्विज मिळून परस्पर श्रम करून अग्नीला मंथन करून ज्यावेळीं अरणींतून जन्मवितात त्याचवेळीं— जन्मतांच— तो आमचा सारथि होतो. आणि जसा रथाचा लगाम सारथीनें आपल्या हातांत घेऊन रथ चालवावा, तसा अग्नि आमचें यज्ञकर्म चालवितो' असा भावार्थ आहे, पण हा मंत्र किंचित् कठिण आहे. सायणाचें भाष्य किंचित् वेगळें आहे तें भाषेखालीं पहा.

'एकाच वयाचे दोघे'=' सवयसा.' यावरून दोघे मिळून अरणीवर घर्षण करून अग्नि उत्पन्न करीत असें होतें. सायणाचार्य समानवयस्क म्हणजे समानसामर्थ्यवान् असें म्हणतात. तें चांगलें संभवतें. अग्नीला मंथून काढणारे बळकट असावे असें दिसतें. त्यावरूनच त्याला 'सहसः पुत्रः,' 'सहसो युवा' (=बळाचा पुत्र), इत्यादि विशेषणें मिळालेलीं आहेत.

'आंगाला आंग घांसतात'=' वपुः युयूषतः.' अक्षरशः आंग मिसळतात. स्त्रीपुरुषांप्रमाणें अंगस्पर्श करितात असा ध्वनि आहे. 'अरणीवर लांकूड घांसतात' असा अभिप्राय.

'भगाप्रमाणें पूजनीय'=' भगो न हव्यः.' या ठिकाणीं 'भग' म्हणजे कोण? सायण म्हणतात 'आदित्य' (=सूर्य?). तसें असेल. अथवा सूर्यरूपच जो भग नांवाचा देव, तो असेल.

'[कर्मांचा] लगाम'=' [ऋतस्य] रश्मीन्.' यज्ञादिक कर्मांचा लगाम धरणें म्हणजे तें यथासांग समाप्तीस नेणें, असा अर्थ होतो. याविषयीं सू. १२३ मं. १३ आणि त्याजवरील टीप पहा.

'आम्हांकडून [कर्मांचा] लगाम आपल्या हातीं घेतो.'=' अस्मद् आ सम् अयंस्त रश्मीन्.' म्हणजे अग्नि पेटण्याच्या पूर्वी आम्ही यज्ञकर्म करण्यास असमर्थ असतों, नंतर अग्नीला पेटवितांच अग्नीनें आमचा यज्ञरूप घोडा अथवा

**यमीं द्वा सवयसा सपर्यतः समाने योना मिथुना समोकसा ।**
**दिवा न नक्तं पलितो युवाजनि पुरू चरन्नजरो मानुषा युगा॥४॥**

यम् । ईम् । द्वा । सऽवयसा । सपर्यतः । समाने । योना । मिथुना । सम्ऽओकसा ।
दिवा । न । नक्तम् । पलितः । युवा । अजनि । पुरु । चरन् । अजरः । मानुषा । युगा ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. यमीम् (=यमेव) [ अग्निं ] सवयसा ( =सवयसौ=सवयस्कौ=समानवयस्कौ) समोकसा ( =समोकसौ=समाननिवासौ ) मिथुना ( =मिथुनसंबन्धेन संबद्धौ ) द्वौ ( १ " दंपती इव एककार्यौयुक्तौ...... होत्रध्वर्यू " ) समाने योना (=एकस्मिन्नेव योनौ=स्थाने=" यज्ञे " ) सपर्यतः (=पूजयतः=स्तुत्यादिना प्रीणयतः ) [ स ] दिवा न नक्तं (=दिवसे तथा रात्रौ ) पलितः [ सन्नपि ] युवा अजनि (=" पूर्वमङ्गारावस्थायां जीर्णोपि समिन्धनानन्तरं "तरुणो जायते ) । [ स च ] पुरू मानुषा युगा ( =पुरूणि मानुषाणि युगानि=बहून् मनुष्यसंबन्धिनः कालविभागान् ) चरन् (=जीवन्नपि ) अजरः (=जरारहितो ) [वर्तते] ॥

समानोकसा समाननिवासौ देवयजनस्थानौ इति सायणः ॥

---

रथ चालविण्याचें काम आपल्या हातीं घेतलेलें असतें. | वृत्तासाठीं ' हव्यः'च्या स्थळीं ' हविअः ' असें वाचावें.

४. ज्या [ अग्नी ]ला एकाच वयाचे [ आणि ] एकाच घरीं राहणारे [ आणि ] परस्पर संबद्ध असे दोघेजण एकाच ठिकाणीं पूजितात, तो दिवसास आणि रात्रीस [ म्हातारपणानें ] पांढरा [ झाला असतांहि ] तरुण [ होऊन ] जन्मतो, [ आणि ] मनुष्यांच्या पुष्कळ डोई जगूनहि जराहित राहतो.

4. He, whom the two, of similar age, married each to the other, [ and ] living in the same dwelling, worship in the same place, is born young day and night [ though at first ] gray— free from old age, [ though ] living through many human generations.

४. या ऋचेंत समानवयस्क इत्यादि विशेषणें लाविलेले दोघे सांगितले आहेत, ते कोण ? सायणाचार्य म्हणतात 'होता' आणि 'अध्वर्यु' हे दोन ऋत्विज्; ग्रास्मनादिक पाश्चात्य विद्वान् म्हणतात कीं, दिवस आणि रात्र हे दोघे. दोघे कोणीहि असोत, स्त्रीपुरुषांचा ध्वनि आहे यांत संशय नाहीं. आम्हीं सायणांस अनुसरून अर्थ केला आहे. पूर्वीच्या ऋचेंत आणि या ऋचेंत सांगितलेले ' दोघे ' हे एकच होत, असें घेणें हें चांगलें दिसतें.

'[ म्हातारपणानें ] पांढरा [ झाला असतांहि ]'=' पलितः. ' म्हणजे पेटविण्याच्या पूर्वी तप्त राखेच्या रूपानें असतो तेव्हां तो केस पिकलेल्या माणसाप्रमाणें म्हातारा दिसतो; पण पेटवून ताजा होतांच पुनः तरुण दिसूं लागतो.

' मनुष्यांच्या पुष्कळ डोई जगूनहि '=' पुरू चरन् मानुषा युगा. ' म्हणजे मानवी काळ. मनुष्यांच्या पिढ्या. मनुष्यें ज्यांत राहतात तो काळ. 'युग' शब्दाचा हा अर्थ वेदांत दुसऱ्या स्थळींहि आला आहे. सू. १०३ मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा. मनुष्यांच्या पुष्कळ पिढ्या होऊन गेल्या तरी अग्नि तरुण आहे तो आहेच, आणि म्हातारा म्हणून होत नाहीं, याविषयीं आश्चर्य ज्यांत प्रदर्शित केलें आहे, अशीं स्थळें वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत.

वृत्तासाठीं ' द्वा 'च्या ठिकाणीं 'दुआ' असें वाचावें लागतें.

**तमीं हिन्वन्ति धीतयो दश व्रिशो देवं मर्तास ऊतये हवामहे ।**
**धनोरधि प्रवत आ स ऋण्वत्यभिव्रजद्भिर्वयुना नवाधित ॥ ५ ॥**

तम् । ईम् । हिन्वन्ति । धीतयः । दश । व्रिशः । देवम् । मर्तासः ।
ऊतये । हवामहे ।
धनोः । अधि । प्रऽवतः । आ । सः । ऋण्वति । अभिव्रजत्ऽभिः ।
वयुना । नवा । अधित ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

५. तम् ईं (=तमेव पूर्वोक्तम्) [ अग्निं ] धीतयः (=यागादिकर्मकर्तारो) दश व्रिशः [ च ] (=दशाङ्गुलयश्च ) हिन्वन्ति (=हितं कुर्वन्ति=प्रीणयन्ति) । [ तं ] देवम् (=अमर्त्यं ) मर्तासः (=मर्त्या ) [ वयम् ] ऊतये (=अस्माकं रक्षणाय ) हवामहे (=आह्वयामः ) । स प्रवतो धनोरधि (=प्रकर्षेण गमनं यस्माचादृशात्प्रवणमार्गादन्तरिक्षात् ) [ वैद्युताग्निरूपेण ] आ ऋण्वति (=आगच्छति ) । [ एवं कृत्वाच ] अभिव्रजद्भिः (=आभिमुख्येन गच्छद्भिः=भक्तैः) [क्रियमाणानि] नवा वयुना (=नवानि वयुनानि=नूतनानि प्रज्ञाविशिष्टानि स्तोत्रादीनि ) अधित (=धारयति=स्वीकुरुते) ॥

यतोयमग्निर्विद्युद्रूपेण प्रवणादन्तरिक्षाद्भूमौ पतति अतः कारणात्तद्विषयास्तस्य नवाः स्तुतीरुपासकाः कुर्वन्ति ताः स प्राप्नोतीति भावः ॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । देवं द्योतमानं तमेनमग्निं दश धीतयो दशसंख्याका अङ्गुलयो व्रिशो विशः परस्परविश्लिष्टा हिन्वन्ति । प्रीणयन्ति मथनकाले । तथा मर्तासो मनुष्या वयं यजमाना ऊतये रक्षणाय हवामहे । आह्वयामः । कोऽस्य विशेष इत्युच्यते । अयमग्निर्धनोर्धनुषः सकाशात् आ प्रकर्षेण गच्छतो बाणानिव । तान्यथा शत्रोरुपरि मुञ्चन्ति । आ इत्युपमार्थे । तद्वत्सोऽग्निर्धनुःस्थानीयान्निजशरीरसकाशात्प्रवतः प्रकृष्टवेगवतो रश्मीनृण्वति । गमयति । रिविर्गत्यर्थः। अत्रान्तर्भावितण्यर्थोऽयम् ।...... छान्दसं रेफस्य संप्रसारणम् । अधिशब्दोऽनर्थको धात्वर्थमात्रानुवादी । किंच एवं प्रवृद्धोऽग्निरभिव्रजद्भिरनुष्ठानार्थमभितः संचरद्भिर्ज्ञेयमर्थमभिगच्छद्भिर्वा । तदर्थं नवा नवानि नूतनानि वयुना वयुनानि प्रज्ञानान्यनुष्ठानविषयाण्यधित । धारयति । ज्ञापयतीत्यर्थः । यद्वा अभिव्रजद्भिराभिमुख्येन गच्छद्भिर्होत्रादिभिः क्रियमाणानि नवानि वयुनानि प्रज्ञाविशिष्टानि स्तोत्रादीन्यधित । धत्ते ॥

५. त्यालाच भक्त [ आणि ] दहा अंगुल्या भजतात. [ त्या ] देवाला [ आम्ही ] मर्त्य [ जन ] संरक्षणाकरितां बोलावितों. तो उभ्या अंतरिक्षापासून खालीं धांव घेतो. तो उपासकांनीं केलेल्या नूतन उपासनांप्रत पावतो.

5. Him the pious propitiate, the ten fingers [ propitiate ]. That god we mortals invoke for [our] protection. He shoots down from the precipitous sky. He receives new honours [ offered ] by suppliants.

५. 'वर जो अग्नि सांगितला त्यालाच हाताच्या दहा अंगुल्या मंथनकाळीं भजतात, त्यालाच उपासकजन भजतात. त्या अमर्त्याला आम्ही मर्त्य आमच्या संरक्षणासाठीं बोलावितों. आणखी त्याचा पराक्रम असा आहे कीं, तो अंतरिक्षांतून विजेच्या रूपानें भूमीवर येतो, तेव्हां भक्तजनांस आश्चर्य वाटून ते त्याच्या नव्यानव्याच स्तुति करितात. तसल्या स्तुति त्यालाच प्राप्त होतात, इतर देवांस प्राप्त होत नाहींत.'

'दहा अङ्गुल्या '=' दश क्षिशः.' सू. ९५ मं. २. आणि त्याजवरील टीप पहा.

'उभ्या अंतरिक्षापासून '=' प्रवतः धनोः अधि.' 'धनु' शब्दाचा अंतरिक्ष असा अर्थ होतो याविषयीं ऋ. १०. ४. ३ 'धनोः अधि प्रवता यासि हर्यन्' या ठिकाणचें सायणभाष्य पहा. तेथेंहि अग्नि उभ्या आकाशांतून येतो असें सांगितलें आहे. प्रस्तुत स्थळीं सायणांनीं निराळा अर्थ केला आहे तो भाषेखालीं उतरून घेतला आहे.

वृत्तसुखासाठीं 'ऋण्वति । अभि॰' इत्यादि म्हणावें.

**त्वं ह्यग्ने दि॒व्यस्य॒ राज॑सि॒ त्वं पार्थि॑वस्य पशु॒पा इ॑व॒ त्मना॑ ।**
**एनी॑ त ए॒ते बृ॑ह॒ती अ॑भि॒श्रिया॑ हिर॒ण्ययी॒ वक्व॑री ब॒र्हिरा॑शाते ॥६॥**

त्वम् । हि । अ॒ग्ने । दि॒व्यस्य॑ । राज॑सि । त्वम् । पार्थि॑वस्य । प॒शु॒पाःऽ-
इ॑व । त्मना॑ ।
एनी॒ इति॑ । ते॒ । ए॒ते इति॑ । बृ॒ह॒ती इति॑ । अ॒भि॒ऽश्रिया॑ । हि॒र॒ण्ययी॒ इ
ति॑ । वक्व॑री॒ इति॑ । ब॒र्हिः । आ॒शा॒ते॒ इति॑ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हि ( =यस्मात् कारणात् ) हे अग्ने, पशुपा इव त्मना ( =पशुपालको यथा स्वकीयानां पशूनां स्वातन्त्र्येण स्वामी भवति तथा ) त्वं दिव्यस्य [ वृष्ट्यादिधनस्य ] राजसि (=ईशिषे=ईश्वरो भवसि) । त्वं पार्थिवस्य (=पृथिवीसंबन्धिनः) [ सस्यादिधनस्य ] (=राजसि=ईश्वरो भवसि ) । एते (=पुरो दृश्यमाने ) एनी ( =श्वेतवर्णे ) बृहती (=बृहत्यौ=विस्तीर्णे ) अभिश्रिया (=अभिश्रियौ=प्राप्तैश्वर्ये ) हिरण्ययी (=हिरण्ययौ=हिरण्यरूपे ) वक्वरी (=वक्वर्यौ=मधुरध्वनी ) [ द्यावापृथिव्यौ ] ते (=तव) बर्हिः आशाते (=कुशासनं व्याप्नुतः=तव कुशासनाय यावत्स्थलमपेक्ष्यते तावत्यौ स्तः) ॥

हे अग्ने, त्वं पृथिवीसंबन्धिनो द्युसंबन्धिनश्च धनस्येश्वरो भवसि । न चात्राश्चर्यं यतो हेतोस्तव कुशासनस्य यावत्स्थलमपेक्ष्यते तावन्मात्रे एव द्यावापृथिव्यौ स्तः न महत्तरे । एतावांस्त्वमिति भावः ॥

राजसि । ईश्वरो भवसि । किमन्यतन्त्रत्वेन नेत्याह । त्मना । आत्मनैव । स्वसामर्थ्येनैव । तत्र दृष्टान्तः । पशुपा इव । पशुपालको यथा स्वसामर्थ्येनैव पशूनां निरोधनिर्गमनादिव्यापारेषु समर्थो भवति तद्वत् । एतद्दृष्टान्तेनात्यन्तस्वातन्त्र्यमुक्तं भवति । इति सायणः ॥

६. कारण कीं, हे अग्नी, गुराखी [जसा गुरांचा] तसा स्वताहाच तूं दिव्य धनाचा [प्रभु] आहेस, तूं भूलोकावरील धनाचा [ प्रभु आहेस ]. ह्या श्वेतवर्णाच्या, मोठ्या, शोभायमान, हिरण्मय, मधुरध्वनियुक्त ज्या [ द्यावापृथिवी], त्या तुझ्या दर्भासनाला पुरतात.

6. For thou, O Agni, art the master of divine blessings, thou of earthly blessings, even as a shepherd [is of his flock]. These fair, vast, glorious, golden, harmonious [Earth and Heaven], suffice for thy seat in a sacrifice.

६. 'हे अग्नी, तूं स्वर्गांतील जें धन, आणि पृथिवीवरील जें धन, त्या दोहींना राजा आहेस; आणि तूं त्यांचा राजा आहेस यांत नवल नाहीं, कारण कीं तूं इतका मोठा आहेस कीं, अतिविस्तीर्ण ज्या द्यावापृथिवी, त्या तुझ्या केवळ दर्भासनांला जागा पुरे इतक्याच मोठ्या आहेत.' यांत अग्नीचें अतिमहत्त्व वर्णिलें आहे, आणि तो द्यावापृथिवीपेक्षांहि अतिशय मोठा असें जाणविलें आहे.

'गुराखी जसा गुरांचा तसा.'=' पशुपा इव.' म्हणजे गुराखी जसा गुरांना पाहिजे तिकडे वळवूं शकतो, पाहिजे तर थांबवूं शकतो, पाहिजे तर मागें फिरवूं शकतो, त्याप्रमाणें अग्नि धनाची व्यवस्था करूं शकतो. असें सायणाचार्य म्हणतात तें खरें दिसतें.

'दिव्य धनाचा '=' दिव्यस्य.' म्हणजे आकाशांतून वृष्टि वगैरे पडत असते तद्रूप धन.

'दर्भासनाला पुरतात '='बर्हिः आशाते.' सायणाचार्य 'यज्ञाला व्यापितात' ( यज्ञं व्याप्नुतः ) असा अर्थ करितात. पण त्यांचा भावार्थ स्पष्ट नाहीं.

वृत्तासाठीं पहिला चरण 'तुअं हि अग्ने दिवि अस्य राजसि' असा वाचावा लागतो, आणि चवथ्या पादांत 'राशाते' याच्या बद्दल '०राशोते' असा उच्चार केल्याशिवाय निर्वाह नाहीं.

**अग्ने जुषस्व प्रति हर्य तद्वचो मन्द्र स्वधाव ऋतजात सुक्रतो ।**
**यो विश्वतः प्रत्यङ्ङसि दर्शतो रण्वः संदृष्टौ पितुमाँ इव क्षयः**
**॥ ७ ॥ १३ ॥**

अग्ने । जुषस्व । प्रति । हर्य । तत् । वचः । मन्द्र । स्वधाऽवः । ऋतऽ-
जात । सुक्रतो इति सुऽक्रतो ।
यः । विश्वतः । प्रत्यङ् । असि । दर्शतः । रण्वः । सम्ऽदृष्टौ । पितुमा-
न्ऽइव । क्षयः ॥ ७ ॥ १३ ॥

## भाषायाम्.

७. हे अग्ने, [ त्वं ] जुषस्व (=प्रीतो भव ) । हे मन्द्र (=मादकारिन्=आनन्द-कारिन् ), हे स्वधावः ( =स्वधावन्=बलवन् ), हे ऋतजात ( =यज्ञाय जात ), हे सुक्रतो (=शोभनप्रज्ञ ) [ अग्ने ], तद् (=एतदस्माकं ) वचः ( =स्तोत्रं ) प्रति हर्य (=पुनः कामयस्व ) । यस् [ त्वं ] संदृष्टौ (=संदर्शने जाते सति=त्वयि सम्यग्दृष्टे सत्येव ) पितुमान् क्षय इव (=अन्नवद् गृहमिव ) विश्वतः प्रत्यङ् (=सर्वतः अनुकूलो ) दर्शतः (=दर्शनीयो ) रण्वः (=रमणीयश् ) [ च ] असि (=भवसि ) ॥

तद् वचः इत्यत्र तत्तादृशं प्रियकरं वचो वाग्रूपं स्तोत्रम् इति सायणः ॥

७. हे अग्नी, तूं प्रसन्न हो; हे आनंदकारी, हे बलवान्, यज्ञासाठीं निर्माण झालेल्या, हे सुप्रज्ञ [ अग्नी ], तूं [ आमचें ] हें स्तोत्र प्रीतीनें स्वीकारून घे; जो तूं दर्शन होतांच अन्नपरिपूर्ण घराप्रमाणें सर्व प्रकारांनीं अनुकूळ, सुंदर [ आणि ] रमणीय असतोस.

7. Be thou gratified, O Agni ; [ and ] O delightful, mighty [ and ] wise [ Agni ], O thou born for [ promoting ] sacrifice, accept this [ our ] prayer with pleasure ; thou, who, so soon as thou art seen, becomest, like a house rich in food, serviceable in all ways, delightful to see [ and ] beautiful.

७. हा येथें सूक्ताचा उपसंहार झाला. 'हे अग्नी, तूं हें आमचें स्तोत्र ऐकून घे आणि आम्हांवर प्रसन्न हो. कारण कीं, जर तूं प्रसन्न होशील, तर एकादें अन्नादिक संपत्तींनीं भरलेलें घर जसें सर्व प्रकारें सोईकर, सुंदर, आणि रमणीय दिसतें, तसा तूं आविर्भूत होतांच होत असतोस,' असा ऋषीचा भावार्थ.

'बलवान्.'='स्वधावान्.' सू. ३६ मं. १२ आणि टीप पहा.

'यज्ञासाठीं निर्माण झालेल्या'='ऋतजात.' हा शब्द वेदांत जेथें जेथें आला आहे, तीं स्थळें काढून पाहिलीं. सायणांनीं कोठें कोठें 'यज्ञात अरणींतून उत्पन्न झालेला' असा आणि कोठें कोठें 'यज्ञासाठीं उत्पन्न झालेला' असा अर्थ केला आहे. दोनी अर्थ चांगले संभवतात.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'प्रति-अङ्कुसि' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १४५.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । जगती छन्दः । अन्त्या तु त्रिष्टुप् ॥

**तं पृच्छता स जगामा स वेद स चिकित्वाँ ईयते सा न्वीयते ।**
**तस्मिन्त्सन्ति प्रशिषस्तस्मिन्निष्टयः स वाजस्य शवसः शुष्मिण-**
**स्पतिः ॥ १ ॥**

तम् । पृच्छत । सः । जगाम । सः । वेद । सः । चिकित्वान् । ईयते
सः । नु । ईयते ।
तस्मिन् । सन्ति । प्रऽशिषः । तस्मिन् । इष्टयः । सः । वाजस्य ।
शवसः । शुष्मिणः । पतिः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे ऋत्विजः ], तं पृच्छत (=उत्तमयज्ञज्ञानार्थमग्निं पृच्छत ) । स जगाम (=आगतवानस्ति ) । स [ एव ] [ यज्ञान् ] वेद (=यज्ञप्रकारं जानाति ) । चिकित्वान् (=ज्ञातवान्=यज्ञप्रकाराणां ज्ञाता ) स [ एव ] ईयते (=प्रार्थ्यते=याच्यते )—स नु ईयते ( =यज्ञज्ञानार्थं स एव प्रार्थ्यते=याच्यते ) । तस्मिन् ( =अग्नावेव ) प्रशिषः (="प्रशासनानि नियमनसामर्थ्यानि" ) सन्ति । तस्मिन् (=अग्नावेव ) इष्टयः (=यागाः=यागज्ञानानि ) [ सन्ति ] । स [ एव ] वाजस्य (=बलस्य ) शवसः (=सामर्थ्यस्य ) शुष्मिणः (=बलवतश्च राजादेः ) पतिः (=प्रभुर् ) [ वर्तते ] ॥

तस्मिन् प्रशिषः इत्यत्र असाध्यं नियम्यापि साधयितुं शक्त इत्यर्थः । इति सायणः ॥

## सूक्त १४५.

ऋषि—उचथ्य नांवाच्या मनुष्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—जगती; शेवटची ऋचा मात्र त्रिष्टुभ्.

१. त्याला तुम्ही पुसा. तो आला आहे. तो जाणतो. त्या ज्ञानवंताची प्रार्थना लोक करितात, त्याचीच प्रार्थना करितात. आज्ञा देण्याचें सामर्थ्य त्याच्याच आंगीं आहे, त्याच्याच आंगीं यज्ञ करण्याचें सामर्थ्य [ आहे ]. तोच सामर्थ्याचा, बळाचा, [ आणि ] बळवंताचा प्रभु [ होय ].

## HYMN 145.

To *Agni*. By *Dîrghatamas* son of *Uchathya* (same as the author of the previous hymn). Metre—*Jagatî*, except in the last verse, where it is *Trishṭubh*.

1. Ask *him*. He is come. He knows. He, the knowing, it is that is asked, he alone is asked. In him there are commands [ to give ], in him [ the knowledge of ] sacrifices. He [ is ] the master of power, [ and ] of might, [ and ] of the mighty.

---

१. देवांस प्रसन्न करील असा यज्ञ कसा करावा तें कोणाला विचारावें? अशा शंकेला ऋषि सांगतोः—' हे मित्र हो, तुम्ही अग्नीला पुसा. तो आला आहे. तो जाणतो. कारण तो उत्तम ज्ञानवान् होता आहे. त्यालाच यज्ञ कसा करावा तें लोक विचारीत असतात. यज्ञ कसा कसा करावा तें सांगण्याचें सामर्थ्य त्याच्याच आंगीं आहे, यज्ञ कसे करावे याचें ज्ञान त्याच्याच आंगीं आहे. सर्व प्रकारचें बळ आणि सर्व बळी पुरुष त्याचेच हातीं आहेत.'

यावरून इतकें सिद्ध होतें कीं, अतिप्राचीन काळीं यज्ञ करण्याची पद्धति आतांसारिखी अगदीं ठरीव आणि न बदलण्याजोगी अशी नसे; तर अमुक प्रकारांनीं यज्ञ केल्यास देवांस विशेष किंवा कमी मान्य होईल अशी समजूत असे. केवळ श्रौतसूत्रांत आणि त्यांच्या टीकेंत सांगितल्याप्रमाणेंच करावें असें नसे.

वृत्तासाठीं दुसरा चरण ' चिकितुआनीयते सा नु ईयते ' असा म्हणावा लागतो.

**तमित्पृ॒च्छन्ति॒ न सि॒मो वि पृ॑च्छति॒ स्वेने॑व॒ धीरो॒ मन॑सा॒ यदग्र॑भीत् ।**
**न मृ॑ष्यते प्रथ॒मं नाप॑रं॒ वचो॒ऽस्य क्रत्वा॑ सचते॒ अप्र॑दृपितः ॥२॥**

तम् । इत् । पृ॒च्छ॒न्ति॒ । न । सि॒मः । वि । पृ॒च्छ॒ति॒ । स्वेन॑ऽइव ।
धीरः॑ । मन॑सा । यत् । अग्र॑भीत् ।
न । मृ॒ष्य॒ते॒ । प्र॒थ॒मम् । न । अप॑रम् । वचः॑ । अ॒स्य । क्रत्वा॑ । स॒च॒ते॒ ।
अप्र॑ऽदृपितः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. तम् इत् पृच्छन्ति ( =अग्निमेव जनाः पृच्छन्ति=यज्ञाः कथं कर्तव्या इत्यादि पृच्छन्ति ) । [ तं ] सिमो न वि पृच्छति ( =सर्वोपि मनुष्यो विविधं न पृच्छति= यः कोपि यत् किंचिदपि न पृच्छति ) [ अपि तु ] धीर इव (=धीर एव=धीमान् पुरुष एव ) स्वेन मनसा यद् अग्रभीत् (=स्वकीयेन मनसा यत्प्रष्टव्यमगृह्णात्=मनसि धारितवान् ) [ तत् पृच्छति ] । [ स च धीरः ] प्रथमं [ वचः ] (=अग्निना प्रथमं प्रत्तमुत्तरं) न मृष्यते (=न विस्मरति) अपरं वचः (=पश्चाद्दत्तमुत्तरमपि न विस्मरति)। [ तर्हि ] अप्रदृपितः ( =अदृप्तः=गर्वरहितः सन् ) अस्य क्रत्वा सचते ( =अग्नेः प्रज्ञया=अग्निना प्रत्तेन प्रज्ञायुक्तेन वचसा गच्छति=प्रज्ञावान् अग्निर्यथा दिशति तथैवाचरति ) ॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । पूर्वमन्त्रेऽग्निं पृच्छतेत्युक्तम् । अत्र तु सोऽनुनयेन प्रष्टव्य इत्याह । तमित् तमेवाग्निं पृच्छन्ति स तु नान्यं पृच्छति प्रश्नसमयेऽपि । सिमः सर्वजनो न विपृच्छति । विपरीतं न पृच्छति । पृष्टोऽपि धीरो धीमानयं स्वेनेव मनसा । इवशब्द एवार्थे । स्वकीययैव बुद्ध्या यत् यत्कार्यमग्रभीत् । वदामीत्यादत्ते । तदेव प्रतिब्रूते न तु प्रश्नानुकूलम् । स्वतन्त्रेश्वर इत्युक्तं भवति । यद्वा प्रष्टा धीमान् स्वेन मनसा वाचा वाच्यं विचार्य तदग्रभीत् यद्वाक्यं वक्तव्यत्वेन स्वीकुर्यात् तदेवाग्निं पृच्छति न तु बहु भाषत इत्यर्थः । परवाक्यासहत्वमाह । अयमग्निः प्रथमं वचः स्ववाक्यात्पूर्वभावि वचनं न मृष्यते । न सहते । तथा परं वचः स्वोक्त्यनन्तरभावि प्रतिवचनं न मृष्यते । यस्मादयमेवंविधस्तस्मादप्रदृपितः । अप्रदृप्तः । यद्वा तेन शिक्षितोऽनुदण्डः सर्वो लोकोऽस्य महानुभावस्याग्नेः क्रत्वा क्रतुना रक्षणादिकर्मणा सह सचते । संगच्छते । जीवतीत्यर्थः ॥

२. त्यालाच [ लोक ] पुसत असतात. [ पण ] [ त्याला ] कोणताहि मनुष्य पाहिजे तसा प्रश्न करीत नाहीं; [ तर ] बुद्धिमंताच्या मनांत जो प्रश्न करावयाचा आला असेल, तोच प्रश्न बुद्धिमान् मनुष्य करितो. पुसणारा ] प्रथमचें [ वचन ] विसरत नाहीं, [ आणि ] नंतरचें वचनहि [ विसरत नाहीं], तर गर्वहीन [ होऊन ] ह्याच्या शाहाणपणानें चालतो.

2. Him alone they question. Any one does not ask [ him ] any thing he likes. A wise man [ asks him that ] alone which his own mind has conceived. [The questioner] forgets not the first reply nor the subsequent one, but meekly walks by his wisdom.

---

२. अग्नीला विचारा असें वर सांगितलें. आतां म्हणतो, ‘ अग्नीलाच सर्व लोक पुसतात तर खरेच; पण पाहिजे तो मनुष्य वेडे वांकडे प्रश्न कुचेष्टा करण्याच्या बुद्धीनें घालितो असें नाहीं, तर बुद्धिमान् मनुष्यच प्रश्न करितो, आणि विचारपूर्वक आणि कोणता प्रश्न करावा, कोणता न करावा असा निश्चय करून प्रश्न करितो; आणि जीं उत्तरें अग्नि देतो, तीं मनःपूर्वक ऐकून घेतो, प्रथमपासून शेवटपर्यंत सर्व ऐकून घेऊन ध्यानांत धरितो, आणि त्याप्रमाणें चालतो; मनांत गर्व करून अग्नीनें सांगितलेल्याचा अव्हेर करीत नाहीं. ’

‘तोच प्रश्न बुद्धिमान् मनुष्य करितो.’ म्हणजे कोणाच्या तरी मनांत प्रश्न करावा असें आलें तर कोणातरी शाहाण्या मनुष्याकडून तो प्रश्न करण्यांत येतो, पाहिजे तो मनुष्य पाहिजे तो प्रश्न करीत नसतो.

‘ विसरत नाहीं’=‘ न मृष्यते.’ ‘मृष्’ धातूचा ‘विसरणें’ असा अर्थ होतो याविषयीं ऋ. ३. ३३. ८ याजवरील सायणांचें भाष्य पहा.

वृत्तासाठीं चवथ्या चरणाच्या आरंभीं ‘ अस्य ’ आणि तिसऱ्या चरणाच्या शेवटील शब्द यांजमध्यें संधि न करणें अवश्य आहे.

तमिद्गच्छन्ति जुह्वस्तमर्वतीर्विश्वान्येकः शृणवद्वचांसि मे ।
पुरुप्रैषस्ततुरिर्यज्ञसाधनोऽच्छिद्रोतिः शिशुरादत्त सं रभः ॥३॥
तम् । इत् । गच्छन्ति । जुह्वः । तम् । अर्वतीः । विश्वानि । एकः ।
शृणवत् । वचांसि । मे ।
पुरुऽप्रैषः । ततुरिः । यज्ञऽसाधनः । अच्छिद्रऽऊतिः । शिशुः । आ ।
अदत्त । सम् । रभः ॥ ३ ॥
उपस्थायं चरति यत्समारत सद्यो जातस्तत्सार युज्येभिः ।
अभि श्वान्तं मृशते नान्द्ये मुदे यदीं गच्छन्त्युशतीरपिष्ठितम् ॥४॥
उपऽस्थायम् । चरति । यत् । सम्ऽआरत । सद्यः । जातः । तत्सार ।
युज्येभिः ।
अभि । श्वान्तम् । मृशते । नान्द्ये । मुदे । यत् । ईम् । गच्छन्ति ।
उशतीः । अपिऽस्थितम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. तमित् (=अग्निमेव) जुह्वः (=जुहूपभृदादयो) गच्छन्ति (=तमेवोद्दिश्याज्यपूर्णाः सत्यो गच्छन्ति)। तम् [इत्] अर्वतीः (=अर्वत्यः="स्तुतयो") [गच्छन्ति]। [स एव] एको मे विश्वानि वचांसि (=मम सर्वाणि स्तुतिरूपाणि वचनानि) शृणवत् (=शृणोतु)। पुरुप्रैषः (=बहुप्रैषभाक्) ततुरिः (=विशेषेण शत्रूणां जेता) यज्ञसाधनः (=यज्ञस्य संपादयिता) अच्छिद्रोतिः (=अप्रतिहतरक्षणः) शिशुः (=अग्निरूपो बालको) रभः (=बलं) सम् आ अदत्त (=सम्यग्गृहीतवान्=मनुष्याणां स्तोत्रहविरादिभिर्बलवानभूत्)॥

सायणस्तु एवंभूतोग्निः सं रभो यज्ञादिसंरम्भवान् सन् आदत्त। आदत्ते हविरादिकं स्वीकरोतीति॥

४. यत् (=यदा) [अग्निः] समारत (=समगच्छत="मन्थनेनाविरभवत्") [तदानीं स] उपस्थायं चरति (=उपस्थाय=समीपमागत्य चरति)। जातः (=अरणिभ्यां प्रादुर्भूतः सन्) सद्यः (=क्षिप्रं) युज्येभिस्तत्सार (=स्वकीयैः सखिभिः सह संचरति)। यद् (=यदानीम्) ईम् (=एतमग्निम्) अपिष्ठितम् (=आविर्भूतं सन्तम्) उशतीः (=उशत्यः=कामयमानाः स्तुतयो) गच्छन्ति (=प्राप्नुवन्ति) [तदा-

३. त्याजकडेसच [ तुपानें भरलेल्या ] पळ्या जातात. त्याजकडेसच स्तुति [ जातात ]. तो एकला माझीं सर्वं स्तोत्रें ऐको. बहुत जनांनीं बोलाविलेला, [युद्धांत ] विजयशाली, यज्ञसाधक, भयरहित साहाय्य करणारा, [ असा जो हा अग्निरूप ] बाळ, तो बळवान् झाला आहे.

४. [ अग्नि ] प्रगट होतांच जवळ येऊन फिरावयास लागतो. तो निष्पन्न होतांच आपल्या मित्रांबरोबर एकाएकीं संचार करावयास लागतो. स्तुति जेव्हां उद्भूत झालेल्या अग्नीप्रत प्रीतीनें जातात, तेव्हां तो श्रम झालेल्या [ मनुष्या]च्या आंगावरून हात फिरवून त्याला आनंद [ आणि ] हर्ष उत्पन्न करितो.

3. To him alone go the sacrificial ladles, to him prayers. May he alone hear all my prayers. Young Agni, who receives many invocations, who is a victor, who accomplishes a sacrifice, whose help is safe, has received strength.

4. When he appears, he walks about in your presence. No sooner is he born than he moves with his friends. When loving praises approach him when he is visible, he gently strokes the fatigued worshipper that he may be pleased [ and ] delighted.

---

३. ‘ सर्व मनुष्यें पळींत तूप भरून त्याच्या आहुति अग्नीप्रतच देतात. त्याजप्रतच सर्व लोक स्तुति करितात. तोच माझीं सर्व स्तोत्रें एकटा ऐकितो. म्हणूनच हा अग्निरूप बाळ सर्वांचीं आमंत्रणें घेऊन, सर्वांचे यज्ञ साधून, सर्वांला युद्धांत शत्रूपासून संरक्षून, सर्वांचें संरक्षण करून; बळवान् झाला आहे. ’

‘ पळ्या ’=‘ जुह्वः.’ म्हणजे अग्नीमध्यें सकळ लोक तुपाच्या आहुति टाकितात, असा भावार्थ आहे. त्याप्रमाणेंच ‘स्तुति त्याजकडेसच जातात’ म्हणजे, त्याचीच स्तुति करितात.

‘ बळवान् झाला आहे ’=‘ आ अदत्त सं रभः.’ अक्षरशः अर्थ ‘ बळ घेता झाला.’ म्हणजे, बळ धारण करिता झाला. भाषेखालीं सायणाचा अर्थ दिला आहे. ‘रभः’ हा शब्द वेदांत पुनः आलेला ना-

स ईं मृगो अप्यो वनर्गुरुप त्वच्युपमस्यां नि धायि।
व्यब्रवीद्वयुना मर्त्येभ्योऽग्निर्विद्वाँ ऋतचिद्धि सत्यः ॥ ५ ॥ १४ ॥

सः। ईम्। मृगः। अप्यः। वनर्गुः। उप। त्वचि। उपऽमस्याम्।
नि। धायि।
वि। अब्रवीत्। वयुना। मर्त्येभ्यः। अग्निः। विद्वान्। ऋतऽचित्।
हि। सत्यः ॥ ५ ॥ १४ ॥

---

नीमयमग्निः] श्वान्तं (=श्रान्तमुपासकं) नान्द्ये मुदे अभि मृशते (=नान्द्यै मुदे=आनन्दाय मोदनाय च आभिमुख्येन स्पृशति=श्रान्तस्योपासकस्याभिमर्शनं कृत्वा तमानन्दयति मोदयति च) ॥

श्वान्तमित्यादौ श्वान्तं श्रान्तं शान्तं वा यजमानं नान्द्ये नन्दनीये कर्मणि निमित्तभूते सति मुदे तस्य संतोषायाभिमृशते। अभिमर्शनं करोति। फलप्रदानेनेति भावः। यथा लोके गुर्वादिः श्रान्तं शिष्यादिकं स्पृशति तद्वत्। इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

५. अप्यः (=अप्संबन्धी=मेघोदकसंबन्धी=मेघोदकपूरितान्तरिक्षे वैद्युताग्निरूपेण भ्रमन्) वनर्गुः (=वनचारी=दावानलरूपेण वने गन्ता) स ईम् (=एष एव) [अग्निरूपो] मृगः (=श्वापदः) उपमस्यां त्वचि (=उपमाहेतुभूतायां श्रेष्ठायां भूम्यास्त्वचि=वेद्याम्) उप नि धायि (=निहितो भवति)। [स] मर्त्येभ्यः (=मरणधर्मभ्यो मनुष्येभ्यो) वयुना (=वयुनानि=यज्ञज्ञानानि) वि अब्रवीत् (=विशेषेण कथयति)। अग्निर्हि विद्वान् (=सर्वज्ञः) ऋतचित् (=यज्ञस्य ज्ञाता) सत्यः (=अनृतरहितः=यत्सत्यं तस्यैवोपदेष्टा) [भवति] ॥

सायणस्तु उपमस्यामुपमायामुपमास्पदायां त्वच्योषध्यादिभिराच्छादितायां वेद्याम् ......। इति ॥

---

हीं, पण 'रभस'= बळवान् असा शब्द आला आहे, त्यावरून आम्हीं भाषांतर केलें आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'जुहुअः' दुसऱ्यांत 'विश्वानि एका' असें म्हणावें; आणि तिसरा आणि चवथा चरण यांजमध्यें संधि करूं नये.

४. 'अग्नीला अरणींत मंथून काढिल्याबरोबर तो आमच्या जवळ जणु येऊन चालावयास लागतो. अरणींतून बाहेर निघतांच तो आपल्या खेळगड्यांबरोबर (आम्हां उपासकां बरोबर) जणु

५. हा [ जो ] उदकांतील [आणि] अरण्यांतील मृग, [तो]-च श्रेष्ठ वेदीवर ठेविला जातो. [ तो ] मर्त्यांला अनेक प्रकारचें यज्ञज्ञान सांगतो. कारण कीं अग्नि [ हा ] विद्वान्, यज्ञातें जाणणारा, [ आणि ] खरा आहे.

5. This deer of the waters [ and ] of the forests, [this deer] alone, is placed on the highest altar. [Agni ] communicates the rites to mortals. For Agni is learned, skilled in sacrifices, [ and ] true.

---

एकदम चालावयास लागतो. उपासकाच्या स्तुति अग्नीला जाऊन पोंहचतांच, तो मन्थन करून करून थकलेला जो उपासक त्याच्या आंगावरून हात फिरवून जणुं त्याचा शीण घालवितो, आणि त्याला आनंद आणि संतोष उत्पन्न होई असें करितो.'

अरणींतून अग्नि बाहेर पडतांच एकाद्या मुलाप्रमाणें कसा वागतो तें या ऋचेच्या पूर्वार्धांत सांगितलें आहे, आणि उत्तरार्धांत अग्नि मंथन करून करून थकलेल्या उपासकाचा शीण कसा नाहींसा करितो तें सांगितलें आहे.

वृत्तासाठीं दुसरा चरण 'सदिअॉ जातस्तत्सॅार युजिएॅभिः' असा खडबडीत म्हणावा लागतो; तिसऱ्या चरणांत 'नान्दिए' असें म्हणावें, आणि चवथ्यांत 'गच्छन्ति उशतीः' असें म्हणावें.

---

५. 'उदकांनीं भरलेले जे अंतरिक्षाचे प्रदेश, त्यांतून विजेच्या रूपानें भ्रमण करणारा, आणि वनांत दावानलरूपानें भ्रमण करणारा जो हा अग्निरूप मृग, त्याला उपासक लोक उत्तम वेदीवर स्थापितात. तो वेदीवर बसल्यावर मनुष्यांला कोणता यज्ञ कसा करावा याविषयीं उपदेश करितो. आणि तो उपदेश उत्तम आणि खरा असतो; कारण अग्नीला सर्व ज्ञान आणि विशेषेंकरून यज्ञाविषयींचें ज्ञान असून, तो खरा उपदेश करणारा होय, खोटा उपदेश करून फसविणारा नव्हे.'

अग्नीला येथें उदकांतील मृग आणि वनांतील मृग म्हटलें आहे, त्याचें तात्पर्य इतकेंच दिसतें कीं, तो एकाद्या अतिशय चपळ हरणाप्रमाणें आकाशांत विजेच्या रूपानें पळत असतो, आणि त्याप्रमाणेंच तो अरण्यांत वणव्याच्या रूपानें धांवत असतो.

या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे. पहिला चरण 'स ईअं मृगो अपिओ वनर्गुः' असा, दुसरा 'उप त्वच्युपमसिआं नि धायि,' तिसरा 'वि अब्रवीद्वयुना मर्तिएभ्यो' आणि चवथा 'अग्निर्विदुआन्तचिद्धि सत्यः' असा म्हणावा.

## सूक्तम् १४६.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**त्रिमूर्धानं सप्तरश्मिं गृणीषेऽनूनमग्निं पित्रोरुपस्थे ।**
**निषत्तमस्य चरतो ध्रुवस्य विश्वा दिवो रोचनापप्रिवांसम् ॥ १ ॥**

त्रिऽमूर्धानम् । सप्तऽरश्मिम् । गृणीषे । अनूनम् । अग्निम् । पित्रोः । उपऽस्थे ।
निऽसत्तम् । अस्य । चरतः । ध्रुवस्य । विश्वा । दिवः । रोचना । आपप्रिऽवांसम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ अहं ] त्रिमूर्धानं (=त्रिशिरसं ) सप्तरश्मिं (=सप्तरश्मियुक्तम्) अनूनं (=संपूर्णं ) पित्रोः उपस्थे निषत्तं (=पितृस्थानीययोर्द्यावापृथिव्योरुदरे मध्ये निषण्णम् ) [ अपि च ] चरतः ( =जङ्गमस्य ) [ सतोपि ] ध्रुवस्य ( =अचलस्य ) अस्य दिवः (=पुरो दृश्यमानस्य द्युलोकस्य ) विश्वा रोचना (=विश्वानि रोचनानि=सर्वाणि दीप्तिमन्ति स्थलानि ) आपप्रिवांसम् (=आपूरितवन्तम् ) अग्निं गृणीषे (=गृणे=स्तौमि ) ॥

अत्र सायणः । अनयाग्निर्यज्ञरूपेण स्तूयते । त्रिमूर्धानं सवनत्रयरूपमूर्धत्रयोपेतम् । द्वित्रिभ्यां पाद्दन्मूर्धसु बहुव्रीहावित्युत्तरपदान्तोदात्तत्वम् । किं च सप्तरश्मिं नियामकसप्तच्छन्दोयुक्तम् । अनूनमविकलं संपूर्णफलम् । अग्निमग्निसाध्यमङ्गनादिगुणयुक्तं वा पित्रोरुपस्थे द्यावापृथिव्योरुत्सङ्गे निषत्तं निषण्णम् । मध्ये वर्तमानमित्यर्थः। भूमिस्थद्रव्येण द्युलोकस्थदेवताभिश्च साध्यत्वादिति यावत् । किं च ध्रुवस्य निश्चलस्य चरतो हविर्भक्षयतोऽस्याग्नेः संबन्धिनं यज्ञं दिवो द्युलोकादागतानि विश्वानि रोचनानि देवविमानान्यापप्रिवांसं सर्वतः पूरयितारं गृणीषे । गृणीहि स्तुहि । यद्वा । अयमग्निरेवोच्यते । त्रिमूर्धवदत्र क्षित्यन्तरिक्षद्युलोकाख्यस्थानत्रयोपेतं लोकत्रयव्याप्तमित्यर्थः । गार्हपत्यादिस्थानत्रयवर्तिनं वा । सप्तरश्मिं सप्तज्वालम् । अनूनमन्यूनम् । पित्रोर्द्यावापृथिव्योरुपस्थ उत्सङ्गे निषत्तम् । नसत्तनिषत्तेति निपातनान्निष्ठानत्वाभावः । निषण्णम् । आपप्रिवांसं सर्वतः पूरयन्तं कामानाम् । उक्तलक्षणविशिष्टमग्निं गृणीषे । गृणीहि स्तुहि । किंच चरतः सर्वत्र ज्वालाभिर्गच्छतो ध्रुवस्य धृतत्वादविचलितस्य दिवा द्योतमानस्यास्याग्नेर्विश्वा सर्वाणि रोचना रोचमानानि तेजांसि सर्वत्र व्याप्नुवन्तीति शेषः । ईदृशमग्निं स्तुहीत्यन्तरात्मनः प्रैषः ।

## सूक्त १४६

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. ज्याला तीन शिरें आहेत, ज्याला सात प्रभा आहेत, जो पूर्ण होय, जो आईबापांच्या उदरांत बसून राहिलेला असतो, [ आणि ] ज्याणें या जंगम [ आणि ] स्थावर द्युलोकाचे सकळ देदीप्यमान प्रदेश भरून टाकिले आहेत, त्या अग्नीला मी स्तवितों.

## HYMN 146.

To *Agni*. By *Dirghatamas* son of *Uchathya*. Metre—*Trishṭubh*.

1. I praise Agni of three heads, of seven rays, who is perfect, who is seated in the womb of his parents, [and] who has filled all the bright regions of this revolving [and yet] unchanging heaven.

---

१. 'तीन शिरांचा, सात किरणांचा, परिपूर्ण, आणि आईबापांच्या (म्हणजे द्यावापृथिवींच्या) उदरांत बसून राहिलेला, आणि द्युलोकाचे सकळ देदीप्यमान प्रदेश आपल्या तेजानें भरून टाकणारा जो अग्नि, त्याला मी स्तवितों.'

'ज्याला तीन शिरें आहेत'=' त्रिमूर्धानम्.' अग्नीचीं तीन शिरें कोणतीं याविषयीं कल्पनाच करणें आहे. सायणांचा अर्थ भाषेखालीं दिला आहे. अनेक शिरें (ज्वाला) ज्याला आहेत तो, याशिवाय दुसरा अर्थ विवक्षित नसेल.

'ज्याला सात प्रभा आहेत'=' सप्तरश्मिः' म्हणजे ज्याला सात किरण आहेत. 'अनेक किरण ज्याला आहेत तो' इतकाच अर्थ ऋषीच्या मनांत असावा. 'सप्तरश्मि' हा शब्द वेदांत कितीएक ठिकाणीं आलेलाआहे. त्यांतून कांहीं ठिकाणीं रथास लाविला आहे, तेथें 'सात लगाम ज्याला आहेत तो' असा अर्थ जुळतो. पण प्रस्तुत ठिकाणीं अनेक किरणांचा इतकाच अभिप्राय असेल असें दिसतें. भाषेखालीं पहा.

'आईबापांच्या उदरांत बसून राहिलेला'= 'पित्रोः उपस्थे निषत्तम्.' म्हणजे भूलोक आणि द्युलोक यांच्यामध्यें विजेच्या रूपानें राहणारा.

'जंगम आणि स्थावर द्युलोकाचे'= 'चरतो ध्रुवस्य दिवः.' म्हणजे चालत आहे असा दिसतो तथापि जो स्थिर होय, अशा द्युलोकाचे. सूर्यादिक गोल चालतात त्यांच्या योगानें चालतो असा दिसतो, आणि त्यांच्या संबंधाशिवाय पाहिलें तर अचल आहे असा जो दिसतो, अशा द्युलोकाचे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'पित्रो०-' च्या ठिकाणीं 'पितरो०' असें म्हणावें.

**उ॒क्षा म॒हाँ अ॒भि व॑वक्ष एने अ॒जर॑स्तस्थावि॒तऊ॑तिर्ऋ॒ष्वः ।**
**उ॒र्व्याः प॒दो नि द॑धाति॒ सानौ॑ रि॒हन्त्यूधो॑ अ॒रु॒षासो॑ अस्य ॥ २ ॥**

उ॒क्षा । म॒हान् । अ॒भि । व॒व॒क्षे । ए॒ने इति॑ । अ॒जरः॑। त॒स्थौ॒ । इ॒तःऽऊ॑तिः । ऋ॒ष्वः ।
उ॒र्व्याः । प॒दः । नि । द॒धा॒ति॒ । सानौ॑ । रि॒हन्ति॑ । ऊधः॑ । अ॒रु॒षासः॑। अ॒स्य॒ ॥ २ ॥

**स॒मा॒नं व॒त्सम॒भि सं॒चर॑न्ती॒ विष्व॑ग्धे॒नू वि च॑रतः सु॒मेके॑ ।**
**अ॒न॒प॒वृ॒ज्याँ अध्व॑नो मि॒मा॑ने॒ विश्वा॒न्केताँ॒ अधि॑ म॒हो द॒धा॑ने ॥३॥**

स॒मा॒नम् । व॒त्सम् । अ॒भि । सं॒चर॑न्ती॒ इति॑ स॒म्ऽचर॑न्ती । विष्व॑क् । धे॒नू इति॑ । वि । च॒र॒तः । सु॒मेके॒ इति॑ सु॒ऽमेके॑ ।
अ॒न॒प॒ऽवृ॒ज्यान् । अध्व॑नः । मि॒मा॑ने॒ इति॑ । विश्वा॑न् । केता॑न् । अधि॑ । म॒हः । द॒धा॑ने॒ इति॑ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. महान् उक्षा (=वृषभः=वृषभसदृशो बलवान् उद्गन्तश्च) [अयमग्निः] एने (=एते) [द्यावापृथिव्यौ] अभि ववक्षे (=अभिलक्ष्य ववृधे=पृथिवीसकाशात् द्युलोकपर्यन्तं वर्धते) [अपि च] अजरः (=जरारहितः) इतऊतिः (=? इतोगमनवान्=पृथिवीसकाशात् ऊर्ध्वं द्युलोकमच्छ गमनवान्) ऋष्वः (=महान्=उच्चैस्तमः) तस्थौ (=तिष्ठति) । [स] उर्व्याः सानौ (=पृथिव्याः सानुनि=समुच्छ्रिते प्रदेशे=वेद्यां) पदो नि दधाति (=पदानि स्थापयति=करोति=वेद्यां तिष्ठति) अस्य (=तस्य) अरुषासः (= अरुषाः=आरोचमानाः=ज्वालाः=ज्वालारूपा जिह्वा) ऊधः मेघरूपमूधः= (=अन्तरिक्षं) रिहन्ति (=लिहन्ति=अन्तरिक्षं प्राप्नुवन्ति) ॥

अभि ववक्षे इत्यत्र द्यावापृथिव्यावभि अभिक्रम्य व्याप्य ववक्षे ...... । व्याप्नोतीत्यर्थः । इति सायणः ॥

३. समानं वत्सं (=परस्परसाधारणम् अग्निरूपं बालम्) अभि संचरन्ती (=अभि संचरन्त्यौ=आभिमुख्येनागच्छन्त्यौ) सुमेके (=शोभमाने) धेनू (=धेन्वौ= द्यावापृथिवीरूपे) विष्वग् वि चरतः (=विविधं गच्छतः न तु संचरतः) [अपि च] [तस्य वत्सस्यार्थम्] अध्वनः (=मार्गान्) अनपवृज्यान् (=अपवर्जनीयरहितान्=

२. हा जो महा वृषभ, तो वाढून वाढून या द्यावापृथिवींला व्यापून टाकितो, [ आणि ] तो अजर अग्नि या भूमीवरून उंचपर्यंत उभा राहतो. तो पृथिवीच्या शिखरावर पाय ठेवितो. त्याच्या ज्वाळा अंतरिक्षरूप काशेला चाटितात.

३. आपल्या साधारण बाळकाप्रत धांवून येणाऱ्या अशा ज्या दोन सुंदर गाई, त्या वेगळ्या दिशेनें चालतात. त्या त्याजकरितां मार्ग निष्कंटक करितात, आणि त्याची सर्व प्रकारें मोठी काळजी करितात.

2. The great bull has grown up to these (earth and heaven). Growing from here, ever youthful Agni stands high. He puts his foot on the summit of the earth (the altar). His red flames lick the firmament.

3. The two beautiful cows which walk towards their common calf go in different directions, rendering the paths safe [for him] and entertaining all great regards for him.

---

२. 'हा जो महा वृषभासारिखा प्रबळ अग्नि, तो पृथिवीपासून द्युलोकापर्यंत वाढतो, तो सदैव तरुण असून पृथिवीपासून द्युलोकापर्यंत उंच असा उभा राहतो. त्याचे पाय वेदीवर असतात, आणि त्याचा माथा अंतरिक्षाला जाऊन लागतो, इतका हा मोठा आहे.'

'वाढून या [द्यावापृथिवीं]ला व्यापून टाकितो '=' एने अभि ववक्षे.' अक्षरशः 'यांजकडेस वाढला आहे.' म्हणजे, वाढतां वाढतां या दोघांलाहि भरून टाकिलें आहे.

'या भूमीपासून उंचपर्यंत उभा राहतो '=' इतऊतिः ऊर्ध्वस्तस्थौ.' अक्षरशः 'इकडून जाऊन उंच उभा राहिला आहे '='इकडून' म्हणजे आम्ही आहों इकडून, अर्थात् पृथिवीवरून. 'इतऊतिः' हा शब्द दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं आला आहे, तेथें सायणाचार्य 'येथून जाणारा' असाच बहुतकरून अर्थ करितात. अग्नि पृथिवीपासून तो द्युलोकापर्यंत व्यापून राहिला आहे. जसा कोणी एकादा भव्य पुरुष, पृथिवीवर उभा राहून त्याचें शिर द्युलोकाला जाऊन लागावें, तसें याचें लागतें, असा कवीचा अभिप्राय आहे.

'पृथिवीच्या शिखरावर '=' उर्व्याः सानौ.' म्हणजे 'वेदीवर.' या शेवटी-

**धीरा॑सः प॒दं क॒वयो॑ नयन्ति॒ नाना॑ हृ॒दा रक्ष॑माणा अजु॒र्यम्।**
**सिषा॑सन्तः॒ पर्य॑पश्यन्त॒ सिन्धु॑मा॒विरे॑भ्यो अभव॒त्सूर्यो॒ नॄन्॥ ४॥**

धीरा॑सः। प॒दम्। क॒वयः॑। न॒यन्ति॒। नाना॑। हृ॒दा। रक्ष॑माणाः। अ॒जु॒र्यम्।
सिसा॑सन्तः। परि॑। अ॒प॒श्य॒न्त॒। सिन्धु॑म्। आ॒विः। ए॒भ्यः॒। अ॒भ॒व॒त्। सूर्यः॑। नॄन्॥ ४॥

निष्कण्टकान्) मिमाने (=निर्मिमाणे=कुर्वत्यौ) [तथैव] विश्वान् (=सर्वान्) महः (=महतः) केतान् (=संकेतान्=संकल्पान्=प्रवर्धनविषयान्) अधि दधाने (=धारयन्त्यौ) [वर्तेते]॥

सायणस्त्वेवं व्याचष्टे। समानमेकमेव वत्सं वत्सस्थानीयं पुत्रवद्धर्षहेतुमग्निमभिमुखं संचरन्ती संचरन्त्यौ द्वे धेनू अग्निहितकरणेन प्रीणयित्र्यौ पत्नीयजमानलक्षणे धेनू विष्वग्विचरतः। संचरतः। स्तनपानादिसदृशेन्धनप्रक्षेपसंमार्जनादिना सम्यक् वर्धयत इत्यर्थः। कीदृश्यौ ते। सुमेके। शोभनकर्माणौ शोभनमेहने वा। परिचरणकुशले इत्यर्थः। किं च अनपवृज्यान् अपवर्जनीयरहितान्।...... अध्वनो मार्गान् अग्नेः प्रान्तप्रदेशान् केशाद्यमेध्यरहितान्मिमाने संपादयित्र्यौ। किं च विश्वान्केतान् सर्वाणि प्रज्ञानानि प्रवर्धनविषयाणि महो महान्त्यधि अधिकं दधाने धारयन्त्यौ। ईदृश्यावध्वर्युयजमानरूपे जायापतिरूपे वा धेनू विष्वग्विचरतः। इति॥

## भाषायाम्.

४. धीरासः (=धीराः=धीमन्तः) कवयः (=प्रज्ञानवन्त ऋषयः) अजुर्यम् (=अजरम्) [अग्निं] नाना हृदा (=बहुप्रकारया बुद्ध्या) रक्षमाणाः (=रक्षन्तः) पदं नयन्ति (=वेदिस्थानं प्रति नयन्ति=तत्र नीत्वा स्थापयित्वा च यजन्ति) [अपि च] [सिन्धुं सूर्यं च] सिषासन्तः (=संभक्तुमिच्छन्तः) सिन्धुं (=मेघोदकं) परि अपश्यन्त (=परितो दृष्टवन्तः) [अपि च] एभ्यो नॄन् (=एतेभ्यो नृभ्यः) सूर्यः आविरभवत् (=प्रत्यक्षोऽभूत्)॥

पदं स्थानं वेदिलक्षणं नयन्ति। प्रापयन्ति। मथनदेशाद्गार्हपत्याद्वा। इति सायणः॥

ल चरणांत असा ध्वनि आहे कीं, अग्नि हा जरी लहानशा बाळाप्रमाणें आमच्या वेदीवर उभा राहतो, तरी त्याच्य ज्वाळा अंतरिक्षांतील जी मेघरूप कास

४. विद्वान् [ आणि ] ज्ञानी लोक अजर [ अग्नी]चा नाना प्रकारच्या काळजीनें सांभाळ करून त्याला [ वेदिरूप ] स्थानाप्रत नेतात. [ मेघोदकाची ] इच्छा करणाऱ्या त्या जनांला मेघोदक प्राप्त झालें, [ आणि ] त्या जनांला सूर्य दृष्टीस पडला.

4. The wise poets, preserving, by means of various cares, Agni who never grows old, lead him to the seat. Desiring to obtain [the rain-water] they saw the rain-water; the sun manifested itself to these men.

---

तिला चाटतात, म्हणजे तींतील दूध पितात—तो आपल्या ज्वालारूप जिभांनीं अंतरिक्षीं असलेल्या मेघांतील उदकरूप दूध जणुं चाखितो. अंतरिक्षापर्यंत तो पोंहचतो इतकाच अभिप्राय आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'उर्व्याः'-याबद्दल 'उर्विआः' असें आणि चवथ्यांत 'रिहन्ति ऊधः' असें म्हणावें.

३. यांत अग्नीचा सांभाळ त्याचीं आईबापें ज्या द्यावापृथिवी, त्या कसा करितात तें सांगितलें आहे. 'द्यावापृथिवीरूप ज्या दोन गाई, त्या दोन्ही या अग्निरूप दोघींच्या एक बाळाप्रत धांवत येतात, तरी त्या नित्य एकत्र राहत नाहींत; एक आली तर दुसरी चालती होते. पण चालत्या झाल्या तरी त्या दोघीहि अग्निरूप बाळासाठीं मार्ग निष्कंटक करून ठेवितात, आणि त्याचा सांभाळ करण्याचे जे अनेक प्रकार, त्यांचा विचारणा आणि योजना नित्यशः करीत असतात.'

सायणाचार्य गाई म्हणजे येथें यजमान आणि त्याची स्त्री ह्या होत असें म्हणतात. भाष्य पहा.

'मार्ग निष्कंटक करितात'='अध्वनः अनपवृज्यान् मिमाने.' म्हणजे अग्नि द्यावापृथिवीच्या मधून व्यापूं लागला म्हणजे त्यास अडथळा येऊं नये असें करितात, असा भावार्थ दिसतो. पण त्या करण्याचा प्रकार स्पष्ट समजत नाहीं. तथापि पुढच्या ऋचेवरून पाहतां, येथें अग्नि म्हणजे सूर्य जो तद्रूपच आहे, त्यापेक्षां सूर्यानें आकाशांतून सरळ आणि निष्कंटक मार्गानें चालावें म्हणून द्यावापृथिवी मार्ग मोकळा आणि सुरक्षित करून ठेवितात असा भावार्थ दिसतो.

---

४. 'कधींहि म्हातारा न होणारा जो अग्नि बाळ, त्याला नानातऱ्हांनीं सांभाळून पुराण उपासक जनांनीं वेदीवर नेऊन बसविलें, आणि तेथें त्याची उपासना केली. त्यांनीं मेघोदकाची आणि सूर्याची वांछा केल्यावरून अग्नीच्या प-

**दि॒दृ॒क्षेण्यः॒ परि॒ काष्ठा॑सु॒ जेन्य॒ ई॒ळेन्यो॑ म॒हो अर्भा॑य जी॒वसे॑ ।**
**पु॒रु॒त्रा यदभ॑व॒त्सूरहै॑भ्यो॒ गर्भे॑भ्यो म॒घवा॑ वि॒श्वद॑र्शतः ॥५॥ १९ ॥**

दि॒दृ॒क्षेण्यः॑ । परि॑ । काष्ठा॑सु । जेन्यः॑ । ई॒ळेन्यः॑ । म॒हः । अर्भा॑य ।
जी॒वसे॑ ।
पु॒रु॒ऽत्रा । यत् । अभ॑वत् । सूः । अह॑ । ए॒भ्यः॒ । गर्भे॑भ्यः । म॒घऽवा॑ ।
वि॒श्वऽद॑र्शतः ॥ ५ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

५. [ अयमग्निः ] परि काष्ठासु दिदृक्षेण्यः (=विविधासु दिक्षु= देशेषु "द्रष्टुमेष्टव्यो दर्शनेच्छाविषयभूतः"=यो दृष्टो भवितुं योग्यस्तादृशो ) जेन्यः ( =प्रशस्तः ) [ अपि च ] महो अर्भाय जीवसे ईळेन्यः (=महतः स्वल्पस्य च जीवनार्थं=महान्तो देवादयो राजादयश्च स्वल्पा निष्काञ्चनयजमानादयश्च यथा जीवेयुस्तथा स्तवनीयः= जीवनार्थं महान्तः स्वल्पाश्च यं स्तुवन्ति तादृशो ) [ भवति ] । यत् ह (=यस्मात् कारणात् खलु ) मघवा (=धनवान् ) विश्वदर्शतः (=विश्वेषां दर्शनयोग्यः ) [ स ] पुरुत्रा (=बहुषु देशेषु ) एभ्यो गर्भेभ्यः (=एतेभ्यः=पूर्वमन्त्रोक्तेभ्य उपासकरूपेभ्यो बालकेभ्यः ) सूः अभवत् (=प्रसविताऽभवत्=उत्पादयितेव वत्सलोऽभवत् ) ॥

काष्ठासु परस्परं व्यावर्तमानासु दशसु दिक्षु । ...... जेन्यः प्रादुर्भवनशीलो भवति जयशीलो वा ...... । महो महतो देवादेरर्भायाभकस्याल्पस्य यजमानादेर्वा जीवसे जीवनाय । हविर्वहनेन धनप्रदानेनेति विवेकः । ...... एभ्यो गर्भेभ्यः... एषामृत्विजां गर्भवच्छिशुवदत्यन्तरक्षणीयानां सूरभवत् ...... तस्मान्नाना हृदा रक्षमाणाः कवयः पदं नयन्तीति पूर्वत्र संबन्धः । इति सायणः ॥

सादेंकरून त्यांस मेघोदकाची आणि सूर्याची प्राप्ति झाली ' असा भावार्थ.

पूर्वी जगाला मेघवृष्टि होऊन पाणी मिळत नव्हतें आणि सूर्याचें दर्शन होत नव्हतें, तेव्हां प्रज्ञानी आणि भाविक उपासकांनीं अग्नीची उपासना केल्यावरून त्यांला त्यांचा लाभ झाला, व अजूनहि तोच क्रम चालला आहे, असा अभिप्राय. 'मेघोदक '=' सिन्धुम्.' सू. ३५ मं. ८ आणि त्याजवरील ' अंतरिक्ष ' शब्दावरची टीप पहा.

' त्या जनांला '=' एभ्यो नॄन्. ' नॄन् ही चतुर्थीबद्दल द्वितीया वृत्तानुरोधेंकरून अक्षरांची संख्या अधिक होऊं नये म्हणून घातली आहे, असें दिसतें. दुसरा निर्वाह दिसत नाहीं.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'सूर्यो'च्या ठिकाणीं 'सूरिओ' असें वाचलें पाहिजे.

५. [ अग्नि हा ] सर्व देशांमध्यें दर्शनयोग्य, प्रशस्त, [आणि] लहान मोठ्यांनीं जगावें म्हणून स्तुतिपात्र होय. कारण कीं धनसंपन्न [ आणि ] सर्वांनीं दर्शनीय [ असा हा अग्नि ] अनेक स्थळीं या [ उपासकरूप ] बाळकांला पिता[च जणुं ] झालेला आहे.

5. [ He is ] in all regions one that is worth being sought to see, excellent, [ and ] deserving to be praised that the great as well as the small may live ; because rich [ Agni ], who is beautiful every where, has in many countries become the father of these children ( the worshippers ).

५. ' अग्नि अनेक देशांत दर्शनेच्छाविषय, म्हणजे ज्यास लोक पाहूं इच्छितात असा, आणि उत्तम स्वभावाचा आहे, आणि लहान मोठे सर्व लोक आपण जगावें म्हणून ज्याचें स्तोत्र करीत असतात असा आहे; कारण कीं यजमानरूप जे बाळ, त्यांचा हा अग्नि आपल्या धनानें आणि शोभेनें वगैरे अनेक देशांमध्यें केवळ बापच जणुं होऊन गेला आहे,' असा अभिप्राय आहे.

' लहानमोठ्यांनीं जगावें म्हणून स्तुतिपात्र '=' महो अर्भाय जीवसे ' ' महो अर्भस्य जीवसे ' असें वास्तविक पाहिजे, पण 'जीवसे' ही जी चतुर्थी आहे, तिच्या साहचर्याकर्षणामुळें ' अर्भाय ' अशी चतुर्थी झाली. असाच निर्वाह सायणांनीं केला आहे, तो आम्हांस योग्य दिसतो.

वृत्तासाठीं ' ईळेनिओ' असें दुसऱ्या पादांत आणि 'गर्भेभिओ' असें चवथ्या पादांत म्हणावें लागतें.

## सूक्तम् १४७.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**कथा ते अग्ने शुचयन्त आयोर्ददाशुर्वाजेभिराशुषाणाः ।**
**उभे यत्तोके तनये दधाना ऋतस्य सामन्रणयन्त देवाः ॥ १ ॥**

कथा । ते । अग्ने । शुचयन्तः । आयोः । ददाशुः । वाजेभिः आ-
शुषाणाः ।
उभे इति । यत् । तोके इति । तनये । दधानाः । ऋतस्य । सामन् ।
रणयन्त । देवाः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अग्ने, आयोः (=गमनवतस्) ते (=तव) आशुषाणाः (=त्वामश्नुवानाः=संभजमानाः=तव भक्तास्) [ त्वां ] शुचयन्तः (=दीपयन्तो ) वाजेभिः (=वाजैः=हविरन्नैः ) कथा ददाशुः ( =कथं सेवितवन्तः ) ? यत् (=यस्मात् कारणात् ) देवाः (=दीप्तिमन्तो यजमाना) उभे तोके तनये दधानाः (=पुत्रसमूहं पौत्रसमूहमिति द्वयमपि धारयन्तः=तैः सहिताः सन्तः ) ऋतस्य सामन् ( =यज्ञस्य सामनि=स्तोत्रे ) रणयन्त (=आत्मानं रमयन्ति=प्रीणयन्ति=प्रीत्या यज्ञे सामानि उच्चार्य इन्द्रादीन् प्रीणयन्ति)॥

ये यज्ञं कृत्वा हविश्चाग्नये प्राप्य सामानि गायन्ति ते पुत्रपौत्रादिभिर्युक्ता भवन्तीति श्रुतमस्माभिः । कः पुनर्यज्ञप्रकारस्तन्न जानीमः । अतो हेतोः हे अग्ने, ते तव भक्ताः कथं त्वां संभजन्ते तद्वदेति भावः ॥

## सूक्त १४७.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे अग्नी, नित्यसंचारी [जो तूं, त्या ] तुझे भक्त [ तुला ] प्रदीप्त करून हविरन्नांनीं [ तुला ] कसे भजतात? कारण कीं भाग्यशाली भक्तजन मुलें आणि नातें या दोघांलाहि घेऊन यज्ञाचें जें स्तोत्र, त्याच्या ठायीं रममाण झालेले आहेत.

## Hymn 147.

To *Agni.* By *Dîrghatamas* the son of *Uchathya.* Metre — *Trishtubh.*

1. How do the worshippers, O Agni,—of thee the traveller, kindle thee and worship thee with oblations? since fortunate sacrificers, taking both [ their ] children [ and their] grand-children, have delighted themselves with the hymn of sacrifice.

---

१. ' हे अग्नी, जे तुझे भक्त तुला हवि देऊन तुझें स्तोत्र यज्ञांत म्हणतात, ते पुत्रपौत्रादिक संततीनें संपन्न होतात असें आम्हीं ऐकिलें आहे, पण ते तुला हवि कसें अर्पण करितात आणि तुला कोणत्या रीतीनें प्रदीप्त करितात, तें आम्हीं चांगलें जाणत नाहीं; यास्तव तें तूंच आम्हांला सांग. ' एकशें पंचेचाळिसाव्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेंत जें सांगितलें आहे, कीं यज्ञ कसा करावा तें अग्नीला विचारा इत्यादि, त्याच अभिप्रायाची ही सांप्रतची ऋचा आहे.

' नित्य संचारी जो तूं, त्या तुझे '=' ते आयोः.' ' आयु ' शब्दाचा अर्थ (चालणारा, नित्य सर्वांच्या घरीं गमन करणारा अशा संबंधानें वगैरे) ' अग्नि ' असा होतो याविषयीं सू. १२२ मं. ८ आणि टीप पहा.

' भक्त '=' आशुषाणाः ' म्हणजे तुला ' भजणारे ' जे ते.

' कारण कीं '=' यत्.' हें कारण, प्रश्न विचारण्याचें आहे, जो प्रश्न विचारिला त्याचें अथवा ' भजतात ' याचें नव्हे. ' मुलें आणि नातें '=' तोके तनये. ' तनये ' हें येथें द्वितीयेचें द्विवचन घ्यावें. सायणांनीं मात्र तसें केलेलें नाहीं.

' रममाण झालेले आहेत '=' रणयन्त ' म्हणजे यापूर्वी रममाण झाले आहेत, असें आम्हीं ऐकिलें आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ' ददाअशुः ' असें म्हणावें.

बोधा मे अस्य वचसो यविष्ठ मंहिष्ठस्य प्रभृतस्य स्वधावः ।
पीयति त्वो अनु त्वो गृणाति वन्दारुस्ते तन्वं वन्दे अग्ने ॥ २ ॥
बोध । मे । अस्य । वचसः । यविष्ठ । मंहिष्ठस्य । प्रऽभृतस्य । स्वऽधाऽवः ।
पीयति । त्वः । अनु । त्वः । गृणाति । वन्दारुः । ते । तन्वम् । वन्दे । अग्ने ॥ २ ॥

ये पायवो मामतेयं ते अग्ने पश्यन्तो अन्धं दुरितादरक्षन् ।
ररक्ष तान्सुकृतो विश्ववेदा दिप्सन्त इद्रिपवो नाह देभुः ॥ ३ ॥
ये । पायवः । मामतेयम् । ते । अग्ने । पश्यन्तः । अन्धम् । दुःऽइतात् । अरक्षन् ।
ररक्ष । तान् । सुऽकृतः । विश्वऽवेदाः । दिप्सन्तः । इत् । रिपवः । न । अह । देभुः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. हे यविष्ठ (=अतिशयेन यौवनोपेत=नित्यतरुण ), हे स्वधावः (=स्वधावन्=बलवन् ) [ अग्ने ], अस्य मंहिष्ठस्य (=दातृतमस्य ) प्रभृतस्य (=प्रकर्षेण संपादितस्य ) मे (=मम ) वचसः ( =स्तोत्ररूपस्य वचनस्य ) बोध ( =बुध्यस्व=अवहितस्तज्जानीहि ) । त्वः (=एकस् ) [ त्वां ] पीयति (=हिनस्ति=तुभ्यं द्रुह्यति ) त्वः (=एकः ) अनु गृणाति ( =अनुकूलो भूत्वा त्वां स्तौति ) । [ तयोर्मध्ये ] [ अहं ] वन्दारुः (=स्तोत्रशीलः सन् ) हे अग्ने, ते तन्वं (=तव शरीरं=तव मूर्तिं=त्वां ) वन्दे (=स्तौमि ) ॥

३. हे अग्ने, ये ते (=तव ) पायवः ( ?रक्षका रश्मयः) अन्धं मामतेयं पश्यन्तः (=अन्धं ममतायाः पुत्रं मद्रूपं पश्यन्तो) दुरितात् अरक्षन् (=मां दुःखाद्रक्षितवन्तः ) सुकृतः ( =मद्रक्षणरूपं शोभनं कर्म कुर्वतस् ) तान् [ पायून् ] विश्ववेदाः (=सर्वज्ञस्त्वं ) ररक्ष ( =ररक्षिथ=रक्षितवानसि ) । दिप्सन्तः इत् रिपवः ( =अस्मान् दम्भितुं हिंसितुमिच्छन्तोपि शत्रवो ) नाह देभुः (=नैवास्मान् हिंसितुमशक्नुवन् ) ॥

अत्र सायणः । अत्रेतिहासमाचक्षते । उचथ्यबृहस्पतिनामानौ द्वावृषी आस्ताम् । तत्रोचथ्यस्य ममता नाम भार्या । सा च गर्भिणी । तां बृहस्पतिर्गृहीत्वारमयत् । शुक्रनिर्गमनावसरे प्राप्ते गर्भस्थं रेतः प्रावादीत् हे मुने रेतो मा त्याक्षीः पूर्वमहं वसामि

२. हे नित्य तरुण [अग्नी], हे प्रबळ [ अग्नी ], हें जें माझें अत्यंत उदार [ आणि ] उत्तम रीतीनें रचिलेलें स्तोत्र, त्याजकडेस तूं चित्त दे. कोणी [ तुझा ] द्वेष करितात, [ आणि ] कोणी [ तुझी ] स्तुति गातात. [ त्यांपैकीं ] हे अग्नी, मी स्तुतिगायक [ आहें, आणि ] तुझ्या विभूतीला वंदीत आहें.

2. O ever youthful [and] mighty [Agni], know thou of this my hymn [ which is ] most liberal [ and ] composed with care. Some hate [ thee ], some praise [ thee ]. A singer of thy praises I, O Agni, am praising thy self.

३. हे अग्नी, तुझ्या ज्या परिपालक [ किरणां]नीं आंधळ्या मामतेयाला पाहून दुःखापासून रक्षिलें, त्या पुण्यवंतांला सर्वज्ञ [ तूं ] रक्षिता झाला[स]. वाईट करावयास इच्छिणारेहि शत्रु वाईट करूं शकले नाहींत.

3. O Agni, those thy protecting [ rays ] which, perceiving the blind son of Mamatâ, preserved [ him ] from sorrow,— thy omniscient self preserved [those rays] that had done good. Even enemies who wished to do harm, could do no harm.

---

२. 'हे अग्नी, हें मी फार श्रम करून रचिलेलें, आणि तुला प्रसन्न करून तुजकडून धन संपादन करण्याविषयीं अत्यंत कुशळ असें स्तोत्र रचून तुला अर्पण करीत आहें, तर याजकडेस तूं कृपावलोकन कर. तुला कितीएक जन न भजतां तुझा द्वेष करितात, त्यांतला मी नव्हे; मी तुझें स्तोत्र गाणारा आहें.'

'अत्यंत उदार '=' मंहिष्ठस्य. ' म्हणजे तुजकडून धन संपादन करून देण्याविषयीं अत्यंत सामर्थ्यवान्.

' तुझ्या विभूतीला '=' ते तन्वम् ' म्हणजे तुला स्वताला, ' तुला ' इतकाच अभिप्राय आहे.

वृत्तानुरोधेंकरून तिसरे चरणांत 'पीयति तुओ ' असें म्हणून चवथ्यांत ' तन्वं ' बद्दल ' तनुअं ' असें म्हणावें.

३. 'हे अग्नी, तुझ्या ज्या किरणांनीं ' ममता ' इच्या आंधळ्या पुत्राला पाहून दुःखापासून रक्षिलें, ते किरण तूं सर्वज्ञ होत्साता रक्षितोस. त्यामुळें आमचा नाश करूं इच्छिणारे जे शत्रु, तेहि नाश करूं पावले नाहींत, ' असा या कांहींशा कठिण मंत्राचा अभिप्राय आहे.

**यो नो अग्ने अररिवाँ अघायुररातीवा मर्चयति द्वयेन ।**
**मन्त्रो गुरुः पुनरस्तु सो अस्मा अनु मृक्षीष्ट तन्वं दुरुक्तैः॥ ४ ॥**

यः । नः । अग्ने । अररिऽवान् । अघऽयुः । अरातिऽवा । मर्चयति । द्वयेन ।
मन्त्रः । गुरुः । पुनः । अस्तु । सः । अस्मै । अनु । मृक्षीष्ट । तन्वम् । दुःऽउक्तैः ॥ ४ ॥

---

रेतःसंकरं मा कार्षीरिति । एवमुक्तो बृहस्पतिर्बलात्प्रतिरुद्धरेतस्कः सन् शशाप । हे गर्भ त्वं यतो रेतोनिरोधमकरोः अतस्त्वं दीर्घं तमः प्राप्नुहि जात्यन्धो भवेति । एवं शप्तो ममतायां दीर्घतमा अजायत । स चोत्पन्नस्तमोऽन्यथयाग्निमस्तौषीत् । स च स्तुत्या प्रीत आन्ध्यं पर्यहरदिति । तदिदमत्रोच्यते । हे अग्ने ते तव संबन्धिनो ये पायवः प्रसिद्धाः पालयितारो रश्मयो मामतेयं ममतायाः पुत्रं दीर्घतमसमन्धं पश्यन्तोऽन्धोऽयम् अतोऽस्माभी रक्षणीय इत्यवगच्छन्तो दुरिताद्दुष्टं प्राप्ताद्दुःखादरक्षन् तान् सुकृतः सुखकर्तॄन् विश्ववेदा विश्वप्रज्ञो ररक्ष । रक्षति । अस्मत्पालनायेति भावः । तैरस्मानपि रक्षिष्यतीत्यर्थः । एवं रक्षितानस्मान् दिप्सन्तो दम्भितुमिच्छन्तो रिपवः कामादयो नाह देभुः । अहेति विनिग्रहार्थीयः । न खलु दम्भितुं शक्नुवन्ति । दम्भु दम्भे । ...... यद्वा सूक्तद्रष्टा दीर्घतमाः स्वयमेवात्मानं परोक्षतया ब्रवीति । इति ॥

---

## भाषायाम्.

४. हे अग्ने, अघायुः (=मारणादिरूपपापेच्छावान्) यः अररिवान् (=अस्मद्दानप्रतिबन्धकः) अरातीवा (=स्वयमदानवान्) [सन्] द्वयेन (=द्विविधाचरणेन=मनसा एकं वाचैकमिति यद् द्विविधं कर्म तेन) नः (=अस्मान्) मर्चयति (=भर्त्सयति=हिंसितुमिच्छति) [तस्य] स मन्त्रः (=जिघांसा मननम्) अस्मै (=तस्मा एव) पुनर्गुरुरस्तु (=प्रतिनिवृत्य गरिता भवतु=तस्य मन्त्रस्तस्यैव नाशको भवतु)। [स पुरुषो] दुरुक्तैः (=स्वकीयैर्दुर्वचनैस्) तन्वं (=स्वकीयं शरीरम्=आत्मानमेव) अनु मृक्षीष्ट (=हिनस्तु=घातयतु) ॥

अघायुर्मारणादिरूपपापेच्छावान् अररिरदाता । अस्मद्दानप्रतिबन्धक इत्यर्थः । ... अरातीवा स्वयमदानवान् । ... शत्रुत्वमाचरन् यः शत्रुर्द्वयेन मानसवाचिकभेदेन द्विविधेन । न ददामीति मानसो मन्त्रः । निन्दाद्यारोपेण दाननिवारणं वाचिको मन्त्रः । यद्वा मायाहेतुकेन विरुद्धरूपेण द्विविधेन मन्त्रेण । यो विरुद्धमाचरति तत्र

४. हे अग्नी, जो कोण नाश करूं इच्छिणारा मनुष्य आम्हांला हवि देऊं देत नाहीं, [ आणि ] आपणहि देत नाहीं, [ आणि ] कपटानें आमची हानि करितो, त्याची मसलत त्यालाच कठिण जाओ. तो आपल्या दुर्वचनांनीं आपलाच घात करून घेओ.

4. He, O Agni, who, desiring to harm, does not allow oblations to be given, [ and ] who does not give them himself, and [ thus ] through treachery seeks to injure us—may his scheme be evil to himself; may he injure himself with his evil words.

काठिन्य इतकेंच कीं ( १ ) 'पायु'-शब्दाचा अर्थ पालन अथवा पालनप्रकार इतकाच असतां पालक किरण असा घ्यावा लागतो, आणि ( २ ) किरणांला अग्नीनें रक्षिलें याचा अभिप्राय समजत नाहीं. हाच मंत्र पुनः ऋ. ४. ४ यांत १३वा आला आहे, तेथें तरी सायणांनीं असाच अर्थ केला आहे.

या दोन्ही मंत्रांच्या भाष्यांत सायणाचार्य एक कथा सांगतात, ती अशी कीं, उचथ्य आणि बृहस्पति या नांवाचे दोघे बंधु होते. "ममता" नांवाची उचथ्याची स्त्री होती ती गर्भिणी होती. बृहस्पतीनें तिच्याशीं संग केला. वीर्योत्सर्गाची वेळ आली तेव्हां तिच्या पोटांतील गर्भ म्हणाला, मी येथें आहें, तूं वीर्य टाकूं नको. तों बृहस्पतीनें अवरोध करून गर्भाला शाप दिला कीं, तूं आंधळा उपज. तो जो उपजला तो 'दीर्घतमा' या सूक्ताचा कर्ता आंधळा जन्मला. त्याणें अग्नीची स्तुति केल्यावरून अग्नीच्या किरणांनीं त्याला डोळे देऊन सुखी केलें, इत्यादि. भाषेखालीं पहा. ही कथा 'दीर्घतमा' हें जें ऋषीचें नांव, तें अन्वर्थक करण्याच्या बुद्धीनें मागाहून रचिली आहे, हें उघड आहे.

कदाचित् 'तान्' याजबद्दल जर 'तेः' असा पाठ असता, तर मग 'हे अग्नी, तुझे परिपालनप्रकार आंधळ्या मामतेयाला पाहून दुःखापासून रक्षिते झाले त्यांच्या योगानें [ सर्व ] पुण्यवंतास सर्वज्ञ तूं रक्षीत असतोस' असा चांगला अर्थ जुळला असता.

'सर्वज्ञ [ तूं ] रक्षिता झाला[स]'= 'विश्ववेदा ररक्ष.' पुरुषव्यत्यय सहनीय आहे, कारण दुसरीं उदाहरणें पुष्कळ आहेत.

४. 'हे अग्नी, जो कोणी आम्ही हवि वगैरे देऊन देवांची सेवा करितों त्याची निर्भर्त्सना करितो, आणि आपण स्वतः हवि न देतां आणि देवसेवा न करितां देवांचा द्वेष करितो, आमच्याशीं शत्रुत्व करितो, आणि आम्हांशीं कपट

करून आमची हानि करूं पाहतो; त्याची दुर्बुद्धि आणि निर्भर्त्सना आणि शाप हे सर्व त्यालाच बाधोत, त्यांपासून आमचें अकल्याण न होतां, उलटें त्याचेंच होओ.'

'आम्हांला हवि देऊं देत नाहीं आणि आपणहि देत नाहीं'='अररिवान् अरातीवा.' हा अर्थ सायणांप्रमाणें केला आहे. पण साधारणपणें या दोन्ही शब्दांचा अर्थ अक्षरशः तसा असला तरी 'शत्रु' इतकाच होतो. तथापि येथें सायणानुसरण आम्हांस योग्य दिसतें.

वर दुसऱ्या ऋचेंत सांगितलें आहे कीं, अग्नीचा द्वेष करणारे कितीएक लोक आहेत, आणि कितीएक त्याला भजणारे आहेत. आणि आतां या ऋचेंत त्याप्रमाणेंच सांगतो कीं, अग्नीला हवि न देणारे इतकेंच नव्हे, पण जो कोण हवि देतो त्याचा द्वेष करणारेहि असतात. यावरून असें अनुमान होतें कीं, वेदामध्यें जे देव सांगितले आहेत, त्यांची भक्ति वेदकाळीं सर्वच लोक करीत असत असें नाहीं, तर आतां जसे शिवाची भक्ति करणारे (शैव) आहेत ह्यांचा द्वेष करणारे वैष्णव आहेत, आणि वैष्णवांचा द्वेष करणारे शैव आहेत, त्याप्रमाणेंच वेदयुगांतहि प्रकार असे. वेदकाळीं आणि त्यापूर्वी आमच्या आर्य पूर्वजांमध्यें त्यांचेच भाऊबंद जे पारसीक (पारसी) आणि दुसरे लोक.—कीं जे मागाहून ग्रीस, इटली वगैरे देशांत जाऊन तिकडेच वसाहत करून राहिले—ते असत. पण ते सर्व अग्निपूजक असत. पारसी तर अजून अग्निपूजक आहेतच. तेव्हां या दोन मंत्रांत अग्नीचा आणि अग्नीच्या भक्तांचा द्वेष करणारे म्हणून सांगितलेले हे अनार्यांपैकीं लोक असावेत असें दिसतें. त्या लोकांचे वंशज जे भिल्ल, कोळी, महार, खोंड, संथाल इत्यादिक लोक आतां आहेत, त्या लोकांत तरी अग्नीची उपासना प्रसिद्ध नाहीं, आणि जी आतां कांहीं रूपानें असेल, ती आर्य लोकांच्या सहवासानें मागाहून प्रचारांत आली असावी, असें म्हणण्यास सबळ कारणें आहेत.

'कपटानें'='द्वयेन.' अक्षरशः 'दोन प्रकारांनीं,' '[प्रकार]द्वयानें' असा अर्थ; पण हे दोन प्रकार आपण हवि न देणें आणि दुसऱ्यालाहि देऊं न देणें हे नाहींत, तर बोलणें एक आणि करणें एक हा जो खोटसाळपणा, विश्वासघातकीपणा अथवा 'कपट' तो होय, असें जें येथें पाश्चात्त्य पंडित सुचवितात तें सबळ दिसतें. 'अद्वयन्तं' अशाविषयीं ऋ. ३. २९. ५ याजवरील सायणभाष्य पहा. ऋ. १. १८७. ३ यांत 'अद्वयाः सखा' याची व्याख्या करितांना सायणांनीं 'द्वयरहितः......मनः-

कर्मविसंवादरहितः' असा अर्थ केला आहे. ऋ. ३. २. १५ हा मंत्र आणि त्याजवरील 'अद्वयाविनम्' याजविषयीं भाष्यहि पहा.

भाषेखालीं सायणभाष्य दिलें आहे त्यांत त्यांनीं प्रस्तुत स्थळीं केलेला अर्थ दिला आहे.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'तन्वं'-च्या जागीं 'तनुअं' असें म्हणावें.

**उत वा यः सहस्य प्रविद्वान्मर्तो मर्तं मर्चयति द्वयेन ।**
**अतः पाहि स्तवमान स्तुवन्तमग्ने माकिर्नो दुरिताय धायीः॥५॥१६॥**

उत । वा । यः । सहस्य । प्रऽविद्वान् । मर्तः । मर्तम् । मर्चयति । द्वयेन ।
अतः । पाहि । स्तवमान । स्तुवन्तम् । अग्ने । माकिः । नः । दुःऽइताय । धायीः ॥ ५ ॥ १६ ॥

संकीर्तयति यच्च प्रियं ब्रूते तन्न करोति अन्यद्वदतीत्येवं मन्त्रस्वरूपद्वैविध्यम् । पूर्वं मानसवाचिकभेदेन इदानीं वाचिककायिकभेदेनेति विवेकः । ईदृशेन मन्त्रेण यः शत्रुर्मर्चयति । भर्त्सयति विधेयीकरोति वास्मान् । स मन्त्रैकदेशो मानसरूपोऽस्मै पुनर्गुरुरस्तु । षष्ठ्यर्थे चतुर्थी । प्रयोक्तुरेव पुनर्गरितास्तु । तथा दुरुक्तीर्वाक्यैर्निन्दारूपैर्वाचिकस्तन्वं स्वकीयां तनुमनुमृक्षीष्ट । ... । अनुक्रमेण लुम्पतु । यद्वा स द्विविधो मन्त्रोऽस्मै प्रयोक्तुरेव गुरुर्गरितास्तु । अन्यान्यप्यस्मत्यकाराय प्रयुक्तानि निष्ठुरभाषणानि सन्ति । तैर्दुरुक्तैः सोऽरातिः स्वतनुमेवावलुम्पतु । स्वात्मानमेवावृत्य दहत्वित्यर्थः । इति सायणाचार्याः ॥

## भाषायाम्.

५. उत वा (=अपि च) हे सहस्य (=बलपुत्र), यः प्रविद्वान् (=प्रकर्षेण ज्ञातवान्="मायामन्त्रेण प्रकर्षेण जानन्") मर्तः (=मरणधर्मा मनुष्यो) द्वयेन (=मनःकर्मविसंवादरूपेण कौटिल्येन) मर्तं मर्चयति (=अन्यं मर्त्यं भर्त्सयति हिनस्ति) अतः (=तस्मान्मनुष्यात्), हे स्तवमान अग्ने (=मया स्तूयमान अग्ने), स्तुवन्तं (=तव स्तोत्रं कुर्वन्तं) [ मां ] पाहि (=रक्ष) [ अपि च ] दुरिताय (=तादृशमनुष्यकृतदुःखाय) नः (=अस्मान्) माकिः धायीः (=मैव स्थापयः=मैवास्मांस्तस्य दुःखस्य वशं गमय)॥

पूर्वमन्त्रे द्विविधकुटिलमन्त्रेण कर्ता तन्मन्त्रणं प्राप्नोतु मास्मानित्युक्तम् । अत्र तु तन्मन्त्रेणास्मान्पाहीत्यग्निः प्रार्थ्यते । ...... मर्चयति । विधेयीकरोति भर्त्सयति वा । इति सायणः ॥

५. आणि हे बलपुत्रा [अग्नी], जो विद्वान् मर्त्य कपटाच्या योगानें दुसऱ्या मर्त्याचा नाश करूं इच्छितो, त्या [मर्त्या]पासून, हे स्तविला जाणाऱ्या अग्नी, [ मज ] स्तवणाऱ्याला तूं रक्ष. तूं आम्हांला [ त्या ] दुःखाच्या स्वाधीन करूं नको.

5. And whatsoever learned mortal, O son of might, seeks to injure [ another ] mortal through treachery, save from him, O Agni that art praised, the man that praises thee. Never abandon us to [ that ] misfortune.

५. 'हे अग्नी, जो कोणी विद्वान् मर्त्य जन, आपल्या पाखांड भाषणानें आमची आणि आमच्या सारिख्या दुसऱ्या मर्त्य जनाची निर्भर्त्सना करून, आमचा नाश करूं इच्छील, त्याजपासून तुझा स्तव करणाऱ्या मज दीनाचें तूं संरक्षण कर. आणि त्या तसल्या मनुष्याच्या करणीपासून जें दुःख व्हावयाचें त्या दुःखाच्या स्वाधीन आम्हांला करूं नकोस.' म्हणजे वितंड वाद करून आमची भक्ति अग्नीवरून उडवून टाकणाऱ्या पाखांड वाद्याशीं आम्हांला प्रसंग पाडूं नकोस असा भावार्थ आहे.

'नाश करूं इच्छितो '=' मर्चयति.' म्हणजे भक्ति उडवून आत्मिक नाश करितो, असा अभिप्राय दिसतो. वरील मन्त्रांत तरी ' मर्चयति ' याचा हाच अर्थ इष्ट दिसतो.

' स्तविला जाणाऱ्या '=' स्तवमान.' म्हणजे ज्यापेक्षां मी तुझी स्तुति करीत आहें, त्यापेक्षां, असा हेतु या विशेषणांत आहे.

हा या सूक्ताचा येथें उपसंहार आहे.

वृत्तासाठीं ' सहस ' बद्दल ' सहसिअ ' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १४८.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**मथीद्यदीं विष्टो मातरिश्वा होतारं विश्वाप्सुं विश्वदेव्यम् ।**
**नि यं दधुर्मनुष्यासु विक्षु स्वर्ण चित्रं वपुषे विभावम् ॥ १ ॥**

मथीत् । यत् । ईम् । विष्टः । मातरिश्वा । होतारम् । विश्वऽअप्सुम् । विश्वऽदेव्यम् ।
नि । यम् । दधुः । मनुष्यासु । विक्षु । स्वः । न । चित्रम् । वपुषे । विभाऽवम् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. विश्वाप्सुं (=विश्वरूपं) विश्वदेव्यं (=सर्वदेवस्थानीयं=विश्वेषां देवानां प्रतिनिधिभूतं) यद् ईं (=यम् एतं) होतारं (=देवानामाह्वातारम्) [अग्निं] विष्टः (=अरण्योः प्रविष्टो) मातरिश्वा (=एतन्नामकः कश्चिद्देवस्वरूपभाक् पुरुषो) मथीत् (=अरणिभ्यां मन्थनेनोदपादयत्) यं [च] [देवाश्] चित्रं (=प्रशस्तं=सुन्दरं) विभावं (=विशेषेण प्रभावत्) स्वर्न (=सूर्यमिव) वपुषे (=शोभायै) मनुष्यासु विक्षु (=मनोरपत्येषु जनेषु) नि दधुः (=नितराम् अस्थापयन्),

## सूक्त १४८.

**ऋषि–उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.**

१. ज्या [ या ] विश्वरूप, [ आणि ] सर्वदेवात्मक, होत्याला मातरिश्वा [ अरणींत ] शिरून मंथून काढिता झाला, [ आणि ] ज्याला देव शोभेसाठीं, सुंदर [आणि ] प्रभायुक्त सूर्याप्रमाणें, मनुष्य जनांमध्यें स्थापिते झाले;

## Hymn 148.

To *Agni*. By *Dîrghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Trishṭubh*.

1. [That Agni], [that] invoker, the representative of all beings, the representative of all gods, whom Mâtaris'van churned out after entering into [ the wood ], [ and ] whom [ the gods ] established among the human races for beauty's sake, like the beautiful [ and ] resplendent sun;

---

१. २. पहिल्या दोन्ही मंत्रांचा संबंध एकत्र आहे, म्हणून भावार्थ एकत्र सांगितला पाहिजे. तो असाः—' ज्या अग्नीला पूर्वीं मातरिश्व्यानें अरणींत शिरून मंथून काढिलें, आणि विश्वरूप व सर्वदेवात्मक होता असा करून ठेविलें, आणि ज्याला सर्व देवांनीं सुंदर आणि तेजःपुंज सूर्याप्रमाणें मानवी प्राण्यांमध्यें स्थापिलें ' ( १ ),

' त्याचें माहात्म्य इतकें आहे कीं, त्याची मी स्तोत्रादि उपासना करीन तर माझें कोणीहि वाईट करूं शकणार नाहीं, कारण अग्नि माझें कवचच जणुं होईल; आणि त्या अग्नीचें मी स्तोत्र करीत राहिलों तर दुसरे सकळ देव येऊन यजनादिक जीं माझीं कर्में, तीं सर्व ते मान्य करून घेतील आणि प्रसन्न होतील ' ( २ ).

'विश्वरूप '=विश्वाप्सुम्.' म्हणजे 'सर्व व्यापी,' सकळ भूतांच्या रूपानें दृष्टीस पडत असणारा.

' सर्वदेवात्मक '=विश्वदेव्यम्. ' म्हणजे, सकळ देवांचा प्रतिनिधि असा जो, जो आला असतां सकळ देव येतातच अथवा आल्या प्रमाणेंच होय, असा.

'मातरिश्वा.' सू.७१ मं.४ आणि टीप पहा.

'[ अरणींत ] शिरून '=' विष्टः. ' याचा अभिप्राय स्पष्ट समजत नाहीं. कितीएक पाश्चात्य विद्वान् हें विष् ' धातूचें रूप समजून ' धरिलेला ' [ मातरिश्वा ] असा अर्थ करितात, पण तोहि नीट जुळत नाहीं.

' शोभेसाठीं '=वपुषे.' म्हणजे या निस्तेज जगाला शोभा यावी म्हणून.

ददानमिन्न ददभन्त मन्माग्निर्वरूथं मम तस्य चाकन् ।
जुषन्त विश्वान्यस्य कर्मोपस्तुतिं भरमाणस्य कारोः ॥ २ ॥

ददानम् । इत् । न । ददभन्त । मन्म । अग्निः । वरूथम् । मम ।
तस्य । चाकन् ।
जुषन्त । विश्वानि । अस्य । कर्म । उपऽस्तुतिम् । भरमाणस्य ।
कारोः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ तस्मा अग्नये ] मन्म ददानं (=तस्मै स्तोत्रमर्पयन्तं) [ मां ] [ केऽपि ] न इत् ददभन्त (=नैव हिंसितुं प्रभवन्ति ) [ सः ] अग्निः तस्य मम (=तस्य स्तोत्रं कुर्वतो मम ) वरूथं चाकन् ( =आवरकं शर्म कामयेत=प्रीतो भूत्वा शर्म दातुं प्रभवति ) [ अपि च ] [ तस्याग्नेर् ] उपस्तुतिं भरमाणस्य (=स्तोत्रं कुर्वतः ) [ अस्य ] [ मद्रूपस्य ] कारोः ( =स्तोतुर् ) विश्वानि कर्म ( =विश्वानि कर्माणि=सर्वाणि यागादीनि कर्माणि ) [ देवा ] जुषन्त (=सेवेरन्=सेविष्यन्ते ) ॥

एतावानग्नेः प्रभाव इति भावः ॥

२. [त्या अग्नीला] स्तोत्र अर्पण करणाऱ्या [मज] उपासकाचें [कोणी] वाईट करूं शकणार नाहींत; [तो] अग्नि मला आनंदानें आश्रय देईल; [आणि] मी जो हा स्तोता स्तोत्र अर्पण करीत आहें, त्या माझीं सर्व कर्में [देव] सेवन करितील.

2. [To that Agni] if I offer prayers, none shall hurt me; [that] Agni shall love to give me support; [and] [the gods] will accept with pleasure all my works—[all works] of this poet who is offering praises.

'स्तोत्र अर्पण करीत आहें'—'भरमाणस.' म्हणजे अग्नीला अथवा अग्निद्वारें देवांला.

वृत्तासाठीं पहिल्या ऋचेंत 'विष्टो'-च्या ऐवजीं 'विषटो' 'विश्वाप्सुं'च्या जागीं 'विश्वअप्सुं,' 'मनुष्यासु'च्या ठिकाणीं 'मनुषिआसु' आणि 'स्वर्णं'च्या बद्दल 'सुअर्णं' असें म्हणावें.

दुसऱ्या ऋचेंत पहिल्या दोन चरणांच्या मध्यें संधि करूं नये, 'विश्वानि'च्या जागीं 'विशुआनि' म्हणावें आणि तिसऱ्या आणि चवथ्या चरणांमध्यें संधि करूं नये.

नित्ये चिन्नु यं सदने जगृभ्रे प्रशस्तिभिर्दधिरे यज्ञियासः ।
प्र सू नयन्त गृभयन्त इष्टावश्वासो न रथ्यो रारहाणाः ॥ ३ ॥
नित्ये । चित् । नु । यम् । सदने । जगृभ्रे । प्रशस्तिऽभिः । दधिरे । यज्ञियासः ।
प्र । सु । नयन्त । गृभयन्तः । इष्टौ । अश्वासः । न । रथ्यः । ररहाणाः ॥ ३ ॥
पुरूणि दस्मो नि रिणाति जम्भैराद्रोचते वन आ विभावा ।
आदस्य वातो अनु वाति शोचिरस्तुर्न शर्यामसनामनु द्यून् ॥ ४ ॥
पुरूणि । दस्मः । नि । रिणाति । जम्भैः । आत् । रोचते । वने । आ । विभाऽवा ।
आत् । अस्य । वातः । अनु । वाति । शोचिः । अस्तुः । न । शर्याम् । असनाम् । अनु । द्यून् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. यम् [ अग्निं ] यज्ञियासः (=यज्ञियाः=यज्ञपरायणा उपासका ) जगृभ्रे (=गृहीतवन्तः ) [ अपि च ] प्रशस्तिभिः (=स्तुतिभिर् ) नित्ये चित् सदने (=नित्यभूत एव स्थले गार्हपत्यलक्षणे ) नु (=क्षिप्रं ) दधिरे (=स्थापयामासुः ) । [ तं ] गृभयन्तः ( =गृह्णन्तः ), रथ्यः अश्वासः न ( =रथे युक्ता अश्वा इव ), रारहाणाः (=रंहसा वेगेन गच्छन्तः सन्तः ) इष्टौ (=यज्ञे निमित्तभूते सति ) प्र सु नयन्त ( प्रकर्षेणानयन् ) ॥

यं मन्थनेनोत्पन्नमग्निं नित्ये चिरसदने नित्य एव गार्हपत्यलक्षणेऽग्न्यासादनस्थाने नु क्षिप्रं जगृभ्रे । गृह्णन्ति । ...... नित्यं गतश्रियो ध्रियते नित्यं गार्हपत्यमिति सूत्राद्गार्हपत्यो नित्यः । तदाश्रयत्वात्सदनमपि नित्यमुच्यते । ...... दधिरे धारयन्त्याहवनीयार्थम् । ... इत्यादि सायणः ॥

४. दस्मः (=शत्रूणामुपक्षपयिता ) जम्भैः (=ज्वालारूपैर्दन्तैः ) पुरूणि (=बहूनि) [वृक्षादीनि वस्तूनि] नि रिणाति (=नितरां हिनस्ति दहति) । आत् (=अनन्तरं) विभावा (=विशेषेण भायुक्तः सन् ) वने आ (=वनमध्ये ) रोचते (=दीप्तो भवति ) । आत् ( =अनन्तरं ) वातः ( =वायुः अनु द्यून् ( =नित्यम् ) अस्य शोचिः

३. ज्या [ अग्नी ]ला यज्ञ करणारे उपासक शाश्वत स्थानीं घेऊन स्तुतींनिशीं स्थापिते झाले. [ उपासक ] त्याला घेऊन रथास जोडिलेल्या अतिशय वेगवंत घोड्यांप्रमाणें, यज्ञासाठीं घेऊन जाते झाले.

४. पराक्रमकारी [ अग्नि ] पुष्कळ [ वस्तूं ]ला [ आपल्या ] दाढांनीं खाऊन टाकितो, [ आणि ] नंतर अरण्यामध्यें अतिशय तेजस्वी [ होत्साता ] प्रकाशतो. नंतर वायु, धनुर्धारी योद्ध्याचा चपळ बाण [ घेऊन धांवल्या ]प्रमाणें, नित्य याची ज्वाळा घेऊन धांवत असतो.

3. Whom the holy worshippers took, [ and ] with hymns placed even on the everlasting seat. Taking him they, swift as horses yoked to a chariot, carried him forward for performing a sacrifice.

4. This accomplisher of wonderful deeds consumes many things with his jaws. Then he brilliantly shines in the forest. Then the wind blows after his flame on every occasion as though after a quick arrow of an archer.

---

३. 'मातरिश्व्यानें मन्थन करून अग्नि बाहेर काढितांच उपासकांनीं त्याला, शाश्वत असें जें अग्नि ठेवायाचें स्थान, त्याजवर यज्ञ करण्यासाठीं नेऊन लवकर ठेविलें,—इतकें लवकर ठेविलें कीं, ते एकाद्या रथास जोडिलेल्या घोड्यांप्रमाणें धांवले.'

'शाश्वत स्थळीं '='नित्ये सदने.' म्हणजे 'गार्हपत्य' अथवा नित्य घरांत ठेवावयाचा अग्नि जेथें ठेवितात, त्या स्थळीं तो अग्नि विजूं देत नसत. नित्य देवांस हवि अर्पण करण्याकरितां जो अग्नि पाहिजे लागे, त्याचें नांव ' आहवनीय;' तो या गार्हपत्यांतून घेऊन जात असत, आणि हा आहवनीय अग्नि नित्य विजाला तरी चिंता नाहीं, पण गार्हपत्य विजतां नये असें होतें म्हणून गार्हपत्याला नित्य असें येथें म्हटलें आहे. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् ' नित्य' म्हणजे ' आपलें स्वताहाचें,' निज, असा अर्थ करितात. पुत्रपौत्रादिकांस 'नित्य' शब्द वेदांत औरस अशा अर्थी लाविलेला आढळतो खरा; पण येथें त्यावरून 'आपला स्वताहाचा' असा अर्थ करण्याचें कारणहि दिसत नाहीं.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'रथिओ' असें वाचावें.

**न यं रिपवो न रिषण्यवो गर्भे सन्तं रेषणा रेषयन्ति।**
**अन्धा अपश्या न दभन्नभिख्या नित्यास ईं प्रेतारो अरक्षन् ५।१७**

न। यम्। रिपवः। न। रिषण्यवः। गर्भे। सन्तम्। रेषणाः। रेषयन्ति।
अन्धाः। अपश्याः। न। दभन्। अभिऽख्या। नित्यासः। ईम्। प्रेतारः। अरक्षन् ॥ ५ ॥ १७ ॥

(=अस्याग्नेर्ज्वाला) अनु वाति (=ता अनुलक्ष्य वाति=ता गृहीत्वा शीघ्रं वाति) अस्तुः (=क्षेप्तुर्वीरस्य=धनुर्धरस्य) असनां शर्यां न (=गच्छन्तीमिषुमिव=शीघ्रं बाणं गृहीत्वा यथा वाति तथा)॥

अत्र दावाग्निरूपेणायं स्तूयते। इति सायणः॥

## भाषायाम्.

५. यम् (=अपि न तं) गर्भे सन्तम् (=अरण्योर्मात्रोरुदरे वसन्तम्) [अग्निं] न रिपवो [रेषयन्ति] (=शत्रवो न हिंसन्ति) न रिषण्यवो रेषणा [वा] (=अन्ये हिंसका हिंसनस्वभावाः पुरुषा वा) रेषन्ति (=हिंसन्ति)। अन्धाः अपश्याः (=ज्ञानशक्तिरहिता अद्रष्टारश्च) अभिख्या (=अभिख्यया=अग्नेस्तेजसा=यद्यपि स सर्वदा मातुरुदर एव न वसति बहिरागत्यापि प्रकाशते तदपि) [तं] न दभन् (=न दभ्नुवन्ति=हिंसितुं न प्रभवन्ति)। [अपि तु] नित्यासः प्रेतारः (=नित्याः प्रेतारः=शाश्वताः प्रीणयितारः=अग्निं हविरादिना प्रसादयितारः शाश्वता उपासका) ईम् (=एनं=तमग्निम्) अरक्षन् (=रक्षन्ति)॥

गर्भे गर्भवद्रक्षकेऽरणिमध्ये सन्तं वर्तमानं ...... न रेषयन्ति न दुःखयन्ति। ...... अन्धा ज्ञानशक्तिरहिता अविद्वांसः अत एवापश्या अद्रष्टारः। यद्वा विद्वांसोऽप्यभावयितारः। अनुपासका इत्यर्थः। ...... नित्या अविचलितभक्तयः। अग्निहोत्रादिनित्यकर्मरता वा ...... प्रेतारः यज्ञादिना तमेव तर्पयितारः ......। इति सायणः॥

४. यांत दावानल जो अग्नि, म्हणजे वणवा, त्याची स्तुति केली आहे. ' अग्नि आपल्या ज्वालारूप दांतांनीं अरण्यांत मोठमोठीं झाडें खाऊन खाक करितो, आणि मग मोठा प्रकाशवान् होऊन जळतो. नंतर एकाग्र धनुर्धारी योद्ध्यानें आपल्या धनुष्यापासून सोडलेला चपळ बाण घेऊन गेल्याप्रमाणें अग्नीचा मित्र जो वायु, तो त्याची ज्वाला घेऊन जोरानें वाहूं लागतो.'

५. [ मातेच्या ] उदरांत राहणाऱ्या ज्या [ अग्नी ]ला शत्रु [ उपद्रव करूं शकत ] नाहींत, उपद्रव करूं इच्छिणारे [ अथवा ] उपद्रव करणारे उपद्रव करूं शकत नाहींत. आंधळे [ आणि ] न पहाणारे जन त्याचें तेज प्रकाशत असलें तरी त्याला दुःख देऊं शकत नाहींत, [ तर ] त्याजवर प्रीति करणारे [ जे ] शाश्वत [ भक्तजन, ते ] त्याला रक्षितात.

5. And to him who dwells in the womb [ of his mothers ] neither the enemies, nor those desirous of injuring [ nor ] those who injure, cause any injury. In spite of his shining out, the blind [ and ] those who will not see, dare not hurt him ; [ but ] his constant devotees who love him, preserve him.

' नित्य '=' अनु द्यून्.' म्हणजे प्रत्येक प्रसंगीं. जेव्हां जेव्हां वणवा पेटतो तेव्हां असा अर्थ आहे.

या ऋचेंत एक साधारण स्वभावोक्ति आहे. पण तिच्या आंतीं प्रसाद आणि अर्थगौरव हीं विलक्षण आहेत.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' आत् ' बद्दल ' आअत् ' असें वाचावें लागतें.

५. ' अग्नीला कोणतेहि शत्रु दुःख देऊं शकत नाहींत, आणि उपद्रव करूं इच्छिणारे अथवा उपद्रव करण्याचा ज्यांचा स्वभाव आहे, ते त्याला कांहींच दुःख देऊं शकत नाहींत; कारण तो आपल्या आईच्या पोटांत ( अरणींत, अथवा अंतरिक्षांत ) सुखरूप असतो त्यामुळें तेथें कोणाचा हात पोंहचत नाहीं. आणि तो जेव्हां बाहेर पडून प्रज्वलित रूपानें प्रकाशतो, तेव्हांहि त्याला ज्ञानांध आणि दुराग्रही लोक उपद्रव करूं शकत नाहींत; कारण त्याचे जे भक्त असतात, ते त्याला हवि इत्यादि देऊन त्याजवर सतत प्रीति करितात आणि त्याचें संरक्षण वेदीवर करितात. '

' [ मातेच्या ] उदरांत '=' गर्भे.' म्हणजे अरणि म्हणून जीं लांकडें असत, त्यांत अथवा अंतरिक्ष जें त्याच्या आंत. या ठिकाणीं वसत असलेल्या अग्नीला कोणी उपद्रव करूं शकत नाहींत हें उघड आहे, आणि ही केवळ स्वभावोक्ति आहे.

' आंधळे आणि न पहाणारे जन '=' अन्धा अपश्यः.' म्हणजे जे अग्नीचें माहात्म्य न जाणणारे, आणि प्रत्यक्ष दिसत असतांहि त्याजकडेस डोळेझांक करणारे जे अनुपासक जन, ते. ते लोक जरी मातेच्या उदरांत रहाणाऱ्या अग्नीला दुखवूं शकत नाहींत, तरी पेटलेल्या अग्नीस विजवून वगैरे उपद्रव करूं शकतील; पण ऋषि म्हणतो, अग्नीचे उपासक जिकडे तिकडे आणि सतत राहणारे

## सूक्तम् १४९.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । विराट् छन्दः । दशकास्त्रयो विराळेकादशका वेत्युक्तलक्षणसद्भावाद् यत्र दशाक्षरा एकादशाक्षरा वा त्रयः पादाः सन्ति तद्विराट् छन्दः ॥

**मह: स राय एषते पतिर्दन्निन इनस्य वसुनः पद आ ।**
**उप ध्रजन्तमद्रयो विधन्नित् ॥ १ ॥**

महः । सः । रायः । आ । ईषते । पतिः । दन् । इनः । इनस्य । वसुनः । पदे । आ ।
उप । ध्रजन्तम् । अद्रयः । विधन् । इत् ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. दन् ( =?दाता दानशीलो ) महो रायः पतिः ( =महतो धनस्य पतिः स्वामी ) इनस्य इनः (=स्वामिनः स्वामी ) सः [ अग्निः ] वसुनः पदे आ (=धनस्य पदे स्थाने=वेदिरूपे ) आ ईषते ( =प्राप्नोति ) । ध्रजन्तम् ( =उपगच्छन्तम् ) [ एतम् ] अद्रयः (=ग्रावाणः ) उप विधन् इत् (=अवश्यं परिचरन्तु ) ॥

दन् इति पदं संशयग्रस्तार्थकम् । रोथग्रास्मानादयः पाश्चात्यपण्डितास्तु पतिर्दन् इति पदद्वयमेकान्वयमिति वदन्ति । प्रमाणार्थं च उतो नो अस्य पूर्व्यः पतिर्दन्वीतं यातं पयस उस्रियायाः (ऋ.१. १५३. ४), स इद्दासं तुवीरवं पतिर्दन्षळक्षं त्रिशीर्षाणं दमन्यत् ( १०. ९९. ६ ) उभा रजी न केशिना पतिर्दन् ( १०. १०५. २) इति मन्त्रानुदाहरन्ति पतिर्दन् पतिर्दम् दम्पतिः दंपतिरिति च विवृण्वन्ति । स्यात्तथा ॥

सायणस्तु । महो महतः पूज्यस्य रायो गवादिरूपस्य धनस्य पतिः पालकः स्वामी सोऽग्निर्दन् ददत् अभिमतं प्रयच्छन् । ददातेः शतरि छान्दसः शपो लुक् तस्य छन्दस्युभयथेत्यार्धधातुकत्वादातो लोप इति चेत्याकारलोपः । आ आभिमुख्येनास्मद्देवयजनं प्रतीषते । गच्छति । किं च इनस्य स्वामिनोऽप्येनः स्वामी सर्वस्य पतिरित्यर्थः । ईदृशोऽयं वसुनो धनस्य पद आस्पदभूते वेदिस्थान आ । आश्रयति । [illegible]वशाद्योग्यक्रियाध्याहारः । यद्वा वसुनो निवासयोग्यस्य धनस्यापीन इति संबन्धः । यद्वा वसुप्राप्तिः प्रसिद्धा । किं च उपध्रजन्तमुपगच्छन्तमेनमभिषवार्थमद्रयो ग्राववन्तो यजमाना विधन्नित् । परिचरन्त्येव । विध विधाने । तौदादिकः । लङि बहुलं छन्दसीत्यडभावः । निघाताभावश्छान्दसः । यद्वा पूर्वत्र तच्छब्दश्रुतेरत्र यच्छब्दाध्याहारेणास्य संबन्धादनिघातः । यद्वा अद्रयोऽभिषवग्रावाणः स्वशब्देरुप उपेत्य विधन्नित् । पूजयन्त्येव । आह्लादं जनयन्तीत्यर्थः । इति ॥

## सूक्त १४९.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—विराट्.

१. तो महा संपत्तीचा उदार पति [ आणि ] प्रभूंचाहि प्रभु धनाच्या स्थानाप्रत येत आहे. आणि तो येत आहे इतक्यांतच ग्रावे त्याला भजोत.

## HYMN 149.

To *Agni*. By *Dirghatamas* the son of *Uchathya*. Metre–*Virât*.

1. He, the liberal lord of great wealth, the lord of lords, is coming to [ the altar ]—the seat of wealth. As he is approaching, let the [ Soma-pressing ] stones honour him.

---

आहेत, त्यामुळें ते त्याला हवि इत्यादिक देऊन नित्य पृथिवीवर जीवंत राखितात, जाऊं देत नाहींत, त्यामुळें अनुपासकांना हेतु सिद्धीस जात नाहीं.

'त्याचें तेज प्रकाशत असलें तरी '= 'अभिख्या.' अक्षरशः अर्थ 'तेजानें' (अभिख्यया) इतका आहे. अग्नीचें तेज ( अभिख्या ) त्यांचे हातीं सांपडण्याजोगें असलें तरी, असा भावार्थ.

वृत्तासाठीं 'रिषण्यवो'च्या जागीं 'रिषण्णिअवो ' असें वाचावें, आणि ' अभिख्या 'च्या स्थळीं ' अभिक्खिआ ' आणि 'नित्यासो 'च्या बद्दल ' नित्तिऑसो ' असें वाचावें.

---

१. ह्या सूक्ताचें वृत्त ' विराट् ' आहे. विराट् म्हणजे प्रत्येक दहा दहा अथवा अकरा अकरा अक्षरांचे तीन चरण ज्यांत असतात, असें वृत्त.

ऋषि म्हणतो, ' हा पहा अग्नि वेदीवर जाऊन बसत आहे. तर हा येत आहे इतक्यांत ग्रावे जोडिले जाओत, आणि त्याजकरितां सोमरस काढिला जाओ, आणि त्याला अर्पिला जाओ.'

'महा संपत्तीचा उदार पति '=' महो रायः पतिर्दन्.' ' दन्' ह्याच्या अर्थाविषयीं संशय आहे. ' उदार ' हा अर्थ आम्हीं सायणानुसारेंकरून दिला आहे. पण तो संभवतो असें आम्हांस खात्रीपूर्वक वाटत नाहीं. जेथें जेथें ' दन् ' शब्द आला आहे. तेथें तेथें त्याच्यापूर्वी 'पतिः' शब्द येतो; म्हणजे ' पतिर्दन् ' असेंच येतें; आणि त्या साहचर्यामुळें 'पतिर्दन्' हे शब्द ' दंपतिः ' (=गृहपतिः ) या अर्थी आहेत असें कितीएक पाश्चात्त्य विद्वान् ( रोथ, ग्रास्मान, इत्यादि ) म्हणतात. परंतु त्या गोष्टीला एतद्देशीय व्याख्याकारांचें प्रमाण नाहीं त्यामुळें आम्हाला तो अर्थ एकदम घेववत नाहीं. म्हणून आम्हीं सायणानुसारें भाषांतर केलें आहे.

' धनाच्या स्थानाप्रत '=' वसुनः पदे आ'. म्हणजे 'वेदीवर.' पाश्चात्त्य विद्वान् 'महो रायः' ही द्वितीया घेऊन 'आ ईषते'

**स यो वृषा नरां न रोदस्योः श्रवोभिरस्ति जीवपीतसर्गः ।**
**प्र यः सस्राणः शिश्रीत योनौ ॥ २ ॥**

सः । यः । वृषा । । नराम् । न । रोदस्योः । श्रवःऽभिः ।
अस्ति । जीवपीतऽसर्गः ।
प्र । यः । सस्राणः । शिश्रीत । योनौ ॥ २ ॥

**आ यः पुरं नार्मिणीमदीदेदत्यः कविर्नभन्योऽ नार्वा ।**
**सूरो न रुरुक्वाञ्छतात्मा ॥ ३ ॥**

आ । यः । पुरम् । नार्मिणीम् । अदीदेत् । अत्यः । कविः । नभन्यः ।
न । अर्वा ।
सूरः । न । रुरुक्वान् । शतऽआत्मा ॥ ३ ॥

## भाषायाम्.

२. यो वृषा (=वीर्यवान्) [अग्निः] नरां न रोदस्योः (=मनुष्याणां द्यावापृथिव्योश्च=मनुष्याणां द्यावापृथिवीस्थदेवानां च=नरैश्च द्यावापृथिवीनिवासिभिश्च) श्रवोभिः जीवपीतसर्गोऽस्ति (=अन्नैः सह जीवपीतसृष्टपेयो भवति) (=येन दत्तमन्नं मनुष्याणां मध्ये सर्वेपि मनुष्यास्तथा देवानां मध्येपि सर्वे देवा भक्षयन्ति येन विसृष्टं दत्तम् उदकादिपेयं मनुष्याणां मध्ये सर्वे पिबन्ति येनोढं हविश्च देवानां मध्ये देवाः सर्वेपि भक्षयन्ति) । यश् [चाग्निः] प्र सस्राणः (=प्रकर्षेण गच्छन्) योनौ (=स्वकीये स्थाने =वेदिलक्षणे) शिश्रीत (=कृताश्रयो भवति=निषीदति),

३. यः कविः (=प्रज्ञावान् अग्निः) अत्यः नभन्यः अर्वा न (=चपलो वायुवेगोश्व इव) [सन्] नार्मिणीं पुरं (=? नर्मणसंबन्धि नगरं=नर्मणनामकस्य कस्यचित्पुरम्) आ अदीदेत् (=आभिमुख्येनादीपयत्), [यश्च] सूरो न (=सूर्य इव) रुरुक्वान् (=दीप्तिमान्) शतात्मा (=शतसंवत्सरजीवी =अपरिमितसंवत्सरजीवी) [भवति],

(=प्राप्नोति) असा अर्थ करून 'पतिर्दन्' म्हणजे दंपतिः =गृहपतिः=यजमानः, असें विवरण करितात.

या ऋचेचे तीनहि चरण अकरा अकरा अक्षरांचे, म्हणजे त्रिष्टुभ वृत्ताचेच आहेत.

२. ज्या वीर्यवान् [अग्नी]नें दिलेलें अन्न आणि पेय मनुष्यें, आणि अंतरिक्ष व स्वर्गलोक यांतील देवहि भक्षीत असतात; जो [अग्नि] पुढें जाऊन जाऊन आपल्या आसनावर बसतो;

३. जो प्रज्ञावान् [अग्नि] चपल आणि वायूसारिख्या शीघ्रगामी घोड्याप्रमाणें नर्मणाच्या नगरावर प्रकाश पाडिता झाला, आणि जो दीप्तिमान् शतजीवी सूर्याप्रमाणें [आहे];

2. That hero, the food and drink given by whom is enjoyed by men as well as by the gods of the earth and heaven; who goes for ward and takes his seat on his throne;

3. Who, endowed with wisdom, shone, like a quick horse, swift as the wind, on the city Narmanā, [and] [is] like the effulgent sun that lives a hundredfold;

---

२–५. दोनपासून पांचपर्यंत चार ऋचांचा अन्वय एकत्र घेतला पाहिजे, यास्तव आम्हीं त्यांजवरील टीकाहि एकत्रच देतों.

'जो पराक्रमी अग्नि मनुष्यांनीं दिलेलें अन्न आणि सोमादि पेय देवांकडून भक्षवितो, आणि जो देवांनीं दिलेलें भक्ष्यपेय मनुष्यांला देतो, आणि त्यांजकडून भक्षवितो, आणि जो अरणींतून बाहेर पडतांच एकदम जाऊन वेदीवर बसतो (२),

'ज्याणें मोठ्या चपळ घोड्याप्रमाणें येऊन नार्मिणी नगरीवर एकदम प्रकाश पाडिला, आणि जो सूर्याप्रमाणें अति तेजस्वी आणि असंख्यरूपी (अथवा असंख्य वर्षेपर्यंत जीवंत राहणारा) होय (३),

'जो द्यावापृथिवींच्या मध्यें म्हणजे द्युलोक आणि पृथिवी यांच्या मध्यभागीं, जन्मतो आणि त्यामुळें द्विजन्म होय, आणि यजन करण्याविषयीं अत्यंत कुशळ आणि देवाला बोलावून आणण्याविषयीं कुशळ होय, आणि जो सर्व द्युलोकाला आणि अंतरिक्षादि अनेक अवकाशप्रदेशाला प्रकाशमान करून आपो देवीचें जें स्थान (= अंतरिक्ष), त्यांत वास करीत असतो (४);

'तोच हा आमच्या वेदीवर बसलेला (अग्नि) आहे. जो मर्त्य आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून याला हवि देत असतो आणि भजत असतो, त्याला तो सर्व प्रकारचीं उत्तम उत्तम धनें देत असतो (५).

दुसऱ्या ऋचेंतील पहिलें वाक्य कठिण आहे. सायणांनीं अर्थ निराळा केला आहे. तो आम्हीं भाषेखालीं उत-

अभि द्विजन्मा त्री रोचनानि विश्वा रजांसि शुशुचानो अस्थात् ।
होता यजिष्ठो अपां सधस्थे ॥ ४ ॥

अभि । द्विऽजन्मा । त्री । रोचनानि । विश्वा । रजांसि । शुशुचानः । अस्थात् ।
होता । यजिष्ठः । अपाम् । सधऽस्थे ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

४. [ स ] यजिष्ठः (=यष्टृतमः=यजनकर्मणि=अत्यन्तकुशलो ) द्विजन्मा (=द्वाभ्यां जातः=अरणीभ्यामुत्पन्नः=द्यावापृथिव्योर्मध्ये विद्युद्रूपेण वा जातो ) होता (=देवानामाह्वाता ) त्री रोचनानि (=त्रीणि रोचनानि त्रीन् द्युलोकस्य दीप्तिमतो भागान् ) विश्वा रजांसि [च] (=विश्वानि रजांसि च=सकलानपि अन्यान् आन्तरिक्षादीन् लोकांश्च ) अभि शुशुचानः ( =आभिमुख्येन दीपयन् ) अपां सधस्थे ( =उदकानां स्थले=अन्तरिक्षे ) अस्थात् (=तिष्ठति=विद्युद्रूपेण निवसति ) [ अपि च ],

४. तो द्विजन्म अग्नि, तो यज्ञ करण्याविषयीं अतिकुशळ होता [ द्युलोकाचे ] तीन्ही देदीप्यमान प्रदेश [आणि] सकळ लोक प्रकाशानें भरून आपो[ देवीं]च्या स्थानीं राहतो;

4. [ That Agni ] born of the two, the invoker who is most skilful in sacrificing, illuminates the three bright regions [ of heaven ] and all the regions of space, and dwells in the bosom of the waters;

---

रून घेतला आहे. 'श्रवोभिः' म्हणजे 'कीर्ति' अथवा 'अन्न' ह्या दोहोंतून कोणता अर्थ येथें घ्यावयाचा ही एक अडचण, आणि 'जीवपीतसर्गः' म्हणजे 'जिवांनीं प्यालेला आहे सर्ग ज्याचा' असा अक्षरशः अर्थ आहे तो उघड आहे तथापि 'सर्ग' म्हणजे काय अर्थ समजावयाचा तें कळत नाहीं, ही दुसरी अडचण. 'जीवपीतसर्गः' हा शब्द वेदांत अथवा दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत पुनः आलेला आढळत नाहीं. कितीएक विद्वान् 'जीवांनीं प्याली आहे किरणरूप सृष्टि ज्याची, तो' असा अर्थ करितात.—'पुढें जाऊन जाऊन'= 'प्र सस्राणः.' म्हणजे अरणींतून बाहेर पडतांच तेथून निघून एकदम वेदीवर बसतो.—'रोदस्योः'च्या ठिकाणीं 'रोदसीओः' आणि 'शिश्रीत'-च्या ठिकाणीं 'शिशरीत' म्हटलें तर अकरा अकरा अक्षरें जमतात.

तिसऱ्या ऋचेंत 'वायुसारिखा शीघ्रगामी'='नभन्यः.' हा एक शब्द, 'नार्मिणी' हा दुसरा, आणि 'शतात्मा' हे तीन शब्द कठिण आहेत. त्यांतून 'नभन्य' शब्दाचें भाषांतर आम्हीं सायणानुसार केलें आहे. 'नार्मिणी' हा शब्द पुनः कोठेंच आलेला आढळत नाहीं. परंतु त्याच्या स्वरूपावरून तें विशेषनामावरून विशेषण झालेलें आहे असें दिसतें. 'शतजीवी' असा जो 'शतात्मा' शब्दाचा अर्थ केला आहे, तो अक्षरार्थ आहे. सायणाचार्य 'असंख्यरूपात्मक' असा अर्थ करितात. असंख्य वर्षें जगणारा असाहि अर्थ होऊं शकेल. कसाहि अर्थ केला तरी 'अनंत' याच्या जवळ जवळ अर्थ आहे. प्रयोगान्तरांवरून अर्थनिर्णय होत नाहीं.

वृत्तासाठीं 'नार्मिणीं'च्या ठिकाणीं 'नार्मणीं' म्हणावें आणि दुसऱ्या चरणांत 'नभनिओ न अर्वा' आणि तिसऱ्यांत 'रुरुक्वआन् शतआत्मा' असें म्हणावें.

चवथ्या ऋचेंत 'द्विजन्म' असें आहे त्याचा अर्थ 'द्यावापृथिवीपासून जन्मलेला' असा आहे. सू. ३१ मं. २ यांत जो 'द्विमाता' शब्द आला आहे, तोहि याच भावार्थाचा आहे. 'दोन मातांपासून झालेला' असा 'द्विजन्म'

**अयं स होता यो द्विजन्मा विश्वा दधे वार्याणि श्रवस्या ।**
**मर्तो यो अस्मै सुतुको ददाश ॥ ५ ॥ १८ ॥**

अयम् । सः । होता । यः । द्विऽजन्मा । विश्वा । दधे । वार्याणि ।
श्रवस्या ।
मर्तः । यः । अस्मै । सुऽतुकः । ददाश ॥ ५ ॥ १८ ॥

## भाषायाम्.

५. अयं स होता (=यः पूर्वासु ऋक्षु प्रतिपादितः स एवायं वेदिस्थितो होता अग्निर्यो देवानामाह्वाता भवति)। यो द्विजन्मा (=द्वाभ्यां द्यावापृथिवीभ्यां जातो) [होता], [तस्मै मर्ताय] विश्वा वार्याणि (=विश्वानि वार्याणि वरणीयानि धनानि) श्रवस्या (=श्रवस्यया=हविरन्नेच्छया) दधे (=धारयति=ददाति) यो मर्तः (=मर्त्यः=मरणधर्मा मनुष्यः) सुतुकः (=सुबलः=बलवान्=प्रबलः=सर्वेणापि स्वकीयेन बलेन युक्तः सन्) अस्मै (=अग्नये) ददाश (=हविर्ददाति=हविषा संभजते) ॥

स यो वृषेत्यत्र सायण एवं व्याख्यातवान्। स तादृशो योऽग्निर्नरां न मनुष्याणामिव रोदस्योर्द्यावापृथिव्योरपि वृषा सेक्ता। उत्पादक इत्यर्थः। एवं सर्वोत्पादकः श्रवोभिः सर्वत्र श्रूयमाणैर्यशोभिर्युक्तः सन्नस्ति। वर्तते। सर्वोत्पादक इत्युक्तं तत्रोपपत्तिमाह। यतोऽयं जीवपीतसर्गः। जीवैर्नानाविधैः पीत आस्वादितः सर्गः सृष्टिक्रमो यस्य स तथोक्तः। तृतीया कर्मणीति पूर्वपदप्रकृतिस्वरत्वम्। पुनर्बहुव्रीहौ स एव स्वरः। अत्रायं सृष्टिक्रमः। अयमग्निः स्वदत्तं हविरादित्यं प्रापय्य तद्रश्मिभिः सह वैद्युतरूपेण मेघद्वारोदकेन प्रवर्ष्य सर्वान् प्राणिनः प्रापयतीत्यतो वृष्ट्युत्पादनद्वारोत्पादयिता। इदानीं साक्षादुत्पादकत्वमाह। योऽग्निर्योनौ गर्भाशये सस्त्राणः प्रविष्टः सन् शिश्रीत। निषिक्तं रेतः धारयति। न पश्चादिदेहाकारेण परिणमयतीत्यर्थः। यद्यग्निर्न पचेत् पूरयेदेव नोत्पद्यते। तस्मादयं साक्षादेवोत्पादकः। स तादृशोऽग्निर्यशस्वी वर्तत इत्यर्थः यद्वा योऽग्निर्नरां न नराणां कर्मसूत्साहयुक्तानां यजमानानामिव। नरा मनुष्या नृत्यन्ति कर्मस्विति यास्कः। नि० ५. १ ॥ तेषां यथा स्वर्गाद्यभिमतवर्षकः तद्वद्रोदस्योरपि। आश्रयवाचिना शब्देनाश्रयिणो लक्ष्यन्ते। भूलोकवर्तिनां वृष्टिप्रदानेन द्युलोकवर्तिनां हविःप्रापणेनेति भावः। स तादृशोऽग्निः श्रवोभिर्हविर्लक्षणैः सोमाज्यादिभिरन्नैर्निमित्तभूतैर्जीवपीतसर्गो जीवविशेषैर्यजमानैरविशेषेण सर्वैरास्वादितस्वभावः सन् अस्ति। प्रकृष्टो वर्तते। अग्निमग्निं हविर्भिः प्रीणयित्वा स्वाभिमतान्भोगान्भुञ्जत इत्यर्थः। किंच योऽग्निर्योनौ स्वकीयस्थाने वेदिलक्षणे

५. तो हा द्विजन्म होता होय; आणि जो मर्त्य याला सर्व सामर्थ्यानें [ हवि ] देतो, त्याजकारणें हा [ अग्नि ] हविरन्नाच्या इच्छेनें सर्व प्रकारचीं उत्तम धनें प्राप्त करून देतो.

5. This is that invoker born of two; who bestows all excellent riches on that mortal who, with all his power, sacrifices unto him.

शब्दाचा अर्थ केल्यास चालेल. दोन माता म्हणजे दोन अरणी, किंवा 'द्यावापृथिवी' ह्या दोन माता. [ द्युलोकाचे ] 'तीन्ही देदीप्यमान प्रदेश'— 'त्री रोचना.' म्हणजे सर्व द्युलोकच. कारण द्युलोकाचे खालचा, मधला आणि वरचा असे तीन भाग कल्पिले आहेत. याविषयीं सू. १०२ मं. ८ आणि टिपा पहा.—'आपो देवींच्या'—'अपाम्.' म्हणजे 'दिव्य जीं उदकें' त्यांच्या. दिव्य उदकें म्हणजे अंतरिक्षांतून मेघोदकरूपानें जीं पडतात तीं. त्यांचें स्थान म्हणजे 'अंतरिक्ष' हें तर उघड आहे.—वृत्तासाठीं 'त्री'च्या जागीं 'तिरी' असें म्हणावें आणि 'अपां'च्या ठिकाणीं 'अपआं' म्हणावें.

पांचव्या ऋचेंत 'सर्व सामर्थ्यानें' (='सुतुकः'=सावेश होत्साता) हें कठिण आहे. परंतु 'सुतुक' शब्द अन्यत्र बरेच ठिकाणीं आला आहे. तीं स्थळें सर्व पाहून आम्हीं भाषांतर केलें आहे. 'आपल्या सर्व सामर्थ्यानिशीं' म्हणजे यज्ञ करण्यांत खर्चाकडे अथवा श्रमाकडे न पाहतां असा अभिप्राय आहे.—आम्हांस वाटतें, वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'द्विजन्मा'च्या ठिकाणीं 'दुइजन्मा' असें, आणि 'वार्याणि'च्या ठिकाणीं 'वारिआणि' असें वाचलें पाहिजे.

## सूक्तम् १५०.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । उष्णिक् छन्दः ॥

**पुरु त्वा दाश्वान्वोचेऽरिरग्ने तव स्विदा ।**
**तोदस्येव शरण आ महस्य ॥ १ ॥**

पुरु । त्वा । दाश्वान् । वोचे । अरिः । अग्ने । तव । स्वित् । आ ।
तोदस्यऽइव । शरणे । आ । महस्य ॥ १ ॥

---

सत्त्राणः प्रविष्टः सन् शिश्रीत । स्वस्मिन्प्राप्तं पुरोडाशादिकं पचति सोऽयमग्निरस्ति महानुभावो वर्तते । इति ॥

आ यः पुरमित्यत्र नार्मिणीं नर्मवर्तीं यजमानानां संबन्धिनीमुत्तरवेदिम् । यद्वा नृणां मनसि स्थितां यजमानानां यज्ञार्थं यां भूमिं प्रत्यग्यागमनमनीषा विद्यते तां पुरं तत्स्थानमादीदेत् दीपयति । ...... नभन्यो न नभसाकाशे भवो नभस्वान्वायुरि-व । किंच शतात्मा । शतं सहस्रमित्यपरिमितवचनः । तत्तद्यजमानगृहापेक्षया आ-हवनीयगार्हपत्याद्यपेक्षया वा नानारूपत्वम् । अथवा मित्रवरुणभेदेनाग्नेर्मित्रादिरूप-म् ...... इत्यादि सायणः ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे अग्ने ], दाश्वान् (=तुभ्यं हविर्दत्तवान् ) [ अहं ] त्वा पुरु वोचे (=त्वां पुरूणि वच्मि=त्वां बहूनि धनानि याचे ) । [ अहं हि ] हे अग्ने, महस्य तोदस्य शरणे आ इव ( =महतस्तोदस्य गृहमध्य इव=महतः स्वामिनो गृहे यथा कुक्षि-दासो वर्तते तथा ) तव स्वित् [ शरणे ] आ अरिः ( =तवैव गृहे सेवकः दासः) [ अस्मि ] ॥

पुरु बहु वोचे ...... पुत्रं देहि वित्तं देहीत्याद्याशसनानि ब्रवीमीत्यर्थः । ...... महस्य महतस्तोदस्येव शिक्षकस्य स्वामिनः शरणे । अस्य गृहे यथा गर्भदासादिरा समन्तान्नियतो वर्तते तद्वदहमपि । इति सायणः ॥

## सूक्त १५०.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अग्नि. वृत्त—उष्णिक्.

१. [ हे अग्नी ], तुजपाशीं मी हवि अर्पण करून पुष्कळ [ वर ] मागतों. हे अग्नी, मी मोठ्या धन्याचे घरीं [ दास ] [ असल्या ]प्रमाणें तुझ्याच एकट्याच्या [ घरीं ] दास आहें.

## Hymn 150.

To *Agni*. By *Dîrghatamas*, son of *Uchathya*. Metre—*Ushṇik*.

1. Having offered oblations, I implore thee [ for ] many [ favours ]. I am, O Agni, a slave in thine [ house ] alone, as in the house of a great master.

---

१. 'हे अग्नी, मी तुला पुष्कळ हव्यें देऊन आतां तूं मला पुष्कळ वर द्यावेस म्हणून प्रार्थना करीत आहें. तुला ते द्यावयास सामर्थ्य आहे. आणि मीहि तुझी अनन्यभावेंकरून सेवा करीत असतों. कारण जसा एकादा मोठा श्रीमान् धनी असावा, आणि त्याच्या घरीं एकादा दास राबत असावा, तसा मी तुझ्या घरीं श्रम घेऊन तुझी सेवा करीत आहें.'

'धन्याचे'=' तोदस्य.' 'तोद' म्हणजे शिक्षक, त्यावरून 'धनी' असा अर्थ.

पाश्चात्त्य पंडित येथें केवळ शिक्षक असा अर्थ करितात, पण तो जुळत नाहीं असें आम्हांस वाटतें.

या सूक्ताचें वृत्त 'उष्णिक्.' याचे पहिले दोन चरण अष्टाक्षरी अनुष्टुभाचे आणि तिसरा एकादशाक्षरी त्रिष्टुभ् वृत्ताचा असतो. या पहिल्या मंत्रांतील पहिल्या चरणांत 'दाश्वान्'च्या ठिकाणीं 'दाशुआन्' म्हणावें, आणि 'अरिः'च्या 'अ०'शीं पूर्वाक्षराबरोबर संधि करूं नये.



व्य॑नि॒नस्य॑ ध॒निनः॑ प्रहो॒षे चि॒दर॑रुषः ।
क॒दा च॒न प्र॒जिग॑तो॒ अदे॑वयोः ॥ २ ॥

वि । अ॒नि॒नस्य॑ । ध॒निनः॑ । प्र॒ऽहो॒षे । चि॒त् । अर॑रुषः ।
क॒दा । च॒न । प्र॒ऽजिग॑तः । अदे॑वऽयोः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे अग्ने ], अनिनस्य (=त्वां स्वामिनं न मन्यमानस्य ) धनिनः अररुषः (=धनिनोपि अररुषः=सत्यपि धने हविर्दानमकुर्वतः ) कदा चन प्रजिगतः (=?कदापि पूजार्थम् अप्रगच्छतः=अनुपासानस्य ) अदेवयोः (=देवान् अकामयमानस्य ) [ पुरुषस्य ] प्रहोषे चित् ( =प्रहोषे सत्यपि=आह्वाने सत्यपि=तस्मिन् कृताह्वाने सत्यपि ) [ त्वामहं तस्माद् ] वि [ वोषे ] (=तस्मात्त्वामपगमयामि=त्वं तत्र मा गच्छेरिति प्रार्थये ) ॥

दुर्बोधेयं तत्र क्रियापदाभावात् । सायणेनापि बहुनायासेन व्याख्याता ॥

२. [ हे अग्नी ], [ तुला ] धनी न मानणारा, [ आणि ] श्रीमंत असतांहि हविर्दान न करणारा, कधींहि उपासना न करणारा, [ आणि ] देवांवर प्रीति न करणारा जो मनुष्य, त्याणें [ तुझें ] आह्वान केलें तरी, [ तूं तिकडे जाऊं नये अशी माझी प्रार्थना आहे ].

2. Even if there be an invocation by that man who doth not regard thee as his master, who [ though] rich doth not sacrifice, who never approacheth [to worship], [and] who doth not love the gods, [I pray thee] away [ from him ].

२. या ऋचेंत क्रियापद नाहीं त्यामुळें हिचा अर्थ दुर्बोध आहे. वरच्या ऋचेंत असलेल्या क्रियापदापासून अध्याहार करून निर्वाह केला पाहिजे. आम्हीं तसेंच केलें आहे. ' माझी तुला प्रार्थना आहे ' याजबद्दल मुळांत केवळ ' वि ' उपसर्ग आहे त्याजबरोबर वरील ऋचेमधून ' वोचे ' हें क्रियापद अध्याहृत घेऊन ' विवोचे '=मी तुला तिकडून प्रार्थनेनें फिरवितों=मी अशी प्रार्थना करितों कीं तूं तिकडे जाऊं नये, असा क्लिष्ट अर्थ करावा लागतो. याजपेक्षा ' प्रजिगतः ' हें द्वितीय पुरुषीं एक वचनीं लेट्चें रूप जर मानिलें, तर मात्र ' कदा चन प्रजिगतः=कदापि मा गाः= कदापि मा गच्छ' असा निर्वाह चांगला होईल. मग ' वि ' हें ' प्रहोषे 'कडे घेऊन ' विशेषेंकरून आह्वान केलें असतांहि ' असा अर्थ करावा. पण ' प्रजिगतः ' याचा तसा प्रयोग होईल कीं नाहीं याविषयीं आम्हांस संशय आहे.

' कधींहि उपासना न करणारा '= ' कदा चन प्रजिगतः.' ' पूजार्थम् ' किंवा ' यजनार्थम् ' असा कांहीं तरी अध्याहार समजला पाहिजे. वेदीजवळ कधींहि न जाणारा असा अर्थ.

वृत्तासाठीं ' वि अग्निनस ' असें व्यस्त वाचावें.

**स चन्द्रो विप्र मर्त्यो महो व्राधन्तमो दिवि ।**
**प्रप्रेत्ते अग्ने वनुषः स्याम ॥ ३ ॥ १९ ॥**

सः । चन्द्रः । विप्र । मर्त्यः । महः । व्राधन्ऽतमः । दिवि ।
प्रऽप्र । इत् । ते । अग्ने । वनुषः । स्याम ॥ ३ ॥ १९ ॥

## भाषायाम्.

३. हे विप्र (=मेधाविन्नग्ने), [यो मनुष्यस्तव वनुः भक्तो भवति] स मर्त्यः (=मरणधर्मा मनुष्यो) दिवि (=द्युलोके) चन्द्रः (=सर्वेषामाह्लादको) महो व्राधन्तमः (=महान् अत्यन्तप्रवृद्धः श्रेष्ठश्च) [भवति]। [अतः कारणात्] हे अग्ने, [वयं] ते (=तव) वनुषः (=हविर्दातारः=भक्ताः) प्रप्र इत् स्याम (=प्रकर्षेणैव स्याम=यथा भवामस्तथा कुरु)॥

सायणस्त्वेवमाह । हे अग्ने विप्र मेधाविन् यो मर्त्यस्त्वां यजते स मर्त्यो यजमानो दिवि द्युलोके चन्द्रः सर्वेषामाह्लादकश्चन्द्रसदृशो भवति । यद्वा चन्द्र एव भवति । यजमानानां चन्द्रत्वप्राप्तिं छन्दोगा आमनन्ति । पितृलोकादाकाशमाकाशाच्चन्द्रमसमेष सोमो राजेति । सोमलोके विभूतिमनुभूयेति च । तथा मुण्डकेपि द्युलोकप्राप्तिराम्नायते एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यरश्मिभिर्यजमानं वहन्ति तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवास इति । एष वः पुण्यः सुकृतो ब्रह्मलोक इति च । पुनः स एव विशेष्यते । महो महतोऽपि व्राधन्तमः प्रवृद्धतमः । इतरदेवानामपि श्रेष्ठ इत्यर्थः । अतोऽग्ने ते तव प्रप्रेत् प्रकर्षेणैव वनुषः संभक्तारः स्याम । यद्वा प्रीणयित्वा प्रप्रेत् स्याम । प्रकृष्टा एव भवेम । इति ॥

३. हे मेधावी [ अग्नी ], [ जो मर्त्य तुला भजतो ], तो स्वर्गी देदीप्यमान, [ आणि ] मोठा [ आणि ] अतिशयेंकरून श्रेष्ठ [ होत असतो ]. यास्तव हे अग्नी, आम्ही तुझे उत्तम भक्त होऊं असें कर.

3. That mortal, O wise [ Agni ], [ who worships thee ] [ becomes ] renowned [ and ] great [ and ] most glorious, in heaven. May we, therefore, be, O Agni, thy sincere worshippers indeed.

---

३. यांत अग्नीच्या भक्तांचें भाग्य वर्णून, तें भाग्य आम्हांस प्राप्त व्हावें म्हणून आम्हो अग्नीचे भक्त नेहमीं राहूं असें घडो, अशी प्रार्थना केली आहे.

हें लहानसें सूक्त येथें संपलें; या शेवटच्या ऋचेंत ऋषि प्रार्थना करितो कीं, आम्ही नित्य अग्नीचीच उत्तम उपासना करीत राहावें म्हणजे आमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील आणि आम्ही स्वर्गी जाऊं आणि तेथें श्रेष्ठत्वाप्रत पोंहचूं.

'अतिशयेंकरून श्रेष्ठ' = 'व्राधन्तमः' म्हणजे इतर देवांपेक्षांहि श्रेष्ठ असा अर्थ होय, असें सायणाचार्य म्हणतात. स्वर्गात राहणारे जे कोणी मनुष्य असतील, त्यांत श्रेष्ठ होतो असें तरी विवक्षित दिसतें खरें.

वेदकाळचे अतिप्राचीन आर्य देवांपाशीं मागणी मागत तीं सर्व ऐहिक सुखासंबंधीच नसत, तर स्वर्गसंबंधीहि असत, अशाविषयीं हें एक चांगलें प्रमाण आहे. सू. ४५. मं. ७ आणि त्याजवरील 'यज्ञांत' याविषयींची टीप पहा.

वृत्तासाठीं प्रथम चरणांत 'मर्तिओ' आणि तिसऱ्यांत 'स्याम'चे ठिकाणीं 'सिआम' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १५१.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । मित्रावरुणौ देवता । आद्या मित्रदेवताकैव । जगती छन्दः ॥

**मित्रं न यं शिम्या गोषु गव्यवः स्वाध्यो विदथे अप्सु जीजनन् । अरेजेतां रोदसी पाजसा गिरा प्रति प्रियं यजतं जनुषामवः ॥१॥**

मित्रम् । न । यम् । शिम्या । गोषु । गव्यवः । सुऽआध्यः । विदथे । अप्ऽसु । जीजनन् ।
अरेजेताम् । रोदसी इति । पाजसा । गिरा । प्रति । प्रियम् । यजतम् । जनुषाम् । अवः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. प्रियं (=सर्वेषां प्रियतमं) यजतं (=यष्टव्यं) यम् [ अग्निं ] जनुषाम् अवः प्रति (=प्राणिनां रक्षणं प्रतिलक्ष्य=प्राणिनां रक्षणापेक्षया) स्वाध्यः (=शोभनध्यानपराः उपासका) गोषु गव्यवः (=गा आत्मन इच्छन्तः सन्तो) मित्रं न (=सखायमिव) विदथे (=यज्ञे) शम्या (=यजनकर्मणा) अप्सु जीजनन् (=अन्तरिक्षे-जीजनन्=अन्तरिक्ष उदपादयन्=अन्तरिक्षे यथाविर्भवति तथाकुर्वन्) [ तस्य ? अग्नेः ] पाजसा गिरा (=तेजसा नादेन च) रोदसी अरेजेताम् (=द्यावापृथिव्यावकम्पेताम्) ॥

एषा दुर्बोधा दूरान्वया अनपेक्षिता चात्र । अग्निदेवताका भवति चेद्वास्त्येवं भावार्थः। पुराकाले मेघोदकरूपासु गोषु सतीषु वृत्रेण रुद्धासु सकला अपि प्राणिनः प्राप्तभया आसन् । तस्मिन् प्रसङ्गे सुकृतः पुरातनर्षयो मेघोदकरूपा गा आत्मन इच्छन्तः प्राणिनां च रक्षणं कारयितुमिच्छन्तः यजनकर्माचरन्तः अग्निरन्तरिक्षे सखा कश्चित्साहाय्यकारीव यथा प्रादुर्भवेत्तथाकुर्वन् । सत्यग्नौ प्रादुर्भूते तस्य तेजो दृष्ट्वा तस्य नादं च श्रुत्वा द्यावापृथिव्यावपि भयेनाकम्पेताम् इति ॥ इमां सायणोपि कथं कथमपि व्याचष्टे । तदेवम् ।

गोषु बह्वीषु निमित्तभूतासु गव्यवो गा आत्मन इच्छन्तः । अत्र यद्यपि गव्यव इत्येवालं न गोष्विति । तथापि गव्यव इत्यत्र गोस्वामित्वं प्रतिपाद्यते । तन्नैकार्थीह्वित्वादपि स्यात् । अतः स्पृहणीया बह्व्य इत्यवगमयितुं गोष्विति पदम् । यथा गवामसि गोपतिः । गणानां त्वा गणपतिम् । ...... पाजसा बलेन गिरा भयंकरशब्देन । इत्यादि ॥

## सूक्त १५१.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—मित्रावरुण. त्यापैकीं पहिली ऋचा एकट्या मित्राविषयींच आहे. वृत्त—जगती.

१. ज्या प्रिय [ आणि ] पूजनीय [ अग्नी ]ला, प्राण्यांच्या संरक्षणासाठीं पुण्यवंत जनांनीं यज्ञस्थळीं गाईंची इच्छा धरून आपल्या कर्माच्या योगेंकरून मित्राप्रमाणें अंतरिक्षांत उत्पन्न केलें, [ त्याच्या ] तेजाच्या योगानें [ आणि ] गर्जनेच्या योगानें भूलोक आणि द्युलोक हे थरथरां कांपले.

## HYMN 151.

To *Mitra* and *Varuṇa*. By *Dîrghatamas*, son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. Earth and Heaven trembled [ with fear ] at the splendour [ and ] the roar of that dear [ and ] venerable one, whom the pious worshippers, desirous of the cows and having regard to the protection of creatures, created in the watery firmament, with their work while sacrificing.

---

१. हें सूक्त मित्रावरुण, म्हणजे मित्र आणि वरुण, यांविषयीं आहे, तथापि पहिला मंत्र अग्नीविषयीं आहे असें दिसतें. आणि यांत आरंभींच 'मित्र' हा शब्द आला आहे त्याजवरून ही ऋचा संहिताकारांनीं भ्रमानें या सूक्तांत घातली असेल. वस्तुतः इचा संबंध या सूक्ताशीं बहुतकरून नाहीं, आणि ही एकाग्या अग्निदेवताक सूक्तांत घातली असती तर बरें झालें असतें.

भावार्थः— 'पूर्वीं वृत्रानें मेघोदकें अवरोधून धरिलीं तेव्हां सर्व प्राण्यांस मोठें संकट प्राप्त झालें. त्यांचा बचाव होण्यासाठीं मेघोदकरूप गाई आपणांस प्राप्त व्हाव्या म्हणून, प्राचीन देवभक्तांनीं यज्ञ करून प्रिय आणि पूज्य अग्नि अंतरिक्षांत विजेच्या रूपानें प्रगट होऊन मेघवृष्टि करी, असें केलें. तेव्हां तो अग्नि त्या उपासकांच्या मित्राप्रमाणें प्रगट होऊन प्रकाशतांच, आणि गर्जना करितांच, द्युलोक आणि भूलोक हे दोन्ही भयानें थरथरां कांपूं लागले.' पण ऋचा दूरान्वय आणि दुर्बोध आहे.

'गाईंची.' म्हणजे मेघोदकरूप गाईंची.

'उत्पन्न केलें'=' जीजनन्.' म्हणजे अरणीपासून घर्षणानें उत्पन्न केलें, अथवा आकाशांत प्रगट होई असें केलें, यांतून एक अर्थ होऊं शकेल. पण द्यावापृथिवी कांपते झाले हें अरणीपासून घर्ष-

यद्ध त्यद्वां पुरुमीळ्हस्य सोमिनः प्र मित्रासो न दधिरे स्वाभुवः ।
अध क्रतुं विदतं गातुमर्चत उत श्रुतं वृषणा पस्त्यावतः ॥ २ ॥
यत् । ह । त्यत् । वाम् । पुरुऽमीळ्हस्य । सोमिनः । प्र । मित्रासः । न ।
दधिरे । सुऽआभुवः ।
अध । क्रतुम् । विदतम् । गातुम् । अर्चते । उत । श्रुतम् । वृषणा ।
पस्त्यऽवतः ॥ २ ॥

### भाषायाम्.

२. [ हे मित्रावरुणौ ], यत् ह (=यस्मात्खलु ) मित्रासो न (=मित्राणीव=सखाय इव ) [ इमे ] स्वाभुवः (=सुष्ठु आ भवितारः=अनुकूला ) [ ऋत्विजः ] सोमिनः पुरुमीळ्हस्य (=सोमवतः सोमयाजिनः पुरुमीळ्हनामकस्य कस्यचित्पुराणस्योपासकस्य ) त्यत् (=प्रसिद्धं हविः ) वां (=युवाभ्यां=युवयोरर्थे ) प्र दधिरे (=प्रकर्षेण धारितवन्तः=प्रार्पितवन्तः ) अध (=अतः कारणात् ) [ युवाम् ] अर्चते (=स्तुवते मह्यं ) क्रतुं गातुं [ च ] विदतं ( =प्रज्ञां स्तोत्रं=स्तोत्रकरणसामर्थ्यं च वेदयतं=ज्ञापयत=प्रयच्छतम् ) उत (=अपि च ) हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तौ ) [ मित्रावरुणौ ], पस्त्यावतः (=गृहस्वामिनो यजमानस्य ) [ स्तोत्रं ] श्रुतं (=शृणुतम् ) ॥

पुरुमीळ्हस्यैतन्नामकस्य राज्ञो मित्रासो न मित्राणीव स्थिताः स्वाभुवः स्वाभवनशीलाः स्वस्वव्यापारसमर्था दधिरे । अध अतः कारणात् । इत्यादि सायणपादाः ॥

णानें उत्पन्न केलेल्या अग्नीविषयीं चांगलें जुळत नाहीं, वैद्युत अग्नीविषयीं जुळतें. पण वैद्युत अग्नि उपासकांनीं कसा निर्माण केला ? उपासकांनीं केलेलें यजनकर्म पाहून अग्नि संतुष्ट झाला आणि अंतरिक्षांत प्रगट झाला, म्हणून उपासकांनींच तो अंतरिक्षांत प्रगट केला असा प्रयोग केला आहे असें दिसतें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' शिमिआ, ' आणि दुसऱ्यांत ' स्वाध्यो 'च्या ठिकाणीं ' सुआधिओ ' असें म्हणावें.

२. [हे मित्रावरुण हो], ज्यापेक्षां [ या ] आज्ञाधारक उपासकांनीं सोमयाजी पुरुमीह्लाचें जें [हवि] तें तुम्हांस मित्राप्रमाणें अर्पण केलें आहे, त्यापेक्षां तुम्ही [ या ] गायकाला बुद्धि आणि स्तोत्रशक्ति द्या. आणि हे वीर्यवंत [मित्रावरुणांनो], तुम्ही या गृहस्वामीचें [ स्तोत्र ] ऐका.

2. Inasmuch as the pious priests have, like friends, offered to you, [O Mitra and Varuna], that oblation] of the Soma-sacrificing Purumîdha, give ye wisdom and the [power of] song to [this] singer; and hear, O brave [ones], the prayer of the master of the house.

२. 'हे मित्रावरुण हो, पुरुमीह्ल या नांवाचा उपासक जें हवि तुम्हांला आणि दुसऱ्या देवांला अर्पण करीत असे असें सांगतात, तसलें उत्तम हवि तुम्हांला आज आमच्या या ऋत्विजांनीं अर्पिलें आहे, तर तुम्ही प्रसन्न व्हा; आणि मज स्तोत्याप्रत बुद्धि द्या आणि स्तोत्रें कशीं रचावीं यांचें ज्ञान करून द्या; आणि माझा जो यजमान, त्याची मनकामना पूर्ण होण्यासाठीं त्याची प्रार्थना ऐकून घ्या.'

'सोमयाजी पुरुमीह्ल'=' सोमिनः पुरुमीह्लस्य.' म्हणजे देवांला सोम अर्पण करीत असे असा जो पुरुमीह्ल तो. या सोमयाजी पुरुमीह्लाविषयीं विशेष सविस्तर इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. तो एक पुरातन भक्त असे आणि त्याचें नांव तीनचारदां वेदांत त्याच संबंधानें आलेलें आहे. सायण म्हणतात, तो एक राजा असे.

'बुद्धि आणि स्तोत्रशक्ति द्या' ='क्रतुं गातुं विदतम्.' म्हणजे उत्तम बुद्धि आणि चांगलीं स्तोत्रें रचण्याची शक्ति. 'गातु' म्हणजे 'स्तोत्र' ऋ. ५. ८७. ८ याजवरील सायणभाष्य पहा.

'गृहस्वामीचें'=' पस्त्यावतः.' गृहस्वामी म्हणजे ज्या घरधन्याकरितां ऋषि हें स्तोत्र म्हणत आहे तो, असें समजलें पाहिजे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'सुआभुवः' आणि चवथ्यांत 'पस्तिआवतः' असें वाचावें लागतें.

**आ वां भूषन्क्षितयो जन्म रोदस्योः प्रवाच्यं वृषणा दक्षसे महे ।**
**यदीमृताय भरथो यदर्वते प्र होत्रया शिम्या वीथो अध्वरम् ॥३॥**

आ । वाम् । भूषन् । क्षितयः । जन्म । रोदस्योः । प्रऽवाच्यम् । वृ-
षणा । दक्षसे । महे ।
यत् । ईम् । ऋताय । भरथः । यत् । अर्वते । प्र । होत्रया । शिम्या ।
वीथः । अध्वरम् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तौ=शूरौ) [ मित्रावरुणौ ], वां (=युवयोः) प्रवाच्यं (=प्रकर्षेण शंस्यं) रोदस्योः (=द्यावापृथिव्योर्मध्ये जायमानं) जन्म (=प्रादुर्भावं) क्षितयः (=सर्वेपि जना) महे दक्षसे (=महते बलाय=महद् बलं लब्धुम्) आ भूषन् (=अलं कुर्वन्ति=प्रशंसन्ति) यद् ईं (=यदेव) [ बलम् ] ऋताय (=सत्याय मनुष्याय) यत् [ च ] अर्वते (= ? " युष्मान् प्राप्तवते यजमानाय ") भरथः (=युवां प्रापयथः=दत्थः) । [ हे मित्रावरुणौ ], [ युवां ] होत्रया (=स्तुत्या) शिम्या [ च ] (=कर्मणा च) अध्वरं वीथः (=यज्ञं प्रति प्राप्नुथः) ॥

आभूषन् सर्वतोलंकुर्वन्ति । श्लाघन्त इत्यर्थः । ...... होत्रया स्तुतिरूपया वाचा शिम्या हविःप्रदानादिना कर्मणा च । इत्यादि सायणः ॥

३. हे वीर्यवंत [मित्रावरुण] हो, तुमचें द्यावापृथिवींमधलें वर्णनीय जन्म सर्व लोक, मोठें बळ [प्राप्त होण्या] साठीं, वर्णीत असतात. ज्या प्रकारचें [बळ] तुम्ही खऱ्या मनुष्याला, [आणि] ज्याप्रकारचें [बळ] तुम्ही [तुम्हांला] भजणाऱ्या उपासकाला प्राप्त करून देत असतां. स्तुतीच्या योगेंकरून [आणि] उपासनेच्या योगेंकरून तुम्ही यज्ञाप्रत येत असतां.

3. * Your praiseworthy birth between the earth and the heaven all men celebrate, O brave [Mitra and Varuna], for [attaining] great strength such as you bring to the righteous man, such as you bring to [your] worshipper. Through praise [and] work you come to the sacrifice.

३. 'हे मित्रावरुण हो, तुमचें जें द्यावापृथिवींमध्यें होणारें वर्णनीय जन्म, तें सर्व लोक बळप्राप्ति करून घ्यावयाची असली म्हणजे वाखाणीत असतात. आणि याप्रमाणें तुमच्या जन्माची स्तुति केली म्हणजे, तुम्ही तुम्हांला भजणारा आणि खऱ्या रीतीनें वागणारा जो मनुष्य, त्याला बळ देत असतां. तुम्हांला स्तोत्र अर्पण करून तुमची सेवा केली म्हणजे तुम्ही यज्ञाप्रत येत असतां.'

'द्यावापृथिवींमधील जन्म'=' रोदस्योर्जन्म.' मित्र म्हणजे सूर्य अथवा दिवस एतद्रूप देव आणि वरुण म्हणजे रात्रिरूप देव. हे दोघेहि द्यावापृथिवींच्या उदरांत म्हणजे अवकाशरूप पोकळींत जन्मतात असें वेदांत सांगितलेलें आहे.

'मोठें बळ प्राप्त होण्यासाठीं वर्णीत असतात'=' आ भूषन् दक्षसे महे' म्हणजे जेव्हां जेव्हां मोठें बळ प्राप्त व्हावें असें युद्धादिक प्रसंगीं वाटत असतें तेव्हां तेव्हां वर्णितात, आणि तेव्हां तेव्हां तसलें मोठें सामर्थ्य तुम्ही प्राप्त करून देत असतां.

'तुम्हांला भजणाऱ्या मनुष्याला'=' अर्वते.' 'अर्वते' हा शब्द येथें कठिण आहे. आम्हीं केवळ सायणांस अनुसरून भाषांतर केलें आहे, दुसरा निर्वाह दिसत नाहीं. अर्वन् शब्दाचा नित्याचा अर्थ घोडा असा आहे.

वृत्तासाठीं 'प्रवाच्यं' बद्दल 'प्रवाचिअं' आणि 'शिम्या' बद्दल 'शिमिआ' असें वाचावें.

प्र सा क्षितिरसुर या महि प्रिय ऋतावानावृतमा घोषथो बृहत् ।
युवं दिवो बृहतो दक्षमाभुवं गां न धुर्युप युञ्जाथे अपः ॥ ४ ॥
प्र । सा । क्षितिः । असुरा । या । महि । प्रिया । ऋतऽवानौ । ऋतम् ।
आ । घोषथः । बृहत् ।
युवम् । दिवः । बृहतः । दक्षम् । आऽभुवम् । गाम् । न । धुरि । उप ।
युञ्जाथे इति । अपः ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. हे असुरा (=असुरौ=प्रबलौ), या क्षितिः (=या देवयजनरूपा भूमिः=आसनं) [युवयोर्] महि प्रिया (=अत्यन्तं प्रीणयित्री) सा प्र[कर्षेण संपादितास्ति] । [अतः कारणात्] हे ऋतावानौ (=ऋतवन्तौ=नित्यं यज्ञगामिनौ), [इदम्] ऋतम् (=इममस्माकं यज्ञं) बृहत् (=बृहता नादेन) आ घोषथः (=अवैकल्येन संपादित इति स्तुतम्)। युवं (=युवां) बृहतो दिवः (=महतो द्युलोकस्य=महतो शुभ्रस्य रथस्य) [धुरि] [लोके रथस्य] धुरि गां न (=धुरि बलीवर्दमिव) अपः (=यज्ञरूपं कर्म तदेव) आभुवं दक्षं (=सर्वतो भवनशीलं श्रेष्ठं बलम्) उप युञ्जाथे (=योजयथः) ॥

युवां शुभ्ररथस्य धुरि यज्ञरूपमश्वं योजयथ इति भावः ॥

प्र । प्रकर्षेण संपादिता । उपसर्गश्रुतेर्योग्यक्रियाध्याहारः । तामासीदतमिति शेषः । यागभूमिर्देवानां प्रियेति प्रसिद्धम् । आसाद्य च हे ऋतावानौ......इत्यादि सायणः ॥

**४. हे प्रबळ [ आणि ] यज्ञवन्त [ मित्रावरुण ] हो, तुम्हांला अत्यंत प्रिय जें आसन, तें आम्हीं चांगलें घातलें आहे. तर तुम्ही या आणि ह्या आमच्या यज्ञाची मोठ्यानें प्रशंसा करा. तुम्ही महान् जो द्यू, त्याच्या [ धुरेला ], [ रथाच्या ] धुरेला बैल [ जोडिल्या]प्रमाणें, यज्ञोपासनारूप सर्वोत्तम बळ जोडीत असतां.**

4. That seat at the altar, O mighty [ gods ], which [ is ] greatly agreeable [ to you ], is carefully prepared by us. Commend this sacrifice, O you who preside over sacrifices! You harness [ to the yoke] of great Heaven the sacrificial rite [ as ] a strong power, like [yoking] a bull to the yoke [ of a chariot ].

४. ' हे मित्रावरुण हो, यज्ञामध्यें येऊन बसण्यास तुम्हांला फार आवडतें. ती तुमची बैठक आम्हीं उत्तम रीतीनें घातली आहे. तर इजवर तुम्ही येऊन बसा. आम्ही करीत आहों हा यज्ञ फार चांगला झाला अशी त्याची मोठ्यानें प्रशंसा करा. यज्ञ चांगला झाला तर त्यापासून मोठमोठीं कार्यें होतात. तुम्ही ज्या यज्ञांत विराजमान होऊन तो पुरा करितां, तो जो यज्ञ तेंच उत्तम बळ तुम्ही रथाच्या जुकडाला बैल जोडिल्याप्रमाणें जोडीत असतां, तर येथें बसल्यानें तुमचा वेळ निरर्थक जाईल असें समजूं नका.'

'यज्ञोपासनारूप सर्वोत्तम बळ'='अपः दक्षम् आभुवम्. ' यांत अडचण इतकी आहे कीं, कर्म अथवा उपासनाकर्म या अर्थी जो 'अपस्' शब्द आहे तो 'अपः' असा आद्युदात्त पाहिजे, आणि येथें तर 'अपः' असा अंतोदात्त आहे त्याचा अर्थ कर्मकुशल, दक्ष, असा होतो. येथें स्वरव्यत्यय मानावा याशिवाय दुसरा निर्वाह दिसत नाहीं. सायणांनीं कर्म असाच अर्थ केला आहे, आणि ते या स्वराच्या अडचणीविषयीं कांहींच सांगत नाहींत.

' यज्ञवंत '='ऋतावानौ.' म्हणजे जेथें जेथें यज्ञ होतो तेथें तेथें येत असणारे.

' यज्ञोपासनारूप सर्वोत्तम बळ '= 'अपः दक्षम् आभुवम्.' म्हणजे यज्ञरूप जें कर्म, तेंच कोणीएक उत्तम बळ अथवा तोच कोणीएक उत्तम बळवान् घोडा, त्याला. यावरून ऋषीच्या मनांत असा अभिप्राय आहे कीं, मित्रावरुण हे जर यज्ञ समाप्तीस नेतील, तर त्या यज्ञापासून उत्पन्न झालेलें सामर्थ्य द्युलोकरूप रथाला घोड्याप्रमाणें अथवा बैलाप्रमाणें प्रतिदिनीं पृथ्वीच्या सभोंताली प्रदक्षिणा करवील.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत ' धुरि उप ' असें वाचावें:

**मही अत्र महिना वारमृण्वथोऽरेणवस्तुज आ सद्मन्धेनवः ।**
**स्वरन्ति ता उपरताति सूर्यमा निम्रुच उषसस्तक्ववीरिव॥५॥१०॥**

मही इति । अत्र । महिना । वारम् । ऋण्वथः । अरेणवः । तुजः ।
आ । सद्मन् । धेनवः ।
स्वरन्ति । ताः । उपरऽताति । सूर्यम् । आ । निऽम्रुचः । उषसः ।
तक्ववीःऽइव ॥ ५ ॥ १० ॥

## भाषायाम्.

५. अत्र मही (=अस्यां मह्याम्=अस्यां पृथिव्यां) [युवां] वारम् ऋण्वथः (=धनं प्रापयथः=धनं प्रयच्छथः)। [युवयोः प्रसादात्] अरेणवः (=निष्पापास्) तुजः (=क्षिप्रगामिन्यो) धेनवः (=? मेघोदकरूपा गावः) सद्मन् आ (=सद्मनि गृहेषु मनुष्याणाम् आगच्छन्ति)। ता [धेनवः] उपरताति (=?" उपरतातौ... मेघानां विस्तारवत्यन्तरिक्षे मेघाच्छन्ने सति") तक्ववीः इव (=?" तक्वा स्तेनस्तस्य वेता गन्ता मनुष्यः स यथा क्रोशति तद्वत्") आ निम्रुचः उषसः (=सायं प्रातश्च) सूर्यं स्वरन्ति (=सूर्यं प्रति स्वर्यन्ति=क्रोशन्ति) [युवामेव तदानीं ता रक्षथः]॥

अत्रेदमुक्तं भवति। अत्र पृथिव्यां यद्धनं तत्सर्वं युवां प्रयच्छथः। अन्तरिक्षाच्च या मेघोदकरूपा गावः शुद्धाः शीघ्रगतयोस्माकं गृहेष्वागच्छन्ति ता अपि युवयोरेव कृपयागच्छन्ति। ताश्च यदा वृत्रेण निरुद्धाः सत्यो गुहायां वसन्ति तदानीं सूर्यदर्शनाय युवामेव प्रार्थयन्ते युवां च तासां सूर्यं प्रयच्छथ इति॥

दुर्बोधा पुनरेषा सायणेनैवं व्याख्याता। हे मित्रावरुणौ युवां मही मह्याम्। सप्तम्येकवचने पूर्वसवर्णदीर्घः। ईदूतौ च सप्तम्यर्थे। पा० १. १. १९.। इति प्रगृह्यता। अत्रास्यां पृथिव्यां महिना महत्त्वेन या धेनूर्वारं वरणीयं प्रदेशमृण्वथः। अन्तर्भावितण्यर्थोऽयम्। गमनादिव्यवहारस्य तयोरधीनत्वात् द्यावापृथिव्योरभिमानिदेवत्वाच्च मित्रावरुणयोः। ता एता धेनवो गावः सायंकाले युष्मन्महत्त्वेनारेणवोऽनवद्यास्तस्कराद्यनपहारेणानष्टा वा तुजः क्षीराणां प्रदात्र्यः। तुजतिर्दानकर्मा। सद्मन् सद्मनि गोष्ठ आ आश्रिता आगच्छन्ति वा। उपसर्गश्रुतेर्योग्यक्रियाध्याहारः। ता एवंकारिता धेनव उपरताति उपरतातौ। सप्तम्या लुक्। मेघानां विस्तारवत्यन्तरिक्षे मेघाच्छन्ने सति सूर्यं सर्वस्य प्रसवितारं सुवीर्यं शोभनसामर्थ्यं वा सुवीर्यां मर्या यथा गोपायत इति तत्सूर्यस्य सूर्यत्वमिति श्रुत्यन्तरात्। आदित्यमभिलक्ष्य स्वरन्ति। स्वर्यन्ति सुतसंताराय स्वृ शब्दोपतापयोः। भौवादिकः। कस्मिन्काल इति तदु-

५. [हे मित्रावरुण हो], तुम्ही या पृथिवीवर [आपल्या] महिम्यानें धन देत असतां; निष्पाप शीघ्रगामी गाई [तुमच्या कृपेनेंच] [चालून] घरीं येतात. त्या, अंतरिक्ष मेघाच्छादित झालें म्हणजे, तक्वीप्रमाणें, सांज सकाळ सूर्यासाठीं ओरडत असतात.

5. In this earth you give, [O Mitra and Varuna], the excellent wealth; the sinless [and] rapid cows come to the house [through you]. When the sky becomes covered with clouds, they low for the sun morning and evening like a Takvavî.

५. ही ऋचा फार कठिण आहे. पहिल्या चरणाचा अर्थ खेरीज करून बाकी सर्व ऋचेचा अर्थ आम्हीं सायणांस अनुसरून केला आहे. वर दिलेल्या भाषांतराचा भावार्थ असाः—'हे मित्रावरुण हो, या पृथिवीवर जें धन आहे, तें तुम्ही देत असतां. तुमच्या कृपेनें गाई घरीं येतात. मेघानें आकाश आच्छादित झालें म्हणजे त्या सांज सकाळ सूर्यप्रकाशासाठीं ओरडत असतात; तेव्हां तुम्हीच सूर्यप्रकाश प्राप्त करून देतां.'

परंतु या ऋचेंत मुख्य अडचणी दोन आहेतः १ली, गाई कोणत्या? लौकिक गाई घ्यावयाच्या, किंवा उषोरूप अथवा मेघोदकरूप समजावयाच्या? २री, 'तक्वीप्रमाणें' अशी उपमा दिली आहे. त्यांत 'तक्वी' म्हणजे काय?

सायण लौकिक गाई समजतात, आणि त्या नित्य सुखरूपपणें घरीं येतात, त्यांना चोर वगैरे हरण करून नेत नाहींत हा मित्रावरुणाचा पराक्रम होय असें समजतात; आणि 'तक्वी' म्हणजे मनुष्य असें भाष्य करितात.

वस्तुतः तात्पर्य असें असेल. 'हे मित्रावरुण हो, या पृथिवीवर असलेलें धन तुम्हींच दिलेलें आहे; उदाहरणार्थ आकाशांतील ज्या मेघोदकरूप गाई त्या आमच्या घरीं चालून येतात त्या तुमच्याच पराक्रमामुळें. आणि वृत्र जेव्हां सूर्याला नाहींसा करितो, म्हणजे मेघोदकरूप गाईंस गुहेंत कोंडून ठेवितो आणि त्यांस प्रकाश दृष्टीस पडेनासा होतो, तेव्हां तो प्रकाश तुम्हीच पुनः त्यांस मिळवून देतां, म्हणजे त्यांस गुहेबाहेर आणितां ते तुम्हीच.'

'पृथिवीवर'='मही.' हीहि एक अडचणच आहे. पण 'मही' हें 'मह्यां' याऐवजीं रूप आहे असें सायणानुसार समजल्याशिवाय दुसरा निर्वाह नाहीं.

'निष्पाप शीघ्रगामी'='अरेणवः तुजः' या अर्थाला प्रमाण ऋ. १. १६३ ६, आणि ऋ. ८. १७. १५ हे मंत्र आणि त्यांजवरील सायणभाष्यांत मिळतें. दोन्हीं विशेषणें मेघोदकरूप गाईंस

**आ वामृताय केशिनीरनूषत मित्र यत्र वरुण गातुमर्चथः।**
**अव त्मना सृजतं पिन्वतं धियो युवं विप्रस्य मन्मनामिरज्यथः॥६॥**

आ । वाम् । ऋताय । केशिनीः । अनूषत । मित्र । यत्र । वरुण । गातुम् । अर्चथः ।
अव । त्मना । सृजतम् । पिन्वतम् । धियः । युवम् । विप्रस्य । मन्मनाम् । इरज्यथः ॥ ६ ॥

च्यते । निम्रुच उषसः । सर्वेष्वपि सायंकालेषूषःकालेषु च । तत्र दृष्टान्तः । तक्ववीरिव । तक्वा स्तेनः । तस्य वेता गन्ता मनुष्यः स यथा क्रोशति तद्वत् । एवं निरुद्धानां गवां मुखचारा युष्मदायत्त इति तयोः स्तुतिः । इति ॥

अत्र धेनुशब्देन उषसो बोद्धव्या इति पाश्चात्याः । 'उपरताति'पदमुपरतात् सामीप्यमित्येतस्य सप्तमी । तक्ववीरिति तक्वा स्तेनकर्मा विः पक्षी अन्यपक्ष्युपजीवी पक्षिविशेष इति विवरणीयमिति च त एव ॥ उभयत्र पुनः प्रयोगान्तरप्राचुर्याभावादर्थनिर्णयकरणे विप्रतिपत्तिर्महीयसी ॥

## भाषायाम्.

६. हे मित्र [अपि च] हे वरुण, यत्र (=यत्र काले=यदानीं) [युवां] गातुम् अर्चथः (=स्तोत्रं गायथस्) [तत्र=तदानीं] वाम् ऋताय (=युवयोर्यज्ञाय) केशिनीः (=केशिन्यः=दीर्घकेशा ज्वालारूपा युवतयः) आ अनूषत (=आभिमुख्येन गायनानि गायन्ति)। [तर्हि युवामागत्य] धियः अव सृजतं (=स्तोत्राणि अवसर्जयतं प्रवाचयतम्) पिन्वतं (=प्रवर्धयतं च=पुष्टानि यथा भवन्ति तथा कुरुतम्)। युवं (=युवां) [हि] विप्रस्य मन्मनां स्तोतुर्मोवतः स्तोत्राणाम्) इरज्यथः (=ईश्वरौ स्वामिनौ भवथः) ॥

केशिनीरित्यत्र केशिनीः केशवत्योऽग्नेर्ज्वाला वां युवयोर्ऋताय यज्ञार्थमानूषत । हविःसमर्पणेनाभिपूजयन्तीत्यर्थः । ...... त्मनात्मनैवावसृजतम् । वृष्टिमवाङ्मुखं विसृजतम् । तथा कृत्वा धियोऽस्मदीयानि कर्माणि पिन्वतम् । वर्धयतमित्यर्थः ॥ इति सायणः ॥

चांगलीं शोभतात. मेघोदकासारिखें शुद्ध दुसरें कांहीं नाहीं, आणि तीं चपळहि आहेत यांत संशय नाहीं.

' अंतरिक्ष मेघाच्छादित झालें म्हण-

जे '='उपरताति.' याविषयींहि अडचण आहेत. ' उपरताति ' हा शब्द दोनदाच ऋग्वेदांत आलेला आहे (ऋ. ७.४८.३). पाश्चात्य पंडित ' उपरतात् ' शब्द क-

६. हे मित्रा आणि हे वरुणा, तुम्ही जेव्हां स्तोत्र गातां, तेव्हां तुमच्या यज्ञाकरितां लांब केशांच्या युवती गाणीं गात असतात. [तर तुम्ही या, आणि] स्तोत्रें म्हणवा, आणि तीं वृद्धिंगत करा. तुम्ही स्तोत्याच्या स्तोत्रांचे राजे आहां.

6. Towards your sacrifice the long-haired damsels chant, when you, O Mitra [and] Varuna, sing the hymn. Sing, therefore, the hymns yourselves and prosper them. [For] you are the masters of the songs of the poet.

ल्पून 'उपरताति' हें सप्तमीचें एकवचन घेतात आणि 'जवळ,' 'समीप' असा अर्थ करितात. पण आम्हांस वाटतें त्याला आधार नाहीं. 'उपरताति'चा अर्थ सायण एथें करितात तो संभवतो. 'उपर' म्हणजे 'मेघ' असा अर्थ होतो याविषयीं सू. ५४ मं. ७ आणि त्याजवरील टीप पहा. त्यावरून 'मेघमालिका [आली] असतां' असा अर्थ होणें कठिण नाहीं.

'तक्वीप्रमाणें'='तक्वीरिव.' या विषयीं मात्र खरोखर कांहींच सांगतां येत नाहीं. 'तक्वन्' म्हणजे चोर, 'वि' म्हणजे पक्षी, यावरून कितीएक पाश्चात्त्य पंडित एक प्रकारचा पक्षी असा अर्थ करितात. पण हा अर्थ निराधार आणि केवळ कल्पित आहे, युक्तिसिद्धसुद्धा दिसत नाहीं. हा शब्द दुसऱ्या एकाच मंत्रांत (ऋ. १०. ९१. २ यांत) आला आहे; यास्तव दुसरा अर्थ सुचविण्यास प्रयोगान्तराचेंहि साधन नाहीं. सायण म्हणतात 'मनुष्याप्रमाणें,' परंतु त्यांच्या व्युत्पत्तीकडे पाहिलें म्हणजे त्यांनीं तरी केवळ निर्वचनावरून कल्पना केली आहे असें वाटतें.

वृत्तासाठीं पहिल्या आणि दुसऱ्या चरणांमध्यें संधि न करणें, आणि 'सूर्यम्'च्या ठिकाणीं 'सूरिअम्' वाचणें इतकें अवश्य आहे.

६. 'हे मित्रावरुण हो, तुम्ही यज्ञांत येऊन गायन गाऊं लागलां म्हणजे, अग्नीच्या ज्या ज्वाळा, त्याच कोणीएक लांब केशाच्या तरुण स्त्रिया, त्या तुम्हांकरितां गाऊं लागतात. तर तुम्ही या, आणि स्तोत्रें आम्हांकडून म्हणवा आणि तीं चांगलीं म्हणवा. कारण स्तोत्रांचे स्वामी तुम्ही आहां, म्हणजे चांगलें स्तोत्र करण्याची आणि म्हणण्याची शक्ति देणें हें तुमच्या हातीं आहे' असा अर्थ.

'स्तोत्र गातां'='गातुम् अर्चथः.' अग्नि येऊन जसा स्तोत्रें म्हणतो आणि होम संपादितो, तसेंच मित्र आणि वरुणहि करितात असें तात्पर्य. 'गातु' शब्दाचा अर्थ 'स्तोत्र' अथवा गायन असा (=गै=गा=गाणें, यापासून) होतो

**यो वां यज्ञैः शशमानो ह दाशति कविर्होता यजति मन्मसाधनः ।**
**उपाह तं गच्छथो वीथो अध्वरमच्छा गिरः सुमतिं गन्तमस्मयू ॥७**

यः । वाम् । यज्ञैः । शशमानः । ह । दाशति । कविः । होता । यजति । मन्मऽसाधनः ।
उप । अह । तम् । गच्छथः । वीथः । अध्वरम् । अच्छ । गिरः । सुऽमतिम् । गन्तम् । अस्मयू इत्यस्मऽयू ॥ ७ ॥

**युवां यज्ञैः प्रथमा गोभिरञ्जत ऋतावाना मनसो न प्रयुक्तिषु ।**
**भरन्ति वां मन्मना संयता गिरोऽदृप्यता मनसा रेवदाशाथे ॥८॥**

युवाम् । यज्ञैः । प्रथमा । गोभिः । अञ्जते । ऋतऽवाना । मनसः । न । प्रऽयुक्तिषु ।
भरन्ति । वाम् । मन्मना । सम्ऽयता । गिरः । अदृप्यता । मनसा । रेवत् । आशाथे इति ॥ ८ ॥

## भाषायाम्.

७. [ हे मित्रावरुणौ ], शशमानः (=शंसमानः ) कविः (=मेधावी ) होता (=देवानामाह्वाता ) मन्मसाधनः (=मन्मसाधकः=स्तोत्रकर्ता ) यो [ यजमानो] वां ह यज्ञैर्दाशति ( =यज्ञद्वारा हविर्दत्त्वा युवां संभजते ) यजति (=पूजयति ) [ च ], तम् उप अह (=तं प्रति खलु ) गच्छथः (=युवां प्राप्नुथः ) [ तस्य च ] अध्वरं वीथः (=यज्ञं कामयेथे ) । [ अतः कारणात् ] अस्मयू (=अस्मान्कामयमानौ ) [ युवाम्] अच्छ गिरः सुमतिं गन्तम् ( =अस्माकं स्तोत्राणि शोभनमतियुक्तामुपासनां प्रति च आगच्छतम् ) ॥

८. हे ऋतावाना (=ऋतावानौ=यज्ञवन्तौ ), मनसो न प्रयुक्तिषु (=मनसः प्रयुक्तिषु मन इव=मनसः प्रयोगेषु यथा मनः प्रथमं शीघ्रं प्रेरयन्ति तद्वत् ) यज्ञैर्गोभिः (=यज्ञिर्यैर्गोविकारैः=यज्ञसंबन्धिभिः पयआदिभिः ) युवां प्रथमा (=युवां प्रथमौ=शीघ्रं प्रथमं च युवामेव) अञ्जते ( =व्यञ्जयन्ति=गोक्षीरादिकं प्रापयन्ति ) । [ अपि च ] संयता मन्मना (=युवामेव सम्यग्गच्छता चेतसा=युष्मत्परेण चेतसा ) वां (=युवयोर् ) गिरः भरन्ति (=स्तुतीः संपाद्य प्रापयन्ति ) । [ तदनन्तरं ] [ युवाम् ] अदृप्यता मनसा ( =दर्परहितेन मनसा=सुगम्येन मनसा ) रेवत् आशाथे

७. [ हे मित्रावरुण हो], जो मेधावी [ आणि ] स्तोत्र करणारा [ उपासक ] स्तोत्रें म्हणून तुम्हांला यज्ञांनीं भजतो [आणि] तुमचें आह्वान करून यजन करितो, त्याजपाशीं तुम्ही जात असतां, [ आणि ] त्याच्या यज्ञावर तुम्ही प्रीति करितां. [ तर ] तुम्ही आम्हांवर प्रीति करून आमच्या भक्तीप्रत [आणि] स्तोत्रांप्रत या.

८. हे यज्ञवंत [मित्रावरुण हो], कामांकडे मन प्रथम आणि सत्वर दवडल्याप्रमाणें यज्ञसंबंधी गोरसांनीं तुम्हांलाच प्रथम आणि सत्वर भजतात. तुम्हांशीं तत्पर अशा चित्तानें तुम्हांलाच स्तोत्रें अर्पण करितात. [ तेणें करून ] तुम्ही सुगम मनानें [ उपासकांकरितां ] द्रव्य धारण करीत असतां.

7. You go to him [and] you love his sacrifice, who, endowed with intelligence and offering prayers, invokes you, praises you, and honours you with sacrifices, and worships you. Come, therefore, lovingly towards [our] hymns [ and our ] worship.

8. [ O Mitra and Varuṇa ] who preside over sacrifices, they honour you with sacrificial milk and clarified butter first, as quickly as the mind is directed to work first. They offer to you praises with a devoted mind. You [ then ] bestow wealth [ on your worshippers ] with a mind free from pride.

---

याविषयीं यात्र सूक्ताचा मं. २ याजवरील टीप पहा.

'लांब केशाच्या युवति.' सू. १४० मं. ८ आणि टीप पहा.

'म्हणवा'='अव सृजतम्.' अक्षरशः 'खालीं टाका,' तोंडांतून खालीं पाडा, आमच्या तोंडांतून म्हणवा.

---

७. 'हे मित्रावरुणांनो, जो कोण उपासक परिश्रम करून तुम्हांला हाक मारितो आणि स्तोत्रें अर्पण करितो, आणि तुमच्या उद्देशानें यज्ञ करितो, त्याजप्रत तुम्ही जातां आणि त्याचें हवि खाण्याविषयीं उत्सुक असतां. तर तुम्ही आम्हांवर प्रीतिकरून माझी जी ही उपासना आणि माझीं जीं हीं स्तोत्रें त्यांजप्रत तुम्ही या.'

८. 'हे मित्रावरुण हो, कांहीं तरी काम कर्तव्य असलें म्हणजे त्यांत हात वगैरे जाण्या पूर्वीं मन प्रथम जातें त्या-

रेवद्वयो दधाथे रेवदाशाथे नरा मायाभिरितऊति माहिनम् ।
न वां द्यावोऽहभिर्नोत सिन्धवो न देवत्वं पणयो नानशुर्मघम्
॥ ९ ॥ २१

रेवत् । वयः । दधाथे इति । रेवत् । आशाथे इति । नरा । मायाभिः । इतःऽऊति । माहिनम् ।
न । वाम् । द्यावः । अहऽभिः । न । उत । सिन्धवः । न । देवऽत्वम् । पणयः । न । आनशुः । मघम् ॥ ९ ॥ २१ ॥

(=धनवद्धविरन्नम् आशाथे=प्राप्नुथः=हविरन्नं गृहीत्वा रयिं प्रयच्छथः) ॥
यज्ञैर्यजनसाधनैर्गोभिर्गोविकारैः पयआदिभिः ...... । प्रयुक्तिषु प्रयोगेषु मनसो न । कर्मणि षष्ठी । मन इव । तद्यथा प्रथमं व्यञ्जयन्ति मुख्यं कुर्वन्ति तत्पूर्वकत्वात्सर्वव्यवहारस्य......। यस्मादेवं यस्मादप्यतानभिभववता मनसा प्रकृष्टेन चेतसा युक्तौ सन्तौ रेवत् धनवत्कर्मास्मदीयमाशाथे । अश्नुवाथे व्याप्नुथः । ददाथे इत्यर्थः । इति सायणः ॥

## भाषायाम्.

९. हे नरा (=नरौ=शूरौ) [ मित्रावरुणौ ], मायाभिः (=युवयोः प्रज्ञाभिः साधनेन) रेवत् वयः (=धनयुक्तम् अन्नं) दधाथे (=धारयथः)—इतऊति (=इतः समीपे रक्षणं यस्य तादृशं=नित्यरक्षणसमर्थं) माहिनं (=महत्) [ च ] [ रेवत्= धनम् ] आशाथे (=उपासकेभ्यः प्रयच्छथः) । वां देवत्वं मघं [ च ] (=युवयोर्देवत्वं महद्भाग्यं च) अहोभिः (=सर्वेषु दिनेषु=कस्मिन्नपि दिने=कदाचिदपि) न द्यावः (=द्युलोकः) [ आनशुः=प्राप ] नोत सिन्धवः (=अन्तरिक्षमपि) [ प्राप ] न पणयः (=पणयोपि=“असुरा अपि”) आनशुः (=प्रापुः) ॥

रेवत् धनवद्वयोन्नं दधाथे । उभयं च धारयथः । यस्मादेवं तस्माद्रेवत् धनवत् । सह दृष्टत्वाद्वय इति गम्यते । धनविशिष्टमन्नम् । ...... आशाथे । अश्नुवाथे । अस्मभ्यं ददाथे इत्यर्थः । कीदृशम् । ...... इतऊति । इतोस्मदभिमुखं गमनवत् इतो रक्षणवद्वा । ...... नानशुः ...... लोकत्रये युवयोः परिभवितारो न केपि सन्तीत्यर्थः ॥ इति सायणः ॥

प्रमाणें, आज्याहुति वगैरे यज्ञांत अर्पण करावयाच्या असल्या म्हणजे प्रथम तुम्हांला अर्पण करितात. तशींच स्तोत्रेंहि तुम्हांलाच प्रथम अर्पण करितात. त्याव-

९. हे शूर [ मित्रावरुणहो ], तुम्ही [ हविरन्न ग्रहण करून ] धन धारण करीत असतां, तुम्ही आपल्या नानाविध प्रज्ञेनें सहज रक्षण करणारें [ आणि ] मोठें [असें] धन धारण करीत असतां. तुमचें [ जें ] देवत्व [ आणि भाग्य, त्यांप्रत स्वर्गहि कधीं पावला नाहीं, अंतरिक्ष नाहीं [ आणि ] पणि सुद्धा पावले नाहींत.

9. You hold [ food ] with wealth, you bestow, O brave [ Mitra and Varuṇa ], with your multiform wisdom, wealth that is ready to help [ and is ] great. Neither the heaven, nor the firmament, nor the Paṇis have any day attained to your godhead nor to your good fortune.

रून तुम्ही हविरन्न स्वीकारून घेऊन उपासकांला धन देत असतां ' असा भावार्थ.

' कामांमध्यें मन दवडल्याप्रमाणें '= 'मनसो न प्रयुक्तिषु.' हे शब्द कठिण आहेत. 'मनसो न प्रयुक्ति' हीं पदें ऋ.१०.३०.१ यांत आले आहेत. त्यांत 'मनसः प्रयुक्ति ' म्हणजे मनाचा प्रयोग अथवा मनाला जें वापरणें अथवा पाठविणें तें असा अर्थ आहे. प्रस्तुत स्थळीं 'प्रयुक्तिषु' हें अनेकवचन आणि सप्तमी आहे त्यावरून अडचण आहे. परंतु मनाला जसें एकदम आणि प्रथम प्रेरितात, तशा घृताहुति तुम्हांला प्रथम आणि एकदम अर्पण करितात इतकें तात्पर्य आहे यांत संशय नाहीं.

' यज्ञसंबंधी गोरसांनीं '='यज्ञैर्गोभिः.' म्हणजे यज्ञांत अर्पण करावयाचे जे तूप, दूध इत्यादिक गोरस त्यांहीं.

'द्रव्य धारण करीत असतां '=' रेवत् आशाथे. ' अक्षरशः 'द्रव्यासहित [हवि] स्वीकारीत असता, ' म्हणजे हव्य स्वीकारून घेऊन धन देत असतां. पुढील ऋचा पहा.

' भजतात '=' अञ्जते. ' अक्षरशः, भिजवितात अभ्यञ्जन करितात. कोणाच्या तरी आंगावर तूप टाकिलें तर त्याला त्यानें सहज अभ्यञ्जन होत असतें म्हणून ' अञ्जते ' असा प्रयोग केला आहे. वस्तुतः ' भजतात ' (='सेवन्ते') इतकेंच विवक्षित आहे.

९. ' हे मित्रावरुण हो, तुम्ही उपासकांचें हवि ग्रहण करून त्यांला आपल्या अनेक प्रकारच्या ज्ञानाच्या योगानें असें मोठें धन मिळवून देतां, कीं जेणें-करून त्यांचें रक्षण पाहिजे तेव्हां तत्क्षणीं होत जाईल. तुमचा जो दिव्य प्रभाव, त्याजप्रत स्वतः स्वर्ग आणि अंतरिक्ष हीं सुद्धा कधींहि प्रावलीं नाहींत

## सूक्तम् १५२.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**युवं वस्त्राणि पीवसा वसाथे युवोरच्छिद्रा मन्तवो ह सर्गाः ।**
**अवातिरतमनृतानि विश्व ऋतेन मित्रावरुणा सचेथे ॥ १ ॥**

युवम् । वस्त्राणि । पीवसा । वसाथे इति । युवोः । अच्छिद्राः । मन्तवः । ह । सर्गाः ।
अव । अतिरतम् । अनृतानि । विश्वा । ऋतेन । मित्रावरुणा । सचेथे इति ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे मित्रावरुणौ ], युवं (=युवां ) पीवसा ( =पीवसानि=अच्छिन्नानि ) वस्त्राणि (= ? " तेजांसि ") वसाथे (=परिदधाथे) । युवोः (=युवयोर् ) मन्तवः सर्गाः ( =मननानि=कर्तव्ययोजनानि उद्योगाश्च ) अच्छिद्रा ह ( =अच्छिद्राः खलु=अच्छिन्नाः खलु) । [ युवां ] विश्वा अनृतानि (=विश्वानि असत्यानि=सर्वाण्यपि असत्यानि ) अव अतिरतं (=नाशयथः ) । [ अपि च ] हे मित्रावरुणौ, [ युवाम् ] ऋतेन सचेथे (=सत्येन सह संगच्छेथे=यत्र यत्र सत्यं तत्र तत्र युवां तस्य संरक्षणादिकं कर्तुं गच्छथः ) ॥

आणि तुमचें महाधनाचें भाण्डार त्याची सर पणींला सुद्धा आलेली नाहीं.'

'धारण करीत असतां '=' दधाथे, आशाथे. ' म्हणजे उपासकांला देण्याकरितां.

'सहज रक्षण करणारें '=' इतऊति.' हा शब्द किंचित् कठिण आहे. पण या स्थळीं हाच अर्थ संभवतो असें वाटतें. 'इतः' म्हणजे 'येथें' 'जवळ,' ऊति=रक्षण. त्यावरून, 'ज्यापासून रक्षण व्हावयाचें तें दूर नाहीं, जवळ आहे'=' ज्यापासून, प्रसंग येईल तेव्हां तत्क्षणीं रक्षण होण्यासारिखें आहे, असें.'

'कधीं '=' अहोभिः.' ऋ. ४. ५३. ७ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'पणि '=' पणयः.' पणि हे मित्रावरुणांच्या धनसंपन्नत्वाची सर पावले नाहींत, बरोबरी करूं शकले नाहींत. त्यांचा संबंध देवत्वाशीं आहे असें दिसत नाहीं. परंतु पणि हे कोण ? सायणाचार्य म्हणतात, ' असुर. ' 'पणि' शब्द जेथें जेथें ऋग्वेदांत आला आहे, तीं सर्व स्थळें काढून पाहतां, 'पणि' शब्दाचा मूळ अर्थ 'ज्यापाशीं धन असतांहि

## सूक्त १५२.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—मित्रावरुण. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [ हे मित्रावरुण हो ], तुम्ही अखंड वस्त्रें धारण करीत असतां. तुमच्या मसलती [ आणि तुमचे ] उद्योग अखंड [ होत ]. तुम्ही सकळ असत्यें नाहींशीं करून टाकितां. हे मित्रावरुण हो, तुम्ही सत्याच्या पाठीमागून जात असतां.

## Hymn 152.

To *Mitra* and *Varuṇa*. By *Dîrghatamas*, son of *Uchathya*. Metre—*Trishṭubh*.

1. You wear fat garments. Your plans [and your] works are free from holes. You put down all untruths. With truth you go, O Mitra and Varuṇa!

---

जो देवांला हविर्दान देत नाहीं तसला मनुष्य.' उदाहरणार्थः हे इंद्रा तूं जे घोडे, ज्या गाई आणि जें धन घेऊन येत असतोस, तें सर्व सोम काढून तुला भजणाऱ्या आणि दक्षिणा देत असणाऱ्या उपासकाला दे; पणीला, म्ह० सोम काढून अर्पण न करणाऱ्या आणि दक्षिणा न देणाऱ्याला, देऊं नको (यमिन्द्र दधिषे त्वमश्वं गां भागमव्ययम् । यजमाने सुन्वति दक्षिणावति तस्मिन् तं धेहि मा पणौ ऋ. ८. ९७. २). ऋ. ६. ५३. ३, ६. ५१. १४, ४. २५. ७ हीं स्थळें विशेषें करून पहा. नंतर 'पणि' हें मेघोदकरूप गाई चोरून आकाशांतील गुहेंत लपवून ठेवणारा जो वल अथवा वृत्र असुर, त्याच्या अनुचरांचें नांव झालें. कदाचित् पृथिवीवरचे पणि ( हविर्दान न करणारे कृपण ) मेल्यानंतर स्वर्गीं 'पणि' नावाचे असुर झाले आणि तेथेंहि देवद्वेष्टे झाले, अशी कल्पना असेल. मेघरूप गाई पणींनीं चोरून नेऊन गुहेंत लपवून ठेविल्या, मग त्यांचा शोध लावण्या करितां इंद्रानें आपली सरमा नांवाची कुत्री पाठविली आणि तिणें शोध लाविला, आणि तिचा आणि पणींचा संवाद झाला तो ऋ. १०. १०८ या सूक्तांत सविस्तर दिला आहे.

---

१. 'अखंड वस्त्रें धारण करितां' = 'पीवसा वस्त्राणि वसाथे.' आम्हीं अर्थ अक्षरशः केला आहे; पण येथें वस्त्राणि म्हणजे काय, तें स्पष्ट समजत नाहीं. सायण म्हणतात, 'तेजें.' तसें असण्याचा संभव आहे खरा. मात्र सामर्थ्य,

एतच्चन त्वो वि चिकेतदेषां सत्यो मन्त्रः कविशस्त ऋघावान् ।
त्रिरश्रिं हन्ति चतुरश्रिरुग्रो देवनिदो ह प्रथमा अजूर्यन् ॥ २ ॥

एतत् । चन । त्वः । वि । चिकेतत् । एषाम् । सत्यः । मन्त्रः । कविऽशस्तः । ऋघावान् ।
त्रिःऽअश्रिम् । हन्ति । चतुःऽअश्रिः । उग्रः । देवऽनिदः । ह । प्रथमाः । अजूर्यन् ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. एतद् (=वक्ष्यमाणम्) एषां त्वश्चन (=एषां मनुष्याणां मध्ये कश्चिदपि) वि चिकेतद् (=विस्पष्टं पश्येत्=द्रष्टुं शक्नोति) [यत एतयोः] कविशस्तः (=मेधाविभिर्जनैः प्रोक्तो) मन्त्रः (=मननं=कर्तव्ययोजनं) सत्यः (=अबाध्यः) [अपि च] ऋघावान् (=शत्रूणां हिंसावान्=घातको) [भवति] [अपि च] उग्रः (=उद्गूर्णबलः सन्) चतुरश्रिः (=अश्रिचतुष्टययोपेतः सन्) त्रिरश्रिम् (=अश्रित्रयोपेतं मनुष्यं=बलवन्तं बलवत्तरो भूत्वा) हन्ति (=नाशयति)। [अपि च] देवनिदो ह (=देवानां निन्दकाः) प्रथमाः (=प्रथमम्) अजूर्यन् (=जीर्णा भवन्ति) ॥

बळ इत्यादिक सुद्धा त्यांत कदाचित् मोडतील. तथापि याच सूक्ताच्या चवथ्या ऋचेंत पाहिलें तर तेजें म्हणजे प्रभाव होय असें दिसून येतें. हीं तेजोरूप वस्त्रें न फाटलेलीं अशीं असतात, म्हणजे मित्रावरुणांचें तेज सर्वत्र व्यापून राहतें, कोठें मध्यें स्खलित होत असतें असें नाहीं.

' उद्योग '=' सर्गाः.' ऋ. ४. २३. ६ याजवरील सायणभाष्य पहा. उद्योग अखंड होत, म्ह० उद्योग आरंभिलेले शेवटास जात असतात. मसलती केल्याप्रमाणें उद्योगाला आरंभ होतो, आणि उद्योगाला आरंभ केल्याप्रमाणें तो शेवटाला जातो.

'सत्याच्या पाठी मागून जात असतां' =' ऋतेन सचेथे.' म्हणजे जेथें जेथें म्हणून सत्य असेल, तेथें तेथें तुम्हां जाऊन त्याला साहाय्य करून त्याचें नित्य रक्षण करून राहत असतां.

ह्या ऋचेचा पाठ पुण्याहवचनांत अहेराच्या वेळीं म्हणत असतात. कारण यांत ' वस्त्राणि ' हा शब्द आला आहे. पण तशा प्रसंगाला योग्य असें या मंत्रांत कांहींच नाहीं. केवळ ' वस्त्राणि ' हा शब्द यांत आलेला आहे इतकेंच काय तें. त्यावरून भिक्षुकांनीं हा मंत्र लावून दिलेला आहे.

२. ही [गोष्ट तर] कोणीहि पाहूं शकतो [ कीं ], यांची विद्वज्जनांनीं वाखाणिलेली [ जी ] मसलत, [ ती ] खरी [ आणि ] घातक [ होय ], ती बलसंपन्न [आहे आणि] ती तीन धारांच्या मनुष्याला चार धारांची [होऊन] मारिते: देवनिंदक जन प्रथम लयास जातात.

2. This any one of men can perceive, [ that ] [ their ] design, praised by the learned, [ is ] unfailing [ and ] able to destroy, [ and ] [ being ] mighty [ it ] strikes [ the sword ] that has three edges, [ itself being ] possessed of four edges : the revilers of the gods are the first to become old.

२. 'ही गोष्ट कोणत्याहि मनुष्याचे दृष्टीस प्रत्यक्षपणें पडते; ती ही कीं, मित्रावरुणांची मसलत खरी, म्हणजे रामबाण होय; आणि ज्यावर तिचा प्रयोग व्हावयाचा त्याचा नाश करणारी होय; आणि जर कोणी प्रबळ मनुष्य असला तर त्याजपेक्षां ती दीडपट प्रबळ होऊन त्याचा नाश करिते; आणि हेंहि प्रसिद्ध आहे कीं, मित्रावरुणादिक देवांची निंदा करणारे जे जन, त्यांचा नाश प्रथम होत असतो.'

'कोणीहि'=' एषां त्वश्चन.' अक्षरशः हे जे मनुष्य लोक त्यांतून प्रत्येक, अर्थात् कोणी पाहिजे तो.

'तीन धारांच्या मनुष्याला'=' त्रिरश्रिम्.' म्हणजे ज्याला तीन धारांच्या अथवा पात्यांच्या तरवारीप्रमाणें बळ असेल त्याला.

'प्रथम लयास जातात'=' प्रथमा अजूर्यन्.' अक्षरशः प्रथम म्हातारे होतात; प्रथम नाशाप्रत जातात. जे मित्रावरुणादिकांची भक्ति करीत नाहीत, त्यांचा नाश लवकर होतो हें सर्व लोक प्रत्यक्ष पाहतात, त्याला प्रमाण नको असें तात्पर्य.

अपादेति प्रथमा पद्वतीनां कस्तद्वां मित्रावरुणा चिकेत ।
गर्भो भारं भरत्या चिदस्य ऋतं पिपर्त्यनृतं नि तारीत् ॥ ३ ॥

अपात् । एति । प्रथमा । पत्ऽवतीनाम् । कः । तत् । वाम् । मित्रा-
वरुणा । आ । चिकेत ।
गर्भः । भारम् । भरति । आ । चित् । अस्य । ऋतम् । पिपर्ति ।
अनृतम् । नि । तारीत् ॥ ३ ॥

प्रयन्तमित्परि जारं कनीनां पश्यामसि नोपनिपद्यमानम् ।
अनवपृग्णा वितता वसानं प्रियं मित्रस्य वरुणस्य धाम ॥ ४ ॥

प्रऽयन्तम् । इत् । परि । जारम् । कनीनाम् । पश्यामसि । न । उपऽ-
निपद्यमानम् ।
अनवऽपृग्णा । विऽतता । वसानम् । प्रियम् । मित्रस्य । वरुणस्य ।
धाम ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. पद्वतीनां (=पादोपेतानां युवतीनां मध्ये) अपात् (=पादरहिता या सा) प्रथमा एति (=प्रथमा सती गच्छति=सर्वेभ्योपि पूर्वं गच्छति) । हे मित्रावरुणा (=हे मित्रावरुणौ), वां तत् (=एतद्युवयोर्महाप्रभावकर्म) कः आ चिकेत (=को जानाति= पद्वतीषु इतरासु प्रभूतासु सतीष्वपि या पादरहिता उषाः सा सर्वाभ्योपि पूर्वं गच्छति एतद्युवयोः प्रभावकर्म तत्कथं भवतीति को नु जानाति) ? [ न कोपि ] । [ युवयोर् ] गर्भः (=शिशुः=सूर्यः) अस्य चित् (=अस्य जगतोपि) भारम् आ भरति (=वहति) [ स च ] ऋतं (=सत्यं) पिपर्ति (=संरक्षति) अनृतं [ च ] नि तारीत् (=असत्यं च नाशयति) ॥

एतत्सर्वं युवयोरेव महानुभावेन घटते तत्पुनः को याथातथ्येन जानाति न कोपीत्यर्थः ॥

४. कनीनां (=कन्यकानाम् उषोरूपाणां प्रतिदिनमाविर्भूतानामुषोरूपाणां कन्यकानां) जारं [ सूर्यं ] प्रयन्तम् इत् (=गच्छन्तमेव) परि पश्यामसि (=परिपश्यामः) न [ तु ] उपनिपद्यमानं (="क्षणमात्रमपि निषीदन्तं") [ परिपश्यामः ] । अनवपृग्णा (=अनवपृग्णानि=अहतानि=अस्खलितानि) वितता (=विततानि=

३. पाय असलेल्या ज्या स्त्रिया, त्यांतून बिनपायांची [ स्त्री ] प्रथम येते. तर हे मित्रावरुण हो, हा तुमचा [पराक्रम] कोण जाणतो ? [तुमचा] बाळ या [जगा]चा भार वाहतो; [तो] सत्याला रक्षितो [आणि] असत्याचा नाश करितो.

४. तो कन्यकांचा जार चालतच असतो तो आम्ही पाहतों, बसत असलेला असा आम्ही त्याला पाहत नाहीं. अस्खलित [आणि] विस्तीर्ण अशीं [ वस्त्रें धारण करणारा [जार थांबत असलेला असा आम्ही कधीं पाहत नाहीं ]. [जो जार] मित्राचें [ आणि ] वरुणाचें प्रिय घर [ होय ].

3. The first that goes is she the footless one among the females endowed with feet. Who, O Mitra and Varuṇa, knows this your [ act ] ? Your boy carries the burden of this [ world ] ; he protects that which is true, [ and ] destroys that which is untrue.

4. We only see the lover of the divine young damsels as he goes, never stopping ; [ but ] clad in unbroken garments, spread far and wide—[ the lover who is ] the dear home of Mitra and of Varuṇa.

---

३. ' हे मित्रावरुण हो, पाय असलेल्या स्त्रिया पुष्कळ असतां बिनपायांची स्त्री त्यांच्या पुढें धांवते; आणि तुमचा बाळक वयानें लहान असतांहि या सर्व जगताचा मोठा भार वाहतो, आणि खऱ्याचा प्रतिपाळ करून खोट्याचा नाश करितो. ह्या सर्व गोष्टी तुमच्या प्रतापानें होत असतात. पण त्या कशा होतात याचें खरें ज्ञान कोणाला आहे ? कोणालाहि नाहीं ' असें तात्पर्य.

' बिनपायांची स्त्री '=' अपात् ' म्हणजे ' उषा. ' ही सगळ्यां पुढें जाते हें खरेंच आहे, कारण कीं ती सर्वांच्या अगोदर म्हणजे अश्वी, सूर्य इत्यादिकांच्या पूर्वींच उगवत असते. तीला अपाद म्हणजे पादहीन असें म्हणण्याचें कारण उघड आहे, कारण तिचे पाय दृष्टीस पडत नसतात. वेदोत्तरकाळीं उषेच्या जागीं कविजनांनी स्थापिलेला जो अरुण, तोहि पादहीन म्हणजे लंगडा असतांहि सर्वांच्या पुढें येतो अशीं कल्पनावचनें पुराणांदिकांत आढळतात.

' तुमचा बाळ '=' गर्भः ' म्हणजे पहांटेला उगवणारा सूर्य नुकताच उगवला असतो, म्हणून त्याला बाळक असें म्हटलें आहे. तो सत्याला रक्षितो आणि अस-

**अनश्वो जातो अनभीशुरर्वा कनिक्रदत्पतयदूर्ध्वसानुः ।**
**अचित्तं ब्रह्म जुजुषुर्युवानः प्र मित्रे धाम वरुणे गृणन्तः ॥ ५ ॥**

अनश्वः । जातः । अनभीशुः । अर्वा । कनिक्रदत् । पतयत् । ऊर्ध्वऽसानुः ।
अचित्तम् । ब्रह्म । जुजुषुः । युवानः । प्र । मित्रे । धाम । वरुणे । गृणन्तः ॥ ५ ॥

विशेषेण विस्तीर्णानि ) [ वस्त्राणि तेजोरूपाणि ] वसानं ( =परिदधानं ) मित्रस्य वरुणस्य [ च ] प्रियं धाम ( =स्थानभूतं ) [ कनीनां जारम् उपनिपद्यमानं न परिपश्यामः ] ॥

एतावता सूर्यो मित्रावरुणयोः प्रियं धाम भवतीत्युक्तं भवति ॥

## भाषायाम्.

५. अनश्वः (=अश्वरहितः ) अनभीशुः (=प्रग्रहहीनः ) [ सूर्यो ] जातः (=जातमात्र एव ) अर्वा कनिक्रदत् ( =अश्व इवात्यर्थं क्रन्दयन् ) ऊर्ध्वसानुः पतयत् (=उपर्युपरि समुच्छ्रयणो गच्छति ) । [ तदानीं ] युवानः (=नित्यतरुणाः=अजराः=देवा ) मित्रे वरुणे धाम प्र गृणन्तः ( =मित्रावरुणयोः स्थानं=स्थानभूतं तं सूर्यं प्र गृणन्तः=स्तुवन्तः ) अचित्तं ब्रह्म (" चित्ताविषयं " स्तोत्रं ) जुजुषुः ( =सिषेविरे) ॥

अचित्तं ब्रह्म जुजुषुरिति दुर्बोधम् । तदपि । यत्सूर्यः अश्वरहितोपि निरालम्बश्च सन्नपि जातमात्र एव ऊर्ध्वमाकाशे गच्छति तस्मिन्काले च यत् देवा मित्रावरुणयोधार्मभूतं सूर्यं च स्तुवन्तः सन्तः मनुष्यैः कृतं स्तोत्रं सेवन्ते तद्युवयोर्मित्रावरुणयोः प्रभावकर्मेति भावगतं स्पष्टम् ॥

सायणस्तु अचित्तं चित्ताविषयं ब्रह्म ... उक्तरूपं कर्म मित्रे वरुणे च उभयोर्धाम तेजःस्थानं युवानो मिश्रयन्तस्तयोर्धाम्न्यारोपयन्तः । तथा प्रगृणन्तो युवयोस्तेजः प्रभवमिति प्रकर्षेण स्तुवन्तो जुजुषुः । सेवन्ते । मनुष्याः सूर्यस्य निरालम्बान्तरिक्षसंचारात्मकं कर्म वरुणमित्रयोर्धानमिति स्तुवन्तीत्यर्थः ॥

त्याचा नाश करितो म्हणजे आपल्या प्रकाशानें खरें आणि खोटें यांजमध्यें, म्हणजे वस्तुतःविद्यमान् आणि भ्रांतिमय जे पदार्थ त्याजमध्यें वगैरे, विवेचन करितो असें विवक्षित दिसते. ज्या पदार्थांस खरोखर अस्तित्व नाहीं, ते विद्यमान आहेत असें भ्रमामुळें रात्रीच्या वेळीं भासत असतें. तो भ्रम सूर्य उगवतांच नाहींसा होतो.

५. [ हा सूर्य ] अश्वरहित, लगामा शिवाय, उपजतांच किंकाळत मोठया त्वरेनें उंच उडून जातो. [ मग ] मित्र आणि वरुण यांचें जें तें [ सूर्यरूप ] घर, त्याची स्तुति करून अजर [ देव ] चित्तातीत स्तोत्राचें सेवन करितात.

5. [ Though ] without a horse, [ and ] without reins, he flew neighing [ like ] a horse with his back high in heaven. The ever-youthful gods, praising [ this ] home of Mitra and of Varuṇa, enjoyed the hymn which was beyond conception.

---

परंतु हा सूर्यबाळ भार कसा वहातो हें स्पष्ट समजत नाहीं. कदाचित् सर्व जगाचा निर्वाह करितो अशा कल्पनेनें म्हटलें आहे कीं काय ? म्हणजे नित्य नेमके वेळीं उगवणें आणि मावळणें, अमुक ऋतूंत अमुक उष्णता करणें इत्यादि भार विवक्षित आहे काय ?

४. ' नित्य एक एक उगवणारी अशा ज्या असंख्य उषोरूप तरुण कन्यका, त्यांचा जार जो सूर्य, कीं जो नित्य चालतच असतो, कधींहि थकून बसत नसतो, आणि जो तेजोरूप अविहत आणि लांबरुंद वस्त्रें धारण करणारा होय, तेंच मित्राचें आणि वरुणाचें प्रिय घर होय—मित्रावरुण सूर्याचे ठायीं राहत असतात. '

' कन्यकांचा जार '=' जारं कनीनाम्. ' सू. ६६ मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा.

'अस्खलित आणि विस्तीर्ण [वस्त्रें]'= ' अनवपृग्णा वितता. ' म्हणजे सूर्याच्या ज्या कांति अथवा प्रभा, कीं ज्या मध्यें काळोख कोठें राहूं न देतां सर्वत्र पसरलेल्या असतात, आणि लांब रुंद वस्त्रांप्रमाणें दिसतात, त्या.

' मित्रावरुणांचें प्रिय घर होय '= ' प्रियं धाम मित्रस्य वरुणस्य. ' मित्राचें घर सूर्य आहे असें म्हणणें हें योग्यच आहे, कारण मित्र सूर्यरूपीच देव. पण वरुण म्हणजे रात्र्यभिमानी देव आहे. तथापि त्याच्या प्रभावामुळें आणि विशेषेंकरून मित्रसाहचर्यामुळें त्याचेंहि धाम सूर्य होय असें सांगितलें असावेसें दिसतें.

---

५. 'सूर्य उगवल्याबरोबर घोड्यासारिखा चालून वर आकाशांत उडून जातो. तेव्हां सर्व देवांला सुद्धा आश्चर्य वाटून ते मित्राचें आणि वरुणाचें गृह असा जो तो सूर्य, त्याचें स्तवन करितात, आणि मनुष्यांनीं अर्पिलेलें हवि आणि स्तोत्र हीं सेवन करितात.' असा या किंचित् कठिण मंत्राचा अभिप्राय आहे. सूर्य घोड्याशिवाय अथवा घोडा नसतांहि घोड्याप्रमाणें उपजतांच म्हणजे उगवतांच

आ धेनवो मामतेयमवन्तीर्ब्रह्मप्रियं पीपयन्त्सस्मिन्नूधन् ।
पित्वो भिक्षेत वयुनानि विद्वानासाविवासन्नदितिमुरुष्येत् ॥ ६ ॥

आ । धेनवः । मामतेयम् । अवन्तीः । ब्रह्मऽप्रियम् । पीपयन् । सस्मिन् । ऊधन् ।
पित्वः । भिक्षेत । वयुनानि । विद्वान् । आसा । आऽविवासन् । अदितिम् । उरुष्येत् ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. धेनवः (=नेत्रोदकरूपा गावः) अवन्तीः (=अवन्त्यः=प्रीणयन्त्यः=मातृवत् सुखयन्त्यः सत्यो) ब्रह्मप्रियं मामतेयं (=ब्रह्म उपासनाकर्म प्रियं यस्य तं) मामतेयं (=ममतायाः पुत्रं) [दीर्घतमसं मां] सस्मिन् ऊधन् (=स्वकीये ऊधनि=स्वकीयोधोभवेन दुग्धेन) पीपयन् (=आप्याययन्तु पीनं पुष्टं कुर्वन्तु) । [स च] वयुनानि विद्वान् (=यज्ञकर्माणि जानन्=यज्ञस्य विविधान् प्रकारान् जानन्) पित्वो भिक्षेत (=अन्नस्य भोजनं याचेत) [लभेत च] [अपि च] आसा आविवासन् (=समीपे युवां परिचरन्=युवां युवयोः समक्षं परिचरन्) अदितिम् उरुष्येत् (=दारिद्र्याद् रक्षितो भवतु) ॥

ब्रह्म प्रियं परिवृढस्य कर्मणः प्रियतमं परिवृढस्याग्नेः प्रीणयितारम् ...... ऊधन् ऊधस्यापीपयन् । सर्वत आप्याययन्तु ...... ऊधोगतेन क्षीरेण युवाभ्यां प्रदेयेन नो ...रक्षन्त्वित्यर्थः । मित्रावरुणाभ्यां पयस्येति श्रुतेः । इति सायणः ॥

---

उडून आकाशांत चढतो इतकें पूर्वार्धाचें तात्पर्य उघड आहे. आणि उत्तरार्धांत देव हे मित्रावरुणाचें घरच असा जो सूर्य, त्याचें स्तोत्र करितात हेंहि उघड आहे; पण 'अचित्तं ब्रह्म जुजुषुः' याचा अर्थ अक्षरशः स्पष्ट असला तरी तेवढें वाक्य कठिण आहे यांत संशय नाहीं. 'चित्तातीत स्तोत्र' म्हणजे ज्याच्याविषयीं चित्तानेंहि कल्पना करवत नाहीं असा अर्थ दिसतो.

६. उपासनेची ज्याला आवड आहे अशा मामतेयाला गाई मायेनें आपल्या कासेच्या योगें करून पुष्ट करोत. उपासना कशा कराव्या हें जाणणारा [ मामतेय ] अन्नाविषयीं [ तुमची ] प्रार्थना करो [ आणि ] तुमची उपासना [ तुम्हां ]समक्ष करून दारिद्र्यापासून मुक्त होओ.

6. May the cows fatten lovingly with their udders the son of Mamatâ who loves worship. May he, knowing different modes of sacrifice, pray you, [O Mitra and Varuṇa], for food; and may he, worshipping [ you ] in [your] presence escape from poverty.

६. ' हे मित्रावरुण हो, ममतेचा पुत्र दीर्घतमा मी उपासनेवर आवड करणारा असून तुमचें आह्वान करून तुम्हां समक्ष तुमची सेवा करितों, आणि सेवा करण्याचे अनेक प्रकारहि मला ठाऊक आहेत; तर मेघोदकरूप गाईचें दूध मला मिळून मी पुष्ट होईन, असें करा. आणि तुम्हांपाशीं मला अन्न मागावयाची परवानगी द्या, आणि मागितल्याप्रमाणें अन्न मला मिळो, आणि मी दारिद्र्यापासून मुक्त होईन असें करा. '

' गाई '=' धेनवः. ' सायणाचार्य ह्या गाई म्हणजे लौकिक गाई असें समजतात. पण आम्हांला वाटतें कीं, येथें मेघोदकरूप गाई घेणें युक्त दिसतें.

' तुम्हांसमक्ष '=' आसा.' 'आसा' हें रूप अशा विलग रीतीनें वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. बहुतेक ठिकाणीं सायणाचार्य ' तोंडानें ' असा अक्षरशः अर्थ करितात. पण तो क्वचितच जुळतो. तथापि दुसरा काय अर्थ करावा याविषयीं सांगणें कठिण. ऋ. १०. ११५. ३. याजवरील भाष्यांत त्यांणी ' समीप ' असें सांगितलें आहे, त्याला अनुसरून आम्हीं येथें निर्वाह केला आहे.

' प्रार्थना करो '=' भिक्षेत. ' म्हणजे तुम्ही जेणें करून अन्न द्याल अशा रीतीनें मागो, तो मागो आणि तुम्ही प्रसन्न होऊन मागितल्याप्रमाणें द्या.

' दारिद्र्यापासून '=' अदितिम्.' 'अदिति ' शब्दाचा अर्थ ' दान न देणारा.' ' अदाता ' असा होतो याविषयीं ऋ. ३. ५४. ११ आणि त्याजवरील भाष्य पहा. परंतु येथें अदात्यापासून असा अर्थ जरी जुळणार नाहीं असें नाहीं, तथापि ' अदान, ' ' दारिद्र्य ' असा अर्थ विवक्षित दिसतो.

**आ वां मित्रावरुणा हव्यजुष्टिं नमसा देवाववसा ववृत्याम्।**
**अस्माकं ब्रह्म पृतनासु सह्या अस्माकं वृष्टिर्दिव्या सुपारा॥७॥२२**

आ । वाम् । मित्रावरुणा । हव्यऽजुष्टिम् । नमसा । देवौ । अवसा । ववृत्याम् ।
अस्माकम् । ब्रह्म । पृतनासु । सह्याः । अस्माकम् । वृष्टिः । दिव्या । सुऽपारा ॥ ७ ॥ २२ ॥

## भाषायाम्.

७. हे देवौ मित्रावरुणौ, [अहं] मनसा (=स्तोत्रेण) अवसा (=तर्पणहेतुना हविषा च) वां (=युवां) हव्यजुष्टिं (=यज्ञमिमं प्रति) आ ववृत्याम् (=आवर्तयेयम्=यथा आनयामि तथा युवामनुकूलौ भवतम्)। अस्माकं ब्रह्म (=स्तोत्रमिदानीं क्रियमाणं) पृतनासु (=संग्रामेषु) सह्याः (=सह्यात्=शत्रून् अभिभवतु)। अस्माकम् (=अस्मदर्थे) दिव्या वृष्टिः (=द्युसंबन्धिनी मेघवृष्टिः) सुपारा (=सुष्ठु पारयित्री=शोभनपरिणामा) [भवतु]॥

७. हे, देव मित्रावरुण हो, मला तुम्हांस स्तोत्राच्या योगानें [आणि] तृप्तिदायक [अन्ना]च्या योगानें [आमच्या ह्या] यज्ञाप्रत वळवूं द्या. आमची उपासना युद्धांत विजयी होओ. आम्हांकारणें दिव्य [आणि] कल्याणकारक वृष्टि [होओ].

7. May I, O gods Mitra and Varuṇa, turn you through my prayer [and] through gratifying oblation towards [my] sacrifice. May our worship lead to victory in battles. May there be for us divine showers ending in good.

७. 'हे मित्रावरुण हो, मीं हें स्तोत्र आणि हें हविरन्न तुम्हांला अर्पण करीत आहें, आणि तुम्ही या यज्ञाप्रत यावें असें प्रार्थीत आहें, तर तुम्ही या यज्ञाप्रत या. आम्हीं हें जें स्तोत्र करीत आहों, त्याच्या योगानें आम्ही संग्रामांमध्यें यशस्वी होऊं असें करा, आणि आम्हांसाठीं आकाशापासून कल्याणकारक अशी मेघवृष्टि होओ.' हा या सूक्ताचा उपसंहार आहे, आणि ऋषि प्रार्थितो कीं, मित्रावरुणांनीं यावें आणि असा वर द्यावा कीं, तो आणि त्याचे जन युद्धांत विजयी होतील, आणि जेणेंकरून सुपीक आणि सुभिक्ष होईल अशी मेघवृष्टि होत राहील.

'तृप्तिदायक अन्नाच्या योगानें'='अवसा.' अक्षरशः 'तर्पणानें.' जेणेंकरून तृप्ति होणार आहे, अशा अन्नादिकांच्या योगेंकरून. ऋ. ७. ८५. ४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'वृष्टि.' कितीएक पाश्चात्त्य विद्वान् येथें वृष्टि म्हणजे हविरन्नांची, सोमाहुतींची वगैरे जी विपुलता, ती असा अर्थ करितात, आणि आमची जी देवांस दिलेली आहुतिवृष्टि ती कल्याणकारक होओ, असें भाषांतर करूं इच्छितात.

वृत्तासाठीं 'दिव्या' बद्दल 'दिविआ' असें चवथ्या चरणांत वाचावें लागतें.

## सूक्तम् १५३.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । मित्रावरुणौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**यजामहे वां महः सजोषा हव्येभिर्मित्रावरुणा नमोभिः ।**
**घृतैर्घृतस्नू अध यद्वामस्मे अध्वर्यवो न धीतिभिर्भरन्ति ॥ १ ॥**

यजामहे । वाम् । महः । सऽजोषाः । हव्येभिः । मित्रावरुणा । नमःऽभिः ।
घृतैः । घृतस्नू इति घृतऽस्नू । अध । यत् । वाम् । अस्मे इति । अध्वर्यवः । न । धीतिऽभिः । भरन्ति ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे मित्रावरुणौ, सजोषाः (=सर्वेपि संगताः सन्तो) [वयं] हव्येभिः नमोभिः (=पुरोडाशादिभिर्हविर्भिः स्तोत्रैश्च) वां (=युवां) महः (=अत्यन्तं) यजामहे (=पूजयामः) । अध यत् (=यस्मात् कारणात्खलु) हे घृतस्नू (=घृतस्य स्रावयितारौ), अस्मे अध्वर्यवः न (=अस्माकमध्वर्यवोपि) घृतैः (=आज्याहुतिभिः) धीतिभिः (=यजनकर्मभिश्च) वां भरन्ति (=युवां पोषयन्ति) ॥

अत्र सायण एवं व्याख्यातवान् । हे घृतस्नू घृतस्य स्रावयितारौ मित्रावरुणौ महो महान्तौ वां यजामहे । पूजयामो यजमाना ऋत्विजश्च । कीदृशाः । सजोषाः । समानप्रीतियुक्ताः । केन साधनेनेति तदुच्यते । हव्येभिः । पुरोडाशादिभिर्नमोभिर्नमस्कारोपलक्षितैः । अध अपि च यद्यस्मात् कारणाद्वां युवामध्वर्यवोऽस्मदीया अध्वर्यवोऽपि । अत्र नशब्दोऽप्यर्थे । तेऽपि धीतिभिः स्वकीयैः कर्मभिर्भरन्ति पोषयन्ति । तस्माद्यजामहे । इति ॥

## सूक्त १५३.

**ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—मित्रावरुण. वृत्त—त्रिष्टुभ्.**

१. हे मित्रावरुण हो, आम्ही सर्वजण मिळून हव्यांच्या योगानें [ आणि ] स्तोत्रांच्या योगानें तुम्हांला अत्यंत भजत आहों. म्हणूनच हे घृतस्रावी [मित्रावरुण] हो, आमचे [ हे ] अध्वर्यु सुद्धा घृताहुतींनीं [ आणि ] यजनकर्मांनीं तुम्हांला तृप्त करीत आहेत.

## Hymn 153.

To *Mitra* and *Varuṇa*. By *Dirghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Trishṭubh*.

1. We, all combined, worship you intensely, O Mitra and Varuṇa, with oblations [and] hymns. It is, therefore, that our priests too, O you who are rich in clarified butter, are gratifying you with oblations of clarified butter [ and ] with pious works.

---

१. 'हे मित्रावरुण हो, आम्ही सर्व जण मिळून तुम्हांला हव्यें अर्पण करून आणि स्तोत्रें म्हणून मोठ्या प्रीतीनें भजत आहों, आणि आमचे हे अध्वर्यु घृताच्या आहुति देऊन तुम्हांस जसे काय पुष्ट करीत आहेत.'

'अत्यंत'='महः.' 'महः' हें येथें क्रियाविशेषण आहे. जसें 'महि' 'महत्,' तसेंच 'महः' हेंहि विशेषण असून क्रियाविशेषणाप्रमाणें योजिलें आहे.

'घृतस्रावी'='घृतस्नू.' म्हणजे घृतासारिखें जें मधुर आणि पुष्टिकारक मेघोदक, त्याचा वर्षाव करणारे. कितीएक पाश्चात्य पंडित तूप ज्यांच्या पाठीवर आहे ते, असा अर्थ करितात, पण त्याला सबळ आधार नाहीं असें वाटतें; आणि तो अर्थ बहुतेक स्थळीं जुळत नाहीं इतकें तरी खरें.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'वां'-च्या ठिकाणीं 'वाअं' असें म्हणावें.

**प्रस्तुतिर्वां धाम न प्रयुक्तिरयामि मित्रावरुणा सुवृक्तिः ।**
**अनक्ति यद्वां विदथेषु होता सुम्नं वां सूरिर्वृषणावियक्षन् ॥ २ ॥**

प्रऽस्तुतिः । वाम् । धाम । न । प्रऽयुक्तिः । अयामि । मित्रावरुणा । सुऽवृक्तिः ।
अनक्ति । यत् । वाम् । विदथेषु । होता । सुम्नम् । वाम् । सूरिः । वृषणौ । इयक्षन् ॥ २ ॥

**पीपाय धेनुरदितिर्ऋताय जनाय मित्रावरुणा हविर्दे ।**
**हिनोति यद्वां विदथे सपर्यन्त्स रातहव्यो मानुषो न होता ॥ ३ ॥**

पीपाय । धेनुः । अदितिः । ऋताय । जनाय । मित्रावरुणा । हविःऽदे ।
हिनोति । यत् । वाम् । विदथे । सपर्यन् । सः । रातऽहव्यः । मानुषः । न । होता ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे मित्रावरुणौ, [ इयं ] प्रस्तुतिः (=प्रकृष्टा स्तुतिः) [ इयं ] प्रयुक्तिः (=मनसः प्रयोगयुक्तं ध्यानम् ) [ इयं ] सुवृक्तिः (=शोभनं स्तोत्रं ) धाम न (=गृहमिव ) वां (=युवाभ्याम् ) अयामि (=अदायि मार्पितास्ति) । यत् (=यस्मात् कारणात्) हे वृषणौ (=वीर्यवन्तौ देवौ ), वां सुम्नम् इयक्षन् (=युवयोः सुखं प्राप्तुमिच्छन् ) [ अयं ] सूरिः (=विद्यारूपेण तेजसा युक्तो ) होता ( =अस्माकं मध्ये होतृनामक ऋत्विग् ) वां (=युवां ) विदथेषु (=यज्ञेषु ) अनक्ति (=व्यञ्जयति=पूजयति ) ॥

३. हे मित्रावरुणौ, ऋताय (=सत्याय ) हविर्दे (=हविषो दात्रे ) जनाय (=मनुष्याय ) धेनुः अदितिः पीपाय (=गौः अखण्डिता यथा भवति तथा पयसा पीना भवतु=सततं पयःपूर्णा भवतु ) । यत् (=यस्मात् कारणात् ) स [ होता ] (= ? अग्निर् ) मानुषो न होता रातहव्यः (=मनुष्यभूतो देवानामाह्वातेव दत्तहविष्कः सन् ) विदथे ( =यज्ञे ) सपर्यन् वां हिनोति ( =पूजयन् युवां प्रीणयति=पूजया युवां प्रसादयति ) ॥

सायणस्तु धेनुः प्रीणयित्री गौरदितिरदीना बहुक्षीरा सती पीपाय । क्षीरेण पुनःपुनराप्यायताम् ।...। पयस्यादिहविष्कं यज्ञं पयोव्रतादिषु यजमानं चेत्यर्थः । ...।

२. हे मित्रावरुण हो, तुम्हांकरितां [ ही ] सुस्तुति, [तुम्हांकरितां ] सुध्यान, [ तुम्हांकरितां ] सुंदर स्तोत्र, घराप्रमाणें, अर्पिलें आहे. कारण कीं हे वीर्यवंत [देव] हो, तुमचा प्रसाद मिळविण्याच्या इच्छेनें [ हा पहा ] आमचा विद्वान् होता तुम्हांला यज्ञांत भजत आहे.

३. हे मित्रावरुण हो, सत्यवान् [आणि] [तुम्हांला] हवि देणारा [ जो ] जन, [त्याच्या]साठीं गाय दुधानें अखंड भरलेली असो. कारण कीं हा [होता] मानवी होत्याप्रमाणें हवि देऊन यज्ञांत तुम्हांला पूजून प्रसन्न करीत आहे.

2. Here is offered, O Mitra and Varuṇa, like a home, a good praise, a good meditation, a good hymn unto you. For [this our ] brilliant invoker, desirous of obtaining your blessing, is, O brave [ gods ], worshipping you in the sacrifices.

3. May the milchcow be inexhaustibly filled with milk for the man who is righteous [ and ] who is a giver of oblation. For that [ invoker ] ( Agni ), having given the oblation, like a human invoker, is worshipfully propitiating you in the sacrifice.

---

२. 'हे मित्रावरुण हो, जींत घरीं निवास केल्याप्रमाणें तुम्हांस सुख होईल, अशी ही उत्तम स्तुति, हें उत्तम ध्यान आणि हें उत्तम स्तोत्र तुम्हांला अर्पण केलें आहे. कारण हा पहा आमचा 'होता' या नांवाचा ऋत्विज् तुम्हांकडून प्राप्त व्हावयाचें सुख प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें तुम्हांला या यज्ञात कसा भजत आहे.'

'सुध्यान'='प्रयुक्तिः.' हा शब्द कठिण आहे. सायणांकडून या ऋचेच्या संबंधानें साहाय्य मिळण्यासारिखें नाहीं. कदाचित् तुम्हांला येथें आणण्याकरितां घोड्यांची मालिका ( स्तुतिरूपच) असा कितीएक पाश्चात्त्य विद्वानांनीं सुचविलेला अर्थ केला पाहिजे. तथापि प्रयोगान्तरें पुष्कळ नसल्यामुळें अर्थनिर्णय निर्विवाद रीतीनें करण्यास अडचण आहे. असें आहे तरी स्तुति अथवा ध्यान या सारिखाच कांहीं तरी अर्थ केला पाहिजे असें वाटतें.

'घराप्रमाणें'='धाम न.' म्हणजे तुम्ही येऊन या स्तुतींत राहाल तर तुम्हांस तुमच्या घरीं राहिल्याप्रमाणें सुख होईल.

उत वां विक्षु मद्यास्वन्धो गाव आपश्च पीपयन्त देवीः ।
उतो नो अस्य पूर्व्यः पतिर्दन्वीतं पातं पयस उस्रियायाः ॥४॥२३

उत । वाम् । विक्षु । मद्यासु । अन्धः । गावः । आपः । च । पीपयन्त । देवीः ।

उतो इति । नः । अस्य । पूर्व्यः । पतिः । दन् । वीतम् । पातम् । पयसः । उस्रियायाः ॥ ४ ॥ २३ ॥

---

यत् यदा स प्रसिद्धो रातहव्य एतन्नामा राजा सपर्यन् स्तुत्या पूजयन् मानुषो होता न मनुष्यस्य यजमानस्य संबन्ध्येतन्नामक ऋत्विगिव विदथे यज्ञे वां हिनोति । हविरादिना प्रीणयति तदा पीपायेत्याह ॥

---

## भाषायाम्.

४. उत (=अपि च) [हे मित्रावरुणौ], वां मद्यासु विक्षु (=युवयोर्मदनीयासु प्रजासु=युवयोर्भक्तेषु=तेषां गृहेषु ) अन्धः (=अन्नं ) गावः आपश्च देवीः (=आपो देव्यश्च दिव्यान्युदकानि च ) पीपयन्त (=पुष्टा भवन्तु=समृद्धा भवन्तु ) । उतो (=अपि च ) नः (=अस्माकम् ) अस्य [ यजमानस्य ] पूर्व्यः (=पुरातनः ) पतिर्दन् (= ? पतिर्दम्=दंपतिः=गृहपतिरग्निः ) [ पीपयन्=पुष्टो भवतु ] । [ हे मित्रावरुणौ ], [ युवाम् ] उस्रियायाः पयसः (=गोः पयसो ) [ भागं ] वीतं पातं (=कामयेथां पिबतं च ) ॥

देवीर्द्योतनशीला गाव आपश्च व्रीह्यादिप्रवर्धकान्युदकानि च मद्यासु युष्माभिर्मदनीयासु विक्षु प्रजासु यजमानलक्षणासु तासामभिवृद्ध्यर्थं पीपयन्त । आप्याययन्तु । उतो अपि च नोऽस्मत्संबन्धिनोऽस्य यजमानस्य पूर्व्यः पूर्वकालीनः पतिः पालकोऽग्निर्दन् दाता भवत्विति शेषः । इत्यादि सायणः ॥

---

‘ अर्पिलें आहे ’=‘ अयामि.’ ‘यम्’ धातूचें रूप आहे. ‘ केलें आहे,’ अथवा ‘ सादर केलें आहे.’ ऋ. ७. ६४. ५ ( सोमः शुक्रो न वायवेऽयामि ) आणि त्यावरील भाष्य पहा.

‘ मिळविण्याच्या इच्छेनें ’=‘ इयक्षन्’ ऋ. २. २०. १ ‘ सुम्नम् इयक्षन्तः त्वावतः नॄन् ’ असें आहे त्यावरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ‘ वां’च्या ठिकाणीं ‘ वाअं ’ असें म्हणावें.

३. ‘ हे मित्रावरुण हो, हा आमचा अग्नि मानवी होत्याप्रमाणें तुम्हांला हविरन्न देऊन तुमची सेवा करून तुम्हांला

४. आणि [हे मित्रावरुण हो], तुमचे [ जे ] आनंदनीय यजमान लोक, [त्यां]च्या घरीं अन्न, गाई, [ आणि ] आपो देवी हीं समृद्ध असोत. आणि आमच्या या [यजमानां]चा [जो ] पुरातन घरधनी, [तो]हि [समृद्ध असो]. [तुम्ही] दुभत्या गाईचें [ हें ] दूध आवडीनें प्या.

4. And may food, cows and the divine waters be prosperous among your people who deserve to be cheered. And [may] the ancient Lord of the house ( Agni ) of this our [ sacrificer ] [ be prosperous ]. Love you [ and ] drink you of the milk of the milch-cow.

---

आम्हांविषयीं प्रसन्न करीत आहे. तर तुम्ही प्रसन्न होऊन गाई आम्हांसारिख्या हविर्दात्यांकारणें नित्य दुधानें भरलेल्या राहतील असें करा.'

यांत 'गाय' ( धेनुः ) सांगितली आहे ती कोणती तें स्पष्ट आणि निर्विवाद रीतीनें सांगवत नाहीं. लौकिक गाय घ्यावयाची असेल तर एकवचन चांगलेंसें जुळत नाहीं. मेघवृष्टिरूप समजावयाची की काय?

'हा [होता].' म्हणजे अग्नि घ्यावा. तसें न केल्यास 'मानुषो न होता' याचा निर्वाह बरोबर लागणार नाहीं.

सायणांनीं अर्थ निराळा केला आहे. भाषेखालीं पहा.

---

४. 'याप्रमाणें आम्हीं तुमची स्तुति केली आहे, तर हे मित्रावरुणहो, तुमचे जे सेवक, त्यांच्या घरीं अन्न, पाणी, आणि गुरेंढोरें हीं समृद्ध असोत. आणि हा जो आमचा यजमान, त्याचे घरीं अग्नि नित्य पूजिला जाऊन प्रसन्न राहो. तर हे मित्रावरुणहो, तुम्ही हें आम्हीं अर्पिलेलें गाईचें दूध आवडीनें प्या' असा ह्या उपसंहारमंत्राचा भावार्थ आहे.

'आनंदनीय'=' मद्यासु.' म्हणजे ज्यांस तुम्ही आनंदित करणें योग्य होय ते, असें सायण म्हणतात तेंच घ्यावें, दुसरा निर्वाह दिसत नाहीं.

'आपो देवी'='आपो देवीः' म्हणजे 'उदकें,' पाणी. बहुत करून आपो देवी म्हणजे मेघोदकें असा अर्थ असतो, पण येथें केवळ पाणी इतकेंच विवक्षित दिसतें.

'पुरातन घरधनी'='पूर्व्यः पतिर्दन्.' म्हणजे अग्नि. पतिर्दन् हें पदद्वय कठिण आहे. परंतु आम्ही पाश्चात्त्यांस अनुसरून 'दंपति' या अर्थी त्याचा प्रयोग आहे असें समजून निर्वाह केला आहे. सायणाचार्य तरी 'पतिः' म्हणजे अग्नि असाच

## सूक्तम् १५४.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । विष्णुर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**विष्णोर्नु कं वीर्याणि प्र वोचं यः पार्थिवानि विममे रजांसि ।**
**यो अस्कभायदुत्तरं सधस्थं विचक्रमाणस्त्रेधोरुगायः ॥ १ ॥**

विष्णोः । नु । कम् । वीर्याणि । प्र । वोचम् । यः । पार्थिवानि ।
विऽममे । रजांसि ।
यः । अस्कभायत् । उत्ऽतरम् । सधऽस्थम् । विऽचक्रमाणः । त्रेधा ।
उरुऽगायः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. नु कम् (=इदानीं खलु) विष्णोर्वीर्याणि (=विष्णोश्चरितानि पराक्रमपूर्णानि) प्र वोचं (=प्रकर्षेण वदानि) । यो [विष्णुः] पार्थिवानि रजांसि (=पार्थिवान् लोकान्=पृथिवीसंबन्धीनि सर्वाण्यपि स्थलानि) विममे (=पद्भ्यामाक्रमति) । उरुगायः (=पृथुक्रमो) यश् [च] त्रेधा विचक्रमाणः (=त्रिः पृथुतमानि पदान्यस्यन्) [सन्] उत्तरं सधस्थम् (=उच्चैस्तमं स्थलं स्वर्गरूपम्) अस्कभायत् (=स्कम्भितवान्=यथाधो न पतति तथा धारयति) ॥

वीर्याणि वीरकर्माणि ...... । उत्तरमुद्गततरमतिविस्तीर्णं सधस्थं सहस्थानं लोकत्रयाश्रयभूतमन्तरिक्षम्...... यद्वा ...उत्तरमुद्गततरमुत्तरभाविनं सधस्थं सहस्थानं पुण्यकृतां सहनिवासयोग्यं भूरादिलोकसप्तकम् ...... यद्वा ... उत्तरमुत्कृष्टतरं सर्वेषां लोकानामुपरिभूतम् । अनुपरावृत्तेस्तस्योत्कृष्टत्वम् । सधस्थमुपासकानां सहस्थानं सत्यलोकम् अस्कभायत् । स्कम्भितवान् । ध्रुवं स्थापितवानित्यर्थः । ...... उरुगायः उरुभिर्महद्भिर्गीयमानः । अतिप्रभूतं गीयमानो वा । ...इत्यादि सायणः ॥

---

अर्थ करितात, पण 'दन्' म्हणजे मात्र 'दाता' असा अर्थ करून 'होओ' इतकें अध्याहृत घेतात. सू. १४९ मं. १ आणि त्याजवरील भाषा पहा. पतिर्दन् हे शब्द नित्य पादाच्या अंतींच येत असतात, त्यामुळें वृत्तानुरोधें करून 'दंपतिः' असें म्हणण्याच्या जागीं 'पतिर्दन्' असें म्हटलें असेल असें संभवतें खरें. 'दंपति' असें अग्नीला ज्यांत म्हटलें आहे असे मंत्र वेदांत आहेत. उदाहरणार्थः 'तं त्वा सुशिप्र दंपते' (ऋ. ५. २२. ४), आ तू सुशिप्र दंपते (ऋ. ८. ६९. १६) इत्यादि. 'पतिर्दन्' हें पदद्वय पादाचे अंतीं मात्र येतें आणि जेथें

## सूक्त १५४.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—विष्णु. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. आतां मी विष्णूचे पराक्रम गातों. जो [विष्णु] सर्व पृथिवीचें आक्रमण करितो, [आणि] जो अत्युच्च [स्वर्ग]स्थानाला सांवरून धरितो. लांब पावलांचा [विष्णु] तीनदा पावलें टाकणारा [होय].

## HYMN 154.

To *Vishṇu*. By *Dîrghatamas*, son of *Uchathya*. Metre—*Trishṭubh*.

1. Let me now proclaim the exploits of Vishṇu, who walks over all the mundane spaces; [and] who upholds the highest heaven,—[Vishṇu] of long steps, walking over all space in three paces.

---

जेथें आलें आहे तेथें ' दंपतिः ' हें पद घालतां आलें नसतें.

वृत्तानुरोधेंकरून पहिल्या पादांत ' मदिआसु,' आणि तिसऱ्यांत 'पूर्विअः' असें म्हणावें लागतें.

---

१. हें सूक्त विष्णूविषयीं आहे. वेदांत विष्णु म्हणजे सूर्यरूपीच देवता होय अशा समजुतीनें त्याविषयीं वर्णन केलें आहे. सू. २२ मं. १६ याजवरील टीप पहा. या प्रस्तुत मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, ' आतां मी विष्णूचीं चरितें सांगावयास आरंभ करितों. तीं हीं कीं, तो तीन पावलांनीं या विस्तीर्ण सर्व पृथ्वीचें आक्रमण करितो, म्हणजे पावलें मोजून टाकिल्याप्रमाणें तीन पावलें टाकितो, आणि त्यांत सर्व पृथिवी येऊन जाते. तो सर्व स्थळीं पर्यटन करितो. आणि तो सर्वांत उंच जो स्वर्ग त्याला अंतराळीं धारण करून खालीं पडूं देत नाहीं. '

'सर्व पृथिवीचें आक्रमण करितो'='पार्थिवानि रजांसि विममे.' अक्षरशः अर्थ पृथिवी संबन्धि जे प्रदेश, त्याजवर मोजून पावलें टाकिल्याप्रमाणें टाकितो आणि ते सर्व आपल्या पावलाच्या आंत घेतो.

' अत्युच्च [ स्वर्ग ] स्थानाला '='उत्तरं सधस्थम्' म्हणजे अति उंच जें पुण्यवंतांचें राहण्याचें स्थळ, तें आकाशांत अंतराळीं धरून राहतो. सधस्थ हा शब्द ऋग्वेदांत बऱ्याच स्थळीं आला आहे; आणि त्याचा अक्षरशः अर्थ, जेथें सर्व लोक मिळून राहतात तें स्थळ असा आहे; त्यावरून सभा, आसन. नंतर उत्तरं सधस्थम्, परमं सधस्थम् इत्यादिक शब्दांनीं अंतरिक्ष अथवा

प्र तद्विष्णुः स्तवते वीर्येण मृगो न भीमः कुचरो गिरिष्ठाः ।
यस्योरुषु त्रिषु विक्रमणेष्वधिक्षियन्ति भुवनानि विश्वा ॥ २ ॥

प्र । तत् । विष्णुः । स्तवते । वीर्येण । मृगः । न । भीमः । कुचरः । गिरिऽस्थाः ।
यस्य । उरुषु । त्रिषु । विऽक्रमणेषु । अधिऽक्षियन्ति । भुवनानि । विश्वा ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. यस्य उरुषु ( =पृथुषु ) त्रिषु विक्रमणेषु ( =विक्रमणस्थलेषु=पदेषु ) विश्वा भुवनानि (=विश्वानि भुवनानि=सर्वाणि भुवनानि पृथिव्यादीनि ) अधिक्षियन्ति (=निवसन्ति ) [ स ] मृगो न भीमः (=मृग इव भयंकरः) कुचरः (=कुत्सितसंचारः=कुत्सितेषु विषमस्थलेषु संचारी ) गिरिस्थाः (=पर्वतनिवासी=पर्वतवदुन्नततरस्थलनिवासी ) विष्णुः तत् वीर्येण (=तेन वीर्येण तद्रूपेण उक्तरूपेण चरितेन ) प्रस्तवते (=प्रस्तूयते=प्रकर्षेण स्तूयते )॥

---

स्वर्ग असा अर्थ व्यक्त करण्याची चाल पडली. प्रस्तुत स्थळीं अंतरिक्ष अथवा स्वर्ग असा अर्थ विवक्षित दिसतो.

' लांब पावलांचा '='उरुगायः म्हणजे दूर दूर पावलें टाकून एका दिवसांत सर्व पृथिवीला पर्यटित करणारा. हा अर्थ आम्हीं ऋ. ६. २८. ४ याजवरील सायणभाष्याच्या आधारें केला आहे. ऋ. ८. २९. ७ हेंहि स्थळ पहा. प्रस्तुत स्थळीं आणि दुसऱ्या कितीएक मंत्रांतहि सायणाचार्य ' पुष्कळ लोक ज्याची कीर्ति गातात' असा अर्थ करितात, पण त्यापेक्षां हा अर्थ चांगला जुळतो.

या सर्व सूक्ताचा पाठ ' शांतिसूक्त,' 'दुष्टजननशांति,' ' विष्णुसूक्त, ' ' कौतुकबन्धन, ' ' ग्रहयज्ञ, ' आणि 'विष्णुबलि,' म्हणून जी करितात, त्यांत विष्णूच्या संबंधानें म्हणत असतात.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' वीरिआणि ' आणि चवथ्यांत ' त्रेधा 'च्या ठिकाणी ' तिरेधा ' असें म्हणावें लागतें.

२. ज्याच्या तीन लांब पावलांमध्यें सकल भुवनें वास करितात तो, [ एकाद्या ] भयंकर श्वापदाप्रमाणें विकट संचार करणारा [आणि] पर्वता[सारिख्या उंच] स्थळीं राहणारा विष्णु, [त्याच्या] चरिताच्या योगेंकरून, स्तविला जातो.

2. Vishṇu who, like some wild animal, is terrible, traverses vast regions, [and] dwells in mountains, [ and ] within whose three steps all the worlds dwell, is celebrated through his exploit.

२. 'विष्णु हा एकाद्या श्वापदाप्रमाणें भयंकर आणि खळग्याकोपऱ्यांतून व खडकावरून उड्या मारणारा आणि पर्वतांवर वास करणारा आहे; आणि त्याचीं जीं तीन पावलें, त्याला जितकी जागा लागते तितक्या जागेंत सकळ भुवनांचा समावेश होत असतो. तर हा जो विष्णूचा महा पराक्रम, त्याच्या योगानें त्याची प्रख्याति लोक गातात.'

'तीन पावलांमध्यें'=' त्रिषु विक्रमणेषु.' म्हणजे सकाळीं उदय होतो. दोनप्रहरीं मध्याह्नीं चढतो, आणि संध्याकाळीं मावळतो, तींच कोणी तीन पावलें, त्यांच्याखालीं जी जागा मावते त्या जागेंत असें तात्पर्य.

'[ एकाद्या ] भयंकर श्वापदाप्रमाणें' =' मृगो न भीमः.' म्हणजे सिंहादिक पशूप्रमाणें असें सायण म्हणतात. ऋषीचें हृद्ग असें आहे कीं, जसा सिंहादिक पशु एकाद्या उंच पर्वतावर राहतो, आणि विकट खडकांवरून उड्या मारितो, तसा सूर्य आपल्या मार्गांत कठिण कठिण उंच सखल प्रदेश आले तरी एकसारिखा जात असतो आणि पर्वतांप्रमाणें जे उंच आणि खडकाळ मेघ त्यांजवर राहतो.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'वीरिएण' म्हणावें आणि तिसऱ्या आणि चवथ्या चरणांमध्यें संधि करूं नये.

**प्र विष्ण॑वे शू॒षमे॑तु॒ मन्म॑ गिरि॒क्षित॑ उरुगा॒याय॒ वृष्णे॑ ।**
**य इ॒दं दी॒र्घं प्रय॑तं स॒धस्थ॒मेको॑ विम॒मे त्रि॒भिरित्प॒देभिः॑ ॥ ३ ॥**

प्र । विष्ण॑वे । शू॒षम् । ए॒तु॒ । मन्म॑ । गि॒रि॒ऽक्षितै॑ । उ॒रु॒ऽगा॒याय॑ । वृष्णे॑ ।

यः । इ॒दम् । दी॒र्घम् । प्रऽय॑तम् । स॒धऽस्थ॑म् । एकः॑ । वि॒ऽम॒मे । त्रि॒ऽभिः॑ । इत् । प॒देभिः॑ ॥ ३ ॥

**यस्य॒ त्री पू॒र्णा मधु॑ना प॒दान्यक्षी॑यमाणा स्व॒धया॒ मद॑न्ति ।**
**य उ॑ त्रि॒धातु॑ पृथि॒वीमु॒त द्यामेको॑ दा॒धार॒ भुव॑नानि॒ विश्वा॑ ॥ ४ ॥**

यस्य॑ । त्री । पू॒र्णा । मधु॑ना । प॒दानि॑ । अक्षी॑यमाणा । स्व॒धया॑ । मद॑न्ति ।

यः । ऊं॒ इति॑ । त्रि॒ऽधातु॑ । पृ॒थि॒वीम् । उ॒त । द्याम् । एकः॑ । दा॒धार॑ । भुव॑नानि । विश्वा॑ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. शूषं मन्म (=बलं स्तोत्रं च=बलकारि स्तोत्रम्=अस्माभिः क्रियमाणं बलदायकं स्तोत्रं ) गिरिक्षिते ( =पर्वतनिवासिने ) उरुगायाय (=पृथुगमनाय ) वृष्णे ( =सेचनसमर्थाय=वीर्यवते ) विष्णवे प्र एतु (=प्रगच्छतु=प्राप्नोतु ) यो [ विष्णुः ] इदं दीर्घं ( =पृथु ) प्रयतं ( =प्रकर्षेण विस्तीर्णं ) सधस्थं ( =स्थानं त्रिभुवनरूपम् ) एकः ( =अद्वितीयस् ) त्रिभिः इत् पदेभिः ( =त्रिभिरेव पदैः पदक्षेपणैः ) विममे (=आक्रमति ) ॥

शूषमस्मत्कृत्यादिजन्यं महद्बलत्वं मन्म मननं स्तोत्रम् । मननीयं शूषं बलं वा...। उरुगायाय । बहुभिर्गीयमानाय । ... सधस्थं लोकत्रयम् । इत्यादि सायणः ॥

४. यस्य [ विष्णोर् ] मधुना ( =मधुररसेन अमृतेन ) पूर्णा ( =पूर्णानि ) त्री (=त्रीणि ) पदानि (=पदप्रक्षेपणस्थानस्था लोका ) अक्षीयमाणा (=अक्षीयमाणानि=क्षयरहितानि सन्ति ) स्वधया मदन्ति (=अन्नेन तैर्नित्यं भुज्यमानेनान्नेन अमृतरूपेण आत्मानं मादयन्ति ) । य उ (=यश्च ) पृथिवीम् उत द्यां (=पृथिवीं द्युलोकं च ) [ अन्तरिक्षं च ] [ एवं ] भुवनानि विश्वा (=विश्वानि भुवनानि=सर्वानपि लोकान् ) त्रिधातु (=त्रिप्रकारं ) दाधार (=दधार=धारयति ) ॥

३. पर्वतावर राहणारा, लांब पावलांचा [ आणि ] शूर अशा विष्णूप्रत बळ [ आणि ] स्तोत्र प्राप्त होओत. जो [विष्णु ] हें विस्तीर्ण [ आणि ] पसरलेलें भुवन, एकटा तीन पावलांनीं आक्रमितो.

४. ज्याचीं मधुररसानें भरलेलीं तीन अक्षय पावलें दिव्य अन्नानें आनंद पावतात. आणि जो एकटा पृथिवीला आणि द्युलोकाला [ आणि ] सकल भुवनांला तीन प्रकारांनीं धारण करितो.

3. Let power [ and ] prayer go to Vishṇu who lives in the mountains, who makes long strides, who is brave; who alone measures this long [ and ] extended space with only three steps.

4. Whose three steps filled with nectar [ and ] indestructible, enjoy themselves with ambrosia; and who upholds the earth and the heaven [ and ] all the worlds in a three-fold manner.

---

३. 'जो विष्णु दूरदूर पावलें टाकितो, जो पर्वतावर राहणारा, जो पराक्रमी, आणि जो तीनच पावलांनीं सर्व त्रिभुवन मोजून जणुं टाकितो, म्हणजे आक्रमण करितो, त्याजप्रत हें आमचें स्तोत्र जाओ आणि तेणेंकरून त्याला बळ प्राप्त होओ ' असा अर्थ आहे.

' बळ आणि स्तोत्र '=' शूषं मन्म. ' म्हणजे जेणेंकरून बळ प्राप्त व्हावयाचें असें हें आमचें स्तोत्र. कितीएक पाश्चात्त्य पंडित ' मोठ्यानें म्हटलेलें ' असा ' शूषम् ' शब्दाचा अर्थ करितात. पण त्याला चांगला आधार दिसत नाहीं.

वरच्या दोन ऋचांत आणि पुढच्या ऋचेंत जो विष्णूचा पराक्रम वर्णिला आहे, तोच तीन पावलांचा पराक्रम या ऋचेंत आहे. इंद्राचा जसा वृत्राला मारून मेघोदकरूप गाईची सुटका केल्याविषयींचा पराक्रम इंद्राविषयींच्या सूक्तांत जिकडे तिकडे येतो, तसा विष्णूविषयींच्या सूक्तांत हा तीन पावलांनीं त्रिभुवन ( द्यु, अंतरिक्ष आणि पृथिवी ) आक्रमिल्याविषयींचा पराक्रम जिकडे तिकडे येत असतो.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' प्र विष्णवे, ' आणि दुसऱ्यांत ' वृष्णे 'च्या जागीं ' वृषणे ' असें वाचावें लागतें.

४. ' विष्णु ज्या ज्या लोकांमधून जातो, ते ते स्वर्ग अंतरिक्ष इत्यादिकांतील असून तेथें नित्य अमृत भरलेलें असतें; तें भक्षण करून ते नित्य राहतात, त्यांला क्षय नाहीं. आणि विष्णु पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक ह्या तिहींसहि आपआपल्या ठिकाणीं ठेवून खालीं पडूं देत नाहीं. '

**तद॑स्य प्रि॒यम॒भि पाथो॑ अश्यां॒ नरो॒ यत्र॑ देव॒यवो॒ मद॑न्ति ।**
**उ॒रु॒क्र॒मस्य॒ स हि बन्धु॑रि॒त्था विष्णोः॑ प॒दे प॑र॒मे मध्व॒ उत्सः॑॥५॥**

तत् । अ॒स्य॒ । प्रि॒यम् । अ॒भि । पाथः॑ । अ॒श्या॒म् । नरः॑ । यत्र॑ । दे॒व॒ऽयवः॑ । मद॑न्ति ।
उ॒रु॒ऽक्र॒मस्य॑ । सः । बन्धुः॑ । इ॒त्था । विष्णोः॑ । प॒दे । प॒र॒मे । मध्वः॑ । उत्सः॑ ॥ ५ ॥

पृथिवीस्थाने पृथिवीं नीचैस्तमां ततोऽन्तरिक्षं ततोपि द्योचैस्तरां द्यामिति त्रिप्रकारं त्रीन् लोकान् स्वस्वस्थानेषु धारयति न पातयतीत्यर्थः ॥

पृथिवीं प्रख्यातां भूमिं द्यामुत द्योतनात्मकमन्तरिक्षं च विश्वा भुवनानि सर्वाणि भूतजातानि चतुर्दशलोकांश्च । यद्वा पृथिवीशब्देनाधोवर्तीनि अतलवितलादिसप्तभुवनान्युपात्तानि । द्युशब्देन तदवान्तररूपाणि भूरादिसप्तभुवनानि । एवं चतुर्दश लोकान् विश्वा भुवनानि सर्वाण्यपि तत्रत्यानि भूतजातानि त्रिधातु ...... पृथिव्यप्तेजोरूपधातुत्रयविशिष्टं यथा भवति तथा दाधार । धृतवान् । ...... उत्पादितवानित्यर्थः । इति सायणः ॥

## भाषायाम्.

५. यत्र [पाथसि] (=यस्मिन् स्वर्गस्थले) देवयवो नरः (=देवान् आत्मन इच्छन्तः=देवान् कामयमानाः प्रेता मनुष्या) मदन्ति (=आत्मानममृतेन मादयन्ति=सुखयन्ति) तत् उरुक्रमस्य (=पृथुपदस्य) अस्य [विष्णोः] पाथः (=स्वर्गस्थानम्) अभि अश्याम् (=आभिमुख्येन प्राप्नुयाम्) । स हि इत्था बन्धुः (=यस्मात् कारणात् स सत्यो बन्धुर्) [भवति] । विष्णोः परमे पदे (=उत्तमे उन्नततमे स्थाने) मध्वः (=मधुररसस्यामृतस्य) उत्सः (=निष्पन्दो) [वर्तते] ॥

पाथः । अन्तरिक्षनामैतत् । पाथोन्तरिक्षं यथा व्याख्यातम् । इति यास्केनोक्तत्वात् । अविनश्वरं ब्रह्मलोकमित्यर्थः । ...... मध्वो मधुररसस्योत्सो निष्यन्दो वर्तते । तदश्याम् । यत्र क्षुत्तृष्णाजरामरणपुनरावृत्त्यादिभयं नास्ति संकल्पमात्रेणामृतकुल्यादिभोगाः प्राप्यन्ते तादृशमित्यर्थः । इति सायणः ॥

'मधुररसानें'=' मधुना.' म्हणजे अमृतरसानें. 'स्वधया' म्हणून जो शब्द पुढें आहे त्याचा तरी अर्थ हाच आहे. जो अमृतरस तीच 'स्वधा,' अथवा त्यांचें अन्न, असें विवक्षित आहे.

'पावलें'=' पदानि' म्हणजे पाव-

५. जेथें पुण्यवंत मनुष्य आनंदानें राहतात, तें या लांब पावलांच्या [विष्णू]चें प्रिय स्वर्गस्थान मला प्राप्त होओ. कारण कीं तो खरोखर बंधु [ होय ]. विष्णूच्या अत्यंत उंच स्थळीं मधुर [अमृता]चा झरा [आहे].

5. May I obtain that heavenly seat dear to this long-strided [ god ], where the god-loving men live in happiness. For he is truly a brother. In Vishnu's highest seat there is a spring of nectar.

वळें ज्यावरून जातात त्या प्रदेशांतील लोक. म्हणजे द्युलोक आणि अंतरिक्ष यांत राहणारे देव आणि पुण्यवंत प्राणी मरणानंतर तेथें गेलेले.

'पृथिवीला आणि द्युलोकाला आणि सकळ भुवनांला' म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष, आणि द्युलोक हीं जीं त्रिभुवनें त्यांला आपआपल्या ठिकाणी ठेवितो; पृथिवीला खालीं, नंतर अंतरिक्षाला, नंतर द्युलोकाला याप्रकारें करून तीन स्थळीं, असें तात्पर्य.

वृत्तासाठीं पहिला आणि दुसरा या चरणांमध्यें संधि न करणें हें अवश्य आहे.

५. 'विष्णूचें अत्यंत उंच पाऊल जेथें पडतें, म्हणजे अत्यंत उंच जें स्वर्गरूप स्थळ, त्यांत पुण्यवंत प्राणी ( म्हणजे देवांला यज्ञादि अर्पण करून मेलेले जन) सुख भोगीत असतात. तेथें अमृताचे झरे वाहतात. आणि त्याची इतकी कृपा पुण्यवंतांवर होते यांत नवल नाहीं, कारण कीं तो खरा बंधु होय. तर तें त्याचें स्थान मला प्राप्त होओ,' असा अभिप्राय आहे.

'पुण्यवंत मनुष्य'='नरो देवयवः.' म्हणजे देव ज्यांस आवडत होते, आणि ज्यांनीं देवांसाठीं यज्ञ केले आणि नंतर मेले, ते लोक तेथें जाऊन राहतात, असें तात्पर्य. यावरून सिद्ध होतें कीं, आमचे आर्य पूर्वज यांचा विश्वास असा असे कीं, पुण्यवंत प्राणी मेल्यानंतर स्वर्गी जात आणि तेथें अमृताचे झरे असत त्यांचें अमृत पीत असत. मेल्यानंतर पुनर्जन्म आणि पुनर्मरण होतें इत्यादिक त्यांचा विश्वास असे कीं नाहीं याविषयीं संशय आहे. मेल्यानंतर मात्र सुखी अशा स्वर्गस्थळीं जातात असें मानीत, असें या सूक्तावरून आणि इतर वेदमंत्रांवरून उघड होतें.

'विष्णूच्या अत्यंत उंच स्थळीं'='विष्णोः परमे पदे.' अक्षरशः अर्थ जरी मध्याह्नीं सूर्य जेथें चढतो तें स्थान 'विष्णूचें अत्यंत उंच स्थळ' होय, तथापि येथें स्वर्गीचा जो अत्युच्च प्रदेश तो विवक्षित आहे यांत संशय नाहीं.

**ता वां वास्तून्युश्मसि गमध्यै यत्र गावो भूरिशृङ्गा अयासः ।**
**अत्राह तदुरुगायस्य वृष्णः परमं पदमव भाति भूरि ॥ ६॥ २४॥**

ता । वाम् । वास्तूनि । उश्मसि । गमध्यै । यत्र । गावः । भूरिऽशृङ्गाः । अयासः ।
अत्र । अह । तत् । उरुऽगायस्य । वृष्णः । परमम् । पदम् । अव । भाति । भूरि ॥ ६ ॥ २४ ॥

---

## भाषायाम्.

६. [ हे पत्नीयजमानौ ], यत्र भूरिशृङ्गासः (=अत्यन्तोन्नतशृङ्गा ) अयासः (=गन्तारः=गमनशीला ) गावः (=किरणरूपा गावः ) [ सन्ति ] ता वास्तूनि (=तानि वास्तूनि=तानि स्थानानि ) वां गमध्यै उश्मसि (=युवां गन्तुम् उश्मः=इच्छामः= युवां तानि स्थानानि गमनाय प्रार्थयामहे ) । अत्राह (=तत्र खलु) उरुगायस्य (=उरुक्रमस्य=पृथुपदस्य ) वृष्णः (=वीर्यवतः=वीरस्य ) परमं पदम् (=अत्यन्तमुन्नततमं स्थानं ) भूरि (=अत्यन्तम् ) अव भाति (=प्रकाशते ) ॥

वास्तूनि सुखनिवासयोग्यानि स्थानानि । ... अत्राह अत्र खलु वास्त्वाधारभूते द्युलोके ... । भूरि अतिप्रभूतमवभाति । स्वमहिम्ना स्फुरति । अयं मन्त्रो यास्केन गोशब्दो रश्मिवाचक इति व्याचक्षाणेन व्याख्यातः । तानि वां वास्तूनि कामयामहे गमनाय यत्र गावो भूरिशृङ्गा बहुशृङ्गा भूरीति बहुनो नामधेयं प्रभवतीति... अयासोऽयनाः । तत्र तदुरुगायस्य विष्णोर्महागतेः परमं पदं परार्ध्यस्थमवभाति भूरि ... । नि० २. ७. । इति । इति सायणः ॥

६. [ हे पत्नीयजमान हो ], जेथें लांब शिंगांच्या [आणि] चपलगामी गाई असतात, त्या स्थळीं तुम्ही जावें अशी आम्ही प्रार्थना करीत आहों. तेथें तें लांब पावलांच्या वीर्यवान् [विष्णू]चें अत्यंत उंच स्थळ अत्यंत प्रकाशत असतें.

6. We pray you may go to that place where there are swift cows having long horns. Here, indeed, shines brilliantly that highest step of the long-strided hero.

६. ज्या यजमानाकरितां हें सूक्त म्हटलें जात आहे, त्याला आणि त्याच्या स्त्रियेला वक्ता म्हणतो, ' हे पत्नीयजमान हो, जेथें मोठमोठ्या शिंगांच्या आणि फार दूर जाणाऱ्या गाई राहतात, तें विष्णूचें अत्युच्च स्थान होय; म्हणजे जेथें किरणरूप गाई असतात, असा जो द्युलोकाचा अत्यंत प्रकाशमान प्रदेश, त्याला विष्णूचें अत्युच्च स्थान असें म्हणतात. तर तुम्ही तेथें जावें अशी आम्ही प्रार्थना करीत आहों, ती आमची सफल होओ. '

' लांब शिंगांच्या आणि चपल गाई.' म्हणजे ' किरण ' होत असें जें सायणाचार्य आणि यास्क म्हणतात, तेंच कवीचें हृद्य दिसतें. यावरून उघड होतें कीं, जो द्युलोकाचा अति उंच प्रदेश आणि ज्यांत किरण भरलेले असतात, तें अत्यंत अभिलषणीय स्वर्गस्थान होय, आणि तेथं जाणें हेंच सर्व कर्मांचें आणि मनोरथांचें सार्थक होय, असें आपले आर्यपूर्वज मानित असतात. त्यांचा स्वर्ग म्हणजे हिमालयाचें एक शिखर होय असा एकादा कैलासादिक डोंगर नसे, अथवा दुसरें एकादें भूमीवरचें स्थळ नसे. तर त्यापासून फार दूर आणि अत्यंत उंच असा असे.

वृत्तासाठीं ' वास्तूनि उश्मनि' असें म्हणावें लागतें.

## सूक्तम् १५५.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । विष्णुर्देवता । आद्यस्य तृचस्य इन्द्राविष्णू देवता । जगती छन्दः ।

**प्र वः पान्तमन्धसो धियायते महे शूराय विष्णवे चार्चत ।**
**या सानुनि पर्वतानामदाभ्या महस्तस्थतुरर्वतेव साधुना ॥ १ ॥**

प्र । वः । पान्तम् । अन्धसः । धियाऽयते । महे । शूराय । विष्णवे । च । अर्चत ।
या । सानुनि । पर्वतानाम् । अदाभ्या । महः । तस्थतुः । अर्वताऽइव । साधुना ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे ऋत्विजः ], वः अन्धसः पान्तं (=युष्माकं सोमलक्षणस्य पेयस्य पानं ) धियायते (=स्तुतीरिच्छते ) महे (=महते ) शूराय [ इन्द्राय ] विष्णवे च प्रार्चत (=प्रकर्षेण संपादयत=प्रार्पयत ) । या ( =यौ=उभाविन्द्राविष्णू ) साधुना अर्वतेव अभिमतदेशप्रापणसमर्थेनाश्वेनेव ) [ गत्वा ] पर्वतानां सानुनि (=पर्वतसदृशोन्नततमप्रदेशानां समुच्छ्रितप्रदेशे ) अदाभ्या ( =अदाभ्यौ=परैरनभिभाव्यौ सन्तौ ) महः (=महद् यथा तथा=उच्छ्रितं यथा तथा ) तस्थतुः (=तिष्ठतः ) ॥

सायणस्तु हे अध्वर्य्वादयः वो युष्माकं संबन्धि पान्तं पालनस्वभावं पातव्यं वान्धसोऽन्धः सोमरूपमन्नं प्रार्चत । प्रकर्षेण संपादयत । ...... पर्वतानाम्......उक्तलक्षणानां लोकानां सानुनि समुच्छ्रितप्रदेशे ...... । अथवा मेघानां समुच्छ्रितप्रदेशे । इति सायणः ॥

## सूक्त १५५.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—विष्णु. पण पहिल्या तीन ऋचा विष्णु आणि इंद्र या दोघांविषयीं आहेत. वृत्त—जगती.

१. [ हे ऋत्विज हो ], तुमचें [ हें ] सोमाचें पेय स्तुतींची इच्छा करणाऱ्या, महान्, [ आणि ] शूर [ इंद्रा ]ला आणि विष्णूला अर्पण करा. जे दोघेहि, विनचूक जाणाऱ्या घोड्याच्या योगानें [ गेल्या ]प्रमाणें [ जाऊन ], पर्वतांच्या शिखरावर उंच [ आणि ] कोणीहि उपद्रव करण्यास अशक्य अशा रीतीनें उभे राहतात.

## HYMN 155.

To *Vishṇu* ( but verses 1-3 are about *Indra* and *Vishṇu* ). By *Dîrghatamas*, the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. Offer your drink of Soma to the great hero ( Indra ) who is fond of praises, and to Vishṇu; who, as by a noble horse, [ reach and ] stand high on the ridge of the mountains, free from all injury.

---

१. ह्या सूक्ताच्या पहिल्या तीन ऋचा इंद्र आणि विष्णु या दोघांविषयीं आहेत. 'हे ऋत्विज हो, तुम्हीं आपलें सोमरूपी जें पेय तें स्तुतिप्रिय, मोठा आणि शूर जो इंद्र, त्याला आणि विष्णूला अर्पण करा. जे इंद्र आणि विष्णु, एकाग्रा जातिवान घोड्यावर बसून उडून गेल्याप्रमाणें जाऊन पर्वतां सारिखे जे मेघ, त्यांच्या शिखरावर जाऊन उंच बसलेले आहेत; आणि तेथें त्यांस कोणीहि उपद्रव करूं शकत नाहींत,' असा या पहिल्या मंत्राचा भावार्थ आहे.

'सोमाचें पेय'=' अन्धसः पान्तम्' 'अन्धः' आणि 'पान्तम्' या दोन्ही शब्दांविषयीं सू. १२२ मं० १ आणि टीप पहा.

'स्तुतींची इच्छा करणाऱ्या'=' धियायते.' म्हणजे स्तुति ज्याला आवडतात त्याला.

'पर्वतांच्या शिखरावर'=' पर्वतानां सानुनि.' म्हणजे पर्वतांप्रमाणें जे दिसत असतात, अशा मेघांच्या शिखरावर. संध्याकाळच्या वेळीं मेघमंडळाकडेस ज्यांनीं लक्षपूर्वक पाहिलें असेल, त्यांस हें नांव मेघांला चांगलें शोभतें असें सहज समजेल.

'उंच'=' महः' हें आम्ही क्रियाविशेषण आहे असें समजतों.

**त्वेषमित्था समरणं शिमीवतोरिन्द्राविष्णू सुतपा वामुरुष्यति ।**
**या मर्त्याय प्रतिधीयमानमित्कृशानोरस्तुरसनामुरुष्यथः ॥ २ ॥**

त्वेषम् । इत्था । सम्ऽअरणम् । शिमीऽवतोः । इन्द्राविष्णू इति । सुतऽपाः । वाम् । उरुष्यति ।
या । मर्त्याय । प्रतिऽधीयमानम् । इत् । कृशानोः । अस्तुः । असनाम् । उरुष्यथः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. हे इन्द्राविष्णू, शिमीवतोः (=प्रहरणादिकर्मवतोर्) वां (=युवयोर्) इत्था (=सत्यमेव) त्वेषं (=प्रदीप्तं) समरणं (="सम्यक् परस्परगमनोपेतं वृष्टिप्रदानाय मेघविदारणरूपं") सुतपाः (=सोमपा उपासक) उरुष्यति (=रक्षति)। या (=यौ) [युवाम्] अस्तुः (=बाणप्रक्षेप्तुः) कृशानोः (=एतन्नामकस्य सोमपालस्य) प्रतिधीयमानम् इत् (=धनुषि स्थाप्यमानमेव) असनाम् (=असनं=बाणं) मर्त्याय (=मरणधर्मणे मनुष्याय) उरुष्यथः (=रक्षथः) ॥

एतस्या अयमर्थः। हे इन्द्राविष्णू, मर्त्य उपासको युवाभ्यां सोममर्पयति स सोमश्च युवां बलवन्तौ कृत्वा वृत्रहनने यथा सम्यक्समर्थौ भवथस्तथा करोति। युवां च सोमपालस्य बाणं रक्षित्वा सोमो यथा नित्यं मनुष्यैर्लभ्येत तथा कुरुथ इति ॥

---

हें सर्व सूक्त 'विष्णुबळि,' 'शांतिसूक्त,' 'दुष्टजननशांति,' आणि 'विष्णुसूक्त' यांत म्हणत असतात.

वृत्रासाठीं दुसऱ्या पादांत, 'विष्णवे च अर्चत,' आणि तिसऱ्यांत 'अदाभिआ' असें म्हणावें लागतें.

२. हे इंद्राविष्णू हो, सोमपी उपासक तुम्हां पराक्रमवंतांचें खरोखर भयंकर जें युद्ध त्याचें रक्षण करितो. आणि धनुर्धारी कृशानूचा बाण धनुष्याला चढवीत असतांना त्या बाणाचें तुम्ही मर्त्यासाठीं रक्षण करितां.

2. The Soma-drinking worshipper protects, O Indra and Vishnu, the truly mighty conflict of you who are powerful. And you protect for the mortal the shaft of the archer Kris'ânu when it is fastened on the bow.

---

२. 'हे इन्द्राविष्णू हो, सोम काढून तुम्हांस अर्पण करणारा उपासक तुम्हांला भजतो त्याच्या योगानें तुमच्या आंगीं बळ येतें, आणि तुम्हीं आपलें भयंकर युद्ध वृत्राशीं करितां. आणि मर्त्य मनुष्याला नित्य सोम मिळावा आणि नित्य तुमची उपासना करितां यावी, म्हणून तुम्ही सोमपाल जो कृशानु, त्याच्या बाणाचें संरक्षण करीत असतां; तेणें करून सोम सुरक्षित राहतो' असा या कांहींशा कठिण ऋचेचा भावार्थ आहे.

'रक्षण करितो'=' उरुष्यति.' म्हणजे त्याला साहाय्य करितो, त्यांत तुम्हांस जय येई असें करितो. कारण तुमच्या आंगीं तो विशेष बळ उत्पन्न करितो. सोम अर्पण केलेला देव प्याले म्हणजे त्यांस मोठें बळ येतें असें वेदांत जिकडे तिकडे सांगितलेलें आहे.

'धनुर्धारी कृशानूचा बाण'='कृशानोः अस्तुः असनाम्.' कृशानु हें आधुनिक संस्कृतांत अग्नीचें एक नांव आहे. पण वेदांत त्याचा तसा अर्थ होत नाहीं. तें एका 'सोमपाला'चें नांव आहे. सोमपाल म्हणजे सोमावर पाहरा करणारा एक गंधर्व. सू. ११२ मं. २१ यांत सांगितलें आहे कीं, अश्वींनीं कृशानूच्या बाणास रक्षिलें, (त्या मंत्रावरील टीप पहा). ऋ. ९. ७७. २ यांतहि कृशानु हा सोमपाल होता अशाविषयीं उच्चार आला आहे, आणि त्याणें सोमरक्षणार्थ बाण मारिला असें सांगितलें आहे. ऋ. १० ६४. ८ यांत सोमरक्षणासाठीं सोमपाल कृशानु याचें आह्वान केलें आहे. ऋ. ४. २७. ३ आणि सायणभाष्यहि पहा.

पण कृशानूची इत्थंभूत सर्व कथा काय आहे ती ऋग्वेदसंहितेंत नाहीं. मात्र इतकें निःसंशय आहे कीं, कृशानु हा एक सोमपाल असून त्याणें सोमरक्षणार्थ बाण मारिला. सांप्रतच्या ऋचेवरून असें होईल कीं, सोम मर्त्यांस मिळूं नये म्हणून कृशानूनें बाण मारिला तो श्येनपक्ष्याला इंद्राविष्णूंनीं लागूं दिला नाहीं, त्याचें निवारण केलें (उरुष्यथः), अथवा श्येनपक्ष्याच्या साहाय्यासाठीं बाण मारिला तेणेंकरून सोम हातीं आला. येथें

ता ईं वर्धन्ति मह्यस्य पौंस्यं नि मातरा नयति रेतसे भुजे ।
दधाति पुत्रोऽवरं परं पितुर्नाम तृतीयमधि रोचने दिवः ॥ ३ ॥
ताः । ईम् । वर्धन्ति । महि । अस्य । पौंस्यम् । नि । मातरा । न-
यति । रेतसे । भुजे ।
दधाति । पुत्रः । अवरम् । परम् । पितुः । नाम । तृतीयम् । अधि ।
रोचने । दिवः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. ताः ( =सोमाहुतयः ) अस्य [ इन्द्रस्य ] ईम् (=एतत् ) महि (=महत् ) पौंस्यं (=वीर्यबलं ) वर्धन्ति (=प्रवर्धयन्ति) । [स इन्द्रस्] [ तत् पौंस्यं ] रेतसे भुजे (=रेतो भोक्तुं=मेघोदकं यथा लोकैर्भुज्येत तथा ) मातरा नि नयति (=मातरौ माता-पितरौ प्रति द्यावापृथिव्यौ प्रति प्रापयति ) । पुत्रः (= ? विष्णुः ) पितुः (= ? ) अ-वरम् (=अवमं ) परम् (=उन्नततरं ) तृतीयं [ च ] नाम (=सामर्थ्यं ) दिवो रोचने अधि (=द्युलोकस्य दीप्ते प्रदेशे ) दधाति (=स्थापयति ) ॥

एतां सुलभाक्षरार्थामपि निगूढाभिप्रायां सायण एवं व्याचष्टे । ताः सोमरूपाः प्र-सिद्धा आहुतयो यजमानेन हुता ईमेतदस्येन्द्रस्य महि महत्पौंस्यं पुंसः कर्म वक्ष्यमाणरूपं बलं वर्धन्ति । वर्धयन्ति । ईमित्यनर्थको वा । स चेन्द्रः सोमपानजनितं सामर्थ्यं मातरा द्यावापृथिव्यौ निनयति । नितरां प्रापयति । किमर्थम् । रेतसे । प्राणिनां पु-त्राद्युत्पादनसामर्थ्याय । भुजे । तेषां भोगाय रक्षणाय वा । कुत्रेति तदुच्यते । दिवो द्योतमानस्यादित्यस्याधि अधिकं रोचने रोचमाने मण्डले । नाम नमनं द्यावापृथिव्योः स्थापितं सामर्थ्यं पुत्रः पुरुत्राता सर्वो जनः पितुः पालकाद्विष्णोरनुमहात् । यद्वा पितुः सर्वोत्पादकात्स्वयमुत्पन्नं सत् अवरं निकृष्टं नाम पौत्रसंज्ञं परं तदुत्कृष्टं पुत्र इति नाम तदुभयापेक्षया तृतीयं पितेति नाम दधाति । धारयति । त्रीणि वाव रेतांसि पिता पुत्रः पौत्र इति श्रुतेः । अस्यायमर्थः । अग्नौ हुताः सोमाहुतय आदित्यमण्डलं प्राप्य द्वादशात्मनः सवितुर्मूर्त्यन्तराविन्द्राविष्णू पोषयन्ति । तुष्टौ तौ मेघद्वारा वर्ष-तः । तया वृष्ट्या सस्यादिद्वारा प्रजाः पुत्रपौत्रादिरूपेण वर्धयस्व इत्येवं महानुभावा-विन्द्राविष्णू इति । इति ॥

---

हा दुसरा अर्थ घ्यावा म्हणजे सू. १९२ मं. २१ आणि १०. ६४. ८ यांच्याशी चांगला मेळ मिळेल.

वृत्तसुलार्थ ' मतिआय ' असें वाचावें लागतें.

३. त्या [ सोमाहुति ] त्याचें हें मोठें वीर्य वाढवितात. [ तो तें ] मेघोदकाचा उपभोग होण्यासाठीं आईबापांप्रत प्राप्त करितो. पुत्र पित्याचें जें खालचें, वरचें, [आणि] तिसरें सामर्थ्य तें द्युलोकाच्या देदीप्यमान प्रदेशावर ठेवितो.

3. Those [ oblations of Soma ]. increase this his ( Indra's ) puissance, [ which ] he communicates to his parents ( heaven and earth ) for the enjoyment of the [ heavenly ] semen ( the rain-water ). The son (? Vishṇu) places in the bright region of heaven, the lower, the higher [ and ] the third puissance of the father.

---

३. हा मंत्र पदशः अर्थ करूं गेलें तर सोपा आहे, पण याचा अभिप्राय काय आहे तें समजत नाहीं. आम्हीं केवळ अक्षरशः अर्थ केला आहे. सायणाचें भाष्य भाषेखालीं उतरून घेतलें आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें कवीचा अभिप्राय असा आहे कीं, 'सोमाहुति अग्नींत टाकिल्या म्हणजे त्या आदित्य मंडलाप्रत जाऊन पोंहचतात, आणि तेथें इंद्राविष्णूला पुष्ट करितात. ते संतुष्ट होऊन मेघवृष्टि करितात. त्या मेघवृष्टीच्या द्वारें धान्यादिक उत्पन्न होऊन प्रजेला पुत्रपौत्र होतात आणि वाढतात.' पण आम्हांला याविषयीं संशय आहे. या ऋचेचा कसा तरी निर्वाह करणें अवश्य आहे.

'त्याचें '=' तस्य.' हा, म्हणजे येथें इंद्र विवक्षित आहे यांत संशय नाहीं. कारण 'महि पौंस्यम्' हें बहुतकरून इंद्राविषयींच येत असतें. वर पहिल्या ऋचेंत 'महते शूराय' म्हणजे इंद्रच आहे, तें पहा.

'मेघोदकाचा उपभोग घेण्यासाठीं' =' रेतसे भुजे.' म्हणजे मेघोदक भूमीवर गळावें आणि मनुष्यांस मिळावें म्हणून.

'आईबाप '=' मातरा.' द्यावापृथिवी हे इंद्राचे बाप होत असें सांगितलें आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'महि अस्य पौंसिअम्' असें आणि दुसऱ्यांत 'पुत्रो अवरं' असें वाचावें लागतें.

तत्तदिदस्य पौंस्यं गृणीमसीनस्य त्रातुरवृकस्य मीळ्हुषः ।
यः पार्थिवानि त्रिभिरिद्विगामभिरुरु क्रमिष्टोरुगायाय जीवसे॥४॥

तत्ऽतत् । इत् । अस्य । पौंस्यम् । गृणीमसि । इनस्य । त्रातुः । अवृकस्य । मीळ्हुषः ।

यः । पार्थिवानि । त्रिऽभिः । इत् । विगामऽभिः । उरु । क्रमिष्ट । उरुऽगायाय । जीवसे ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. इनस्य (=स्वामिभूतस्य) अवृकस्य (=निःशत्रोर्) मीळ्हुषः (=दानशीलस्य) अस्य त्रातुः (=तारकस्य विष्णोस्) तत्तत् इत् पौंस्यं (=तानि तानि प्रसिद्धानि सर्वाणि वीरकर्माणि पुनःपुनर्) गृणीमसि (=गृणीमः=स्तुमः) यो [विष्णुर्] उरुगायाय जीवसे (=पृथुगमनाय जीवसे=विस्तीर्णस्थलाय जीवनाय=प्राणिनो यथा सर्वत्र जीवन्ति तथा) त्रिभिः इत् विगामभिः (=त्रिभिरेव पदैः पदप्रक्षेपणैः) पार्थिवानि [रजांसि] (=सर्वान् पृथिवीसंबन्धिनो लोकान्) उरु क्रमिष्ट (=पृथु यथा तथा क्रमितवान्=पृथुभिस्त्रिभिः पदप्रक्षेपणैः सर्वां पृथिवीं क्रान्तवान्) ॥

पौंस्यं पुंस्त्वं पराक्रमातिशयम् ...।... मीळ्हुषः। सेक्तुर्नित्यतरुणस्य। स्तुत्येषु पराक्रमेषु मध्य एकमुदाहरति। यो ...... । उरुगायायोरुगातव्याय जीवसे लोकत्रयरक्षणाय। इति सायणः ॥

४. प्रभु, तारक, निःशत्रु, [ आणि ] उदार [ अशा ] या [विष्णू]चीं तीं तींच चरितें आम्ही गातों. जो [ विष्णु ] विस्तीर्ण प्रदेशीं प्राण्यांनीं जगावें म्हणून सकळ पृथिवीचें तीनच पावलांनीं विस्तीर्ण आक्रमण करीत असतो.

4. We celebrate all those exploits of this powerful, foeless, gracious saviour; who traverses widely all earthly space in only three paces, that the world may live far and wide.

४. ही ऋचा आणि पुढच्या आतां विष्णूविषयींच आहेत. 'विष्णूचीं जीं जगांत प्रसिद्ध असलेलीं चरितें, तीं आम्ही पुनःपुनः वर्णितों. त्यांपैकीं हें एक होय कीं, सर्व पृथिवींतील प्राण्यांनीं जगावें म्हणून तो मोठमोठीं तीनच पावलें टाकून यावन्मात्र त्रैलोक्याचें आक्रमण करितो.'

'तीं तींच चरितें आम्ही गातां'='तत् इत् पोंस्यं गृणीमसि.' म्हणजे आम्ही पुनःपुनः विष्णूचीं प्रसिद्ध चरितें गातों.

या मंत्रांत सांगितलेलें एक चरित उदाहरणार्थ आहे. इंद्राचा वृत्रवधाविषयींचा पराक्रम जसा पुनःपुनः येतो, तसा विष्णूचाहि तीन पावलांविषयींचा पराक्रम पुनःपुनः येतो.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'पौंसिअं' असें वाचावें लागतें.

**द्वे इदस्य क्रमणे स्वर्दृशोऽभिख्याय मर्त्यो भुरण्यति ।**
**तृतीयमस्य नकिरा दधर्षति वयश्चन पतयन्तः पतत्रिणः ॥ ५ ॥**

द्वे इति । इत् । अस्य । क्रमणे इति । स्वःऽदृशः । अभिऽख्याय ।
मर्त्यः । भुरण्यति ।
तृतीयम् । अस्य । नकिः । आ । दधर्षति । वयः । चन । पतयन्तः ।
पतत्रिणः ॥ ५ ॥

---

## भाषायाम्.

५. स्वर्दृशः (=स्वर्गस्य द्रष्टुः) अस्य [विष्णोर्] द्वे इत् (=द्वे एव) क्रमणे (=पदे=पदक्षेपणे सूर्योदयमध्याह्नारोहणरूपे) मर्त्यः (=मरणधर्मा मनुष्य उपासकः) अभिख्याय भुरण्यति (=अभीक्षते भजते च)। अस्य तृतीयं [तु] [क्रमणम्=अस्तंगमनरूपं] नकिः आ दधर्षति (=न कोपि बुद्ध्याभिभवति=ज्ञातुं न कोपि शक्नोति अस्तंगमनं क्व भवतीति न कोपि जानाति) वयश्चन (=मरुतोपि न) पतयन्तः पतत्रिणः (=उत्पतनशीलाः पक्षिणोपि) [नाधर्षन्ति=न ज्ञातुं शक्नुवन्ति) ॥

सायण एवं व्याख्यातवान् । अस्य स्वर्दृशः स्वर्गस्य सर्वस्य वा द्रष्टुर्विष्णोर्द्वे इत् क्रमणे द्वे एव पदे मर्त्यो मनुष्योऽभिख्याय सर्वभूत्यादिना प्रख्याय भुरण्यति । गच्छति । भजते ॥ भुरण्यतिः कण्ड्वादिर्गतिकर्मा भुरण्यति शवतीति तत्कर्मसु पाठात् ॥ प्रसिद्धत्वाद्भूलोकं वृष्ट्यागमनादन्तरिक्षं चेत्युभे क्रमणे जानाति । अस्य विष्णोस्तृतीयं क्रमणं द्युलोकाख्यं कोऽपि मर्त्यो नकिर्नैवादधर्षति । बुद्ध्या नाभिभवति । ज्ञातुं न शक्नोतीत्यर्थः । न केवलं मनुष्य एव अपि तु वयश्चन वेतारो मरुतोऽपि । कीदृशास्ते । पतयन्तः । सर्वत्र गमनसमर्थाः । तथा पतत्रिणः पतनशीला गरुडादयो वायवो वा नकिरादधर्षति । नैव शक्नुवन्ति ॥ धृषेर्लेट्यडागमः ॥ सत्यलोकस्यात्यन्तविप्रकृष्टत्वेन सर्वेषामविषयत्वादिति भावः । इति ॥

५. या स्वर्गदर्शी [विष्णू]चीं दोनच पावलें मर्त्य पाहून भजतो. याचें तिसरें पाऊल कोणीहि जाणूं शकत नाहीं; मरुत् [जाणूं शकत] नाहींत, [आणि] उडणारे पक्षीहि [जाणूं शकत नाहींत].

5. Only two steps of this [Vishṇu] who visits the heaven, the mortal sees and worships. His third no one can comprehend, not even the Maruts nor the feathered birds.

५. 'ह्या विष्णूचीं दोन पावलें सर्व मनुष्य पाहतात आणि भजतात; मात्र तिसरें पाऊल कोणासच सांपडत नाहीं— तें कोठें पडतें तें मरुत् सर्वत्र जाणारे आणि चपळ धांवणारे आहेत तरी त्यांसहि सांपडत नाहीं, आणि सर्वत्र गमन करणारे जे पक्षी, तेहि जाणूं शकत नाहींत. तो इतका लवकर जातो कीं, मरुतांलाहि त्याजबरोबर टिकाव धरवत नाहीं, आणि पक्ष्यांलाहि धरवत नाहीं.'

'स्वर्गदर्शी'='स्वर्दृशः.' म्हणजे मध्याह्नीं स्वर्गाकडेस जाणारा जो, तो. सूर्यरूपी विष्णूला हें विशेषण शोभतें यांत संशय नाहीं.

'दोनच पावलें'='द्वे इत् क्रमणे.' म्हणजे सूर्य उगवतो तें एक पाऊल, आणि मध्याह्नीं आकाशांत चढतो, तें दुसरें. तिसरें पाऊल म्हणजे तो संध्याकाळीं मावळतो तें. मावळून तो कोठें जातो तें कोणास समजत नाहीं, आणि तिकडे मरुत् अथवा पक्षीहि जाऊं शकत नाहींत, असा ऋषीचा अभिप्राय दिसतो. परंतु सायणाचार्य पहिलें पद म्हणजे पृथिवी, आणि दुसरें पद म्हणजे अंतरिक्ष, असें म्हणतात, आणि तिसरें पद म्हणजे द्युरूप होय असें सांगतात. (भाषेखालीं पहा.) तसेंहि संभवतें खरें.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'द्वे' बद्दल 'दुए,' 'स्वर्दृशः' च्या बद्दल 'सुअर्दृशः,' व दुसऱ्यांत 'अभिख्याय' बद्दल 'अभिखिआय' असें वाचावें लागतें.

चतुर्भिः साकं नवतिं च नामभिश्चक्रं न वृत्तं व्यतीँरवीविपत् ।
बृहच्छरीरो विमिमान ऋक्वभिर्युवाकुमारः प्रत्येत्याहवम् ॥६॥२९॥

चतुःऽभिः । साकम् । नवतिम् । च । नामऽभिः । चक्रम् । न । वृत्तम् । व्यतीन् । अवीविपत् ।
बृहत्ऽशरीरः । विऽमिमानः । ऋक्वऽभिः । युवा । अकुमारः । प्रति । एति । आऽहवम् ॥ ६ ॥ २९ ॥

## भाषायाम्.

६. [स विष्णुश्] चतुर्भिः साकं (=चतुर्भिः सह) नवतिं च (=? नवती च=नवत्या च=सचतुर्नवत्या) नामभिः (=? स्वविभूतिभिः) वृत्तं चक्रं न (=वर्तुलं चक्रमिव=वर्तुलं चक्रं यथा कश्चित् भ्रमयति तथा) व्यतीन् (=अश्वान्) अवीविपत् (=भ्रमयति)। बृहच्छरीरः (=महास्थूलशरीरो) युवा (=नित्यतरुणः) अकुमारः (=अनल्पो) [विष्णुः] विमिमानः (=लोकान् उरुपदैः क्रामन्=शीघ्रं चलन्) ऋक्वभिः (=स्वकीयैस्तेजोभिः सह) आहवं प्रति एति (=आह्वानं प्रति आगच्छति)॥

एषाप्यत्यन्तदुर्बोधा। सायणस्तु व्याख्यातवानेवम्। अयमादित्यात्मा विष्णुश्चतुर्भिः साकं सहितां नवतिम्। सचतुर्नवतिमित्यर्थः। एतत्संख्याकान् कालावयवान् नामभिः स्वकीयनमनप्रकारैः प्रेरणविशेषैर्वृत्तं यथा भवति तथा व्यतीन् विविधानेव स्वभावान् वृत्तं चक्रं न बह्वरोपेतं चक्रमिव। तं यथा शत्रोरुपरि प्रक्षेपेण भ्रमयति तद्वदुक्तसंख्याकान् कालावयवानवीविपत् कम्पयति भ्रमयति। टुवेपृ कम्पने। ण्यन्ताल्लुङि चङि रूपम्॥के पुनस्त उच्यन्ते। संवत्सर एकः। अयने द्वे। पञ्चर्तवः। द्वादश मासाः। चतुर्विंशत्यर्धमासाः। त्रिंशदहोरात्राः। अष्टौ यामाः। एकस्मिन्दिने पर्यावर्तमानानि मेषादीनि द्वादश लग्नानीति मिलित्वा चतुरधिकनवतिसंख्याकानवीविपत्। ननु आदित्यः स्वयमपि इतरवत्परिभ्रमति। कथं भ्रमयतीत्युच्यते नैष दोषः। एतेषां भ्रामकस्य ध्रुवस्य विष्णोर्मूर्त्यन्तरत्वात्। अथवा स्वभ्रमणाधीनत्वादितरेषां परिभ्रमणस्य। अतः स्वयं भ्रमयतीत्युच्यते। एवं कालात्मको विष्णुर्बृहच्छरीरो विराडात्मना सर्वदेवमनुष्यादिशरीराणां स्वशरीरत्वात्। बृहच्छरीरत्वमेवोपपादयति। विमिमानो विविधमात्मानं मिमानो देवतिर्यगात्मना विभज्य स्थापयन्। यद्वा ऋक्वभिः स्तुतिमद्भिर्मन्त्रवद्भिर्वा विमिमानः। यद्यपि विभुस्तथापि भक्त्याधीनत्वात् स्तुत्या प्रीयते। युवा सर्वत्र मिश्रणशीलो नित्यतरुणो वा। अतएवाकुमारोऽनल्पः। एवं भूतो महाविष्णुराहवमाह्वानं प्रत्येति। गच्छति यज्ञदेशम्। इति॥

६. तो चवऱ्याण्णव विभूतींनीं वाटोळ्या चक्राप्रमाणें [ आपल्या ] घोड्यांकडून भ्रमण करवितो. महाशरीर, नित्य तरुण [ आणि ] महान् [ जो ] [विष्णु, तो] [ आपल्या] तेजांसहित मोठीं पावलें टाकीत टाकीत आह्वानाप्रत येतो.

6. He has with his four and ninety forms set in motion [ his ] horses like a round wheel. The huge-bodied, ever youthful [ and ] grown up [ Vishṇu] comes to the invocation, making large strides, with [ his ] splendours.

---

६. ही ऋचा अत्यंत दुर्बोध आहे. अक्षरार्थ सोपा आहे. पण ऋषीचें हृद्ग काय आहे तें कळत नाहीं. जाणून बुजूनच ती गूढार्थक केलेली आहे, तेव्हां तिच्या अर्थाविषयीं फार संशय असावा यांत नवल नाहीं. सायणांनींहि फारच ओढाताण करून अर्थ बसवून निर्वाह केला आहे ( भाषेखालीं पहा. ) दिलेल्या भाषांतराचा सारांश असा दिसतोः ' विष्णु आपले असंख्य घोडे एकाद्या वाटोळ्या चाकास गरगर फिरविल्या प्रमाणें आपल्या चवऱ्याण्णव विभूतींनीं फिरवितो. तो आपल्या तेजांसहित उपासकांच्या हाके सरशीं धांवत येत असतो. ' परंतु चवऱ्याण्णव विभूति कोणत्या ? चवऱ्याण्णव म्हणजे अनेक अशा अपरिमितार्थी परिमितार्थक शब्द आहे, असें म्हटलें तरी या अनेक विभूति त्या कोणत्या हा प्रश्न राहतोच. या मंत्राचा पूर्वार्धच कठिण आहे. उत्तरार्ध सोपा आहे.

' मोठीं पावलें टाकीत टाकीत '= 'विमिमानः.' अक्षरशः 'मोजीत.' म्हणजे अंतर मोजण्यासाठीं जणुं पावलें टाकीत टाकीत. सू. १५४ मं. १ आणि ३ यांत ' विममे ' याचा प्रयोग याच अर्थी केला आहे तो पहा.

' आह्वानाप्रत '=' आहवम्. ' 'युद्धाप्रत ' असा कितीएक पाश्चात्यांनीं केलेला अर्थहि संभवतो.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' व्यतीन्' बद्दल ' विअतीन् ' आणि चवथ्यांत ' प्रतिएति आहवम् ' म्हणावें.

## सूक्तम् १५६.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । विष्णुर्देवता । जगती छन्दः ॥

**भवा मित्रो न शेव्यो घृतासुतिर्विभूतद्युम्न एवया उ सप्रथाः ।**
**अधा ते विष्णो विदुषा चिदर्ध्यः स्तोमो यज्ञश्च राध्यो हविष्मता १**

भव । मित्रः । न । शेव्यः । घृतऽआसुतिः । विभूतऽद्युम्नः । एवऽयाः । ऊं इति । सऽप्रथाः ।
अध । ते । विष्णो इति । विदुषा । चित् । अर्ध्यः । स्तोमः । यज्ञः । च । राध्यः । हविष्मता ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. [ हे विष्णो ], [ त्वं ] मित्रो न शेव्यो भव (=मित्रं सखेव सुखकरो भव ) । [ त्वं ] घृतासुतिः (=घृतमासूयते नीयते यस्मै तादृशः ) विभूतद्युम्नः (=प्रभूतधनः ) एवयाः (=रक्षणाय गन्ता ) उ (=उत=अपि च ) सप्रथाः (=सर्वतः पृथुः ) [ भवसि ] । अध (=अतः कारणात् ) हे विष्णो, ते स्तोमः (=तव स्तोत्रं ) विदुषा चित् (=जानतापि कविना ) अर्ध्यः ( =" पुनःपुनः प्रवर्धनार्हः"=कर्तव्यः ) । [ तव ] यज्ञश्च हविष्मता राध्यः (=यज्ञश्च हविर्दत्तवतोपासकेन समाराधनीयो ) [ भवति ]॥

घृतमुदकमासूयते येन स तादृशः । यद्वा घृतमाज्यमाभिमुख्येन गीयते यस्मै स तादृशः । ... अर्ध्यः पुनःपुनः प्रवर्धनार्हः । एकवारकरणे न संपूर्यत इत्यर्थः ॥ इति सायणः ॥

## सूक्त १५६.

**ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—विष्णु. वृत्त—जगती.**

१. [ हे विष्णू ], तूं [ आम्हांला] [एकाद्या] मित्राप्रमाणें सुखदायक हो. तूं घृत पिणारा, मोठा भाग्यवान्, सत्वर रक्षण करण्याकरितां धावणारा, आणि सर्वव्यापी आहेस. यास्तव हे विष्णू, तुझें स्तोत्र विद्वानानें रचण्यास योग्य होय, आणि हवि देणाऱ्या उपासकानें तुझ्या प्रीत्यर्थ यज्ञ करण्यास योग्य होय.

## HYMN 156.

To *Vishṇu*. By *Dîrghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. Be kind [ unto us ] like a friend. Thou lovest to drink clarified butter, [ art ] possessed of mighty wealth, runnest swiftly [ to succour thy worshipper ], and traversest vast spaces. Therefore, thy hymn deserveth to be made by the learned, and thy sacrifice to be offered by the giver of oblation.

---

१. 'हे विष्णू, तूं मित्राप्रमाणें आम्हांला सुखकारक हो. तुला सर्व लोक घृताच्या आहुति देतात, तूं मोठा भाग्यवान्, सत्वर रक्षण करणारा, आणि सर्वव्यापी आहेस. यास्तव हे विष्णू, सर्व कवींनीं तुझी स्तुति गावी आणि सर्व यजमानांनी तुजप्रीत्यर्थ यज्ञ करावे, अशी तुझी योग्यता आहे,' असा भावार्थ.

या मंत्रांत स्तोत्रें रचणारा कवि आणि हवि देणारा यजमान हे निराळे दर्शविले आहेत हें ध्यानांत ठेवावें. वेदकाळीं यज्ञ करून हवि देतांना कोणत्या तरी विद्वान् कवीचा स्तोत्रें करून म्हणण्याच्या कामीं उपयोग करीत असत, असें या आणि दुसऱ्या मंत्रावरून उघड दिसून येतें.

वृत्तासाठीं 'शेव्यो'च्या ठिकाणीं 'शेविओ' असें, 'अध्यैः'च्या ठिकाणीं 'अधिअः' आणि 'राध्यो'च्या जागीं 'राधिओ' असें म्हणावें लागतें.

यः पूर्व्याय वेधसे नवीयसे सुमज्जानये विष्णवे ददाशति ।
यो जातमस्य महतो महि ब्रवत्सेदु श्रवोभिर्युज्यं चिदभ्यसत् ॥२॥

यः । पूर्व्याय । वेधसे । नवीयसे । सुमत्ऽजानये । विष्णवे । ददाशति ।
यः । जातम् । अस्य । महतः । महि । ब्रवत् । सः । इत् । ऊं इति । श्रवः॒ऽभिः । युज्यम् । चित् । अभि । असत् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. यो [ यजमानः ] पूर्व्याय नवीयसे वेधसे ( =पुरातनायापि नूतनतमाय=यः प्राक्तनः सन्नप्यत्यन्ताभिनवो विधाता भवति तस्मै ) सुमज्जानये विष्णवे (=सुजानये विष्णवे=सुजन्मने विष्णवे ) ददाशति ( =पुरोडाशदानादिना भजते ) यः ( =यश्च कविर् ) महतोस्य ( =महतस्तस्य ) महि ( =महत् ) जातं ( =जन्म) ब्रवत् (=ब्रूयात्=स्तौति ) स इत् उ (=स एव ) श्रवोभिः (=अन्नादिसंपद्भिः सह ) युज्यं चित् (=संगमनमेव ) अभि असत् (=प्राप्नुयात्=प्राप्स्यति ) ॥

सायणस्तु पूर्व्याय पूर्वकालीनाय । नित्यायेत्यर्थः । वेधसे विविधजगत्कर्त्रे नवीयसे नित्यनूतनाय । अत्यन्तरमणीयायेत्यर्थः । स्तुत्याय वा सुमज्जानये स्वयमेवोत्पन्नाय ...... । यद्वा सुतरां मादयतीति सुमत् । तादृशी जाया यस्य स तथोक्तः । तस्मै सर्वजगन्मादनशीलश्रीपतय इत्यर्थः । ...... । जातं जन्मोत्पत्तिं हिरण्यगर्भादिरूपं जन्म ब्रवत् ब्रूयात् । ...... सेदु ...... सोपि दाता श्रवोभिरन्नैः कीर्तिभिर्वा युक्तः सन् युज्यं चित् सर्वैर्गन्तव्यमेव तत्पदमाभिमुख्येनासत् । गच्छति । प्राप्नोति । इति ॥

२. पुरातन [असूनहि] अतिनूतन [आणि] सुजन्म असा जो हा विधाता विष्णु, त्याला जो कोण हविर्दानानें भजेल, [आणि] जो कोण या महान् [विष्णू]चें महा जन्म वर्णील, तोच अनेकविध संपत्तींच्या समागमाप्रत पावेल.

2. He who sacrifices to Vishnu who is the ancient [and is yet] the most modern protector, and who is of glorious birth, [and] he who sings the great birth of him who is great,—he alone shall attain to fellowship with riches.

२. या ऋचेंत विष्णुभक्ताचें भाग्य वर्णिलें आहे; तें हें कीं, 'तो (विष्णुभक्त) अन्नादिक ज्या अनेक संपत्ति, त्यांशीं समागम पावतो, म्हणजे त्या त्याला प्राप्त होतात आणि सोडून जात नाहींत, मग तो भक्त विष्णूला हविरन्नादिक अर्पून भजो, अथवा विष्णूचीं जन्मापासूनचीं जीं चरितें, त्यांची कीर्ति गाऊन भजो.'

'पुरातन असून अतिनूतन'=' पूर्व्याय नवीयसे.' जसा अतिपुरातनकाळीं असे, तसाच सांप्रत काळींहि आहे असा जो त्याला; अर्थात् 'नित्य' जो त्याला.

'सुजन्म'='सुमज्जानये.' म्हणजे जन्मल्यापासून ज्यानें मोठमोठे पराक्रम केले, आणि ज्याचें जन्म मोठमोठे पराक्रम करण्यासाठींच झालेलें आहे, त्याला.

'भजेल'=' ददाशति.' हा हविर्दान करणारा यजमान होय, आणि 'वर्णितो' (ब्रवत्) तो स्तोत्रें रचणारा कवि होय.

'समागमाप्रत'='युज्यम्.' अक्षरशः अर्थ मैत्री, सहवास, असा आहे; म्हणजे संपत्ति अशा पुरुषाच्या घरीं ब्राह्मण्यास मित्राप्रमाणें आनंद पावतील.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'पूर्विआय,' आणि चवथ्यांत 'युज्जिअम् अभि असत्' असें म्हणावें.

**तमु स्तोतारः पूर्व्यं यथा विद ऋतस्य गर्भं जनुषा पिपर्तन ।**
**आस्य जानन्तो नाम चिद्विवक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे ३**

तम् । ऊं इति । स्तोतारः । पूर्व्यम् । यथा । विद । ऋतस्य । गर्भम् । जनुषा । पिपर्तन ।
आ । अस्य । जानन्तः । नाम । चित् । विवक्तन । महः । ते । विष्णो इति । सुऽमतिम् । भजामहे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. हे स्तोतारः, तमु (=तमेव) पूर्व्यं (=सनातनम्) ऋतस्य गर्भं (=यज्ञस्य बालकं=यज्ञो बालवदुत्पादितं प्रेम्णा पूजितं च ) [ विष्णुं ] यथा विद (=यथा जानीथ तथा ) जनुषा (=जन्मना=जन्मसंकीर्तनेन=जन्मादिचरितस्य संकीर्तनेन ) पिपर्तन (=पिपृत=प्रीणयत ) । जानन्तः (=अस्य नाम जानन्तो ) [ यूयम् ] अस्य नाम चित् (=नामैव=सुश्लोकमेव ) आ विवक्तन (=समन्ताद्वदत=विस्तीर्णं यथा प्रसार्यते तथा ब्रूत ) । —हे विष्णो, [ वयं ] महस्ते (=महतस्तव ) सुमतिं भजामहे (=शोभनात्मिकां बुद्धिं सेवामहे ) ॥

पूर्व्यं पूर्वार्हमनादिसंसिद्धम् ऋतस्य गर्भं यज्ञस्य गर्भभूतम् । यज्ञात्मनोत्पन्नमित्यर्थः । यज्ञो वै विष्णुरिति श्रुतेः । यद्वा ऋतस्योदकस्य गर्भं गर्भकारणम् । उदकोत्पादकमित्यर्थः ॥ इति सायणः ॥

३. हे स्तोते हो, तुम्ही जाणतां त्याप्रमाणें [ या ] सनातन यज्ञबाळकाला [ त्याच्या ] जन्म[कथे]नें प्रसन्न करा. याचें माहात्म्य तुम्ही जाणत आहां तेंच तुम्ही गा—हे विष्णू, महान् जो तूं त्या तुझ्या कृपेला आम्ही भजतों.

3. Propitiate that ancient child of sacrifice (Vishnu), O praisers, [ by celebrating his ] birth, as you know it. Celebrate you who know, the fame of this [ Vishnu ]. We worship thy benevolence —thou, O Vishṇu, who art great.

---

३. 'हे स्तोते जन हो, तुम्ही या सनातन विष्णूचें चरित जाणतां तसेंच गाऊन त्याला संतोषवा. याचें जें चरित तुम्ही जाणत आहां, तेंच गा.—आणि हे विष्णू, तुझी जी कृपा तिला आम्ही भजतों, आमच्या हातून तुझें संकीर्तन कसेंहि झालें तरी तें तूं मान्य करून घे, आणि आपल्या कृपेच्या योगानें आम्हांवर प्रसन्न हो.' असें ऋषि जवळच्या मित्रांस म्हणून मग विष्णूला संबोधून बोलतो.

'तुम्ही जाणतां त्याप्रमाणें '=' यथा विद. ' म्हणजे तुम्हांला जसें ज्ञान असेल त्याप्रमाणें गा, तें ज्ञान थोडें अथवा अपूर्ण असलें म्हणून चिंता नाहीं, कारण विष्णु हा कृपावान् आहे, तो तुमचें वर्णन अपूर्ण आणि अशुद्ध असलें तरी तें मान्य करून घेईल.

'जन्म[कथे]नें '=' जनुषा. ' म्हणजे विष्णूनें पूर्वीच्या काळापासून काय काय केलें तें चरित गाऊन. 'जनुषा.' हें रूप ऋक्संहितेंत पुष्कळ ठिकाणीं आलें आहे. त्याचा अर्थ बहुतकरून 'स्वभावतः,' 'जन्मापासून' असा होत असतो असें ते ते सर्व मंत्र काढून पाहिल्यावर दिसतें खरें; पण तो अर्थ प्रस्तुत स्थळीं जुळत नाहीं. आणि आम्हीं केलेला अर्थ विवक्षित आहे असें वाक्यसंदर्भावरून वाटतें.

'यज्ञबाळकाला '=' ऋतस्य गर्भम्.' हें विशेषण अग्नीला शोभतें, आणि बहुत करून तें त्यालाच लाविलेलें आढळतें. अग्नि यज्ञबाळक खराच, कारण कीं त्याला यज्ञांत घर्षणानें उत्पन्न करून बाळकाप्रमाणें त्याचें लालन पालन खावयास आणि प्यावयास देऊन करितात. पण हें नांव 'सोम' आणि विष्णु यांलाहि दिलेलें आहे, त्याचा अभिप्राय इतकाच दिसतो कीं, यज्ञांत बाळकाप्रमाणें ज्याचें लालन करितात तो.

वृत्तासाठीं 'पूर्विअं' असें वाचावें.

तमस्य राजा वरुणस्तमश्विना क्रतुं सचन्त मारुतस्य वेधसः ।
दाधार दक्षमुत्तममहर्विदं व्रजं च विष्णुः सखिवाँ अपोर्णुते ॥४॥
तम् । अस्य । राजा । वरुणः । तम् । अश्विना । क्रतुम् । सचन्त ।
मारुतस्य । वेधसः ।
दाधार । दक्षम् । उत्ऽतमम् । अहःऽविदम् । व्रजम् । च । विष्णुः ।
सखिऽवान् । अपऽऊर्णुते ॥ ४ ॥

आ यो विवाय सचथाय दैव्य इन्द्राय विष्णुः सुकृते सुकृत्तरः ।
वेधा अजिन्वत्त्रिषधस्थ आर्यमृतस्य भागे यजमानमाभजत् ॥ ५ ॥
॥ २६ ॥ २१ ॥
आ । यः । विवाय । सचथाय । दैव्यः । इन्द्राय । विष्णुः । सुऽकृते ।
सुकृत्ऽतरः ।
वेधाः । अजिन्वत् । त्रिऽसधस्थः । आर्यम् । ऋतस्य । भागे । यजमानम् । आ । अभजत् ॥ ५ ॥ २६ ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

४. राजा वरुणः ( =वरुणराजो ) मारुतस्य (=मरुद्युक्तस्य ) वेधसः (=विधातुः) अस्य [ विष्णोस् ] तं क्रतुं (=तं वक्ष्यमाणं पराक्रमं ) [ सचते=सेवते ] तं [ क्रतुम् ] अश्विना ( =अश्विनौ ) [ इतरे च देवाः] सचन्त (=असेवन्त=सेवन्ते=पूजयन्ति) [ सोयं महापराक्रमो] विष्णुः अहर्विदम् (=अह्नो लम्भयितारं=वृत्रेणापहृतस्य दिवप्रकाशस्य प्रत्यानयितारम् ) उत्तमम् (=उत्कृष्टतमं ) दक्षं (=बलं ) दाधार (=धारयति=धत्ते) सखिवान् (=गोष्ठं सखिभिर्मरुद्भिर्युक्तः सन्) व्रजं च (=गोष्ठं=मेघोदकरूपाणां=सूर्यकिरणरूपाणां च गवां वृत्रेण पिहितं स्थानम् ) अपोर्णुते ( =उद्घाटयति=वृत्रं हत्वा मेघजाता अपः सूर्यादीनां तेजांसि च यथा पुनर्लभ्यन्ते तथा करोति )॥

मारुतस्य मरुत्संघातस्य देवगणस्य वेधसो विधातुः स्रष्टुर्विष्णोः क्रतुं कर्म पालनादिरूपं वरुणादयः सचन्ते । तदधीनत्वात् पालनस्य । स च सखिवान् इन्द्रमरुदादिसहायोपेतः सन् उक्तलक्षणं दक्षं वृष्ट्युत्पादनादिसामर्थ्यरूपं बलं दाधार । तथा व्रजं चापोर्णुते । इति सायणः ॥

५. दैव्यः (=देवगुणविशिष्टः) यः सुकृत्तरः (=अत्यन्तं सुकर्मकर्ता ) विष्णुः सु-

४. मरुद्युक्त जो प्रभु विष्णु, त्याच्या पराक्रमाला राजा वरुण [ भजतो ] [ आणि ] त्या पराक्रमाला अश्वी [ देव ] भजतात. विष्णु दिवस उत्पन्न करणारें असें उत्कृष्ट बळ आपल्या आंगीं धारण करितो, आणि आपल्या मित्रांच्या साहाय्यानें गाईंचा गोठा उघडितो.

५. दैव्य [ आणि ] महासुकृती जो विष्णु सुकृती इंद्राला साहाय्य करण्यासाठीं येतो, तो त्रैलोक्यस्थ प्रभु विष्णु आर्य यजमानाला सुखी करो, आणि यज्ञाच्या भाग्याचा उपभोक्ता करो.

4. King Varuṇa [ honours ] that exploit, the As'vins honour that exploit, of this lord Vishṇu [ who is ] accompanied by the Maruts : Vishṇu holds the highest power of finding the day-[ light ] and breaks open the cowfold with his friends.

5. The Lord Vishṇu who, divine and most beneficent, came to beneficent Indra, for rendering help—may he, the Lord who dwells in the three worlds, promote the Âryan sacrificer and make him a participator in the good luck of a sacrifice.

---

४. 'वृत्रानें सूर्यकिरणांवर आणि मेघोदकांवर आवरण घातल्यामुळें त्यांस [illegible]केकीं येतां येईना असें झालें असतां, वृत्राला मारून सूर्याकडून पुनः प्रकाशविण्याचें आणि मेघाकडून पुनः वृष्टि करविण्याचें सर्वोत्कृष्ट बळ विष्णूच्या आंगीं असून, त्याचा तो उपयोग करितो. हा जो विष्णूचा महा पराक्रम, त्याला राजा वरुण आणि अश्वी देव भजतात, म्हणजे त्याची जणुं पूजा करितात, आणि त्याप्रमाणें आपणहि पराक्रम करूं लागतात.'

'मरुद्युक्त '=' मारुतस्य.' यावरून उघड होतें कीं, मरुत् इंद्राबरोबरच फिरतात असें नाहीं, तर ते विष्णूचेहि मित्र आहेत, आणि इंद्राला ते साहाय्य करितात त्याप्रमाणें विष्णूलाहि साहाय्य करितात.

'दिवस उत्पन्न करणारें '='अहर्विदम्.' अक्षरशः 'दिवसाला शोधून काढणारें,' म्हणजे वृत्रानें लपवून ठेविलेल्या दिवसाचा जो प्रकाश त्याचा पत्ता लावणारें. ऋ. ८. ५. ९ आणि २१ यांजवरील सायणभाष्य पाहा.

'मित्रांच्या साहाय्यानें '=' सखिवान्.' हे मित्र म्हणजे मरुत्.

५. 'जो दिव्य विष्णु इंद्राला सुद्धा

## सूक्तम् १५७.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अश्विनौ देवता । जगती छन्दः ॥

**अबोध्यग्निर्ज्म उदेति सूर्यो व्युषाश्चन्द्रा मह्यावो अर्चिषा ।**
**आयुक्षातामश्विना यातवे रथं प्रासावीद्देवः सविता जगत्पृथक् ॥१॥**

अबोधि । अग्निः । ज्मः । उत् । एति । सूर्यः । वि । उषाः । चन्द्रा । मही । आवः । अर्चिषा ।
अयुक्षाताम् । अश्विना । यातवे । रथम् । प्र । असावीत् । देवः । स-विता । जगत् । पृथक् ॥ १ ॥

कृते (=सुकर्मकारिणे ) इन्द्राय सचथाय (=सचनाय=साहाय्याय=साहाय्यं कर्तुम् ) आ विवाय ( =आजगाम=आगच्छति ) [ स ] त्रिसधस्थः ( =लोकत्रये स्थितो ) वेधाः (=विधाता ) आर्यं यजमानम् (=आर्यमुपासकम्=उपासकमार्यजनम् ) अजिन्वत् (=जिन्वतु=प्रेरयतु ) ऋतस्य भागे [ च ] आ अभजत् ( =यज्ञस्य भाग्ये च भागिनं करोतु=यज्ञफलस्य लब्धारं करोतु ) ॥

सुकृत्तरः शोभनफलप्रदानां मध्ये श्रेष्ठः । इति सायणः

## भाषायाम्.

१. अग्निः अबोधि (=प्रतिबोधितोस्ति) । सूर्यो ज्मः (=पृथिव्याः सकाशात्) उदेति ( =उद्गच्छति ) । चन्द्रा ( =आह्लादकारिणी ) मही ( =महती ) उषाः अर्चिषा ( =स्वकीयेन तेजसा ) आवः (=व्युष्टा भवति ) । अश्विना ( =अश्विनौ ) यातवे (=यातुं=गन्तुं=गमनाय ) रथम् आयुक्षाताम् (=अयोजयताम्=अश्वयुक्तमकुरुताम् ) । देवः सविता ( =देदीप्यमानः सविता ) जगत् ( =जंगमं मनुष्यादिकं भूतजातं ) प्र असावीत् (=स्वस्वकर्मानुरोधेन प्रेषितवान् भवति=ते प्रतिबुध्य यथा स्वस्वकर्मणि प्रवृत्ता भवेयुस्तांस्तथा जागृतानकरोत् ) ॥

साहाय्य करूं शकतो, तो प्रभु विष्णु या आर्य यजमानाला सुखी करो, आणि यज्ञापासून देवप्रसादाचा वगैरे जो लाभ होणार, त्याचा तो भोक्ता होई असें करो' असा अभिप्राय.

'महासुकृती '=' सुकृत्तरः. ' म्हणजे मोठमोठे पराक्रम आणि उपासकांचें कल्याण करणें इत्यादिक जीं सुकृत्यें, तीं अतिशयें करून करणारा.

'त्रैलोक्यस्थ'=' त्रिषधस्थः. ' म्हणजे तीन लोकांत असणारा. इतर ठिकाणींहि हें विशेषण आलें आहे तेथें साय-

## सूक्त १५७.

ऋषि–उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देव–अश्वी देव. वृत्त–जगती.

१. अग्नि जागा झाला आहे. सूर्य पृथिवीवर उगवत आहे. आल्हादकारक [आणि] मोठी उषा [आपल्या] कांतीनें फांकली आहे. अश्वींनीं चालण्यासाठीं [आपला] रथ जोडिला आहे. सविता देव उगवून त्याणें जगाला आपआपल्या कामीं पाठविलें आहे.

## Hymn 157.

To the *As'vins*. By *Dîrghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. Agni has awoke. The sun is rising above the earth. Delightful [and] wide Ushas has dawned with her brightness. The As'vins have yoked [their] chariot for to go. Divine Savitâ has sent forth the movable creatures each after its pursuit.

णांनीं हाच अर्थ केला आहे, आणि द्युलोकादिक जे तीन लोक, त्यांत राहणारा असें सांगितलें आहे.

'यज्ञाच्या भाग्याचा उपभोक्ता करो'= 'भागे ऋतस्य आ अभजत्.' म्हणजे यज्ञापासून जें भाग्य प्राप्त व्हावयाचें, तें प्राप्त होई असें करो.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'दैविअः,' आणि तिसऱ्यांत 'आरिअं' असें म्हणावें लागतें.

---

१. हें सूक्त अश्वींविषयीं आहे. ही पहिली ऋचा प्रातःकाळाविषयीं आहे. 'अग्नि पेटला आहे. सूर्य उगवून पृथिवीवर चढतो आहे. उषा उगवून सर्वांस आल्हाद करीत आहे. अश्वींनीं जाण्यासाठीं आपल्या रथास घोडे जोडिले आहेत. आणि सविता देव उगवून त्याणें सर्व जंगम प्राण्यांस जागृत करून आपआपल्या कामीं पाठविलें आहे पहा.'

'जाण्यासाठीं'='यातवे.' म्हणजे त्यांचें जें पृथिवी सभोंतालींचें पर्यटन, तें करण्यासाठीं, म्हणजे आपलें नित्याचें काम करण्यासाठीं.

या ऋचेंत जे देव सांगितले आहेत, ते सर्व 'उषर्बुध्' म्हणजे पहांटेस जागे होणारे आहेत. (सू. ९२ मं. १८, सू. ४४ मं. १, ९ इत्यादि स्थळें पहा). म्हणूनच प्रभातकाळ झाला असें म्हणून दाखविण्याचें असतां, ते देव उगवले आहेत इतकेंच सांगतो.

वृत्तासाठीं 'अबोधि अग्निः ... सूरिअः,' 'वि उषा... मही आव अर्चिषा' असें म्हणावें.

यद्युञ्जाथे वृषणमश्विना रथं घृतेन नो मधुना क्षत्रमुक्षतम् ।
अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतं वयं धना शूरसाता भजेमहि ॥२॥

यत् । युञ्जाथे इति । वृषणम् । अश्विना । रथम् । घृतेन । नः । मधुना । क्षत्रम् । उक्षतम् ।
अस्माकम् । ब्रह्म । पृतनासु । जिन्वतम् । वयम् । धना । शूरऽसाता । भजेमहि ॥ २ ॥

अर्वाङ् त्रिचक्रो मधुवाहनो रथो जीराश्वो अश्विनोर्यातु सुष्टुतः ।
त्रिवन्धुरो मघवा विश्वसौभगः शं न आ वक्षद्द्विपदे चतुष्पदे॥३॥

अर्वाङ् । त्रिऽचक्रः । मधुऽवाहनः । रथः । जीरऽअश्वः । अश्विनोः । यातु । सुऽस्तुतः ।
त्रिऽवन्धुरः । मघऽवा । विश्वऽसौभगः । शम् । नः । आ । वक्षत् । द्विऽपदे । चतुःऽपदे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे अश्विना (=अश्विनौ), यद् (=यस्मात् कारणात्) [युवां] वृषणं (=सामर्थ्योपेतं) रथं युञ्जाथे (=अश्वयुक्तं कुरुथः) [तस्मात् कारणात्] [युवां] मधुना घृतेन (=मधुरेण घृतेन="उदकेन") नः क्षत्रम् (=अस्मदीयं क्षत्रियजातं बलं=क्षत्रिय समूहम्) उक्षतं (=सिञ्चतम्)। [तथा] अस्माकं ब्रह्म (=अस्माभिः कृतं स्तोत्रं) पृतनासु (=संग्रामेषु) जिन्वतं (=प्रीणयतं=जयदानेन सफलं कुरुतम्)। [अपि च] वयं शूरसाता (=शूरसातौ=युद्धे) धना (=धनानि=शत्रोर्बहुविधानि धनानि) भजेमहि (=लभेमहि)॥

मधुना। युष्मद्रथस्थेन मधुनास्मदीयं बलं प्रवर्धयतमित्यर्थः। अश्विनो रथस्य मधुपूर्णत्वं मधुवाहनो रथ इत्यादिषु प्रसिद्धम्। किं च अस्माकं पृतनास्वस्मदीयासु पुत्रभृत्यादिमनुष्यरूपासु प्रजासु ब्रह्म ...... जिन्वतम्। ......। यद्वा पृतनासु परकीयासु प्रजासु ... इत्यादि सायणाचार्याः॥

३. त्रिचक्रः (=त्रिभिश्चक्रैरुपेतो) मधुवाहनः (=मधुनो वाहको) जीराश्वः (=शीघ्राश्वयुक्तः) सुस्तुतः (=अत्यन्तं स्तुतः) अश्विनो रथः अर्वाङ् यातु (=आयातु)। त्रिवन्धुरः (=ईषारूपत्रिविधवन्धनकाष्ठयुक्तो) मघवा (=धनवान्) विश्वसौभगः

२. हे अश्वी हो, तुम्ही आपला पराक्रमी रथ ज्यापेक्षां जोडिला आहे, [ त्यापेक्षां ] तुम्ही [ आपल्या ] मधुर घृतानें आमचा क्षत्रिय समुदाय भिजवा. तुम्ही आमचें स्तोत्र युद्धांत यशस्वी करा. आम्ही संग्रामांत लुटी मिळवूं असें करा.

2. Inasmuch as you have, O As'vins, yoked your mighty chariot, sprinkle you our rulers with the sweet fat. Prosper our song in battles. May we obtain booties in the fight.

३. तीनचाकी, मधु वाहून नेणारा, वेगवान् घोडे जोडिलेला, [आणि] प्रख्यात, असा [जो] अश्वींचा रथ, [ तो ] इकडे येओ. तो तीन दांड्यांचा, धनसंपन्न, सर्वभाग्यसंपूर्ण [ रथ ] आमच्या द्विपदांला [ आणि ] चतुष्पदांला सुख घेऊन येओ.

3. May the three-wheeled, honey-bearing chariot of the As'vins, which has fleet horses, [ and which is ] much praised, come hitherward. May the rich [ chariot ] of the three-fold pole, possessed of every good fortune, bring happiness to our bipeds [and to our] quadrupeds.

---

२. 'हे अश्वी हो, तुम्ही आतां आपला रथ जोडून आपल्या नित्याच्या प्रयाणाला निघालां आहां, आणि तुमच्या रथांत मध भरलेला असतो, आणि तो मध ज्यावर पडेल त्याचे मनोरथ सिद्धीस जातात; त्यापेक्षां हे जे आमचे राजे युद्धास जात आहेत, त्यांजवर तो मध प्रोक्षण करा. आम्हीं केलेली प्रार्थना पूर्ण करून आम्हांला संग्रामांत यश द्या; आणि शत्रूचीं अनेक प्रकारचीं जीं धनें, तीं आम्हांस लूट मिळतील असें करा.' कांहीं तरी वास्तविक अथवा काल्पनिक युद्धप्रसंगाला अनुलक्षून ही ऋचा म्हटली आहे असें समजून इचा अर्थ केला पाहिजे.

'पराक्रमी'=' वृषणम्.' म्हणजे बळकट, न मोडणारा, जिकडे तिकडे मोठ्या पराक्रमानें जणुं जाणारा, असा.

[ आपल्या ] मधुर घृतानें=' मधुना घृतेन.' म्हणजे जो पौष्टिक मध तुमच्या रथांत नित्य भरलेला असतो, आणि रथ जाऊं लागला म्हणजे त्यांतून थपथप जो पडत असतो, त्याणें. सू. ३४ मं. ३ आणि सू. ११२. मं. २१, आणि टिपा पहा.

**आ नु ऊर्जं वहतमश्विना युवं मधुमत्या नः कशया मिमिक्षतम् ।**
**प्रायुस्तारिष्टं नी रपांसि मृक्षतं सेधतं द्वेषो भवतं सचाभुवा ॥४॥**

आ । नः । ऊर्जम् । वहतम् । अश्विना । युवम् । मधुऽमत्या । नः । कशया । मिमिक्षतम् ।
प्र । आयुः । तारिष्टम् । निः । रपांसि । मृक्षतम् । सेधतम् । द्वेषः । भवतम् । सचाऽभुवा ॥ ४ ॥

---

(=सकलसौभाग्योपेतः ) [ स रथो ] नः द्विपदे चतुष्पदे (=अस्माकं पुत्रादिप्रजायै पशुजाताय च ) शम् आ वक्षत् (=कल्याणम् आवहतु ) ॥

अर्वाङ् अस्मदभिमुखः ...... । त्रिवन्धुरः निम्नोन्नतकाष्ठत्रयोपेतः । इत्यादि सायणः ॥

---

## भाषायाम्.

४. हे अश्विना (=अश्विनौ ), युवं (=युवां ) नः (=अस्मभ्यम् ) ऊर्जम् (=अन्नम् ) आ वहतम् ( =आनयतम् ) । [ अपि च ] मधुमत्या कशया (=मधुयुक्तेन प्रतोदेन ) नः (=अस्मान् ) मिमिक्षतं (=सिञ्चतम् ) । [ अस्माकम् ] आयुः प्र तारिष्टम् (=प्रातारिष्टं=प्रवर्धयतम् ) , [ अस्माकं ] रपांसि निर्मृक्षतम् (=दुःखानि निःशेषेणापगमयतम् ) । द्विषः (=द्वेष्टॄन् ) सेधतं (=प्रतिषेधतं=नाशयतम् ) । [ अपि च] [ अस्माकं ] सचाभुवा (=सचाभुवौ=अस्माकं सह गच्छन्तौ=रक्षणार्थं सदैवास्माकं समीपे वर्तमानौ ) भवतम् ॥

---

'आमचा क्षत्रियसमुदाय '=' नः क्षत्रम्. ' म्हणजे आमचे जे राजे लढण्यास जात आहेत, ते.

उत्तरार्धांत केलेली प्रार्थना लक्ष्यांत ठेवण्या जोगी आहे. वेदकाळचे ऋषि (म्हणजे कवि) व्यवहारदक्ष होते, आणि ते गिरिगव्हरीं राहत नसत अशाविषयीं हें एक उत्तम उदाहरण होय.

३. ' ज्याला तीन चाकें आहेत, ज्यांत मध असतो, ज्याला चपळ घोडे जोडिलेले असतात, आणि ज्याची सर्व लोक स्तुति करितात, ज्याला तीन दांडी असतात, ज्यांत धन भरपूर भरलेलें असतें, आणि जो सर्व सौभाग्यांनीं युक्त, तो अश्वींचा रथ आम्हांकडेस येओ, आणि येतांना आम्हांस आमच्या पुत्रपौत्रादिक द्विपदांस आणि गाई, घोडे, इत्यादि चतुष्पदांस सुख घेऊन येओ. '

' तीन चाकी '=' त्रिचक्रः.' सू. ११८ मं. २ पहा.

**४. हे अश्वी हो, तुम्ही आम्हांला अन्न घेऊन या [ आणि ] मधानें भरलेल्या चाबकानें आम्हांला भिजवा. तुम्ही आमचें आयुष्य वाढवा, [ आमचे ] व्याधि नाहींसे करा, आमच्या द्वेष्ट्यांचें निवारण करा. [ आणि ] आमचे पाठराखे व्हा.**

4. Bring to us food, O As'vins, [and] sprinkle us with your honeyed whip. Prolong [our] lives. Wipe off [our] diseases. Ward off [our] enemies. Be our champions.

'मधु वाहून नेणारा '=' मधुवाहनः.' सू. ४७ मं. ४ पहा.

'तीन दांड्यांचा '=' त्रिवन्धुरः. ' सू. ४७ मं. २ पहा.

वृत्तासाठीं ' जीराशुओ ' असें दुसऱ्या पादांत म्हणावें लागतें.

४. ' हे अश्वींनो, तुम्ही आपल्या रथांत आम्हांसाठीं अन्न भरून आणा. तुमच्या रथाचे सर्व अवयव आणि तत्संबंधी सर्व वस्तु मधानें भरलेल्या आहेत, त्यापेक्षां तुमचा चाबूक आम्हांवर हालवून त्यांत असलेला मध आम्हांवर टाका. आमचें आयुष्य वाढवून आम्हांस निर्व्याधि आणि निःशत्रु करून, सदैव रक्षण करण्यासाठीं आम्हांबरोबर असा.'

' मधानें भरलेल्या चाबकानें आम्हांस भिजवा '=' मधुमत्या नः कशया मिमिक्षतम्. ' अश्वींच्या रथावर मधु असतो, तेव्हां त्यांचा चाबूक सुद्धां मधानें चिपचिपीत भिजलेला असतो, आणि तो हालविल्याबरोबर त्यांतून मध गळतो, अशी समजूत आहे.

' तुम्ही आमचें आयुष्य' इ०. सू. ३४ मं ११ याचा उत्तरार्ध आणि या ऋचेचा उत्तरार्ध हे एकच आहेत. तो मंत्र पहा.

युवं ह गर्भं जगतीषु धत्थो युवं विश्वेषु भुवनेष्वन्तः ।
युवमग्निं च वृषणावपश्च वनस्पतींरश्विनावैरयेथाम् ॥ ५ ॥
युवम् । ह । गर्भम् । जगतीषु । धत्थः । युवम् । विश्वेषु । भुवनेषु । अन्तरिति ।
युवम् । अग्निम् । च । वृषणौ । अपः । च । वनस्पतीन् । अश्विनौ । ऐरयेथाम् ॥ ५ ॥
युवं ह स्थो भिषजा भेषजेभिरथो ह स्थो रथ्या३ राथ्येभिः ।
अथो ह क्षत्रमधि धत्थ उग्रा यो वां हविष्मान्मनसा ददाश ॥६॥
॥ २७ ॥ २ ॥
युवम्। ह । स्थः । भिषजा । भेषजेभिः । अथो इति । ह । स्थः। रथ्या । रथ्येभिरिति रथ्येभिः ।
अथो इति । ह । क्षत्रम् । अधि । धत्थः । उग्रा । यः । वाम् । हविष्मान् । मनसा । ददाश ॥ ६ ॥ २७ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

५. [ हे अश्विनौ ], युवं ह (=युवां खलु ) जगतीषु (=गमनसमर्थासु गोषु ) गर्भं धत्थः (=गर्भं स्थापयथः ) । युवं (=युवां ) विश्वेषु भुवनेषु अन्तः (=सर्वेषु भूतेषु मध्ये ) [ गर्भं धत्थः ] । [ अपि च ] हे वृषणौ (=वीर्यवन्तौ ) अश्विनौ, युवं (=युवाम् ) अग्निं च अपश्च वनस्पतींश्च ऐरयेथाम् (=अग्निम् उदकानि तथा ओषधीश्च अस्मान् प्रति प्रेरयथः=वयं तत्सर्वं यथा लभेमहि तथा कुरुथः ) ॥

६. युवं ह (=युवां खलु ) भेषजेभिः (=औषधैर् ) भिषजा (=भिषजौ=वैद्यौ ) स्थः । अथो ह (=अपि च ) रथ्येभिः (=रथ्यैः=रथवोढृभिः=रथवहनकुशलैरश्वैः ) रथ्या (=रथ्यौ=रथवन्तौ=उत्तमरथवन्तौ) स्थः । अथो ह (=अपि च) हे उग्रा (=हे उग्रौ=उद्गूर्णबलौ=प्रबलतमौ ), यो हविष्मान् (=यो हविर्युक्त उपासको ) वां मनसा ददाश (=युवां युष्मदायत्तेन चेतसा हविर्दानादिना पूजयति ) [ तस्मिन् ] क्षत्रम् अधि धत्थः (=बलं निधत्थः=बलं स्थापयथः=तस्मै बलं प्रयच्छथः ) ॥

हशब्दोऽश्विनौ हि देवानां भिषजावित्यादिप्रसिद्धिद्योतनार्थः । ...,.. अथो ह रथो रथ्या ...... । आ वां रथो अश्विनेत्यादिप्रसिद्धिद्योतनार्थो हशब्दः ।

५. [ हे अश्वी हो ], तुम्ही गाईंमध्यें गर्भ घालीत असतां, तुम्ही सकळ भूतांमध्यें [ गर्भ घालीत असतां ]. हे वीर्यवंत अश्वी हो, तुम्ही अग्नीला आणि उदकांला आणि वनस्पतींला [आम्हांकरितां] पाठवून देत असतां.

5. You put the fœtus in the cows, you in the womb of all creatures. You send, O brave As'vins, Agni and the waters, and the plants.

६. [ हे अश्वी हो ], तुम्ही औषधांच्या योगानें वैद्य आहां, आणि तुम्ही रथयोग्य अश्वांच्या योगानें उत्तम रथ हाकणारे आहां. आणि हे प्रबळ अश्वी हो, जो यजमान तुम्हांला मन:पूर्वक हविर्दान देऊन भजतो, त्याच्या आंगीं तुम्ही बळ घालीत असतां.

6. You, [ O As'vins ], are physicians with your medicaments, and you are also charioteers with your chariot-horses. And you bestow power [ on him ], O mighty [ As'vins ], who serves you with oblations with a [ devoted ] mind.

---

५. 'हे अश्वी हो, तुम्ही गाई आणि दुसरीं सर्व भूतें यांच्या आंगीं गर्भ राही असें करितां. आणि आम्हांला अग्नि, उदकें आणि वनस्पति, म्हणजे झाडें इत्यादि, यांचा लाभ होई आणि त्यांपासून आमचें कल्याण होई, असें करितां.'

'तुम्ही गाईंमध्यें गर्भ घालीत असतां '=' गर्भं जगतीषु धत्थ:.' म्हणजे गाई इत्यादिक जे स्त्रीजातीचे प्राणी, ते असें विवक्षित आहे. ऋ. १०. १८४. २ यांत गर्भाधानाच्या वेळीं अश्वीस प्रार्थना आहे कीं, 'अश्वी देव गर्भधारण करवोत '=' गर्भं ते अश्विनौ देवौ आ धत्तां पुष्करस्रजा.' अथर्ववेद १४. २. ५ यांत अश्वींला नवरा म्हणतो 'हे अश्वी हो, तुमच्या प्रसादेंकरून आमच्या अंत:करणांत कामेच्छा रममाण होओत '=' अश्विना हत्सु कामा अरंसत.' आणि अथर्ववेद २. ३०. २ यांत पुरुष म्हणतो, 'हे अश्वी हो, तुम्ही दोघां प्रियांस जवळ आणा, दोघांचा संग करवा '=' सं चेन्नयाथो अश्विना कामिना सं च वक्षथ:.'

'[ आम्हांकरितां ] पाठवून देत असतां '=' ऐरयेथाम्.' म्हणजे आम्हांकडे पाठवून देतां, आम्हांस त्यांची प्राप्ति करून देत असतां.

वृत्तासाठीं 'भुवनेषु अन्त:' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १५८.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अश्विनौ देवता । त्रिष्टुप् छन्दः । अन्त्या त्वनुष्टुप् ॥

**वसू रुद्रा पुरुमन्तू वृधन्ता दशस्यतं नो वृषणावभिष्टौ ।**
**दस्रा ह यद्रेक्ण औचथ्यो वां प्र यत्सस्राथे अकवाभिरूती ॥ १ ॥**

वसू इति । रुद्रा । पुरुमन्तू इति पुरुऽमन्तू । वृधन्ता । दशस्यतम् । नः । वृषणौ । अभिष्टौ ।
दस्रा । ह । यत् । रेक्णः । औचथ्यः । वाम् । प्र । यत् । सस्राथे इति । अकवाभिः । ऊती ॥ १ ॥

---

अनयो रथेन विशेषसंबन्धो युवोर्हि पूर्वं सवितोषसा रथम् ऋताय चित्रं घृतवन्तमिष्यति ( ऋ. १. ३४. १० ) इत्यादिमन्त्रान्तरेषु प्रसिद्धः । इत्यादि सायणपादाः ॥

---

### भाषायाम्.

१. हे वृषणौ (=सेचनसमर्थौ=वीर्यवन्तौ ) [ अश्विनौ ], अभिष्टौ (=अस्माकम् अभिगमने सति=अस्मासु साहाय्यार्थं वामभिगतेषु सत्सु ) वसू (=उदारौ ) रुद्रा (=संग्रामे विजयिनौ ) पुरुमन्तू (=बहुप्रज्ञौ ) वृधन्ता ( =वृधन्तौ=प्रवृद्धौ=महान्तौ) [ युवां ] नः दशस्यतम् (=अस्मभ्यं धनादिकं प्रयच्छतम् ) । यद्ध (=यस्मात् कारणात् खलु ) हे दस्रा (=दस्रौ=शत्रूणामुपक्षपयितारौ ), यद् (=यदा ) औचथ्यः (=उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा मद्रूपो ) वां रेक्णो [ याचते ] (=युवां धनार्थं प्रार्थयते) [ तदा ] [ युवाम् ] अकवाभिः ऊती (=अकवाभिरूतिभिः अकुत्सितै रक्षणैः=समृद्धैः संरक्षणैः सह ) प्र सस्राथे (=प्रकृष्टं गच्छथः=तं प्रति सत्वरमागच्छथः) ॥

---

१. 'हे अश्वी हो, तुम्हांजवळ उत्तम औषधें आहेत, त्यामुळें तुम्ही उत्तम वैद्य आहां. तुम्हांजवळ उत्तम घोडे आणि उत्तम रथ आहेत, आणि तुम्ही रथ हाकण्याविषयीं अति कुशळ आहां. आणि जो कोण उपासक तुम्हांला हवि देऊन भजेल, त्याला तुम्ही उत्तम बळ प्राप्त करून देतां.'

'वैद्य आहां'=' भिषजा स्थः' सू. ११२ मं. १६ आणि टीप पहा.

'उत्तम रथ हाकणारे'=' रथ्या.' सू. ३४ मं. १० पहा.

वृत्तासाठीं 'रथिआ रायिएभिः' असें म्हणावें.

## सूक्त १५८.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अश्वी देव. वृत्त—त्रिष्टुभ्. शेवटची ऋचा मात्र अनुष्टुभ् वृत्ताची.

१. हे वीर्यवन्त [ अश्वी ] हो, दयाळू, शूर, अतिशयेंकरून बुद्धिमान्, [ आणि ] महान् [असे जे], ते तुम्ही तुम्हांप्रत आम्हीं याचना केली म्हणजे आमची मनकामना पूर्ण करा. कारण कीं उचथ्याचा पुत्र जेव्हां तुम्हांपाशीं धन [ याचितो ] तेव्हां, हे महाश्चर्यकारी [ अश्वी ] हो, तुम्ही आपल्या उदार रक्षणांसहित धांवत येत असतां.

## Hymn 158.

To the *As'vins.* By *Dirghatamas,* the son of *Uchathya.* Metre—*Trishtubh,* except the last verse where it is *Anushtubh.*

1. O brave As'vins, when we approach you with a prayer, be you gracious unto us—you who are benevolent, victorious, exceedingly wise, [ and ] great. For when the son of Uchathya [ prays ] you for wealth, you come forward with liberal helps, O performers of miraculous deeds!

---

१. 'हे अश्वी हो, आम्ही तुमच्या साहाय्यार्थ जेव्हां तुम्हांपाशीं हात जोडून उभे राहूं, तेव्हां तुम्हीं आम्हांस अभीष्ट असलेलें देऊन आमची मनकामना पूर्ण करीत जा. तुम्ही आजपर्यंत तसें केलेंच आहे. कारण जेव्हां जेव्हां हा उचथ्याचा मुलगा ( मी दीर्घतमा ) तुम्हांजवळ द्रव्य मागतो, तेव्हां तेव्हां तुम्ही भरपूर साहाय्य घेऊन हाकेसरशीं धांवत येत असतां.'

'आम्हीं तुम्हांप्रत याचना केली म्हणजे' = 'अभिष्टौ.' 'अभिष्टि' शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आला आहे, तीं सर्व स्थळें पाहून हें भाषांतर आम्हीं येथें केलें आहे. 'अभिष्टि' म्हणजे 'साहाय्य' इतकाच अर्थ सर्वत्र पाश्चात्य करितात. परंतु सायणांनींच जरी तो अर्थ एक दोन स्थळीं ( ऋ. ८. ६८. ५. चें भाष्य पहा) दिला आहे, तरी सर्वत्र तो जुळत नाहीं. केव्हां केव्हां येथें केल्यासारिखा अथवा 'अभीष्टलाभ' असा अर्थ करावा लागतो असें आम्हांस वाटतें.

'कारण कीं......जेव्हां' = 'यत्......यत्.' हा जो दोन ठिकाणीं आलेला 'यत्'शब्द, त्याचा निर्वाह दुसऱ्या रीतीनें दिसत नाहीं. तिसऱ्या पादांत क्रियापद नाहीं, तें कोणतें घ्यावें तें समजत नाहीं, त्यामुळें ही अडचण आहे.

**को वां दाशत्सुमतये चिदस्यै वसू यद्धेथे नमसा पदे गोः।**
**जिगृतमस्मे रेवतीः पुरंधीः कामप्रेणेव मनसा चरन्ता ॥ २ ॥**

कः। वाम्। दाशत्। सुऽमतये। चित्। अस्यै। वसू इति। यत्। धेथे इति। नमसा। पदे। गोः।
जिगृतम्। अस्मे इति। रेवतीः। पुरम्ऽधीः। कामप्रेणऽइव। मनसा। चरन्ता ॥ २ ॥

**भाषायाम्.**

२. हे वसू (=उदारौ), यत् (=यौ) [सुमतिम्=अनुग्रहं] नमसा (=केवलेन नमस्कारेण द्वारा) गोः पदे (=वेदिरूपाया गोः स्थाने=देवयजनदेशे) धेथे (=कुरुथः) अस्यै चित् सुमतये (=तस्या अपि सुमतये=तस्मा अपि अनुग्रहाय) [यावत् पर्याप्तं भवति तावत्] को वां दाशत् (=को युवां हविरादिना पूजयितुं शक्नुयात्)? [न कोपि]। [अतः कारणात्] [हविर्दानादिपूजेच्छुषु) अस्मे (=अस्मासु) कामप्रेणेव मनसा चरन्ता (=कामपूरकेणेव हेतुना गच्छन्तौ=पृथिवीं प्रदक्षिणीकुर्वन्तौ) [युवां] रेवतीः पुरंधीः (=धनवतीः स्तुतीः=धनसंपत्फलवतीनां स्तुतीनां करणसामर्थ्यं) जिगृतं (=प्रबुध्यतं=वयं प्रबुद्धाः सन्तः प्रातःकाले तादृशीः स्तुतीर्यथा कुर्मस्तथा कुरुतम्)॥

वां युवयोः संबन्धिन्या अस्यै वक्ष्यमाणरूपायै सुमतये चित् शोभनबुद्ध्यै।......। स्वल्पेनैव हविषा महत्फलप्रदानरूपाया ईदृश्या अपि बुद्ध्यै प्रीणनाय को दाशत्। को दद्यात्। दातुं शक्नुयात्। युवयोः प्रभावस्यातिमहत्त्वादिति भावः।... कथं मतेः सौष्ठवमिति तदुच्यते। यद्यस्मात्कारणाद्गोः पदे ...... वेदिरूपायाः स्थाने ...... अस्माभिः प्रार्थितौ सन्तौ नमसा हविर्लक्षणेन यवमात्रप्रकारेणान्नेन धेथे। धारयथो बहुप्रदानविषयां बुद्धिम्। इत्यादि सायणः॥

कदाचित् 'कारण की, हे महापराक्रमकारी अश्वी हो, उचथ्याचा पुत्र तुम्हांपाशीं धन [याचितो आणि तें त्याला मिळतें], [आणि] कारण कीं तुम्ही आपल्या उदार संरक्षणांसहित धांवत येत असतां,' असें उत्तरार्धाचें भाषांतर केलें पाहिजे.

वृत्तासाठीं 'औचथिओ' असें वाचावें लागतें.

२. हे उदार [अश्वी] हो, तुमच्या ह्या अनुग्रहासाठीं तरी कोण तुम्हांला भजूं शकतो, कीं जो [अनुग्रह] तुम्ही केवळ नमस्काराच्या द्वारें वेदीच्या स्थळीं करीत असतां? मनकामना पूर्ण करण्याच्या हेतूनें जणुं भ्रमण करणारे असे जे तुम्ही, ते धन प्राप्त करून घेणाऱ्या स्तुति आमच्या आंगीं जागृत करा.

2. Who can, O liberal [As'vins], sacrifice to you even for this favour which you show at the altar for a mere obeisance? Awaken then in us you, who traverse [the earth] as if with the object of gratifying [your worshippers] desires, prayers that shall be crowned with wealth.

---

२. 'हे अश्वी हो, तुम्ही आमच्या वेदीवर येऊन केवळ आमचा नमस्कार स्वीकारून आम्हांवर जे अनेक अनुग्रह सहज करितां, त्या अनुग्रहांस योग्य इतकी तरी तुमची नमस्काररूप सेवा करण्याची शक्ति कोणाला आहे? विशेष सेवा स्तोत्रादिक तर राहूं दे, पण तुमची साधारण नमस्काररूप सेवा कशी करावी हें सुद्धा ठाऊक नाहीं; कारण तुमचा प्रभाव मोठा आहे त्यामुळें तुमची कीर्ति कशी गावी, तुमची स्तुति कशी करावी हें कोणास ठाऊक नाहीं. यास्तव तुमची स्तुति करण्याची आमची इच्छा आहे, ती तुम्ही स्तुति करण्याची शक्ति आमचे आंगीं प्रेरून पूर्ण करा. आणि तशी स्तुति आम्हीं केली म्हणजे आम्हांला धनसंपत्ति सहज मिळूं शकतील.' असा भावार्थ आहे.

'वेदीच्या स्थळीं'=' पदे गोः.' 'पदे गोः' (=गाईचें स्थान) हें वेदीचें, म्हणजे यज्ञांत देवांस जेथें बसवीत त्या स्थळाचें, नांव दुसऱ्या ठिकाणी आलें आहे. ह्या अक्षरार्थापासून असा पर्यवसित अर्थ कसा आला, हें निर्विवाद सांगणें कठिण आहे.

'भ्रमण करणारे'=' चरन्ता.' सविता, उषा इत्यादिक जसे देव सकाळीं उगवून भ्रमण करणारे, तसे अश्वीहि होत.

'जागृत करा'=' जिगृतम्.' म्हणजे आम्ही निजलों असतां आम्हांस प्रातःकाळीं उठवून आम्हांकडून तसल्या स्तुति म्हणवा. अश्वी देव प्रातःकाळीं येणाऱ्या देवांपैकीं आहेत म्हणून असा प्रयोग केला आहे. ऋ. ४. ५०. १२ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

युक्तो ह यद्वां तौग्र्याय पेरुर्वि मध्ये अर्णसो धायि पज्रः ।
उप वामवः शरणं गमेयं शूरो नाज्म पतयद्भिरेवैः ॥ ३ ॥

युक्तः । ह । यत् । वाम् । तौग्र्याय । पेरुः । वि । मध्ये । अर्णसः । धायि । पज्रः ।
उप । वाम् । अवः । शरणम् । गमेयम् । शूरः । न । अज्म । पतयत्ऽभिः । एवैः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ हे अश्विनौ ], यत् (=यस्मात् कारणात् ) वां (=युवयोः) पेरुः (=पारणकुशलः=अतिशयेन वेगवान् ) पज्रः (=प्रबलो ) [ रथस् ] तौग्र्याय (=तुग्रपुत्रार्थं ) युक्तो ह अर्णसो मध्ये वि धायि (=युक्तमात्र एव समुद्रस्य मध्ये स्थापितोभूत्=यदा युक्तोभूत् तदानीमनन्तरेणेव तौग्र्योद्धारार्थं समुद्रमध्ये गतोभूत् ) [ तस्मात् कारणात् ] शूरो न अज्म पतयद्भिः एवैः (=यथा कश्चिच्छूरः पक्षिवदुत्पतद्भिरश्वैराजिधावनं शीघ्रं करोति तथा ) वाम् अवः शरणम् उप गमेयं (=युवयोः संरक्षणरूपं शरणं शीघ्रं प्राप्नुयाम्=युवयो रक्षणं शीघ्रं गच्छेयं तत्र च शरणे तिष्ठेयम् )॥

सायण एवं व्याचष्टे । अत्रेतिहासमाहुः। तौग्र्यनामकं राजानं युद्धे शत्रवः पराभाव्य पाशैर्दृढं बद्ध्वा समुद्रमध्ये प्रचिक्षिपुः । स चोत्तरीतुमशक्तः सन् अश्विनौ तुष्टाव । तौ च तुष्टौ शीघ्रमेव रथमश्वैर्योजयित्वा समुद्रमागत्य तमुत्तार्यापालयतामिति । अयमर्थोऽजोहवीदश्विना तौग्र्य इत्यादि मन्त्रान्तरे प्रसिद्धः । सोऽत्रोच्यते । हे अश्विनौ वां युवयोः संबन्धी पेरुः पारणकुशलो रथो युक्तो ह । अश्वैर्युक्तः खलु । हशब्दो मन्त्रान्तरप्रसिद्धिद्योतनार्थः। स चोदाहृतः । कस्मै । तौग्र्याय । एतन्नाम्ने राज्ञे । तद्बन्धमोचनार्थम् । कुत्रेति तदुच्यते । अर्णसोऽम्भसो मध्ये समुद्रस्य मध्ये । स च पज्रः पाजसा बलेन तीर्णः सन् विधायि । धारितः स्थापितः । यस्मादेवं तस्माद्वां युवयोर्युवो रक्षणं शरणमुपगमेयम् । संप्राप्नुयाम् । ऐहिकदुःखाद्विमुक्तो युष्मत्स्थानं संभजेयम् । गतौ दृष्टान्तः । पतयद्भिरेवैरश्वैः शूरो न शूर इव । स यथाज्म जित्वा निर्भयं स्वगृहं प्राप्नोति तद्वत् । इति ॥

३. [ हे अश्वी हो ], ज्यापेक्षां तुमचा अति वेगवान् [आणि] महा बळवान् रथ जोडून तुग्रपुत्रासाठीं समुद्राच्या मध्यभागीं ठेविला गेला, त्यापेक्षां मी, उडणाऱ्या घोड्यांनीं एकादा शूर शर्यत [धांवतो ] तसा, धांवून तुमच्या रक्षणाचा आश्रय पावेन असें करा.

3. Inasmuch as your swift [and] mighty chariot, so soon as the horses were joined to it, was placed in the middle of the surging ocean for the son of Tugra, may I reach the shelter of your protection [swiftly] as a hero [runs his] race by means of flying horses.

---

३. 'हे अश्वी हो, तुमाचा पुत्र समुद्रांत बुडत असतां तुम्ही आपला अतिवेगवान् रथ जोडून, जोडिला न जोडिला इतक्यांतच समुद्राच्या मध्यभागीं नेऊन ठेविला, आणि त्याचा उद्धार केला. तर याप्रमाणें भक्तांचें संरक्षण करण्यास धांवणारे असे जे तुम्ही, ते मला आपल्या संरक्षणदात्या आश्रयाप्रत घेऊन जा —जसा एकादा शूर, पक्ष्यासारिख्या चपळ घोड्यांनीं शर्यत धांवून, नेमलेल्या जागीं जाऊन पोंहचतो, तसा मी तुमच्या आश्रयाप्रत पोंहचेन असें करा.'

'तुग्रपुत्रासाठीं'=' तौग्र्याय.' सू. ११७ मं. १५ पहा.

'एकादा शूर' इ०. यावरून हें उघड दिसतें कीं, वेदकाळचे आर्य लोक शर्यती खेळण्यांत कुशळ असत, आणि शर्यती धांवण्यासाठीं फार चपळ घोडे ठेवीत असत. शर्यती खेळत याविषयीं हा इतकाच मंत्र आहे असें नाहीं, पण दुसरेहि मंत्र आहेत. आमच्या आधुनिक स्थितीकडेस पाहिलें तर, कोण म्हणेल कीं ज्या आर्य लोकांनीं वेद रचिले आणि ज्यांविषयीं त्यांत सांगितलें आहे, त्या आर्य जनांचे वंशज आम्ही हिंदू लोक नहोंत, तर पश्चिमेकडील जे इंग्रेज, इत्यादि लोक तेच मात्र होत !

तृग्रासाठीं 'तौग्रिआय,' 'मधिए' आणि 'शूरो न अज्म' असें वाचावें लागतें.

उप॑स्तुतिरौचथ्यमु॑रुष्येन्मा मामि॒मे प॑त॒त्रि॒णी॒ वि दु॑ग्धाम् ।
मा मामे॒धो दश॑तयश्चि॒तो धा॒क् प्र यद्वां॑ ब॒द्धस्त्मनि॒ खाद॑ति॒ क्षाम् ॥ ४
उप॑ऽस्तुतिः । औ॒च॒थ्यम् । उ॒रु॒ष्येत् । मा । माम् । इ॒मे इति॑ । प॒त॒त्रि॒णी इति॑ । वि । दु॒ग्धा॒म् ।
मा । माम् । एधः॑ । दश॑ऽतयः । चि॒तः । धा॒क् । प्र । यत् । वा॒म् । ब॒द्धः । त्मनि॑ । खाद॑ति । क्षाम् ॥ ४ ॥

## भाषायाम्.

४. उपस्तुतिः (=मयोपेत्य कृता स्तुतिः) औचथ्यम् (=उचथ्यस्य पुत्रं माम्) उरुष्येत् (=रक्षतु) । इमे पतत्रिणी (=इमे पक्षिवच्छीघ्रं गच्छती अहोरात्रे) मां मा वि दुग्धां (=" विशेषेण दोहगतसारं मा कार्ष्टां=प्राणनिर्गमनानुकूल्यं मा कुरुताम् ") । मां दशतयः (=दशगुणितश्) चितः (=संचित) एधः (=प्रज्वालितेन्धनसंघो) मा धाक् (=मा दहतु) यत् (=यस्मात्) वां (=युवयोः संबन्धी) [मद्रूपो जनो] बद्धः (=पाशबद्धः सन्) त्मनि (=आत्मनि=आत्मना) क्षां प्र खादति (=भूमिं भक्षयति=" गन्तुमशक्तः सन् भूमौ परिलुठति ") ॥

सायण एवमाह । अत्राख्यानमाहुः । जरारहितगात्रं जात्यन्धं दीर्घतमसं मामतेयं वरिवसितुमशक्नुवानाः स्वगर्भदासा अग्नौ प्रदाहाय प्रचिक्षिपुः । तत्र क्षिप्तोऽश्विनावस्तावीत् । तौ चैनमरक्षताम् । ततोऽप्यम्रियमाणमुदकेष्वपातयन् । तत्र निमग्नः पुनरश्विनौ तुष्टाव । तुष्टौ सन्तौ तौ जलादुदहार्ष्टाम् । एवमवध्यं तं त्रैतनो नामकः कश्चिद्दासोऽस्य शिरो वक्षश्च वितक्षत् । ततोऽप्यपालयतामिति । तदिदमृग्द्वयाभ्यामुच्यते । इति ॥

४. उचथ्याच्या पुत्राला स्तुति रक्षो. मला ह्या पक्ष्यांसारिख्या दोघी पिळून नीरस न करोत. दसपट लांकडाचा ढीग मला जाळून न टाको. कारण तुमचा [ हा ] [ पाश]बद्ध [ उचथ्यपुत्र ] आपणच माती खात आहे.

4. May the hymn preserve the son of Uchathya. May this winged couple never deprive me of my sap. May the tenfold pile of wood never burn me, as your bound slave is eating the earth in himself.

४. 'हे अश्वी हो, मी तुमची स्तुति केली आहे, तिच्या योगानें माझें संरक्षण होओ. ह्या पक्ष्याप्रमाणें चालणाऱ्या ज्या दिवस आणि रात्र, त्या मला रसहीन न करोत. मला लांकडांचा ढीग न जाळो. मी जमिनीवर लोळत आहें.'

सायणाचार्य म्हणतात, या सूक्ताचा कर्ता दीर्घतमा ऋषि जन्मापासून अंध असून म्हातारा झाला, आणि त्याचे गुलाम त्याला संभाळून संभाळून त्रासले; तेव्हां त्यांनीं त्याला जाळण्यासाठीं अग्नीत टाकिलें. त्यानें अश्वींची स्तुति केल्यावरून तो सुखरूप बाहेर निघाला. तेव्हां त्यांणीं त्यास पाण्यांत टाकून दिलें. तेथूनहि अश्वींनीं त्याची मुक्ति केली. नंतर त्रैतन नांवाचा गुलाम होता, त्याणें त्याचें शिर कापिलें; तेव्हांहि अश्वींनीं त्याला रक्षिलें. ती कथा ही आणि पुढची या दोन ऋचांत सांगितली आहे. असें म्हणतात.

पण या कथेच्या खरेपणाला कल्पनेशिवाय दुसरा आधार थोडाच दिसतो. कारण दुसऱ्या एका मंत्रांत दीर्घतमा हा आंधळा कसा झाला आणि त्याचें आंध्य कसें गेलें तें सांगितलें आहे, त्यावरून तो म्हातारा झाला तेव्हां जन्मांध राहिला असें म्हणणें संभवत नाहीं. ह्या सर्व कथा 'दीर्घतमा' या नांवावरून आणि प्रस्तुत ऋचां सारिख्या ऋचांवरून रचिल्या गेल्या असें दिसतें.

'दोघी.' म्हणजे दिवस आणि रात्र ह्या दोघी. त्या नीरस न करोत, म्हणजे मला म्हातारा न करोत, असें दिसतें.

'दसपट लांकडांचा ढीग'='दशतयश्चित एधः' म्हणजे प्रेत जाळावयाची चिता कीं काय ?

'माती खात आहे'='प्र खादति क्षाम्.' म्हणजे भूमीवर लोळत आहे असा अर्थ सायण करितात. पण तो वरील कथेस अनुसरून केला आहे. आमचें भाषांतर अक्षरशः आहे.

वृत्तासाठीं 'औचथिअम्' असें वाचावें.

न मा गरन्नद्यो मातृतमा दासा यदीं सुसमुब्धमवाधुः ।
शिरो यदस्य त्रैतनो वितक्षत्स्वयं दास उरो अंसावपि ग्ध ॥ ५ ॥

न । मा । गरन् । नद्यः । मातृऽतमाः । दासाः । यत् । ईम् । सुऽसंमुब्धम् । अवऽअधुः ।
शिरः । यत् । अस्य । त्रैतनः । विऽतक्षत् । स्वयम् । दासः । उरः । अंसौ । अपि । ग्धेति ग्ध ॥ ५ ॥

## भाषायाम्.

५. यद् ईं (=यद्यपि) दासाः (=? नाशका) [मां] सुसमुब्धं (=सुष्ठु संकुचित-सर्वाङ्गं) [कृत्वा] अवाधुः (=अवक्षिप्तवन्तः सन्ति) [तदपि] मातृतमा नद्यः (=अतिशयेन मातृवद्वत्सला नद्यो) मा (=मां) न गरन् (=मा भक्षयन्=मा भक्षयन्तु=मा मग्नं कुर्वन्तु)। [अपि च] यद् (=यद्यपि) अस्य (=पुरो दृश्यमानस्य मम) शिरस्त्रैतनः (=एतन्नामा दासो) वितक्षत् (=विशेषेणातक्षत्=छिन्नवानस्ति) [तदपि] [स] दासः स्वयम् उरः अंसौ (=स्वकीयमेवोरःस्थलं बाहू च) अपि ग्ध (=हन्तु)॥

सायणस्त्वेवमाह। नद्यो नदनशीला मातृतमा मातृवज्जगतो हितकारिण्य आपो मा मां दीर्घतमसं गरन्। न गिरेयुः। निमग्नं मा कुर्युः। गॄ निगरणे। लेटि व्यत्ययेन शप्। गिरणप्राप्तिं दर्शयति। यद्यस्माद्दासा अस्मदुपक्षपयितारो मदीयगर्भदासा ईमेनं दीर्घतमसं मां सुसमुब्धं सुष्ठु संकुचितसर्वाङ्गम्। स्वती पूजायामिति प्रादिसमासेऽव्ययपूर्वपदप्रकृतिस्वरत्वम्। अवाधुः। अवाङ्मुखमपातयन्। किं च अस्य मम शिरः स त्रैतन एतन्नामको दासोऽत्यन्तनिर्घृणः सन् यद्यस्माद्वितक्षत्। विविधं तष्टवान्। तस्मात्स दासः स्वयं स्वकीयमेव शिरस्तक्षतु। न केवलं शिर एव अपितु मदीयमुरो वक्षःस्थलमंसौ च ग्ध। हतवान् विदारितवान् इत्यर्थः। हन्तेर्लुङि छान्दसमेतद्रूपम्। ततः स्वकीयमुरोंऽसावपि स्वशस्त्रेणैव तथा कृतवान्। तन्नुवयोर्माहात्म्यमिति भावः। इति॥

५. उत्तम माता अशा ज्या नदी त्या, दासांनीं मला बांधून आंत टाकिलें आहे तरी, मला बुडूं न देओत. त्रैतनानें जरी या [जना]चें शिर कापिलें आहे, [तरी] तो दास आपलेंच उर [आणि आपलेच] बाहू कापून घेओ.

5. May the rivers, the best of mothers, never swallow me, though the Dâsas have bound me fast and thrown me down. Though Traitana has cut my head, may the Dâsa crush his own breast and shoulders.

५. सायणांनीं या ऋचेचा अर्थ वर सांगितलेल्या कथेस अनुसरून केला आहे. ( भाषेलालीं पहा. )

वस्तुतः पाहिलें तर अक्षरार्थ उघड आहे. पण यांत 'त्रैतन' म्हणजे कोण, आणि 'दास' हे कोण, तें जर निर्विवाद सांगतां येईल, तर मग सर्व ऋचेचा अर्थ सरळ लागेल. पण 'त्रैतन' हें नांव पुनः आलेलें नाहीं. सायण म्हणतात, दीर्घतमाचे जे बंदे त्यांतून एकाचें नांव 'त्रैतन' होतें. हे दास म्हणजे कोळी, भिल्ल, रामोशी इत्यादिक अनार्य जन, ते घ्यावयाचे असतील, असें वाटतें. त्यांचा आणि दीर्घतमाचा तंटा होऊन त्यांनीं त्याला अनेक प्रकारचे उपद्रव दिले, अशा कथेला अनुलक्षून ही ऋचा लावावयाची असेल. 'दास'शब्दाविषयीं सू. १०३ मं. ३ आणि सू. ३३ मं. ४ आणि टीप पहा.

वृत्तासाठीं 'नदिओ' असें वाचावें लागतें.

दीर्घतमा मामतेयो जुजुर्वान्दशमे युगे ।
अपामर्थं यतीनां ब्रह्मा भवति सारथिः ॥ ६ ॥ १ ॥

दीर्घऽतमाः । मामतेयः । जुजुर्वान् । दशमे । युगे ।
अपाम् । अर्थम् । यतीनाम् । ब्रह्मा । भवति । सारथिः ॥ ६ ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

६. मामतेयः (=ममतायाः पुत्रो ) दीर्घतमा दशमे युगे जुजुर्वान् (=जीर्णः सन्=वृद्धो भवन् ) अर्थं यतीनाम् (=अर्थं गच्छन्तीनां=स्वकीयं प्रयोजनं प्राप्नुवतीनाम् ) अपां (=कर्मणां ) ब्रह्मा सारथिः (=ब्रह्मरूपः सारथिर् ) भवति (=लप्स्यमानफलकर्मणां यो ब्रह्मा ऋत्विग्विशेषस्तद्रूपः सारथिर्भवति ) ॥

सायणस्त्वेवमाह । दीर्घतमा एतन्नामा महर्षिः स च मामतेयो ममतायाः पुत्रो दशमे युगे दशयुगपर्यन्तं महानुभावयोरश्विनोः प्रभावात्पूर्वोक्तादुःखाद्विमुक्तोऽत्यन्तसुखी स्वपुत्रभार्यादिभिः सहितो जीवितवान् । दशमे युगेऽतीते सति जुजुर्वान् जीर्णो वलीपलितगात्रो बभूव । एवं भूतः सन् अर्थं पुरुषैरर्थ्यमानं कर्मफलं स्वर्गादिकं यतीनां प्राप्नुवतीनामपामप्कार्याणां प्रजानाम् । यद्वा अपामपसां कर्मणामर्थं प्रयोजनं यतीनां तासां प्रजानां ब्रह्मा ब्रह्मसदृशः परिवृढो भवति । किं च सारथिः तद्वन्निर्वाहको भवति । देवो भवतीत्यर्थः । एवमस्य वृत्तान्तं मन्त्रोऽनुवदति । स्वयं वा स्वात्मानं परोक्ष्येणाश्विनोर्महानुभावत्वं प्रकटयितुं ब्रवीति । इति ॥

---

६. ममतेचा पुत्र दीर्घतमा दहाव्या युगीं वृद्ध होत्साता परिणामाप्रत जाणाऱ्या कर्मांचा ऋत्विग्रूप सारथि झाला आहे.

6. Dîrghatamas the son of Mamatâ, being old in the tenth age, becomes the priest-charioteer of rites running towards their goal.

---

६. ‘ दहाव्या युगीं ममतेचा पुत्र दीर्घतमा म्हातारा होऊन, फलद्रूप होणारीं जीं उत्तम यज्ञादिक कर्मे, तेच कोणीएक रथ, ते चालविणारा उत्तम ऋत्विग्रूप सारथि झाला. ’ हा अक्षरार्थाचा भाव आहे. पण जाणून बुजून ऋषीनेंच ऋचा गूढार्थ केली आहे. त्यामुळें अक्षरार्थाच्या आंत काय असेल, तें समजत नाहीं. उदाहरणार्थ, ‘ दहावें युग ’ म्हणजे काय ? ‘ युग ’ शब्दाचा अर्थ वेदांत कृतयुगादिक युगें असा होत नाहीं, तर पिढी इतकाच होतो. (सू. १३९ मं. ८ आणि सू. ९२ मं. ११ आणि टिपा पहा).

तेव्हां ‘दहाव्या पिढींत म्हातारा होऊन’ म्हणजे तरी काय ? वेदकाळींचे ऋषि आपण शंभर वर्षे वांचलों तर मोठें भाग्य असें मानीत असत. तेव्हां दीर्घतमा दहा पिढ्या जगला असा सुद्धा खरा भावार्थ नसेल.

‘ परिणामांप्रत जाणाऱ्या ’=‘ अर्थं यतीनाम्. ’ म्हणजे ज्या इच्छेनें यज्ञादिक कर्मे करावयाचीं, ती इच्छा ज्यांत पूर्ण होणार अशीं कर्मे.

वृत्तासाठीं ‘ यतीनआं ’ असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १५९.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः। द्यावापृथिव्यौ देवता। जगती छन्दः॥

**प्र द्यावा॑ य॒ज्ञैः पृ॑थि॒वी ऋ॑ता॒वृधा॑ म॒ही स्तु॑षे वि॒दथे॑षु॒ प्रचे॑तसा।**
**दे॒वेभि॒र्ये दे॒वपु॑त्रे सु॒दंस॑से॒त्था धि॒या वार्या॑णि प्र॒भूष॑तः॥ १ ॥**

प्र। द्यावा॑। य॒ज्ञैः। पृ॒थि॒वी इति॑। ऋ॒त॒ऽवृधा॑। म॒ही इति॑। स्तु॒षे।
वि॒दथे॑षु। प्रऽचे॑तसा।
दे॒वेभिः॑। ये इति॑। दे॒वपु॑त्रे॒ इति॑ दे॒वऽपु॑त्रे। सु॒ऽदंस॑सा। इ॒त्था।
धि॒या। वार्या॑णि। प्र॒ऽभूष॑तः॥ १॥

### भाषायाम्.

१. ऋतावृधा (=ऋतावृधौ=ऋतं सत्यरूपं यजनं प्रवर्धयन्त्यौ) मही (=मह्यौ) विदथेषु प्रचेतसा (=विदथेषु प्रचेतसौ=यज्ञेषु विषयेषु प्राज्ञे) [एतादृशे] द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ) यज्ञैः (=यज्ञसाधनैर्हविर्भिः) प्र स्तुषे (=प्रकर्षेण स्तौमि) देवेभिर्देवपुत्रे (=देवैर्देवपुत्रे=देवा एव पुत्रा ययोस्तादृश्यौ) सुदंससा (=सुदंससौ=शोभनपराक्रमकर्माणौ) ये [द्यावापृथिव्यौ] इत्था धिया (=सत्यया भक्त्या द्वारा) वार्याणि प्रभूषतः (=धनानि अलंकुरुतः पूजयतः=प्रयच्छतः)॥

## सूक्त १५९.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—द्यावापृथिवी, म्हणजे द्यू आणि पृथिवी हे दोघे. वृत्त—जगती.

१. सत्य धर्माचा उत्कर्ष करणाऱ्या, विस्तीर्ण, [आणि] यज्ञांविषयीं प्रज्ञावान् अशा द्यावापृथिवी मी उपासनांच्या योगेंकरून स्तवितों. ज्या देवांच्या योगानें देवपुत्री [आणि] महाश्चर्यकारी अशा द्यावापृथिवी खऱ्या भक्तीच्या द्वारें अनेक संपत्ति देतात.

## HYMN 159.

To *Dyâvâprithivyau* (i.e. Heaven and Earth, conceived as gods). By *Dîrghatamas*, the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. I praise with offerings Heaven and Earth, who promote the true rite, who are vast, [and] endowed with wisdom as regards sacrifices: who are the parents of the gods [and] performers of wonderful deeds and bestow excellent riches in return for sincere worship.

---

१. 'यज्ञाची प्रवृद्धि करून इष्टलाभ करून देणाऱ्या, अति विस्तीर्ण, आणि यज्ञ कसा करावा तें शिकविण्याविषयीं प्राज्ञ, अशा ज्या द्यू आणि पृथिवी, त्यांस मी हव्यें अर्पण करून स्तवितों. ज्या द्यावापृथिवी प्रत्यक्ष देवांचे आईबाप होत, आणि मोठेमोठे पराक्रम करणाऱ्या असून, उपासकांनीं खऱ्या प्रेमानें भक्ति केली म्हणजे त्यांस अनेक प्रकारचीं उत्तम धनें देत असतात.'

'सत्य धर्माचा उत्कर्ष करणाऱ्या'= 'ऋतावृधा.' म्हणजे यज्ञ हाच जो सत्य धर्म, त्याचा उत्कर्ष, म्हणजे त्याची प्रवृद्धि, करून तो करणाऱ्यांचें कल्याण करणाऱ्या.

'उपासनांच्या योगेंकरून'='यज्ञैः.' म्हणजे यजनरूप ज्या उपासना, त्यांसहित.

द्यावापृथिवी म्हणजे द्युलोक आणि पृथिवी ह्या दोन देवता. द्यू विषयीं सू. ७१ मं. ५ आणि टीप पहा. द्यू हा सकल देवांचा बाप, आणि पृथिवी ही माता असें वर्णन वेदांत येत असतें. सविता, उषा, वरुण, अश्वी देव इत्यादि द्यू आणि पृथिवी यांच्याच उदरीं वस्तुतः जन्मतात (म्हणजे प्रातःकाळीं उगवतात) म्हणून त्यांस (द्यू आणि पृथिवी यांस) देवांचे आईबाप म्हणतात. ह्या द्यूला द्यौष्पितर् (द्यौष्पिता)=बाप द्यू असेंहि म्हणतात. रोमन आणि ग्रीक लोकांमध्येंहि जो आकाशरूप देव असे, त्याला ग्रीस्पितर् अथवा जौस्पितर् (=जू-

**उत मन्ये पितुरद्रुहो मनो मातुर्महि स्वतवस्तद्धवीमभिः ।**
**सुरेतसा पितरा भूम चक्रतुरुरु प्रजाया अमृतं वरीमभिः ॥ २ ॥**

उत । मन्ये । पितुः । अद्रुहः । मनः । मातुः । महि । स्वऽतवः । तत् । हवीमऽभिः ।
सुऽरेतसा । पितरा । भूम । चक्रतुः । उरु । प्रऽजायाः । अमृतम् । वरीमऽभिः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. उत (=अपि च) अद्रुहः पितुः मातुः (=द्रोहरहितस्य पितुर्दिवः द्रोहरहितायाः पृथिव्याश्च) महि स्वतवः (=महत् स्वायत्तबलं च) तत् मनः (=मतिम्=अनुग्रहात्मिकां तां प्रसिद्धां बुद्धिं) हवीमभिः (=आह्वानैर्) मन्ये (=बहुमन्ये=पूजयामि) । सुरेतसा पितरा [हि] (=शोभनरेतसौ बहुजीवोत्पादकौ तौ पितरौ हि) प्रजायाः (=स्वापत्यभूतप्राणिसंघस्य=तदर्थं) वरीमभिः उरु भूम (=विस्तृतत्वैर्विस्तृतं भूम=विस्तृतप्रदेशैर्विस्तीर्णां भूमिम्) अमृतं चक्रतुः (=अमरणं चक्रतुः=सुरेतस्त्वान्नित्यं जीवान् उत्पाद्य भूमिं प्राणिभिर्निवसितां कृतवन्तौ=सततप्राण्युत्पादनेन भूमिर्यथा कदापि जीवरहिता न स्यात् तथा कृतवन्तौ) ॥

पितर्) म्हणत, आणि तो सर्व देवांचा आणि दैत्यांचा बाप होय असें मानीत असत. आणि पृथ्वीला देवा दैत्यांची माता असें मानीत असत.

'देतात'=' भूषतः.' 'भूष्' धातूचा मूळ अर्थ 'शोभविणें' 'पूजणें' असा आहे. पूजणें अशा अर्थाचे जे धातु असतात, त्यांचा प्रयोग वेदांत 'देणें' अशा अर्थी पुष्कळ ठिकाणीं होत असतो. उदाहरणार्थ, तन्नो मित्रो वरुणो मामहन्ताम् अदितिः इ० (सू. १०१ मं. ११ इत्यादि).

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'वारि-आणि' असें वाचावें.

२. आणि सुख देणारा जो पिता त्याची [ आणि ] मातेची जी उदार आणि स्वपराक्रमी मति, तिला आह्वानांच्या योगानें मी प्रसन्न करितों. अमोघवीर्य अशीं जीं हीं मातापितरें, तीं विस्तीर्ण प्रदेशांहीं विस्तीर्ण [ अशा] भूमीला [ आपल्या ] अपत्यांसाठीं अक्षय करितीं झालीं.

2. And with oblations I propitiate that liberal [and] self-strong benevolence of the beneficent father (Heaven) and of the mother (Earth)—fruitful parents who have made immortal for their children this world which is wide with its expanses.

२. 'जे आई बाप, म्हणजे द्यु आणि पृथिवी हेच आईबाप, अतिविस्तीर्ण भूमीला आपल्या सुबीजत्वामुळें नित्य प्राण्यांनीं भरून टाकितात, आणि प्राणिरहित अशी कधींहि राहूं देत नाहींत, आणि तेणेंकरून यजमानादिक जीं त्यांचीं अपत्यें, त्यांस सुख देतात, त्यांस मी माझ्या आह्वानांच्या योगेंकरून स्तवितों; आणि त्यांची जी मोठी आणि स्वतःप्रबळ कृपा, ती प्रसन्न करितों,' असा या किंचित् कठिण मंत्राचा अभिप्राय आहे.

'स्वपराक्रमी'=' स्वतवः.' म्हणजे जी कृपा प्रसन्न झाली असतां कल्याण करण्याचें काम तिच्या हातून सहज होण्यासारिखें असतें, अशी.

'प्रसन्न करितों'='मन्ये.' म्हणजे प्रार्थितों, याचितों. याच सूक्ताच्या पांचव्या मंत्रांत 'मन्' धातूचा अर्थ सायणांनीं कसा केला आहे तो पहा.

'अमोघवीर्य'=' सुरेतसा.' म्हणजे ज्यांचें वीर्य व्यर्थ जाणारें नव्हे. ज्यांला असंख्य मुलें होतात. हें विशेषण द्यावापृथिवीरूप जीं आईबापें, त्यांस अत्यंत शोभतें यांत संशय नाहीं. 'अमोघवीर्य' हें येथें साभिप्राय अथवा हेतुगर्भ विशेषण आहे.

'विस्तीर्ण प्रदेशांहीं विस्तीर्ण'=' उरु वरीमभिः.' म्हणजे मोठमोठे आणि अफाट जे प्रदेश, त्यांहीं भरलेली.

'आपल्या अपत्यांसाठीं'='प्रजायाः.' ही अडचण आहे. 'प्रजायै' असें रूप असावें असें विवक्षित दिसतें. आणि 'प्रजा' याचा या अर्थ अन्वयाप्रमाणें यजमानादिक उपासक असा घेतला पाहिजे. पण 'प्रजया' असा पाठ असता तर 'सुरेतसा पितरा......भूम प्रजया अमृतं चक्रतुः' म्हणजे 'अमोघवीर्य जीं द्यावापृथिवीरूप बापें, त्यांनीं आपल्या संततीच्या योगानें सर्व भूमि जशी काय अमर, म्हणजे जींत जीव नाहींत असें कधींहि होत नाहीं अशी, केली जाते,' असा अर्थ करितां आला असता. तसा

**ते सूनवः स्वपसः सुदंससो मही जज्ञुर्मातरा पूर्वचित्तये ।**
**स्थातुश्च सत्यं जगतश्च धर्मणि पुत्रस्य पाथः पदमद्वयाविनः॥३॥**

ते । सूनवः । सुऽअपसः । सुऽदंससः । मही इति । जज्ञुः । मातरा । पूर्वऽचित्तये ।
स्थातुः । च । सत्यम् । जगतः । च । धर्मणि । पुत्रस्य । पाथः । पदम् । अद्वयाविनः ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. [ हे द्यावापृथिव्यौ ], ते (=युवयोः प्रसिद्धाः) स्वपसः (=शोभनकर्माणो) सुदंससः (=शोभनपराक्रमाः) सूनवः (=पुत्राः=देवा) मही मातरा (=मह्यौ मातापितरौ=वां द्यावापृथिव्यौ) पूर्वचित्तये जज्ञुः (=पूर्वानुग्रहायाजनयन्=युवां यथा प्रातःकाले सर्वेभ्योपि पूर्वम् उपासकाननुगृह्णीथस्तथा युवामजीजनन्) । [ अतः कारणात् ] स्थातुश्च जगतश्च (=स्थावरस्य जंगमस्य च प्राणिजातस्य) धर्मणि (=धारणे=धारणाय) अद्वयाविनः पुत्रस्य सत्यं पदं (=कपटरहितस्य युवयोः पुत्रभूतस्याग्नेः सत्यं स्थानं वेदिलक्षणं) पाथः (=रक्षथः) ॥

हे द्यावापृथिव्यौ, मातरावपि युवां युवयोः सूनवस्ते देवाः प्रातःकाले प्रथमयजनस्वीकरणार्थमजनयन् । अत एव युवां युवयोः पुत्रभूतस्याग्नेः सत्यं पदं वेदिरूपं प्राप्य तद् रक्षथः अपि च तथा कृत्वा स्थावरं जंगमं च भूतजातं स्वस्वस्थाने धारयथ इति भावः ॥

---

पाठ असता तर 'प्रजा' म्हणजे सर्व प्रकारचे प्राणी जे भूमीवर उत्पन्न होतात, ते असें समजावयाचें.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'मन्ये'-च्या ठिकाणीं 'मनीए' असें म्हणावें.

३. सुकर्मकारी [ आणि ] महा पराक्रमी असे ते [ तुमचे ] पुत्र [ देव ] पूर्वानुग्रहासाठीं तुम्हां मोठ्या मातापितरांस उत्पन्न करिते झाले. [हे द्यावापृथिवी हो], स्थावर आणि जंगम जीं भूतें, त्यांच्या रक्षणासाठीं तुम्ही तुमच्या निष्कपट पुत्राच्या सत्य पदाचें रक्षण करीत असतां.

3. Those [ your ] sons ( the gods ), skilful in performing works [ and ] performers of brave deeds, have begotten [ you ] the great parents, that you may receive the first worship in the morning. You, [ O Heaven and Earth ], for the purpose of maintaining the immovable and the movable [creation], preserve the true seat (the altar ) of [ your ] guileless son ( Agni ).

३. पहिल्या मंत्रांत सांगितलें कीं, द्यावापृथिवी हीं सकळ देवांचीं आईबापें होत, आणि दुसऱ्यांतहि त्यांस आईबापेंच म्हटलीं आहेत. यांत म्हणतो, ‘ हे द्यावापृथिवी हो, तुम्ही जरी महा मोठीं मातापितरें आहां, तथापि तुम्हांला प्रातःकाळीं मर्त्य लोकांची उपासना प्रथम स्वीकारून घेण्यासाठीं तुमच्या महापराक्रमी आणि महाकर्मकारी पुत्रांनीं म्हणजे देवांनीं निर्माण केलें. त्यावरूनच तुम्ही नित्य प्रातःकाळीं येऊन तुमच्या निष्कपट पुत्राचें ( अग्नीचें ) जें वेदिरूप स्थान, त्याजवर बसतां आणि तेथून सकळ स्थावरजंगम जगताचें धारण करीत असतां. ’

‘ पूर्वानुग्रहासाठीं ’=‘ पूर्वचित्तये. ’ म्हणजे प्रातःकाळीं येऊन सर्व देवांपूर्वीच उपासकांची उपासना ग्रहण करून घेणें हा जो अनुग्रह, तो करण्यासाठीं असा भावार्थ. म्हणजे प्रतिदिनीं पहांटेस पूजलीं जाण्यास.

‘ निष्कपट पुत्राच्या ’=‘ अद्वयाविनः पुत्रस्य. ’ ‘ अद्वयाविन् ’ हें ‘ निष्कपट, ’ ‘ मनापासून प्रसाद करणारा ’ या अर्थी अग्निरूप होत्याला लाविलेलं आढळतें. ऋ. ३. २. १५.

‘ सत्य पद ’=‘ सत्यं पदम्. ’ म्हणजे जेथें अग्नि खरोखर राहतो, जेथें राहण्याचें केवळ ढोंग करितो असें नव्हे, असें जें तें. म्हणजे जशीं एकाद्या देवाचीं कितीएक देवळें असावी, आणि त्यांतून प्रत्येकाजवळ राहणारे लोक तो देव तेथें राहतो असें समजतात, तसा अग्नि आकाशांत, पृथिवीवर द्युलोकीं वगैरे राहिल्याप्रमाणें दिसतो, पण खरोखर तो वेदीवरच राहतो असा कवीचा अभिप्राय आहे.

ते मायिनो ममिरे सुप्रचेतसो जामी सयोनी मिथुना समोकसा।
नव्यंनव्यं तन्तुमा तन्वते दिवि समुद्रे अन्तः कवयः सुदीतयः॥४॥
ते। मायिनः। ममिरे। सुऽप्रचेतसः। जामी इति। सयोनी इति सऽयोनी। मिथुना। सम्ऽओकसा।
नव्यम्ऽनव्यम्। तन्तुम्। आ। तन्वते। दिवि। समुद्रे। अन्तरिति। कवयः। सुऽदीतयः।॥ ४ ॥

---

### भाषायाम्.

४. मायिनः (=प्रज्ञावन्तः) सुप्रचेतसः (=शोभनबुद्धिमन्तस्) ते [देवा] जामी (=परस्परं स्वसृभूते) सयोनी (=समानयोनिनिष्पन्ने) मिथुना (=मिथुनभूते) समोकसा (=समोकसौ=समानस्थाने) [एतादृश्यौ द्यावापृथिव्यौ] ममिरे (=निर्ममिरे=उदपादयन्)। [ते] सुदीतयः (=शोभनदीप्तिमन्तः) कवयः (=प्रज्ञावन्तो) [हि] नव्यंनव्यं तन्तुं (=? नवं नवं सृष्टिरूपस्य वस्त्रस्य तन्तुं) दिवि समुद्रे अन्तः (=द्युलोके तथान्तरिक्षे) आ तन्वते (=विस्तारयन्ति)॥

सायणस्त्वेवं व्याचष्टे। ते प्रसिद्धे द्यावापृथिव्यौ मायिनः। माया प्रज्ञा। स्वविषयप्रज्ञावन्तः प्रज्ञोपलक्षितकर्मवन्तो वा सुप्रचेतसः सुष्ठु प्रकर्षेण चेतितुं शक्ता रश्मयो ममिरे मिमते प्रमाणेन परिच्छिन्दन्ति। कीदृश्यौ ते। जामी। परस्परं भगिनी। एतत्कुत इति चेत् उच्यते। सयोनी समानोत्पत्तिस्थाने। मिथुना प्राण्युत्पत्तये मिथुनभूते। परस्परमवियुक्ते इत्यर्थः। समोकसा समानस्थाने द्युपृथिव्योरेकस्मिन्नेवावकाशरूप आकाशेऽवस्थानात्। समीचीनस्थाने वा। किं च कवयो मेधाविनः स्वव्यापारविषयज्ञानवन्तः सुदीतयः सुष्ठुद्योतना रश्मयो दिवि द्योतमाने समुद्रेन्तरिक्षेऽन्तर्मध्ये। समुद्रशब्दोऽन्तरिक्षनामसु पाठात् तद्वचनः। स चैवं यास्केन निरुक्तः। समुद्रः कस्मात् समुद्द्रवन्त्यस्मादापः समभिद्रवन्त्येनमापः संमोदन्तेऽस्मिन्भूतानि समुद्रको भवति समुनत्तीति वा। नि० २. १०। इति नव्यंनव्यं तन्तुं तननीयं विस्तारणीयम्। जात्येकवचनम्। रश्मीन् आ तन्वते। समन्ताद्विस्तारयन्ति। इति॥

'उत्पन्न करिते झाले'=' जजुः.' द्यावापृथिवींला इंद्रानें उत्पन्न केलें असें सांगितलें आहे. सू. ९६ मं. ४ इत्यादि प्रमाणें पुष्कळ आहेत. ऋ. २. ४०. १ यांत पूषा आणि सोम ह्यां देवांनीं द्यावापृथिवींस उत्पन्न केलें असें सांगितलें आहे (सोमापूषणा...जनना दिवो जनना पृथिव्याः). ऋ. १०. ११०.

४. ते प्राज्ञ [ आणि ] महा मेधावी [ देव ] [द्यावापृथिवींला] परस्पर-भगिनी-भावसंबद्ध, सहोदरी, मिथुनभूत [ आणि ] समानस्थानी अशा निर्माण करिते झाले. ते तेजःपुंज मेधावी [ देव] द्युलोकांत [ आणि ] अंतरिक्षांत नवे नवे तंतु ताणितात.

4. Those skilful [ and ] wise [ gods ] have produced the two sisters (Earth and Heaven), both of the same source, coupled to each other, [and ] living in the same place. The resplendent [ and ] wise [gods] stretch new threads in Heaven [ and ] Earth.

१. यांत त्वष्ट्यानें त्यांस निर्माण केलें असें सांगितलें आहे. ऋ. १०. १९०. ३ यांत धात्यानें त्यांस निर्माण केलें असें म्हटलें आहे ('धाता......अकल्पयत् । दिवं च पृथिवीं च '). ऋ. १०. १२१. ९ यांत द्यावापृथिवींस 'हिरण्यगर्भ' या देवानें निर्माण केलें असें सांगितलें आहे. ( जनिता यः पृथिव्या यो वा दिवं ......जजान ).

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'सुअपसः' असें म्हणावें. या ऋचेचा उत्तरार्ध अगदीं आधुनिक श्लोकाप्रमाणें वाचतां येतो.

४. देवांनीं द्यावापृथिवींला निर्माण केलें म्हणून वर सांगितलें त्याविषयींच पुनः सांगतोः ' महा कुशल आणि महाबुद्धिमंत जे देव, त्यांनीं ह्या परस्पर बहिणी होत अशा, एकच उदरांत निर्माण झालेल्या, आणि एकाच ठिकाणीं राहणारें जोडपें होत अशा द्यावापृथिवी उत्पन्न केल्या. देव नित्य आपली सृष्टि उत्पन्न करीत असतात; ते द्युलोकांत आणि अंतरिक्षांत सृष्टिरूप ताणा नवा नवा नित्य ताणीत असतात. '

ह्या ऋचेंत द्यावापृथिवी ह्या देवांपासून उत्पन्न झाल्यामुळें एकमेकींच्या बहिणी होत असें दाखविलें आहे.

' मिथुनभूत '=' मिथुना'—म्हणजे बहिणींची जोडी होय अशा.

' नवे नवे तंतु ताणितात '=' नव्यंनव्यं तन्तुम् आ तन्वते. ' आम्हीं अक्षरशः अर्थ केला आहे. ते नित्य द्युलोकांत आणि अंतरिक्षांत आपली सृष्टि रचित असतात असा भावार्थ दिसतो.

तद्राधो अद्य सवितुर्वरेण्यं वयं देवस्य प्रसवे मनामहे ।
अस्मभ्यं द्यावापृथिवी सुचेतुना रयिं धत्तं वसुमन्तं शतग्विनम् ॥
॥ ५ ॥ २ ॥

तत् । राधः । अद्य । सवितुः । वरेण्यम् । वयम् । देवस्य । प्रऽसवे । मनामहे ।
अस्मभ्यम् । द्यावापृथिवी इति । सुऽचेतुना । रयिम् । धत्तम् । वसुऽमन्तम् । शतऽग्विनम् ॥ ५ ॥ २ ॥

## भाषायाम्.

५. तत् (=एवं सति=एवं कृते सत्यस्माभिः स्तोत्रे) वयम् अद्य देवस्य [सवितुः] (=द्योतमानस्य सवितुः) प्रसवे (=उदये=उदयकाले) [तस्य] सवितुर्वरेण्यं राधः (=श्रेष्ठं धनं) मनामहे (=याचामहे) । [अपि च] हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), सुचेतुना (=शोभनचेतसा) अस्मभ्यं वसुमन्तं (=गृहादिधनयुक्तं) शतग्विनं रयिं (=शतगुणितां संपदं) धत्तं (=प्रयच्छतम्) ॥

वरेण्यं वरणीयं राधः पुरुषार्थसाधनसमर्थं गवादि धनम् । इति सायणपादाः ॥

५. तर आम्ही आज देदीप्यमान सवित्याच्या [या] उदयकाळीं त्याचें श्रेष्ठ धन याचितों. तर हे द्यावापृथिवी हो, तुम्ही कृपा करून आम्हांला धनसंपन्न शेकडो प्रकारची संपत्ति द्या.

5. So we implore this day at the rise of resplendent Savitâ his excellent blessing. Give us, O Heaven and Earth, with your benevolence a hundred-fold prosperity accompanied by wealth.

५. हा या सूक्ताचा उपसंहार आहे. शेवटीं ऋषि म्हणतो, 'आम्ही आज प्रातःकाळीं सवित्यापासून उत्तम धन याचितों. आणि हे द्यावापृथिवी हो, तुम्ही आम्हांला अनेक प्रकारचें धन कृपा करून द्या.'

'उदयकाळीं'='प्रसवे.' अक्षरशः प्रेरणेच्या वेळीं. म्हणजे सविता जेव्हां सर्वांस आपल्या तेजानें प्रेरावयास, म्हणजे आपआपल्या कामीं पाठवायास, लागतो त्यावेळीं, अर्थात् सूर्योदयकाळीं.

'त्याचें श्रेष्ठ धन'='सवितुर्वरेण्यं राधः.' म्हणजे, जें धन सविता देव देत असतो, तसलें धन.

'शेकडो प्रकारची'='शतग्विनम्.' म्हणजे अक्षरशः अर्थ 'शतपट,' 'शतगुणित' असा आहे, तरी शेकडो प्रकारची दौलत असा भावार्थ आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'वरेणिअम्' असें वाचावें.

## सूक्तम् १६०.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः। द्यावापृथिव्यौ देवता। जगती छन्दः॥

**ते हि द्यावापृथिवी विश्वशंभुव ऋतावरी रजसो धारयत्कवी।**
**सुजन्मनी धिषणे अन्तरीयते देवो देवी धर्मणा सूर्यः शुचिः॥१॥**

ते इति। हि। द्यावापृथिवी इति। विश्वऽशंभुवा। ऋतवरी इत्यृतऽवरी। रजसः। धारयत्कवी इति धारयत्ऽकवी।
सुजन्मनी इति सुऽजन्मनी। धिषणे इति। अन्तः। ईयते। देवः। देवी इति। धर्मणा। सूर्यः। शुचिः॥ १॥

### भाषायाम्.

१ ते विश्वशंभुवा (=विश्वशंभुवौ=सर्वेषां सुखयित्र्यौ) ऋतावरी (=ऋतावर्यौ=यज्ञवत्यौ) रजसो धारयत्कवी (=? अन्तरिक्षस्य मेधाविनां देवानां धारयित्र्यौ=अन्तरिक्षे देवान् धारयन्त्यौ) सुजन्मनी (=सुजाते) धिषणे (=? धारके=सर्वेषां भूतानां धारयित्र्यौ) देवी (=देव्यौ=दीप्तिमत्यौ) द्यावापृथिव्यौ अन्तः (=तयोर्मध्ये) शुचिः (=शुद्धो) देवः (=दीप्तिमान्) सूर्यो धर्मणा (=? स्वधर्मेण=स्वभावतः) ईयते (=गच्छति) हि॥

धर्मणा प्रकाशोदकदानादिधारणेन युक्तः सन् ईयते। सर्वदा गच्छति। ...... रजस उदकस्योदकोत्पत्तौ। उदकं रज उच्यते...... धारयत्कवी अकृच्छ्रेण धारकं कवि (?) ययोस्ते तादृश्यौ वृष्ट्युदकधारयत्सूर्योपेते इत्यर्थः। इत्यादि सायणः॥

## सूक्त १६०.

ऋषि–उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता– द्यावापृथिवी. वृत्त–जगती.

१. सकळ विश्वाला सुखकारक, यज्ञसंपन्न, अंतरिक्षांतील देवांचें धारण करणाऱ्या, सुजन्मधारक, [ आणि ] देदीप्यमान [ अशा ज्या ] त्या द्यावापृथिवी, त्यांच्या मधून देदीप्यमान [आणि] पवित्र सूर्य [ आपल्या ] धर्माप्रमाणें जात असतो.

## HYMN 160.

To *Heaven* and *Earth*. By *Dîrghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Jagatî*.

1. The resplendent [and] pure Sûrya (sun) according to [his] habit passes through those Heaven and Earth, who bestow happiness upon all, who receive sacrifices, who sustain the wise [ gods ] of the firmament, who are of noble birth, [ and ] who are the supporters [of all].

---

१. या मंत्रांत द्यावापृथिवींच्या मधून सूर्य धांवत असतो, असें सांगितलें आहे. बहुत करून सगळी ऋचा द्यावापृथिवीच्या विशेषणांनीं भरली आहे.

'यज्ञसंपन्न '=' ऋतावरी.' म्हणजे ज्यांप्रीत्यर्थ लोक यज्ञ करितात, ज्यांस यज्ञांत लोक बोलावितात.

'अंतरिक्षांतील देवांचें धारण करणाऱ्या '=' रजसो धारयत्कवी.' हें वाक्य कठिण आहे. सायणांनीं 'उदक धारण करणारा सूर्य ज्यांच्यामध्यें आहे अशा' असा अर्थ केला आहे. ( भाषेखालीं पहा ). 'धारयत्कवी' हा शब्द पुनः आलेला नाहीं, आणि 'रजसः' याचा संबंध दुसऱ्या रीतीनें येण्याचा मार्ग दिसत नाहीं. केलेल्या भाषांतराचा भावार्थ, 'अंतरिक्षांत देवांस धारण करणाऱ्या' असा आहे.

'धारक'='धिषणे.' हा अर्थ अक्षरशः आहे. वस्तुतः 'धिषणे' हें द्यावापृथिवींचें एक नांव आहे. तें नांव पडण्याचें कारण भिन्न भिन्न रीतीनें सांगतात. आम्हीं सायणांनीं अन्य ठिकाणीं दिलेला अर्थ घेतला आहे.

'आपल्या धर्माप्रमाणें '=' धर्मणा.' हाहि शब्द कठिण आहे. 'धर्मणा' ही तृतीया सांप्रतच्या स्थळाप्रमाणेंच दुसऱ्या कितीएक मंत्रांत आली आहे. त्या त्या ठिकाणीं सायणांनी निरनिराळ्या रीतीनें निर्वाह केला आहे. आम्ही 'धर्म'-शब्दाच्या साधारण अर्थास अनुलक्षून येथें भाषांतर केलें आहे.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'सूरिअः' असें वाचावें.

**उरुव्यचसा महिनी असश्चता पिता माता च भुवनानि रक्षतः ।**
**सुधृष्टमे वपुष्ये न रोदसी पिता यत्सीमभि रूपैरवासयत् ॥२॥**

उरुऽव्यचसा । महिनी इति । असश्चता । पिता । माता । च । भुवनानि । रक्षतः ।
सुधृष्टमे इति सुऽधृष्टमे । वपुष्ये इति । न । रोदसी इति । पिता । यत् । सीम् । अभि । रूपैः । अवासयत् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. उरुव्यचसा ( =उरुव्यचसौ=प्रभूतव्यापने=विस्तीर्णं यथा तथा व्यापके ) महिनी (=महिन्यौ=महत्यौ ) असश्चता (=असश्चतौ=असज्यमाने=परस्परविलग्ने ) सुधृष्टमे ( =शोभनधर्षणवत्यौ ) वपुष्ये न पिता माता रोदसी ( =बालकशरीरेभ्यो हिते लौकिकपितराविव हिते हितकारके मातापितृभूते द्यावापृथिव्यौ ) भुवनानि रक्षतः (=सर्वाणि भूतानि पालयतः ) । यत् (=यस्मात् कारणात् ) पिता (=द्यौष्पिता ) सीं (=तां मातां=पृथिवीं ) रूपैः अभि अवासयत् (=अनेकवर्णैर्वस्तुभिः समाच्छादयति ) ॥

अथवा पिता ( =द्यौष्पिता ) यत्सीं (=यत् किंचित्=सर्वं भूतजातं ) रूपैरभि अवासयत् ( =रूपैराच्छादयति=सरूपं करोति=निर्मिमीते ) इति चतुर्थः पादो व्याख्येयः ॥

पिता द्यौर्मातरं पृथिवीमनेकविधजीवैरुपेतां करोति । उभावपि ततः सर्वाणि भूतानि रक्षतः इति भावः ॥

यत्सीम् इत्यादौ सायणस्तु यद्यस्मात् सीं सर्वतः पिता पितृस्थानीया द्यौ रूपैर्निरूपणसाधनैः प्रशस्तैः प्रकाशैर्निरूप्यमाणैर्वृष्ट्यादिभिर्वाभ्यवासयत् । अभिवासयति । अधितिष्ठति । तस्मात् पिता माता च भुवनानि रक्षतः । इत्याह ॥

२. महाव्यापक, विस्तीर्ण, परस्पर विलग्न, अतिशयें करून धैर्यवान्, [ आणि ] प्राण्यांच्या शरीरांचें हित करणारे जणुं असे जे द्यावापृथिवीरूप बाप आणि आई, ते [ सकळ ] भूतांला रक्षितात. कारण पिता द्यू मातेला अनेक रूपांच्या पदार्थांनीं आच्छादित करीत असतो.

2. Heaven the father and Earth the mother, both widely expanded, vast, not joined to each other, full of courage and as if caring for the bodies [ of creatures ], protect [ all ] creatures. For the father clothes her ( the mother ) with all shapes.

२. तात्पर्यः—' द्यू जो पिता, तो पृथ्वी आईला अनेक वर्णांच्या भूतांनीं भरून टाकितो, आणि मग ती दोघेंहि सकळ भूतांचा प्रतिपाळ आईबापांप्रमाणें करितात.'

' परस्पर विलग्न '=' असश्चता.' म्हणजे एकमेकाला लागलेलीं नव्हेत. पुष्ट, हाडकाला हाडुक ज्यांचें चिकटलेलें नाहीं अशा, अर्थात् पुष्ट, 'सुंदर' असा अर्थ चांगला संभवतो.

' अतिशयें करून धैर्यवान् '=' सुधृष्टमे.' या विशेषणाचें येथें प्रयोजन स्पष्ट समजत नाहीं. आम्हीं अक्षरार्थ दिला आहे. सायणाचार्य ' प्रगल्भ '=' प्रौढ ' ' वयांत आलेल्या ' असा पर्यवसानीं अर्थ करितात.

' प्राण्याच्या शरीरांचें हित करणाऱ्या '=' वपुष्ये.' म्हणजे प्राणिरूप जे त्यांचे बाळक, त्यांच्या शरीराला जपणाऱ्या, त्यांचें पोषण करणाऱ्या. हें विशेषण आईबापांस चांगलें शोभतें.

' मातेला '=' सीम्.' अक्षरशः 'तिला.' ह्या चवथ्या चरणाचा अर्थ सायणांनीं निराळा केला आहे, तो भाषेखालीं पहा. पाद कठिण आहे यांत संशय नाहीं. अथवा, 'सर्व कांहीं पदार्थांला पिता द्यू रूप देत असतो;' म्हणजे सर्व पदार्थांचा उत्पादक द्यूच आहे, असा अर्थ करावा. ' यत् सीम् ' म्हणजे ' यत् किमपि '=' सर्वम् ' असा अर्थ वेदांत असतो.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत ' वपुषिए ' असें वाचावें लागतें.

**स वह्निः पुत्रः पित्रोः पवित्रवान्पुनाति धीरो भुवनानि मायया ।**
**धेनुं च पृश्निं वृषभं सुरेतसं विश्वाहा शुक्रं पयो अस्य धुक्षत ॥३**

**सः । वह्निः । पुत्रः । पित्रोः । पवित्रऽवान् । पुनाति । धीरः । भुवनानि । मायया ।**
**धेनुम् । च । पृश्निम् । वृषभम् । सुऽरेतसम् । विश्वाहा । शुक्रम् । पयः । अस्य । धुक्षत ॥ ३॥**

---

## भाषायाम्.

३· वह्निः (=हविषां वोढा ) पवित्रवान् (=पावनरश्मियुक्तो ) धीरः (=धीमान् ) [ एतादृशः ] पित्रोः पुत्रः (=जगतः पित्रोर्द्यावापृथिव्योः पुत्रभूतः ) सः [ अग्निर् ] मायया (=प्रज्ञया ) भुवनानि पुनाति (=सर्वाणि भूतानि पावयति ) । पृश्निं (=शुक्लवर्णां) धेनुं (=गां पृथिवीरूपाम्) अस्य सुरेतसं वृषभं च (=इमं प्रभूतरेतसं द्युरूपं वृषभं च ) विश्वाहा (=विश्वान्यहानि=सदैव ) शुक्रं पयः (=शुद्धम् उदकं ) धुक्षत (=दोग्धि=अग्निः पृथिवीं मातरं द्यां च पितरं दुग्ध्वा ताभ्याम् उदकरूपं पयो मनुष्याणामर्थं निष्काशयति ) ॥

सायणस्तु एवं व्याचष्टे । पित्रोर्मातापित्रोर्द्यावापृथिव्योः । पिता मात्रेति पिता शिष्यते । उदात्तयण इति पितुर्विभक्तिरुदात्ता । पुत्रः पुरुत्राता पुत्रस्थानीय आदित्यः पवित्रवान् पावनरश्मियुक्तो धीरो धीमान् स वह्निः फलस्य वोढा धारकः सन् मायया प्रज्ञया स्वकीयया भुवनानि भूतजातानि पुनाति । पावयति । प्रकाशयतीत्यर्थः । किं च स एव पुत्रः पृश्निं शुक्लवर्णां धेनुं प्रीणयित्रीं भूमिं सुरेतसं शोभनसामर्थ्यं शोभनोदकं वा वृषभं सेक्तारं द्युलोकं च मायया पुनाति । प्रकाशयतीत्यर्थः । कदा । विश्वाहा । सर्वाण्यप्यहानि । सर्वकालमित्यर्थः । किं च अस्य द्युलोकस्य । यद्वा कर्मणि षष्ठी । इमं द्युलोकं शुक्रं पयो दीप्तं पयःसदृशमुदकं धुक्षत् । दोग्धि । दुहेश्छान्दसे लुङि शल इगुपधादनिटः क्स इति च्लेः क्सादेशः । ईदृशो महानुभाव आदित्यस्तयोः पुत्र इति द्यावापृथिव्योः स्तुतिः । इति ॥

३. या आईबापांचा जो हा पवित्र, [आणि] बुद्धिमान्, [आणि] हविर्वाहक पुत्र, तो आपल्या कौशल्यानें सकळ भूतांला पावन करितो. आणि तो शुक्लवर्णाची गाय आणि सुवीर्य वृषभ यांस नित्य दोहून शुद्ध पय काढितो.

3. That son of the parents [ of all ], who is the carrier [ of oblation ], who possesses the means of purification [ and ] who is wise, purifies [all] creatures with his power. He daily milks the pure water from the fair cow and the bull that possesses good semen.

३. भावार्थः—' द्यावापृथिवीरूप जीं जगताचीं आईबापें, त्यांचा पुत्र असा जो अग्नि तो, त्यांचें दोहन करून त्यांपासून शुद्ध असें जें मेघोदकरूप दूध तें काढितो; म्हणजे त्यांस प्रसन्न करून त्यांजकडून मनुष्यांच्या हितासाठीं मेघवृष्टि करितो,' असा अभिप्राय दिसतो. पण 'तो पुत्र' (=स पुत्रः) म्हणजे अग्नि किंवा आदित्य घ्यावयाचा, या विषयीं शंका आहे. सायणाचार्य आदित्य म्हणतात.

'हविर्वाहक पुत्र'='वह्निः पुत्रः.' अक्षरशः अर्थ 'वाहक पुत्र,' इतकाच आहे. 'वह्नि' हें विशेषण जसें अग्नीला लाविलेलें असतें, तसेंच इतर देवांसहि वेदांत लावितात. पण त्याचा अर्थ 'रथांत बसून जाणारा अथवा नेणारा' असा कितीएक विद्वान् करितात. सायणाचार्य वेगवेगळ्या रीतीनें वेगवेगळ्या ठिकाणीं निर्वाह करितात.

' सुवीर्य वृषभ '=' सुरेतसं वृषभं.' म्हणजे उदकरूप पुष्कळ रेत ज्यापासून वाहतें, असा प्रबळ ग्रुरूप पिता.

' शुद्ध पय '=' शुक्रं पयः. ' म्हणजे मेघोदकरूप दूध. ' पयः ' या शब्दाचेच दोन अर्थ होतात.

वृत्तसुखार्थ पहिल्या पादांत 'पितरोः' असें वाचावें.

**अयं देवानामपसामपस्तमो यो जजान रोदसी विश्वशंभुवा।**
**वि यो ममे रजसी सुक्रतूययाजरेभिः स्कम्भनेभिः समानृचे ॥४॥**

अयम् । देवानाम् । अपसाम् । अपःऽतमः । यः । जजान । रोदसी इति । विश्वऽशम्भुवा ।
वि । यः । ममे । रजसी इति । सुक्रतुऽयया । अजरेभिः । स्कम्भनेभिः । सम् । आनृचे ॥ ४ ॥

**ते नो गृणाने महिनी महि श्रवः क्षत्रं द्यावापृथिवी धासथो बृहत्।**
**येनाभि कृष्टीस्ततनाम विश्वहा पनाय्यमोजो अस्मे समिन्वतम् ॥**
**॥ ५ ॥ ३ ॥**

ते इति । नः । गृणाने इति । महिनी इति । महि । श्रवः । क्षत्रम् । द्यावापृथिवी इति । धासथः । बृहत् ।
येन । अभि । कृष्टीः । ततनाम । विश्वहा । पनाय्यम् । ओजः । अस्मे इति । सम् । इन्वतम् ॥ ५ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

४. यः [ कोपि देवो ] विश्वशंभुवा रोदसी जजान ( =सर्वेषां सुखयित्र्यौ द्यावापृथिव्यौ जनयामास) यो [ देवः ] सुक्रतूयया ( =शोभनकर्मेच्छया ) रजसी वि ममे (=इमौ लोकौ निर्मितवान्) [ यश्च ] अजरेभिः स्कम्भनेभिः समानृचे (=शाश्वतैः स्तम्भनैः स्थापितवान्=धारितवान्) [ सः ] अयम् अपसां देवानाम् अपस्तमो [ भवति ] (=कुशलकर्मणां देवानां मध्ये अतिशयेन कुशलकर्मकारी भवति ) ।

५. द्यावापृथिवी ( =हे द्यावापृथिव्यौ), ते महिनी [ युवां ] (=ते महिन्यौ युवाम् =अतः कारणान्महत्यौ युवां) गृणाने (=अस्माभिरेवं स्तूयमाने सत्यौ ) नो महि श्रवः (=बृहत् क्षत्रं [ च ] अस्मभ्यं महतीं कीर्तिं महद् बलं च) धासथः (=प्रयच्छतम्) अस्मे पनाय्यम् ओजः समिन्वतं [ च ] ( =अस्मासु स्तुत्यं शरीरबलं प्रेरयतम्=अस्मभ्यं स्तुत्यम् इन्द्रियप्रबलत्वं धत्तं ) येन [ वयं ] विश्वहा कृष्टीः अभि ततनाम (=अस्माकं पुत्रपौत्रादिरूपां प्रजां नित्यम् अतिशयेन विस्तारयाम )॥

४. ज्यानें विश्वाला सुख करणाऱ्या द्यावापृथिवींस उत्पन्न केलें, ज्यानें [ या ] दोन्ही लोकांस [ आपल्या ] चातुर्यानें निर्मिलें, आणि ज्यानें त्यांस अक्षय स्तंभनांनीं स्थापित केलें, तो देव सर्व कुशळ देवांमध्यें अतिशय कुशळ देव होय.

५. तर हे द्यावापृथिवी हो, मोठ्या अशा ज्या तुम्ही, त्या आम्हांकडून स्तविल्या होत्साऱ्या आम्हांला मोठी कीर्ति आणि मोठें बळ द्या, आणि आमच्या आंगीं वाखाणण्यास योग्य असें तेज घाला; कीं जेणेंकरून आम्ही आपली संतति नित्य सर्वत्र पसरावयाला समर्थ होऊं.

4. He is the most skilful of [ all ] the skilful gods, who produced the Heaven and Earth that make all happy, who with his beautiful design created the two worlds and held them fast on ever-lasting props.

5. Therefore, do you O Heaven and Earth, who are great, [ thus ] praised [ by us ], grant us great renown, and great power [ and ] give us praiseworthy strength, whereby we may ever perpetuate our race everywhere.

---

४. या ऋचेंत द्यावापृथिवींस निर्माण करणाऱ्या देवाचें चातुर्य वाखाणिलें आहे:– 'देव तर सर्वच कुशळ आहेत, पण त्यांतून ज्या कोणीं सकळ प्राणिमात्रांस सुखदायक अशा या द्यावापृथिवींस आपल्या चातुर्यानें निर्मिलें, आणि अक्षय स्तंभ उभारून जणुं सांवरून धरिल्याप्रमाणें सांवरून आपआपल्या ठिकाणीं धरिलें आहे, तो देव सर्वांत अत्यंत कुशळ होय.'

'अक्षय स्तंभनांनीं स्थापित केलें'= 'अजरेभिः स्तम्भनेभिः समानृचे.' म्हणजे, कधींहि न मोडणारे असे जणुं खांबच उभारून त्यांजवर बसविलें आहे, कीं जेणेंकरून ते उभय लोक आपआपल्या ठिकाणीं घट्ट राहतील.

वृत्तासाठीं तिसऱ्या आणि चवथ्या चरणांच्या मध्यें संधि न करणें हें अवश्य आहे.

५. हा येथें या सूक्ताचा उपसंहार आहे. ऋषि वर मागतो कीं, 'हे द्यावापृथिवी हो, याप्रमाणें आम्हीं तुमची स्तुति केली आहे, तर मोठ्या अशा ज्या तुम्ही, त्या आम्हांस मोठा कीर्तिमान् उत्कर्ष, आणि मोठें बळ, आणि शरीर-

## सूक्तम् १६१.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । ऋभवो देवता । अन्त्या त्रिष्टुप् । शिष्टा जगत्यः ॥

**किमु श्रेष्ठः किं यविष्ठो न आजगन्किमीयते दूत्यं१ कद्यदूचिम ।**
**न निन्दिम चमसं यो महाकुलोऽग्ने भ्रातर्द्रुण इद्भूतिमूदिम ॥ १ ॥**

किम् । ऊं इति । श्रेष्ठः । किम् । यविष्ठः । नः । आ । अजगन् ।
किम् । ईयते । दूत्यम् । कत् । यत् । ऊचिम ।
न । निन्दिम । चमसम् । यः । महाऽकुलः । अग्ने । भ्रातः । द्रुणः ।
इत् । भूतिम् । ऊदिम ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. किमु श्रेष्ठः किं यविष्ठ आ अजगन् (=किं ज्येष्ठ आगच्छत् किं वा यविष्ठ आगच्छत्=अयमागतो यः स किं श्रेष्ठः कनिष्ठो वा)? किं दूत्यमीयते (=अथवा दूत्यं गच्छति किम्=दूतो भूत्वागतोस्ति किम्)? यद् ऊचिम [तत्] कत् (=यदूचिम तत् किम्)? यो महाकुलस्तं चमसं न निन्दिम (=यस्माच्चमसो महाकुलः= महाकुलोत्पन्नस्त्वष्ट्रा कृतोस्ति तस्माद्धेतोस्तं न दूषयाम)। हे भ्रातः अग्ने, द्रुण इत् भूतिम् ऊदिम (=काष्ठविकारस्य तस्य चमसस्यैव प्राप्तिरूपं भाग्यं ब्रूमः)॥

अत्र सायणः। ऋभवो नाम सुधन्वनस्त्रयः पुत्रा ऋभुर्विभ्वा वाज इति। ते च मनुष्याः सन्तः सुकर्मणा देवत्वं प्राप्य कदाचित्कर्मकाले सोमपानाय प्रवृत्ताः। तान्प्रति देवैः प्रेरितोऽग्निः परस्परसमानरूपान्दृष्ट्वा स्वयमपि तदाकारं धृत्वा तेषु मध्ये स्वयं चतुर्थः सन् पातुं प्रवृत्तः। ते च ऋभव आगतं तं समानरूपमवलोक्य विवेक्तुमसमर्थाः परस्परमेवं संदिहते। अयं किमु श्रेष्ठः किं नु खल्वस्मत्तोऽयं प्रशस्यतमो वयसा श्रेष्ठः सोऽस्मानाजगन्। आगमत्। प्राप्तः। गमेर्लङि छान्दसः शपः श्लुः। हल्ङ्यादिलोपे मो नो धातोरिति नत्वम्। अजगन्निति गतिकर्मा अगन्नजगन्निति तत्रानुपाठात्। किं यविष्ठः। किं वास्माकं युवतमोऽस्मत्तः कनीयान् आजगन्। प्राप्तः। किं वा दूत्यं दूतकर्म देवसंबन्धीयते। गच्छति। देवैः प्रेरितो दूतोऽस्मानागतो वा। दूतस्य भागकर्मणी इति यत्॥ यदूचिम यदेतद्ब्रूमः तत्कत्। कथं निश्चेतव्यमित्यर्थः। वयं तावत्त्रय एव इदानीं चत्वारः समानरूपा वर्तामहे। तस्मादयमधिकः किमु श्रेष्ठ इति विचिकित्सा। एवं संदिह्य कथंचित्स्वतोऽन्यं निश्चित्य ते प्रत्यपरोक्षेण ब्रुवते। हे अग्ने

## सूक्त १६१.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—ऋभु. वृत्त—शेवटची त्रिष्टुभ्; उरलेल्या सर्व सूक्ताचें जगती.

१. काय? सर्वांत वडील तो आला आहे? कीं सर्वांत लहान तो आला आहे? अथवा हा दूत करीत आहे काय? आम्हीं जें म्हटलें तें काय आहे? आम्ही चमसाला निंदीत नाहीं, कारण तो मोठ्यांपासून झालेला आहे. हे बंधु, अग्नि, आम्हीं त्या काष्ठपात्राचीच प्राप्ति वर्णिली आहे.*

## Hymn 161.

To the *Ribhus*. By *Dirghatamas* the son of *Uchathya*. Metre — *Jagatî*, except in the last verse where it is *Trishtubh*.

1. Is he the eldest, is he the youngest that has come to us? Is he acting the messenger? What is that which we have described? We will not despise the bowl, which is made by the great; we have described, O brother Agni, the acquisition only of the wooden bowl.

---

संपत्ति हीं द्या, कीं जेणेंकरून आम्ही आपली प्रजा वाढवूं आणि जिकडे तिकडे पसरूं.'

या मंत्रावरून असें सिद्ध होतें कीं, आपले आर्य पूर्वज आपली संतति नित्य वाढावी आणि जिकडे तिकडे पसरावी अशी इच्छा करीत असत.

'सर्वत्र पसरावयाला समर्थ होऊं'= 'ततनाम.' 'सर्वत्र' असें जें आम्हीं पद घातलें आहे, तें 'ततनाम' या रूपापासून गम्य आहे.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'समिन्वतम्'च्या ठिकाणीं 'समिनुअतम्' असें वाचणें इष्ट आहे.

---

१. हें सूक्त ऋभूंविषयीं आहे. ऋभु कोण होते त्याविषयीं सू. २० मं.१ याजवरील टीप पहा.

या मंत्राचा अर्थ आम्हीं अक्षरशः केला आहे. पण तो समजावयाला कांहीं एक कथा घडलेली असावी असें प्रथम दर्शनीं दिसतें. ती कथा सायण अशी सांगतात कीं, ऋभु म्हणून सुधन्वा नांवाच्या मनुष्याचे ऋभु, विभ्वा आणि वाज असे तिघे पुत्र होते. ते मनुष्य असतां सत्कर्मांच्या योगानें देव झाले. ते एकदा यज्ञांत सोम प्यावयास लागले. तेव्हां देवांनीं पाठविलेला अग्नि तेथें आला, आणि ते तिघेहि एकाच रूपाचे आहेत असें पा-

एकं चमसं चतुरः कृणोतन तद्वो देवा अब्रुवन्तद्व आगमम् ।
सौधन्वना यद्येवा करिष्यथ साकं देवैर्यज्ञियासो भविष्यथ ॥ २ ॥

एकम् । चमसम् । चतुरः । कृणोतन । तत् । वः । देवाः । अब्रुवन् ।
तत् । वः । आ । अगमम् ।
सौधन्वनाः । यदि । एव । करिष्यथ । साकम् । देवैः । यज्ञियासः ।
भविष्यथ ॥ २ ॥

---

भ्रातः भ्रातृवद्भागार्ह । भ्राता यथा बलात्स्वकीयभागं स्वीकरोति तद्वत् समानरूपमाश्रित्य बलाच्चमसपानाय प्रवृत्त इति भ्रातरित्युक्तम् । हे तादृशाग्ने चमसं न निन्दिम । अधिकः समागत इति पानमकृत्वा चमसं न दूषयामः । णिदि कुत्सायाम् । छन्दसि वेत्ति वक्तव्यमिति द्विर्वचनाभावः । अदूष्यत्वे कारणमाह । यश्चमसो महाकुलः । महाकुलोत्पन्नस्त्वष्ट्रा निर्मितत्वात् । वक्ष्यति च त्वष्टा मास्वन्तन्यानिज इति । अतः कारणात् द्रुणः । विकारे प्रकृतिशब्दः । ततश्च तत्स्थे तच्छब्दः । इच्छब्दोऽवधारणे । दारुविकारचमसस्य भूतिं प्राप्तिमूदिम । ब्रूमः । विदेश्छान्दसे लिटि वचिस्वपीति संप्रसारणम् । क्रादिनियमादिट् । इति ॥

---

## भाषायाम्.

२. एकं चमसं चतुरः कृणोतन (=एकं सन्तमपि चमसं तं चतुरः कुरुत=एकस्य चतुरः कुरुत)। देवास्तत् वः (=युष्मभ्यम्) अब्रुवन् (=अवदन्)। तद् वः आ अगमं (=तदेव वक्तुमहं युष्मान् प्रति आगतोस्मि)। हे सौधन्वनाः (=सुधन्वनः पुत्रा ऋभवः), यदि एव करिष्यथ (=एवं करिष्यथ चेत्) देवैः साकं यज्ञियासो भविष्यथ (=देवैः सह यज्ञार्हा भविष्यथ=देवैः सह यज्ञभागभाजो भविष्यथ)॥

एवं पृष्टोग्निस्तान्प्रत्युवाचेति सायणः ॥

२. [ हे ऋभूंनो ], तुम्ही एका चमसाचे चार चमस करा. देवांनीं तुम्हांला हें सांगितलें आहे. हें [सांगण्यास] मी तुम्हांप्रत आलों आहें. हे सुधन्व्याचे पुत्र हो, तुम्ही जर असें कराल, [ तर ] तुम्ही देवांबरोबर यज्ञयोग्य व्हाल.

2. Make the one bowl into four. That the gods have told you. That I have come [ to tell ] you. If you, O sons of Sudhanvan, do so, you shall become worthy of being honoured with sacrifices along with the gods.

हून त्याणेंहि त्यांसारिखें रूप घेऊन त्यांजमध्यें बसला. तेव्हां आपण कोणते, आणि हा कोण, हें त्यांस ओळखितां येईना. तेव्हां ते आपसांत आणि मग अग्नीला बोलत आहेत. पहिल्या ऋचेंत ऋभु बोलत आहेत, दुसरींत अग्नि बोलत आहे, इत्यादि.

वरच्या कथेला अनुलक्षून भावार्थः ' हा जो आला आहे, तो आम्हांतून वडील तो आला आहे, कीं कनिष्ठ तो आला आहे ? किंवा हा अग्नि देवांचें दूत्य करण्यास आला आहे काय ? आम्हीं जें आतां म्हटलें, तें काय ? हे अग्नी, आम्ही त्वष्ट्यानें केलेल्या चमसाची निंदा करीत नाहीं, तर त्याची प्रतिष्ठाच गात आहों.'

' मोठ्यांपासून झालेला '='महाकुलः'. म्हणजे त्वष्ट्यानें निर्मिलेला आहे. त्वष्ट्यानें एक चमस केला होता, त्याचे ऋभूंनीं चार केले. तर ऋभु म्हणतात, हे अग्नी, त्वष्ट्याच्या चमसाची आम्ही निंदा करीत नाहीं, तर उलटें त्याचें भाग्य वर्णीत आहों.

' काष्ठपात्राचीच '='द्रुणः.' अक्षरशः लांकडाचा केलेला जो चमस अथवा सोमपात्र, त्याची. चमस लांकडाचा करीत असत; कारण प्राचीनकाळीं धातु मिळत नव्हत्या, हेंच असेल.

वृत्तासाठीं ' दूत्यं 'च्या ठिकाणीं ' दूतिअं ' असें वाचावें.

२ सायण म्हणतात, 'अग्नि ऋभूंप्रत बोलतोः– हे ऋभू हो, तुम्ही एक चमस आहे त्याचे चार करा. असें तुम्हांस देवांनीं सांगितलेलें सांगावयास मी आलों आहें. जर तुम्ही तसें कराल, तर तुम्ही देव व्हाल आणि मग इतर देवांप्रमाणें तुम्हांप्रीत्यर्थहि लोक यज्ञ करून हवि आणि सोम अर्पण करूं लागतील.'

' एका चमसाचे चार चमस '=' एकं चमसं चतुरः.' सू. २० मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत ' यदि एवा ' असें वाचावें.

अग्निं दूतं प्रति यदब्रवीतनाश्वः कर्त्वो रथ उतेह कर्त्वः ।
धेनुः कर्त्वा युवशा कर्त्वा द्वा तानि भ्रातरनु वः कृत्व्येमसि ॥३॥

अग्निम् । दूतम् । प्रति । यत् । अब्रवीतन । अश्वः । कर्त्वः । रथः ।
उत । इह । कर्त्वः ।
धेनुः । कर्त्वा । युवशा । कर्त्वा । द्वा । तानि । भ्रातः । अनु । वः ।
कृत्वी । आ । इमसि ॥ ३ ॥

चकृवांस ऋभवस्तदपृच्छत क्वेदभूद्यः स्य दूतो न आजगन् ।
यदावाख्यच्चमसाञ्चतुरः कृतानादित्त्वष्टा ग्नास्वन्तर्न्यानजे ॥ ४ ॥

चकृऽवांसः । ऋभवः । तत् । अपृच्छत । क्व । इत् । अभूत् । यः ।
स्यः । दूतः । नः । आ । अजगन् ।
यदा । अवऽअख्यत् । चमसान् । चतुरः । कृतान् । आत् । इत् । त्वष्टा ।
ग्नासु । अन्तः । नि । आनजे ॥ ४ ॥

## भाषायाम्.

३. [हे ऋभवः], यद् (=यदा) दूतमग्निं प्रति (=दूतकर्म कुर्वन्तमग्निं प्रति) अब्रवीतन (=अवदत) अश्वः कर्त्वः (=अश्वः कर्तव्यः) उतेह रथः कर्त्वः (=अपि च रथः कर्तव्यः) धेनुः कर्त्वा (=गौः कर्तव्या) द्वा [पितरौ] युवशा कर्त्वा (=युवानौ कर्तव्यौ) [इति यानि देवैरुक्तानि] तानि अनु कृत्वी (=अनुक्रमेण कृत्वा) वः (=देवान्युष्मान् प्रति) एमसि (=एमः=आगच्छामः)

४. तत् हे ऋभवः, चकृवांसः (=कृतवन्तः) [यूयम्] अपृच्छत, 'यो दूतः नः आ अजगन् (=यो दूतो भूत्वास्मान्प्रत्यागच्छत्) स्यः (=स) क्व इत् अभूत् (=क्व खलु आसीत्=क्व गतोऽस्ति खलु)?' । यदा त्वष्टा चमसान् चतुरः कृतान् अवाख्यत् (=यदा त्वष्टा चमसांश्चतुरः कृतान् अपश्यत्) आदित् (=तत्क्षणमेव) [स] ग्नासु अन्तः नि आनजे (=देवीषु मध्ये न्यक्तोऽभूत्=देवीषु मध्ये लीनोऽभवत्="स्त्रियमात्मानममन्यत") ॥

३. [ हे ऋभूंनो ], तुम्ही जे अग्निदूताप्रत बोललां, कीं, 'घोडा करावयाचा आणि रथ करावयाचा, गाय करावयाची, दोघेंहि आईबापें [ पुनः ] तरूण करावयाचीं, तर ह्या सर्व गोष्टी करून, हे भ्रात्या, आम्ही तुम्हांप्रत येतों,'

3. When you, [ O Ribhus ], said to Agni the messenger, 'we will come to you (the gods) after having done, O brother, as ordered viz, having made the horse, and made the chariot, made the cow, [ and ] made the two parents young;'

४. तें, हे ऋभूंनो, तुम्हीं केल्यावर तुम्ही विचारिते झालां कीं, 'आम्हांपाशीं जो दूत आला होता तो कोठें आहे?' जेव्हां त्वष्टा चार चमस केलेले पाहता झाला, त्याबरोबर तो स्त्रियांमध्यें लपून राहिला.

4. Having done that you, O Ribhus, asked, 'where indeed is he who came unto us as messenger?' When Tvashtâ saw the four bowls made, he instantly hid amongst the goddesses.

---

३. ४. या दोन ऋचांचा संबंध एकत्र असल्यामुळें त्यांचा भावार्थ एकच ठिकाणीं सांगतों; 'हे ऋभू हो, तुम्ही अग्नीदूताप्रत जेव्हां असें म्हणालां कीं, हे बंधू, देवांनीं सांगून पाठविल्या प्रमाणें आम्ही घोडा, रथ, धेनु हीं करून, आणि आईबापांस पुनः तरूण करून देवांप्रत येतों '( ३ ),

'तेव्हांच ते सर्व चमत्कार तुम्हीं कांहीं एक विलंब न लावितां केले, आणि अग्निरूप दूताकडे केलेले पराक्रम सांगण्यासाठीं म्हणून पाहूं लागलां, तर तो तुमच्या दृष्टीस पडला नाहीं; तेव्हां तुम्ही म्हणालां कीं, तो दूत होऊन आलेला अग्नि कोठें आहे ? वस्तुतः अग्नीनें जाऊन त्वष्ट्याला सांगितलें, आणि त्वष्ट्यानें तुम्हीं एकाचे चार चमस केलेले पाहतांच, लाजून देवपत्न्यांमध्यें लपून जणुं राहिला.' ( ४ ).

'घोडा करावयाचा आणि रथ करावयाचा '=' अश्वः कर्त्वः उत इह रथः कर्त्वः.' ऋभूंनीं इंद्राकरितां रथ आणि घोडे करून दिले; अश्वींकरितां रथ केला; असें सांगितलें आहे, तेच हे होत. सू. २० मं. १ याजवरील टीप पहा.

'गाय करावयाची'=' धेनुः कर्त्वः ' सू. २० मं. ३ आणि टीप पहा. ही गाय बृहस्पतीकरितां केली होती असें सहावे ऋचेंत सांगितलें आहे.

' आईबापें तरूण करावयाचीं '=' यु-

हनामैनाँ इति त्वष्टा यदब्रवीच्चमसं ये देवपानमनिन्दिषुः ।
अन्या नामानि कृण्वते सुते सचाँ अन्यैरेनान्कन्या३नामभिः स्परत्
॥ ५ ॥ ४ ॥

हनाम । एनान् । इति । त्वष्टा । यत् । अब्रवीत् । चमसम् । ये । देवऽ-
पानम् । अनिन्दिषुः ।
अन्या । नामानि । कृण्वते । सुते । सचा । अन्यैः । एनान् । कन्या ।
नामऽभिः । स्परत् ॥ ५ ॥ ४ ॥

## भाषायाम्.

५. ये देवपानं चमसम् अनिन्दिषुः [ तान् ] एतान् [ ऋभून् ] हनाम इति यत् त्वष्टा अब्रवीत् ( =ये ऋभवो देवपानपात्रभूतं चमसमदूषयन् तान् हनामेति यदा त्वष्टावदत् ) [ ततः प्रभृति] सुते सचा (=सोमेभिषुते सति=सोमाभिषवे=सोमयागे सोमपानकाले ) [ ऋभवः ] अन्या नामानि कृण्वते ( =अन्यानि नामानि कुर्वते=धारयन्ति=देवनामानि धारयन्ति=देवा अभूवन् ) [ अपि च ] एतान् (=तानृभून् ) अन्यैर्नामभिः ( =पूर्वस्मादन्यैर्देवनामभिः ) कन्या स्परत् ( =तेषां माता प्रीणयति=तान् अन्यनामभिर्जानाति=देवनामभिराह्वयति ) ॥

हनामेति यद्यदाब्रवीत्त्वष्टा । पूजार्थं बहुवचनम् ।......। अनिन्दिषुः। निन्दामकुर्वन् । देवयोग्यं त्वाष्ट्रचमसं मनुष्या ऋभवः स्वीकृत्य चतुर्धा व्यभजन् ......तदा प्रभृति मनुष्याः सुतेऽभिषुते सोमे पानाय प्रस्तुते सति सचा सह परस्परमन्या नामान्यन्यानि होत्रध्वर्यूद्गात्रादीनि कृण्वते । कुर्वन्ति । पूर्वं नाम प्रच्छाद्योपह्वकालेऽध्वर्य उपह्वयस्व होतरुपह्वयस्वेत्येवमन्यैरेव नामभिरात्मानं त्वष्टृवधभीत्या प्रख्यापयन्तीत्यर्थः। पूर्वमन्यानि कथं प्रसक्तानीत्यत आह । एनान्नरान् कन्या स्वोत्पादयित्री मातान्यैरेव नामभिः स्परत् । प्रीणयति । स्पृ प्रीतिबलनयोः । लेटयडागमः । इति सायणः॥

वशा कर्त्या इ. ' सू. २० मं. ४ आणि टीप पहा.

' तुम्हांप्रत '=' वः.' म्हणजे देवांप्रत. हा निरोप अग्नीच्या द्वारें देवांकडेस सांगून पाठविला आहे, असें समजावयाचें.

' जो दूत'=' यो दूतः.' म्हणजे अग्नि समजावयाचा.

' य स्य दूतो ' यांत ' य 'पुढें विसर्ग म्हणण्याचा प्रचार वैदिक पाठांत नाहीं, आणि पोथ्यांतहि लिहिलेला नसतो. आणि मोक्षमूलर यांच्या मोठ्या सभाष्य ऋक्संहितेच्या आवृत्तींत तरी विसर्ग गा-

५. यांनीं देवपात्र चमस निंदित केला, तर यांला आपण मारून टाकूं, असें ज्या दिवशीं त्वष्टा म्हणाला, [ त्या दिवसापासून ] सोमसवनाच्या वेळीं हे दुसरीं नांवें धारण करूं लागले, [ आणि ] यांची आई यांजवर दुसऱ्या नांवांनीं प्रीति करूं लागली.

5. Ever since Tvashtâ said: 'we will kill these [ Ribhus ] who have despised the bowl from which the gods drink', the Ribhus assume other names when Soma is offered, [and] the young woman [ their mother ] loves them under other names.

ळलेलाच आहे, पण केवळ संहितेची जी त्यांची आवृत्ति आहे, तींत त्यांनीं पुनः विसर्ग घातला आहे. त्याचें बहुतकरून कारण असें दिसतें कीं, प्रातिशाख्यांत हा विसर्ग गाळण्याविषयीं कांहीं सांगितलेलें नाहीं, आणि " तमेवोष्माणमूष्मणि " ( पटल ४ ) असें सांगितलें आहे, त्यावरून 'यस्स' असें व्हावें असें होतें. पण प्रातिशाख्याचा आधार नाहीं तरी वैदिक पाठ 'य स्य दूतो' असा असल्याविषयीं आम्हीं आपली खातरी कितीएक उत्तम वैदिकांचा पाठ ऐकून घेऊन करून घेतली आहे, आणि पोथ्या पाहतांहि 'य स्य दूतो' असेंच आहे. यावरून 'य स्य दूतो' हा पाठ परंपरागत आलेला आहे असें समजून आम्हीं कायम ठेविला आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या मंत्रांतील दुसऱ्या पादांत दुसरा जो 'कत्वंः' शब्द आहे, त्याच्या ठिकाणीं 'कर्तुअः' असें म्हणावें. तिसऱ्या पादांत दुसरा 'कर्त्वा' शब्द आहे त्याजबद्दल 'कर्तुआ,' आणि चवथ्या चरणात 'कत्वी एमसि' असें म्हणावें.

चवथ्या मंत्रांतील दुसऱ्या चरणांत 'क इत्' आणि चवथ्यांत 'ग्नासु अन्तर्नि आनजे' असें म्हणावें.

५. 'त्वष्ट्यानें जेव्हां असें म्हटलें कीं, 'या ऋभूंनीं मी केलेलें देवांचें चमसपात्र निंदिलें आणि त्याचीं चार केलीं, त्यापेक्षां या ऋभूंस मारून टाकूं,' त्या दिवसापासून ऋभूंनीं पूर्वीचीं नांवें बदलून दुसऱ्या नांवानें वर्तूं लागले, आणि त्या दिवसापासून त्यांची आई त्यांस दुसऱ्या नांवानें हाक मारीत असते. म्हणजे, पूर्वीं मनुष्य होते ते मग देव झाले.' असा या ऋचेचा भावार्थ आहे, पण ऋचा कठिण आहे.

'देवपात्र चमस'='देवपानं चमसम्.' म्हणजे, देव ज्या चमसामधून पीत असत असें पात्र, अथवा प्याला.

'दुसरीं नांवें'='अन्या नामानि.' सायण म्हणतात कीं, त्वष्टा मारील या

**इन्द्रो हरी युयुजे अश्विना रथं बृहस्पतिर्विश्वरूपामुपाजत ।**
**ऋभुर्विभ्वा वाजो देवाँ अगच्छत स्वपसो यज्ञियं भागमैतन ॥६॥**

इन्द्रः । हरी इति । युयुजे । अश्विना । रथम् । बृहस्पतिः । विश्वऽरूपाम् । उप । आजत ।
ऋभुः । विऽभ्वा । वाजः । देवान् । अगच्छत । सुऽअपसः । यज्ञियम् । भागम् । ऐतन ॥ ६ ॥

### भाषायाम्.

६. इन्द्रो हरी युयुजे (=ऋभुभिर्निर्मितौ हरिद्वर्णावश्वौ स्वरथे योजयति ) । अश्विना (=अश्विनौ ) रथं [ युयुजाते ] ( =ऋभुभिः कृतं रथं योजयतः ) । बृहस्पतिः (=ब्रह्मणः स्तोत्रस्य पतिः पालयिताभिमानी देवो ) विश्वरूपाम् (=एतन्नामिकाम् ऋभुभिः कृतां गाम् ) उप आजत (=स्वीकरोति ) । [ अतः कारणात् ] ऋभुर्विभ्वा वाज [ इति ऋभवो यूयं ] देवान् अगच्छत (=देवान् प्रति अगच्छत=देवत्वं प्राप) । सुअपसः (=सुकर्माणः अश्वरथगवादिपरमाद्भुतकर्मणां कर्तारो) [ यूयं ] यज्ञियं भागम् ऐतन (=यज्ञसंबन्धिनं भागं=यज्ञे प्रार्पितस्य हविषो भागं प्राप्तवन्तः स्थ ) ॥

---

भीतीनें ऋभूंनीं आपलीं नांवें बदललीं. ( भाषेखालीं पहा ). पण नवीं नांवें धारण केलीं म्हणजे 'देव झाले' इतकेंच विवक्षित दिसतें.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत ' कनिआ ' असा उच्चार केला पाहिजे.

६. इंद्रानें रथाला घोडे जोडिले; अश्वींनीं रथ [ जोडिला ]; बृहस्पतीनें विश्वरूपेला हाकून नेली: [त्याजवरून] ऋभु, विभ्वा [आणि] वाज [हे तुम्ही] देवांप्रत पोंहचलां; सुकर्मकारी ऋभु यज्ञाच्या भागाला पावलां.

6. Indra yoked the tawny pair of horses [that you the Ribhus made for him]; the As'vins [ drove in ] the chariot [ that you had made ]; Brihaspati drove the cow Vis'varûpâ [ that you had produced]. [ So ] you Ribhu, Vibhvâ [ and ] Vâja went among the gods,—you, the skilful [Ribhus], attained to part of the sacrificial offering.

---

६. 'हे ऋभूंनो, तुम्ही इंद्राकरितां घोडे निर्माण केले; तुम्हीं अश्वींकरितां रथ निर्माण केला; तुम्हीं बृहस्पति म्हणून जो स्तोत्राचा अधिपति देव त्याजकरितां 'विश्वरूपा' या नांवाची गाय निर्माण केली. हीं तुमचीं मोठीं आश्चर्यकारक कामें. त्यांजबद्दल तुम्ही देवांकडे गेलां, आणि देव होऊन इतर देवांबरोबर बसलां, आणि इतर देवांबरोबर तुम्हांलाहि उपासक जन हवि अर्पण करूं लागले.'

'इंद्रानें रथाला घोडे जोडिले'= 'इन्द्रो हरी युयुजे.' म्हणजे इंद्र जो आपल्या रथाला घोडे जोडितो, ते त्याला ऋभूंनीं करून दिले.

'बृहस्पतीनें विश्वरूपेला हाकून नेली' =' बृहस्पतिः विश्वरूपाम् उप आजत.' बृहस्पति म्हणजे उपासनेमध्यें जें स्तोत्र म्हणावयाचें अथवा स्तोत्रें म्हणून जी उपासना करावयाची, तिचा अभिमानी देव; म्हणजे तद्रूपच देव. त्यालाच ब्रह्मणस्पति असेंहि नांव आहे. म्हणजे, ब्रह्मणस्पति म्हणून जो देव आहे, तो आणि बृहस्पति, हे एकच. सू. १०६ मं. ५ आणि याजवरील टीप पहा.

या बृहस्पतीसाठीं ऋभूंनीं आपल्या चातुर्यानें विश्वरूपा या नांवाची गाय निर्माण करून दिली असें वेदांत सांगितलें आहे. ऋ. ४. ३३. ८ याजवरील सायणभाष्य पहा. सर्व पृथिवीवर पर्यटन करणाऱ्या अश्वींला ऋभूंनीं रथ निर्माण करून दिला असें समजणें हें जसें स्वाभाविक आहे, तसेंच गाईचें दूध ज्यांत अवश्य आहे अशा उपासनेचा जो अधिदेव, त्याजकरितां त्यांणीं गाय निर्माण करून दिली, असें समजणें हेंहि स्वाभाविक आहे.

'सुकर्मकारी'=' स्वपसः.' म्हणजे

**निश्चर्मणो गामरिणीत धीतिभिर्या जरन्ता युवशा ताकृणोतन ।**
**सौधन्वना अश्वादश्वमतक्षत युक्त्वा रथमुप देवाँ अयातन ॥७॥**

निः । चर्मणः । गाम् । अरिणीत । धीतिऽभिः । या । जरन्ता । युवशा । ता । अकृणोतन ।
सौधन्वनाः । अश्वात् । अश्वम् । अतक्षत । युक्त्वा । रथम् । उप । देवान् । अयातन ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. धीतिभिः (=युष्माकं प्रज्ञाभिर्) गां चर्मणः निः अरिणीत (=चर्मणः सकाशात् गां निरगमयत=चर्मणः सकाशाद् गौर्यथा उत्पाद्यते तथाकुरुत ) । या जरन्ता (=यौ जरन्तौ=यौ युष्माकं पितरौ वृद्धावास्तां ) ता युवशा अकृणोतन (=तौ युवशौ युवानौ कृतवन्तः स्थ ) । हे सौधन्वनाः (=सुधन्वनः पुत्रा ऋभवः), [ यूयम् ] अश्वात् अश्वम् अतक्षत ( =एकेनाश्वेन अश्वान्तरं निर्मितवन्तः स्थ ) । [ एवं कृत्वा ] [ यूयं ] रथं युक्त्वा (=युष्माकम् अश्वं रथे योजयित्वा=रथमारुह्य ) उप देवान् अयातन (=देवान् प्रति अगच्छत ) ॥

---

गाय, रथ, घोडा, हीं निर्माण करणें इत्यादिक जीं आश्चर्यकारक कामें, तीं करणारे. तीं कामें केलीं म्हणून ते देवत्वाप्रत पावले असा अभिप्राय आहे. त्यामुळें 'स्वपसः' हें हेतुगर्भ विशेषण आहे.

वृत्तासाठीं चवथ्या पादांत 'स्वपसः'-च्या ठिकाणीं 'सुअपसः' असें वाचावें.

**७. हे ऋभू हो, तुम्ही आपल्या बुद्धिबळानें चामड्यांतून गाय काढिते झालां, [ आणि ] जे तुमचे [ आईबाप ] वृद्ध [ होते ], त्यांना तरुण करिते झालां. हे सुधन्व्याचे पुत्र हो, तुम्ही अश्वापासून अश्व उत्पन्न करिते झालां. [आणि नंतर] रथ जोडून देवांप्रत पावलां.**

7. You with your talents made the cow to come out from the hide. You made young those that were old. You, the sons of Sudhanvan, fashioned [ a ] horse from a horse. [ You then ], having put the horses to the chariot, went among the gods.

---

७ यांत ऋभूंचे तीन पराक्रम सांगितले आहेत: 'पहिला—त्यांणीं मेलेल्या गाईच्या चामड्यापासून दुसरी जीवंत गाय निर्माण केली; दुसरा—त्यांणीं आपल्या वृद्ध आईबापांस पुनः तरुण केलें; आणि तिसरा—त्यांणीं एका घोड्यापासून दुसरा घोडा निर्माण केला. हे पराक्रम केल्यानंतर त्यांना देवत्व प्राप्त झालें, आणि ते देवांमध्यें वास करावयास गेले.'

'चामड्यांतून गाय काढिते झालां'='चर्मणः गां निररिणीत.' ( सू. ११० मं. ८ आणि त्यावरील टीप पहा ).

मेलेल्या गाईला तिचें चामडें घेऊन त्याच्यापासून पुनः सजीव निर्माण केली, असें वेदांत कितीएक ठिकाणीं सांगितलें आहे. उदाहरणार्थ, यया धिया गाम् अरिणीत चर्मणः=ज्या बुद्धीनें, हे ऋभू हो, तुम्ही चामड्यापासून गाय निर्माण करिते झालां, ऋ. ३. ६०. २. शिवाय ऋ. ४. ३६. ४ पहा.

'जे तुमचे आईबाप वृद्ध होते' इ०. सू. ११७ मं. १३ याजवरील टीप पहा.

'अश्वापासून अश्व उत्पन्न करिते झालां'='अश्वात् अश्वम् अतक्षत.' हा घोडा म्हणजे 'पेदु' नांवाच्या योद्ध्याचा वाईट घोडा असतां त्या पेदूला अश्वींनीं सद्गुणी आणि विजयी घोडा दिला, म्हणून कितीएक ठिकाणीं सांगितलेला जो, तोच असावा असें दिसतें. आणि हें जर खरें असेल, तर पेदूचा वाईट घोडा असतां त्याला अश्वींनीं चांगला घोडा दिला अशी कथा जेथें जेथें आली आहे, तेथें तेथें अश्वींनी पेदूच्या वाईट घोड्यापासून चांगला घोडा निर्माण केला असा भावार्थ समजला पाहिजे. पेदूच्या घोड्याविषयीं सू. ११६ मं. ६, सू. ११९ मं. १० आणि सू. ११७ मं. ९ हीं स्थळें पहा.

**इदमुदकं पिबतेत्यब्रवीतनेदं वा घा पिबता मुञ्जनेजनम् ।**
**सौधन्वना यदि तन्नेव हर्यथ तृतीये घा सवने मादयाध्वै ॥ ८ ॥**

इदम् । उदकम् । पिबत । इति ।-अब्रवीतन । इदम् । वा । घ । पि-
बत । मुञ्जऽनेजनम् ।
सौधन्वनाः । यदि । तत् । नऽइव । हर्यथ । तृतीये । घ । सवने ।
मादयाध्वै ॥ ८ ॥

**भाषायाम्.**

८. [ हे ऋभवः, यूयम् आत्मानं प्रति ] इति ( =वक्ष्यमाणप्रकारेण ) अब्रवीतन (=अब्रवीत=उक्तवन्तः) । [तदेवम्] । हे सौधन्वनाः (=सुधन्वनः पुत्राः), इदमुदकं [प्रथमे सवने] (=प्रातःसवने सोमाभिलक्षणं जलं) पिबत । वा घ (=अथवा) [द्वितीय-सवने ] मुञ्जनेजनं ( =मुञ्जतृणेन संशोधितम् ) इदम् [ उदकं सोमलक्षणं ] पिबत । यदि [ तु ] तत् (=तदपि ) नेव हर्यथ (=नैव कामयध्वे ) [ तर्हि ] तृतीये सवने घ (=सायंतनसोमाभिषवणकाले ) मादयाध्वै ( =सोमपानेन मादयुक्ता भवत=आनन्दि-ता भवत ) ॥

अत्रेदमुक्तं भवति प्राप्तदेवत्वा ऋभवः आत्मानं प्रति प्रथमे सवने सोमः पीयतां द्वितीयसवने वा तृतीये वा पीयतामित्यवदन्निति ॥

८. [हे ऋभू हो], तुम्ही आपणांस म्हणालां 'हें पाणी तुम्ही प्या, अथवा मुञ्ज तृणानें शुद्ध केलेलें हें उदक प्या; आणि, हे सुधन्व्याचे पुत्र हो, तें जर तुम्हांला आवडत नसेल, तर तुम्ही तिसऱ्या सवनांच्या वेळीं आनंद पावा.'

8. You said [to yourselves]: 'drink you this water, or drink this one strained by means of the Munja-grass; or, if you do not like this, O sons of Sudhanvan, be you delighted in the third Soma-offering [of the day].'

---

८. भावार्थः—'ऋभूंस जेव्हां देवत्व प्राप्त झालें, तेव्हां ते आपल्यास म्हणाले, हे सुधन्व्याचे पुत्र हो, तुम्ही आतां देव झालां आहां, त्यामुळें लोक तुम्हांला प्रातःसवनाच्या वेळीं, मध्याह्नसवनाच्या वेळीं आणि सायंसवनाच्या वेळीं, याप्रमाणें दिवसांतून तीनदा सोम अर्पण करितील; तर ह्या तिहींतून तुम्ही पाहिजे त्यावेळीं यज्ञाप्रत जाऊन सोमपान करीत असावें.'

'हें पाणी'='इदमुदकम्.' म्हणजे सोमरूप पाणी जें प्रातःसवनाच्या वेळीं अर्पण करितात, तें.

'अथवा मुञ्ज तृणानें शुद्ध केलेलें हें उदक'='वा घ इदम् मुञ्जनेजनम्.' म्हणजे मुंज नांवाच्या गवताच्या योगानें गाळलेलें सोमरूप उदक. मुंज गवताची चाळण करून तीजमधून गाळिलेला, असा अर्थ बहुत करून असावा. सायणाचार्य म्हणतात कीं, सोमवल्ली मुंज नांवाच्या पर्वतांत होत असल्यामुळें साधारणपणें सोमांत मुंज नावाच्या गवताचे तुकडे असावयाचे, ते ज्यांतून काढून टाकिले आहेत, तो सोम 'मुंजनेजन' होय.

'आनंद पावा'='मादयाध्वै.' म्हणजे सोम पीऊन सुख पावा.

या ऋचेच्या पहिल्या पादांत बारा अक्षरें असावीं त्याबद्दल तेरा अक्षरें होतात! 'इति' हें पद त्यांत प्रथम नसतां मागाहून कोणत्या तरी कारणामुळें घातलें गेलें असें समजावयाचें कीं काय? कारण कीं 'इति' शब्द काढून टाकिला तर केवळ वृत्ताचीच सोय होते असें नाहीं, तर सर्व ऋचेचाहि अर्थ वर केलेल्या अर्थापेक्षां चांगला जुळतो, असें आम्हांस वाटतें. कारण कीं 'अब्रवीतन' याचा अर्थ वेदांतील प्रचाराप्रमाणें आज्ञार्थी केला म्हणजे, खालीं लिहिल्याप्रमाणें भाषांतर करितां येतें. ऋषि म्हणतोः—'हे सुधन्व्याचे पुत्र हो, हें पाणी तुम्ही प्या अथवा मुञ्ज तृणानें शुद्ध केलेलें हें उदक तुम्ही प्याल कीं काय तें सांगा. आणि तें जर तुम्हांला आवडत नसेल, तर तुम्ही तिसऱ्या सवनाच्या वेळीं आनंद पावा.'

चवथ्या चरणांत 'मादयाधुऐ' असें म्हणावें.

**आपो भूयिष्ठा इत्येको अब्रवीदग्निर्भूयिष्ठ इत्यन्यो अब्रवीत् ।**
**वधर्यन्तीं बहुभ्यः प्रैको अब्रवीदृता वदन्तश्चमसाँ अपिंशत ॥९॥**

आपः । भूयिष्ठाः । इति । एकः । अब्रवीत् । अग्निः । भूयिष्ठः । इति । अन्यः । अब्रवीत् ।
वधःऽयन्तीम् । बहुऽभ्यः । प्र । एकः । अब्रवीत् । ऋता । वदन्तः । चमसान् । अपिंशत ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. [ सर्वेभ्योपि तत्त्वेभ्यः ] आपो भूयिष्ठाः ( =आप एव महत्तमाः= परोपकृत्तमा ) [ भवन्ति ] इति एकः ( =युष्माकमेकः ) अब्रवीत् । अन्यः ( =युष्माकम् अन्यः ) अग्निर्भूयिष्ठः (=सर्वेभ्योपि अग्निरेव लोकानाम् उपकृत्तमो ) [ भवति ] इति अब्रवीत् । एकः (=शिष्टस्तु तृतीयो ) वधर्यन्तीं (= ? भूमिं ) बहुभ्यः प्र अब्रवीत् ( =बहूनां तत्त्वानां सकाशात् प्रकृष्टतराम् अब्रवीत्=सर्वेभ्योपि तत्त्वेभ्यः सकाशात् भूमिरेव परोपकृत्तरेति अवदत् ) । [ एवं प्रकारेण ] ऋता वदन्तः (=ऋतानि सत्यानि उच्चारयन्तो ) [ यूयं हे ऋभवः], चमसाम् अपिंशत ( =चतुःसंख्याकांश्चमसानवयव्यकुरुत=एकं चमसं विभज्य ततश्चतुःसंख्याकांश्चमसान् अकुरुत ) ॥

आपो भूयिष्ठा इति योवदत् स तासाम् अपाम् अनुग्रहात् चमसचतुष्करणसमर्थोभवत् । अग्निर्भूयिष्ठ इति तु योब्रवीत् स तस्याग्नेरनुग्रहात् चमसचतुष्करणसमर्थोभवत् । यश्च भूमिर्भूयिष्ठेत्यब्रवीत् सोपि तस्या भूमेरनुग्रहात् चमसचतुष्करणसमर्थोभवत् इति भावः ॥

वधर्यन्तीम् । वधरिति रेफान्तोपि वज्रनाम । वधोऽर्क इति तन्नामसु पाठात् । तदिच्छति वृष्ट्युदकायेति वधर्यन्तो मेघपङ्क्तिरुच्यते । यद्यपीयं स्ववधार्थं वज्रं स्वयमेव नापेक्षते । तथापि वृष्ट्यर्थमिन्द्रवज्रेण हन्यमानत्वात् तदिच्छन्तीत्युपचर्यते । यद्वा बहुभ्यस्तेषामर्थाय वधर्यन्तीं वधमात्मन इच्छन्तीं भूमिम् । इति सायणः ॥

९. एक म्हणाला, उदकें सर्वांत मोठीं [ होत ], अग्नि सर्वांत मोठा [ होय ] असें दुसरा म्हणाला; एक म्हणाला, भूमि सर्वांपेक्षां मोठी होय: [या प्रकारें] सत्यांचा उच्चार करून, हे ऋभू हो, तुम्ही [ एकाचे चार ] चमस करिते झालां.

9. One [ of you ] said that the waters are the greatest of all; another said, that Agni is the greatest of all; the third said, the Earth [is] greater than all. Declaring [these] truths you, [ O Ribhus ], divided [ the single ] bowl into four.

---

९. या मंत्रांत ऋभूंनीं एका चमसाचे फोडून चार केले ते कसे केले तें सांगितलें आहे. 'ऋभूंपैकीं एकजण म्हणाला, उदकें सर्वांत मोठीं आहेत, त्यावरून त्याला उदकांचा प्रसाद होऊन एका चमसाचे चार करण्याचें सामर्थ्य त्याच्या आंगीं आलें; दुसऱ्यानें अग्नि श्रेष्ठ आहे असें म्हणतांच, अग्नीच्या प्रसादानें एकाचे चार चमस करण्याचें सामर्थ्य त्याला आलें. त्याप्रमाणेंच भूमीला श्रेष्ठ म्हणणाऱ्यासहि तिच्या प्रसादेंकरून एका चमसाचे चार करण्याचें सामर्थ्य आलें.' म्हणजे एक चमस असतां त्याचे चार करावयाचा जो चमत्कार, तो करून दाखविण्याला ऋभूंस कांहीं मोठे कष्ट अथवा श्रम पडले असें नाहीं. त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें उच्चार मात्र केला, इतक्यांत त्यांस एकदम चार चमस करण्याची शक्ति आली.

'भूमि'='वधर्यन्तीम्.' हा अर्थ सायणांपासून घेतला आहे, पण त्यांसच त्याविषयीं संशय आहे. ते मेघमाला किंवा पृथिवी असा अर्थ करितात (भाषेखालीं पहा). वधर्यन्तीम् हा शब्द पुनः कोठें आलेला नाहीं.

'एकाचे चार चमस करिते झालां'= '[ चतुरः ] चमसान् अपिंशत.' ऋ. ३. ६०. २ यांतहि असेंच सांगितलें आहे, (याभिः शचीभिश्चमसान् अपिंशत), तें पहा.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'इत्येको'-च्या ठिकाणीं 'इति एको' असें, आणि दुसऱ्यांत 'इत्यन्यो'च्या ठिकाणीं 'इति अन्यो' असें वाचावें लागतें.

श्रोणामेक उदकं गामवाजति मांसमेकः पिंशति सूनयाभृतम् ।
आ निम्रुचः शकृदेको अपाभरत्किं स्वित्पुत्रेभ्यः पितरा उपावतुः॥
॥ १० ॥ ५ ॥

श्रोणाम् । एकः । उदकम् । गाम् । अव । अजति । मांसम् । एकः । पिंशति । सूनया । आऽभृतम् ।
आ । निऽम्रुचः । शकृत् । एकः । अप । अभरत् । किम् । स्वित् । पुत्रेभ्यः । पितरौ । उप । आवतुः ॥ १० ॥ ५ ॥

## भाषायाम्.

१०. एकः (=त्रयाणामृभूणां मध्य एकः ) श्रोणां गां (=पङ्गुकां गां यज्ञार्थं हननीयां गाम् ) उदकम् अव अजति (=उदकं प्रति गमयति=वध्यभूमिं प्रति नयति) । [ अनन्तरम् ] एकः (=अपरः ) सूनया आभृतं मांसं पिंशति (=स्वधितिना संपादितं तस्या मांसम् अवयवीकरोति=हृदयजिह्वावक्षआद्यवयवान् विभजति ) । एकः (=शिष्टस्तु तृतीयः ) आ निम्रुचः ( =सायंकालात्प्रागेव ) शकृत् अपाभरत् (=गोपुरीषं निरसनाय नयति ) । [ एवं सति ] पुत्रेभ्यः (=पुत्राणां सकाशात् ) पितरौ किं स्वित् उपावतुः (=किमधिकमुपगच्छेतां=प्राप्नुयाताम् ) ?

किं स्वित् पुत्रेभ्यः पितरा उपावतुरिति निगूढार्थकम् । पितरौ यज्ञस्य पालयितारौ जायापती इति सायणः । स हि ऋचामिमामेवं व्याख्यातवान् । अत्र ऋभव एव ऋत्विग्रूपेण स्थित्वा सर्वत्र यज्ञं निर्वहन्तीत्याह । श्रोणां शोणम् । शोणवर्णमुदकं रुधिरमेक ऋभुषु मध्ये ऋत्विक् गामवाजति । बाह्यभूमिं प्रति गमयति । रक्षोभागत्वेन स्थापयति । तथैको मांसं सूनया छेदनसाधनेन स्वधितिनाभृतं संपादितं पिंशति । हृदयजिह्वावक्षआद्याकारेणाहृतं संपादितं मांसं पिंशति अवयवीकरोति । स्वधितिना तत्तदवयवान्विभजतीत्यर्थः । अथैको निम्रुचो निःशेषेण च्छिन्नान्मांसात् शकृत् कुक्षिस्थं जरत्तृणमूवध्यनामकमपाभरत् । अपाहरन्निरसनाय । एवम् ऋत्विग्रूपेण स्थितेभ्यः पुत्रेभ्यः पुरुत्रातृभ्यः पुत्रस्थानीयेभ्यः ऋभुभ्यः सर्वेष्वनुष्ठितेषु पितरा यज्ञस्य पालयितारौ जायापती किं स्विदुपावतुः । किं नु खलु प्राप्नुतः । अवतेः प्राप्त्यर्थाच्छान्दसो लिट् । सर्वं तैरेवानुष्ठितमिति तयोर्न किंचित्कृत्यमस्तीत्यर्थः । अथवायमर्थः । एकस्तेषामन्यतमः श्रोणां पङ्गुकां गामुदकं प्रत्यवगमयति । अपरः सूनया मांसविक्रयिण्याभृतं संपादितं मांसं पिंशति । अपर आ निम्रुचोऽस्तमयादर्वागेव

१०. एकजण पांगळ्या गाईला पाण्याजवळ हाकून नेतो. दुसरा सुरीनें काढिलेल्या मांसाचे तुकडे करितो; तिसरा संध्याकाळा पूर्वींच कोठा नेऊन टाकून देतो. ह्या शिवाय पुत्रांपासून आईबापांस काय अधिक मिळावें?

10. One [ of them ] drives the lame cow to the water; another divides into its parts the flesh cut out with the knife; the third removes before evening the intestines containing the undigested grass. What [ after this] should parents receive from their sons ?

---

१०. ही ऋचा कठिण आहे. पहिल्या तीन पादांचा अर्थ उघड आहे कीं, ऋभूंनीं गाय कापून तिचें मांस वेगळें काढिलें, आणि तिचा कोठा नेऊन संध्याकाळ होण्याच्या पूर्वी टाकून दिला. परंतु चवथ्या चरणाचा (' ह्याशिवाय पुत्रांपासून आईबापांस काय अधिक मिळावें ' ? याचा ) काय अभिप्राय असेल, तो स्पष्टपणें सांगवत नाहीं. ऋभूंचे आईबाप वृद्ध असतां त्यांजकरितां ते गाय मारून यज्ञाची सिद्धता करीत, आणि गाय मारण्यासंबंधी सर्व काम यथायोग्य करीत. यापेक्षां कोणतें काम आईबापांकरितां त्यांच्या पुत्रांनीं करावें ? असा अभिप्राय असावा. सायणाचार्य किंचित् निराळा अर्थ करितात; तो भाषेखालीं पहा.

' पांगळ्या गाईला पाण्याजवळ हाकून नेतो '=' श्रोणां गाम् उदकम् अव अजति. ' म्हणजे तिचे पाय बांधून मारण्याकरितां पाणी जेथें बाहेर नदींत वगैरे असेल तेथें घेऊन जातो. 'श्रोण' शब्दाचा अर्थ पांगळा हा वेदांत प्रसिद्ध आहे. ऋ. २. १३. १२; २. १५. ७ आणि सायणभाष्य पहा.

' कोठा '=' शकृत् ' म्हणजे ज्यांत खाल्लेलें पण न पचलेलें गवत असतें, तो भाग; म्हणजे आंतडीं, अथवा कोठा, कोथळा. तो संध्याकाळ होण्यापूर्वी टाकण्याची चाल असावी असें यावरून दिसतें.

सायणाच्या म्हणण्याप्रमाणेंहि ही गाय यज्ञासाठीं मारिली असें होतें. वेदांत दुसऱ्या ठिकाणींहि अशा यज्ञाचे उल्लेख आलेले आहेत. सू. १६४ मं. ४३ यांत ' चित्रविचित्र रंगाचा बैल शिजवितात; आणि तसें करणें हा सनातन धर्म आहे' ( उक्षाणं पृश्निम् अपचन्त ...... तानि धर्माणि प्रथमान्यासन्) असें म्हटलें आहे. ऋ. १०. २७. २ यांत ऋषि इंद्राला म्हणतो कीं, 'जेव्हां मला देवांस न भजणाऱ्या अनार्य शत्रूबरोबर लढण्यासाठीं तयारी करावयाची असेल, तेव्हां हे

उद्वत्स्वस्मा अकृणोतना तृणं निवत्स्वपः स्वपस्यया नरः ।
अगोह्यस्य यदसस्तना गृहे तदद्येदमृभवो नानु गच्छथ ॥ ११ ॥
उद्वत्ऽसु । अस्मै । अकृणोतन । तृणम् । निवत्ऽसु । अपः । सुऽ-
अपस्यया । नरः ।
अगोह्यस्य । यत् । असस्तन । गृहे । तत् । अद्य । इदम् । ऋभवः ।
न । अनु । गच्छथ ॥ ११ ॥

शकृन्नोपुरीषं हरति । एवमृभुभिरनुष्ठिते सति किं स्विदेतस्मात्परिचरणादन्यत्पुत्रेभ्यः सकाशादुपावतुः । उपगच्छेतामिति । इति ॥

## भाषायाम्.

११. हे नरः (=शूरा ऋभवः), यूयं स्वपस्यया (=सुकर्मेच्छया=स्वसुकर्मकौशल-दर्शनाय) उद्वत्सु (=पर्वतादिषून्नतप्रदेशेषु) अस्मै [जगते] (=अस्य भूतजातस्या-र्थाय) तृणं निवत्सु च (=निम्नप्रदेशेषु च) अपः (=उदकानि) अकृणोतन (=नि-र्मितवन्तः स्थ)। हे ऋभवः, [यूयं] यत् अगोह्यस्य गृहे असस्तन (=अगोपनीयस्य सवितुर्गृहे सुप्तवन्तः स्थ) तदिदम् अद्य (=तथा अस्मिन्दिने अत्र) नानु गच्छथ (=नानुकुरुथ नानुष्वपिथ=न निद्रां कुरुथ)॥

सायणस्तु भिन्नं व्याख्यातवान् । तदेवम् । पुराणप्रसिद्धान्सुधन्वनः पुत्रान् कर्मणा देवत्वं प्राप्तवत ऋभून् स्तुत्वा वेदप्रसिद्ध्या सूर्यरश्मिरूपानृभूनिदानीं स्तौति । हे ऋभवः । उरु प्रभूतं भासमाना ऋतेनादित्येन भासमाना वा ऋतेनोदकेनोदका-र्थमुत्पन्ना वा । रश्मीनामुरुभासमानत्वं प्रसिद्धम् । तथादित्यादुत्पत्तिरपि । उदकार्थ भवनमपि रश्मीनां धर्मकाले भूमिगतं सारमादाय पुनर्वर्षकाले प्रवर्षन्तीति प्रसिद्धम् । आदित्याज्जायते वृष्टिरिति शास्त्रात् । तथाविधा नरः प्रकाशवृष्ट्युदकादेर्नेतारो यूय-मुद्वत्सून्नतेषु प्रदेशेषु मेर्वादिषु तृणं व्रीहियवादिरूपमस्मै प्राणिजातायोपकारार्थम-कृणोतन । कृतवन्तः स्थ । उपसर्गाच्छन्दसि धात्वर्थे वति । तथा निवत्सु प्रवणदेशे-ष्वस्मा एवाप उदकान्यकृणोतन अकुर्वत । किं स्वभोगार्थं नेत्याह स्वपस्यया । शोभ-नकर्मेच्छया । शोभनं कर्मभिः कृतमिति यथा यजमानाः स्तुवन्ति तदिच्छयेत्यर्थः । किं च यूयमगोह्यस्याग्राह्यस्यादित्यस्य गृहे मण्डले यत् यावत्कालमसस्तन । सुप्तवन्तः स्थ । रात्रौ निर्व्यापारास्तिष्ठथ । षस स्वप्ने । अस्माल्लङि पूर्ववत्तस्य तनबादेशः । अदादित्वाच्छपो लुक् ॥ तत्तावन्तं कालमद्याह्नीदमिदानीं नानुगच्छथ । अनुसृत्य न गच्छथ । यावन्तं कालं रात्रौ सूर्ये निगूढा वर्तध्वे तावन्तमेव कालमहन्यपि नानु-

११. हे ऋभूंनो, तुम्हीं या [जगता]करितां [पर्वतादिक] उंच प्रदेशांवर गवत उत्पन्न केलें आहे, [ आणि ] हे पराक्रमी [ ऋभू ] हो, आपलें चातुर्य दाखविण्याच्या इच्छेनें खोल प्रदेशांमध्यें उदकें [ निर्माण केलीं आहेत ]. हे ऋभू हो, तुम्ही अगोपनीय [ सवित्या]च्या घरीं सुस्थ निजून राहिलां, तसें तुम्ही आज येथें करीत नाहीं.

11. On the heights you have produced grass for this [ creation ], and, O brave ones, the waters in the depths, in order that you may show your skill. You do not, O Ṛibhus, sleep here this day as you slept in the house of the unconcealable [ Savitā ].

इंद्रा, तुजकरितां पुष्ट बैल मारून मी शिजवीन' ( यदीदहं युधये संनयानि अदेवयून्...... ते तुभ्रं वृषभं पचानि). इतर ठिकाणीं रेडे मारून देवांस खाऊं घालीत, अशाविषयीं सांगितलें आहे. ऋ. ५. २९. ७; ८. १२. ८ इत्यादि मंत्र पहा.

११. भावार्थः ' हे ऋभू हो, तुम्हीं आपलें चातुर्य दाखविण्याकरितां पर्वतावर गवत आणि दऱ्यांत पाणी निर्माण केलें आहे. तर तुम्ही सूर्याच्या घरीं जसे रात्रीं निजून राहतां, तसे आज येथें निजूं नका.'

सायणाचार्य म्हणतात कीं 'ऋभु'शब्दाचा मूळचा अर्थ 'सूर्यकिरण' असा आहे, आणि या मंत्रापासून सूक्ताच्या शेवटपर्यंतचे मंत्र सूर्य किरणरूप जे ऋभु, तत्पर लाविले पाहिजेत; आणि सूर्यकिरणांच्या योगानें वृष्टि होऊन गवत रुजतें, आणि ते सूर्याच्या ठायीं रात्रीच्या वेळीं निजूनच जसे काय राहतात, म्हणून तुम्ही आज येथें निजूं नका, असें ऋषि म्हणत आहे. याप्रमाणें अर्थ लाविला तर जुळतो आणि 'ऋभु' शब्दाचा मूळ अर्थ ' कांतिमान् सूर्यकिरण ' असा होत नसेल असें म्हणवत नाहीं.

' अगोपनीय सवित्याच्या '=' अगोह्यस्य. ' अगोह्य हें वेदामध्यें पुष्कळ वेळ सवित्याचें विशेषण असल्यामुळें त्याच्या विशेषनामाप्रमाणें योजिलें जातें.

' करीत नाहीं '=' नानु गच्छथ. ' म्हणजे 'करूं नका' अशा अर्थी आज्ञार्थ भाषांतर केलें पाहिजे. सर्व प्राचीन भाषांमध्यें आज्ञार्थ क्रियापदांचा स्वार्थी आणि स्वार्थ क्रियापदांचा आज्ञार्थी प्रयोग करण्याची चाल आहे. त्यांचीं उदाहरणें त्या त्या भाषांत मिळतात.

**संमील्य यद्भुवना पर्यसर्पत क्व स्वित्तात्या पितरा व आसतुः ।**
**अशपत यः करस्नं व आददे यः प्राब्रवीत्प्रो तस्मा अब्रवीतन १२।**

सम्ऽमील्य । यत् । भुवना । परिऽअसर्पत । क्व । स्वित् । तात्या । पितरा । वः । आसतुः ।
अशपत । यः । करस्नम् । वः । आऽददे । यः । प्र । अब्रवीत् । प्रो इति । तस्मै । अब्रवीतन ॥ १२ ॥

गच्छथेत्यर्थः। यद्वा अगोपनीयस्य तस्य गृहेऽन्तरिक्षे यत् यावन्तं कालमसस्तन वृष्टिमदत्त्वा स्वापमकुरुत । तत्तावन्तं कालमद्येदानीं वर्षसमय इदं सस्याभिवर्धनवृष्टिप्रवाहरूपं कर्म नानुगच्छथ । अनुसृत्य न प्राप्नुथ । यावन्तं कालं विवर्षथ तावन्तमेव कालं प्रवर्षथेत्यर्थः ॥ इति ॥

## भाषायाम्.

१२. [हे ऋभवः], यत् (=यदा) [यूयं] भुवना संमील्य (=भुवनानि भूतजातानि आच्छाद्य) पर्यसर्पत (=तानि परितः सर्पणं कृतवन्तः स्थ) [तदा] वः (=युष्माकं) तात्या पितरा (तात्यौ पितरौ=वत्सलौ पितरौ) क्व स्वित् आसतुः (=क्व खलु आस्ताम्)? यो वः करस्नम् आददे (=युष्माकं हस्तं गृहीतवान्=निरुद्धवान्) तं यूयम् अशपत (=अनाशयत) यस् [तु] प्राब्रवीत् (=युष्मानस्तावीत्) [यूयं] तस्मै प्रो अब्रवीतन (=प्रकर्षेण स्तुतवन्तः स्थ)॥

इत्यक्षरार्थः। परमार्थतस्तु दुर्बोधार्थाभिप्रायेयम् । सायण एवं व्याख्यातवान् । हे ऋभवो रश्मयो यूयं यत् यदा भुवना भूतजातानि संमील्य संमीलनं कृत्वा जलधरपटलैराच्छाद्य पर्यसर्पत । परितः सर्पणं कुरुथ । वर्षथेत्यर्थः । तात्या तातौ तायमाने वृष्ट्युदके । यद्वा तात्या तासु वर्षासु । छान्दसस्त्यप्रत्ययो दकारस्यात्वं च । अथ वा पितृविशेषणम् । तात्या तत्कालीनौ पितरा जगतः पालकौ सूर्याचन्द्रमसौ क्व स्विदासतुः । कुत्र खलु तिष्ठतः । अहोरात्राविभागेन प्रवर्षयथेत्यर्थः । किंच ईदृशान्वो युष्मान् यः कोऽपि वृष्टिप्रतिबन्धकारी राक्षसादिः करस्नम् । बाहुनामैतत् करस्नौ बाहू इत्युक्तत्वात् अत्र त्वकारान्तम् । युष्मदीयं हस्तमाददे । गृह्णाति प्रतिरोधं करोति । तमशपत नाशयथ यश्च प्राब्रवीत् । प्रकर्षेण वाचा निरुन्द्धे । तस्मै प्रो प्रैवाब्रवीतन । प्रकर्षेण भर्त्सनादिशब्दं कुरुथ । यद्वा यो नूनं स्तौति तं प्रकर्षेण स्तुतेत्यर्थः । इति ॥

१२. [ हे ऋभूंनो ], जेव्हां तुम्ही भुवनाला झांकून त्याच्या सभोतालीं पसरलां, तेव्हां तुमचे वत्सल आईबाप कोठें होते ? ज्याणें तुमचा हात धरिला, त्याला तुम्हीं शाप दिला: ज्याणें तुमची स्तुति केली, त्याला तुम्ही आशिर्वाद देते झालां.

12. When you, having enveloped all creation, crept round it, where indeed were your affectionate parents ? Him you cursed who held your hand, him you blessed who blessed you.

'आपलें चातुर्य दाखविण्याच्या इच्छेनें '=' स्वपस्यया. ' याचा संबंध गवत आणि पाणी या दोहोंकडे घेतला पाहिजे.

वृत्तसुखार्थ पहिल्या पादांत "उद्वत्सु अस्मा, ' दुसऱ्यांत ' निवत्सु अपः सुअपस्यया ' आणि तिसऱ्यांत ' अमोहिंअस्य ' असें म्हणावें लागतें.

१२. हाहि मंत्र सूर्यकिरणरूप जे ऋभु तत्पर लावावयाचा आहे असें सायण म्हणतात. आम्हीं सायणांस अनुसरून अक्षरार्थ दिला आहे. सायणांचा अर्थ भाषेखालीं पहा.

अक्षरार्थ जरी सोपा आहे, तरी अभिप्राय काय आहे तो स्पष्ट समजत नाहीं. सायणांनीं सुद्धा याविषयीं ओढाताणच केली आहे.

' वत्सल '=' तात्या.' 'तात' असा जो पिता या अर्थी शब्द आहे, त्यापासून हें विशेषण झालें आहे. मराठी 'ताट्या' हें या पासूनच निघालें असेल काय ?

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ' कुअसित् ' असें वाचावें.

सुषुप्वांस ऋभवस्तदपृच्छतागोह्य क इदं नो अबूबुधत् ।
श्वानं बस्तो बोधयितारमब्रवीत्संवत्सर इदमद्या व्यख्यत ॥ १३ ॥

सुसुप्वांसः । ऋभवः । तत् । अपृच्छत । अगोह्य । कः । इदम् । नः ।
अबूबुधत् ।
श्वानम् । बस्तः । बोधयितारम् । अब्रवीत् । संवत्सरे । इदम् । अद्य ।
वि । अख्यत ॥ १३ ॥

## भाषायाम्.

१३. हे ऋभवः, सुषुप्वांसः (=गृहीतनिद्रा) [यूयं] तत् अपृच्छत (=आदित्यं प्रति एतं वक्ष्यमाणं प्रश्नमकुरुत)। हे अगोह्य (=केनाप्यगोपनीय सवितः), कः इदं नः अबूबुधत् (=क एतद्वस्तु अस्मानबोधयत्)? बस्तः (=अजः) श्वानं बोधयितारम् अब्रवीत् (=श्वा बोधयितेत्यवदत्)। [अपि च] अद्य संवत्सरे (=अद्यतनदिनपर्यन्ते वर्षे) इदं वि अख्यत (=अदर्शयत्) [इति चावदत्]॥

इयमपि निगूढतराभिप्राया। सायणः पुनरेवमाह। हे ऋभवो रश्म्यात्मका यूयं सुषुप्वांस आदित्यमण्डले स्वपन्तो वर्षणाय। तमादित्यं तद्वाक्यमपृच्छत। प्रश्नं कुरुथ। किं तदिति चेदुच्यते। हे अगोह्य केनचिदगोपनीयादित्य स्वामिन् नोऽस्मदीयमिदं कर्म वर्षणरूपं कोऽबूबुधत्। बोधयति। प्रेरयति। साहाय्यं करोति। बस्तः सर्वस्य वासयितादित्यः। बवयोरभेदत्वम्। बोधयितारं प्रेरयितारं श्वानमब्रवीत्। अन्तरिक्षे श्वसन्तं वायुं प्रावादीत्। असौ युष्मान्प्रेरयतीति। अथ वा वायुसाहाय्येन वर्षन्तो यूयं संवत्सरे पूर्णेऽद्येदानीमिदं जगद्व्यख्यत। विविधं प्रकाशितवन्तः। पूर्वं सूर्याचन्द्रमसौ यथा न दृश्येते तथा वर्षित्वेदानीं वर्षकालेऽतीते विश्वं जगद्व्यक्तं कुरुथेत्यर्थः। इति॥

१३. हे ऋभू हो, तुम्ही निद्रा घेतल्यानंतर [ आदित्याला ] विचारिते झालां: हे अगोपनीय [सविता ], हें आम्हांस कोणीं शिकविलें? बकरा म्हणाला, शिकविणारा कुत्रा होय; ही गोष्ट त्याणें आज एका वर्षांत शिकविली.

13. You, O Ribhus, having slept asked this question: O unconcealable one, who has taught this unto us? The ram said, the dog was the teacher; he taught this in a year this day.

---

१३. या ऋचेचाहि आम्हीं केवळ सुलभ अक्षरार्थ दिला आहे. अन्वयामध्येंहि यांत कांहीं कठीण नाहीं. पण ऋषीचें बोलणें कोणत्या अभिप्रायाचें आहे तें समजत नाहीं. म्हणजे 'हें शिकविलें' असे जे शब्द आहेत, त्यांतील 'हें' तें काय, 'बकरा' तो कोण, 'कुत्रा' कोण, आणि त्याणें एक वर्षांत शिकविलें म्हणजे काय, तें समजण्यास साधनें आहेत असें दिसत नाहीं. सायणांनीं हाहि मंत्र सूर्यकिरणरूप जे ऋभु,, तत्परत्व लाविला आहे. ( भाषेखालीं पहा ). पण वरच्या मंत्राप्रमाणें यांतहि त्यांणीं ओढाताण केली आहे.

'बकरा'='बस्तः.' 'बस्त' शब्दाचा साधारण अक्षरशः अर्थ हा येथें केला आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत 'अगोहिअ' असें, आणि चवथ्या चरणांत 'विअख्यत' असें म्हणावें लागतें.

दि॒वा या॑न्ति म॒रुतो॒ भूम्या॒ग्निर॒यं वातो॑ अ॒न्तरि॑क्षेण याति ।
अ॒द्भिर्या॑ति॒ वरु॑णः समु॒द्रैर्यु॒ष्माँ इ॒च्छन्त॑: शवसो नपातः॥१४॥६॥

दि॒वा । या॒न्ति॒ । म॒रुत॑: । भूम्या॑ । अ॒ग्निः । अ॒यम् । वात॑: । अ॒न्तरि॑-
क्षेण । या॒ति॒ ।
अ॒त्ऽभिः । या॒ति॒ । वरु॑णः । स॒मु॒द्रैः । यु॒ष्मान् । इ॒च्छन्त॑: । श॒व॒सः ।
न॒पा॒तः ॥ १४ ॥ ६ ॥

## भाषायाम्.

१४. हे शवसो नपातः (=बलस्य पुत्रा) [ऋभवः], युष्मानिच्छन्तः (=युष्म-दिच्छवो) मरुतः दिवा यान्ति (=द्युलोके गच्छन्ति) अग्निश् [च] भूम्या (=पृथिव्यां) याति (=संचरति) [तथा] अयं वातः (=अयं वायुरपि) अन्तरिक्षेण याति (=अन्तरिक्षे संचरति) [अपि च] वरुणः अद्भिः समुद्रैः (=अप्सु समुद्रेषु च) याति (=संचरति) ॥

अत्र सायणः । हे शवसो वृष्टिकार्यस्य बलस्य नपातो न पातयितार ऋभवः युष्मानिच्छन्तो वृष्ट्यनुकूलचिकीर्षया युष्मानेवेच्छन्तः सर्वे देवा आयान्ति । कस्मादिति तदुच्यते । मरुतो वृष्ट्यनुकूला देवा दिवा द्युलोकादन्तरिक्षाद्यान्ति । आगच्छन्ति । भूम्या भूमेः सकाशादग्निर्याति । आगच्छति । अयं वातः सर्वदा संचारी वायुरन्तरिक्षेण याति अन्तरिक्षादायाति । तथा वरुण आवरको जलाभिमानी देवः समुद्रैः समुन्दनस्वभावैरद्भिः । ताभ्य आयाति । यद्वा पूर्वं वृष्टिसाहाय्यायागता एते देवाः कृतकार्याः सन्तः पुनर्युष्मान्कामयमानाः स्वस्वदेशं प्रति यान्तीत्यर्थः । इति॥

१४. हे बळाचे पुत्र हो, तुमची इच्छा करून मरुत् द्युलोकांतून जातात, अग्नि भूमीवरून जातो, हा वायु अंतरिक्षांतून जातो, [आणि] वरुण पाण्यावरून आणि समुद्रावरून जातो.

14. Wishing for you, O sons of strength, the Maruts go along the heavens, Agni along the earth, this Vâyu goes along the sky, [and] Varuṇa goes along the waters [and] the seas.

१४. 'हे ऋभूंनो, तुमच्या आशेनें मरुत् आपल्या प्रदेशांतून म्हणजे द्युलोकांतून चालतात, अग्नि पृथिवीवर, वायु अंतरिक्षांत आणि वरुण उदकांत संचार करितो.' सायणाचार्य म्हणतात, सूर्यकिरणरूप जे ऋभु, ते मेघवृष्टि करितील अशा आशेनें हे आतां सांगितलेले देव आपापल्या संचारस्थानापासून ऋभूप्रत, म्हणजे सूर्यकिरणांप्रत, येतात. (भाषेखालीं पहा).

'हे बळाचे पुत्र हो'=' शवसो नपातः.' बळाचा अथवा शक्तीचा पुत्र हें साधारणतः अग्नीचें विशेषण असतें, पण शक्तीचा अथवा बळाचा पुत्र असें विशेषण इतर देवांसहि लाविलेलें आढळतें. उदाहरणार्थ सू. २२ मं. ६ पहा. ऋ. ८. २५. ५ यांत मित्रावरुण यांस लाविलेलें आहे. हें विशेषण ऋभूंस आणखी दुसऱ्या दोन तीन मंत्रांत लाविलेलें आहे.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'भूम्य अग्निः,' आणि तिसऱ्यांत 'समुद्रैः' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १६२.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः। अश्वो देवता। तृतीयाषष्ठ्यौ जगत्यौ शिष्टा-
स्त्रिष्टुभः॥

**मा नो॑ मि॒त्रो वरु॑णो अर्य॒मायुरिन्द्र॑ ऋभु॒क्षा म॒रुत॒ः परि॑ ख्यन्।**
**यद्वा॒जिनो॑ दे॒वजा॑तस्य॒ सप्तेः॑ प्रव॒क्ष्यामो॑ वि॒दथे॑ वी॒र्या॑णि॥ १॥**

मा। न॒ः। मि॒त्रः। वरु॑णः। अ॒र्य॒मा। आ॒युः। इन्द्रः॑। ऋ॒भु॒क्षाः।
म॒रुतः॑। परि॑। ख्य॒न्।
यत्। वा॒जिन॑ः। दे॒व॒ऽजा॑तस्य। सप्तेः॑। प्र॒ऽव॒क्ष्याम॑ः। वि॒दथे॑। वी॒-
र्या॑णि॥ १॥

### भाषायाम्.

१. [वयं] वाजिनः (=प्रबलस्य) देवजातस्य (=देवेभ्यो जातस्य) सप्तेः (=अश्वस्य) वीर्याणि (=चरितानि=सामर्थ्यानि) विदथे (=अस्मिन्यज्ञे) प्रवक्ष्यामः (=प्रकर्षेण प्रतिपादयिष्यामः) [इति] यत् [तेन कारणेन] मित्रः, वरुणः, अर्यमा, आयुः (=सततगमनो वायुः) ऋभुक्षाः (=महान्) इन्द्रो मरुतश् [च] नः (=अस्मान्) मा परि ख्यन् (=मा प्रतिदिशन्तु)॥

परिख्यानं नाम निन्दा। ...... आयुः सततगन्ता वायुः। ...... देवजातस्य बहुदेवतास्वरूपेणोत्पन्नस्य। उषआदीनाम् अस्य शिरआद्यवयवत्वादिति भावः। उषा वा अश्वस्य मेध्यस्य शिर इत्यादिश्रुतेः। यद्वा देवेभ्यो जातस्य गन्धर्वकुल उत्पन्नत्वात्। इत्यादि सायणः॥

## सूक्त १६२.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—अश्व, म्हणजे यज्ञांत बळी द्यावयाचा घोडा. वृत्त—त्रिष्टुभ्; मात्र तिसरी आणि सहावी या दोन ऋचांचें जगती.

१. आम्ही देवांपासून झालेल्या [ आणि ] प्रबळ वारूचीं चरितें यज्ञामध्यें सांगणार आहों; तर मित्र, वरुण, अर्यमा, वायु, महा इंद्र [ आणि ] मरुत् [ हे ] आमची निर्भर्त्सना न करोत.

## HYMN 162.

To the Horse that is going to be sacrificed. By *Dirghatamas* the son of *Uchathya*. Metre—*Trishtubh* except in verses 3 and 6 where it is *Jagatî*.

1. May not Mitra, Varuna, Aryamâ, the Mobile [ Vâyu ], great Indra, and the Maruts despise us that we are going to proclaim in this sacrifice the achievements of the powerful and the god-begotten horse.

१. हें सूक्त यज्ञांत जो घोडा मारीत, त्याविषयीं आहे. जसा गाई मारून तिचें मांस ज्यात अर्पण केलें जाई त्या यज्ञाला ' गोमेध ' म्हणत, त्याप्रमाणेंच ज्यांत घोडा मारीत त्या यज्ञाला ' अश्वमेध ' म्हणत. हें सूक्त अश्वमेधाला अनुलक्षून केलेलें आहे.

आजपर्यंत ज्या सूक्तांचें भाषान्तर झालें, त्यांत हें आणि या पुढचें सूक्त हीं दोन सूक्तें फार चमत्कारिक आहेत. कारण कीं आजपर्यंत झालेलीं सूक्तें बहुतकरून देवांच्या स्तुतिपर आणि प्रार्थनाविषयक होतीं. परंतु या दोन सूक्तांवरून प्राचीन आर्य लोकांच्या चालीविषयीं कांहीं चमत्कारिक गोष्टी आपणास समजून येण्यासारिख्या आहेत.

या पहिल्या ऋचेचा भावार्थः—'आम्हीं आतां या सूक्ताच्या द्वारें यज्ञासाठीं मारावयाच्या घोड्याचें माहात्म्य वर्णीत आहों, देवाचें वर्णीत नाहीं, यामुळें मित्रादिक जे देव, त्यांस राग न येओ.'

' देवांपासून झालेल्या.'=' देवजातस्य.' हें विशेषण केवळ प्रशंसादर्शक आहे.

' वायु '=' आयुः.' ऋ. ५. ४१. २ आणि सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' अर्यमा आयुः ' आणि चवथ्यांत ' वीरिआणि ' असें म्हणावें.

शांतिसूक्त म्हणून जें म्हणतात, त्यांत या सर्व सूक्ताचा पाठ म्हणण्याची चाल आहे.

**यन्निर्णिजा रेक्णसा प्रावृतस्य रातिं गृभीतां मुखतो नयन्ति ।**
**सुप्राङजो मेम्यद्विश्वरूप इन्द्रापूष्णोः प्रियमप्येति पाथः ॥ २ ॥**

यत् । निःऽनिजा । रेक्णसा । प्रावृतस्य । रातिम् । गृभीताम् । मुखतः । नयन्ति ।
सुऽप्राङ् । अजः । मेम्यत् । विश्वऽरूपः । इन्द्रापूष्णोः । प्रियम् । अपि । एति । पाथः ॥ २ ॥

**एष छागः पुरो अश्वेन वाजिना पूष्णो भागो नीयते विश्वदेव्यः ।**
**अभिप्रियं यत्पुरोळाशमर्वता त्वष्टेदेनं सौश्रवसाय जिन्वति ॥३॥**

एषः । छागः । पुरः । अश्वेन । वाजिना । पूष्णः । भागः । नीयते । विश्वऽदेव्यः ।
अभिऽप्रियम् । यत् । पुरोळाशम् । अर्वता । त्वष्टा । इत् । एनम् । सौश्रवसाय । जिन्वति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. निर्णिजा रेक्णसा प्रावृतस्य (=रूपवता वस्त्रेण हिरण्यादिकालंकारेण चालंकृतस्य) [अश्वस्य] मुखतः (=पुरतः) यत् गृभीतां रातिं नयन्ति (=यां गृहीतां रातिं नयन्ति=यं बलिरूपेण गृहीत्वा नयन्ति) [स] सुप्राङ् (=शोभनगमनो) मेम्यत् (=मेमेशब्दं कुर्वन्) विश्वरूपः (=नानारूपः=नानावर्णः) अजः इन्द्रापूष्णोः प्रियं पाथः अपि एति (=इन्द्रस्य पूष्णश्च प्रीणयितृ अन्नं प्रति गच्छतु=तयोरन्नस्य भागो भवतु) ॥

विश्वरूपो बहुवर्णोपेतः कृष्णग्रीवः कृष्णललामो वा अनेकवर्ण इत्यर्थः । एवंरूपोऽयमिन्द्रापूष्णोः । इन्द्रः प्रसिद्धः । पूषा पोषको देवोऽग्निः । तयोः प्रियम् इत्यादि सायणः ॥

पाथःशब्दः सायणेन प्रायः अन्नशब्देन व्याख्यातः । क्वचित्तु जलशब्देन स्थलशब्देनापि । पाश्चात्यास्तु नित्यं स्थलवाचीति मत्वा तथा व्याचक्षते ॥

३. पूष्णो भागः (=पूष्णो देवस्य भागभूतोपि) विश्वदेव्यः (=विश्वैरपि देवैर्भक्षयितुं योग्यः) एष छागः (=अयं शृङ्गरहितोजो) वाजिना अश्वेन (=प्रबलेनाश्वेन सह) पुरो नीयते (=पुरतो नीयते) । यत् (=यस्मात् कारणात्) सौश्रवसाय (=सु-

२. सुंदर वस्त्रें [ आणि ] अलंकार घातलेल्या घोड्याच्या पुढें जो वळी धरून नेत आहेत तो सुंदर रीतीनें चालणारा, बें बें करून ओरडणारा, [ आणि ] नानावर्णांचा बकरा, इंद्र आणि पूषा यांचा प्रिय भक्ष्य होओ.

३. पूषा-[देवा]चा भाग पण सकळ देवांनीं खाण्यास योग्य असा हा बोकड प्रबळ घोड्याबरोबर पुढें नेला जात आहे; कारण कीं, याची कीर्ति व्हावी म्हणून याला घोड्याबरोबर स्वत: त्वष्ट्यानेंच प्रिय बळि केला आहे.

2. May the bleating he-goat walking forth gracefully, [ and ] of variegated colours, that they seize and lead as an offering in front of the [horse] covered with beautiful clothes and ornaments, become the beloved food of Indra and Pûshan.

3. This goat the portion of Bhaga, [ and yet ] fit to be accepted by all the gods, is being led forth along with the powerful horse, because Tvashtâ himself, for the sake of its renown, has rendered it a beloved offering along with the horse.

---

२. घोड्याबरोबर बकराहि मारीत असें दिसतें. ' सुंदर वस्त्रालंकार घालून सजविलेल्या या घोड्याच्या पुढें ज्या बकऱ्याला धरून नेत आहेत, जो बकरा ऐटीनें चालत आहे, बें बें करून स्वभावतः ओरडत आहे, तो अनेकरंगी बकरा इंद्र आणि पूषा या दोघांचा प्रिय भक्ष्य होओ. '

' नाना वर्णांचा '=' विश्वरूपः. ' म्हणजे काळ्या कंठाचा अथवा काळा टिळक ज्याच्या कपाळावर आहे असा, असें सायणाचार्य म्हणतात.

' सुंदर वस्त्रें आणि अलंकार घातलेल्या '=' निर्णिजा रेक्णसा प्रावृतस्य. ' ज्या पशूला बळि द्यावयाचें त्याला सुंदर वस्त्रें आणि माळा इत्यादिक अलंकार घालण्याची चाल सर्व लोकांमध्यें असे. रोमन लोकांतहि तशी चाल असे. आणि अजून तरी काळिका वगैरे देवीसाठीं रेडा मारावयाचा असला म्हणजे त्याप्रमाणेंच वस्त्रादिकांनीं त्याला शोभविण्याची चाल आहे.

' प्रिय भक्ष्य होओ '=' प्रियम् अपि एति पाथः. ' अक्षरशः ' प्रिय अन्नाप्रत पावो. ' ' पाथः ' याचा अर्थ पाश्चात्त्य विद्वान् सर्वत्र स्थान असा करितात. तो अर्थ घेतला तर, इंद्र आणि पूषा यांच्या स्थानाप्रत पावो असें भाषांतर होईल.

**यद्धविष्यमृतुशो देवयानं त्रिर्मानुषाः पर्यश्वं नयन्ति ।**
**अत्रा पूष्णः प्रथमो भाग एति यज्ञं देवेभ्यः प्रतिवेदयन्नजः ॥४॥**

यत् । हविष्यम् । ऋतुऽशः । देवऽयानम् । त्रिः । मानुषाः । परि । अश्वम् । नयन्ति ।
अत्र । पूष्णः । प्रथमः । भागः । एति । यज्ञम् । देवेभ्यः । प्रतिऽवेदयन् । अजः ॥ ४ ॥

---

श्रवस्त्वाय=सुकीर्तये ) त्वष्टा इत् (=त्वष्टा नाम विश्वकर्मैव ) एनम् (=एतमजम् ) अर्वता (=अश्वेन सह ) अभि प्रियं पुरोळाशं (=प्रीणयितृ दानं=बलिं ) जिन्वति (=करोति ) ॥

यत् ...... त्वष्टा इत् एनं ...... जिन्वति इत्यत्र जिन्वति इत्यनिघातं पदमपेक्ष्यते ॥

---

## भाषायाम्.

४. यद् (=यदा ) मानुषाः ( =यजमाना ) हविष्यं (=हविर्योग्यं=मेध्यं ) देवयानं (=देवान् प्रति गच्छन्तम् ) अश्वम् ऋतुशः (=ऋतावृतौ=काले काले ) त्रिः परि नयन्ति (=अग्निं परितो नयन्ति ) अत्र (=तदा ) पूष्णः प्रथमो भागः (=पूष्णो देवस्य प्रथमभूतो भागो ) यज्ञं देवेभ्यः प्रति वेदयन् एति (=अयं यज्ञो भो देवा गृह्यतामिति प्रख्यापयन् स्वेन शब्देन कथयन् गच्छति ) ॥

---

पण सायण बहुतकरून 'अन्न' असा अर्थ करितात, आणि बहुतेक ठिकाणी तो जुळतो.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'मेम्यत्' बद्दल 'मेमिअत्' असें वाचावें लागतें.

३. 'हा जो बोकड आहे हा जरी पूषा देवाचा भाग होय, तरी तो सर्व देवांनीं खाण्यास योग्य आहे; तो या घोड्याबरोबर बळि देण्यास पुढें घेऊन जात आहेत. कारण की याची ( बोकडाची ) दिगंतरीं कीर्ति व्हावी म्हणून, याला साक्षात् त्वष्टा जो विश्वकर्मा त्याणें घोड्याप्रमाणें प्रिय बळि केला आहे—म्हणजे, त्याला घोड्याप्रमाणें मारून बळि द्यावा, आणि तसा मारून बळि दिला तर तो देवांस गोड लागे, अशी योजना त्याच्या मांसाच्या आंगीं केली आहे.'

'पूषा-[देवा]चा भाग' = 'पूष्णो भागः.' पूषा या गवळदेवाविषयीं सू. ४२ मं. ८ आणि त्याजवरील टीप पहा. पूषा देव गुरांचा आणि बकऱ्यां मेंढरां-

४. जेव्हां बळि देण्यास योग्य [आणि] देवांप्रत जाणाऱ्या अशा घोड्याला मनुष्य योग्य काळीं तीनदा अग्नीसभोंताली फिरवितात, तेव्हां पूषा-[देवा]चा प्रथम भाग [ असा जो हा ] बोकड, [ तो ] देवांला यज्ञ निवेदन करीत जातो.

4. When the men lead the horse, worthy of being sacrificed [and] proceeding to the gods, three times round [Agni] at the proper hours, then the he-goat, the first portion of Pûshan, goes declaring the sacrifice to the gods.

चा देव असल्यामुळें त्याला बकरें बळि देणें हें स्वाभाविक आहे.

‘ त्वष्ट्यानें ’=‘ त्वष्टा. ’ त्वष्टा सर्व प्राण्यांस निर्माण करणारा देव होय. या ठिकाणीं बोकडाला त्वष्ट्यानें प्रिय बळि केलें आहे असें सांगितलें आहे, त्याचा अभिप्राय असा आहे कीं, सर्व पशूंचा निर्माण कर्ता त्वष्टा आहे तेव्हां त्यानें जो बोकड निर्माण केला, तो बळि द्यावा म्हणूनच केला आहे. ऋ. १. १८८. ९ ( त्वष्टा रूपाणि हि प्रभुः पशून् विश्वान् समानजे ).

‘ बोकड ’=‘ छागः. ’ सायण म्हणतात, ‘ छाग ’ म्हणजे बिनशिंगांचा बोकड समजावयाचा आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ‘ विश्वदेविअः ’ असें म्हणावें.

४. ‘ जेव्हां उपासक लोक बळि देण्यास योग्य आणि देवांकडेस जाण्याची तयारी करणाऱ्या अशा घोड्याला अग्नीच्या सभोंताली तीनदा फिरवितात, तेव्हां बोकडहि त्याजबरोबरच फिरतो, आणि आपल्या बें बें अशा ओरडीनें देवांस जणुं म्हणतो, हा यज्ञ तुम्हांसाठीं केला जात आहे, तो तुम्ही स्वीकारून घ्या. ’

‘ बळि देण्यास योग्य ’=‘ हविष्यम्. ’ सायण ‘ हविर्योग्य ’ असें म्हणतात. त्याचा अर्थ ज्याला हवि देणें योग्य होय तो, असा आहे. हा शब्द पुनः आलेला नाहीं. त्यामुळें अर्थनिर्णयास सबळ साधनें नाहींत.

‘ देवांप्रत जाणाऱ्या ’=‘ देवयानम् ’ म्हणजे मेल्यानंतर.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत ‘ पर्यश्वं ’-च्या बद्दल ‘ परि अश्वं ’ असें वाचावें लागतें.

होताध्वर्युरावया अग्निमिन्धो ग्रावग्राभ उत शंस्ता सुविप्रः ।
तेन यज्ञेन स्वरंकृतेन स्विष्टेन वक्षणा आ पृणध्वम् ॥ ५ ॥ ७ ॥
होता । अध्वर्युः । आऽवयाः । अग्निम्ऽइन्धः । ग्रावऽग्राभः । उत ।
शंस्ता । सुऽविप्रः ।
तेन । यज्ञेन । सुऽअरंकृतेन । सुऽइष्टेन । वक्षणाः । आ । पृणध्वम् ।
॥ ५ ॥ ७ ॥

## भाषायाम्.

५. होता (=देवानाम् आह्वाता ), अध्वर्युः (=अध्वर्युर्नाम ऋत्विक् ), आवयाः, अग्निमिन्धः ( =अग्नेर्दीपयिता एतन्नामा ऋत्विक् ), ग्रावग्राभः (=ग्राव्णो गृह्णातीति एतन्नामा ऋत्विक् ) उत (=अपि च) शंस्ता (=प्रशास्ता एतन्नामा ऋत्विक् ) सुविप्रः (=मेधावी ब्रह्मा एतन्नामक ऋत्विक् च ) [ एतादृशा यूयम् ऋत्विजः संगम्य ] स्वरं-कृतेन (=सुष्ठु संपादितेन ) स्विष्टेन ( =सुष्ठु इष्टेन कृतेन ) तेन यज्ञेन ( =अनेन यज्ञहविरादिना ) वक्षणाः आ पृणध्वं ( =" घृतकुल्यादीन् आ पृणध्वम्=सर्वतः पूरयत " ) ॥

वक्षणा आ पृणध्वम् देवानाम् उदराणि पूरयतेति मास्मनादयः पाश्चात्याः । पर-मार्थतस्तु घृतादीनां प्रवाहान्वाहयतेति भावो दृश्यते । सति तु वक्षणाशब्दस्योदरार्थ-कत्वे भारतवर्षीयः सायणो न तदज्ञास्यदिति न ॥

५. होता, अध्वर्यु, आवया, अग्निमिंध, ग्रावस्तुत्, प्रशास्ता, आणि बुद्धिमान् ब्रह्मा हे तुम्ही, चांगल्या रीतीनें संपादिलेला आणि चांगल्या रीतीनें अर्पण केलेला [ जो ] हा यज्ञ, त्याणें प्रवाह भरून टाका.

5. Do you, the invoker (Hotâ), the Adhvaryu, the Âvayâ, the Agnimindha (kindler of fire), the Grâvastut (holder of the Soma-pressing stones), the Pras'âstâ and the learned [Brahmâ], fill the streams by means of that sacrifice which is well prepared [and] well-offered.

---

५. या ऋचेंत होता, अध्वर्यु इत्यादिक जे अनेक ऋत्विज्, त्यांला ऋषि म्हणतो कीं, तुम्हीं या यज्ञाची तयारी करून तुपाचे वगैरे प्रवाह वाहवा.

'होता' म्हणजे देवांचें आह्वान करणारा आणि स्तोत्रें म्हणणारा जो ऋत्विज्, तो. 'अध्वर्यु' म्हणजे हवि देणारा ऋत्विज्. 'आवया' म्हणजे अध्वर्यूला मदत करणारा एक 'प्रतिप्रस्थाता' या नांवाचा ऋत्विज् असें सायण म्हणतात. 'अग्निमिन्ध' म्हणजे अग्नीला पेटविणें हें ज्याचें काम होय, तो ऋत्विज्. 'ग्रावस्तुत्' म्हणजे ग्रावे अथवा सोम काढण्याचे पाषाण ज्याजवळ असत, तो ऋत्विज्. 'प्रशास्ता' म्हणजे होत्याला मदत करणारा एक ऋत्विज्. 'ब्रह्मा' हें एका ऋत्विजाचें नांव आहे. त्याला तीन वेद येत असावे, आणि मन्त्र म्हणण्यांत वगैरे चूक झाली तर ती दुरुस्त करणें हें त्याचें काम असे.

सर्व मिळून सोळा ऋत्विज् असत. त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें: १ होता, २ उद्गाता, ३ अध्वर्यु, ४ ब्रह्मा, ५ ब्राह्मणाच्छंसी, ६ प्रस्तोता, ७ मैत्रावरुण, ८ प्रतिप्रस्थाता, ९ पोता, १० प्रतिहर्ता, ११ अच्छावाक, १२ नेष्टा, १३ अग्नीध्, १४ सुब्रह्मण्य, १५ ग्रावस्तुत् आणि १६ उन्नेता. हे सोळा ऋत्विज् मोठमोठ्या यज्ञांत मात्र लागत. आणि हे सोळा ऋत्विज् कधीं तरी अति प्राचीन वेदकाळीं लागत कीं नाहीं, याविषयीं संशय आहे.

वर सांगितलेल्या सोळांतून 'ब्राह्मणाच्छंसी,' 'प्रस्तोता' 'मैत्रावरुण,' 'प्रतिप्रस्थाता,' 'प्रतिहर्ता,' 'अच्छावाक,' 'सुब्रह्मण्य' आणि 'उन्नेता' हीं आठ ऋत्विजांचीं नांवें ऋग्वेद संहितेंत कोठें आलेलीं नाहींत.

'प्रवाह भरून टाका'='वक्षणा आ पृणध्वम्.' म्हणजे तुपाचे वगैरे लोट वा-

**यूपव्रस्का उत ये यूपवाहाश्चषालं ये अश्वयूपाय तक्षति।**
**ये चार्वते पचनं संभरन्त्युतो तेषामभिगूर्तिर्न इन्वतु ॥ ६ ॥**

यूपऽव्रस्काः । उत । ये । यूपऽवाहाः । चषालम् । ये । अश्वऽयूपाय । तक्षति ।

ये । च । अर्वते । पचनम् । सम्ऽभरन्ति । उतो इति । तेषाम् । अभिऽगूर्तिः । नः । इन्वतु ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. [ये] यूपव्रस्काः (=यूपार्थं वृक्षस्य च्छेत्तारः) उत (=अपि च) ये यूपवाहाः (=यूपस्य वाहका) ये [च] अश्वयूपाय चषालं तक्षति (=अश्वमेधे प्रयुक्ताय यूपाय चषालं नामाग्रभागं संपादयन्ति) उतो तेषाम् अभिगूर्तिः (=तेषां सर्वेषां सर्वथा करणीयमिति यः संकल्पः स) नः इन्वतु (=अस्मान् व्याप्नोतु=तेषां संकल्पेन वयं युक्ता भवेम) ॥

उतो तेषाम् अभिगूर्तिः नः इन्वतु इति चतुर्थपादो दुर्बोधः सायणेनैवं व्याख्यातः। उतो अपि च नोऽस्मत्संबन्धिनां तेषामृत्विजामभिगूर्तिः संकल्पः सर्वथा करणीयमिति बुद्धिरिन्वतु । व्याप्नोतु । ...... यद्वा तेषामभिगूर्तिर्नोऽस्मान् इन्वतु । यागं साधुपारं प्रापय्य फलेन योजयत्वित्यर्थः । इति ॥

हवा, त्याच्या जणुं नग्न वाहत असें करा. वृत्ताकरितां 'स्वरंकृतेन' आणि 'स्विष्टेन' यांच्या जागीं 'सुअरंकृतेन' आणि 'सुइष्टेन' असें म्हणावें.

६. जे यूप तोडणारे, जे यूपाला वाहून आणणारे [ आणि ] जे अश्वयूपासाठीं चषाल तोडितात, आणि जे घोडा शिजवावयाची सामग्री मिळवितात, त्या सर्वांचा संकल्प आम्हांप्रत येओ.

6. May the cutters of the sacrificial post, and those who carry the sacrificial post, and those who cut the wooden ring for the horse-post, and those who collect the materials for cooking the horse—may the determination of those come unto us.

६. या ऋचेचा चवथा चरण कठीण आहे. ' उतो अभिगूर्तिः इन्वतु ' याचा अक्षरशः अर्थ सोपा आहे, तरी अभिप्राय उघड दिसत नाहीं. जे ऋत्विगादिक यूपाला स्वतः आपण तोडून आणण्याची वगैरे मोठी मेहनत करितात, कष्टी होत नाहींत, त्यांचा आवेश आमच्या आंगीं येओ असा अर्थ आहे काय?

' यूप तोडणारे '=' यूपव्रस्काः.' म्हणजे यज्ञस्तंभ उभारण्याकरितां लांकूड पाहिजे त्यासाठीं वृक्ष तोडणारे.

' यूपाला वाहून आणणारे '=' यूपवाहाः. ' म्हणजे झाड तोडल्या ठिकाणांहून तें यज्ञस्थळीं घेऊन येणारे.

' चषाल. ' म्हणजे यूपाच्या शिरावर एक लांकडाचें वलय घालीत तें.

' घोडा '=' अर्वते. ' म्हणजे घोड्याचें मांस. सामग्री म्हणजे लांकडें, भांडीं इत्यादि.

' संकल्प '=' अभिगूर्तिः. ' म्हणजे श्रम करून अश्वमेध करूं आणि यज्ञ सिद्धीस नेऊं असा जो निश्चय, तो.

या ऋचेचा पहिला आणि तिसरा हे दोन चरण एकादशाक्षरी आहेत आणि दुसरा आणि चवथा हे द्वादशाक्षरी आहेत. अकरांचीं बारा अक्षरें ओढाताण करून मिळविणें त्यापेक्षां ही त्रिष्टुभ् आणि जगती यांचें मिश्र वृत्त आहे असें म्हणावें हें चांगलें असें आम्हांस वाटतें.

**उप प्रागात्सुमन्मेऽधायि मन्म देवानामाशा उप वीतपृष्ठः ।**
**अन्वेनं विप्रा ऋषयो मदन्ति देवानां पुष्टे चकृमा सुबन्धुम्॥ ७ ॥**

उप । प्र । अगात् । सुऽमत् । मे । अधायि । मन्म । देवानाम् । आशाः ।
उप । वीतऽपृष्ठः ।
अनु । एनम् । विप्राः । ऋषयः । मदन्ति । देवानाम् । पुष्टे । चकृम ।
सुऽबन्धुम् ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. [ अयम् अश्वः ] उप प्र अगात् (=उपागतोस्ति ) । मे मन्म सुमत् अधायि (=मम स्तोत्रं सुष्ठु यथा तथा व्यधायि=चक्रे ) । उपवीतपृष्ठः (=साधुपोषणेन कान्त-पार्श्वभागः ) [ अश्वो ] देवानाम् आशाः (=देवानां दिशः=देवानां स्थलानि प्रति=दिवं प्रति ) उप [ गच्छति ] । एनं विप्रा ऋषयः (=मेधाविनः स्तोतारः ) अनु मदन्ति (=अनुमोदन्ति सम्यक्कृतमिति वचनेन परितोषयन्ति ) । [ वयं ] देवानां पुष्टे (=देवानां पोषणे निमित्ते सति) [ तं ] सुबन्धुं (=शोभनबान्धवं=स्वर्गस्थसुज्ञातियुक्तं) चकृम (=कृतवन्तः स्मः ) ॥

सायणस्त्वेवमाह । मन्म मननीयं फलं सुमदुप प्रागात् । उप प्रैतु सुमत् स्वयमित्यर्थ इति यास्कः । यद्वा स्वयमेव मादयितृतमे मय्यधायि । धीयते । फलभूतोश्व आगतः स च मया धृत इत्यर्थः । किमर्थम् । वीतपृष्ठः साधुपोषणेन प्राप्तपार्श्वभागः कान्तपृष्ठो वा । अत्यन्तं दप्त इत्यर्थः । तादृशोऽयं देवानामाशाः पूरयितुमुपगच्छतु । यागार्थमागतमेनं सुबन्धुं शोभनबन्धनमश्वं देवानामाशासमानानां पुष्टे पोषणाय चकृम कुर्मः । तं च विप्रा मेधाविन ऋत्विज ऋषयोऽतीन्द्रियद्रष्टारोऽन्ये वा विप्रा ऋषयश्चानुमदन्ति । अनुमोदन्ताम् । सम्यक् कृतमिति परितुष्यन्तु । इति ॥

७. [ हा पहा घोडा ] आला. मी आपलें स्तोत्र सुंदर रीतीनें रचिलें आहे. सुंदर पाठीचा घोडा देवांच्या प्रदेशांप्रत जात आहे. मेधावी ऋषि याचें अभिनंदन करीत आहेत. देवांच्या मेजवानीमुळें ह्या घोड्याला आम्हीं सुबंधु केलें आहे.

7. [ The horse ] has come forth. My hymn is composed beautifully; the sleek-backed [ horse ] is going to the regions of the gods. The wise poets are congratulating him. We have given him good connections through a feast to the gods.

---

७. भावार्थः—' हा पहा मेध्य वारू येत आहे. या यज्ञांत म्हणावयाचें माझें स्तोत्र मीं सुंदर तयार केलें आहे. पुष्ट आणि गुळगुळीत पाठीचा हा घोडा देवांच्या देशांप्रत जाण्याच्या तयारींत आहे. बुद्धिमान् हे आमचे ऋत्विज् याची प्रशंसा करीत आहेत, आणि तो स्वर्गी जात आहे हें त्याचें भाग्य वर्णांत आहेत. आम्ही देवांस पोषणकारक मांस घालण्याच्या निमित्तानें त्याला चांगले चांगले संबंधी करून दिले आहेत—म्हणजे, तो स्वर्गी गेल्यानंतर देव त्याचे संबंधी आणि बांधव होतील.'

' सुंदर पाठीचा '=' वीतपृष्ठः.' म्हणजे ज्याला खावयास घालून पुष्ट केलें असल्यामुळें त्याची पाठ पुष्ट आणि गुळगुळीत झालेली आहे.

' देवांच्या मेजवानीमुळें ह्या घोड्याला आम्हीं सुबंधु केलें आहे '=' देवानां पुष्टे चकृमा सुबन्धुम्.' सायणाचार्य म्हणतात कीं, ' देवांला खाऊं घालण्यासाठीं आम्ही त्याला चांगल्या रीतीनें बांधिलें आहे.' ( भाषेखालीं पहा ).

**यद्वाजिनो दाम संदानमर्वतो या शीर्षण्या रशना रज्जुरस्य ।**
**यद्वा घास्य प्रभृतमास्ये तृणं सर्वा ता ते अपि देवेष्वस्तु ॥ ८ ॥**

यत् । वाजिनः । दाम । सम्ऽदानम् । अर्वतः । या । शीर्षण्या । रशना । रज्जुः । अस्य ।

यत् । वा । घ । अस्य । प्रऽभृतम् । आस्ये । तृणम् । सर्वा । ता । ते । अपि । देवेषु । अस्तु ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

८. वाजिनः (=प्रबलस्य) अर्वतः (=अश्वस्य) यद् दाम (=ग्रीवाबद्धा रज्जुः) संदानं [च] (=पादबद्धा रज्जुश्च) या [च] अस्य शीर्षण्या रशना रज्जुः (=शिरसि बद्धा बन्धनी रज्जुश्च) वा घ (=अपि च) यद् अस्य आस्ये प्रभृतं तृणं (=मुखे प्रक्षिप्तं तृणमस्ति)—ते सर्वा ता (=तव सर्वाणि तानि वस्तूनि), [हे अश्व], अपि देवेषु अस्तु (=देवेषु मध्ये देवत्वं प्राप्य निवसन्तु=तत्सर्वं देवत्वं प्राप्नोतु) ॥

८. [ तुज ] प्रबळ अश्वाची जी अघाडी पिछाडी [ आणि ] जी तुझी मानेस बांधिलेली काढणी [ आणि ] दोरी, आणि या तुझ्या तोंडांत घेतलेलें जें गवत, तीं तुझीं सर्व [ हे अश्वा ], देवलोकीं वास करोत.

8. [ That ] which [ is ] the cord [ tied to the feet] [ and ] the rope [ tied round the neck ] [ of this ] powerful horse, [ that ] which [ is ] the cord [and] the string tied to his head, or [ that ] grass which he has taken into his mouth —may all this of thine, [ O horse ], dwell among the gods.

---

८. ज्या घोड्याला बळि द्यावयाचें आहे, त्याला सूक्तकर्ता म्हणतो, 'हे अश्वा, तुला आम्ही बळि देत आहों, तेव्हां तूं तर स्वर्गी जाशील आणि देव होशील यांत संशय नाहींच; पण आम्ही अशी प्रार्थना करितों कीं, तुझी जी अघाडी पिछाडी, आणि तुझ्या मानेला बांधिलेलीं जीं वेष्टनें आणि तुझ्या तोंडांत अर्धें गिळलेलें जें गवत, तीं सर्वें देव होओत आणि देवलोकीं वस्ति करोत.'

यांत ज्या अघाड्या पिछाड्या आणि दुसऱ्या दोऱ्या वगैरे सांगितल्या आहेत, त्या नित्याच्या नव्हेत, तर मारतेवेळीं त्याला ज्यांनीं बांधावयाचा त्या समजावयाच्या आहेत. आतां, घोड्याच्या संसर्गाची जी दोरी आणि जें तोंडांत घेतलेलें गवत, तें सुद्धा देवत्वाप्रत पोंहचून देवलोकीं वास करूं शकतें अशी ज्यापेक्षां या प्राचीन आर्यांची समजूत असे, त्यापेक्षां मनुष्यें मेल्यानंतर तीं देवत्वाप्रत पावतात आणि देवलोकीं वास करितात असा त्यांचा समज असेलच यांत संशय नाहीं. यावरून, प्राचीन आर्यलोक यज्ञ करीत ते केवळ ऐहिक लाभांसाठीं करीत आणि स्वर्गाविषयीं ते कांहीं विचार करीत नसत असें जे कितीएक विद्वान् समजतात, तें निराधार होय असें दिसून येतें.

तिसऱ्या चरणांत 'प्रभृतमासिए तृणम्' असें म्हटल्या शिवाय राहवत नाहीं. त्यामुळें आणि पहिल्या चरणांत बारा अक्षरें मुळींच असल्यामुळें पहिला आणि तिसरा हे चरण द्वादशाक्षरी आहेत. दुसरा आणि चवथा हे एकादशाक्षरी आहेत ( चवथ्यांत 'देवेषु अस्तु' असें म्हणावें ). त्यामुळें ही ऋचा सुद्धा सहावे ऋचेसारिखी आहे.

**यदश्वस्य क्रविषो मक्षिकाश यद्वा स्वरौ स्वधितौ रिप्तमस्ति ।**
**यद्धस्तयोः शमितुर्यन्नखेषु सर्वा ता ते अपि देवेष्वस्तु ॥ ९ ॥**

यत् । अश्वस्य । क्रविषः । मक्षिका । आश । यत् । वा । स्वरौ । स्वऽधितौ । रिप्तम् । अस्ति ।

यत् । हस्तयोः । शमितुः । यत् । नखेषु । सर्वा । ता । ते । अपि । देवेषु । अस्तु ॥ ९ ॥

**यदूवध्यमुदरस्यापवाति य आमस्य क्रविषो गन्धो अस्ति ।**
**सुकृता तच्छमितारः कृण्वन्तूत मेधं शृतपाकं पचन्तु ॥१०॥९॥**

यत् । ऊवध्यम् । उदरस्य । अपऽवाति । यः । आमस्य । क्रविषः । गन्धः । अस्ति ।

सुऽकृता । तत् । शमितारः । कृण्वन्तु । उत । मेधम् । शृतऽपाकम् । पचन्तु ॥ १० ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

९. अश्वस्य क्रविषः ( =आममांसस्य ) यत् (=यमंशं ) मक्षिका आश (=मक्षिका भक्षितवती ) यद् वा स्वरौ स्वधितौ रिप्तम् अस्ति ( =यो वांशो यूप अञ्जनकाले असौ वा अवदानकाले लिप्तोस्ति ) यत् शमितुर्हस्तयोः (=विशसनकर्तुः पुरुषस्य हस्तयोः ) नखेषु यत् (=तस्य नखेषु वा योंशो ) [ लिप्तमस्ति=लिप्तोस्ति ]—ते सर्वा ता (=तव सर्वाणि तानि अङ्गानि ), [ हे अश्व ], अपि देवेषु अस्तु (=देवत्वं देवेषु मध्ये प्राप्य निवसन्तु=तत् सर्वे देवत्वं प्राप्नोतु )

१०. उदरस्य यद् ऊवध्यम् (=उदरस्थितं यदजीर्णं तृणादिकम् ) अपवाति (=दुर्गन्धरूपेणापगच्छति ) यश् [ च ] आमस्य क्रविषः (=अपक्वस्य मांसस्य ) गन्धोस्ति (=दुर्गन्धोस्ति ) तत् शमितारः सुकृता कृण्वन्तु (=तानि सर्वाणि विशसनकर्तारः सुकृतानि=संस्कृतानि कुर्वन्तु=तान् दुर्गन्धान् अपगमय्य शिष्टं यथा संस्कृतमपगताशुद्धत्वं भवति तथा कुर्वन्तु ) उत (=अपि च ) मेधं शृतपाकं पचन्तु (=मेध्यं यज्ञार्हं पश्ववयवं यथायोग्यं पचन्तु ) ॥

ऊवध्यमीषज्जीर्णं तृणं पुरीषम् । ......पाकस्य समये यत्किंचिदूवध्यमपक्वस्य च लेशोस्ति ।......तत्सर्वं शमितारो विशसनकर्तारः सुकृता कृण्वन्तु । सुकृतमुक्तदोषरहितं

९. घोड्याच्या मांसाचा जो अंश मक्षिकेनें खाल्ला आहे, अथवा जो यूपाला [ किंवा ] सुरीला लागला आहे, [ अथवा ] जो कापणाऱ्याच्या हातांला किंवा नखांला [ लागला आहे ]–ते तुझे सर्व [ अंश ], [ हे अश्वा ], देवलोकीं वास करोत.

१०. पोटांतील जो गवताचा वगैरे कोठा त्याचा वास उठत असेल, [आणि ] हिरव्या मांसाचा जो वास आहे, तो सर्व कापणारे शुद्ध करोत; आणि यज्ञभागांला यथायोग्य शिजवोत.

9. What of the raw flesh of [ this ] horse the fly has eaten, or what has stuck to the post [ and ] to the knife, what [ has stuck ] to the hands [ and ] what to the nails of the slaughterer—may all this of thine, [ O horse ], dwell among the gods.

10. The contents of the entrails which stink [ and ] the smell which there is of the raw flesh, let the slaughterers make that all pure. And let them cook moderately the portion to be sacrificed.

---

९. 'हे अश्वा, तुला मारिल्यावर तुझ्या मांसाचे जे लहान लहान तुकडे माशीनें खाल्ले असतील, अथवा जे यूपाला किंवा सुरीला लागले असतील, किंवा जे तुला कापणाऱ्याच्या हातांला किंवा नखांला लागले असतील, तेहि देवलोकीं जाऊन वास करोत.'

'मांसाचा '=' क्रविषः. ' म्हणजे न शिजविलेलें जें कच्चें मांस त्याचा. 'क्रविष्' म्हणजे न शिजविलेलें हिरवें मांस.

'कापणाऱ्याच्या '=' शमितुः. ' हा मांस वेगवेगळें करणारा बाहेरचा कोणी नसे, तर ऋत्विजांतूनच एक जण असे. पशु आलीकडे मारितात तो बांधून मुठकून मारितात, सुरीनें अथवा तरवारीनें वगैरे तोडून मारीत नाहींत. त्यावरून पशु मारणें याला ' अवदान ' ( म्हणजे ' बांधणें ') असें नांव पडलें आहे. आणि मुठकून मारिल्यावर मेला म्हणजे मग सुरीनें मांस तोडून काढीत. त्याचें नांव ' विशसन. ' परंतु अति प्राचीन काळीं प्रचार निराळा असेल. ११ वा मंत्र पहा.

या आणि वरच्या ऋचेंतहि प्रथम तृतीय पुरुषीं निर्देश असून नंतर द्वितीय पुरुषीं आहे.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत ' देवेषु अस्तु ' असें वाचावें.

१०. 'मांस शिजवितेवेळीं त्याला आंतड्यांतले जे पुरीषादि भाग त्यांचा

**यत्ते गात्रा॑द॒ग्निना॑ प॒च्यमा॑नाद॒भि शूलं॒ निह॑तस्याव॒धाव॑ति ।**
**मा तद्भूम्या॒मा श्रि॑ष॒न्मा तृणे॑षु दे॒वेभ्य॒स्तदु॒शद्भ्यो॑ रा॒तम॑स्तु॥ ११॥**

यत् । ते । गात्रा॑त् । अ॒ग्निना॑ । प॒च्यमा॑नात् । अ॒भि । शूल॑म् । निऽ-
ह॑तस्य । अ॒व॒ऽधाव॑ति ।
मा । तत् । भूम्या॑म् । आ । श्रि॒ष॒त् । मा । तृणे॑षु । दे॒वेभ्यः॑ । तत् ।
उ॒शत्ऽभ्यः॑ । रा॒तम् । अ॒स्तु ॥ ११ ॥

---

कुर्वन्तु...... । मेधं मेध्यं यज्ञार्हं पश्ववयवं शृतपाकं देवयोग्यपाकोपेतं यथा भवति तथा पचन्तु । पितृमनुष्यादियोग्यमतिपक्वमीषत्पक्वं च मा कुर्वन्त्वित्यर्थः । इति सायणाचार्याः ॥

---

## भाषायाम्.

११. [ हे अश्व ], अग्निना पच्यमानात् ते ( =तव ) गात्रात् यद् अवधावति (=योंशो रसरूपोधः पतति ) निहतस्य [ तव वा ] [ यद् ] अभि [शूलम् अवधावति ] (=योंशो नितरां हतस्य तव विशसनकाले तव योंशः शूलमभिलक्ष्य अवधावति निर्गच्छति) तत् भूम्यां मा आ श्रिषत् (=भूम्यां मा तत् श्लिष्टं भवतु ) मा तृणेषु [वा आ श्रिषत् ] (=आस्तरणभूतेषु दर्भेषु वा मा श्लिष्टं भवतु ) । [ तर्हि ] तत् [ सर्वमङ्गम् ] उशद्भ्यो देवेभ्यो रातमस्तु (=कामयमानेभ्यो देवेभ्यो दत्तमस्तु) ॥

भूम्यां ...... पाकसमये । तथा ...... तृणेषु विशसनसमये । इति सायणः ॥

---

अंश वाहून दुर्गंध येत असेल, अथवा मांसालाच आंमचा दुर्गन्ध येत असेल, तो सर्व कापणारे आणि शिजविणारे धुऊन स्वच्छ करोत आणि अर्पण करावयाचा जो भाग तो फार कमीहि नाहीं आणि फार अधिकहि नाहीं अशा रीतीनें शिजवोत ' असा भावार्थ.

'यज्ञभागाला '=' मेधम् ' म्हणजे मांसाचा जो भाग यज्ञांत अर्पण करण्यासारिखा आहे तो भाग.

वृत्तसुखार्थ ' कृण्वन्तु । उत ' असें वाचलें पाहिजे.

११. [ हे घोड्या ], अग्नीच्या योगानें तुझें शरीर शिजत असतांना जो तुझा अंश [खालीं] गळेल, [ अथवा ] तुला मारिला म्हणजे त्यावेळीं [ जो तुझा अंश] सुरीकडेस गळेल, तो भूमीला [ अथवा ] गवताला चिकटून न राहो. तो इच्छाळू देवांला अर्पिला जाओ.

11. What of thy limbs, while they are being cooked on the fire, may run down, or [ run down ] towards the knife when thou art cut, let not that stick to the earth, nor to the grass. Let that be given to the longing gods.

११. 'हे घोड्या, तुला मारतानां जो तुझा भाग रक्तरूपानें वगैरे खालीं हाथरलेल्या दर्भांवर वाहेल, अथवा तुला शिजवितांना ऊत येऊन जो भाग जमिनीवर वाहेल, तो तेथें राहील आणि व्यर्थ जाईल असें तूं समजूं नको, तर ते ते सर्व भाग आम्ही देवांला अर्पण करूं. कारण हे सर्व भाग खाण्याविषयीं देव फार उत्सुक आहेत.'

या ऋचेवरून तरी असें वाटत नाहीं कीं प्राचीन आर्यांला मांस कापतांना अथवा तें शिजवितांना किळस येत असे. सांप्रत काळीं जे यज्ञ करितात त्यांत विधीप्रमाणें पशु मारून शिजवितात तर खरे, पण तीं तीं सर्व मांससंबंधाचीं कर्में करणाऱ्या ब्राह्मणांला किळस येतो, आणि त्यांच्या मनास वाईट वाटत असतें हें आम्हांला प्रत्यक्ष पाहिल्यावरून ठाऊक आहे.

'भूमीला'='भूम्याम्.' जो अंश शिजतांना वाहेल तो भूमीवर पडण्याचा संभव आहे, आणि मारतांना जो पडावयाचा, तो दर्भांवर पडावयाचा संभव आहे असें सायण म्हणतात.

'इच्छाळू देवांस'='उशद्भ्यो देवेभ्यः' पशूचें मांस शिजवून देवांस अर्पण करावयाचें तें खाण्याविषयीं ते फार उत्सुक असतात असें आर्यलोक समजत, त्याचें हें एक चांगलें उदाहरण होय.

**ये वाजिनं परिपश्यन्ति पक्वं य ईमाहुः सुरभिर्निर्हरेति ।**
**ये चार्वतो मांसभिक्षामुपासत उतो तेषामभिगूर्तिर्न इन्वतु ॥१२॥**

ये । वाजिनम् । परिऽपश्यन्ति । पक्वम् । ये । ईम् । आहुः । सुरभिः । निः । हर । इति ।

ये । च । अर्वतः । मांसऽभिक्षाम् । उपऽआसते । उतो इति । तेषाम् । अभिऽगूर्तिः । नः । इन्वतु ॥ १२ ॥

**यन्नीक्षणं मांस्पचन्या उखाया या पात्राणि यूष्ण आसेचनानि ।**
**ऊष्मण्यापिधाना चरूणामङ्काः सूनाः परि भूषन्त्यश्वम् ॥ १३ ॥**

यत् । निऽईक्षणम् । मांस्पचन्याः । उखायाः । या । पात्राणि । यूष्णः । आऽसेचनानि ।

ऊष्मण्या । अपिऽधाना । चरूणाम् । अङ्काः । सूनाः । परि । भूषन्ति । अश्वम् ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१२. ये वाजिनं पक्वं परिपश्यन्ति (=अश्वावयवं पक्वं परितः पश्यन्ति=अश्वावयवान् पाके सेच्छतमं पश्यन्ति ) ये [ अयम् अश्वः ] सुरभिः (=सुगन्धिर्जातोस्ति ) ई निर्हर (=एनम् अग्नेः सकाशान्निष्कासय ) इति आहुः ये च अर्वतो मांसभिक्षाम् उपासते (=अश्वस्य मांसस्य भिक्षा काङ्क्षन्ते=हुतभक्षितशिष्टमश्वमांसं भिक्षयन्तस्तदीप्सया परितो याचकाः सन्त उपासते ) उतो तेषाम् अभिगूर्तिः (=तेषां सर्वेषामुद्यमनं संकल्पयुक्त उद्यमो ) नः इन्वतु ( =अस्मान् व्याप्नोतु=वयं तेन युक्ता भवेम ) ॥

वयम् अश्वमांसपचने तस्य देवेभ्योर्पणे शिष्टस्य तस्य च भक्षणे अत्यन्तं पर्युत्सुका भवेमेति भावः ॥

सायणस्तु तेषामुक्तविधानामभिगूर्तिरभित उद्यमनं नोऽस्मानिन्वतु । व्याप्नोतु । यथास्माभिरश्वं उपालब्ध एवं स्पृहयन्ति तथा यज्ञो निर्वाहयत्वित्यर्थः । यद्वा मन्त्रो देवपरो व्याख्येयः । ये देवा वाजिनं पक्वं परिपश्यन्ति कदा होष्यतीति विलम्बं दृष्ट्वा ये च सुरभिः ईमेनं निर्हर निःशेषेणास्मभ्यं देहीत्याहुः । ये चार्वतोऽश्वस्य मांसभिक्षामुपासते तेषामभिगूर्तिर्न इन्वतु । तेषामुद्यमः सफलो भवत्वित्यर्थः । इति ॥

१३. मांस्पचन्याः ( =मांसपचन्याः=मांसपचनार्थं व्यापृताया ) उखाया यत् नीक्ष-

१२. जे घोडा शिजलेला पाहतात, जे म्हणतात कीं झाला· आतां चांगला सुगंध येतो झाला काढा, आणि जे घोड्याची मांस-भिक्षा मिळेल म्हणून वाट पहात बसतात, त्यांचा सर्वांचा संकल्प आम्हांप्रत येओ.

१३. मांस शिजवावयाच्या था-लींत घालावयाची जी पळी, सु-रवा ओतून ठेवावयाचीं जीं पात्रें, मांसपात्रांतील ऊब जाऊं नये म्ह-णून वर ठेवण्याचीं [जीं] झांकणीं, [आणि] जे आंकडे [आणि] सुऱ्या, तीं घोड्या[चें मांस] तयार करि-तात.

12. Those who eagerly see the horse cooked, who say, 'it is smelling agreeable, take it out,' who wait to receive the alms of the equine meat— may the eagerness of all those pervade us.

13. The trial-ladle of the pot for cooking the meat, the cups for containing the soup, the shutters of the meat-pots that prevent the steam from escaping, the hooks [and] the knives, all prepare the [meat of the] horse.

---

१२. यांत ऋषि म्हणतो: 'घोड्याचें मांस शिजत असतांना अत्यंत औत्सुक्यानें त्याजकडेस जे पाहत राहतात, जे तें शिजल्यावर हां आतां शिजलें व त्याला वास चांगला येत आहे, आतां हें विस्तवावरून खालीं उतरा असें म्हणतात, आणि जे शिजविलेलें मांस देवांस अर्पण केल्यावर आपणास त्याचा थोडा भाग मिळेल अशी आशा करून वाट पाहत बसतात, त्यांचा जो या अश्वमांसाविषयीं मोठा भाव, तो आमच्या आंगीं प्राप्त होओ.'

पण 'त्यांचा सर्वांचा संकल्प आम्हांप्रत येओ' हा चवथा चरण कठिण आहे. म्हणजे त्याचा भावार्थ समजत नाहीं. शब्दार्थ उघडच आहे. सायण असा एक अर्थ करितात. दुसरा कसा अर्थ करितात तो भाष्ये खालीं पहा. सहाव्या ऋचेचाहि शेवटचा चरण असाच आहे. तो पहा.

या ऋचेवरून हि प्राचीन आर्यांस मांसाचा किळस होता असें दिसत नाहीं.

तिसऱ्या आणि चवथ्या चरणांत अक्षरांच्या ठिकाणीं बारा बारा अक्षरें आहेत. पहिला आणि दुसरा हे एकादशाक्षरी चरण आहेत. यावरून हीहि ऋचा मिश्र वृत्ताची आहे.

१३. 'घोड्याचें मांस खाण्याजोगें होई तोंपर्यंत जीं जीं उपकरणें लागतात

**निक्रमणं निषदनं विवर्तनं यच्च पड्बीशमर्वतः ।**
**यच्च पपौ यच्च घासिं जघास सर्वा ता ते अपि देवेष्वस्तु ॥ १४॥**

निऽक्रमणम् । निऽसदनम् । विऽवर्तनम् । यत् । च । पड्बीशम् । अर्वतः ।
यत् । च । पपौ । यत् । च । घासिम् । जघास । सर्वा । ता । ते । अपि । देवेषु । अस्तु ॥ १४ ॥

णं (=स्थाल्याः पाकपरीक्षायाः साधनं यत् काष्ठं ) यूष्णः आसेचनानि यानि पात्राणि (=क्वथितस्य मांसरसस्य आसेचनसाधनानि धारणयोग्यानि यानि पात्राणि) चरूणाम् (=मांसपूर्णानां पात्राणाम् ) ऊष्मण्या [ या ] अपिधाना (=ऊष्मण्यानि यानि अपिधानानि=ऊष्मनिवारणार्हाणि यान्यपिधानसाधनानि) [तानि] [तथा] अङ्काः(="हृदयाद्यवयवाङ्कनसाधनवेतसशाखाः") सूनाः (=स्वधित्यादीन्यवदानसाधनानि च) अश्वं परि भूषन्ति (=अश्वमांसं साधयन्ति=भक्षणयोग्यं कुर्वन्ति ) ॥

**भाषायाम्.**

१४. अर्वतः (=अश्वस्य ) [ यत् ] निक्रमणं (=नितरां क्रमते यत्र तत् स्थानं ) [ यत् ] निषदनम् (=उपवेशनस्थानं ) [ यद् ] विवर्तनम् (=इतस्ततोलुण्ठनस्थानं ) यच्च [ तस्य ] पड्बीशं (=पादबन्धनस्थानं ) यच्च [ उदकं ] पपौ यच्च घासिं (=यं च घासिं तृणादिकं ) जघास (=अभक्षयत् )—ते सर्वा ता (=तव सर्वाणि तानि ), [ हे अश्व ], अपि देवेषु अस्तु (=देवत्वं प्राप्य देवेषु मध्ये निवसन्तु )॥

तान्यपि निरर्थकानि मा भूवन्नित्यर्थः । इति सायणः ॥

त्यांतून कितीएक यांत सांगितली आहेतः 'मांस ज्यांत शिजवावयाचें ती थाली ( मांस्पचनी उखा ); तींत मांस शिजतांना तें शिजलें कीं नाहीं तें पाहण्याकरितां आंत घालून परीक्षा करावयाची पळी ( नीक्षणम् ); मांसरस अथवा मांसांतून निथळणाऱ्या पातळ रसाला छुरवा म्हणतात तो ओतून ज्यांत भरून ठेवीत असत तीं पंचपात्रें(आसेचनानि पात्राणि); मांस शिजल्यानंतर तें भांड्यांत भरून ठेविलें म्हणजे त्याची ऊब निघून जाऊं नये म्हणून त्यांजवर ठेवावयाची जीं झांकणी ( चरूणाम् ऊष्मण्यानि अपिधानानि ); काळीज वगैरे उत्तम उत्तम भाग अडकवून ठेवण्याचे आंकडे ( अङ्काः ); आणि मांस कापण्याचे सुरे ( सूनाः ).

१४. घोडा ज्यावरून चालला आहे तें स्थान, [ त्याची ] बैठक, [ तो ] लोळलेलें ठिकाण, आणि त्याला बांधिलेली जी जागा, त्याणें प्यालेलें जें [ पाणी] आणि त्याणें खाल्लेली जी वैरण—तीं तुझीं सर्व, हे अश्वा, देवलोकीं वास करोत.

14. What formed the horse's place of walking, [what his] place of crouching, [ what his ] place of rolling, and what formed the place where his feet were tied, whatever he may have drank and what fodder he may have eaten —may all this of thine, [ O horse ], dwell among the gods.

---

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' मांस्पचनिआ ' आणि तिसऱ्या चरणांत ' ऊष्मण्णिआ अपिधाना ' आणि चवथ्यांत 'भूषन्ति अश्वम्' असें म्हणावें लागतें.

---

१४. जेथें जेथें घोडा बांधिला असेल, चालला असेल, निजला असेल, लोळला असेल, पडून राहिला असेल, तीं सर्व ठिकाणें, आणि त्याणें जें पाणी प्यालेलें, त्याणें जें गवत खाल्लेलें, तींहि सर्व पावन होओत'. जो घोडा मारून बळि द्यावयाचा त्याचें भाग्य केवढें मोठें तें दाखविणें हा या ऋचेचा उद्देश आहे.

सूक्तारंभीं जरी अनुक्रमणिकेला अनुसरून तिसरी आणि सहावी ह्या ऋचा शिवाय करून सगळ्या ऋचांचें वृत्त त्रिष्टुभ् म्हणून सांगितलें आहे, तरी वास्तविक असें नाहीं हें पूर्वी आपण आठवी आणि बारावी या ऋचांच्या वेळीं पाहिलें आहे. या चवदाव्या ऋचेचा पहिला चरण जगती छंदाचा ( द्वादशाक्षरी ), दुसरा अनुष्टुभ् छंदाचा आणि तिसरा आणि चवथा हे त्रिष्टुभाचे आहेत (चवथ्यांत ' देवेषु अस्तु' असें वाचावें ).

**मा त्वाग्निर्ध्वनयीद्धूमगन्धिर्मोखा भ्राजन्त्यभि विक्त जघ्रिः ।**
**इष्टं वीतमभिगूर्तं वषट्कृतं तं देवासः प्रति गृभ्णन्त्यश्वम् ॥१५॥९॥**

मा । त्वा । अग्निः । ध्वनयीत् । धूमऽगन्धिः । मा । उखा । भ्राजन्ती । अभि । विक्त । जघ्रिः ।
इष्टम् । वीतम् । अभिऽगूर्तम् । वषट्ऽकृतम् । तम् । देवासः । प्रति । गृभ्णन्ति । अश्वम् ॥ १५ ॥ ९ ॥

**यदश्वाय वास उपस्तृणन्त्यधीवासं या हिरण्यान्यस्मै ।**
**संदानमर्वन्तं पड्बीशं प्रिया देवेष्वा यामयन्ति ॥ १६ ॥**

यत् । अश्वाय । वासः । उपऽस्तृणन्ति । अधीवासम् । या । हिरण्यानि । अस्मै ।
सम्ऽदानम् । अर्वन्तम् । पड्बीशम् । प्रिया । देवेषु । आ । यमयन्ति ॥ १६ ॥

---

## भाषायाम्.

१५. [ हे अश्व=अश्वमांस ], धूमगन्धिः (=धूमगन्धयुक्तः ) [ अयम् ] अग्निस् त्वा मा ध्वनयीत् ( =त्वां मा ध्वनयत्=त्वां ध्वनयित्वा भाण्डं मा भाङ्क्षीत् ) । [ तथा ] भ्राजन्ती (=तापाद्दीप्ता ) जघ्रिः ( =" तापेन जिघ्रती ") उखा (=स्थाली ) मा अभि विक्त (=मा चोचलत्=तापातिशयेन मा नीनशत् ) । तम् अश्वम् (=एवं सति हि हे अश्व अश्वमांस, त्वाम् ) इष्टं (=हुतं ) वीतं (=कान्तम् ) अभिगूर्तं (=प्रदानायाभिमुख्येनोद्यतं ) वषट्कृतं (=वषट्शब्देन प्रार्पितं ) [ त्वां ] देवासः प्रति गृभ्णन्ति (=प्रति गृह्णन्ति=संतोषेण स्वीकरिष्यन्ति ) ॥

हे पच्यमानाश्वावयव त्वा त्वां धूमगन्धिरग्निर्मा ध्वनयीत् । ध्वनौ सति भाण्डभङ्गः स्यात् । ...... भ्राजन्ती अत्यन्ताग्निसंयोगेन दीप्ता । ......तं तादृशमश्वमिष्टं होतुमिषितं वीतं होमायानीतमभिगूर्तमाभिमुख्येन प्रदानायोद्यतम् । यद्वा इष्टं प्रयाजैराप्रीतं वीतं पर्यग्निकृतमभिगूर्तं ये यजामह इत्यागूर्त्योक्तं वषट्कृतं वषट्कारेण देवसंस्कृतम् । एवंभूतमित्यादि सायणः ॥

१६. यद् अधीवासं वासः (=उपर्याच्छादनयोग्यं यद् वस्त्रम् ) अश्वाय उपस्तृणन्ति (=सर्वत आच्छादयन्ति ) [ अपि च ] हिरण्यानि या (=हिरण्मयानि या-

१५. [ हे घोड्या ], धुरकट वास ज्याला येत आहे असा अग्नि तुला न वाजवो, [ जाळानें ] भाजणारी [आणि] गळणारी थाली न फुटो. म्हणजे मग, अर्पण केलेला, आवडीनें घेतलेला, पुढें ठेविलेला, वषट् असें म्हणून दिलेला [ असा जो तूं ], त्याला देव ग्रहण करितील.

१६. घोड्याच्या आंगावर जें पांघरावयाचें वस्त्र घालितात, [आणि ] जे सोन्याचे अलंकार [ घालितात, ते ] [आणि] घोड्याच्या मानेला बांधिलेली दोरी [ आणि] पायांला बांधिलेली दोरी, [ ह्या ] प्रिय [ वस्तु ] त्याला देवलोकीं घेऊन जातात.

15. May not the fire which is smelling of its smoke make thee sound, [ O equine meat ]! May not the pan that is burning [ and ] trickling burst asunder. For then the gods will accept thee, O horse-[ meat ], offered, loved, brought in front, [and] given with the exclamation *Vashaṭ*.

16. The garment with which they clothe the horse, the golden ornaments with which [ they adorn ] him, the rope round his neck [ and ] the rope tied to his feet—[ these ] dear [ things ] take him among the gods.

---

१५. घोड्याचें मांस मोठ्या झपाट्यानें शिजत आहे. आणि भांड्याखाली मोठा जाळ झाला आहे असें पाहून ऋषि त्या मांसाला म्हणतोः ' हे अश्वमांसा, विस्तवाला धुरकट वास येत आहे, तर तो तुला जाळून न टाको, आणि तुला शिजवितांना तुजकडून मोठा आवाज करवून भांडें न फोडून टाको; आणि विस्तवानें जी ही थाली जळत आहे, आणि जींतून तुझा रस बाहेर पाझरत आहे, ती न फुटो. असें न झालें आणि तूं चांगलें शिजलेंस म्हणजे तुला आम्हीं आणून वषट् असा उच्चार करून देवांस अर्पण केलें म्हणजे देव तुला मोठ्या प्रीतीनें स्वीकारितील. '

' हे घोड्या. ' म्हणजे हे घोड्याच्या मांसा. घोड्याचें मांस विस्तवावर शिजत आहे त्याला ऋषि बोलत आहे, जीवंत घोड्याला बोलत नाहीं.

' तुला न वाजवो '=' मा ध्वनयीत्. ' म्हणजे तूं शिजतां शिजतां उंवेच्या जोरानें भांडें फुटून तुझा आवाज न होओ असा भावार्थ दिसतो.

**यत्ते॑ सा॒दे मह॑सा॒ शूकृ॑तस्य॒ पार्ष्ण्या॑ वा॒ कश॑या वा तु॒तोद॑ ।**
**स्रु॒चेव॒ ता ह॒विषो॑ अध्व॒रेषु॒ सर्वा॒ ता ते॒ ब्रह्म॑णा सूदयामि॥१७॥**

यत् । ते॒ । सा॒दे । मह॑सा । शूकृ॑तस्य । पार्ष्ण्या॑ । वा॒ । कश॑या । वा॒ । तु॒तोद॑ ।
स्रु॒चाऽइ॑व । ता । ह॒विषः॑ । अ॒ध्व॒रेषु॑ । सर्वा॑ । ता । ते॒ । ब्रह्म॑णा । सू॒द॒या॒मि॒ ॥ १७ ॥

---

न्यलंकरणानि ) अस्मै (=अश्वाय ) [कुर्वन्ति] [ तानि ] संदानं पड्बीशं [च] (=शिरोबन्धनं पादबन्धनं च ) [ इत्येतानि ] प्रिया (=प्रियाणि तस्य वस्तूनि ) अर्वन्तम् (=अश्वं ) देवेषु आ यमयन्ति (=प्रापयन्ति ) ॥

सायणस्त्वेवमाह । अश्वाय संज्ञप्यमानायाधीवासमुपर्याच्छादनयोग्यं यद्वास उपस्तृणन्ति । सर्वत आच्छादयन्ति।......तथास्मा अश्वाय या यानि हिरण्यानि सौवर्णराजतकांस्यानि कल्पयन्ति । तथार्वन्तम् । षष्ठ्यर्थे द्वितीया । अर्वतोऽश्वस्य संदानं शिरोबन्धनं पड्बीशं पादेषु प्रविष्टं पादबन्धनम् । एतानि प्रिया देवानां प्रियतराणि चात्वाले बद्धा स्थापितानि देवेष्वायामयन्ति । प्रापयन्ति । इति ॥

---

## भाषायाम्.

१७. [ हे अश्व ], सादे महसा शूकृतस्य ते (=अवसादे श्रमे जाते सति शू शू इति महता नादेन ध्वनिं कुर्वतस्ते=शू इति ध्वनिं कुर्वन्तं त्वां) यत् पार्ष्ण्या वा कशया वा तुतोद (=पादाघातेन प्रतोदेन वा कोपि अव्यथयत् ) [ यानि च तस्मिन् काले तव दुःखानि जातानि ] ता ता ते सर्वा (=तानि तानि सर्वाणि तव दुःखानि) अध्वरेषु हविषः स्रुचेव (=यज्ञेषु हविषः स्रुचा यथा हविः=यज्ञेषु यथा घृतादिकं स्रुचा सूदयन्ति क्षरयन्ति तथा ) ब्रह्मणा सूदयामि (=स्तोत्रेण क्षरयामि=स्तोत्रमुच्चार्य देवेभ्यः समर्पयामि ) ॥

सायणस्तु शूकृतस्य । शब्दानुकरणमेतत् । शूत्कारं कुर्वतस्ते तव सादे सदनेऽगमने निमित्तभूते सति । ...... अर्थतोऽगमनं कुर्वतः शूत्कारं कुर्वतस्ते त्वाम्...... सूदयामि । क्षरामि । आहुतित्वेन कल्पयामीत्यर्थः । इति सायणः ॥

ते सादे तवोपर्यारोहणे सति इति यद्मास्मनादयः पाश्चात्या आहुस्तच्चिन्त्यमिति स्पष्टम् । अध्यारोहणे सदधातोरयुक्तत्वात् । तथैव सूदयामि मधुराणि करोमि इति यत्तैरेवोक्तं तदप्ययोग्यम् ॥

१७. [ हे अश्वा ], तूं थकून मोठ्यानें शूं केल्यावेळीं तुला कोणी टाचेनें अथवा चाबकानें मारिलें असेल, तीं तुझीं सर्व [ दुखें ], तुपाच्या पळीनें यज्ञांत [ तूप ] [ अर्पण केल्या]प्रमाणें मी [ आपल्या ] स्तोत्राच्या योगानें देवांला समर्पण करितों.

17. Whatever thou mayest have suffered, [ O horse], when one has struck thee with the heel or with the whip at thy sighing loudly in fatigue, I pour forth [ to the gods ] with my prayer, even as [ clarified butter ] with a ladle of oblation in sacrifices.

---

' वषट् असें म्हणून दिलेला '=' वषट्कृतः. ' ' वषट् ' शब्दाविषयीं सू. ३१ मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' मा त्वा अग्निः,' दुसऱ्यांत ' भ्राजन्ती अभि ' आणि चवथ्यांत ' गृभ्णन्ति अश्वम् ' असें म्हणावें, म्हणजे अकरा अकरा अक्षरें येतील. पण तिसऱ्या चरणांत आधींच बारा अक्षरें आहेत! त्यावरून हीहि ऋचा मिश्रवृत्ताची समजली पाहिजे.

१६. ' घोड्याला मारतांना त्याच्या आंगावर जे वस्त्रालंकार घालितात, आणि त्याच्या पायांला आणि मानेला ज्या दोऱ्या बांधितात, त्या सर्व मिळून त्याला देव लोकाप्रत घेऊन जातात, आणि तेथें त्याला पोंहचवितात. '

जो पशु बळि द्यावयाचा असेल त्याला वस्त्रालंकार घालून उत्तम सजवीत, आणि तीं सर्व आभरणें त्याला आवडत असत (' प्रिया '); त्यांला घोडा येथेंच टाकून जातो असें नाहीं, तर त्यांसहित घोडा स्वर्गी जातो असें सांगण्याचा उद्देश कवीचा या ऋचेंत आहे असें दिसतें. हे वस्त्रालंकार घालण्याची चाल प्राचीन काळीं आणि सांप्रतहि सर्व लोकांत आहे.

वृत्तासाठीं ' उपस्तृणन्ति । अधीवासं ' आणि ' हिरण्यानि अस्मै ' असें पहिल्या दोन पादांत म्हणावें. तिसरा आणि चवथा हे पाद त्रिष्टुभाचे नसून विराट् छंदाचे ( दहा दहा अक्षरांचे ) दिसतात. तिसऱ्या पादांत ' अरुअन्तं ' असें म्हटलें पाहिजे. आणि चवथ्यांत ' देवेषु आ ' असें म्हणावें. त्यांतून अकरा अकरा अक्षरें निघत नाहींत. मात्र खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटलें तर अकरा अकरा अक्षरें मिळतील !

संदानमर्रुअन्तं पड्बीशं ।
प्रिया देवेषु ऑअ यामयन्ति ।

---

१७. ' हे अश्वा, तूं जीवंत होतास तेव्हां तुजवर कोणी बसून जात असतांना शूं चालून चालून थकलास, आणि मोठ्यानें शूं शूं करून सुसकार

**चतुस्त्रिंशद्वाजिनो देवबन्धोर्वङ्क्रीरश्वस्य स्वधितिः समेति ।**
**अच्छिद्रा गात्रा वयुना कृणोत परुष्परुरनुघुष्या वि शस्त ॥१८॥**

चतुःऽत्रिंशत् । वाजिनः । देवऽबन्धोः । वङ्क्रीः । अश्वस्य । स्वऽधितिः । सम् । एति ।
अच्छिद्रा । गात्रा । वयुना । कृणोत । परुःऽपरुः । अनुऽघुष्य । वि । शस्त ॥ १८ ॥

## भाषायाम्.

१८. वाजिनः (=बलवतो) देवबन्धोः (=देवा बन्धवो यस्य तादृशस्य=स्वर्गे देवबन्धुवत् निवासार्थं गमिष्यमाणस्य ) अश्वस्य चतुस्त्रिंशत् वङ्क्रीः ( =उभयपार्श्वास्थीनि ) स्वधितिः समेति (=असिः विशसनार्थं संगच्छते ) । [ एवं सति हे विशसनस्य कर्तारः ], [ अस्य ] अच्छिद्रा गात्रा (=अच्छिद्राणि गात्राणि =छिद्ररहितानि गात्राणि=अवयवा अहता यथा स्युस्तथा) वयुना कृणोत (=वयुनानि कुरुत प्रज्ञानानि कुरुत=परस्परं विविक्तान् कुरुत ) [ अपि च ] परुष्परुः (=प्रत्येकं पर्व ) अनुघुष्य विशस्त (=अनुक्रमेण अयममुकोवयवः विशस्यतामयमिति नामानि गृहीत्वा विहत) ॥

देवबन्धोर्देवानां प्रियस्य ...... । वयुना ... कृणोत ...... हृदयजिह्वावक्षःप्रभृतीनि प्रज्ञाय मध्ये च्छिन्नानि मा कुरुतेत्यर्थः । तदर्थं परुःपरुः प्रतिपर्व प्रतिहृदयाद्यवयवमनुघुष्य इदमवद्यमिति संशब्द्यैव विशस्त । विशसनं कुरुत । ...... गात्रं गात्रमस्यानूनं कृणुतादिति प्रैषात् । इति सायणः ॥

---

टाकूं लागलास, त्यावेळीं तुला अधिक न चालवितां सोडून द्यावें; तसें न करितां तूं मस्ती करितोस असें समजून बसणाऱ्यानें तुला पायांचे टाचेनें अथवा चाबकानें मारिलें असेल; तेव्हां तुला जीं दुःखें झालीं असतील, तीं मी आज पळीनें देवांस तूप अर्पण केल्याप्रमाणें माझ्या स्तोत्रांनिशीं देवांला अर्पण करितों. देव त्या तुझ्या दुःखांचा योग्य विचार करितील आणि तुला उपद्रव करणाऱ्यास शासन करितील,' असा या सुंदर मंत्राचा अभिप्राय आहे. कवीचें हृद्ग असें आहे कीं, तुझे जे मांसादिक अवयव, ते देवांनीं खाल्ले म्हणजे तुझीं जीं पूर्वींचीं दुःखें, तीं आपलींच दुःखें असें समजून ते त्यांचें फळ तुला देतील.

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' पार्ष्णिआ ' असें म्हणावें.

१८. प्रबळ [आणि] देवांचा बंधु असा जो घोडा, त्याच्या चवतीस बरगड्यांमध्यें सुरी घुसते. [ हे कापणारे हो ], याचे अवयव सगळ्याचे सगळेच सोडवा; प्रत्येक सांधा एकामागून एक नांव घेऊन कापा.

18. The knife enters the thirty-four ribs of the horse, powerful [ and ] related to the gods. [ O cutters ], cut open his limbs each entire in itself; cut out each of the joints naming them in order as you do so.

१८. मांस कापणाऱ्यांला सूक्तकर्ता म्हणतो:—'हा जो प्रबळ आणि बळि दिला गेल्यामुळें देवांचा सगा झालेला घोडा, त्याच्या चवतीस बरगड्यांत तुमची सुरी जाणार आहे. तर ती आंत घुसून आंतले अवयव छिन्न विच्छिन्न करून टाकिल असें होऊं देऊं नका. काळीज जिव्हा इत्यादिक जे अवयव, त्याची योग्य रीतीनें ओळख करून ते जशाचे तसेच सगळेच कापून काढा. आणि काढितांना हा अमुक अवयव हा प्रथम तोडा, नंतर हा अमुक अवयव आतां हा कापा, या प्रकारें करून कापून सगळे सांधेहि वेगळे वेगळे सोडवा.'

'देवांचा बंधु'=' देवबन्धोः.' म्हणजे देवांस जो प्रिय तो, असें सायण म्हणतात. पण येथें अक्षरार्थ सोडण्याचें कांहीं कारण नाहीं. 'देवबन्धु'. याविषयीं सुबंधु या वरील याच सूक्ताच्या सातव्या मंत्रावर दिलेली टीप पहा.

एकस्त्वष्टुरश्वस्या विशस्ता द्वा यन्तारा भवतस्तथ ऋतुः ।
या ते गात्राणामृतुथा कृणोमि ताता पिण्डानां प्र जुहोम्यग्नौ॥१९॥
एकः । त्वष्टुः । अश्वस्य । विऽशस्ता । द्वा । यन्तारा । भवतः । तथा ।
ऋतुः ।
या । ते । गात्राणाम् । ऋतुऽथा । कृणोमि । ताऽता । पिण्डानाम् ।
प्र । जुहोमि । अग्नौ ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

१९. त्वष्टुः (=? "दीप्तस्य") अश्वस्य विशस्ता (=विशसनस्य कर्ता) एकः (=एक एव) । [तस्य] यन्तारा द्वा (=यन्तारौ द्वौ=नियमयितारौ निबन्धनकर्तारौ द्वौ) भवतः । तथा ऋतुः (=तथैव काल एक एव) । —[ हे अश्व ], ते गात्राणां या (=तव गात्राणां मध्ये यानि गात्राणि हृदयाद्यवयवान् ) ऋतुथा कृणोमि (=काले छिनद्मि=यस्मिन् यस्मिन् काले योवयवश्छेदनीयस्तस्मिंस्तस्मिन् काले यानवयवान् छिनद्मि ) ताता पिण्डानां ( =पिण्डानां मध्ये तानि तानि पिण्डानि मांसखण्डान् ) अग्नौ प्र जुहोमि (=अग्नौ प्रकर्षेण हुतानि करोमि ) ॥

एतस्याः पूर्वार्धो दुर्बोधः । सायणेनैवं कथंकथमपि व्याख्यातः । त्वष्टुरस्य दीप्तस्याश्वस्य विशस्ता विशसनस्य कर्ता एकः । एक एव । स कः । ऋतुः । एतदुपलक्षितः कालात्मा । तस्यैव सर्वेषामपि पर्यवसितृत्वात् । यद्वा ऋतुर्निःशङ्कं विशसनाय गन्ता शमिता । तथा द्वा यन्तारा नियमयितारावहोरात्रे देवौ द्यावापृथिव्यौ वा ऋत्विक्षु भवतः । इति ॥

१९. देदीप्यमान अश्वाचा कापणारा एक [आहे], दोघे दाबून धरणारे आहेत आणि [एक] ऋतु [ आहे ]. [ हे अश्वा ], जीं जीं तुझीं गात्रें मी कालक्रमाप्रमाणें कापितों, ते ते पिंड मी अग्नीच्या ठायीं अर्पितों.

19. One is the slaughterer of the brilliant horse ; two are his holders, and one is the proper time. Whichever of thy limbs, [ O horse ], I cut according to the proper hours, I throw all those lumps of flesh into Agni.

---

१९. ह्या ऋचेचा प्रथमार्ध दुर्बोध आहे. त्याचा अभिप्राय काय आहे तें समजत नाहीं. सूक्तकर्त्यानेंच मुद्दाम गूढ अशा शब्दांनी लिहिलें आहे. आम्ही अक्षरशः अर्थ केला आहे. उत्तरार्धाचा भावार्थ असा आहे कीं, ' हे अश्वा, तुझ्या आंगाचे जे जे अवयव मी वेळाच्या क्रमानें म्हणजे प्रथम काळीज, मग जीभ इत्यादि क्रमानें कापतों, ते तुझ्या मासाचे गोळे मी आवडीनें आणि मोठ्या सन्मानानें अग्नींत अर्पण करितों. '

' कालक्रमाप्रमाणें '=' ऋतुथा. ' म्हणजे प्रथम अमुक अवयव, मग दुसरा अमुक, या अशा क्रमानें.

' पिंड, ' म्हणजे मासाचे गोळे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' अश्वसिआ ' आणि चवथ्यांत 'जुहोमि अग्नौ' असें म्हणावें.

**मा त्वा तपत्प्रिय आत्मापियन्तं मा स्वधितिस्तन्व आ तिष्ठिपत्ते ।**
**मा ते गृध्नुरविशस्तातिहाय छिद्रा गात्राण्यसिना मिथू कः ॥२०॥**

मा । त्वा । तपत् । प्रियः । आत्मा । अपिऽयन्तम् । मा । स्वऽधितिः ।
तन्वः । आ । तिस्थिपत् । ते ।
मा । ते । गृध्नुः । अविऽशस्ता । अतिऽहाय । छिद्रा । गात्राणि ।
असिना । मिथु । करिति कः ॥ २० ॥

---

**भाषायाम्.**

२०. [हे अश्व], प्रिय आत्मा (=प्रीणयिता प्राणः=प्रियस्य प्राणस्य वियोगः) अपियन्तं त्वा (=देवेष्वपि गच्छन्तं=देवेषु मध्ये गच्छन्तं त्वां) मा तपत् (=मा तप्तं दुःखितं कार्षीत्)। स्वधितिः (=छेदनसाधनोसिस्) ते तन्वः (=तव तनूः=तव गात्राणि) मा आ तिष्ठिपत् (=मा चिरमातिष्ठतु=तेषु चिरं मा तिष्ठतु)। [तथा] गृध्नुः (=केवलमांसग्रहणेप्सुः) अविशस्ता (=अकुशलो विशसनकर्ता) अतिहाय (=तत्तच्छेत्तव्यमङ्गमतिक्रम्य) असिना ते गात्राणि (=तवावयवान्) मिथु छिद्रा मा कः (=मिथ्या छिन्नानि मा कार्षीत्) ॥

आत्मा भोगायतनत्वाच्च ... देहो ... । वियोगजनिता व्यथा मा भूदित्यर्थः। ...... । ते तव तन्वस्तनूरङ्गानि मा तिष्ठिपत् । त्वयि चिरमास्थितानि मा कार्षीत् ... अतिहाय न्यूनातिरेकभावेन तत्तदङ्गमतिक्रम्य मध्ये मिथु मिथ्या व्यर्थ्यमसिना छिद्रा छिद्राणि तिर्यक् छिन्नानि मा कः । मा कार्षीत् । इत्यादि सायणः ॥

२०. [ हे अश्वा], तूं वर जात असतांना तुला तुझा प्रिय प्राण दुःख न देओ. सुरी तुझ्या गात्रांवर फार वेळ न बसो. अडाणी [ आणि ] गिधडासारिखा कापणारा तुझीं गात्रें जागा सोडून सुरीनें उगीच न छेजरो.

20. May [ the separation of ] dear life not torment thee, [ O horse ], as thou goest up. May the knife not lie long on thy limbs. May not the unskilful slaughterer, leaving the proper places, vulture-like wantonly cut thy limbs.

---

२०. ' हे अश्वा, तुला मारितांना तुझे फार हाल न होओत; तुझा प्राण एकदम न निघून गेल्यामुळें तुला दुःख न होओ. मारावयाची सुरी तुझ्या आंगावर फार वेळ न राहो, तर एकदम कापण्याचें काम लवकर होऊन जाओ, गिधडासारिखा मांस काढून घेण्याविषयीं उत्सुक जो कापणारा पुरुष, तो अडाणीपणानें सुरी भलभलत्या ठिकाणीं मारून तुझीं गात्रें उगीच छेदून न टाको, तर सांध्याच्या ठिकाणींच मारून एक एक गात्र सोडवून काढो, ' असा या चमत्कारिक मंत्राचा भावार्थ आहे. आम्ही चमत्कारिक म्हणतों, कारण की घोडा यज्ञाकरितां मारावा हें योग्य किंवा अयोग्य याविषयीं जरी आर्य लोकांस शंका येत नसे, तथापि त्याला विनाकारण दुःख होऊं नये अशाविषयीं त्यांस फार कीव येत असे, हें यावरून सिद्ध होतें.

' वर जातांना '=' अपियन्तम्. ' म्हणजे स्वर्गी जातांना असें सायण म्हणतात तें खरें दिसतें. वर ऋचा ८, ९, ११, १४ यांत ' अपि 'शब्दाचा प्रयोग केला आहे, तो याच्याशीं ताडून पाहिला म्हणजे सायणाचें म्हणणें खरें दिसतें.

' प्राण दुःख न देओ. ' म्हणजे लवकर निघून न गेल्यामुळें.

' गिधडासारिखा '=' गृध्नुः. ' म्हणजे गिधडाप्रमाणें मांस ओढून काढणारा, निर्दय.

' अडाणी कापणारा '=' अविशस्ता. ' विशस्ता म्हणजे कापणारा. यावरून 'अविशस्ता' म्हणजे कापणारा जो नव्हे तो असा अर्थ व्हावा; पण तसा न होतां 'अडाणी कापणारा' होतो हा लक्ष्यांत ठेविण्यासारिखा आहे.

**न वा उ एतन्म्रियसे न रिष्यसि देवाँ इदेषि पथिभिः सुगेभिः ।**
**हरी ते युञ्जा पृषती अभूतामुपास्थाद्वाजी धुरि रासभस्य ॥२१॥**

न । वै । ऊं इति । एतत् । म्रियसे । न । रिष्यसि । देवान् । इत् । एषि । पथिऽभिः । सुऽगेभिः ।
हरी इति । ते । युञ्जा । पृषती इति । अभूताम् । उप । अस्थात् । वाजी । धुरि । रासभस्य ॥ २१ ॥

---

## भाषायाम्.

२१. [हे अश्व], एतद् [यत् म्रियसे तत्] न वा उ म्रियसे (=एतद् यत्तव मरणमिति भाति तत् परमार्थतस्तव मरणं नास्ति) । [एतद् यद् रिष्यसि तत् ] न रिष्यसि [ वा उ ] (=एष यस्तव नाश इति भाति स न खलु तव नाशः परमार्थतः ) । [ परमार्थतो हि ] सुगेभिः पथिभिः (=सुगमनैर्मार्गैर् ) देवान् इद् एषि ( =देवानेव गच्छसि ) । हरी (=इन्द्रस्य हरिद्वर्णावश्वौ ) तथा पृषती (=पृषत्यौ=मरुतां वाहनभूते हरिण्यौ ) ते युञ्जा अभूतां ( =तव युजावभवताम्=इन्द्ररथे मरुतां रथे च योक्ष्यसे ) [ अपि च ] रासभस्य धुरि (=गर्दभवाहने अश्विनो रथे ) वाजी (=बलवान् गर्दभः ) [ तव सयुग् भूत्वा] उप अस्थात् (=उपस्थितोस्ति=तव समीपे तिष्ठति) ॥

मृतोपि त्वं देवलोके गत्वा इन्द्रस्य रथे, मरुतां रथे, अश्विनोश्च रथे यतो योक्ष्यसे अतो हेतोस्त्वं नैव म्रियसे नैव नश्यसि-चेत्यर्थः ॥

२१. [हे अश्वा], तूं जो हा मरत आहेस तो खरोखर मरत नाहींस, आणि नाशाप्रत पावत नाहींस. तूं चांगल्या मार्गांनीं देवांप्रतच जात आहेस. तुजबरोबर इंद्राचे पिवळे घोडे [आणि] मरुतांच्या ठिपके असलेल्या हरिणी तुझ्या बरोबर जोडिल्या जातील. [अश्वींच्या] गाढवाच्या धुरेला तुज बरोबर बळवान् गाढव जोडिला जाईल.

21. This is not thy true death, this is not thy destruction: thou art going to the gods themselves by happy roads. The tawny horses [of Indra] and the spotted deer of the Maruts have become thy yoke-fellows. The mighty [ass] stands yoked, [as thy yoke-fellow] [joined] to the yoke of the [As'vins'] ass.

---

२१. 'हे अश्वा, तूं मेलास तरी उत्तम मार्गानें स्वर्गी जाऊन तेथें इंद्राचा रथ इंद्राच्या पिंगट जोडीबरोबर, मरुतांचा रथ त्यांच्या ठिपक्यांच्या हरिणींबरोबर, आणि अश्वींचा रथ त्यांच्या गाढवाबरोबर ओढण्याचें महा भाग्य तुला प्राप्त झालें आहे; त्यापेक्षां तूं मरतोस तो खरोखर मरतो आहेस असें नाहीं, आणि तुझा नाश होतो आहे असें दिसतें तो खरोखर तुझा नाश होत आहे असें नाहीं.'

या मंत्रावरून असें स्पष्ट होतें कीं, या सूक्ताचा कर्ता दीर्घतमा, मरणानंतर परलोक आहे आणि तिकडे घोड्यासारिखे पशुहि जाऊं शकतात, असें मानीत आहे.

'चांगल्या मार्गांनीं.' अक्षरशः 'सुगम्य मार्गांनीं,' म्हणजे सोप्या मार्गांनीं. यज्ञांत मारिलें जाणें हा स्वर्गी जाण्याचा फार जवळचा आणि सोपा मार्ग आहे असें आर्य लोक मानीत.

'इंद्राचे पिवळे घोडे'=' हरी.' इंद्राचे पिवळे दोन घोडे आहेत अशी वेदांत प्रसिद्धि आहे.

'मरुतांच्या ठिपके असलेल्या हरिणी'=' पृषती.' याविषयीं सू. ६४ मं. ८ याजवरील टीप पहा.

'अश्वींच्या गाढवाच्या धुरेला'=' रासभस्य धुरि.' सू. ३४ मं. ९ याजवरील टीप पहा.

'बळवान् गाढव' म्हणजे अश्वींच्या रथाला नेहमीं जोडिला जातो तो गाढव. सू. ३४ मं. ९ पहा.

या वृत्ताचा पहिला चरण अकरा अक्षरांचा नसतां बारा अक्षरांचा आहे, वरकड चरण अकरा अक्षरांचे आहेत. तेव्हां हीहि ऋचा मिश्र वृत्ताची आहे असें समजलें पाहिजे.

**सुगव्यं नो वाजी स्वश्व्यं पुंसः पुत्राँ उत विश्वापुषं रयिम् ।**
**अनागास्त्वं नो अदितिः कृणोतु क्षत्रं नो अश्वो वनतां हविष्मान्**
**॥ २२ ॥ १० ॥**

सुऽगव्यम् । नः । वाजी । सुऽअश्व्यम् । पुंसः । पुत्रान् । उत । विश्वऽपुषम् । रयिम् ।
आनागाःऽत्वम् । नः । अदितिः । कृणोतु । क्षत्रम् । नः । अश्वः । वनताम् । हविष्मान् ॥ २२ ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

२२. वाजी (=बलवानयमालभ्यमानोश्वो) नः (=अस्मदर्थं) सुगव्यं स्वश्व्यं (=शोभनगोसमूहं शोभनाश्वसमूहं च) [तथैव] पुंसः पुत्रान् (=पुरुषान् भृत्यादीन् पुत्रांश्च) उत विश्वापुषं रयिम् (=अपि च सर्वपोषकं धनं) [कृणोतु=ददातु]। अदितिः (=एतन्नाम्नी आदित्यानां माता) नः अनागास्त्वं कृणोतु (=अस्माकं सर्वतो निष्पापत्वं करोतु ददातु)। [अपि च] [अयं] हविष्मान् अश्वः (=हविर्भूतावयवोश्वो=हवीरूपेण हुतोश्वो) नः क्षत्रं वनताम् (=अस्माकं बलं ददातु) ॥

पुंसः पुत्रान् । पुत्रशब्दः स्त्रीपुमपत्यसाधारणः। अतः पुमपत्यानीत्यर्थः। यद्वा पुंसो बन्ध्वादीन् पुत्रान् ... आत्मजान् । स्र्यपत्यानि पुमपत्यानि चेत्यर्थः।...... अदितिरदीनोऽश्वोऽनागास्त्वं कृणोतु । इत्यादि सायणः ॥

२२. हा अश्व आम्हांला चांगल्या गाई, चांगले घोडे, पुरुष [ आणि ] पुत्र [ आणि ] सर्वांचें पोषण करण्याजोगी संपत्ति देओ. अदिति आम्हांला पापापासून मुक्त करो. हवीरूपानें अर्पण केलेला घोडा आम्हांला बळ प्राप्त करून देओ.

22. May the powerful [ horse ] [ procure ] for us good cows, good horses, men, sons, [ and ] wealth sufficient to maintain all. May Aditi grant us freedom from sin. May the horse offered in the shape of sacrificial food give us power.

२२. हा येथें सूक्ताचा उपसंहार होतो. ' हा जो आम्ही घोडा मारून देवांस अर्पितों, याच्या योगानें आम्हांला पुष्कळ चांगल्या गाई, पुष्कळ चांगले घोडे, चाकर नोकर, आणि पुत्र आणि सर्वांचें संरक्षण करण्यास समर्थ इतकी संपत्ति आम्हास मिळो. अदिति देवी आम्हांला पापापासून मुक्त करो; आणि ज्या घोड्याचें मांस आम्हीं हवीरूपानें आज अर्पण केलें आहे, त्याजपासून आम्हांला बळ प्राप्त होओ; ' असें ऋषीचें शेवटचें मागणें आहे.

' पुरुष [ आणि ] पुत्र '=' पुंसः पुत्रान्. ' म्हणजे चाकर आणि पुत्र, अथवा 'पुरुष जातीचीं मुलें,' अर्थात् मुलगे, असाहि अर्थ सायणांनीं सुचविल्याप्रमाणें होईल.

' अदिति आम्हांला पापापासून मुक्त करो '=' अनागास्त्वं नः अदितिः कृणोतु. ' अदिति देवी पापाची क्षमा करिते, आणि पाप होऊं देत नाहीं अशाविषयीं सू. ७२ मं. ९ आणि त्याजवरील टीप पहा.

' हवीरूपानें अर्पण केलेला घोडा '=' हविष्मान् अश्वः.' म्हणजे ज्याला मारून तें मांस देवांस अर्पण केलें आहे तो.

हा अर्थ सायणांस अनुसरूनच केला आहे. आणि त्यांत अडचणहि कांहीं दिसत नाहीं. आतां यावरून इतकें उघड होतें कीं, वेदांत हवि हवि म्हणून जें जिकडे तिकडे येत असतें, तें धान्याचेंच असे असें नाहीं, तर मांसाचेंहि असे असें म्हणण्यास कांहीं अडचण नाहीं. हवि कशाचें करीत असत हा प्रश्न वेदाच्या संबंधानें नित्य येतो. या ऋचेवरून हवि धान्याचेंहि करीत असतील असा जरी संभव राहतो, तरी तें मांसाचेंहि करीत असत इतकें तर स्पष्ट होतें.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' सुगविअं ' आणि 'सुअश्विअं ' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १६३.

उचथ्यस्य पुत्रो दीर्घतमा ऋषिः । अश्वो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**यदक्रन्दः प्रथमं जायमान उद्यन्त्समुद्रादुत वा पुरीषात् ।**
**श्येनस्य पक्षा हरिणस्य बाहू उपस्तुत्यं महि जातं ते अर्वन् ॥१॥**

यत् । अक्रन्दः । प्रथमम् । जायमानः । उत्ऽयन् । समुद्रात् । उत । वा । पुरीषात् ।
श्येनस्य । पक्षा । हरिणस्य । बाहू इति । उपऽस्तुत्यम् । महि । जातम् । ते । अर्वन् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे अर्वन् (=अश्व), यद् (=यस्मात् कारणात्) [त्वं] जायमानः (=जातमात्र एव) समुद्रात् उत वा पुरीषात् (=समुद्रात् अथवा अन्तरिक्षात्) उद्यन् (=उद्गच्छन्) प्रथमम् अक्रन्दः (=महाशब्दमकरोः) [यस्माच्च कारणात्] [तव] श्येनस्य पक्षा (=श्येनस्येव पक्षिणः पक्षौ) हरिणस्य बाहू (=हरिणस्येव पादौ) [आस्ताम्] [अतः कारणात्] ते महि जातं (=तव महज्जन्म) उपस्तुत्यम् (=उपस्तवनीयं=स्तवनार्हं खलु) [भवति] ॥

## सूक्त १६३.

ऋषि—उचथ्याचा पुत्र दीर्घतमा. देवता—हें सूक्त बळी द्यावयाच्या घोड्याविषयीं आहे. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [ हे अश्वा ], तूं प्रथम जन्मतांच समुद्रापासून अथवा अंतरिक्षापासून वर उडून ज्यापेक्षां खिंकाळलास, [ आणि ] [ तुला ] श्येनाचे पंख [ आणि ] हरिणाचे पाय [ होते ], [ त्यापेक्षां ], हे अश्वा, तुझें मोठें जन्म स्तवनीय होय.

## HYMN 163.

To the horse that is going to be sacrificed. By *Dîrghatamas*, son of *Uchathya*. Metre—*Trishtubh*.

1. Inasmuch as thou didst first neigh, so soon as born, as thou wentst up from the sea or from the sky, [ and ] [ as ] [ thou hadst ] the wings of a hawk [ and ] the feet of a deer, thy great birth [ is ], O horse, worthy of being celebrated.

---

१. हेंहि सूक्त अश्वाविषयीं आहे, म्हणजे वरच्या सूक्ताप्रमाणेंच बळि द्यावयाच्या घोड्याविषयीं आहे. या पहिल्या ऋचेंत घोड्याचें जन्म समुद्रापासून अथवा अंतरिक्षापासून झालेलें आहे अशा एका समजुतीला अनुलक्षून ऋषि म्हणतो : ‘हे घोड्या, तूं जेव्हां उत्पन्न झालास, तेव्हांच हरिणाच्या पायांसारिख्या तुझ्या पायांनीं आणि ससाण्याच्या पंखांप्रमाणें जे तुझे पंख, त्यांहीं समुद्रावरून अथवा अंतरिक्षांतून (कोणी म्हणतात तूं समुद्रांत जन्मलास, आणि कोणी म्हणतात अंतरिक्षापासून जन्मलास, त्यांतून) वर एकदम उडालास, आणि मोठ्यानें खिंकाळलास. असें ज्यापेक्षां आहे, त्यापेक्षां तुझें जन्म आणि चरित वाखाणण्यास योग्य होय यांत संशय नाहीं.’

घोड्याची उत्पत्ति समुद्रापासून झाली याविषयीं वेदोत्तरकाळींहि प्रसिद्धि आहेच. त्यामुळें तर चवदा रत्नें समुद्रांतून मंथन करून काढिलीं त्यांत घोडा हा एक आहे. आणि घोडा आकाशांत पक्ष्यांप्रमाणें प्रथम जन्मला हीहि समजूत फार पुरातन आहे. अजूनहि अशी समजूत आहे कीं, त्याच्या चारी पायांला जे बिनकेशाचे चार पांढरे टिपके गुढग्यांवर असतात, तेथें पूर्वी सर्व घोड्यांस पंख होते तेव्हां ते त्यांच्या योगेंकरून उडून सर्वांस उपद्रव करूं लागले म्हणून इंद्रानें छेदून टाकिले असें मानितात.

‘श्येनाचे पंख आणि हरिणाचे पाय.’ हे दोन्ही अत्यंत चपळतेचे दर्शक होत.

**यमेन दत्तं त्रित एनमायुनगिन्द्र एणं प्रथमो अध्यतिष्ठत् ।**
**गन्धर्वो अस्य रशनामगृभ्णात्सूरादश्वं वसवो निरतष्ट ॥ २ ॥**

यमेन । दत्तम् । त्रितः । एनम् । अयुनक् । इन्द्रः । एनम् । प्रथमः ।
अधि । अतिष्ठत् ।
गन्धर्वः । अस्य । रशनाम् । अगृभ्णात् । सूरात् । अश्वम् । वसवः ।
निः । अतष्ट ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. यमेन दत्तम् एनम् (=अश्वं ) त्रितः (=? एतन्नामको देवः ) अयुनक् (=रथे योजितवान् ) इन्द्रः प्रथमः अधि अतिष्ठत् ( =अधिष्ठितवान्=आरूढवान् ) । गन्धर्वः अस्य रशनां (=नियमनरज्जुम् ) अगृभ्णात् (=गृहीतवान् ) । [ अपि च ] हे वसवः (=देवाः ), [ यूयम् ] अश्वं सूरात् (=आदित्यात् ) निः अतष्ट (=साधु संपादितवन्तः=उदपादयत ) ॥

यमेन नियामकेनाग्निना । ...... त्रितः पृथिव्यादिषु त्रिषु स्थानेषु वर्तमानः स्तीर्णतमो वा वायुः । ...... गन्धर्वः सोमः । सोमेन समया विपृक्त इति वक्ष्यमाणत्वात् । ... इति सायणः ॥

श्वापदांत हरिण आणि पक्ष्यांत ससाणा हे अत्यंत चपळ असतात.

ग्रहयज्ञ म्हणून जो करितात, त्यांत हा मंत्र स्कन्द देवाला, म्हणजे कार्तिक स्वामीला, आवाहन करण्याचे कामी आणि त्यास हवि देण्याचे कामीं म्हणत असतात. स्कन्द देवाचा संबंध या ऋचेशीं काय आहे, असा विचार केला तर 'यदक्रन्दः' यांत 'अन्दः' हा ध्वनि 'स्कन्दः' यासारिखा मूळचीं दोन अक्षरें सोडिलीं तर आला आहे असा दिसतो, दुसरें कारण कांहींच नाहीं. स्कन्द हा शब्द वेदांत आलेला नाहीं, तेव्हां स्कन्द देव कोठून येणार ? असें असल्यामुळें स्कन्द नाहीं तर नाहीं, 'अन्द' असें ज्यांत आहे असा तरी मंत्र स्कंदाला लावून देऊंया असें म्हणून हा भटजी बोवांनीं लावून दिला आहे, यांत संशय नाहीं. वास्तुशांतीच्या वेळींहि स्कन्द देवाचें आह्वान करितांना हाच मंत्र म्हणतात.

२. यमानें हा दिला; त्रितानें तो रथाला जोडिला; इंद्र याजवर प्रथम बसला; गन्धर्वानें याची रसी धरिली. हे देव हो, तुम्ही घोड्याला आदित्यापासून निर्माण करिते झालां.

2. Given by Yama, Trita harnessed him (the horse). Indra was the first to ride him. Gandharva seized his rope. You, O gods, fashioned the horse from the sun.

---

२. या ऋचेंत अश्वाविषयीं दुसऱ्या कितीएक कथांस अनुलक्षून ऋषि बोलत आहे. परंतु त्या कथांविषयीं कांहीं विशेष ठाऊक नाहीं. यम याविषयीं सू. ३५ मं. ६ आणि टीप पहा. 'त्रित' याविषयीं सू. ५२ मं. ५ याजवरील टीप पहा. 'गन्धर्व' याविषयीं सू. २२ मं. १४ याजवरील टीप पहा. 'घोड्याला आदित्यापासून कसें निर्माण केलें याविषयीं काय कथा असेल ती प्रसिद्ध नाहीं.

हीहि ऋचा शांतिसूक्तांत आणि वास्तुशांतीच्या वेळीं म्हणत असतात. पण यमाचा, अथवा इंद्राचा, अथवा दुसऱ्या कोणाहि देवाचा या ऋचेशीं काय संबंध आहे तो विशेष सांगणें नलगे.

असि यमो अस्यादित्यो अर्वन्नसि त्रितो गुह्येन व्रतेन ।
असि सोमेन समया विपृक्त आहुस्ते त्रीणि दिवि बन्धनानि॥३॥
असि । यमः । असि । आदित्यः । अर्वन् । असि । त्रितः । गुह्येन । व्रतेन ।
असि । सोमेन । समया । विऽपृक्तः । आहुः । ते । त्रीणि । दिवि । बन्धनानि ॥ ३ ॥
त्रीणि त आहुर्दिवि बन्धनानि त्रीण्यप्सु त्रीण्यन्तः समुद्रे ।
उतेव मे वरुणश्छन्त्स्यर्वन्यत्रा त आहुः परमं जनित्रम् ॥ ४ ॥
त्रीणि। ते । आहुः । दिवि । बन्धनानि । त्रीणि । अप्ऽसु । त्रीणि । अन्तरिति । समुद्रे ।
उतऽइव । मे । वरुणः । छन्त्सि । अर्वन् । यत्र । ते । आहुः । परमम् । जनित्रम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. [ हे अर्वन् ], [ त्वं ] यमः असि । [ त्वम् ] आदित्योसि । [ त्वं ] गुह्येन व्रतेन (=गोपनीयेन कर्मणा ) त्रितोसि । त्वं सोमेन समया विपृक्तोसि (=सोमेन सह संपृक्तोसि संगतोसि ) । ते (=तव ) दिवि (=द्युलोके ) त्रीणि बन्धनानि (=त्रीन् संबन्धान् ) आहुः ॥

स्पष्टाक्षरार्थामपि दुर्बोधाभिप्रायामिमां सायण एवं व्याचष्टे । हे अर्वन् त्वं यमोऽसि । नियमिताग्निरसि तेन दत्तत्वात्तच्छब्दव्यपदेशः । तथादित्योऽसि । सूराश्निरतष्टेत्युक्तत्वात् । तथा गुह्येन व्रतेन गोपनीयेन दुर्दिनरूपेण वा कर्मणा सर्वत्र व्याप्तिरूपेणेत्यर्थः । तेन त्रितस्त्रिषु स्थानेषु तायमानो वायुरसि । त्रित एनमायुनगित्युक्तत्वात्तद्रूपत्वम् । अथ वा गुह्येन व्रतेन गोपनीयेन कर्मणा योगादिसाधनरूपेण त्रित एतन्नामक ऋषिरसि । किंच हे अश्व त्वं सोमेन समया सह विपृक्तः । वीत्येष समित्येतस्मिन्नर्थे । संपृक्तोऽसि। तेन गृहीतत्वात् । हे अश्वेरूप ते तव दिवि द्युलोक आदित्ये वा वर्तमानस्य त्रीणि बन्धनान्युत्पत्तिकारणान्याहुः पुराविदः । वसव आदित्यो द्युस्थानं चेति त्रीणि । इति ॥

४. ते (=तव ) दिवि (=द्युलोके ) त्रीणि बन्धनानि [ सन्तीति ] आहुः । अप्सु

३. हे अश्वा, तूं यम आहेस, तूं आदित्य आहेस. तूं गुह्य कर्मानें त्रित आहेस. तूं आणि सोम एक झाला आहेस. तुझीं तीन बंधनें द्युलोकांत आहेत असें सांगतात.

४. तुझीं बंधनें द्युलोकांत तीन [ आहेत असें ] सांगतात, तीन अंतरिक्षांत [ आणि ] तीन समुद्रांत [आहेत]. आणि हे अश्वा, तूं वरुणासारिखा तुझें अत्यंत श्रेष्ठ जन्म कोठें [ आहे असें ] म्हणतात तें मला सांग.

3. Thou art Yama, thou art Âditya, O horse; thou art Trita by the secret work; thou art united to Soma. They say thy ties are three in heaven.

4. They say thy ties are three in heaven, three in the sky, three in the ocean. And tell me like Varuṇa, O horse, where they say thy highest birth is.

---

३. ह्या ऋचेचा साधारण अर्थ तर स्पष्टच आहे. पण ऋषीच्या मनांतील भावार्थ काय आहे तें कळत नाहीं. घोडा हा यम कसा, तो आदित्य आहे म्हणजे काय, आणि तो त्रित आहे म्हणजे काय? आणि तो आणि सोम हे एकच म्हणजे काय, त्याचा अर्थ खरोखर काय असेल तो असो. सायणांनीं (आम्हांस वाटतें ओढून ताणून) केलेला अर्थ भाषेखालीं दिला आहे तो पहा.

वृत्तासाठीं 'असि आदित्यो' आणि 'गुहिएन' असें म्हणावें.

४. यांतहि गूढार्थच आहे. अश्वाचीं तीन बंधनें अथवा जन्मस्थानें स्वर्गलोकीं आहेत, तीन अंतरिक्षांत, आणि तीन समुद्रांत आहेत असें म्हणतात. यांतून तुझें अत्यंत श्रेष्ठ जन्मस्थान कोणतें म्हणतात, तें तूं मला सांग, असें ऋषि अश्वाला म्हणतो.

तीन स्थानें तीं कोणतीं? सायण काय म्हणतात तें भाषेखालीं पहा. या ऋचेचा अक्षरार्थ स्पष्ट आहे. पण वरच्या ऋचेप्रमाणेंच अभिप्राय गूढ आहे.

'वरुणासारिखा' = 'वरुण इव.' ह्या उपमेचा अर्थ काय? वरुणाचें उत्तम स्थान कोठें आहे तें जसें वरुण सांगतो तसा तूं सांग, असा अर्थ आहे काय? आणि असें असेल तर वरुण कोठें सांगतो?

**इमा ते वाजिन्नवमार्जनानीमा शफानां सनितुर्निधाना ।**
**अत्रा ते भद्रा रशना अपश्यमृतस्य या अभिरक्षन्ति गोपाः ॥५॥११**

इमा । ते । वाजिन् । अवऽमार्जनानि । इमा । शफानाम् । सनितुः । निऽधाना ।
अत्र । ते । भद्राः । रशनाः । अपश्यम् । ऋतस्य । याः । अभिऽरक्षन्ति । गोपाः ॥ ५ ॥ ११ ॥

---

(=अन्तरिक्षे ) त्रीणि [ बन्धनानीति ] त्रीणि [च] अन्तः समुद्रे (=समुद्रस्य मध्ये ) [ सन्तीत्याहुः ] । हे अर्वन्, यत्र ते परमं जनित्रम् आहुः (=यस्मिन् स्थले तवोत्तमं जन्माहुस्तत् ) उत वरुण इव मे (=मम ) छन्त्सि (=कथयैव) ॥

सायण एवं व्याचष्टे । पूर्वं दिवि त्रीणि बन्धनानीत्युक्तम् । इदानीं स्थानत्रयेष्वपि त्रीणि बन्धनानीत्याह । हे अर्वन् ते तव दिवि संबन्धनानि त्रीण्याहुः । तानि पूर्वमुक्तानि । अप्सु । अबुपजीवितत्वाद्भूलोकोऽप्यप्शब्देनाभिधीयते । पृथिव्यां त्रीणि बन्धनान्याहुः । अन्नं स्थानं बीजमिति त्रीणि । तथा समुद्रेऽन्तः समुद्रमध्ये समुद्रवर्णादपादानात्समुद्रमन्तरिक्षम् । तस्मिन् त्रीणि वृष्ट्युत्पत्तिनिमित्तानि मेघो विद्युत् स्तनितमिति । उतेव । इवशब्दश्चार्थे । अपि च हे अर्वन् अश्व वरुणः पापस्य वारकः फलस्यावर्जयिता वा त्वं मे मह्यं छन्त्सि । कथयसि । किं कथयसीति चेत् उच्यते । ते तव परमं जनित्रं निरतिशयं जन्म । जनेरौणादिक इत्रप्रत्ययः । यत्र येषु त्रिषूक्तेषु स्थानेषु आहुः । कथयन्ति । यद्वा यत्र यस्मिन्नादित्ये परमं जनित्रमाहुः । सूरादश्वं वसवो निरतष्टेत्युक्तत्वात् । तादृशं प्रशस्तं जन्म यज्ञसाधनभावेन कथयसीत्यर्थः । इति ॥

---

## भाषायाम्.

५. हे वाजिन् (=बलवन्नश्व ), इमा ते अवमार्जनानि [ सन्ति ] (=एतानि तवाङ्गानां संशोधनस्थलानि अत्र भवन्ति ) । सनितुः (=महोदारस्य ) [ ते ] शफानां (=खुराणाम् ) इमा (=इमानि ) निधाना (=निधानानि=प्रक्षेपणस्थानानि ) [ भवन्ति ]। [ अपि च ] अत्र [स्थले] ते भद्रा रशनाः (=तव कल्याणा रज्जूः) अपश्यं (=पश्यामि ) । या [ रशनाः ] ( =यास् तव रज्जूः ) ऋतस्य गोपाः ( =सत्यभूतस्य यज्ञस्य रक्षितारः पुरुषा ) अभिरक्षन्ति ( =रक्षन्ति ) ॥

सायणस्तु एवं व्याचष्टे । सनितुर्योगसंभक्तुस्तव ...... शफानां निधानानि स्थाना-

५. हे अश्वा, हीं येथें तुला धुऊन पुसून स्वच्छ करण्याचीं स्थळें आहेत. हीं तुज उदाराच्या खुरांची पावलट आहे. येथें तुझे शुभ रज्जु माझ्या दृष्टीस पडत आहेत, कीं ज्यांस यज्ञाचे रक्षक रक्षीत आहेत.

5. These are, O horse, the places for scrubbing and cleansing thee. These are the places where thou, the bounteous one, didst tread with thy hoofs. I see here thy auspicious ropes, which the preservers of the sacrifice are keeping.

---

५. घोड्यास मारिल्यानंतर ऋषि त्याला म्हणतोः–‘ तुला जेथें धुऊन पुसून खरारा करून शुद्ध करीत असत, तीं हीं स्थळें पहा. तूं जेथून फिरत असस, ती जागा ही पहा येथें स्पष्ट दिसत आहे. तुला ज्यांनीं बांधीत, त्या ह्या दोऱ्या पहा येथें यज्ञाचे रक्षक रक्षीत आहेत. ’

‘ शुभ रज्जु ’=‘भद्रा रज्जूः.’ शुभ असें म्हणण्याचें कारण असें दिसतें कीं, ज्या दोऱ्यांला घोडा बांधिला असून बळि दिला जाऊन मोठ्या दिव्य पदाला पोंहचला, त्या दोऱ्या ह्या असल्यामुळें त्यांस ‘शुभ,’ म्हणजे कल्याणकारक, असें विशेषण लाविलें आहे.

वृत्तासाठीं ‘ अवमार्जनानि । इमा’ असें म्हणावें.

**आत्मानं॑ ते॒ मन॑सा॒राद॑जानाम॒वो दि॒वा प॒तय॑न्तं पत॒ङ्गम्। शिरो॑ अपश्यं प॒थिभिः॑ सु॒गेभि॑ररे॒णुभि॒र्जेह॑मानं पत॒त्रि ॥ ६ ॥**

आ॒त्मान॑म्। ते॒। मन॑सा। आ॒रात्। अ॒जा॒ना॒म्। अ॒वः। दि॒वा। प॒त॒यन्त॑म्। प॒त॒ङ्गम्।

शिरः॑। अ॒प॒श्य॒म्। प॒थिऽभिः॑। सु॒ऽगेभिः॑। अ॒रे॒णुऽभिः॑। जेह॑मानम्। प॒त॒त्रि ॥ ६ ॥

---

नि। संचारप्रदेशा इत्यर्थः। ...... । यद्वा इमा ते तवावमार्जनानि अङ्गप्रक्षालनसाधनानि उदकानि। इमानि सनितुस्तव शफानां निधानानि देवयजनभूमयः संचारप्रदेशा वा। अत्रास्मिन्देवयजनस्थाने या रशना गोपास्तव पालयितारो राजपुरुषा ऋत्विजो वा ऋतस्य संबन्धिनोऽभिरक्षन्ति ता अपश्यम्। इति ॥

---

**भाषायाम्.**

६. [हे अश्व], [अहं] मनसा (=चेतसा=अन्तश्चक्षुषा) ते (=तव) पतङ्गं (=पक्षिसदृशं पक्षोपेतम्) आत्मानं (=प्राणम्) अवो दिवा पतयन्तं (=द्युलोकादवस्ताद् उत्पतन्तम्) आरात् अजानां (=दूरादपश्यम्)। [अहं] पतत्रि (=पतत्रोपेतं=पक्षिवत्पक्षोपेतं) [तव] शिरः सुगेभिः (=सुगैः शोभनगमनैर्) अरेणुभिः (=रेणुरहितैः शुद्धैः=आन्तरिक्षैः) पथिभिः (=मार्गैर्) जेहमानम् अपश्यम् (=गच्छत् सद् दृष्टवान्) ॥

अवः। अवस्तात्। सामर्थ्याद् भूमेः। भूमिमारभ्य दिवान्तरिक्षेण मार्गेण पतङ्गमादित्यं पतयन्तं गच्छन्तं व्याप्नुवन्तम्। ...... अरेणुभिरपापैः ... आदित्यमण्डलादप्युपरिभूतैः। सत्यलोकमार्गैरित्यर्थः। तत्र प्रतिबन्धाभावान्मार्गाणामुक्तरूपत्वम्। ... यद्वा ते आत्मानमेवं भावयामि मनसा दिवा द्योतनात्मकेनान्तरिक्षमार्गेण दिवः सकाशाद्यावोऽवस्तादवाङ्मुखं पतयन्तं यागदेशं प्रति व्याप्नुवत् अत एव पतङ्गं पतनशीलमधःपतदादित्यसदृशं वा एवं तव शिरो भावयामीत्यर्थः। शिरश्चैवमपश्यम्। उक्तरूपैर्देवयजनमार्गैर्जेहमानम्। यज्ञदेशं व्याप्नुवत् पतत्रि शीघ्रगामि शिरः पश्यामि। यद्यप्यात्मशब्देन सशिरस्कं शरीरमुक्तं तथापि देहात्पूर्वं शिरसो दृश्यमानत्वात् पृथगभिधीयते। इति सायणः ॥

६. तुझा आत्मा उडणाऱ्या पक्ष्याप्रमाणें द्युलोकाखालीं दूर उडतांना माझ्या मनानें मी पाहिला. मी तुझें उडणारें शिर चांगल्या [ आणि ] बिनधुळीच्या मार्गांनीं जातांना पाहिलें.

6. I have perceived with my mind at a distance thy Self, flying like a bird underneath the heaven. I have seen thy flying head passing by good roads free from dust.

---

६. हें सर्वच सूक्त गूढार्थक आहे. अक्षरार्थ जरी उघड आहे, तरी ऋषीच्या मनांतील भावार्थ उघड नाहीं. ऋषि म्हणतो, 'हे घोड्या, तुला मारिल्यावर तुझा प्राण स्वर्गांत गेला त्याला मी पक्ष्यासारिखा स्वर्गाकडेस पृथिवीपासून उडून जात असतांना दूरून आपल्या मनानें पाहिलें; आणि तसेंच तुझें शिर, पक्ष्याप्रमाणें उडून जात असतांना पाहिलें आणि तें चांगल्या आणि बिनधुळीच्या मार्गांनीं जात असतांना पाहिलें.' येथें घोडा स्वर्गी जात असतां ऋषि म्हणतो आपण आपल्या ज्ञानचक्षूनें तो पाहिला. म्हणजे घोड्याला देवत्व प्राप्त झालें, आणि तो इतर देवांप्रमाणें स्वर्गी संचार करूं लागला.

यांत जीं 'पाहिला' आणि 'पाहिलें' अशीं क्रियापदें आहेत तीं, पाहत आहें अशा अर्थी आहेत.

'बिनधुळीच्या मार्गांनी'='अरेणुभिः पथिभिः.' म्हणजे अंतरिक्षांतील आणि स्वर्गांतील मार्गांनीं. ऋ. ६. ६२. ६ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा. सू. ३५ मं. ११ हाहि पहा.

अत्रा॑ ते रू॒पमु॑त्त॒मम॑पश्यं जिगी॑षमाणमि॒ष आ प॒दे गोः ।
य॒दा ते॒ मर्तो॒ अनु॒ भोग॒मान॒ळादिद्ग्रसि॑ष्ठ ओष॑धीरजीगः ॥ ७ ॥

अत्र॑ । ते॒ । रू॒पम् । उ॒त्ऽत॒मम् । अ॒प॒श्य॒म् । जिगी॑षमाणम् । इ॒षः ।
आ । प॒दे । गोः ।
य॒दा । ते॒ । मर्तः॑ । अनु॑ । भोग॑म् । आन॑ट् । आत् । इत् । ग्रसि॑ष्ठः ।
ओष॑धीः । अ॒जी॒ग॒रिति॑ ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. [ हे अश्व ], आ पदे गोः (=पृथिव्याः स्थाने=वेद्याम् ) इषो जिगीषमाणं (=हविरन्नमाजिधावनेनेव जेतुमिच्छत् ) ते (=तव ) उत्तमम् (=उत्कृष्टतमं ) रूपम् (=आत्मानं=प्राप्तदेवत्वं स्वरूपम् ) अत्र [ देवयजने ] अपश्यम् । [ अपि च ] मर्तः (=मर्त्य उपासकस् ) ते (=तुभ्यं ) यदा भोगम् अनु आनट् (=भोक्तव्यमन्नं गमयति=अर्पयति ) आद् इत् (=तदानीमेव ) ग्रसिष्ठः (=ग्रसितृतमः=भक्षयितृतमः सन् ) ओषधीः अजीगः (=ओषधिविकारात्मकान्यन्नानि भक्षितवानसि ) ॥

त्वं देवत्वं प्राप्तो यदा इतरैर्देवैः सह हविरन्नग्रहणार्थमागतस्तदा तुभ्यं मर्त्या उपासकास्तवोचितानि तृणरूपाणि हविरन्नानि दत्तवन्तस्तदा च त्वं तानि तृणादिरूपाणि हविरन्नानि अत्यन्तबुभुक्षित इव क्षिप्रं भक्षितवान् तत्सर्वमहं दृष्टवान् । एतत्सर्वं मृतस्य तव भविष्यतीत्यर्थः ॥

७. [हे अश्वा], तुझें उत्कृष्ट रूप वेदीवर हविरन्न मिळवितांना मी येथें पाहिलें. आणि मर्त्य उपासकानें तुजप्रत वनस्पतिरूप हविरन्न आणिल्याबरोबर तूं अतिशय भुकेलेला होत्साता तें खाऊन टाकिलेंस.

7. Here I saw, [ O horse ], thy highest Self winning the oblation on the altar. When the mortal worshipper brought the vegetable food (grass) to thee, thou didst immediately swallow it most greedily.

---

७. या ऋचेंत ऋषि अशी कल्पना करितो कीं, 'बळि दिलेला घोडा देवलोकीं जाऊन इतर देवांप्रमाणेंच मर्त्यलोकीं हविरन्न घेण्याकरितां यज्ञाप्रत येऊंहि लागला. तसा आलेला आपणास दृष्टी पडला आणि यज्ञास आल्यावेळीं उपासकांनीं त्याजला गवताचें हवि खाऊं घातलें, तें त्याणें मोठ्या झपाट्यानें एकदम खाऊन फडशा पाडलें.' हें सर्व आपण पाहिलें असें ऋषि म्हणतो. म्हणजे ह्या सर्व गोष्टी घोड्याला बळी दिल्यावर, आणि घोड्याला त्यामुळें देवत्व प्राप्त झाल्यावर घडतील, असें ऋषीच्या मनांतील हृद्य आहे.

'उत्कृष्ट रूप'='उत्तमं रूपम्' म्हणजे ज्या उत्तम देवत्वाप्रत घोडा पोंहचला, तें. देव झाल्यानंतरचें रूप.

'मिळवितांना'='जिगीषमाणम्.' अक्षरशः 'जिंकतांना.' शर्यतीच्या घोड्याप्रमाणें फार सत्वर धांवून येऊन घेतांना असा अभिप्राय. घोडा मरून जरी दिव्य स्वरूपाप्रत पावला, तरी तो घोडा तो घोडाच आहे हें कवि विसरत नाहीं; म्हणूनच तो शर्यतीच्या घोड्याप्रमाणें धांवत येऊन हवि घेतो, आणि त्याचें हवि म्हणजे गवत (औषधि) होय असें म्हणतो.

'वनस्पतिरूप हवि'='भोगम् । ओषधीः.' म्हणजे गवत.

अनु त्वा रथो अनु मर्यो अर्वन्ननु गावोऽनु भगः कनीनाम् ।
अनु व्रातासस्तव सख्यमीयुरनु देवा ममिरे वीर्यं ते ॥ ८ ॥

अनु । त्वा । रथः । अनु । मर्यः । अर्वन् । अनु । गावः । अनु । भगः । कनीनाम् ।
अनु । व्रातासः । तव । सख्यम् । ईयुः । अनु । देवाः । ममिरे । वीर्यम् । ते ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. हे अर्वन् (=अश्व), [अश्विनो] रथः अनु त्वा (=त्वामनु भवति=त्वामनुसरति=त्वद्वेगापेक्षया निकृष्टतरवेगो भवति)। मर्यः अनु [त्वा] (=बलवान् अजर इन्द्रस् त्वत्तो निकृष्टतरवेगो भवति)। [उषसां] गावः अनु [त्वाम्] (=उषसां वेगवत्यो गावस्त्वत्तो निकृष्टतरवेगा भवन्ति)। कनीनां भगः अनु [त्वां] (=नित्ययौवनोपेतानामुषसां सौभाग्यभूतः सवितापि त्वत्तो निकृष्टतरवेगो भवति)। व्रातासः (=व्राताः=मरुतां गणास्) तव सख्यम् अनु ईयुः (=त्वामनुसृत्य तव मित्रत्वं याचन्ते त्वद्वेगवद्वेगमिच्छन्ति)। देवास्ते (=तव) वीर्यम् अनु ममिरे (=तव शौर्यस्य पश्चात् मीयन्ते=तव वीर्यादल्पीयांसो भवन्ति)॥

अश्विनो रथोत्यन्तवेगवानिति श्रुत्यन्तरे दृश्यते। प्र वां रथो मनोजवा इयर्तीत्यादि ऋ. ७. ६८. ३.। मर्यशब्देनेन्द्रग्रहणमपि श्रुत्यन्तरे दृष्टमेव यथा ससान मर्यो युवभिर्मखस्यन् ऋ. ३. ३१. ७। उषाः स्वरथे गा योजयतीत्यपि श्रुत्यन्तरेषु प्रसिद्धम्। यथा। प्रति गाव उषसं वावशन्त ऋ. ७. ७५. ७। जारः कनीनाम् (ऋ. १. १५२. ४) इत्यादिशब्देरुषसां ग्रहणमपि श्रुतिप्रसिद्धम्। व्रातशब्देनापि मरुतां गणस्य ग्रहणं शर्धं शर्धं व एषां व्रातं व्रातं गणं गणं सुशस्तिभिः अनु क्रामेम धीतिभिः ऋ. ५. ५३. ११ इत्यादिषु दृष्टम्॥

८. हे अश्वा, [ अश्वींचा ] रथ तुजपेक्षां उणा, अजर [इन्द्र] तुजपेक्षां उणा, [ उषेच्या ] गाई तुजपेक्षां उण्या, तरुण उषांचा पति तुजपेक्षां उणा; [ मरुतांचे ] गण तुझ्या पाठीस लागून तुझ्या मैत्रीची वांछा करितात. देव तुझ्या पराक्रमाची बरोबरी करूं शकत नाहींत.

8. The chariot [ of the As'vins ] [ is ] inferior to thee [in speed], ever youthful [Indra ] [ is ], O horse, inferior to thee, the cows [ of Ushas ] [ are ] inferior to thee, inferior to thee [ is ] the lover of the youthful [ Ushases ]. The troops [ of Maruts ] follow thee and strive after equality with thee. The gods fall short of thy heroism.

---

८. या सूक्तांतील इतर मंत्राप्रमाणें हाहि मंत्र अक्षरार्थाच्या संबंधानें पाहिला तर सोपा आहे, पण भावार्थानें अवघड आहे. तथापि दुर्बोध नाहीं. घोड्याला बळि दिल्यानंतर त्याला जें दिव्यरूप प्राप्त झालें, त्या वेळीं त्याला पृथिवीवर असतां जो वेग असे त्याच्या असंख्यपट वेग आला; तो कोणाकोणापेक्षां अधिक होय तें ऋषि येथें सांगतो आहे: 'हे घोड्या, तूं अश्वींच्या रथापेक्षांहि वेगवान् झालास; इंद्र हा अतिवेगवान् म्हणतात, पण तूं त्यापेक्षांहि वेगवान् झालास; 'उषा' ज्या गाईस आपल्या रथास जोडिते त्या वेगानें धांवणाऱ्या म्हणतात, पण तूं त्यांपेक्षांहि वेगवान् झालास, नित्यतरुण कन्यकांसारिख्या ज्या ज्या उषा, त्यांचा जार अथवा पति सविता हा फार सत्वर चालणारा म्हणतात, पण तूं त्याहिपेक्षां वेगवान् झालास; मरुद्गण हा वेगवान् होय, पण तूं त्याहिपेक्षां वेगवान् झालास; आणि तुझें शौर्य तर इतकें मोठें कीं, देवहि त्याची बरोबरी करूं शकत नाहींत.' यांतील उपमा, योग्य आणि वेदांत सांगितलेल्या गोष्टीस अनुसरून आहेत यांत संशय नाहीं, आणि समजण्यासहि सुलभ आहेत.

'[ अश्वींचा ] रथ '=' रथः. ' ' अश्वींचा ' हें पद अध्याहृत घेणें यांत या ठिकाणीं ओढाताण नाहीं. अश्वींचा रथ मोठा वेगवान् आहे याविषयीं ऋ. ७. ६८. ३; ५. ७७. ३; ६. ६३. ७ इत्यादि मंत्र पहा.

' अजर [ इन्द्र ] '='मर्यः. ' 'मर्य'-[illegible] ध्यावयाचा [illegible]विषयीं ऋग्वेदांत प्रमाणें आहेत. ऋ. ३. ३१. ७पहा. हा घोडा इंद्रापेक्षांहि वेगवान् झाला असें पुढच्या ऋचेंत सांगितलें आहे तें पहा.

'[ उषेच्या ] गाई '=' गावः. ' उषा आपल्या रथाला गाई जोडिते असें पु-

हिर॑ण्यशृ॒ङ्गोऽयो॑ अस्य॒ पादा॒ मनो॑जवा॒ अव॑र॒ इन्द्र॑ आसीत् ।
दे॒वा इद॑स्य हवि॒रद्य॑मायन्यो अर्व॑न्तं प्रथ॒मो अ॒ध्यति॑ष्ठत् ॥ ९ ॥

हिर॑ण्यऽशृङ्गः । अयः॑ । अ॒स्य॒ । पादाः॑ । मनः॑ऽजवाः । अव॑रः । इन्द्रः॑ । आ॒सी॒त् ।
दे॒वाः । इत् । अ॒स्य॒ । ह॒विः॒ऽअद्य॑म् । आय॑न् । यः । अर्व॑न्तम् । प्र॒थ॒मः । अ॒धि॒ऽअति॑ष्ठत् ॥ ९ ॥

## भाषायाम्.

९. [ अयमर्वा ] हिरण्यशृङ्गः (=सुवर्णशृङ्गयुक्तो ) [भवति ] । अस्य पादाः अयः (=अयोमया ) [ भवन्ति ] । मनोजवाः (=मनोवेग ) इन्द्रः (=इन्द्रोपि ) [ तं प्रति] अवरः (=निकृष्ट ) आसीत् । [ यस्य ] अस्य [ अश्वस्य ] हविरद्यं (=हवीरूपं भक्ष्यभागं ) देवा इत् आयन् (=यन्मांसरूपं हविर्भक्षयितुं देवा अपि भूमावागच्छन् ) यः [ इन्द्रः ] प्रथमः अर्वन्तम् अध्यतिष्ठत् (=प्राप्तदिव्यस्वरूपं यं चार्वन्तम् इन्द्रः प्रथमभावी सन्नारूढवान् ) ॥

हिरण्यशृङ्गो हितरमणीयशृङ्गो वा । उन्नतशिरस्को हृदयरमणशृङ्गस्थानीयशिरोरुहो वा । ...... अयः । अयोमयाः । अयःपिण्डसदृश इत्यर्थः । ... अध्यतिष्ठत् । अधिष्ठितवान् । सहविष्ट्वेन स्वकीयत्वेन वाश्रितवानित्यर्थः । इति सायणः ॥

ष्कळ ठिकाणीं वेदांत सांगितलें आहे. सू. ९२ मं. २ आणि टीप पहा.

' तरुण [ उषां]चा पति '=' भगः कनीनाम्.' ' कनीनाम् ' म्हणजे ' उषांचा ' अशाविषयीं सू. १५२. ४ आणि टीप पहा. हा पति म्हणजे सविता होय. आणि सविता देव मोठ्या त्वरेनें चालतो अशाविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

' [ मरुतांच] गण'='व्रातासः.' 'व्रात'-शब्दानें मरुतांचा 'गण' घ्यावयाचा अशाविषयीं ऋ. ५. ५३. ११ हा मंत्र पहा. जसा अश्वींचा रथ, जसा इंद्र, जशा उषेच्या गाई, आणि जसा सविता फार त्वर चालतो, तसेच मरुत्हि फार वेगानें धांवतात याविषयीं वेदांत सर्वत्र प्रसिद्धि आहे.

घोड्याला बळि दिल्यानंतर त्याला दिव्यस्वरूप प्राप्त होतें, तेव्हां त्याला अत्यंत मोठ्या वेगानें धांवण्याची शक्ति प्राप्त होते असें समजणें साहजिक आहे. कारण जीवंत असतांना ज्याला जें असतें, तेंच मेल्यानंतर त्याला स्वर्गी मोठ्या उत्कृष्ट मानानें प्राप्त होतें असें मानणें ह्याविषयीं साक्ष सर्व धर्मांचीं पुस्तकें देतील.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत ' अर्वन्' च्या ठिकाणीं 'अर्हुअन्,' दुसऱ्यांत 'मानो जत्,' आणि चवथ्यांत ' वीर्य'च्या ठिकाणीं ' वीरिअम् ' असें म्हणावें.

९. [ हा अश्व ] सोन्याच्या शिंगांचा [ होय ]. याचे पाय लोखंडाचे [ होत ]. मनाप्रमाणें वेगवान् [ जो ] इंद्र, [तोहि] यापेक्षां उणा झाला; ज्याचें हवि भक्षण्यासाठीं साक्षात् देव आले होते, आणि ज्याजवर इंद्र प्रथम आरूढ झाला.

9. This horse has [now] golden horns. His feet are [ now ] of iron. Even Indra, swift as the mind, became second to him—to him, to the oblation of whose flesh the gods themselves came down, and whom [ after his immolation ] Indra was the first to mount.

---

९. 'हा घोडा बळि दिल्यावर त्याला जें दिव्यरूप प्राप्त झालें, त्याला सोन्याचीं शिंगें आणि लोखंडाचे पाय झाले, आणि मनाप्रमाणें जो वेगवान् इंद्र त्याचा सुद्धा वेग त्याच्या वेगापेक्षां कमी झाला; ज्या अश्वाचें मांस खाण्यास स्वतः देव खालीं आले होते, आणि जो दिव्यरूपी झाल्यानंतर त्याजवर इंद्र प्रथम आरूढ झाला.'

'सोन्याच्या शिंगांचा '=' हिरण्यशृङ्गः.' घोड्याला बळि दिल्यानंतर त्याला सोन्याचीं शिंगें प्राप्त झालीं असें सांगण्याचा उद्देश काय असावा? घोड्याला जे दागिने घालीत त्यांत शृङ्गस्थळीं कांहीं तरी दागिना कदाचित् घालीत असतील काय?

'लोखंडाचे' इ०. म्हणजे कितीहि चालला तरी ते दुखणार नाहींत इतके दृढ झाले आहेत.

'उणा झाला '= ' अवरः आसीत्.' म्हणजे या घोड्यापेक्षां कमी वेगवान् झाला. वरचा मंत्र पहा.

'ज्याजवर इंद्र प्रथम आरूढ झाला '= ' यः अर्वन्तं प्रथमः अधि अतिष्ठत्. ' वर दुसरी ऋचा पहा.

तृचासाठीं '०शृङ्गो अयो ' असें पहिल्या चरणांत म्हणावें.

ई॒र्मान्ता॑सः॒ सिलि॑कमध्यमासः॒ सं शूर॑णासो दि॒व्यासो॒ अत्याः॑ ।
हं॒सा इ॑व श्रेणि॒शो य॑तन्ते॒ यदाक्षि॑षुर्दि॒व्यमज्म॒मश्वाः॑ ॥१०॥१२॥

ई॒र्मेऽअ॑न्तासः । सिलि॑कऽमध्यमासः । सम् । शूर॑णासः । दि॒व्यासः॑ ।
अत्याः॑ ।
हं॒साःऽइ॑व । श्रे॒णि॒ऽशः । य॒त॒न्ते॒ । यत् । आक्षि॑षुः । दि॒व्यम् । अज्म॑म् । अश्वाः॑ ॥ १० ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१०. दिव्यासः (=द्युसंचारिणः ) अत्याः (=आशुगामिनः ) शूरणासः (=विक्रान्ता ) अश्वा यद् दिव्यम् अज्मं (=यदा द्युसंबन्धिनं प्रदेशम् ) आक्षिषुः (=व्याप्नुवन्ति ) [ तदा ] [ ते ] ईर्मान्तासः (=ईर्मान्ताः=विरलान्ताः ) सिलिकमध्यमासः ( =निबिडमध्यमाः ) [सन्तो] हंसा इव श्रेणिशः सं यतन्ते ( =हंसा इव पङ्क्तीभूय संगताः प्रगच्छन्ति ) ॥

इमां सायण एवं व्याचष्टे । अत्राश्वसमूहस्तुतिद्वारेणायं स्तूयते । ईर्मान्तासः । ईरिताः प्रेरिता अन्ता येषां ते तथोक्ताः । विरलान्ता इत्यर्थः । सिलिकमध्यमासः । संसृताः संगता मध्यप्रदेशा येषां ते तथोक्ताः । मध्ये निबिडा इत्यर्थः । अथवा शरीरस्यैते विशेषणे । ईर्मं ईरितः पुरतो नुन्न इत्यर्थः । तादृशः पृथुरन्तो जघनप्रदेशो येषां ते तादृशाः । तथा सिलिकमध्यमासः । संसृतः संगतः संलग्नो मध्यभागो येषां ते तादृशाः । पुष्टत्वात्प्रौढपृष्ठाः संलग्नमध्याश्चेत्यर्थः । जघनपुरोभागावपेक्ष्य सिलिकमध्यमा इत्युक्तम् । समित्ययमुपसर्गो यतन्त इत्याख्यातेन संबन्धयितव्यः । शूरणासो विक्रमशीला दिव्यासो दिवि भवा अत्या अतनशीलाः । यद्यप्ययमश्वनाम तथाप्यश्वशब्दस्य वक्ष्यमाणत्वादयं यौगिकोऽवगन्तव्यः । ईदृशा अश्वाः श्रेणिशः । एकव्यापाराणां बहूनां समूहः श्रेणिरित्युच्यते । शीघ्रधावनाय श्रेणिशः पङ्क्तीभूय सं यतन्ते । सम्यक् यत्नं कुर्वन्ति । तत्र दृष्टान्तः । हंसा इव । ते यथा श्रेणीभूता ईर्मान्तास इत्यामुक्तरूपाः सन्तोऽन्तरिक्षे [redacted] तद्वत् । कदा । उच्यते । यत् यदाश्वा दिव्य[redacted] गमनं गन्तव्यं वा मार्गमाक्षिषुः । व्याप्नुवन्ति । तदा । अयं मन्त्रो यास्केनैवं व्याख्यातः । ईर्मान्ताः समीरितान्ताः पृथ्वन्ता वा सिलिकमध्यमाः संसृतमध्यमाः शीर्षमध्यमा वा अपि वा शिर आदित्यो भवति यदनुशेते सर्वाणि भूतानि मध्ये चैषां तिष्ठति । इदमपि तच्छिर एतस्मादेव समाश्रितान्येतदिन्द्रियाणि भवन्ति । संशूरणासो दिव्यासो अत्याः । शूरः शवतेर्गतिकर्मणो दिव्या दिविजा अत्या अतनाः । हंसा इव

१०. स्वर्गींचे अति वेगवान् घोडे जेव्हां दिव्य मार्गानें जातात, तेव्हां ते पराक्रमी घोडे, अंतीं विशाळ आणि मध्यें बारीक अशा मालिकेनें हंस जसे मालिकेनें जातात त्याप्रमाणें मिळून धांवतात.

10. The brave and swift divine horses when they fill the divine paths, press forward in a row like flamingos, extended at the head and thin in the middle.

१० या ऋचेंत साधारणपणें स्वर्गांतील घोडे कसे धांवतात तें सांगितलें आहे. 'हंस आकाशांत उंच प्रदेशीं पुढें मोठी आणि मध्यें बारीक होत होत जाणाऱ्या मालिकेच्या रूपानें जसे उडतात, तसे हे शूर आणि अत्यंत चपळ घोडे आकाशांतील मार्गानें पुढें मोठी आणि मध्यें बारीक होत जाणाऱ्या मालिकेच्या रूपानें धांवत असतात.' त्यांस जमिनीवर धांवणें अवश्य नाहीं, ते आकाशांत पक्ष्यांप्रमाणें उंच प्रदेशीं उडतात, असें तात्पर्य.

यांत जे 'ईर्मान्त,' 'सिलिकमध्यम' आणि 'शूरण' असे तीन शब्द आले आहेत, ते अत्यंत अप्रसिद्ध आहेत. ते ऋग्वेदसंहितेंत पुनः आलेले नाहींत.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'दिविआसो,' तिसऱ्यांत 'शिरिंणिशो,' आणि चवथ्यांत 'दिविअम्', असें वाचावें लागतें.

तव शरीरं पतयिष्ण्वर्वन्तव चित्तं वात इव ध्रजीमान् ।
तव शृङ्गाणि विष्ठिता पुरुत्रारण्येषु जर्भुराणा चरन्ति ॥ ११ ॥
तव । शरीरम् । पतयिष्णु । अर्वन् । तव । चित्तम् । वातःऽइव । ध्रजीमान् ।
तव । शृङ्गाणि । विऽस्थिता । पुरुऽत्रा । अरण्येषु । जर्भुराणा । चरन्ति ॥ ११ ॥
उप प्रागाच्छसनं वाज्यर्वा देवद्रीचा मनसा दीध्यानः ।
अजः पुरो नीयते नाभिरस्यानु पश्चात्कवयो यन्ति रेभाः ॥१२ ॥
उप । प्र । अगात् । शसनम् । वाजी । अर्वा । देवद्रीचा । मनसा । दीध्यानः ।
अजः । पुरः । नीयते । नाभिः । अस्य । अनु । पश्चात् । कवयः । यन्ति । रेभाः ॥ १२ ॥

---

श्रेणिशो यतन्ते । हंसा हन्तेर्घ्नन्त्यध्वानम् । श्रेणिश इति श्रेणिः श्रयतेः समाश्रिता भवन्ति । यदाक्षिषुर्यदापुर्दिव्यमज्ममजनिमाजिमश्वाः । नि० ४ १३ । इति ॥

---

## भाषायाम्.

११. हे अर्वन्, तव शरीरं पतयिष्णु (=उत्पतनशीलं=पक्षिवदन्तरिक्षे गमनसमर्थं) [ भवति ] । तव चित्तं (=मनो ) ध्रजीमान् (=वेगवान् ) वात इव (=वायुरिव ) [ ध्रजीमत्=वेगवद्भवति ] । तव शृङ्गाणि (=तेजोरूपाणि ) पुरुत्रा (=बहुषु प्रदेशेषु ) विस्थिता (=विस्थितानि प्रसृतानि ) [ भवन्ति ] । जर्भुराणा (=जर्भुराणानि=मनोहराणि ) [ तानि ] अरण्येषु चरन्ति (=अरण्यप्रदेशेषु इतस्ततो गच्छन्ति ) ॥

अश्वस्य शृङ्गाभावात् तद्वदुन्नतानि तेजांसि परिगृह्यन्ते । इति सायणः ॥

१२. देवद्रीचा (=देवान् [illegible] ) मनसा दीध्यानः ( =दीप्यमानो ) वाजी (=बलवान् ) [ अयम् ] अर्वा (=अश्वः ) शसनं (=विशसनं=विशसनस्थानम् ) उप प्र अगात् (=उपागतोऽस्ति ) । नाभिः (=बन्धुभूतः ) अजः अस्य पुरो नीयते (=अस्य पुरतो नीयते ) । पश्चात् रेभाः कवयः (=स्तोत्रकुशला ऋषयः ) अनु यन्ति ( अनुगच्छन्ति ) ॥

११. हे अश्वा, तुझें शरीर पक्ष्याप्रमाणें उडणारें [ होय ]. तुझें मन वेगवान् वायूप्रमाणें [वेगवान् होय ]. तुझीं शिंगें पुष्कळ ठिकाणीं पसरलेलीं [ आहेत ]. [ तीं] मनोहर [ शिंगें ] अरण्यांत फिरत असतात.

१२. देवपरायण मनाच्या योगानें प्रकाशणारा हा प्रबळ अश्व, कापण्याच्या जागीं हा पहा आला. याचा बंधु जो बोकड, त्याला याच्या पुढें धरून नेतात. स्तोत्र करणारे विद्वान् मागाहून चालत आहेत.

11. Thy person, O horse, [ is ] winged ; thy mind [ swift ] as the swift wind. Thy horns [ are ] extended in all directions in many places. The delightful [horns] play about in the forests.

12. The powerful horse, shining with a mind tending godwards, has come forth. The he-goat, his brother, is led in front of him. The prayerful sages follow him behind.

---

११. 'शिंगें' = 'शृङ्गाणि.' हीं शिंगें म्हणजे घोड्याला दिव्य स्वरूप प्राप्त झाल्यानंतर जीं किरणांसारिखीं तेजें त्याच्या आसपास दिसतात, तीं होत असें सायणाचार्य म्हणतात तें युक्त दिसतें.

या मंत्रांत म्हटलेलें देवलोकीं गेलेल्या अश्वालाच म्हटलेलें आहे.

'अरण्यांत फिरत असतात'='अरण्येषु चरन्ति.' हें किरणांस अनुलक्षून म्हटलें आहे असें दिसतें. आणि बळि दिलेल्या घोड्यास जें दिव्य रूप प्राप्त होतें, तें किरणरूपानें होतें अशी कल्पना दिसते. हें जर खरें असेल, तर या घोड्याचीं शिंगें अरण्यांत फिरतात त्याचें तात्पर्य उघड आहे.

वृत्तासाठीं पहिल्या चरणांत 'पतयिष्णु अर्वन्' असें म्हणावें, आणि पुढें 'पुरुत्रा । अरण्येषु' असें म्हणावें.

१२ 'घोडा कापण्याचें जें ठिकाण, त्याजवळ तो येत आहे असें पाहून कवि म्हणतो:— देवांकडेस जाण्यास तयार आणि उत्सुक ज्याचें मन झालें आहे, आणि तेणेंकरून जो शोभत आहे, असा हा पहा घोडा मारण्याच्या स्थळाप्रत आला आहे! याच्या पुढें याचा मेधबंधु बोकड धरून नेत आहेत, आणि स्तोत्र करणारे [illegible] ते त्याच्या मागून चालत आहेत.'

पूर्वीच्या ( तेराव्या ) ऋचेपर्यंत हा जो बळि जावयाचा घोडा, तो बळि दिला, आणि तो स्वर्गी जाऊन त्याला दिव्य स्वरूप प्राप्त झालें, असें समजून कवीनें

**उप प्रागात्परमं यत्सधस्थमर्वाँ अच्छा पितरं मातरं च ।**
**अद्या देवाञ्जुष्टतमो हि गम्या अथा शास्ते दाशुषे वार्याणि १३॥१३**

उप । प्र । अगात् । परमम् । यत् । सधऽस्थम् । अर्वान् । अच्छ ।
पितरम् । मातरम् । च ।
अद्य । देवान् । जुष्टऽतमः । हि । गम्याः । अथ । आ । शास्ते ।
दाशुषे । वार्याणि ॥ १३ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१३. अर्वान् (=अश्वो) यत् परमं सधस्थम् (=उत्कृष्टं स्थानं स्वर्गरूपं) [तद्] उप प्र अगात् उपप्रगतोस्ति) अच्छ मातरं पितरं च (=मातरं च पितरं च=द्यावापृथिवीरूपौ प्रति) । [हे अश्व], अद्य (=अस्मिन् दिने) [त्वं] जुष्टतमः (=प्रीततमः) [सन्] देवान् गम्या हि (=देवान् प्रति गच्छेः खलु) । अथ (=इदानीं च स्तोता मद्रूपो) दाशुषे (=हविर्दत्तवत उपासकाय) वार्याणि (=वरणीयानि श्रेष्ठानि धनानि) आशास्ते (=प्रार्थयते) ॥

सधस्थं सहस्थानं सुकृतिभिरेकत्र निवासयोग्यं स्वर्गाख्यं यदस्ति तत् । किमर्थम् । पितरं मातरं चाच्छ आभिमुख्येन प्राप्तुम् ।... जुष्टतमः प्रीततमः । स्वर्गं प्राप्नोमीति हर्षयुक्त इत्यर्थः । ...... । अथानन्तरं यजमान आशास्ते । कस्मै । दाशुषे । हविर्दत्तवते स्वस्मै । कानि । वार्याणि वरणीयानि धनानि । यद्वा पुरुषस्य व्यत्ययः । आशास्ते प्रार्थये यजमानार्थम् । इति सायणः ॥

---

वर्णन केलें आहे. वस्तुतः त्याला अजून मारून बलि दिला नव्हता. आतां मारण्याच्या ठिकाणीं तो येत आहे असें पाहून बोलत आहे.

'प्रकाशणास'= '[redacted] ३.२०.४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'बंधु'='नाभिः' म्हणजे घोड्याबरोबर त्याला बलि द्यावयाचा, आणि तो घोड्याबरोबरच स्वर्गी जाणारा, म्हणून त्याला घोड्याचा बंधु असें म्हटलें आहे.

'पुढें धरून नेतात'='पुरो नीयते.' सू. १६२ मं. ३,४ आणि त्याजवरील टीप पहा.

पहिल्या पादांत 'वाजी अर्वा,' आणि दुसऱ्यांत 'दीधिआनः' असें म्हणावें म्हणजे वृत्ताला बरोबर मिळेल.

१३. जें सर्वोत्कृष्ट स्थान त्याजप्रत आणि पित्याप्रत आणि मातेप्रत हा घोडा जात आहे. हे अश्वा, आज तूं अत्यंत आनंदित होऊन देवांप्रत जा. आतां [ हा कवि], हविर्दात्या यजमानाप्रत उत्तम धनें मिळोत अशी प्रार्थना करितो.

13. The horse is going forth to the seat which is the highest, going forth to the Father and to the Mother ( Heaven and Earth ).—Mayest thou go to-day to the gods, being highly delighted.— And now the poet implores excellent blessings for the sacrificing worshipper.

---

१३. 'हा पहा बळी दिलेला घोडा अत्यंत उंच स्वर्गाकडेस मातापितरांप्रत जात आहे.– हे घोड्या, तूं आज मोठ्या आनंदानें देवलोकीं जा.– आणि आतां शेवटीं मी अशी प्रार्थना करितों कीं, हवि देणारे जे उपासकलोक, त्याला सर्व प्रकारचीं उत्तम सौख्यें प्राप्त होओत.' याप्रमाणें या सूक्ताचा येथें उपसंहार झाला.

पहिल्या दोन किंवा तीन ऋचा खेरीज करून हें सर्व सूक्त बळी दिला गेल्यानंतर देवलोकीं पोंहचून देवत्वाप्रत पावलेला जो अश्व, त्याला संबोधून केलेलें आहे. पूर्वीचें सूक्त बहुतकरून सगळें, बळी द्यावयाचा पण अजून दिलेला नाहीं अशा अश्वाविषयीं आहे.

'पित्याप्रत आणि मातेप्रत '='पितरं मातरं च.' हे 'आईबाप' म्हणजे कोण? घोड्याचे भौतिक उत्पादक नसतील, कारण कीं साधारण कोणतेहि पशु, बळि दिले गेल्यामुळें पवित्र न झाले तरी, स्वर्गी जातात अशी समजूत असल्याप्रमाणें दिसत नाहीं. तर द्यावापृथिवीरूप जे आईबाप, ते विवक्षित आहेत असें आम्हांस वाटतें. 'पिता माता' याचा अर्थ वेदांमध्यें 'द्यू आणि पृथिवी' असा कितीएक मंत्रांत सायणांनींहि केला आहे. उदाहरणार्थ ऋ.७. १०१. ३ यांत 'पितुः पयः प्रति गृभ्णाति माता' आणि ऋ. १०. ५४. ३, 'यत् पितरं च मातरं च साकम्' इ० यांजवरील सायणभाष्य पहा. प्रस्तुत ठिकाणीं द्यावापृथिवी बळी दिलेल्या घोड्याचे आईबाप म्हणण्याचें कारण हें कीं, तो बळी दिला गेल्यावर देव होतो, आणि द्यावापृथिवी सर्व देवांचे आईबाप होत.

वृत्रासाठीं चवथ्या [illegible] णि' ह्या ठिकाणीं 'वारिआणि' असें म्हणावें लागतें.

१५. एकाच काळीं झालेले जे सातजण त्यांपैकीं सातवा एकटाच जन्मला, आणि सहाजणच एकाकाळीं झालेले देवोत्पन्न ऋषि होत, असें म्हणतात. त्यांचीं प्रिय रूपें निरनिराळ्या स्थळीं स्थापिलीं आहेत, [ आणि ] तीं वेगवेगळ्या आकृतीचीं [ रूपें ] रूपभेदेंकरून स्वामीकारणें चालतात.

15. Of the seven born simultaneously they say the seventh was born alone [ and that ] six only were born together, god-begotten sages. Their desirable forms established in separate places, and of different appearances, go each according to its appearance for the benefit of their master.

---

खालची बाजू वर आणि वरची खालीं केलेली असते, आणि त्याला दहा घोडे जोडिलेले असतात. हें चक्र म्हणजे सूर्यदेवाचें जें मण्डल, तेंच होय. तें मेघबाष्पांनीं आच्छादित होत्सातें चालत असतें. आणि त्याजवर सकळ जगाची स्थापना केलेली आहे.'

यांत 'उताणें आडें,' आणि 'दहा घोडे' हे जे रूपकाचे भाग, त्यांचा खरा इङ्गितार्थ काय असेल, तो नीट कळत नाहीं; अर्थ नेहमींप्रमाणें आम्हीं अक्षरशः केला आहे.

'सूर्याचें नेत्र'=' सूर्यस्य चक्षुः.' या ठिकाणीं सूर्य म्हणजे सूर्याभिमानी जो देव, तो समजावयाचा, आणि प्रकाशाढ्य जें मण्डल तें त्याचें केवळ चक्षु होय.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'रजसेति आवृतम्' असें म्हणावें.

---

१५. या मंत्रांत ऋतूंविषयीं वर्णन आहे. साधारण वर्षाचे बारा मास, त्यांचे सहा ऋतु आणि अधिक मास येतो तो एक ऋतु मिळून सात ऋतु यांत सांगितले आहेत. त्यांपैकी सहा ऋतु मुख्य आहेत आणि ते जणुं काय प्रत्यक्ष आदित्यापासून जन्मले आहेत, आणि ते आपल्या वेगवेगळ्या रूपांनीं आदित्याची उपासना जणुं करीत असतात, असा साधारण आशय आहे, पण यांतील ऋचें- [illegible] रूपकात्मक आणि निगूढार्थक असल्यामुळें अर्थाविषयीं बरीच अडचण आहे.

'एकाच काळीं झालेले'=' साकंजानाम्.' म्हणजे जसे एकाद्या स्त्रीला जुळे पुत्र होतात, तसे सर्व मिळून एकाच प्रसवानें जन्मलेले.

'ऋषि.' सायणाचार्य या ठिकाणीं ऋषि म्हणजे 'गमन करणारे' इतकाच विशेषणार्थी अर्थ करितात. आम्हीं अक्षरशः भाषांतर केलें आहे, पण त्या शब्दाचा अर्थ येथें वस्तुतः काय असेल

स्त्रियः सतीस्ताँ उ मे पुंस आहुः पश्यदक्षण्वान्न वि चेतदन्धः ।
कविर्यः पुत्रः स ईमा चिकेत यस्ता विजानात्स पितुष्पितासत् ॥ १६
स्त्रियः । सतीः । तान् । ऊं इति । मे । पुंसः । आहुः । पश्यत् ।
अक्षण्ऽवान् । न । वि । चेतत् । अन्धः ।
कविः । यः । पुत्रः । सः । ईम् । आ । चिकेत । यः । ता । विऽ-
जानात् । सः । पितुः । पिता । असत् ॥ १६ ॥

---

शस्तत्तत्स्थाने विहितानि पृथक् पृथक् स्थापितानि रूपशो रूपभेदेन विकृतानि विविधाकृतियुक्तानि । स च रूपभेदस्तैत्तिरीयैराम्नातः स रसमह वसन्ताय प्रायच्छद्यवं ग्रीष्मायेत्यादि । स्थात्रेऽधिष्ठात्रे तदर्थाय रेजन्ते । चलन्ति । जगद्व्यवहाराय पुनः-पुनरावर्तन्त इत्यर्थः । इति ॥

---

## भाषायाम्.

१६. स्त्रियः सतीः (=यद्यपि स्त्रियो भवन्ति तदपि) तान् उ मे पुंस आहुः (=तानेव मम पुरुषान् वदन्ति=ते मम पुरुषा भवन्तीति निगदन्ति) [ यदेतत् ] अक्षण्वान् (=ज्ञानदृष्ट्युपेतः पुरुषः ) पश्यत् ( =द्रष्टुं शक्नोति ) न वि चेतत् अन्धः (=ज्ञानदृष्टिरहितः पुरुषस् तत् न द्रष्टुं समर्थो भवति ) । यः पुत्रः कविः (=यः पुत्रः क्रान्तदर्शी भवति ) स ईं (=स एव ) आ चिकेत (=ज्ञातुं समर्थो भवेत् ) । ता यो विजानात् (=यः पुरुषस् तानि पूर्वोक्तानि विशेषेण ज्ञातुं समर्थो भवति ) स पितुः पिता असत् (=जनकस्यापि जनको भविष्यति ) ॥

मे मदीया या दीधितयः स्त्रियः ...... योषितः सतीः सत्यः । योषिद्वदुदकरूपगर्भधारणात्स्त्रीत्वम् । एषां रश्मीनामाविष्टलिङ्गत्वात्स्त्रीलिङ्गता । तान् उ तान्रश्मीनेव पुंस आहुः । प्रभूतवृष्ट्युदकसेक्तॄन् पुरुषान् आहुः ...... अमुमर्थमत्यन्तनिगूढमक्षण्वान् ज्ञानदृष्ट्युपेतः कश्चिन्महान् पश्यत् । जानाति । अन्धोऽतथारूपः स्थूलदृष्टिर्न विचेतत् । न विचेतयति । न जानाति । किंच यः कविः क्रान्तदर्शी पुत्रः स्त्रीपुरुषरूपाणां रश्मीनां पुत्रस्थानीयः ...... वृष्ट्युदकलक्षणोऽस्ति स ईं स एव पुत्रः । यद्वा ईमेनमर्थं स्त्रीणां सतीनां पश्चात् पुरुषभावमाचिकेत । सर्वतो जानाति । पित्रोः स्थितिं पुत्र एव जानाति नान्यः । यः कश्चित्ता तानि विजानात् स्त्रीपुरुषपुत्ररूपाणि जानीयात् स पितुः पितासत् । पिता वृष्ट्या जगत्पालको रश्मिसमूहः । तस्यापि पिताभिरक्षकः । स भवति । ...... स्वयं पितुः पुत्रः सन्नपि स्वपुत्रापेक्षया पिता च भवति । पुत्रपौत्रादिसहितश्चिरकालं जीवी भवति । इत्यादि सायणः ॥

१६. त्या माझ्या स्त्रिया असतांहि त्यांस माझे पुरुष म्हणतात. डोळस हें पाहूं शकतो, आंधळा पाहूं शकत नाहीं. जो पुत्र बुद्धिमान् होय, तोच [ या गोष्टी ] जाणूं शकेल. [ आणि ] या गोष्टी जो जाणील तो पित्याचा पिता होईल.

16. Though these are my females, they call them my males. He who has eyes can see [ this ], he who is blind cannot see. That son who is a seer,—he alone can perceive it. And he who can know it shall become the father of the father.

---

त्याविषयीं संशय आहे. कदाचित् ऋतुरूप कवि आदित्याचें माहात्म्य त्याजपुढें चालून गात असतात, असा मंत्रकर्त्याचा भावार्थ असेल.

'निरनिराळ्या स्थळीं '='धामशः.' म्हणजे, वसंताच्या वेळीं वसंतऋतु, ग्रीष्माच्या वेळीं ग्रीष्मऋतु, पावसाळ्याचे वेळीं वर्षाऋतु, इत्यादि नियमानें ज्या त्या काळीं यथायोग्य ऋतूंची स्थापना केली आहे.

'स्वामीकारणें '='स्थात्रे.' म्हणजे ज्या रथापुढें हे ऋतुरूप कवि आदित्याचें माहात्म्य गात गात चालतात, त्या रथांत बसलेला जो आदित्य, त्या कारणें.

---

१६. या मंत्राचा भावार्थ सायणाचार्य असा सांगतात कीं, 'जे माझे म्हणजे आदित्याचे किरण स्त्रीरूप आहेत, त्यांस पुरुष म्हणतात. आणि ही गोष्ट खरी आहे. परंतु ज्ञानी मनुष्यांस ती समजते, अज्ञानांध मनुष्यांला समजत नाहीं. ही गोष्ट माझ्या किरणसमूहाचा पुत्रभूत जो वृष्ट्युदकसमूह, तो जाणतो. आणि ज्या कोणा मनुष्याला ही गोष्ट समजेल, तो आपल्या पित्यापेक्षांहि बुद्धिमान् होय असें समजावें.'

परंतु या ऋचेच्या पहिल्या तीन चरणांचा तरी अभिप्राय आतां सांगितला त्याहून कांहीं अन्य असावा असें दिसतें. मात्र सायणांनीं सांगितल्याप्रमाणें ऋचा आदित्याच्या किरणांविषयींची असेल, आणि ते आदित्यकिरण स्त्रीरूप असतांहि पुरुष होत, आणि ही गोष्ट ज्ञानी पुरुषालाच समजेल, आणि ज्या मुलाला समजेल तो आपल्या बापाचा बाप होय, म्हणजे बापापेक्षां शहाणा होय, असा ऋषीचा अभिप्राय असेल.

या सर्व सूक्ताविषयीं असें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, यांत आदित्य म्हणजे अनादि आणि अनंत काल, आणि तो जो आदित्य अथवा काल तद्रूप परमेश्वर, याविषयीं उखाण्यांप्रमाणें गुह्य अभिप्रायाचीं वचनें जिकडे तिकडे भरलीं आहेत. आम्हांस वाटतें, अशा प्रकारच्या सूक्तांचें अक्षरशः भाषांतर करणें हेंच इष्ट

अवः परेण पर एनावरेण पदा वत्सं बिभ्रती गौरुदस्थात् ।
सा कद्रीची कं स्विदर्धं परागात्क स्वित्सूते नहि यूथे अन्तः ॥१७

अवः । परेण । परः । एना । अवरेण । पदा । वत्सम् । बिभ्रती ।
गौः । उत् । अस्थात् ।
सा । कद्रीची । कम् । स्वित् । अर्धम् । परा । अगात् । क । स्वित् ।
सूते । नहि । यूथे । अन्तरिति ॥ १७ ॥

---

**भाषायाम्.**

१७. परेण (=अमुना पदेन) अवः (=अधस्तात्=अधोवर्तमाने देशे ) [अपि च] एना अवरेण (=अनेन अपरेण ) पदा (=पादेन ) परः (=परस्ताद्) वत्सं बिभ्रती (=स्ववत्सम् आकर्षन्ती ) गौः उत् अस्थात् (=उदितास्ति ) । सा [ गौः ] कद्रीची (=क गच्छन्ती) [भवति]? कं स्वित् अर्धं परा अगात् (=कं मार्गं प्रति गतवती)? क स्वित् (=क खलु) सूते (=कुत्र प्रदेशे वत्सम् उत्पादयति)? नहि यूथे अन्तः [ सूते] (=सजातीयगोसमूहे न खलु वत्सम् उत्पादयति ) ॥

अत्राग्नौ हूयमानाहुतिर्गोरूपेण स्तूयते । ...... वत्सं वत्सस्थानीयमग्निम् ...... बिभ्रती धारयन्ती ...... उदस्थात् सूर्यं प्रति उत्तिष्ठति । ...... कम् अर्धं कं फलभाजम् ऋद्धं पुरुषम् आगत्य परागात् परा गच्छति । ...... सूते फलम् उत्पादयति । इत्यादि सायणः ॥

---

होय; ऋचीचा गुप्त भावार्थ सर्वत्र एकदम न समजला तरी, तो अक्षरशः भाषांतर वाचकांच्या हातीं आल्यावर, केव्हां ना केव्हां तरी उघड होईल.

१७. एका पायानें वासराला खालीं धारण करणारी, आणि दुसऱ्या पायानें वर धारण करणारी गाय उगवली आहे. ती कोठें जाणारी होय? ती कोणत्या दिशेप्रत जाते? ती कोठें विते? ती कळपांत [ तर वीत नाहीं ].

17. The cow has risen that bears her young with this leg below and with that other leg above. Where is she going? In what direction has she gone? Where does she bring forth? Not certainly among the herd.

---

१७. या मंत्रात एका गाभण्या गाईविषयीं सांगून ऋषि म्हणतो, 'जी गाय या लोकीं आपल्या वत्साला एका पायानें धारण करिते, आणि वरच्या लोकीं दुसऱ्या पायानें धारण करिते, ती उगवली आहे. ती कोठें जाणारी होय बरें? ती कोणत्या दिशेला जात आहे? ती कोठें वीत असते? आपल्या कळपांत तर वीत नाहींच.'

परंतु ती गाय म्हणजे कोण समजावयाची त्याविषयीं निश्चयानें सांगवत नाहीं. कदाचित् उषा असेल. वत्स म्हणजे सूर्य. सायणाचार्य गाय म्हणजे अग्नीमध्यें अर्पिलेली आहुति असें म्हणतात. भाषेखालीं पहा. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें वत्स म्हणजे आहुतीनें पुष्ट केलेला अग्नि होय.

ह्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे. पण पहिल्या चरणांत 'पर एनावरेण'च्या ठिकाणीं 'परैनावरेण' असें आणि चवथ्यांत 'क्व स्वित्'च्या बद्दल 'कुअ स्वित्' असें वाचावें लागतें.

अवः परेण पितरं यो अस्यानुवेद परं एनावरेण ।
कवीयमानः क इह प्र वोचद्देवं मनः कुतो अधि प्रजातम्॥१८॥
अवः । परेण । पितरम् । यः । अस्य । अनुऽवेद । परः । एना । अवरेण ।
कविऽयमानः । कः । इह । प्र । वोचत् । देवम् । मनः । कुतः । अधि । प्रऽजातम् ॥ १८ ॥

## भाषायाम्.

१८. अवः (=अवस्तात्=अत्राधोदेशे) अस्य [ जगतः ] [ अवरं ] पितरम् (=? अग्निं ) परेण [ पित्रा सह ] (=आदित्यरूपेण सह ) [ समानभूतं ] [ तथा च ] परः (=परस्मिन्नुपरि वर्तमाने देशे ) [ परं पितरम्=आदित्यरूपम् ] एना अवरेण [ पित्रा ] (=अनेन अवरेणाग्निरूपेण पित्रा सह ) [ समानभूतं ] यः अनुवेद (=अनुक्रमेण जानाति ) [ ईदृशः ] कवीयमानः (=कविवदाचरन्=मेधावी ) कः इह (=अस्मिन् लोके ) प्र वोचत् (=प्रकर्षेण अवोचत्=सूक्तानि प्रोक्तवान्=ईदृशः सूक्तप्रवक्ता को बभूव )? देवं मनः (=द्योतमानं=दिव्यं=मनः=एतज्ज्ञातुं समर्थं मनः ) कुतः अधि (=कस्माददृष्टविशेषात् ) प्रजातं (=जायते ) ? ॥

सायण इमामेवं व्याचष्टे । अवोऽवस्तात्स्थितमस्य पितरमेतल्लोकपालकमग्निं परेणादित्येन सह योऽनुवेद । अनुक्रमेण जानाति । तथा परः परस्तात्स्थितमादित्यमस्य पितरं पालकम् । सोऽपीममेव लोकं वृष्ट्यादिना पालयति । तादृशमादित्यमेनानेनावरेणाग्निना सह योऽनुवेद । अग्न्यादित्यौ व्यतिहारेणोपास्ते । यद्वा अभिभूतरजस्तमस्कावुद्बुद्धसत्त्वौ अत एव स्वाधीनमायावेतावेकत्वेनैवाधिगच्छति । स तादृशः पुरुषः कवीयमानः कविवदाचरन् क्रान्तदर्शित्वमात्मनः ख्यापयन् क इहास्मिन् लोके प्रवोचत् । प्रब्रवीति । किंच देवं द्योतमानं देवविषयमलौकिकं वा मनः कुतः कस्माददृष्टविशेषादधि आधिक्येन प्रजातम् । उत्पन्नम् । उभयमपि दुर्लभमित्यर्थः । इति ॥

१८. या लोकीं या लोकाचा हा पिता आणि तो दुसरा पिता, आणि वरच्या लोकीं तो पिता आणि हा दुसरा पिता हे दोन्ही एकच असे ज्याणें जाणिले, असा कोणता कवि या लोकीं उपदेश करून गेला? [ असें ] दिव्य मन कोठून उत्पन्न होतें?

18. He who knows here below that [this] Father of the [universe] and the other [Father], [and] in the other world [that Father] and this Father below, are one—what sage of this kind has taught here in this world? Whence is [such] a divine mind born?

---

१८. या ऋचेचा भावार्थ असा दिसतो कीं, 'असा ऋषि म्हणजे कवि कोण होऊन गेला, कीं ज्याला या पृथिवीवर जगताचा बाप अग्नि म्हणजे आदित्यच असें समजलें, आणि ज्याला पर लोकीं जो बाप आदित्य तो आणि अग्नि हे एकत्र आहेत असें समजलें? हें समजण्यास जें दिव्य मन पाहिजे तें कोठून बरें उत्पन्न होतें?'

आतां यांत जे दोन पिते सांगितले, ते सायणाप्रमाणें आम्हीं सांगितलेले अग्नि आणि आदित्य हे होत, कीं या लोकीं दृष्टीस पडणारा जो आदित्य आणि पर लोकीं असलेला परमेश्वर हे दोघे घ्यावयाचे याविषयीं आम्हांस संशय आहे. याविषयीं निर्णय करणें कठिण आहे.

वृत्तासाठीं 'अस्य । अनुवेद' असें वाचावें.

ये अर्वाञ्चस्ताँ उ पराच आहुर्ये पराञ्चस्ताँ उ अर्वाच आहुः ।
इन्द्रश्च या चक्रथुः सोम तानि धुरा न युक्ता रजसो वहन्ति १९

ये । अर्वाञ्चः । तान् । ऊं इति । पराचः । आहुः । ये । पराञ्चः ।
तान् । ऊं इति । अर्वाचः । आहुः ।
इन्द्रः । च । या । चक्रथुः । सोम । तानि । धुरा । न । युक्ताः । र-
जसः । वहन्ति ॥ १९ ॥

---

## भाषायाम्.

१९. ये (= ? रश्मयः ) अर्वाञ्चः (=अधोमुखाः ) [ सन्ति ] तान् उ (=तानेव ) पराचः (=पराङ्मुखान् ) आहुः । ये [ च ] पराञ्चः (=पराङ्मुखाः ) [ सन्ति ] तान् उ (=तानेव रश्मीन् ) अर्वाचः (=अधोमुखान् ) आहुः । [ त्वम् ] इन्द्रः च (=अपि च ) [ त्वं ] हे सोम, या ( =यानि ) [" मण्डलपरिभ्रमणानि "] चक्रथुः (=कृतवन्तौ ) तानि धुरा युक्ता न (=धुरि युक्ता अश्वा इव) रजसः (=रजः=लोकान् ) वहन्ति (=निर्वहन्ति ) ॥

ये सूर्यसोमयोश्चक्रे वर्तमाना रश्मयो महादयश्च तत्परिभ्रमणवशेनार्वाञ्चः ...... अधोमुखाः सन्ति । ताँ उ तानेव पराचः ...... ऊर्ध्वान् आहुः कालविदः । तथा प्रथमं ये पराञ्चः ताँ उ तानेव अर्वाच आहुः । हे सोम त्वमिन्द्रः परमेश्वरः ...... आदित्यः ...... स च युवां या यानि मण्डलपरिभ्रमणानि चक्रथुः । ...... तानि रजसो ... लोकस्य ॥ कर्मणि षष्ठी ॥ लोकं वहन्ति । निर्वहन्ति । इत्यादि सायणः ॥

१९. जे अभिमुख आहेत त्यांलाच पराङ्मुख म्हणतात, [आणि] जे पराङ्मुख आहेत त्यांस अभिमुख म्हणतात. हे इंद्रा आणि सोमा, तुम्ही जीं [ भ्रमणें ] करीत असतां, तीं धुरीला जुंपलेल्या घोड्यांप्रमाणें जगताचा निर्वाह करितात.

19. They say those that tend towards us are turned from us, and that those that are turned from us tend towards us. Those [revolutions], which Indra and thou, O Soma, make, carry on the universe like [ horses ] yoked to the pole.

१९. हाहि मंत्र असा आहे कीं, याचा शब्दशः अर्थ उघड दिसतो तरी त्याचा भावार्थ निगूढ आहे. सायणांप्रमाणें भावार्थ असा आहे कीं, 'ही ऋचा आदित्य आणि चंद्र यांविषयीं आहे; ते जगासभोंताली परिभ्रमण करीत असतात, तेणेंकरून त्यांचे जे किरण एका वेळीं अधोमुख असतात ते दुसरे वेळीं ऊर्ध्वमुख होतात, आणि जे प्रथम ऊर्ध्वमुख असतात ते मागाहून अधोमुख होतात. आणि असें होत असतें म्हणूनच जगाचा निर्वाह चालत असतो, नाहींतर चालणार नाहीं.'

'अभिमुख'='अर्वाञ्चः.' म्हणजे दोन प्रहरच्या वेळीं जे खालीं तोंडें करून जणुं येणारे ते किरण. तेच सूर्य उगवला म्हणजे त्या वेळीं 'ऊर्ध्वमुख' (पराञ्चः) म्हणजे वर तोंडें करून जणुं असलेले असे दिसतात.

'इंद्र.' येथें इंद्र म्हणजे आदित्य (सूर्य) असा अर्थ सायणांप्रमाणें घेतल्याशिवाय निर्वाह नाहीं असें वाटतें. वेदांत इंद्र म्हणजे प्रथम आदित्यरूपच देवता असे, अशा अर्थाचीं वाक्यें कोठकोठें आलीं आहेत. सोम म्हणजे चंद्र हा अर्थ आधुनिक संस्कृतांत तर प्रसिद्धच आहे, पण वेदकाळीं तो अर्थ असे कीं नाहीं याविषयीं मोठाच संशय आहे.

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परि षस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभि चाकशीति ॥२०॥१७॥

द्वा । सुऽपर्णा । सऽयुजा । सखाया । समानम् । वृक्षम् । परि । सस्वजाते इति ।
तयोः । अन्यः । पिप्पलम् । स्वादु । अत्ति । अनश्नन् । अन्यः । अभि । चाकशीति ॥ २० ॥ १७ ॥

---

### भाषायाम्.

२०. सयुजा (=सयुजौ=समानयोगौ=समानसंबन्धौ) सखायौ (=मित्रभूतौ) द्वा (=द्वौ) सुपर्णा (=सुपर्णौ=पक्षिणौ=जीवपरमात्मरूपौ) समानम् (=एकरूपं) वृक्षं परि षस्वजाते (=आश्रयतः)। तयोरन्यः (=तयोर्मध्य एकः=जीवः) स्वादु पिप्पलं (=तस्य वृक्षस्य मधुरं फलं=मधुराणि फलानि) अत्ति (=भक्षयति)। अन्यः (=अपरः=परमात्मा) अनश्नन् (=अभक्षयन्=तानि फलान्यभक्षयन्नेव) अभि चाकशीति (=तमन्यं जीवं फलानि भक्षयन्तमाभिमुख्येन पश्यति) ॥

अत्र लौकिकपक्षिद्वयदृष्टान्तेन जीवपरमात्मानौ स्तूयेते। यथा लोके द्वौ सुपर्णौ सुपतनौ शोभनगमनौ सयुजा समानयोगौ सखाया समानख्यानौ समानं वृक्षं परिषस्वजाते। एकमेव वृक्षं परिषस्वजाते। आश्रयतः। तयोरन्य एकः पिप्पलं पक्वं स्वादुतरमत्ति अपरोनश्नन् अभिचाकशीति। अभिपश्यति। तद्वत् द्वौ सुपर्णस्थानीयौ क्षेत्रज्ञपरमात्मानौ सयुजा समानयोगौ। योगो नाम संबन्धः। स च तादात्म्यलक्षणः। ...... एकस्वरूपावित्यर्थः। ......... वृक्षो देहः। स चोभयोः समान एक एव। जीवस्य भोगार्थत्वात् परमात्मना सृष्टैर्महाभूतैरारब्धत्वात्तस्योपलब्धिस्थानत्वाच्चोभयोरपि समानः। तादृशं समानं वृक्षं परिषस्वजाते। परिष्वजतः। आश्रयतः। ...... तयोरन्यो जीवात्मा पिप्पलं कर्मफलं स्वादुभूतमत्ति। भुङ्क्ते। यस्य यदुपार्जितं तत्तस्य स्वादु भवति। अन्यः परमात्मानश्नन् आत्मकामत्वेनाभुञ्जानः स्पृहाया अभावात्। इत्यादि सायणः ॥

२०. एकमेकाचे जीवलग मित्र [ असे ] दोघे पक्षी एकाच वृक्षाचा आश्रय करितात. त्यांतून एक [त्या वृक्षाचीं जीं] गोड फळें [ तीं ] भक्षण करितो. [ आणि] दुसरा [ तीं ] भक्षण न करितां त्यांजकडेस पहात रहातो.

20. The two birds, intimate friends, take shelter in the same tree. One of them eats the sweet berries, the other without eating perches, looking on.

---

२०. यांत जीव आणि परमात्मा याविषयीं लौकिक दोन पक्ष्यांच्या दृष्टान्तानें वर्णन केलें आहे. 'जसे दोन पक्षी एकमेकाचे अत्यंत जीवलग मित्र असून त्यांनीं कांहीं वेळपर्यंत एकाच झाडावर बसावें, आणि त्यांतून एका पक्ष्यानें त्या झाडाचीं पिकलेलीं गोड फळें खावीं, आणि दुसऱ्यानें केवळ पहात राहावें, त्याप्रमाणें जीव आणि परमात्मा हे दोघे या देहांत कांहीं काळपर्यंत वास करितात, आणि कर्मफळांचा उपभोग जीव घेतो, परंतु परमात्मा तीं फळें न खातां केवळ पाहत राहतो, आणि तेणेंकरून अलिप्त असतो.'

याप्रमाणें या मोठ्या महत्त्वाच्या ऋचेचा भावार्थ आहे यांत संशय नाहीं. यावरून उघड होतें कीं, जीवात्मा आणि परमात्मा हे वेगळे आहेत तरी वस्तुतः ते एकच आहेत, आणि एकच आहेत तरी त्यांत भेद आहे इत्यादीविषयीं जी मतें आलीकडेस प्रसिद्ध आहेत, त्यांचें बीज वेदांत आहे. वेदकाळीं आध्यात्म ज्ञानाविषयीं विचार मुळींच नसे. कर्मकाण्डाविषयींच फार प्रचार असे असा जो समज आहे, आणि तो समज बहुतकरून खरा आहे यांत संशय नाहीं, त्याला हें एक बाधक आहे. आतां कितीएक पाश्चात्त्य विद्वान् या ठिकाणीं 'द्वा सुपर्णा' म्हणजे सूर्य आणि चंद्र असा अर्थ करितात; पण तो येथें जुळत नाहीं, आणि आम्हीं यास्कसायणादिकांस अनुसरून दिलेला अतिप्राचीन जो अर्थ, तो सोडून देण्यास योग्य कारण दिसत नाहीं. इतकें खरें आहे कीं, सुपर्ण हा शब्द पुढच्या मंत्रांत आला आहे तरी जीव आणि परमात्मा यांविषयीं त्यांत अर्थ नाहीं, तर तेथें किरण असा अर्थ केला आहे. पण या सूक्तांतील बहुतेक मंत्र स्फुट असल्याप्रमाणें आहेत; त्यांचा पूर्वापर संबंध फार थोडाच आहे, एका मंत्रांत आलेली गोष्ट त्याच्या पुढच्या मंत्रांत चालू राहत नसतां, त्यांत कांहीं दुसऱ्याच विषयाचें प्रतिपादन केलेलें असतें. ( तथापि २१ व्या मंत्रावरील सायणभाष्य पहा ).

यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिमेषं विदथाभिस्वरन्ति ।
इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा विवेश ॥२१॥
यत्र । सुऽपर्णाः । अमृतस्य । भागम् । अनिऽमेषम् । विदथा । अभिऽस्वरन्ति ।
इनः । विश्वस्य । भुवनस्य । गोपाः । सः । मा । धीरः । पाकम् । अत्र । आ । विवेश ॥ २१ ॥

## भाषायाम्.

२१. यत्र (=यस्मिन्) [आदित्ये] सुपर्णाः (=शोभनपतनाः=सुगमना रश्मयः) अमृतस्य भागम् (=उदकस्यांशं बाष्परूपेण) अनिमेषम् (=अनवरतं=नित्यं) विदथा (=विदथेन=ज्ञानेन) अभिस्वरन्ति (=अभिप्रापयन्ति=पृथिव्याः सकाशान्नयन्ति) [यश्च] विश्वस्य भुवनस्य (=सकलस्य भूतजातस्य) इनः (=स्वामी) गोपाः (=पालयिता) [च] [भवति] स धीरः (=प्रज्ञावान्) [आदित्यः] पाकं मा अत्र (=इमं मूढं माम्) आ विवेश (=प्रविश्य तत्र निवसति) ॥
इयं सायणेनाध्यात्मपक्षेपि व्याख्याता भवति ॥

'एकाच वृक्षाचा'='समानं वृक्षम्.' म्हणजे शरीराचा.

वृक्षासाठीं पहिल्या चरणांत 'द्वा'च्या स्थळीं 'दुआ' असें आणि तिसऱ्या चरणांत 'स्वादु अत्ति' असें वाचावें लागतें.

२१. ज्याचे ठायीं पक्षी अमृताचा भाग ज्ञानपुरस्सर नित्य पोंहचवीत असतात, [ आणि जो ] सकल जगताचा प्रभु [ आणि ] रक्षणकर्ता [ होय ], तो प्रज्ञावान् [ परमेश्वर ] मज मूढाच्या आंगीं प्रवेश करून राहिला आहे.

21. That Wise one has entered me an ignorant [ man ], into whom the birds incessantly [ and ] knowingly carry portions of the ambrosia, [ and ] who is the lord [ and the ] preserver of all creation.

---

२१. या सूक्तांतील इतर मंत्रांप्रमाणें हाहि मंत्र निगूढार्थक आहे. सायणांप्रमाणें भावार्थ असा आहे कीं, 'ज्या आदित्याचे किरण पृथिवीवरील उदक बाष्परूपानें हरण करून नेहमी त्याजकडे, म्हणजे आदित्याकडेस, पोंहचवीत असतात, आणि जो आदित्य सकल जगाचा प्रभु आणि पालक होय, तो महापरमेश्वर आदित्य माझ्या आंगीं शिरून तेथें नियामक होऊन वास करीत आहे.'

'पक्षी '=' सुपर्णाः.' म्हणजे किरण. 'सुपर्ण 'शब्द याच अर्थी याच सूक्ताच्या ४७ व्या मंत्रांत योजिलेला आहे तो पहा. सूर्य, अग्नी वगैरे देवांच्या अश्वांस सुपर्ण हा शब्द वेदांत पुष्कळ ठिकाणीं लाविलेला आहे. आणि सूर्याचे 'पिवळे घोडे' (हरयः) म्हणजे तरी वस्तुतः त्याचे पिवळ्या रंगाचे किरणच होत.

'पोंहचवीत असतात '=' अभिस्वरन्ति.' हा अर्थ सायणांप्रमाणें दिला आहे, पण आम्हांस त्याविषयीं संशय नाहीं असें नाहीं. निर्वचनाकडे पाहिलें तर 'स्तवितात' असा अर्थ व्हावा; पण सायणांनी केलेला अर्थ केल्याशिवाय निर्वाह नाहीं असें दिसतें. या मंत्रावरूनहि सिद्ध होतें कीं, या सूक्तांत जो कोठें कोठें परमेश्वर सांगितला अथवा जाणविला आहे, तो आदित्यरूप होय, किंवा आदित्य हें ज्याचें एक रूप आहे तद्रूप होय. आणि हें योग्यच आहे. कारण कीं अतिप्राचीन काळीं आदित्य, अग्नि इत्यादिक जीं तेजें आणि महाभूतें, त्यांजवरूनच ईश्वराच्या रूपाचें थोडथोडें ज्ञान मनुष्यांस झालें. ईश्वराचें सकल स्वरूप एकदम समजण्यास मार्ग नव्हताच, आणि तें सगळें स्वरूप कोणासच प्रथम समजलें नसेल यांत संशय नाहीं.

यस्मिन्वृक्षे मध्वदः सुपर्णा निविशन्ते सुवते चाधि विश्वे ।
तस्येदाहुः पिप्पलं स्वाद्वग्रे तन्नोन्नशद्यः पितरं न वेद ॥ २२ ॥

यस्मिन् । वृक्षे । मधुऽअदः । सुऽपर्णाः । निऽविशन्ते । सुवते । च । अधि । विश्वे ।
तस्य । इत् । आहुः । पिप्पलम् । स्वादु । अग्रे । तत् । न । उत् । नशत् । यः । पितरम् । न । वेद ॥ २२ ॥

---

## भाषायाम्.

२२. यस्मिन् वृक्षे (=आदित्यरूपे) मध्वदः सुपर्णाः (=मधुराणि फलानि भक्षयन्तः पक्षिणो=रश्मयो) निविशन्ते (=प्रविशन्ति=रात्रौ स्वापं कुर्वन्ति) [ यस्मात्] अधि विश्वे सुवते च (=यस्माद्वृक्षात् विश्वस्मिन् जगति सकले भुवने बालान् जनयन्ति=प्रातःकाले पुनरपि सर्वत्र प्रकाशं कुर्वन्ति) तस्य इत् (=तस्यैव) पिप्पलं (=फलम्) अग्रे स्वादु आहुः (=सर्वेषु मध्ये स्वादिष्ठं वदन्ति) [ तत्त्वविदः ] । यः [ पुरुषः ] पितरं न वेद (=तमादित्यरूपं पितरं न जानाति) [ स ] तत् [ पिप्पलं ] न उत् नशत् (=तन्नैव प्राप्नोति) ॥

अत्र वृक्षस्वरूपकल्पना । अधिदैव आदित्यम् अध्यात्म आत्मानं च प्रशंसति । ... वृक्षे वृक्षवत्सर्वफलाश्रयभूते मध्वदः । मध्वित्युदकनाम । तददन्तीति मध्वद उदकस्याचारः सुपर्णाः सुपतना रश्मयः ...... न वेद । नोपास्ते । अध्यात्मपक्षे । यस्मिन् परमात्मनि वृक्षे वृक्षवद्भ्रमनादिरहितेऽविक्रिये सुपर्णाः ...... इन्द्रियाणि मध्वदः ... ज्ञानभाञ्जि ... । निविशन्ते स्वापकाले स्वस्वविषयेभ्यः प्रतिनिवृत्तान्यात्मनि वृत्त्या लीयन्ते । पुनः प्रबोधकालेऽधि विश्वे विश्वस्योपरि सुवते च । उद्यन्ति । स्वस्वविषयान् लभन्त इत्यर्थः । तस्य परमात्मनः पिप्पलं ...... अमृतत्वलक्षणं ज्ञानं...... । नोन्नशत् । न प्राप्नोति । आत्मानं यो वेद स एव तन्मोक्षफलं प्राप्नोतीत्यर्थः । इत्यादि सायणः ॥

२२. ज्या वृक्षाच्या ठायीं गोड फळें खाणारे पक्षी आश्रय करितात आणि जेथून ते सकळ विश्वावर पिलें घालितात, त्याचेंच फळ सर्वांपेक्षां गोड [ असें] म्हणतात. [ त्या] पित्याला जो जाणत नाहीं, त्याला तें फळ मिळत नाहीं.

22. They say the berry of that tree only is the sweetest of all, in which birds, eating sweet fruits, take shelter, and whence they spread their nests all over the world. He shall never attain that berry who does not know the Father.

---

२२. 'ज्या महापरमेश्वर आदित्याच्या ठायीं किरणरूप पक्षी रात्रीं निवास करितात, आणि जेथून ते पक्षी प्रातःकाळीं आपलीं प्रकाशरूप पिलें सर्व जगतांत पसरितात, त्याचेंच फळ अत्यंत मधुर होय असें म्हणतात. आणि हा वृक्ष म्हणजे सकळ विश्वाचा पिता होय हें ज्याणें जाणिलें नाहीं, त्याला तें अति गोड फळ मिळत नाहीं' असा भावार्थ आहे.

ह्याहि मंत्र सायणांनीं अध्यात्मपर लाविला आहे. (तो अर्थ भाषेखालीं पहा.) तसा अर्थ केला तर वृक्ष म्हणजे परमात्मा (ईश्वर), पक्षी म्हणजे इंद्रियें, गोड फळें म्हणजे ज्ञान, आश्रय करितात म्हणजे झोंपेच्या वेळीं आपआपल्या विषयांपासून निवृत्त होतात, पिलें घालतात म्हणजे प्रातःकाळीं उठतात, फळ म्हणजे संसारापासून परमात्म्याचें ज्ञान, इत्यादि अर्थ केला पाहिजे. कदाचित् असा द्विविध अर्थ ऋषीच्या मनांत विवक्षित नसेल असें म्हणवत नाहीं, कारण हें सूक्त सर्व गूढार्थक असून परमार्थज्ञानाविषयीं यांत जिकडे तिकडे अन्योक्ति विवक्षित अथवा जाणविलेल्या आहेत.

'पिलें घालितात'='सुवते.' म्हणजे प्रातःकाळीं उठून आपला प्रकाश जिकडे तिकडे पसरितात, असा भावार्थ सायण सांगतात तो घेतल्याशिवाय निर्वाह दिसत नाहीं.

वृत्तासाठीं 'मध्वदः'च्या जागीं 'मधुअदः' आणि 'स्वाद्वग्रे'च्या स्थळीं 'स्वादुअग्रे' असें म्हणावें लागतें.

यद्गा॒य॒त्रे अधि॑ गाय॒त्रमाहि॑तं॒ त्रैष्टु॑भाद्वा॒ त्रैष्टु॑भं नि॒रत॑क्षत ।
यद्वा॒ जग॒ज्जग॒त्याहि॑तं प॒दं य इत्तद्वि॒दुस्ते अ॑मृत॒त्वमा॑नशुः ॥२३॥
यत् । गा॒य॒त्रे । अधि॑ । गा॒य॒त्रम् । आऽहि॑तम् । त्रैस्तु॑भात् । वा॒ । त्रैस्तु॑-
भम् । निः॒ऽअत॑क्षत ।
यत् । वा॒ । जग॑त् । जग॑ति । आऽहि॑तम् । प॒दम् । ये । इत् । तत् ।
वि॒दुः । ते । अ॒मृ॒त॒ऽत्वम् । आ॒न॒शुः ॥ २३ ॥

## भाषायाम्.

२३. अत्राक्षरार्थः स्पष्ट एव । निगूढार्थस्तु सायणेनैवं दर्शितः । गायत्रे अधि गायत्रमाहितम् । प्राथम्यात्सर्वैः स्तुत्यत्वाच्च गायत्री भूः । तदीयं स्थानं गायत्रम् । अधि उपरि तत्र गायत्रमाग्नेयं पदमाहितम् । प्रथमसृष्टत्वात् गायति त्रायते च व्युत्पत्त्या च प्रजापतेर्मुखाद्गायत्र्या सहोत्पन्नत्वाद्वत्तयाग्निरपि गायत्रः । गायत्रोऽग्निरिति श्रुतेः । भूम्यामग्निः स्थापित इति यदस्ति । तथा त्रैष्टुभाद् द्वितीयत्वाद्वृष्टिपर्जन्यविद्युद्रूपत्रिस्तोभयुक्तादन्तरिक्षात् त्रैष्टुभं स्तोभयुक्तमूर्द्ध्वाधस्तिर्यग्लक्षणस्तोभत्रयोपेतं वायुं निरतक्षत । साधु संपादितवन्तो देवा इति यदस्ति । वा अथवा जगति सर्वैर्गन्तव्य उन्नततमे वा तृतीयभूते द्युलोके जगद्गमनशीलमादित्याख्यं पदमाहितमिति यदस्ति । तदिदं त्रिषु स्थानेषु त्रयाणामग्न्यादीनां पदाधानं य इत् य एव नरा विदुर्जानन्ति । त एवामृतत्वमानशुः । अमरणरूपं पदमाप्नुवन्तीत्यधिलोकम् ॥

इमामृचं सायणोधियज्ञमपि व्याचष्टे तद्व्याख्यानं तु ग्रन्थविस्तरभयान्नात्र लिख्यते ॥

२३. गायत्रावर जें गायत्र स्थापिलें आहे, अथवा त्रैष्टुभापासून जें त्रैष्टुभाला निर्माण केलें आहे, अथवा जागतावर जें जागत पद स्थापिलें आहे, तें ज्यांला समजलें तेच अमरत्वाप्रत पावतात.

23. Those only have attained to immortality who have known how it is that the seat of Agni has been placed on earth, that they made Vâyu (the Wind) from the sky, or that the seat of the Sun-god has been placed in the highest heaven.

---

२३. या मंत्राचा जो वर अर्थ दिला आहे तो केवळ शब्दशः आहे. त्याचा भावार्थ सायणांनीं दिला आहे त्याशिवाय दुसरा चांगला भावार्थ संभवत नाहीं असें आम्हांस वाटतें यास्तव तोच येथें उतरून घेतों: 'पृथिवीवर अग्नीला जें स्थापिलें आहे तें कसें; अथवा अंतरिक्षापासून जो वायु निर्माण केला आहे, तो कसा; अथवा अत्युच्च द्युलोकीं जो आदित्य परमेश्वर बसविला आहे तो कसा; हें सर्व ज्याला समजतें त्यालाच मृत्यूची भीति नाहीं आणि तोच अमरत्वाप्रत पावतो, दुसरा पावत नाहीं.'

यांत 'गायत्र,' 'त्रैष्टुभ' आणि 'जागत' हे जे तीन शब्द आहेत, त्यांजवर सर्व ऋचेचा अर्थ अवलंबून आहे. 'गायत्र' म्हणजे गायत्री वृत्तांत केलेलें स्तोत्र; तसेंच 'त्रैष्टुभ्' म्हणजे 'त्रिष्टुभ्' वृत्तांत केलेलें स्तोत्र; आणि 'जागत' म्हणजे 'जगती' नांवाच्या वृत्तांत रचिलेलें स्तोत्र. असे अक्षरशः अर्थ आहेत. तरी ते केवळ अक्षरशः अर्थ येथें कवीच्या मनांत विवक्षित नाहींत हें उघड आहे. तर भावार्थ काय आहे याविषयीं निश्चय कसा करावा? आम्हांस वाटतें कीं, अशा संबंधाच्या ज्या ऋचा, त्यांचा व्याख्यानपरंपरेनें पुरातन काळापासून आलेला जो अर्थ, तो घ्यावा. आतां 'गायत्र,' 'त्रैष्टुभ' आणि 'जागत' यांचे साधारण अर्थ वेगळेच असतां सायणांनीं केलेले अर्थ कसे होतील, याविषयीं जरी त्यांनीं सांगितलेल्या उपपत्तीवरून समाधान कदाचित् होणार नाहीं, तथापि त्यांनीं सांगितलेले अर्थ होत असतील असें समजण्यास कांहीं अडचण नाहीं. आणि त्यांनीं केलेला अर्थ केवळ युक्तिबद्ध अथवा काल्पनिक नसून व्याख्यानपरंपरागत पुरातन आहे.

या मंत्रांत 'गायत्र,' 'त्रैष्टुभ' आणि 'जागत' अथवा 'जगत्' यांचे द्विविध अर्थ होतात त्यांविषयीं श्लेषालंकार कवीनें केला आहे हें उघड आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'जगति आहितं,' असें म्हणावें; आणि चवथ्या

गायत्रेण प्रति मिमीते अर्कमर्केण साम त्रैष्टुभेन वाकम् ।
वाकेन वाकं द्विपदा चतुष्पदाक्षरेण मिमते सप्त वाणीः ॥ २४ ॥

गायत्रेण । प्रति । मिमीते । अर्कम् । अर्केण । साम । त्रैस्तुभेन । वाकम् ।
वाकेन । वाकम् । द्विऽपदा । चतुःऽपदा । अक्षरेण । मिमते । सप्त । वाणीः ॥ २४ ॥

---

### भाषायाम्.

२४. गायत्रेण [छन्दसा] अर्कं प्रति मिमीते (=प्रतिमन्त्रं परिच्छिनत्ति=निर्मिमीते कविः)। अर्केण (=अर्कैः) साम (=गायत्ररथंतरसंज्ञकं) [निर्मिमीते]। त्रैष्टुभेन (=त्रिष्टुप्छन्दसा) वाकं (=वाकं नाम छन्दो) [निर्मिमीते]। द्विपदा चतुष्पदा [वा] वाकेन (=पादद्वयबद्धविराडादिच्छन्दोरूपेण पादचतुष्टयबद्धानुष्टुभादिच्छन्दोरूपेण वा वाकेन) वाकम् (=अनुवाकं) [निर्मिमीते]। अक्षरेण (=अक्षरैः) सप्त वाणीः (=सप्त छन्दांसि) मिमते (=निर्मिमते) ॥

सायण इमामेवं व्याचष्टे। गायत्रेण गायत्रच्छन्दसार्कमर्चनसाधनं मन्त्रं प्रति मिमीते। प्रत्येकं परिच्छिनत्ति। अर्को मन्त्रो भवति यदेनेनार्चन्तीति निरुक्तम् ॥ प्रतिमन्त्रं गायत्रेण छन्दसोपनिबद्धं करोति। उपलक्षणमेतदन्येषां छन्दसाम्। यद्वेतरेषां छन्दसामस्यैव चतुश्चतुरक्षराधिक्येन तत्तच्छन्दोभिः प्रतिमिमीत इत्यर्थः। यद्वा प्रतिशब्दः समित्येतस्मिन्नर्थे। छन्दोभिर्मन्त्रान् संमितं करोतीत्यर्थः। अर्केण साम उक्तलक्षणेन मन्त्रेण साम गायत्ररथंतरसंज्ञकं साम प्रतिमिमीते। ...... त्रैष्टुभेन वाकम्। अत्र त्रिष्टुबुपादानमितरच्छन्दःप्रदर्शनार्थम्। अथवा अनादेशे सर्वत्र त्रिष्टुभो ग्रहणात्प्राचुर्याभिप्रायेणेदमुक्तम्। त्रैष्टुभेन द्विवारत्रिवारावृत्तेन द्वृचतृचरूपं वाकं वक्तव्यमेकैकं छन्दः प्रतिमिमीते। अथवा वाकं सूक्तमेतावतीभिस्त्रिष्टुब्भिरुपनिबद्धमिदं सूक्तमिति। तादृशेन वाकेन वाकं वाकवर्गमनुवाकं वा मिमीते। कीदृशेन वाकेनेति स विशेष्यते। द्विपदा चतुष्पदा। पादद्वयबद्धविराडादिच्छन्दोनिबद्धमन्त्ररूपेण चतुष्पदा पादचतुष्टयोपेतेनानुष्टुबादिमन्त्ररूपेणेति। इयतीभिर्द्विपदाभिर्वर्गः इयतीभिश्चतुष्पदाभिरुपेतो वर्गः। इयद्द्विपदरूपैर्वाकैः इयच्चतुष्पदरूपैर्वाकैश्च परिमितोऽनुवाक इति। सूक्तपक्ष एतावद्भिः सूक्तैरयमनुवाक इति। किं चाक्षरेणाक्षरेणैव सप्त वाणीर्वाग्धिष्ठितानि सप्त च्छन्दांसि मिमते। निर्माणं कुर्वन्ति। अष्टाक्षरा गायत्री एका-

२४. गायत्र वृत्ताच्या योगानें अर्क रचितात, अर्काच्या योगानें साम [रचितात]. त्रिष्टुभ् वृत्ताच्या योगानें वाक [रचितात]. द्विपाद् [ अथवा ] चतुष्पाद् वाकाच्या योगानें [अनु]वाक [ रचितात ]. अक्षरांच्या योगानें सप्त वृत्तें निर्माण करितात.

24. [ A poet ] composes an *Arka* by means of the *Gâyatra* metre, a *Sâman* by means of an *Arka*, [and] a *Vâka* by means of the *Trishṭubh* metre; [ composes]an *Anuvâka* by means of a two-footed or four-footed *Vâka*. By means of syllables they compose the seven metres.

---

चरणांत बारा अक्षरें असावीं त्याजबद्दल तेरा आहेत तीं ' ते अमृतत्वम् 'च्या स्थळीं ' तेऽमृतत्वम् ' असें वाचल्यानें बारा होतील.

---

२४. या ऋचेंत कांहीं गूढार्थ दिसत नाहीं. यांत केवळ कितीएक वृत्तांची अथवा स्तोत्रप्रकारांची उत्पत्ति सांगितली आहे. ' गायत्री नांवाचें जें वृत्त, त्याजपासून सर्व छन्दांची उत्पत्ति आहे; कारण त्याला चार चार अक्षरें जोडीत गेलें म्हणजे दुसरीं वृत्तें ( अर्काः ) निर्माण होतात. तीन अर्क म्हटले म्हणजे साम होतें. त्रिष्टुभ् वृत्ताच्या योगानें वाक होतो. वाक म्हणजे ज्यांत दोनच अथवा तीनच त्रिष्टुभ् वृत्ताच्या ऋचा असतात असें सूक्त. कितीएक वाक ज्यांत असतात अशा वर्गाला अनुवाक म्हणतात. आणि सात जीं मुख्य वृत्तें तीं अक्षरांच्या योगानें होतात. '

' अर्क ' म्हणजे साधारण कोणताहि मंत्र होय असें सायण म्हणतात. परंतु कांहीं तरी विशेष अर्थ असावा.

' साम. ' म्हणजे, तीन तीन ऋच मिळून एक एक साम होत असतें.

' सप्त वृत्तें '=' सप्त वाणीः. ' म्हणजे गायत्री, अनुष्टुभ्, त्रिष्टुभ्, जगती, इत्यादि सात वृत्तें. सप्त वाणीः हे शब्द वेदांत आणखी कितीएक मंत्रांत आलेले आहेत, तेथें सायण ' सप्त नद्या ' म्हणजे अंतरिक्षांतील मेघोदकरूप नद्या असा अर्थ करितात.

वृत्तासाठीं 'चतुष्पदा। अक्षरेण' असें संधिविरहित वाचलें पाहिजे.

जग॑ता॒ सिन्धुं॑ दि॒व्य॑स्तभायद्रथन्त॒रे सूर्यं॒ पर्य॑पश्यत् ।
गा॒य॒त्रस्य॑ स॒मिध॑स्ति॒स्र आ॑हु॒स्ततो॑ म॒ह्ना प्र रि॑रिचे महि॒त्वा ॥
॥ २५ ॥ १८ ॥

जग॑ता । सिन्धु॑म् । दि॒वि । अ॒स्त॒भा॒य॒त् । र॒थ॒म्ऽत॒रे । सूर्य॑म् । परि॑ ।
अ॒प॒श्य॒त् ।
गा॒य॒त्रस्य॑ । स॒म्ऽइधः॑ । ति॒स्रः । आ॒हुः॒ । ततः॑ । म॒ह्ना । प्र । रि॒रि॒चे॒ ।
म॒हि॒ऽत्वा ॥ २९ ॥ १८ ॥

---

दशाक्षरा त्रिष्टुभ् द्वादशाक्षरा जगतीति । अक्षरैः पादाः परिमीयन्ते । परिमितैः पादैश्छन्दांसि । ततः पादानां छन्दसामक्षरं मूलमिति । तथा ऋग्वर्गसूक्तानुवाकादीनां चाक्षरं मूलमित्यक्षरप्रशंसा । इति ॥

---

## भाषायाम्.

२५. [ प्रजापतिर् ] जगता (=जागतेन साम्ना ) सिन्धुं (=समुद्रम्=अन्तरिक्षं ) दिवि (=द्युलोके ) अस्तभायत् (=स्तम्भितवान्=ततो यथा न पतति तथाकरोत् ) । रथंतरे (=" एतन्नामके साम्नि स्तम्भितं ") सूर्यं पर्यपश्यत् (=परिदृष्टवान् ) । गायत्रस्य (=गायत्र्या उत्पन्नस्य साम्नस् ) तिस्रः समिधः (=तिस्रः प्रकाशिकास्तनूः) आहुः (=कथयन्ति तत्त्वविदः ) । ततः (=अतो हेतोस् ) [ तद् गायत्रं साम ] मह्ना महित्वा (=बलेन महत्त्वेन च ) प्र रिरिचे (=इतरेभ्यः सामभ्यः प्ररिक्तमधिकं भवति ) ॥

जगतीच्छन्दस्कायामृच्युत्पन्नं साम जगत् । ...... सिन्धुं ...... आदित्यं दिवि द्युलोकेऽस्तभायत् स्तम्भितवान् । जागतो वा एष य एष तपतीति श्रुतिः । रथंतर एतन्नामके साम्नि स्तम्भितं सूर्यं पर्यपश्यत् । परिदृष्टवान् प्रजापतिः । तदाधारभूतायामृचि । ऋ. ७. ३२. २२. । स्वर्दृशमिति सूर्यप्रतिपादकशब्ददर्शनात् । असौ वाव स्वर्दृगिति हि श्रुतिः । अत एव तत्र सूर्यदर्शनं विधीयते रथंतरे प्रस्तूयमाने संमीलयेत् । स्वर्दृशं प्रति वीक्षेतेति सामब्राह्मणेन '। ...... समिधः समिन्धानास्तिस्रो विभक्तीराहुः ।'पादत्रयमाहुरित्यर्थः । अथवा तिस्र ऋच आहुः । इत्यादि सायणः ॥

२५. जागत [सामा]च्या योगेंकरून सिंधूला द्युलोकीं धारण करिता झाला. रथंतरावर सूर्याला पाहता झाला. गायत्र [सामा]च्या तीन प्रभा [ आहेत असें ] म्हणतात. तेणेंकरून त्याचें बळ आणि मोठेपण हीं अधिक होत.

25. He upheld the ocean in the heaven by means of a hymn in the *Jagatî* metre, [and] beheld the sun in the *Rathantara* hymn. They say there are three flames of the *Gâyatra* hymn: through this it excels [ the others ] in power and greatness.

---

२५. या ऋचेंत निरनिराळ्या सामाचीं सामर्थ्यें सांगितलीं आहेत. ' जगती छंदानें केलेलें जें साम, तेणेंकरून द्युलोकांत अंतरिक्षाला धारण केलें, आणि ' रथंतर ' म्हणून जें साम, त्याच्या योगेंकरून सूर्याला अंतराळीं धरितां आलें. या दोन्ही सामांपेक्षां गायत्री छंदांत केलेल्या सामाची योग्यता मोठी आहे, आणि त्याचें बळ आणि माहात्म्य हीं श्रेष्ठ आहेत, कारण त्याचे तीन भाग असतात. '

' धारण करिता झाला '=' अस्तभायत्. ' ह्याचा कर्ता सांगितलेला नाहीं, पण सायणाचार्य ' प्रजापति ' असें म्हणतात, तसें घ्यावें; अथवा उपासक अथवा जागत साम म्हणणारा असें अध्याहृत घ्यावें.

' सिंधूला '=' सिन्धुम्. ' म्हणजे ज्या भागांत वरुण राहतो तो अंतरिक्षाचा भाग. सायणाचार्य ' आदित्याला ' असें म्हणतात. आदित्य ज्यांत असतो, त्या लोकाला असा जर सायणांचा भावार्थ असेल. तर त्यांचा अर्थ घेण्यास कांहीं अडचण नाहीं. नाहीं तर 'सिन्धु' शब्दाचा अर्थ ' आदित्य ' म्हणजे ' सूर्याभिमानी देव, ' असा अर्थ करणें कठिण होईल.

' रथंतरावर '=' रथंतरे. ' म्हणजे रथंतर या नांवाच्या सामावर सूर्याला बसविता झाला. म्हणजे ' रथंतर ' म्हटलें जातें म्हणून सूर्य अंतराळीं सुरक्षित राहतो. ' रथंतर ' हें एक प्रकारच्या सामाचें नांव आहे. रथंतर हें नांव पडण्याचें कारण सायणांनीं ऋ. १०. १८१. १ याजवरील भाष्यात असें सांगितलें आहे कीं, तें साम म्हटलें म्हणजे ज्या देवतेला अनुलक्षून तें म्हणावें तिच्या रथाला वेग येतो म्हणून ' रथंतर', ( रथंतरं रथरंहःसाधनं साम तद्रथंतरम् ). आणि त्याच मंत्रांत वसिष्ठकुळांतील प्रथ नांवाचा ऋषि म्हणतो कीं, रथंतर हें साम प्रथम वसिष्ठानें सवित्या देवाकडून आणिलें; म्हणजे, तें रचण्याची युक्ति प्रथम वसिष्ठाला समजली.

वृत्तानुरोधेंकरून ' दिवि अस्तभायत्' आणि ' सूरिअम् ' असें म्हणावें लागतें.

उप ह्वये सुदुघां धेनुमेतां सुहस्तो गोधुगुत दोहदेनाम् ।
श्रेष्ठं सवं सविता साविषन्नोऽभीद्धो घर्मस्तदु षु प्र वोचम् ॥२६

उप । ह्वये । सुऽदुघाम् । धेनुम् । एताम् । सुऽहस्तः । गोऽधुक् । उत ।
दोहत् । एनाम् ।
श्रेष्ठम् । सवम् । सविता । साविषत् । नः । अभिऽइद्धः । घर्मः । तत् ।
ऊं इति । सु । प्र । वोचम् ॥ २६ ॥

---

## भाषायाम्.

२६. [अहं] सुदुघां (=सुष्ठु दोग्ध्रीम्) एताम् (=?उषोरूपां) धेनुं (=गाम्) उप ह्वये (=आह्वयामि)। उत (=अपि च) सुहस्तो गोधुक् (=शोभनहस्तो गोदोग्धा=कुशलो दोहनकर्ता=ईदृश्या गोर्दोहनस्य ज्ञाता) एतां दोहत् (=एतां दोग्धुं शक्नोति=दोग्धि)। [अपि च] सविता (=उषसः पश्चादागन्ता देवः) श्रेष्ठं सवं नः साविषत् (=श्रेष्ठं स्वकीयं प्रसवम् अस्मदर्थमनुजानातु=अस्मदर्थं स्वकीयैः सर्वैस्तेजोभिः सह उदेतु)। [तस्य] घर्मः (=प्रतापः) अभीद्धः (=अस्मदाभिमुख्येन दीप्तो) [भवतु]। [अहं हि] तदु (=तदेव वस्तु) सु प्र वोचं (=सुष्ठु प्रकर्षेण वक्तुं शक्नोमि=प्रवक्तुमिच्छामि=कथयिष्यामि सूक्तैः) ॥

२६. ही जी पुष्कळ दूध देणारी गाय, तिला मी बोलावितों, आणि तिची धार कुशळ धारकाढ्या काढितो. सविता आम्हांसाठीं आपल्या श्रेष्ठ प्रसवाप्रत पावो. त्याची प्रभा प्रदीप्त [ होओ ]. त्याचेंच मी उत्तम प्रकारेंकरून यश गावयाला इच्छितों.

26. I call this cow which gives much milk. And the skilful milker has milked her. May Savitâ exhibit his best birth for us, [ may ] his effulgence [be] brightened. And let me sing that alone.

२६. आम्हांस वाटतें कीं ही ऋचा, उषा जी तीच कोणी एक गाय असें समजून तिजविषयींची समजावयाची आहे. 'ही जी उषोरूप पुष्कळ दूध देणारी गाय, तिला मी बोलावीत आहें. या गाईचें दूध कसें काढावें हें ज्यांला समजतें असे जे कुशळ पुरुष, ते तिचें दूध काढूं शकतात; म्हणजे तिजपासून धनादिकाचा लाभ करून कसा घ्यावा तें कितीएक कुशळ उपासकांला समजतें, आणि ते तसा लाभ करून घेतात. ही उषा उगवून गेल्यावर सविता देव आपल्या मोठ्या वैभवासहित उगवो आणि त्याची प्रभा जिकडे तिकडे पसरो. कारण कीं, त्याचें यश गाण्याविषयीं मी उत्सुक आहें, दुसऱ्या कशाचेंच यश गाणें मला आवडत नाहीं.'

'पुष्कळ दूध देणारी'=‘सुदुघाम्.' अक्षरशः 'सहज दूध देणारी,' म्हणजे लाथा न मारणारी, लवकर पान्हा सोडणारी. उषेला गाय असें वेदांत पुष्कळ ठिकाणीं म्हटलें आहे ( सू. ९२ मं. १), आणि तिचें दूध म्हणजे तिणें प्राप्त करून दिलेलें धन होय.

या सर्व सूक्ताबरोबर ही ऋचाहि, शांतिसूक्त, दुष्टजननशांति, वामनसूक्त इत्यादिकांत म्हणतात, ( पहिल्या मंत्रावरील टीप पहा ). पण त्याशिवाय श्राद्धांत अन्नस्तुति म्हणून जो भाग असतो त्यांतहि ही ऋचा म्हणत असतात; म्हणजे, ब्राह्मणांस भोजन घालून, ते जेऊं लागले म्हणजे, अन्नाची प्रशंसा करिते वेळीं म्हणतात. त्याचें कारण असें दिसतें कीं, यांत 'गोधुक्' शब्द आला आहे, आणि त्यावरून गोधूमाची ( गव्हांची ) स्तुति केल्यासारिखी होईल असें वाटून हा मंत्र लावून दिला असावा. कारण 'गोधूम' शब्द ऋग्वेदांत येत नाहीं. आणि 'सुदुघां,' 'धेनुम्,' 'दोहत्' आणि 'घर्म' हे शब्द आले आहेत, यांवरून हा मंत्र गाईच्या दुधाचा जो पायस त्याविषयीं असेल असें वाटल्यावरून याची योजना या श्राद्धप्रसंगीं केली असावी. कारण श्राद्धांत पा-

हिङ्कृण्वती वसुपत्नी वसूनां वत्समिच्छन्ती मनसाभ्यागात् ।
दुहामश्विभ्यां पयो अघ्न्येयं सा वर्धतां महते सौभगाय ॥ २७ ॥

हिङ्ऽकृण्वती । वसुऽपत्नी । वसूनाम् । वत्सम् । इच्छन्ती । मनसा । अभि । आ । अगात् ।
दुहाम् । अश्विऽभ्याम् । पयः । अघ्न्या । इयम् । सा । वर्धताम् । महते । सौभगाय ॥ २७ ॥

## भाषायाम्.

२७. हिङ्कृण्वती ( =हिङ्कारं कुर्वती ) वत्सं ( =स्ववत्सं सवितारं ) मनसा इच्छन्ती ( =औत्सुक्येन वाञ्छन्ती ) वसूनां वसुपत्नी ( =धनानां स्वामिनी ) [ सा ] अभि आ अगात् ( =आभिमुख्येन आगच्छति ) । इयम् अघ्न्या (=गौः) अश्विभ्याम् ( =अश्विदेवाभ्यां सहागत्य ) पयो दुहां (=पयो दुग्धां=क्षीरं क्षारयतु ) । सा [उषोरूपा गौः] महते सौभगाय ( =बृहते सौभाग्याय=महद्भाग्यं वयं यथा लभेमहि तथा ) वर्धतां ( =प्रवृद्धा भवतु=उत्कर्षमेतु ) ॥

सायण इमां लौकिकगोपरं व्याख्याय, अश्विभ्यां ताभ्यामर्थाय पयः क्षीरं दुहाम् । दुग्धाम् । इति विवृत्य च अत्रापि वृष्टिपरत्वेन यथायोगं योज्यमित्याह । तच्चैवम् । हिङ्कृण्वती वर्षणाय शब्दयन्ती वसूनां गोसस्यादिधनानां बहूनां वसुपत्नी तेषामेव पालयित्री वत्सं लोकं वत्सवत्पोषणीयं मनसेच्छन्ती प्रीणयितुमभ्यागात् । अभिगच्छति मेघरूपा । सा चाघ्याहन्तव्या । प्रस्तुतेत्यर्थः । पय उदकमश्विभ्यां व्याप्ताभ्यां स्थावरजङ्गमाभ्यामर्थाय । यद्वा अश्विनौ वाय्वादित्यौ । ताभ्यां सकाशाद्दुहाम् । दुग्धाम् । तौ हि वृष्टेर्मोचयितारौ । इति ॥

यस अवश्य आहे इतकेंच नव्हे, पण अजूनहि तो पात्रांवर प्रथम वाढण्याची चाल आहे. आणि तो पायस वाढतांनाच हा मंत्र म्हणतात.

वृत्तासाठीं ‘ साविषन्नो । अभीक्रो ’ असें म्हणावें.

२७. धनांची धनीन अशी जी ही गाय, ती [ आपल्या ] वासराची उत्कंठेनें आठवण करून हंबरडा फोडीत येत आहे. ही गाय अश्वींसहित [ येऊन] दुधाचा पान्हा सोडो. [आणि] तिचा मोठ्या सौभाग्याकरितां उत्कर्ष होओ.

27. Mistress of all blessings, she comes anxiously desiring her calf, [and] lowing. May this cow give milk, [ coming ] with the As'vins. May she be glorious for great good fortune [ to us ].

२७. वरच्या प्रमाणें हीहि ऋचा उषा हीच जी कोणी एक गाय, तिजविषयीं समजून लाविली पाहिजे. ' ही पहा उषोरूप गाय आपल्या सूर्यरूप वत्साची आठवण करून त्याच्यासाठीं हंबरत हंबरत येत आहे. ही सकळ धनांची धनीन, अश्वींसहित येऊन आम्हांस दूध देओ. हिचा उत्कर्ष होओ, आणि तेणेंकरून आमचें मोठें कल्याण होओ,'. असा भावार्थ.

' अश्वींसहित [ येऊन ] '='अश्विभ्याम्.' सविता आणि उषा हे जसे मोठ्या पहांटेस येणारे देव होत, तसेच अश्वीहि पहांटेस रथांत बसून येणारे आहेत, म्हणून उषोरूप गाईनें अश्वींसहित येऊन दूध द्यावें, असें ऋषि म्हणतो.

' वासराची '=' वत्सम्. ' सूर्य अथवा सविता हा उषेचा पुत्र अथवा वत्स होय असें सांगितलें आहे. तो उषेबरोबर येत नाहीं. तिच्या मागून येतो म्हणून ती त्याजकरितां हंबरते असा अर्थ.

विवाहांत ' आयुःसूक्त ' म्हणून जें म्हणतात, त्यांत आणि वाग्दानांत हा मंत्र म्हणतात; कारण यांत ' सौभगाय ' हा शुभसूचक शब्द आला आहे !

वृत्तासाठीं दुसऱ्या चरणांत ' मनसाभि आगात् , ' आणि तिसऱ्यांत ' अघ्नियेयं ' असें वाचावें.

गौरमीमेदनु वत्सं मिषन्तं मूर्धानं हिङ्ङकृणोन्मातवा उं ।
सृक्वाणं घर्ममभि वावशाना मिमाति मायुं पयते पयोभिः ॥२८ ॥
गौः । अमीमेत् । अनु । वत्सम् । मिषन्तम् । मूर्धानम् । हिङ् । अकृणोत् । मातवै । ऊं इति ।
सृक्वाणम् । घर्मम् । अभि । वावशाना । मिमाति । मायुम् । पयते । पयःऽभिः ॥ २८ ॥

## भाषायाम्.

२८. मिषन्तं (=निमीलिताक्षं) वत्सं (=सवितृरूपम्) अनु[लक्ष्य] गौः (=उषोरूपा) अमीमेत् (=शब्दं करोति)। उ (=उत=अपि च) मूर्धानं (=वत्सशिरो) मातवै (="लेहनेन शोधयितुं") हिङ् अकृणोत् (=हिङ्कारमकरोत्=हिङ्कारं करोति=हिङ्कारं कृत्वा वत्समूर्धानं लेढि)। घर्मं सृक्वाणं (=? क्षीरस्य सर्जयितारं वत्सम्) अभि[लक्ष्य] वावशाना (=भृशं कामयमाना=महता कामेन हम्बारवं कुर्वती) मायुं मिमाति (=शब्दं शब्दयति=शब्दं करोति) [अपि च] पयोभिः पयते (=क्षीरैः पुष्टा पूर्णा भवति)॥

अत्र सायणः। गौर्धेनुर्मिषन्तं निमीलिताक्षं वत्समनु प्राप्यामीमेत्। शब्दं करोति। मीमयतिः शब्दकर्मा॥ यद्वा उक्तं वत्समनु आत्मानं प्रक्षिपति। किं च तस्य वत्सस्य मूर्धानं मातवै मातुं निर्मातुं लेहनेन शोधयितुम्। उशब्दोऽवधारणे। हिङ्ङकृणोत्। हिङ्कारमकरोत् करोति। किं च सृक्वाणं वत्सस्य शब्दवदनप्रान्तं फेनस्य स्रष्टारं घर्मं क्षीरस्य क्षरणशीलं वत्समभि अभिलक्ष्य वावशाना भृशं कामयमाना मायुं शब्दं मिमाति। निर्मीति। करोति। तादृशी सती पयोभिः प्रभूतैः क्षीरैः पयते। प्यायते। आप्यायनं करोति वत्सम्। अत्रापि मेघपरतया योजनीयम्। एवमाहूता मेघरूपा गौर्धेनुर्मिषन्तं वृष्टिरूपक्षीराभावेन निमीलिताक्षलोकाख्यं पुत्रमनु अनुसृत्यामीमेत्। गर्जनशब्दं वर्षणचिह्नरूपं करोति। मूर्धस्थानीयां भूमिं मातवा उ निर्मातुमेव सस्यादियुक्तां कर्तुं हिङ्ङकृणोत्। हिङ्काररूपं शब्दमकरोत्। प्रतिपादनभेदादपुनरुक्तिः। किं च सृक्वाणं फलस्य स्रष्टारं घर्मं दीप्तं पुत्रमभि वावशानाभिमुख्येन कामयमाना पयोभिरुदकैः पयते। प्यायते। आप्यायनं करोति। इति॥

२८. डोळे झांकलेल्या वत्साकडेस पाहून गाय हंबरते, [आणि] त्याच्या डोक्याला हंबारून चाटते. ती मोठ्यानें हंबरडा फोडून पान्हा सोडविणाऱ्या [ वत्सा]कडे पाहून ओरडते. ती दुधाच्या पान्ह्यानें भरून जाते.

28. The cow lows towards her calf that has still his eyes closed, and cries and licks his head. Greatly lowing at the sight of the calf that makes the milk flow, she raises a cry. She is distended with milk.

२८. यांतहि उषा हीच गाय आणि सूर्य हाच वत्स असें समजावयाचें; आणि 'पहांट असतां उषा येते आणि सूर्यरूप वत्स अजून डोळे झांकून निजला आहे (म्हणजे अजून उगवला नाहीं) असें पाहून ओरडते आणि ओरडून त्याचें डोकें जणुं चाटते; आणि त्याला पाहिल्याबरोबर आपल्या आंगीं पान्हा फुटला असें पाहून मोठ्यानें हंबरडा फोडिते, आणि पान्ह्यानें तटतटून उभी राहते,' असा अभिप्राय समजावयाचा आहे.

पण, वरचे दोन मंत्र आणि त्याप्रमाणेंच हाहि सायणांनीं असा लाविला आहे कीं, गाय म्हणजे 'माध्यमिका वाक्' (म्हणजे अंतरिक्षांत होणारी मेघगर्जना), आणि 'वत्स' म्हणजे मेघोदकसमूह (म्हणजे मेघरूपानें जो उदकाचा संचय अंतरिक्षांत जमून राहतो, तो). असा भावार्थ नसेल असें सिद्ध करण्यास विशेष प्रमाणें नाहींत.

'पान्हा सोडविणाऱ्या [वत्सा]कडे पाहून'= 'घर्मं सृक्वाणम् अभि.' हे दोन शब्द कठिण आहेत. 'घर्म' म्हणजे ऊनऊन दुधाचा केलेला पायस (ज्याला अभिवर्ग्य असें म्हणत); त्यावरून कासेमधून वाहणारें ऊनऊन ताजें दूध, असा अर्थ आम्ही घेतला आहे. 'सृक्वन्' शब्द तर पुनः आलेला नाहीं; पण सायणांनीं 'सृज्'धातु सुचविल्याप्रमाणें आम्हीं त्याजपासून व्युत्पत्ति समजून निर्वाह केला आहे.

'भरून जाते'=' पयते.' 'पुष्ट करिते' (वत्साला). असा अर्थ सायणांनीं केलेला संभवतो.

वास्तुशांतीच्या वेळीं वगैरे 'सवत्स गोदान' म्हणजे जिला वासरूं आहे अशा गाईचें दान देतात त्या वेळीं ही ऋचा म्हणत असतात. पण याचें कारण इतकेंच कीं, यांत 'गौः' (गाय) आणि 'वत्सं' (वासरूं) हे शब्द आले आहेत।

अयं स शिङ्क्ते येन गौरभीवृता मिमाति मायुं ध्वसनावधि श्रिता।
सा चित्तिभिर्नि हि चकार मर्त्यं विद्युद्भवन्ती प्रति वव्रिमौहत २९

अयम्। सः। शिङ्क्ते। येन। गौः। अभिऽवृता। मिमाति। मा-
युम्। ध्वसनौ। अधि। श्रिता।
सा। चित्तिऽभिः। नि। हि। चकार। मर्त्यम्। विऽद्युत्। भवन्ती।
प्रति। वव्रिम्। औहत॥ २९॥

अनच्छये तुरगातु जीवमेजद्ध्रुवं मध्य आ पस्त्यानाम्।
जीवो मृतस्य चरति स्वधाभिरमर्त्यो मर्त्येना सयोनिः॥३०॥१९॥

अनत्। शये। तुरऽगातु। जीवम्। एजत्। ध्रुवम्। मध्ये। आ।
पस्त्यानाम्।
जीवः। मृतस्य। चरति। स्वधाभिः। अमर्त्यः। मर्त्येन। सऽयोनिः॥
॥ ३०॥ १९॥

---

## भाषायाम्.

२९. अयं (=पुरो दृश्यमानः) स [वत्सः] शिङ्क्ते (=अव्यक्तध्वनिं करोति)। येन [वत्सेन] अभीवृता (=वेष्टिता) गौः ध्वसनौ अधि (=गवां निवासाश्रये) श्रिता (=स्थिता) [सती] मायुं मिमाति (=शब्दं शब्दयति=शब्दं करोति=उच्चैर्हम्बारवं करोति)। सा [गौश्] चित्तिभिः (=स्तनपानादिस्नेहकर्मभिः) मर्त्यं नि हि चकार (=मनुष्यं नीचैः करोति=मनुष्येभ्योपि स्नेहातिशयं करोति)। [सा] विद्युत् भवन्ती (=विद्युद्रूपेणाविर्भवन्ती) वव्रिं प्रत्यौहत (=रूपं प्रकाशयति)॥

३०. तुरगातु (=तूर्णगमनम्=आशुगमनं) जीवं (=जीवत्) एजत् (=चञ्चलं) [वस्तु=जीवात्मरूपं] ध्रुवम् (=अचलम्) अनत् (=प्राणनं कुर्वत्) पस्त्यानां मध्ये आ (=गृहाणां मध्ये शरीररूपे गृहे) शये (=शेते=सुप्तवदास्ते)। जीवः (=जीवनात्मा) मृतस्य स्वधाभिः (=मृतसदृशस्य जडस्य बलैः=इन्द्रियैश्) चरति (=गच्छति)। अमर्त्यः (=परमात्मा) मर्त्येन सयोनिः (=मर्त्येन शरीरेण सह समान[illegible]=समाने जडशरीरे स्थितः=अमर्त्यं आत्मा मर्त्ये शरीरं चैकत्रैव तिष्ठतः)। [illegible]स्त्वन्यथा। तदेवम्। अनत् प्राणनं कुर्वत् जीवं जीवनवत्तुरगातु स्वव्यापा[illegible] तूर्णगमनं सदेजच्छये। शेते वर्तते। पश्चात् प्राणायामानन्तरमुक्तं[illegible] सत्

२९. हा पहा तो [ वत्स ] ओरडत आहे; आणि त्याणें वेष्टिलेली [ अशी जी ] गाय, [ ती ] दावणींत उभी राहून हंबरडा फोडीत आहे. ती मायेनें मनुष्याला पाठीमागें टाकिते. [ ती ] वीज होऊन [ आपलें ] रूप प्रगट करिते.

29. Here he is panting [ for her ]. And surrounded by him the cow, which has taken her stand in the cow-fold, is lowing. With her acts of kindness she has excelled human beings. She becomes lightning and manifests her form.

३०. चंचळ, जीवंत [आणि] उगीच न बसणारी अशी जी वस्तु, ती श्वासोच्छ्वसन करीत घराच्या मध्यभागीं निश्चल पडून राहते. जीवंत पदार्थ मेलेल्याच्या बळेंकरून चालतो. अमर्त्य आणि मर्त्य एकाच ठिकाणीं [ राहतात ].

30. That which is quick, living [ and ] moving lies breathing in the centre of the house, motionless. That which is living goes by the force of that which is dead : the immortal in the same place as the mortal.

---

२९. हाहि मंत्र, गाईविषयीं आणि वत्साविषयीं आहे. पण गाय म्हणजे कोण आणि वासरूं म्हणजे कोण, याविषयींच संशय आहे. सायणाचार्य प्रथम लौकिक गाय आणि तिचा वत्स यांविषयीं घेऊन, नंतर गाय म्हणजे माध्यमिका वाक् ( अंतरिक्षांतील गर्जना ) इची देवता, आणि वत्स म्हणजे मेघ अथवा मेघरूपानें अंतरिक्षांत असलेला उदकसंचय, ' हंबरडा फोडीत आहे ' म्हणजे मेघगर्जनेच्या वेळीं जो गंभीर नाद होतो तो, इत्यादि व्याख्यान करितात.

गाय म्हणजे उषा आणि वत्स म्हणजे सूर्य असा अर्थ घेतला तरी लागेलच. तसें केलें तर वत्स गाईकरितां आणि गाय वत्साकरितां ओरडत आहे अशी कवीप्रमाणें कल्पना केली पाहिजे. आणि उषा हीच वीज होते असें कल्पणें यांत विशेष नवल नाहीं.

या ऋचेचें वृत्त जगती आहे. तिसऱ्या पादांत ' मर्तिअम् ' असें वाचावें.

३०. ही ऋचा, मनुष्य जो मर्त्य आणि त्याचा अमर आत्मा त्या दोघांविषयीं आहे. 'मनुष्याचा आत्मा चपलगामी, जीवंत, आणि सदैव चंचल असा असतांहि, या शरीररूप वाड्याच्या मध्यभागीं श्वासोच्छ्वास करीत निश्चल होऊन पडलेला आहे. आणि जोंपर्यंत तो शरीरा-

अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम् ।
स सध्रीचीः स विषूचीर्वसान आ वरीवर्ति भुवनेष्वन्तः ॥३१॥
अपश्यम् । गोपाम् । अनिऽपद्यमानम् । आ । च । परा । च । पथिऽभिः । चरन्तम् ।
सः । सध्रीचीः । सः । विषूचीः । वसानः । आ । वरीवर्ति । भुवनेषु अन्तरिति ॥ ३१ ॥

---

ध्रुवमविचलितं सत् परस्त्यानां गृहाणां मध्ये । अथैतेष्वा स्थाणुवत्तिष्ठति । आकारः पूरणो वा । जीवस्य वैलक्षण्यमाह । मृतस्य शरीरस्य संबन्धी जीवो मर्त्येन मरणधर्मकेण शरीरेण सयोनिः । पूर्वं समानोत्पत्तिस्थानः । यद्यपि जीवस्य न जन्मास्ति तथापि वपुषस्तत्सद्भावात्तत्संबन्धेनोपचर्यते । तदेवाह । अमर्त्योऽमरणस्वभावः । जीवापीतं वाव किलेदं म्रियत इति श्रुतेः । उक्तस्वभावो जीवः स्वधाभिश्चरति । पुत्रकृतैः स्वधाकारपूर्वकदत्तैरन्नैश्चरति । वर्तत इत्यर्थः । इति ॥

---

## भाषायाम्.

३१. पथिभिः ( =अनेकैर्मार्गैः ) आ च परा च चरन्तम् ( =आभिमुख्येन गच्छन्तं पराङ्मुखं च गच्छन्तम् ) अनिपद्यमानम् ( =अविपन्नम्=अविषण्णं ) गोपा ( =गोपायितारं=पालकं=जीवम् ) अपश्यम् ( =पश्येयम् ) । स सध्रीचीः ( =संगताः ) स [ एव च ] विषूचीः ( =विष्वगञ्चन्तीः=विविधं गच्छन्तीः) [ ? त्विषो ] वसानः ( =परिदधानः सन् ) भुवनेषु अन्तः ( =जगति ) आ वरीवर्ति ( =पुनःपुनरावर्तते ) ॥

विविधशरीरेषु वर्तमानः परमात्मा जगति पुनःपुनर्जायते न च श्रमाद्विषण्णो भवतीति भाति इत्यभिप्रायः ॥

सध्रीचीर्विषूचीर्वसान इति पुनरसुलभाभिप्रायम् । सायणस्तु सर्वामृचमादित्यपरं व्याख्याय पथिभिर्विचित्रैर्मार्गैरन्तरिक्षरूपैराचरन्तं च परा चरन्तं च उदयप्रभृत्या मध्याह्नमागच्छन्तं मध्याह्नप्रभृत्या सायं पराङ्मुखं गच्छन्तम् ...... आदित्यमपश्यम् । ...... किंच स आदित्यः सध्रीचीः सहाञ्चतीर्विषूचीर्विष्वगञ्चती रात्रावपि चन्द्रमादित्यानां प्रकाशयित्रीस्त्विषो वसान आच्छादयन् । इत्यादिना विवृणोति ॥

३१. न थकतां अनेक मार्गांनीं इकडे येणारा आणि तिकडे जाणारा जो रक्षक, तो माझ्या दृष्टीस पडो. तो एकत्र मिळून जाणाऱ्या ज्या त्यांस, आणि तोच वेगळया वेगळया जाणाऱ्या ज्या त्यांस पांघरून भुवनांमध्यें पुनः-पुनः येतो.

31. May I see the protector coming hither and going away from this direction by the many paths, without being fatigued. He, clad in those [garments] that are associated, [and] he in those that are dissociated, passes again and again through the worlds.

मध्यें असतो, तोंपर्यंत मृतवत् जड जें शरीर त्याच्या हस्तपादादिकांच्या बळेंकरून चालतो असा दिसतो. या प्रकारेंकरून अमर्त्य आत्मा आणि मर्त्य मनुष्यदेह हे एकत्र राहत असतात,' असा अभिप्राय.

आम्हांस वाटतें कीं, हा मंत्र वर सांगितल्याप्रमाणें आत्म्याविषयीं आहे. वेदकाळींहि आत्मा सजीव आणि अमर आणि सर्व गतींचा स्वामी होय, आणि देह हा मर्त्य आणि जड आणि मंद होय याविषयीं आर्यजनांची समजूत या ऋचेवरून समजून येते. मनुष्याचा आत्मा अमर होय याविषयीं मनुष्यांस ज्ञान अत्यंत प्राचीन काळीं सर्व देशांत असे कीं नाहीं याविषयीं संशय असो, पण आपल्या आर्यजनांस तर असे यांत संशय नाहीं.

वृत्तासाठीं 'शये'च्या जागीं 'शईए' असें पहिल्या पादांत, 'पस्तिआनां' असें दुसऱ्यांत आणि 'अमर्तिओ मर्तिएना' असें चवथ्यांत म्हणावें लागतें.

३१. 'मनुष्याचा प्राण अथवा आत्मा जो तो जातो आणि येतो; म्हणजे एक मनुष्य मेला, दुसरा आला; तो गेला, पुनः तिसरा आला, या प्रकारेंकरून नित्य जगांत त्याचें भ्रमण चाललें आहे, तरी तो थकत नाहीं. असा जो आत्मा त्याचें खरें ज्ञान काय आहे, तें मला होवो,' असा याचा अभिप्राय दिसतो. पण यांत "एकत्र मिळून जाणाऱ्या ज्या त्यांस, आणि वेगळ्या वेगळ्या जाणाऱ्या ज्या त्यांस पांघरून" (सध्रीचीर्विषूचीर्वसानः) हें वाक्य दुर्बोध आहे. 'सध्रीचीः' आणि 'विषूचीः' यांचें विशेष्य सांगितलेलें नसल्यामुळें त्याचा अभिप्राय कळत नाहीं. तरीहि पूर्वीची आणि इच्या पुढची या दोन्ही ऋचा आत्म्याविषयीं असल्यामुळें हीहि आत्म्याविषयींच आहे असें समजून अर्थ करणें अवश्य दिसतें.

हीच ऋचा पुनः दहाव्या मंडलांत एकशें सत्राव्या सूक्तांत (३री) आली आहे, तेथें सायणांनीहि ती प्राणपर लावावी

य ईं चकार न सो अस्य वेद य ईं ददर्श हिरुगिन्नु तस्मात् ।
स मातुर्योना परिवीतो अन्तर्बहुप्रजा निर्ऋतिमा विवेश ॥ ३२ ॥
यः । ईम् । चकार । न । सः । अस्य । वेद । यः । ईम् । ददर्श । हिरुक् । इत् । नु । तस्मात् ।
सः । मातुः । योना । परिऽवीतः । अन्तः । बहुऽप्रजाः । निःऽऋतिम् । आ । विवेश ॥ ३२ ॥

## भाषायाम्.

३२. यः [पुमान्] ई चकार (=इमं प्राणिनं=प्राणमुत्पादयामास) न सः अस्य वेद (=स पुमांस्तं प्राणं परमात्मानं न जानाति=यद्यपि तं पुत्ररूपेण जनयति तदपि तं याथातथ्येन न जानाति) । नु (=अपि च) य ई ददर्श (=यः कोपि तं चक्षुषा पश्यति) तस्मात् [स] हिरुक् इत् (=अन्तर्हित एव=अदृग्गोचर एव वस्तुतो) [भवति] । मातुर्योना अन्तः (=मातुरुदरमध्ये) परिवीतः (=परिवेष्टितः=अन्तर्हितः) स बहुप्रजाः (=बहुजन्मा=बहुजन्मभाक् सन्) निर्ऋतिम् आ विवेश (=दुःखं प्रविशति=अनुभवति) ॥

असें सुचविलें आहे. पुढच्या ऋचेकडे पाहिलें म्हणजे ही प्रस्तुतची ऋचा आत्मपर लावावी इतकेंच नव्हे, पण येथें 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' याचें दिग्दर्शन केलें आहे असें समजावयाचें आहे असें आम्हांस वाटतें.

सायणांनीं ही ऋचा आदित्यपर लाविली आहे. तशी लाविली तरी, आत्मा हा आदित्यरूपच आहे असें कवीच्या मनांत नसेलसें वाटत नाहीं. त्यामुळें मंत्रांतील किती एक पदांचा अर्थ आदित्यपर कदाचित् चांगला बसेल असें वाटतें.

वृत्तासाठीं 'भुवनेषु अन्तः' असें म्हणावें.

३२. ज्याणें याला केलें तो याला जाणत नाहीं; ज्याणें याला पाहिलें त्याच्या दृष्टीला हा पडत नाहीं. तो आईच्या उदरांत झांकलेला असतो. तो अनेक जन्म घेणारा दुःखांत शिरला आहे.

32. He who produced him does not know him. From him who sees him is he concealed. He is hidden within the womb of his mother. Taking many births he has entered upon misery.

---

३२. 'मनुष्याची उत्पत्ति, त्याच्या बापापासून होते; पण त्या बापाला तो मुलगा कोण आहे हें खरेपणीं समजत नाहीं. सर्व मनुष्यें म्हणतील कीं आम्ही याला पाहत आहों, पण तो कोण आहे तें खरेपणीं त्यांतून कोणा एकाला दिसत नाहीं. तो आपल्या मातेच्या उदरांत लपविलेला असतो, आणि अनेक जन्में घेऊन घेऊन दुःख भोगतो', असा या चमत्कारिक ऋचेचा अभिप्राय आहे.

सायणांनीं सुद्धा या मंत्राचा असाच बहुतकरून अर्थ केला आहे. आणि भावार्थ असाच आहे याविषयीं कांहीं योग्य संशयास कारण दिसत नाहीं. तर मग मनुष्याच्या आत्म्याला अनेक जन्म आहेत आणि जन्म घेऊन घेऊन तो बिचारा शिणून जातो आणि दुःख पोंहचतो, आणि जें शरीर आपण पाहतों तो खरोखर मनुष्य नव्हे, खरा मनुष्य कोणास समजत नाहीं आणि तो कोणास दिसतही नाहीं, असा जो तत्त्वज्ञानी लोकांचा सिद्धांत, तो केवळ आधुनिक नाहीं, तर फार प्राचीन आहे असें होतें.

'अनेक जन्म घेणारा' = 'बहुप्रजाः.' 'प्रजा'शब्दाचा अर्थ 'जन्म,' 'उत्पत्ति' असा होतो याविषयीं ऋ. १० ७२.९ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

**द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बन्धुर्मे माता पृथिवी महीयम् ।**
**उत्तानयोश्चम्वो३र्योनिरन्तरत्रा पिता दुहितुर्गर्भमाधात् ॥ ३३ ॥**

द्यौः । मे । पिता । जनिता । नाभिः । अत्र । बन्धुः । मे । माता । पृथिवी । मही । इयम् ।
उत्तानयोः । चम्वोः । योनिः । अन्तः । अत्र । पिता । दुहितुः । गर्भम् । आ । अधात् ॥ ३३ ॥

---

**भाषायाम्.**

३३. द्यौः ( =द्युलोकाभिमानी महान् देवो ) मे ( =मम ) पिता जनिता ( =जनकः) अत्र ( =अपि च ) नाभिः ( =उत्पत्तिस्थानं ) [ भवति ] । इयं मही (=महती पृथिवी) मे ( =मम ) बन्धुः ( =बन्धिका ) माता (=जननी ) [ च ] [ भवति] उत्तानयोश्चम्वोः अन्तः (=ऊर्ध्वतनयोर्द्यावापृथिवीरूपयोः पात्रयोर्मध्ये) योनिः (=गर्भस्थानं ) [ भवति ] । अत्र ( =तत्र योनौ ) पिता ( =अस्माकं पितृभूतो द्यौः) दुहितुर्गर्भं ( =दुहितृभूतायाः कन्याभूताया अस्माकं स्वसुः पृथिव्या गर्भम्) आ अधात् ( =वृष्टिरूपेण स्थापयति=पिता सन्नपि कन्यया सह रमते ) ॥

३३. द्यू माझा बाप, जनक, आणि आदिकारण [ होय ]. ही महापृथिवी माझा बंधु [ आणि ] आई [ होय ]. उताण्या दोन चंबूंच्या आंत योनि [ होय ]. तींत पिता कन्येचा गर्भ स्थापित करितो.

33. Dyaus [ is ] my father, creator and origin. This vast earth [ is ] my sister [and] mother. Within the two shells of a cup lying one over the other is the womb. Into this the Father places the embryo of the daughter.

---

३३. 'द्यू माझा पिता, जनक आणि आम्हां सर्वांचें उत्पत्तिस्थान होय. आणि पृथिवी माझी बहीण आणि आई होय. द्यू आणि पृथिवी ह्यांच्यामध्यें योनि आहे त्यांत आमचा जो पिता द्यू तो, आमची बहीण आणि वास्तव द्यूची कन्या अशी जी पृथिवी, तिच्या आंगीं गर्भस्थापन करितो; म्हणजे मेघजलवृष्टिरूप जें बीज तें शिंपडतो.'

'आदिकारण'='नाभिः.' असा अर्थ 'नाभि' शब्दाचा होतो याविषयीं ऋ. १०. २०. ४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

'बंधु'='बन्धुः.' म्हणजे बहीण असा अर्थ समजावयाचा आहे.

'उताण्या दोन चंबूंच्या आंत'='उत्तानयोः चम्वोः अन्तः.' आकाश वर आणि पृथिवी खालीं, हीं दोन अंड्याच्या अथवा एकाद्या गोल भांड्याच्या (म्हणजे चंबूसारिख्या भांड्याच्या) शकलासारिखीं शकलें वेगळीं करून एकमेकावर ठेविल्याप्रमाणें दिसतात त्यांस 'उताणे दोन चंबू' म्हणतात. हीं शकलें म्हणजे ज्यांस वेदोत्तरकालीन भाषेंत ब्रह्मांडाचीं शकलें म्हणतात, तीं. द्यू आणि पृथिवी ह्या एकमेकांवर कशा राहिल्या आहेत त्यांच्या आकृतीकडेस पाहिलें तर त्यांस चंबूचीं शकलें म्हणणें हें साहजिक आहे, आणि त्यामुळेंच त्यांस ब्रह्मांडाचीं शकलें असें पौराणिक म्हणतात.

'पिता कन्येचा गर्भ स्थापन करितो'='पिता दुहितुः गर्भम् आ अधात्.' म्हणजे, पिता कन्येच्या ठायीं गर्भस्थापन करितो. याचा अभिप्राय असा आहे कीं, द्यू हा सर्वांचा पिता म्हणून प्रथम सांगितलें, यावरून आणि पृथिवी ही आमची बहीण होय यावरून, पृथिवी ही त्याची कन्या आणि पृथिवीवर जी उदकवृष्टि स्वर्गापासून होते, तेंच कोणीएक त्याचें रेत. द्यूला पृथिवीचा नवरा, आणि पृथिवीला द्यूची बायको म्हणतात. त्या म्हणण्याशीं या ऋचेंत कुठ्या विरोध जाणविला आहे.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'चमुओः' असें म्हणावें लागतें.

पृच्छामि त्वा परमन्तं पृथिव्याः पृच्छामि यत्र भुवनस्य नाभिः ।
पृच्छामि त्वा वृष्णो अश्वस्य रेतः पृच्छामि वाचः परमं व्योम ३४

पृच्छामि । त्वा । परम् । अन्तम् । पृथिव्याः । पृच्छामि । यत्र । भुवनस्य । नाभिः ।
पृच्छामि । त्वा । वृष्णः । अश्वस्य । रेतः । पृच्छामि । वाचः । परमम् । विऽओम ॥ ३४ ॥

## भाषायाम्.

३४. [ अहं ] त्वा पृथिव्याः परम् अन्तं ( =पृथिव्याश्चरममन्तं ) पृच्छामि (=पृथिव्याश्चरमोन्तः को न्विति त्वां पृच्छामि) । यत्र भुवनस्य (=जगतो ) नाभिः (=संनाहः=मध्यस्थानं ) [ भवति ] [ तत्किं न्विति ] पृच्छामि । वृष्णः (=सेचनसमर्थस्य अश्वस्य रेतः) [ किं भवतीति ] त्वा ( =त्वां ) पृच्छामि । वाचः (=सर्वस्य वाग्जातस्य ) परमं व्योम ( =उच्चैस्तमं स्थानं ) [ किं न्विति ] त्वा ( =त्वां ) पृच्छामि ।

पृथिव्याः परम् अन्तम् । ......यत्र सर्वा पृथिवी समाप्यते तत्पृच्छामि ।...... नाभिः संनाहो बन्धनम् । यत्र सर्वं संनद्धं भवति तम् । ...... वृष्णो वर्षकस्याश्वस्य व्याप्तस्यादित्यस्य । असौ वा आदित्यो वृषाश्व इति तैत्तिरीयकम् । तस्य रेतो रेतोवत्कारणं तत्किमिति पृच्छामि । ...... व्योम स्थानं सर्वस्य वचसः कारणम् । इत्यादि सायणः ॥

३४. मी तुला पृथिवीची शेवट सीमा कोणती तें पुसतों. जगाचें मध्य जेथें आहे तें ठिकाण कोणतें असें पुसतों. वळू घोड्याचें रेत कोणतें तें पुसतों. वाचेचें अति उंच स्थान कोणतें असें पुसतों.

34. I ask thee, [which is] the extreme end of the earth? I ask, [what is] the place where [there is] the centre of the world? I ask thee, [what is] the semen of the stallion charger? I ask [what is] the highest seat of the speech?

---

३४. यांत चार प्रश्न घातले आहेत, ते खरोखर चार उखाणे आहेत. ते हे:– 'पृथिवीचा शेवट कोठें? जगताचा मध्यकेंद्र कोठें? वळू घोड्याचें रेत तें कोणतें? वाचेचें अति उंच स्थान कोणतें?'

या चार उखाण्यांचीं उत्तरें पुढच्या ऋचेंत सांगितलीं आहेत, तीं पहा.

सायण म्हणतात कीं, अश्वमेधाच्या मधल्या दिवशीं 'ब्रह्मोद्य' म्हणून जें होत असे; त्यांत ह्या ऋचेंतील चार प्रश्न ऋत्विज् लोक यजमानास घालीत. प्रत्येक ऋत्विजानें एक एक प्रश्न घालावयाचा. हें सायणाचें म्हणणें योग्य दिसतें. 'ब्रह्मोद्य' म्हणजे, ज्यांत एकानें दुसऱ्याला कूटें (अथवा उखाणे) विचारावयाचे आणि ते विचारण्यांत जसें आपआपलें चातुर्य दाखवून एकमेकावर चढाचढी करावयाची, त्याप्रमाणेंच त्यांचीं समर्पक उत्तरें देण्याविषयीं एकमेकांवर चढाचढी करीत, अशी एक करमणूक अथवा विनोद. तसल्या 'ब्रह्मोद्यांत' घालावयाचे जे उखाणे, ते यज्ञसंबंधी अथवा ब्रह्मज्ञानासंबंधींच घालीत असत. त्यांतलेच उखाणे या ऋचेंत आहेत.

याच्या संबंधानें पाहिलें तर 'पृथिवीची शेवट सीमा,' 'जगाचें मध्य,' 'वळू घोड्याचें रेत' आणि 'वाचेचें अति उंच स्थान' ह्या गोष्टी अश्वमेधादिक कर्मांच्या संबंधानें अथवा ब्रह्मज्ञानाच्या संबंधानें नित्य डोळ्यापुढें घोळत असतच, आणि या ठिकाणीं त्यांविषयींचा अभिप्राय काय आहे इतकाच प्रश्न केला आहे.

वृत्तासाठीं चवथ्या चरणांत 'व्योम'-च्या स्थळीं 'विओम' असें म्हणावें लागतें.

**इयं वेदिः परो अन्तः पृथिव्या अयं यज्ञो भुवनस्य नाभिः ।**
**अयं सोमो वृष्णो अश्वस्य रेतो ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥**
**॥ ३५ ॥ २० ॥**

इयम् । वेदिः । परः । अन्तः । पृथिव्याः । अयम् । यज्ञः । भुवनस्य । नाभिः ।
अयम् । सोमः । वृष्णः । अश्वस्य । रेतः । ब्रह्मा । अयम् । वाचः । परमम् । विऽओम ॥ ३५ ॥ २० ॥

---

## भाषायाम्.

३५. इयं [ या ] वेदिः [ स एव पूर्वोक्तः ] पृथिव्याः परोन्तः । अयं [ यो ] यज्ञः [ स एव पूर्वोक्तो ] भुवनस्य नाभिः । अयं [ यः ] सोमस् [ तदेव पूर्वोक्तं ] वृष्णो अश्वस्य रेतः । अयं [ यो ] ब्रह्मा (=सूक्तानां प्रवक्ता एतन्नामक ऋत्विक् ) [ तदेव पूर्वोक्तं ] वाचः (=सर्वस्य वाग्जातस्य ) परमं व्योम (=उत्कृष्टतमं स्थानं ) [ भवति ] ॥

अत्र सायणः । पृथिव्याः प्रथनवत्या भूम्याः परो अन्तः परमन्तं पर्यवसानमियं वेदिः । न हि वेद्यतिरिक्ता भूमिरस्ति । एतावती वै पृथिवी यावती वेदिरिति श्रुतेः । तथायं यज्ञो भुवनस्य भूतजातस्य नाभिः संनहनम् । तत्रैव वृष्ट्यादिसर्वफलोत्पत्तेः सर्वप्राणिनां बन्धकत्वात् । अथ वृष्णो वर्षकस्यादित्यस्य रेतोऽयं सोमो रसात्मकः । अग्नौ हुतः सोमरस आदित्यं प्राप्य वृष्ट्यादिफलं जनयति । अयं ब्रह्मा प्रजापतिरेव वाचो मन्त्रादिरूपायाः परमं व्योम । उत्कृष्टं रक्षकं स्थानम् । तत्रैवोत्पत्तेस्तत्रैव पर्यवसानाच्च । इति ॥

३५. ही [जी] वेदि [तीच] पृथिवीची शेवट सीमा; हा [जो] यज्ञ [तोच] जगाचा मध्य; हा [जो] सोम [तेंच] वळू घोड्याचें रेत; हा [जो] ब्रह्मा [तोच] वाचेचें अति उंच स्थान.

35. This altar [is] the extreme end of the earth. This sacrifice [is] the centre of the world. This Soma [is] the semen of the stallion charger. This Brahmâ [priest] [is] the highest seat of speech.

३५. वरच्या ऋचेंत जे उखाणे घातले त्यांचीं उत्तरें या ऋचेंत दिलीं आहेत.

'वेदि.' जेथें हवि अर्पण करावयाचें तें उभारलेलें स्थळ. यज्ञाचें महत्त्व अतिशय वाढलें तेव्हां यज्ञांतील एक जी मुख्य वस्तु तिला पृथिवीचा अंत म्हणणें हें साहजिक आहे. ज्या काळीं गाईची पूज्यता आणि माहात्म्य हीं वाढलीं, त्या काळीं गाई तीच पृथिवी असें दाखविण्याकरितां गोतमानें पृथिवीसभोंतालीं प्रदक्षिणा न करितां गाईसभोंतालींच केली अशी कथा प्रचारांत आली, हें प्रसिद्धच आहे.

हेंच कारण यज्ञाला जगाचा मध्य असें म्हणण्याविषयीं आहे.

'वळू घोड्याचें रेत'='वृष्णः अश्वस्य रेतः.' म्हणजे बळवान् आणि खशी न केलेला जो वारू, त्याचें रेत. सायण म्हणतात येथें 'वळू घोडा' म्हणजे आदित्य समजावयाचा आहे. आणि आदित्यापासून जी जमिनीवर मेघवृष्टि होते, तें त्याचें रेत. ती वृष्टि सोम अर्पण केल्यामुळें पडते म्हणून सोमालाच 'वळू घोड्याचें रेत' असें म्हटलें आहे. ही उपपत्ति कशीहि असली तरी, 'वळू घोडा' म्हणजे आदित्य म्हणून जें म्हणणें तें मात्र खरें दिसतें. 'वळू घोडा'. हें महानुभावदर्शक नांव आहे. जसें अर्वाचीन काळीं पराक्रमदर्शक 'सिंह' हें नांव देवांस, वीरांस वगैरे लावितात, तसें अतिप्राचीन काळीं 'वृषा' अथवा 'वृषा अश्वः' हें लावीत असत.

'ब्रह्मा.' म्हणजे सूक्तें रचून म्हणणारा ऋत्विज् असा अर्थ येथें घेतला पाहिजे, 'प्रजापति' असा सायणाप्रमाणें घ्यावयाचा नाहीं. वाचा म्हटली म्हणजे सूक्तरूपच, इतर वाचाच नव्हे, आणि ज्याला तसल्या वाचेचा उच्चार करितां येतो तोच खरा वाग्ब्रह्म, इतर व्यर्थ अशी प्रशंसा यांत जाणविली आहे. ईश्वराचें नामस्मरण करण्याकरितां जितके शब्द उच्चारिले, तितकी वाचा, इतर शब्द केवळ आवाज होत, असें जसें कोणी तरी ईश्वरभजनप्रशंसेनें म्हणेल, त्याप्रमाणें ही सूक्ताची प्रशंसा आहे.

'साधारण लोक समजतात कीं, पृथिवीचा अंत म्हणजे अत्यंत दूरचा एक

सप्तार्धगर्भा भुवनस्य रेतो विष्णोस्तिष्ठन्ति प्रदिशा विधर्मणि।
ते धीतिभिर्मनसा ते विपश्चितः परिभुवः परि भवन्ति विश्वतः॥३६
सप्त। अर्धऽगर्भाः। भुवनस्य। रेतः। विष्णोः। तिष्ठन्ति। प्रऽदिशा। विऽधर्मणि।
ते। धीतिऽभिः। मनसा। ते। विपःऽचितः। परिऽभुवः। परि। भवन्ति। विश्वतः॥ ३६॥

## भाषायाम्.

३६. भुवनस्य रेतः (=जगतो रेतोभूता) अर्धगर्भाः (=अपूर्णगर्भाः=अपूर्णावयवबाष्परूपगर्भाः) सप्त [रश्मयो] विष्णोः प्रदिशा (=आदित्यरूपस्य एतन्नामकस्याज्ञया) विधर्मणि तिष्ठन्ति (=अन्तरिक्षे आसते)। विपश्चितः (=बुद्धिमन्तस्) ते धीतिभिः (=प्रज्ञाभिस्) ते मनसा (=अपि च ते मनसा बुद्ध्या) परिभुवः (=सर्वत्र व्याप्ता) विश्वतः परि भवन्ति (=सकलं जगत् सर्वतो वेष्टन्ते)॥

सकलाज्जगतो बाष्परूपेणोदकहरणात्तस्य च बाष्पस्य गर्भवद्धारणाज्जगतो रेतस्त्वं रश्मीनामर्धगर्भत्वं च। ते आदित्यस्याज्ञया सकलं जगत् प्रज्ञया चेतसा च पूरयन्ति चेति भावः॥

प्रदेश, पण तें खरें नव्हे, ही जी वेदि तोच पृथिवीचा अंतप्रदेश; भुवनाचा मध्य म्हणजे, कोणी म्हणतात येथें आहे, कोणी म्हणतात तेथें आहे, पण खरा मध्य यज्ञ हाच होय; वळू घोड्याचें रेत म्हणजे वृष्टि असें कोणी म्हणतात, पण तें खरें नव्हे, सोम हेंच तें रेत होय; वाणीचें उंच स्थान अंतरिक्ष अथवा द्युलोक होय असें कोणी समजतात, पण तें खरें नव्हे, सूक्तें रचून म्हणणारा जो ऋत्विज् तेंच वाणीचें उच्च स्थान होय' असा कवीचा अभिप्राय आहे.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'यज्जओ' आणि चवथ्यांत 'विओम' असें म्हणावें लागतें.

३६. जगाचें रेत [होत, असे] अपूर्णगर्भधारी सात [ किरण ] विष्णूच्या आज्ञेनें अंतरिक्षांत राहतात. ते विवेकी [होत्साते] बुद्धींनीं [ आणि ] तेच जाणिवेनें सकळ विश्वाला सर्व दिशांनीं वेष्टून टाकितात.

36. Being the semen of the world, the seven [ rays ], bearing imperfect embryos [ within them], stand in the expanse of the sky by the direction of Vishṇu. They the wise ones surround the universe embracing it on all sides, with intelligence and a mind.

३६. या ऋचेचा भावार्थ: ‘ आदित्याचे जे सात किरण, ते जगाचें रेत ( म्हणजे भूमीवरून बाष्परूपानें हरण केलेलें उदक ) धारण करितात आणि त्या रेताचा गर्भ त्यांच्या आंगीं राहतो; पण तो प्रथम अपूर्ण असतो, म्हणजे, पूर्ण दशेला आलेला नसतो. ते किरण आदित्याच्या आज्ञेवरून सर्व अंतरिक्षभर पसरून राहतात; आणि ते सकळ जगताला प्रज्ञा- आणि जाणीव यांहींकरून वेष्टून टाकितात. म्हणजे· जगतामध्यें जी प्रज्ञा आणि जाणीव आहे, ती आदित्याच्या किरणांनीं दिलेली आहे. ’

‘ अंतरिक्षांत ’=‘ विधर्मणि.’ या अर्थाच्या प्रमाणासाठीं ऋ. १०. १२३. ८ आणि त्यांजवरील सायणभाष्य पहा. वरच्या दोन ऋचांत जे उखाणे सांगितले, त्यासारिखाच प्रस्तुत ऋचेंत एक आहे. त्याचें उत्तर त्यांतच जाणविलें आहे. ‘ विष्णूच्या आज्ञेनें आकाशांत राहणारे असे अर्धगर्भ सातजण, कीं जे सकळ विश्वाला बुद्धि आणि प्रज्ञा यांहींकरून वेष्टून राहतात, ते कोण ? ’ असा उखाणा. ‘ सात ’ या शब्दावरून प्रसिद्ध सात किरण असें उत्तर द्यावयाचें आहे असें वाटतें.

न वि जा॑नामि॒ यदि॑वे॒दमस्मि॑ नि॒ण्यः संन॑द्धो॒ मन॑सा चरामि ।
य॒दा माग॑न्प्रथम॒जा ऋ॒तस्यादिद्वा॒चो अ॑श्नुवे भा॒गम॒स्याः ॥ ३७ ॥

न । वि । जा॒ना॒मि॒ । यत्ऽइ॑व । इ॒दम् । अस्मि॑ । नि॒ण्यः । सम्ऽन॑द्धः ।
मन॑सा । च॒रा॒मि॒ ।
य॒दा । मा॒ । आ । अग॑न् । प्र॒थ॒म॒ऽजाः । ऋ॒तस्य॑ । आत् । इत् ।
वा॒चः । अ॒श्नु॒वे॒ । भा॒गम् । अ॒स्याः ॥ ३७ ॥

---

## भाषायाम्.

३७. यदिव इदम् (=इदं यत्किमपि=यद्यदिदं तत्तत्सर्वम्) [अहम्] अस्मि [इति] न वि जानामि। [अहं] निण्यः (=अन्तर्हितः) मनसा संनद्धः (=चेतसा संबद्धश्च) चरामि (=वर्ते)। यदा (=यस्मिन् काले) ऋतस्य प्रथमजाः (=? सत्यस्य प्रथमजातः=अग्निः) आ अगन् (=आगच्छत्) आद् इत् (=तदानीमेव) अस्या वाचः भागम् (=एकदेशम्) अश्नुवे (=लब्धवानस्मि) ॥

सायणस्त्वेवं व्याख्यातवान् । अहं यदि वेदं यदपीदं विश्वमस्मि । कृत्स्नः प्रपञ्चोऽप्यहमेवास्मि । नामरूपांशं परमार्थे त्यक्त्वा सर्वत्रानुगतोऽस्मि । योऽयं सच्चिदानन्दाकारोऽस्ति सोऽहमस्मीति न विजानामि । विविच्य नाज्ञासिषम् । परं शास्त्रजनितमिदमहमस्मीति ज्ञानं जातम् । अविवेक्यहमित्यर्थः । कार्यकारणयोरभेदात् । कृत्स्नप्रपञ्चस्यापि ब्रह्मानन्यत्वेन ब्रह्मैकत्वावगमे प्रपञ्चजातमपि स्वस्वरूपमेव भवति । इदं सर्वं यदयमात्मा ब्रह्मैवेदं सर्वम् आत्मैवेदं सर्वं स ईक्षत बहु स्यां प्रजायेयेत्यादिश्रुतिभ्य एकविज्ञानेन सर्वविज्ञानप्रतिज्ञानात् तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्य इत्याद्युपपत्तिभिश्च प्रपञ्चस्य ब्रह्मानन्यत्वं सिद्धम् । यद्वा इवशब्द उपमार्थः । यदिव यत्परोक्षज्ञानं सर्वैकात्म्यरूपमानुभाविकमस्ति । तदिव तद्वदेवाहमस्मि । इदं सर्वमहमस्मीति ज्ञानं मे जातम् । अपि त्वेतद्दार्ष्टान्तिकभूतम् । आनुभविकं सार्वात्म्यं यदस्ति तन्न विजानामि । न प्राप्तोऽस्मि । शास्त्रजनितं सार्वात्म्यं जातं न त्वानुभाविकमित्यर्थः । तत्र कारणमाह । यतोऽहं निण्यः । अन्तर्हितनामैतत् । अन्तर्हितो मूढचित्तः । चित्तप्रत्यक्प्रवणाभावेन परिच्छिन्न इत्यर्थः । तत्रोपपत्तिमाह । संनद्धोऽविद्याकामकर्मभिः सम्यग् बद्धो वेष्टितः । अत एव मनसा युक्तो भावनासहिष्णुना बहिर्मुखेन विक्षिप्तेन चेतसा युक्तः संचरामि संसारे । अथवा मनसा संनद्धश्चरामि । इन्द्रियपरवश एव सन् संसारे दुःखमनुभवामि । न सार्वात्म्यं जाना-

३७. हें जें कांहीं आहे, तो मी आहें असें मी जाणत नाहीं. मी गुह्य आणि मनानें संबद्ध असा होत्साता राहत असतों. जेव्हां सत्याचा प्रथमजात मजप्रत आला तेव्हांच मला या वाणीचा भाग प्राप्त झाला.

37. I do not know that I am all this whatsoever. Hidden and bound up with the mind I exist. When the first-born of Truth came to me, from that time I immediately began to enjoy part of this voice.

---

३७. ह्यांत एक दुसरें कूट आहे तें आत्म्याच्या स्वरूपाविषयीं आहे. पण सर्व ऋचेचा संगतवार अर्थ काय आहे तो सांगणें कठिण आहे. सायणांनीं तरी प्रयासानेंच अर्थ लाविला आहे असें दिसतें. तो भाषेखालीं उतरून घेतला आहे, तो पहा. आम्हीं वर केलेलें भाषांतर शब्दशः आहे. आत्मा हा सर्वास ठाऊक आहे तरी त्याचें खरें स्वरूप कोणीहि जाणत नाहीं इतकें तात्पर्य उघड दिसतें. पण उत्तरार्धाचा अर्थ आत्म्याच्या रूपाच्या संबंधानें कसा लावावयाचा तें सांगणें सोपें नाहीं.

अपाङ् प्राङेति स्वधया गृभीतोऽमर्त्यो मर्त्येना सयोनिः ।
ता शश्वन्ता विषूचीना वियन्ता न्य१न्यं चिक्युर्न नि चिक्युरन्यम् ३८

अपाङ् । प्राङ् । एति । स्वधया । गृभीतः । अमर्त्यः । मर्त्येन ।
सऽयोनिः ।
ता । शश्वन्ता । विषूचीना । विऽयन्ता । नि । अन्यम् । चिक्युः ।
न । नि । चिक्युः । अन्यम् ॥ ३८ ॥

मीति परिदेवते । यास्कोऽपीमं परिदेवनार्थत्वेनोदाजहार । अथापि परिदेवना कस्माच्चिद्भावात् न वि जानामि यदि वेदमस्मि । नि० ७. ३. । इति । बहिर्मुखचेतसः स्वरूपापरिज्ञानजनितं दुःखमन्यत्र श्रूयते । पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यन्ति नान्तरात्मन्निति । तर्हि कदैतद्भवति इत्याह । यदा मागन् आगमिष्यति तदा । किं तदित्युच्यते । ऋतस्य परमार्थस्य परस्य ब्रह्मणः प्रथमजाः प्रथमोन्मेषः प्रथमोत्पन्नचित्तप्रत्यक्प्रवणजनितोऽनुभावः स यदा मा मां प्राप्नोति आदित् अनन्तरमेवाव्यवधानेनास्या वाच ऐकात्म्यप्रतिपादिकाया उपनिषद्वाचः यदि वेदमस्मीत्युक्ताया वा भागं भजनीयं शब्दब्रह्मणा व्याप्तव्यं परं ब्रह्मपदमश्नुवे । प्राप्नोमि । चित्तस्य बहिर्मुखतां परित्यज्यान्तर्मुखतैवादुःसंपादा । सा यदा स्यात् तदानीमेव स्वरूपं द्रष्टुं सुशकं भवति । पश्चाद्विलम्बाभावात् यथा गिरिशिखरात्पतन् पाषाणोऽविलम्बेन पतति तद्वत् । चित्तप्रत्यङ्मुखत्वस्य दुःशकत्वमपि तत्रैव श्रूयते । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैच्छदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्निति । इति ॥

## भाषायाम्.

३८. स्वधया गृभीतः (=स्वस्थानेन स्वशरीरेण गृहीतः=शरीरयोगाद्दृगादीन्द्रियगोचरः) अमर्त्यः (=अमरणधर्मा सन्नपि) मर्त्येन सयोनिः (=मरणधर्मणा शरीरेण सह समानस्थानः) [ आत्मा ] अपाङ् प्राङ् एति (=अधो गच्छति प्रकृष्टं गच्छति =कदाचिन्निकृष्टां गतिं कदाचिदुत्कृष्टां गतिं प्राप्नोति ) । ता (=तौ) [ देहात्मानौ ] शश्वन्ता (=नित्यसंबन्धौ ) विषूचीना (=विषूचीनौ=सर्वत्र गच्छन्तौ ) वियन्ता (=वियन्तौ=विविधेषु स्थलेषु गच्छन्तौ ) [ ततः ] । अन्यं ( =तयोर्मध्य एकं=देहं ) [ जना ] नि चिक्युः (=पश्यन्ति ) अन्यम् (=अपरम्=आत्मानं ) [ जना ] न नि चिक्युः (=न पश्यन्ति ) ॥

एकः सुलभज्ञानः । अपरस्तु दुर्लभज्ञान इत्यर्थः ॥

३८. अमर्त्य [ असतांहि ] मर्त्याबरोबर वास करणारा जो, तो शरीराच्या योगानें समजण्यांत येणारा [ होत्साता ] मागें येतो [ आणि ] पुढें जातो. ते नित्य संबद्ध [ आणि ] सर्व ठिकाणीं जाणारे [ आणि ] अनेक स्थळीं गति असलेले [ असे होत ]. [ त्यांतून ] एकाला [ लोक ] पाहतात, दुसऱ्याला पाहत नाहींत.

38. Living in a common place the immortal with the mortal, [ and ] known by means of its body, [the soul ] goes [ now ] backwards [ and now ] forwards. They are ever bound together, all-pervading [ and ] reaching various places. One [ of them ] they perceive, the other they do not perceive.

३८. ही ऋचा आत्म्याविषयीं आहे. ऋषि म्हणतो: ' स्वतः अमर असतांहि आत्मा मरण पावणाऱ्या देहाबरोबर वस्ति करितो. तो स्वतः दृष्टीस न पडतां तो जेथें राहतो त्या स्थळाच्या योगानें, म्हणजे शरीराच्या योगानें, दृष्टिगोचर होत असतो. त्या आत्म्याचा केव्हां केव्हां उत्कर्ष आणि केव्हां केव्हां निकर्ष होतो. आत्मा आणि देह यांचा संबंध नित्य आहे, ते सर्वत्र जातात, आणि पाहिजे तेथें जातात. त्यांपैकीं एकाला ( म्ह. देहाला ) लोक पाहूं शकतात, दुसऱ्याला ( आत्म्याला ) लोक पाहूं शकत नाहींत. '

' अमर्त्य असतांहि ' इ० वर तिसावा मंत्र आणि त्याजवरील टीप पहा.

' मागें येतो आणि पुढें जातो '= 'अपाङ् प्राङ् एति.' म्हणजे, त्याची गति नेहमी उत्तम होते असें नाहीं. तो केव्हां केव्हां चांगल्या स्थितीप्रत जातो, आणि केव्हां केव्हां वाईट स्थितीप्रत जातो.

' नित्य संबद्ध '=' शश्वन्ता. ' म्हणजे नित्य असून एकमेकाशी जोडिलेले असे.

'एकाला'='अन्यम्.' अर्थात् देहाला.

वृत्तासाठीं दुसरा चरण ' अमर्तिओ मर्तिएन स्वधाभिः ' आणि चवथ्या चरणांत ' न्यन्यं ' बद्दल ' निअन्यं ' असें वाचावें.

**ऋचो अक्षरे परमे व्योमन्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः ।**
**यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते॥३९॥**

ऋचः । अक्षरे । परमे । विऽओमन् । यस्मिन् । देवाः । अधि । विश्वे । निऽसेदुः ।
यः । तत् । न । वेद । किम् । ऋचा । करिष्यति । ये । इत् । तत् । विदुः। ते । इमे । सम् । आसते ॥ ३९ ॥

## भाषायाम्.

३९. ऋचः (=वेदस्य ) यस्मिन् परमे व्योमन् अक्षरे अधि ( =अत्यन्तोत्कृष्ट-स्वर्गभूते अक्षरे ) विश्वे देवा निषेदुः (=सर्वेपि देवा निवसन्ति ) तत् [ अक्षर"= अक्षरसमूहं ] यो न वेद (=यः पुमान् न जानाति ) [ स ] ऋचा (=वेदेन ) किं करिष्यति (=वेदलाभात्किं लभते )? ये [ पुमांसस् ] तद् विदुः (=तज्जानन्ति ) ते इत् इमे सम् आसते (=त एव सुखिनो भूत्वा संगच्छन्ते=सुखिनो भूत्वा स्वर्गे संगता भवन्ति ) ॥

इदमुक्तं भवति । यद्वेदस्याक्षरं स एव सकलदेवनिवासभूत उत्तुङ्गतमः स्वर्गः । एतद्वृत्तं यो न जानाति तस्य वेदेन किम् । ये तज्जानन्ति त एव सुखिनो भूत्वा स्वर्गं गच्छन्तीति ॥

इमामृचं सायणोन्यथा व्याचष्टे । इतरेपीतरथा बहुभिः प्रकारैर्व्याचक्षते तत्सर्वं सायणभाष्ये द्रष्टव्यम् ॥

३९. वेदाचें अक्षर म्हणजे जेथें सकळ देव वास करितात असा अत्यंत उंच स्वर्ग होय. तर तें [अक्षर] ज्याणें जाणिलें नाहीं, तो [ मनुष्य ] वेद घेऊन काय करील ? ज्यांनीं तें जाणिलें, तेच सुखी होऊन भेटतात.

39. What will that [ man ] do with the Ṛig ( Veda ) who does not know that the Word of the Ṛig is the highest heaven in which all the gods dwell ? Those only who have known this, will happily meet together.

---

३९. यांत वेदाचें माहात्म्य सांगितलें आहे. ' वेदाचें जें अक्षर, तें सामान्य नव्हे; तर ज्यांत सर्व देव वास करितात असा जो अति उंच स्वर्ग तद्रूप तें अक्षर होय. हें गुह्य ज्याला समजलें नाहीं, त्याला वेदापासून काय लाभ ? कांहीं नाहीं. ज्यांस तें गुह्य समजलें आहे, तेच सुखी होऊन स्वर्गांत जाऊन एकमेकाला मिळतात. '

ही जी वेदाक्षरप्रशंसा येथें केली आहे, तिजवरून असें दिसतें कीं, वेदाच्या अक्षरांत कांहीं विलक्षण शक्ति आहे असें जेव्हां मानूं लागले ( प्रथम तसें मानीत नव्हते हें अनेक सूक्तांवरून उघड होतें ), तेव्हां ही ऋचा रचिली गेली; आणि या सूक्तांतील दुसरे बरेच मंत्र ज्यापेक्षां अशाच तऱ्हेचे आहेत, त्यापेक्षां हें सर्व सूक्तच थोडेंसें अर्वाचीन असावें, म्हणजे इतर सूक्तांप्रमाणें फार प्राचीन नसावें, असें कितीएक अनुमान काढितात. या संबंधानें अर्वाचीन म्हणजे शास्त्रें, पुराणें, इत्यादिकांच्या संबंधानें पाहिलें तर फार प्राचीन समजावयाचें हें तर आहेच.

' तें अक्षर. ' म्हणजे ' तसलें अक्षर; ' ' तसा प्रभाव त्यांत आहे ही गोष्ट ज्यांनीं जाणिली नाहीं ' असा भावार्थ.

वेदाच्या अक्षरांत सर्व देव वास करितात, याचें तात्पर्य असें आहे कीं, वेदाचें अक्षर उच्चारिल्याबरोबर देव येतात, जेथें जेथें वेद उच्चारिला जातो, तेथें तेथें देव वास करीत असतात.

' अत्यंत उंच स्वर्ग'=' परमं व्योम.' स्वर्गाचा जो अत्यंत उंच प्रदेश अथवा भाग त्यांत देव वास करितात, अशी समजूत असे. सू. ३४ मं. ८ आणि त्याजवरील टीप भाग १ पृष्ठ ४०५ येथें पहा.

वृत्तासाठीं पहिल्या पादांत ' विओमन् ' असें वाचावें.

**सूयवसाद्भगवती हि भूया अथो वयं भगवन्तः स्याम ।**
**अद्धि तृणमघ्न्ये विश्वदानीं पिब शुद्धमुदकमाचरन्ती ॥४०॥२१॥**
सुयवसऽअत् । भगऽवती । हि । भूयाः । अथो इति । वयम् । भगऽवन्तः । स्याम ।
अद्धि । तृणम् । अघ्न्ये । विश्वऽदानीम् । पिब । शुद्धम् । उदकम् । आऽचरन्ती ॥ ४० ॥ २१ ॥
**गौरीर्मिमाय सलिलानि तक्षत्येकपदी द्विपदी सा चतुष्पदी ।**
**अष्टापदी नवपदी बभूवुषी सहस्राक्षरा परमे व्योमन् ॥ ४१ ॥**
गौरीः । मिमाय । सलिलानि । तक्षती । एकऽपदी । द्विऽपदी । सा । चतुःऽपदी ।
अष्टाऽपदी । नवऽपदी । बभूवुषी । सहस्रऽअक्षरा । परमे । विऽओमन् ॥ ४१ ॥

---

## भाषायाम्.

४०. सूयवसाद् (=शोभनस्य यवसस्यात्तो भक्षयित्री) [ त्वं गौर् ] भगवती हि भूयाः (=सुखवतो=सुखिनो स्याः) । अथो (=तदनन्तरं) वयं भगवन्तः स्याम (=सुखिनो भवाम=भविष्यामः) । हे अघ्न्ये (=अहननीये गौः), [ त्वं ] विश्वदानीं (=सर्वदा) तृणम् अद्धि (=भक्षय) । आचरन्ती (=सर्वत्र संचारं कुर्वती) शुद्धम् उदकं (=निर्मलं जलं) पिब ॥

माध्यमिका या वाक् सैव गौरत्र विज्ञेया ॥

४१. सलिलानि तक्षती (=उदकानि कुर्वती=मेघोदकानि वर्षयन्ती) गौरीः (=गौरी=गौरवर्णा गौः=माध्यमिका वाक्=अन्तरिक्षे श्रूयमाणा मेघगर्जनरूपा वाक्) मिमाय (=शब्दं करोति) । सा एकपदी (=पदिकोपेता) द्विपदी (=पादद्वयोपेता) [ अथवा ] चतुष्पदी (=पादचतुष्टयोपेता) [ भवति ] । अष्टपदी (=पादाष्टकोपेता) [ अपि च ] नवपदी (=नवपादोपेता) सहस्राक्षरा [ वा ] बभूवुषी (=भवन्ती) [ सा ] परमे व्योमन् (=अत्यन्तोत्कृष्टतमे) व्योमन् (=व्योमनि=स्वर्गे) [ मिमाय=ध्वनिं करोति ] ॥

मेघगर्जनरूपा या माध्यमिका वाक्सैव गौः कदाचित् एकपदा अपि च भूयसी

४०. तूं चांगलें गवत खाऊन सुखी हो. म्हणजे मग आम्ही सुखी होऊं. हे गाई, तूं नित्य गवत खा. [ आणि ] जिकडे तिकडे संचार करणारी जी तूं ती निर्मळ पाणी पी.

४१. उदकें निर्माण करणारी गाय हंबरडा फोडिते. ती एक चरणाची, दोन चरणांची आणि चार चरणांची होय. आठ चरणांची, नऊ चरणांची [ आणि ] हजार अक्षरांचीं होणारी [ ती गाय ] अत्यंत उंच स्वर्गी [ हंबरडा फोडिते ].

40. Eating good grass be thou happy. We too will then be happy. Eat thou thy grass always, O holy cow! Drink the pure water, thou that roamest everywhere.

41. The cow that creates the waters lows. She has one foot, two feet, and four feet. Becoming eight-footed, nine-footed, and of a thousand syllables, [ she lows ] in the highest heaven.

---

४०. सायणाचार्य म्हणतात, अग्निहोत्राकरितां ठेविलेली लौकिक गाय जर ओरडूं लागली तर तिला गवत घालतांनां आणि पाणी पाजितांनां ही ऋचा म्हणावी म्हणून रचिली आहे. पण आम्हांस वाटतें कीं, पुढच्या ऋचेंत जी 'माध्यमिका वाक्' तीच कोणी एक गाय, ती आणि ही एकच आहे; आणि तिला गाय समजून गाईला जसें बोलावें तसें ऋषि विनोदानें बोलत आहे. लौकिक गाईविषयीं हा मध्येंच मंत्र येण्याचा संभव नाहीं, म्हणून या सूक्तांतील इतर ऋचांप्रमाणें यांतहि रूपक आणि कांहींतरी निगूढ अर्थ असावा असें समजून चालणें अवश्य दिसतें.

'गाई'='अघ्ये.' 'अघ्या' शब्दाचा अर्थ अक्षरशः 'जिला मारूं नये ती,' असा आहे. आतां मारूं नये ती कां, आणि ही समजूत अत्यंत प्राचीन काळापासून होती कीं कसें, याविषयीं निर्णय करण्यास विशेष साधनें पाहिजेत.

वृत्तासाठीं दुसऱ्या पादांत 'स्याम' बद्दल 'सिआम,' आणि तिसऱ्यांत 'अघ्ये'च्या ठिकाणीं 'अघिए' असें म्हणावें.

४१. ही ऋचा 'माध्यमिका वाक्' म्हणजे आकाशांत ऐकूं येणारी जी मेघवाणी, तीच कोणी एक गाय अशी कल्पिलेली, तिजविषयीं आहे.

ऋषि म्हणतोः 'ही गाय अत्यंत उंच

**तस्याः समुद्रा अधि वि क्षरन्ति तेन जीवन्ति प्रदिशश्चतस्रः ।**
**ततः क्षरत्यक्षरं तद्विश्वमुप जीवति ॥ ४२ ॥**

तस्याः । समुद्राः । अधि । वि । क्षरन्ति । तेन । जीवन्ति । प्रऽदिशः । चतस्रः ।
ततः । क्षरति । अक्षरम् । तत् । विश्वम् । उप । जीवति ॥ ४२ ॥

---

भवति । कदाचित् द्विपदा ऋगिव दीर्घा भवति । कदाचिच्चतुष्पदा ऋगिव ततोपि द्राघीयसी भवति । कदाचिद् अष्टपदा नवपदा वा ऋगिव दीर्घकाला भवति । कदाचित् सहस्राक्षरा ऋगिव अत्यन्तदीर्घकाला भूत्वा उत्तुङ्गतमे स्वर्गभागे शब्दयतीति भावः ॥

---

## भाषायाम्.

४२. तस्याः (=तस्याः सकाशात्=गौर्याः सकाशात्=माध्यमिकवाग्रूपाया गोः सकाशात्) समुद्राः (=मेघोदकरूपाः समुद्रा) अधि वि क्षरन्ति (=विविधं क्षरन्ति) । तेन [ क्षरणेन ] चतस्रः प्रदिशः (=सर्वा अपि दिशः प्रदिशश्च सर्वदिक्प्रदिक्स्था जना) जीवन्ति । ततः (=तस्याः सकाशात्) अक्षरम् (उदकं) क्षरति । तत् (=तस्मात् उदकक्षरणात्) विश्वम् उप जीवति (=निर्वाहं करोति) ॥

---

आकाशांत ओरडते. ती केव्हां केव्हां एक पायाची असते; म्हणजे एक चरणाच्या ऋचेप्रमाणें थोडक्यांत संपणारी असते. केव्हां केव्हां दोन चरणांच्या ऋचेइतकीच दीर्घ असते. केव्हां केव्हां, चार अथवा आठ अथवा नऊ चरणांच्या ऋचेला जितका वेळ लागतो, तितका काळपर्यंत गर्जत असते. आणि केव्हां केव्हां तर एकाद्या सहस्र अक्षरें असलेल्या ऋचेला म्हणण्यास जितका वेळ लागतो, तितका वेळपर्यंत गर्जना करीत असते.'

'उदकें निर्माण करणारी'='सलिलानि तक्षती.' म्हणजे जी ओरडून उदकांची वृष्टि जमिनीवर करिते. वृष्टीच्या पूर्वी अथवा बरोबर गर्जना होत असते, म्हणून गर्जना जी तीच वृष्टि करीत असते अशी कल्पना साहजिक आहे.

सायणांनीं अर्थ निराळा केला आहे. तो अर्थ त्यांच्या भाष्यांत पहा. सायणांसहि मंत्र कठिण वाटल्यामुळें त्यांनी यास्कभाष्य आपल्या भाष्यांत उतरून घेतलें आहे.

वृत्तासाठीं 'तक्षती' 'एकपदी' असें म्हणावें आणि चवथ्या पादांत 'विओमन्' असें वाचावें.

४२. तिजपासून समुद्र वाहतात, आणि तेणेंकरून चारीहि प्रदेश जीवंत राहतात. तिजपासून पाणी पडतें, आणि तेणेंकरून सकळ विश्वाचा निर्वाह चालतो.

42. From her the seas flow in all directions, [and] thereby the four quarters [ of the globe ] live. From her the eternal [ water ] flows, and on this the world lives.

४२. या ऋचेचा अर्थ उघडच आहे. इजवरून इतकें सिद्ध होतें, कीं वरच्या मंत्रांत जी गाय सांगितली, ती मेघगर्जनारूप होय. ती मेघगर्जना म्हणजेच 'माध्यमिका वाक्' होय.

'समुद्र.' म्हणजे मेघ अथवा 'मेघोदकें.' त्यांस 'सिन्धु' अथवा 'समुद्र' असें वेदांत म्हणत असतात.

'चारीहि प्रदेश'='चतस्रः प्रदिशः.' म्हणजे चोहोंकडील प्रदेश, देश. सर्व देश, सर्व पृथिवीवरील देशांतील लोक.

'पाणी'='अक्षरम्.' म्हणजे मेघोदकच. अथवा ज्याला क्षय नाहीं तें. 'अक्षर' शब्दाचा अर्थ उदक असा निर्विवाद होतो हें लक्ष्यांत ठेवावें; कारण कीं, 'अक्षर'शब्दाप्रमाणेंच जो 'ऋत' (=क्षयरहित सत्य) शब्द, त्याचा अर्थ उदक असा होत नाहीं असें पाश्चात्त्य विद्वान् समजतात. तसा अर्थ होतो असें सायणांस अनुसरून सू. १०५ मं.१२ या ठिकाणीं आम्हीं प्रतिपादन केलें आहे, तें पहा.

वृत्तासाठीं तिसऱ्या चरणांत 'क्षरति अक्षरम्' असें वाचावें.

शकमयं धूममारादपश्यं विषूवता पर एनावरेण।
उक्षाणं पृश्निमपचन्त वीरास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ॥४३॥
शकऽमयम्। धूमम्। आरात्। अपश्यम्। विषुऽवता। परः। एना। अवरेण।
उक्षाणम्। पृश्निम्। अपचन्त। वीराः। तानि। धर्माणि। प्रथमानि। आसन्॥ ४३॥

## भाषायाम्.

४३. शकमयं धूमं (=शकन्मयं=शुष्कगोमयसंभूतं धूमम्) आरात् (=दूरात्) अपश्यम् (=अहं दृष्टवान्)। एना विषूवता अवरेण (=अनेन अधरेण अधः पृथिव्यां स्थितेन व्याप्तिमता) [अग्निना] वीराः (=शौर्ययुक्ताः पुमांसः) पृश्निम् उक्षाणं (=विचित्रं वृषम्) अपचन्त (=अपचन्)। तानि धर्माणि (=तान्येव धर्मस्य कर्माणि) प्रथमानि आसन् (=ततः पूर्वं धर्मकर्माणि नासन्)॥

अतिपुरातनकाले जनाश्चित्रवर्णमुक्षाणं पक्त्वा देवेभ्योर्पयामासुः। तस्मिन्युगे स एव धर्मः। सोमाभिषवस्तोत्रकरणयज्ञयागादीनि तु ततोर्वाक् कृतानि जनैरिति भावः॥

सायणस्त्वेवमाह। शकमयं शकन्मयं शुष्कगोमयसंभूतं धूममारात् नातिदूरेपश्यम्। दृष्टवानस्मि। दिवा धूमस्य दूरे दृश्यमानत्वात्स एव दर्शनविषयतयोक्तः। विषुवता व्याप्तिमतैनानेनावरेण निकृष्टेन धूमेन परः परस्तात्तत्कारणभूतमग्निमपश्यम्। अहं यजमान इत्यर्थः किंचोक्षाणं फलस्य सेक्तारं पृश्निं शुभ्रवर्णम्। प्राश्नुते तेन फलमिति स्वयं प्राश्नुत इति वा पृश्निर्वर्णोरूपः सोमः। तं वीरा विविधेरणकुशला ऋत्विजोऽपचन्त। अत्र धात्वर्थानादरेण तिङ्प्रत्ययः करोत्यर्थः। स च क्रियासामान्यवचनोऽत्रौचित्यादभिषवेण संपादितवन्त इत्यर्थः। तानि तत्साधनानि धर्माण्यनुष्ठानानि प्रतमानि प्रकृष्टानि फलपर्यवसानीयान्यासन्। संपादितान्यभवन्। यद्वा सोम उक्षाभवत् पूर्वं तं देवाः शकतापचन्यज्ञार्थे तद्भवो धूमो मेघ आसीत् तदुच्यते। तत्परत्वेन वा मन्त्रो व्याख्येयो विचक्षणैः। इति॥

४३. मी गोरीचा धूर दूरून पाहिला. त्याच्या पलीकडे सर्वत्र पसरणारा जो हा खालीं असलेला [ अग्नि ] त्याच्या योगानें चित्रविचित्र बैलाला शूर पुरुष शिजवीत असत. तो पहिला धर्म असे.

43. I saw at a distance smoke coming from burning cow-dung. Yonder by means of this netherlying and spreading [ Agni ] the heroes cooked a variegated bull. Those were the first acts of religion.

---

४३. अति प्राचीनकाळीं धर्म म्हणजे कशाला म्हणत, तें यांत सांगितलें आहे. ‘ गोऱ्या जमवून त्यांच्या विस्तवानें, एक सुंदर असा बैल शिजवीत, आणि तो देवांस अर्पण करीत. यालाच प्रथम धर्म असें म्हणत; सोम अर्पण करणें, स्तोत्रें म्हणणें इत्यादिक जे धर्म, ते मागाहून प्रचारांत आले ’ असा अभिप्राय.

‘ पाहिला ’=‘ अपश्यम्. ’ म्हणजे बोलणारा अशी कल्पना करीत आहे कीं, प्राचीन काळीं बैल शिजवीत तो आपण प्रत्यक्ष पाहत आहे, आणि त्याप्रमाणें तो बोलत आहे.

‘ त्याच्या पलीकडे ’=‘ परः. ’ म्हणजे धुराच्या पलीकडे, धुराच्या आड.

‘ खालीं असलेला ’=‘अवरेण.’ म्हणजे पृथिवीवर वास करणारा जो अग्नि देव, तोच. सूक्ताचा १७ वा आणि १८ वा हे मंत्र पहा, म्हणजे त्यांत ‘ अवर ’ म्हणजे भूमिगत देव अग्नि होय, असें समजावयाचें आहे, तें समजेल. अथवा ‘ अवर ’ म्हणजे धुराच्या खालीं असलेला म्हणून ‘ अवर. ’

‘ शूर पुरुष ’=‘ वीराः. ’ म्हणजे ऋत्विज्, उपासक.

वृत्तासाठीं ‘ प्रथमानि आसन् ’ असा उच्चार करावा.

त्र॒यः के॒शिन॑ ऋतु॒था वि च॑क्षते संवत्स॒रे व॑पत॒ एक॑ एषाम् ।
विश्व॒मेको॑ अ॒भि च॑ष्टे॒ शचीभि॒र्ध्राजि॒रेक॑स्य ददृशे॒ न रू॒पम् ॥४४॥

त्र॒यः । के॒शिनः॑ । ऋ॒तु॒ऽथा । वि । च॒क्ष॒ते॒ । सं॒व॒त्स॒रे । व॒प॒ते॒ । एकः॑ ।
एषा॒म् ।

विश्व॑म् । एकः॑ । अ॒भि । च॒ष्टे॒ । शची॑भिः । ध्राजिः॑ । एक॑स्य । द॒दृ॒शे॒ ।
न । रू॒पम् ॥ ४४ ॥

---

## भाषायाम्.

४४. केशिनः (=बहुकेशास्) त्रयो [देवा] [जगद्] ऋतुथा (=यथाकालं) वि चक्षते (=विविधं पश्यन्ति)। एषाम् एकः (=तेषां मध्य एकोग्निः) संवत्सरे वपते (=संवत्सरेतीते सति "दाहेन केशस्थानीयौषधिवनस्पत्यादिकच्छेदनेन नापितकार्यं करोति")। एकः (=अन्यः=आदित्यो) विश्वं (=सकलं जगत्) शचीभिः (=स्वकीयैः प्रकाशनवृष्ट्यादिकर्मभिः) अभि चष्टे (=अभितः पश्यति=प्रकाशयति)। एकस्य (=तृतीयस्य=वायोर्).ध्राजिः (=गतिर्) [ददृशे=दृश्यते] न [तु] रूपं ददृशे (=दृश्यते)॥

४४. केंसाळ [ असे ] तिघे-जण [ आपआपल्या ] काळीं वेगवेगळ्या प्रकारेंकरून [जगाचें] अवलोकन करितात. त्यांतून एक प्रतिवर्षीं वपन करितो. दुसरा [ आपल्या ] पराक्रमांनीं विश्वावर कृपावलोकन करितो. तिसऱ्याची गति दृष्टीस पडते, [ पण ] रूप [ दृष्टीस पडत ] नसतें.

44. Three hairy [gods] look over [ the world ] each in his own season. One of them shears [ the world ] once a year; another shines on the world with all [ his ] energies. Of the third the motion is visible [ but ] not the form.

४४. यांतहि एक उखाणा आहे. तो असा कीं, ' केसाळ असे कोंणीएक तिघे पुरुष आपआपल्या काळाप्रमाणें जगामध्यें कार्यें करितात. त्यांतून एक प्रतिवर्षीं जगाचें वपन करितो; दुसरा आपल्या प्रतापानें विश्वाचें अवलोकन करितो; आणि तिसऱ्याची गति दृष्टीस पडते, पण त्याचें रूप अदृश्य आहे. तर हे तिघे कोण ते सांगा. '

उत्तर सायणाचार्य देतात तें असें:— पहिला अग्नि, तो प्रतिवर्षीं अरण्यें जाळून पृथिवीचें जणुं वपन करितो; दुसरा सूर्य. आणि तिसरा वायु; त्याची चाल आमच्या इंद्रियांस गोचर आहे, पण त्याचें रूप दृष्टीस पडत नाहीं हें उघड आहे. याप्रमाणेंच उत्तर आहे यांत संशय दिसत नाहीं. तिसरा वायुच घ्यावयाचा हें ' ध्राजि 'शब्दावरून उघड आहे. कारण जेथें जेथें ' ध्राजि 'शब्द वेदांत आला आहे तेथें तेथें तो वायूच्या गतीचाच वाचक आहे. ऋ. १०. १३६. २ आणि १०. ९७. १३ पहा.

चत्वारि वाक् परिमिता पदानि तानि विदुर्ब्राह्मणा ये मनीषिणः।
गुहा त्रीणि निहिता नेङ्गयन्ति तुरीयं वाचो मनुष्या वदन्ति ॥४५॥

चत्वारि । वाक् । परिऽमिता । पदानि । तानि । विदुः । ब्राह्मणाः । ये । मनीषिणः ।
गुहा । त्रीणि । निऽहिता । न । इङ्गयन्ति । तुरीयम् । वाचः । मनुष्याः । वदन्ति ॥ ४५ ॥

---

## भाषायाम्.

४५. चत्वारि वाक्पदानि परिमिता (=वाचश्चत्वारि स्थानानि रूपाणि परिमितानि परिगणितानि सन्ति) । ये ब्राह्मणा मनीषिणः (=मेधाविनः) [सन्ति] [ते] तानि [चत्वारि पदानि] विदुः (=जानन्ति) । [तेषां] त्रीणि [पदानि] गुहा निहिता (=गुहायां निहितानि=अन्तर्हितानि) [सन्ति] न इङ्गयन्ति (=न चेष्टन्ते=न प्रकाशन्ते) । तुरीयं वाचः (=वाचस्तुरीयं चतुर्थं) [पदं] मनुष्या वदन्ति (=व्यवहरन्ति) ॥

कानि तानि चत्वारीत्यत्र बहवः स्वस्वमतानुरोधेन बहुधा वर्णयन्ति । ओम् भूः भुवः स्वः इति चत्वारीति केचन वेदवादिनः ॥ नामक्रियोपसर्गनिपातरूपाणि चत्वारीति वैयाकरणाः ॥ मन्त्राः कल्पो ब्राह्मणं चतुर्थी लौकिकीति याज्ञिकाः ॥ ऋग्यजुःसामानि चतुर्थी व्यावहारिकीति नैरुक्ताः ॥ सर्पाणां वाग् वयसां क्षुद्रसरीसृपस्य च चतुर्थी व्यावहारिकीत्यैतिहासिकाः ॥ पशुषु तूणवेषु मृगेष्वात्मनि चेत्यात्मवादिनः ॥ "परा पश्यन्ती मध्यमा वैखरीति चत्वारीति योगिनः । तत्र एकैव नादात्मिका वाक् मूलाधारादुदिता सती परेत्युच्यते । नादस्य च सूक्ष्मत्वेन दुर्निरूपत्वात् सैव हृदयगामिनी पश्यन्तीत्युच्यते योगिभिर्द्रष्टुं शक्यत्वात् । सैव बुद्धिं गता विवक्षां प्राप्ता मध्यमेत्युच्यते । मध्ये हृदयाख्य उदीयमानत्वान्मध्यमायाः । अथ यदा सैव वक्के स्थिता ताल्वोष्ठादिव्यापारेण बहिर्निर्गच्छति तदा वैखरीत्युच्यते । एवं चत्वारि वाचः पदानि परिमितानि । मनीषिणो मनसः स्वामिनः स्वाधीनमनस्का ब्राह्मणा वाच्यस्य शब्दब्रह्मणोधिगन्तारो योगिनः परादिचत्वारि पदानि विदुः । जानन्ति । तेषु मध्ये त्रीणि परादीनि गुहा निहितानि । हृदयान्तर्वर्तित्वात् । तुरीयं तु पदं वैखरीसंज्ञकं मनुष्याः सर्वे वदन्ति" इति सायणाचार्यभाष्यसारः ॥

अथापि च ब्राह्मणं भवति । सा वै वाक् सृष्टा चतुर्धा व्यभवदेष्वेव लोकेषु त्रीणि

४५. वाणीचीं चार रूपें गणिलेलीं आहेत. जे ब्राह्मण प्रज्ञावान् [ आहेत ] त्यांस तीं अवगत असतात. [ त्यांतून ] तीन [रूपें] गुप्त आहेत, तीं समजण्यांत येत नाहींत. वाणीचें जें चवथें रूप, तें मनुष्यें बोलत असतात.

45. Four forms are counted of voice. Those Brâhmaṇas know them who are wise. Three are secret and do not manifest themselves. The fourth form of voice [ is what ] men speak.

४५. यांत एक दुसरा उखाणा आहे, तो हाः ' वाचेचीं चार रूपें आहेत; तीं चारीहि प्रज्ञावान् ब्राह्मण जे असतोल, त्यांस ठाऊक आहेत. त्यांतून तोन तर गुप्त असून बाहेर दिसत अथवा ऐकूं येत नाहींत. चवथें रूप जें तेंच मनुष्यें बोलत असतात. तर हीं चार रूपें कोणतीं तीं सांगा. '

हीं चार रूपें कोणतीं त्याविषयीं अनेक उत्तरें अनेक मतानुसारी लोकांनीं आपआपल्या मतानुरोधेंकरून दिलीं आहेत. वैय्याकरण, याज्ञिक, नैरुक्त, ऐतिहासिक, आत्मवादी, योगी, यांच्या मतांप्रमाणें चार रूपें वेगवेगळीं सांगितलीं आहेत, तीं भावेखालीं पहा.

वरच्या ४१व्या आणि ४२व्या ऋचांशीं या ऋचेचा संबंध आहे असें मानिलें तर द्युलोकीं देव बोलतात ती एक, अंतरिक्षांत मेघादिकांची दुसरी, पृथिवीवरील पशुपक्ष्यादिकांची तिसरी, आणि मनुष्यें बोलतात ती चवथी, मिळून चार भाषा येथें उद्दिष्ट असतील तर कोण जाणे. त्यांतून पहिल्या तिहींचें तात्पर्य कोणास समजत नाहीं म्हणून त्या गुप्त होत, असें कदाचित् असेल.

' वाणोचीं......रूपें'='वाक्...... पदानि. ' ' वाक् ...... पदानि ' हीं रूपें अवश्य ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत. ' वाक्पदानि ' असें समस्त पद असून ' वाक् ' आणि ' पदानि ' यांच्या मध्यें ' परिमिता ' असें एक दुसरें पद आलें त्यामुळें ' वाचः पदानि ' असें व्हावें तरी ' वाक् पदानि' असेंच राहिलें. म्हणजे समासांतील पदें समासाबाहेर पडलीं तरी समासांत असल्याप्रमाणेंच त्यांचीं रूपें होतात त्याचें हें ऋग्वेदांत पहिलेंच उदाहरण आहे. मराठी कवितेंतहि अशीं उदाहरणें पुष्कळ येतात. विशेषेंकरून तुकारामाच्या अभंगांत येतात. उदाहरणार्थः—तुका म्हणे हरी । सूत्र तुम्हां हातीं दोरी ॥

इन्द्रं॑ मि॒त्रं वरु॑णम॒ग्निमा॑हु॒रथो॑ दि॒व्यः स सु॑प॒र्णो ग॒रुत्मा॑न् ।
एकं॒ सद्विप्रा॑ बहु॒धा व॑द॒न्त्य॒ग्निं य॒मं मा॑त॒रिश्वा॑नमाहुः ॥४६॥२२॥

इन्द्र॑म् । मि॒त्रम् । वरु॑णम् । अ॒ग्निम् । आ॒हुः॒ । अथो॒ इति॑ । दि॒व्यः ।
सः । सु॒ऽप॒र्णः । ग॒रुत्मा॑न् ।
एक॑म् । सत् । विप्राः॑ । ब॒हु॒धा । व॒द॒न्ति॒ । अ॒ग्निम् । य॒मम् । मा॒त॒रि-
श्वा॑नम् । आ॒हुः॒ ॥ ४६ ॥ २२ ॥

---

व्ये । या दिवि सादित्ये सा बृहती सा स्तनयित्नावथ पशुषु ततो या वागत्यरिच्यत तां ब्राह्मणेष्वदधुः । तस्माद्ब्राह्मणा उभयीं वाचं वदन्ति या च देवानां या च मनुष्याणामिति । इति ॥

---

## भाषायाम्.

४६. [ अमुं ] मित्रं वरुणम् अग्निम् [ इति बहुभिर्नामभिर् ] आहुः ( =वदन्ति ) । अथो (=अपि च ) [ यो ] दिव्यः सुपर्णो गरुत्मान् (=दिवि चरन् सुपतत्री पक्षीति प्रसिद्धः सोपि ) स [ एव ] । एकं सत् (=एकमेव वर्तमानं यद् वस्तु तद् ) विप्रा बहुधा वदन्ति (=मेधाविनः पुमांसो बहुभिः प्रकारैर्वदन्ति ) । [ तमेव महापुरुषम् ] अग्निं यमं मातरिश्वानम् आहुः (=अग्निर्यमो मातरिश्वेति नामभिः ख्यापयन्ति ) ॥

सायण एवं व्याचष्टे । अमुमादित्यमैश्वर्यविशिष्टमिन्द्रमाहुः । तथा मित्रं प्रमीतेर्मरणात्त्रातारमहरभिमानिनमेतन्नामकं देवं तमाहुः । वरुणं पापस्य निवारकं रात्र्यभिमानिनं देवमाहुः । तथाग्निमङ्गनादिगुणविशिष्टमेतन्नामकमाहुः । अथो अपि चायमेव दिव्यो दिवि भवः सुपर्णः सुपतनो गरुत्मान् गरणवान् पक्षवान् वा । एतन्नामको यः पक्ष्यस्ति सोऽप्ययमेव । कथमेकस्य नानात्वमिति उच्यते । अमुमेवादित्यमेकमेव वस्तुतः सन्तं विप्रा मेधाविनो देवतातत्त्वविदो बहुधा वदन्ति । तत्तत्कार्यकारणेनेन्द्राद्यात्मकं वदन्ति । एकैव वा महानात्मा देवता सूर्य इत्याचक्षत इत्युक्तत्वात् । किंच तमेव वृष्ट्यादिकारणं वैद्युताग्निं यमं नियन्तारं मातरिश्वानमन्तरिक्षे श्वसन्तं वायुमाहुः । सूर्यस्य ब्रह्मणोऽनन्यत्वेन सर्वात्म्यमुक्तं भवति । अत्र ये केचिदग्निः सर्वा देवता इत्यादि श्रुतितोऽयमेवाग्निरुत्तरे अपि ज्योतिषी इति मत्वाग्नेरेव सर्वात्म्यप्रतिपादकोऽयं मन्त्र इति वदन्ति । तत्पक्षे प्रथमोऽग्निशब्द उद्देश्यः । तमग्नि[illegible]न्द्राद्यात्मकत्वकथनम् । अयं मन्त्रो निरुक्त एवं व्याख्यातः । इममेवाग्निं महान्तमा-

४६. [ कोणी ] इंद्र, मित्र, वरुण, [ अथवा ] अग्नि [ असें ] म्हणतात. आणि सुपक्ष जो द्युलोकींचा पक्षी तोहि तोच होय. वस्तुतः जी एकच वस्तु, तिला विद्वान् लोक अनेक नांवें देतात. [ त्यालाच ] अग्नि, यम, [आणि] मातरिश्वा [ असें ] म्हणतात.

46. They call [ him ] Indra, Mitra, Varuṇa [ and ] Agni. Also he [ is the same as ] the heavenly Bird of excellent wings. The sages name the One Being in various ways. They call [ him ] Agni, Yama [ and ] Mâtaris'vâ.

४६. यांत आदित्यरूपानें जो परमेश्वर व्यक्त आहे त्याविषयीं मोठा उखाणा आहे. ' कोणीएक वस्तु एकच असतां तिला इंद्र, मित्र, वरुण, दिव्य गरुत्मान्, दिव्य सुपर्ण, यम, मातरिश्वा, इत्यादि नांवांनीं हाक मारितात. तर ही वस्तु कोण ?' परमेश्वर विवक्षित आहे.

सायणाचार्यांनीं असाच अर्थ केला आहे, तो भाषेखालीं पहा.

वेदांत, म्हणजे संहिताभागांत, अनेक देवांची भक्ति आणि स्तुति आहे, एका परमेश्वराचें प्रतिपादन नाहीं, असें म्हणतात; आणि तें बहुतेक अंशीं खरें आहे. पण केव्हां केव्हां अशीं वचनें त्यांतच दृष्टीस पडतात कीं, अनेक देव जे सांगितले आहेत ते वस्तुतः अनेक नसतां एकच देवाचीं तीं अनेक नांवें आहेत. हीं जीं थोडीं वचनें त्यांपैकीं ही एक ऋचा होय. आणि याच कारणामुळें ही ऋचा मोठ्या महत्त्वाची आणि फार प्रसिद्धीस आलेली अशी आहे.

' सुपक्ष जो द्युलोकींचा पक्षी '=' दिव्यः सुपर्णो गरुत्मान्. ' म्हणजे सूर्य अथवा आदित्य. सू. ३५ मं. ७ आणि त्याजवरील टीप पहा.

' यम. ' सू. ३५ मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

' मातरिश्वा. ' सू. ३१ मं. ३ आणि सू. ५८ मं. ६ आणि टीप पहा.

कृष्णं नियानं हरयः सुपर्णा अपो वसाना दिवमुत्पतन्ति ।
त आववृत्रन्त्सदनादृतस्यादिद्घृतेन पृथिवी व्युद्यते ॥ ४७ ॥

कृष्णम् । निऽयानम् । हरयः । सुऽपर्णाः । अपः । वसानाः । दिवम् । उत् । पतन्ति ।
ते । आ । अववृत्रन् । सदनात् । ऋतस्य । आत् । इत् । घृतेन । पृथिवी । वि । उद्यते ॥ ४७ ॥

---

त्मानमेकमात्मानं बहुधा मेधाविनो वदन्ति इन्द्रं मित्रं वरुणमग्निं दिव्यं च गरुत्मन्तं । दिव्यो दिविजो गरुत्मान् गरणवान् गुर्वात्मा महात्मेति वा । नि० ७. १८ । इति ॥

---

## भाषायाम्.

४७. सुपर्णाः (=शोभनपत्राः=शोभनपक्षा) हरयः (=हरिद्वर्णा रश्मिरूपा अश्वाः) अपो वसानाः (=उदकानि परिदधानाः=बाष्परूपमुदकं परिदधानाः सन्तः) कृष्णं नियानं (=कृष्णवर्णमन्धकारमयमध्वानं=तादृशेनाध्वना) दिवम् उत् पतन्ति (=द्युलोकं प्रति पक्षिवदुत्पतन्ति) । [पश्चात्] ते [रश्मिरूपा हरयः] ऋतस्य सदनात् (=सत्यभूतस्यादित्यस्य स्थानात्=द्युलोकात्) आ अववृत्रन् (=आवर्तन्ते= पुनरावर्तन्ते) । आद् इत् (=तदानीमेव=यदागच्छन्ति तत्क्षणमेव) पृथिवी घृतेन (=घृतवच्छ्लक्ष्णेनोदकेन) वि उद्यते (=विविधं सर्वत्र क्लिद्यते=तत्क्षणमेव सर्वत्र वृष्टि- र्जायते) ॥

४७. उदक[बाष्प] पांघरणारे आणि उत्तम पांख असलेले पिवळे घोडे अंधारमय मार्गानें द्युलोकाप्रत उडून जातात. ते अविनाशी [आदित्या]च्या स्थानापासून परत येत असतात. [आणि] आल्याबरोबर पृथिवी घृतानें सर्वत्र भिजून जाते.

47. The winged tawny horses, clad in the water-mists fly up to Heaven along the dark path. They return from the home of the Eternal Truth. As soon as they come the earth is everywhere bathed with the rich water.

४७. यांत आदित्याच्या किरणांविषयीं उखाणा आहे. 'ज्यांला उत्तम पांख आहेत, जे उदकबाष्परूपी वस्त्रें पांघरलेले असतात, जे अंधारानें भरलेल्या रस्त्यानें स्वर्गी उडून जातात, आणि जे सनातनाच्या माहेरापासून परत पृथिवीवर आल्याबरोबर, सकळ पृथिवी घृतासारिख्या पोषक उदकानें भिजून चिंप होते, ते कोण? तें सांगा.' आदित्याचे किरण विवक्षित आहेत.

'उदकबाष्प पांघरणारे'=' अपो वसानाः.' म्हणजे पृथिवीवरील उदकें बाष्परूपानें आकर्षण करून नेणारे. उदकबाष्पास (म्हणजे धुक्यास) वस्त्राची उपमा देणें हें स्वाभाविक आहे.

'अंधारमय मार्गानें'=' कृष्णं नियानम्.' म्हणजे अंतरिक्षांतील जे प्रदेश त्यांत. सू. ३५ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

'अविनाशी [आदित्या]च्या स्थानापासून'=' ऋतस्य सदनात्.' अक्षरशः सत्य अथवा खरा जो, त्याच्या घरापासून. 'ऋत' हा शब्द आदित्य याचें नांव, यादाखल योजिला जातो याविषयीं सू. १३६ मं. २ आणि त्याजवरील टीप पहा.

'घृतानें भिजून जाते'=' घृतेन उद्यते.' म्हणजे पाऊस पडत असतो. पृथिवीवर पाऊस पडतो, तो सूर्याचे किरण घेऊन येतात अशी कल्पना वेदांत कोठेंकोठें आहे. तिला अनुसरून यांत ऋषि बोलत आहे.

वृत्तासाठीं 'वि उद्यते' असें वाचावें.

यस्ते स्तनः शशयो यो मयोभूर्येन विश्वा पुष्यसि वार्याणि ।
यो रत्नधा वसुविद्यः सुदत्रः सरस्वति तमिह धातवे कः ॥४९॥
यः । ते । स्तनः । शशयः । यः । मयःऽभूः । येन । विश्वा । पु-
ष्यसि । वार्याणि ।
यः । रत्नऽधाः । वसुऽवित् । यः । सुऽदत्रः । सरस्वति । तम् । इह ।
धातवे । करिति कः ॥ ४९ ॥
यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।
ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ५०
यज्ञेन । यज्ञम् । अयजन्त । देवाः । तानि । धर्माणि । प्रथमानि ।
आसन् ।
ते । ह । नाकम् । महिमानः । सचन्त । यत्र । पूर्वे । साध्याः । सन्ति ।
देवाः ॥ ५० ॥

---

## भाष्यार्थ.

४९. हे सरस्वति, ते (=तव) यः स्तनः शशयः (=शश्वत्पूर्णदुग्धो) यो मयोभूः (=कल्याणस्य भावयिता) येन विश्वा (=विश्वानि=सर्वाणि) वार्याणि (=धनानि) पुष्यसि (=वर्धयसि) यो रत्नधाः (=बहुविधरमणीयरत्नानां धारयिता दाता) वसुवित् (=धनस्य लम्भयिता) [च] यः सुदत्रः (=सुदानः=महोदारश्च) [भवति] तं [स्तनम्] इह (=अत्र स्थले=अस्मदर्थे) धातवे (=पातुं पानाय) कः (=कुरु=पानायास्मभ्यं देहि) ॥

५०. देवाः (=कर्मदेवाः=पूर्वं मनुष्याः सन्तोपि पश्चात् स्वकीयैः कर्मभिर्देवत्वं प्राप्ता उपासका) यज्ञेन (=यजनकर्मणा) यज्ञम् अयजन्त (=यज्ञम् अकुर्वत)। तानि धर्माणि (=धर्मकर्माणि) प्रथमानि (=अपूर्वाणि) आसन्। ते ह (=ते खलु पूर्वोक्ताः कर्मदेवा) महिमानः (=महान्तो देवा) [भूत्वा] नाकं (=स्वर्गं) सचन्त (=प्राप्ताः)। यत्र (=नाके) पूर्वे (=पुरातनाः) साध्याः (=यज्ञादिसाधनेन प्राप्तदेवत्वा एतन्नामका) देवाः सन्ति (=निवसन्ति) ॥

४९. हे सरस्वति, जो तुझा स्तन पूर्ण भरलेला होय, जो सुखदायक होय, ज्याच्या योगानें सकल धनाला वृद्धिंगत करितेस, जो उत्तम धन देणारा, संपत्ति प्राप्त होई असें करणारा, जो महोदार, तो स्तन आम्हांला पिण्यास दे.

49. That breast of thine, O Sarasvatî, which is inexhaustible, which gives happiness, with which thou nourishest all excellent wealth, which gives riches [ and ] guides to prosperity, [ and ] which is bountiful, give [us] that here to suck.

५०. यज्ञाच्या योगानें देव यज्ञ करिते झाले. तोच पहिला धर्म होय. ते मोठे होऊन स्वर्गाप्रत गेले, जेथें पुरातन काळचे साध्य देव राहतात.

50.. The gods performed a sacrifice by means of a sacrifice. Those were the first religious acts. They [ having become ] great beings went to heaven, where the ancient divine Sâdhyas live.

---

४९. हा मंत्र सरस्वती या देवीविषयीं आहे. ती जी सरस्वती माता, ती सकळ जगताला आपलें थान पाजते आणि तेणेंकरून सकळ जगत् सुखी होतें आणि सर्व धनांच्या उपभोगाप्रत पावतें आणि धनसंपन्न होतें. तर ती सरस्वती आई, तें आपलें थान आम्हांस पाजो असें ऋषीचें म्हणणें या मंत्रांत आहे. सरस्वती ही कोण देवी होय याविषयीं सू. ८९ मं. ३ आणि टीप पहा.

‘पूर्ण भरलेला’=‘शशयः.’ ‘शशय’शब्द ऋक्संहितेंत जेथें जेथें आला आहे तेथें तेथें ‘निजून राहिलेला’ असा सायणांनी अर्थ केला आहे, पण या सर्व ठिकाणीं आम्हीं येथें दिलेला अर्थ चांगला संभवतो. ‘निजून राहिलेला,’ पडलेला नव्हे, यावरून ‘पुष्ट,’ ज्यानें भरलेला असा अर्थ व्हावा.

वृत्तासाठीं ‘वारिआणि’ असें वाचावें लागतें.

५०. तात्पर्यः—‘या पृथिवीवर उपासक लोकांनीं प्रथम यज्ञ जो तेंच धर्मकृत्य केलें. त्याशिवाय दुसरा धर्म कोणताहि प्रथम ठाऊक नसे. ते उपासक जन त्या यज्ञाच्या योगानें मोठे देव होऊन स्वर्गी जाऊन इतर देवांत मिळाले. याप्रमाणें यज्ञाचें पुरातनत्व, धर्मसंबंधी प्रधानत्व, आणि महत्त्व आहे.’

‘यज्ञाच्या योगानें यज्ञ करिते झाले’=‘यज्ञेन यज्ञम् अयजन्त.’ या शब्दांच्या

समानमेतदुदकमुच्चैत्यव चाहभिः ।
भूमिं पर्जन्या जिन्वन्ति दिवं जिन्वन्त्यग्नयः ॥ ५१ ॥
समानम् । एतत् । उदकम् । उत् । च । एति । अव । च । अहऽभिः ।
भूमिम् । पर्जन्याः । जिन्वन्ति । दिवम् । जिन्वन्ति । अग्नयः ॥ ५१ ॥

**भाषायाम्.**

५१. एतद् (=वक्ष्यमाणम्) उदकं समानम् (=एकरूपं) [भवति] । [तत्] उच्च एति (=ऊर्ध्वं स्वर्गं प्रति हवीरूपेण गच्छति) अहोभिः (=कतिपयेषु दिनेषु च) अव च [एति] (=अधस्तात्=पृथिवीं प्रत्यपि मेघोदकरूपेणागच्छति) । पर्जन्या [हि] (=मेघा हि) भूमिं जिन्वन्ति (=पृथिवीं=पृथिवीनिवासिनः प्राणिनः प्रीणयन्ति) दिवं (=द्युलोकं=द्युलोकनिवासिनो देवांश्च) अग्नयो जिन्वन्ति (=आहवनीयाद्याः पृथिवीनिवासिभिः समिद्धा अग्नयः प्रीणयन्ति) ॥

मेघोदकं यथा पृथिवीनिवासिनो जनान् जीवयति पृथिवीनिवासिभिरग्निषु प्रार्पितं हविर्द्युनिवासिनो देवांस्तथैव जीवयतीत्यर्थः ॥

अर्थाविषयीं कांहीं थोडासा विवाद आहे. सायणांनीं दोन तीन वेगवेगळे अर्थ सूचविले आहेत. त्यांतून एक हा कीं, 'यजमान लोक पूजनीय अग्नीला मंथनानें उत्पन्न करून यज्ञ करिते झाले.' या पहिल्या पादाच्या अक्षरार्थाविषयीं कांहीं वाद असला तरी, प्रथम मनुष्यांनीं यज्ञ केला, आणि त्यापूर्वी दुसरा धर्म ठाऊक नव्हता, आणि तो जो यज्ञ केला तेणेंकरून ते लोक स्वर्गी गेले असा भावार्थ आहे यांत संशय नाहीं. 'देव यज्ञ करिते झाले' म्हणजे जे मागाहून देवत्वाप्रत पावले त्यांनीं प्रथमपासून धर्मस्थापना करूनच ते स्वर्गी गेले.

'साध्य'=' साध्याः.' म्हणजे अंगिरआदिक जे ऋषि देव होऊन स्वर्गी राहिले आहेत, ते.

हा मंत्र प्रसिद्ध आहे, आणि मंत्रपुष्पांजलि देतांना वगैरे म्हणण्यांत येत असतो.

वृत्तासाठीं 'प्रथमानि आसन्' आणि 'साधिआः' असें म्हणावें लागतें.

५१. हें एकच उदक आहे. [ तें कांहीं दिवस ] वर जातें आणि कांहीं दिवस खालीं येतें. मेघ पृथिवीला तृप्त करितात [आणि] अग्नि [ जे आहेत ते ] द्युला तृप्त करितात.

51. This [is] one and the same water. It travels up wards and it also travels downwards for some days. The clouds refresh the earth, the [sacrificial] fires refresh the heaven.

---

५१. 'जसें मेघांचें पाणी भूमीवर उतरून मनुष्यादिकांस सुखी करितें, तसें भूमीवर मनुष्यांनीं अग्नींत अर्पण केलेलें हवि आकाशांत चढतें आणि तेथील देवांस सुखी करितें. मेघोदकांची जशी मनुष्यादिक प्राणी वाट पाहत राहतात, तसे देवलोक हवीरूप उदकाची वाट पाहत राहतात. दोन्हीं एकसारिखींच उदकें आहेत ' असें तात्पर्य.

' कांही दिवस '='अहोभिः.' म्हणजे पावसाळ्याच्या दिवसांत.

'अग्नि.' हे अग्नि म्हणजे हवि अर्पण करण्याकरितां लोकांनीं आपआपल्या घरीं पेटविलेले जे विस्तव ते.

' द्युला '=' दिवम्.' देव कैलासावर अथवा वैकुंठीं अथवा ब्रह्मलोकीं राहतात इत्यादि कल्पना आधुनिक आहेत. वेदकाळीं देव देदीप्यमान जो अंतरिक्षावरील प्रदेश, तेथें राहतात असें समजत असत. आणि तो जो द्युलोक त्यालाच स्वर्ग असें मानीत. हिमालयाच्या एका टेंकडीवर कांहीं, दुसऱ्या टेंकडीवर दुसरे कांहीं, असे देव राहूं लागले ते पौराणिक काळीं राहूं लागले.

ह्याचें वृत्त अनुष्टुभ्. दुसरा चरण ' उच्चैति अव चाहभिः.' आणि चवथा 'दिवं जिन्वन्ति अग्नयः' असा म्हणावा.

दि॒व्यं सु॑प॒र्णं वा॑य॒सं बृ॒हन्त॑म॒पां गर्भं॑ द॒र्श॒तमोष॑धीनाम् ।
अ॒भी॒प॒तो वृ॒ष्टिभि॑स्त॒र्पय॑न्तं॒ सर॑स्वन्तम॒वसे॑ जोहवीमि ।५२।२३।२२

दि॒व्यम् । सु॒ऽप॒र्णम् । वा॒य॒सम् । बृ॒हन्त॑म् । अ॒पाम् । गर्भ॑म् । द॒र्श॒तम् ।
ओष॑धीनाम् ।
अ॒भी॒प॒तः । वृ॒ष्टिऽभिः॑ । त॒र्पय॑न्तम् । सर॑स्वन्तम् । अव॑से । जो॒ह॒वी॒मि ।
॥ ५२ ॥ २३ ॥ २२ ॥

---

भाषायाम्.

५२. दिव्यं (=दिवि भवं) वायसं (=गमनशीलम् अतिशीघ्रं) सुपर्णं (=पक्षिणं) बृहन्तं (=महान्तम्) अपाम् ओषधीनां [ च ] दर्शतं गर्भम् (=उदकानामोषधीनां च रमणीयं बालम्) [ अपि च ] अभीपतः (=आनुकूल्येन) वृष्टिभिस्तर्पयन्तं (=जगत् प्रीणयन्तं) सरस्वन्तम् (=एतन्नामकं देवम्) अवसे (=रक्षणाय) जोहवीमि (=पुनःपुनराह्वयामि) ॥

सायणस्तु सरस्वन्तम् उदकवन्तम् । सर इत्युदकनाम । देवं सूर्यं वा । इति ।

५२. द्युलोकांतील जो अति चपळ महापक्षी, जो महान्, जो उदकांचा आणि ओषधींचा सुंदर बाळ, जो प्रसन्न होऊन वृष्टींच्या योगानें [ जगाला ] तृप्त करितो, त्या सरस्वान् देवाला मी संरक्षणाकरितां पुनःपुनः बोलावितों.

52. I invoke again and again for protection Sarasvân, the swift heavenly bird, the vast, the beautiful fœtus of the waters [ and ] of the plants, who favourably refreshes the world with showers.

५२. 'सरस्वान्' या नांवाचा जो देव, त्याला मी पुनःपुनः स्तुति करून विनवितों कीं, 'त्याणें येऊन माझें संरक्षण करावें. तो आकाशांतून मोठ्या झपाट्यानें उडणारा महापक्षी होय, जो उदकांचा आणि वनस्पतींचा सुंदर गर्भ अथवा बाळ होय, आणि जो उदकवृष्टींच्या योगानें जगावर कृपा करून त्याला संतृप्त करणारा होय,' असा या मंत्राचा भावार्थ आहे.

यांत जो सरस्वान् देव सांगितला तो वेदांत फार प्रसिद्ध नाहीं तरी कितीएक ठिकाणीं आला आहे. त्याचें स्वरूप या मंत्रावरून दिसून येतें त्यापेक्षा विशेष त्याविषयीं कांहीं अवगत नाहीं, आणि असण्याचा संभवहि नाहीं. उदकांचा संरक्षण करणारा आणि तेणेंकरून जगाला तृप्त करणारा तो देव आहे. तो सूर्यरूपच होय.' कारण 'दिव्य सुपर्ण' हें सूर्याचें नांव आहे. आणि ह्या ऋचेवरून इतकेंहि स्पष्ट दिसतें कीं सूर्य आणि अग्नि हे एकरूपच होत. कारण 'अपां गर्भः' आणि 'ओषधीनां गर्भः' हीं अग्नीचीं वाचकें होत. ( ऋ. ३. १. १३ आणि भाष्य पहा ).

'द्युलोकांतील ......पक्षी'='दिव्यः सुपर्णः.' आकाशांतून सूर्य पक्ष्याप्रमाणें धावतो म्हणून हें नांव पडलें आहे. सू. ३५ मं. ७ पहा.

'उदकांचा [ आणि ] ओषधींचा... बाळ'='अपाम् ओषधीनां गर्भः.' विजेच्या रूपानें अग्नि पाण्यांच्या उदरांतून जणुं पडतो म्हणून उदकांचा बाळ; आणि लांकडाला घांसून बाहेर काढिला जातो म्हणून ओषधींचा बाळ, हें अग्नीचें वर्णन होय. 'जो सरस्वान् म्हणजे केवळ अग्निच होय' असा भावार्थ.

ह्या सूक्ताचा येथें उपसंहार झाला.

## सूक्तम् १६५.

आद्ये द्वे ऋषिवाक्यम् । तृतीया पञ्चमी सप्तमी नवमी चेत्येता मरुद्वाक्यभूताः । चतुर्थी षष्ठ्यष्टमी दशम्येकादशी द्वादशी चेत्येता इन्द्रवाक्यभूताः । अन्त्यास्तिस्रः पुनरपि ऋषिवाक्यभूताः । कृत्स्नस्य सूक्तस्य स्यादगस्त्यः कर्ता । कृत्स्नस्य सूक्तस्य मरुत्वानिन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**कया॑ शु॒भा सव॑यसः॒ सनी॑ळाः समा॒न्या म॒रुतः॒ सं मि॑मिक्षुः ।**
**कया॑ म॒ती कुत॒ एता॑स ए॒तेऽर्च॑न्ति शु॒ष्मं॒ वृष॑णो वसू॒या ॥ १ ॥**

कया॑ । शु॒भा । स॒ऽव॑यसः । स॒ंऽनी॑ळाः । स॒मा॒न्या । म॒रुतः॑ । सम् । मि॒मि॒क्षुः॒ ।

कया॑ । म॒ती । कुतः॑ । आ॒ऽइ॑तासः । ए॒ते । अर्च॑न्ति । शुष्म॑म् । वृष॑णः । व॒सु॒ऽया ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. सवयसः (=समानवयस्काः) सनीळाः (=समाननिवासा) मरुतः कया समान्या शुभा (=कया कैरपि दुर्ज्ञेयया समानया एकरूपया कान्त्या) सं मिमिक्षुः (=संगताः सन्ति=युक्ताः सन्ति)! एते वृषणः (=वर्षितारः=बलवन्तो) [ मरुतः ] कुत एतासः (=कुतः प्रदेशादागताः सन्तः) कया मती (=कीदृश्या मत्या=स्तुत्या) [ कया=कीदृश्या ] वसूया (=वसूयया=धनेच्छया च) [ स्तुताः ] शुष्मम् अर्चन्ति (=उपासकेभ्यो बलं प्रयच्छन्ति)?

समानवयस्काः समाननिवासा मरुतः समानयैव कयापि कान्त्या युक्ता भवन्ति । सा तु कैरपि पूर्णत्वेन दुर्ज्ञेया भवति । ते बलवन्तो मरुतः कीदृश्या स्तुत्या कीदृश्या धनयाच्ञया च प्रार्थिताः सन्तः प्रार्थयद्भ्यो बलं दास्यन्ति? दास्यन्तश्च कुतः प्रदेशादागच्छन्तीति ऋषिप्रश्नात्मकं वाक्यम् ॥

म्यक्षतिर्गतिकर्मेति सायणः सम्यक् कुत्रचित् । १. १६७. ३ इत्यादिषु स्थलेषु म्यक्षतिः प्रकाशनकर्मेति यद् मास्माभिरुक्तं तदपि समानाभिप्रायमेव पर्यवसितं । अर्चन्ति शुष्मं लोकेऽर्चन्ति पूजयन्ति जगति कुर्वन्ति इति सायणोक्तिः समीचीना । ये हि केचित् पूजनार्थास्ते धातवो दानार्था अपि भवन्ति ॥

## सूक्त १६५.

ऋषि–१, २ इंद्र; ३, ५, ७, ९ मरुत्; ४, ६, ८, १०, ११, १२ इंद्र; १३-१५ अगस्त्य. देवता– मरुत् आणि इंद्र. याप्रमाणें अनुक्रमणिकेंत सांगितलें आहे; पण वस्तुत: पाहिलें तर १, २, १३, १४, १५ ह्या ऋचा ऋषिवाक्यभूत होत; ४, ६, ८, १०, ११, १२ ह्या ऋचा इंद्रवाक्य होत आणि ३, ५, ७, ९ ह्या ऋचा मरुद्वाक्य होत. आणि सर्व सूक्ताचा कर्ता अगस्त्य हा होय. वृत्त– त्रिष्टुभ्.

१. एकाच वयाचे [ आणि ] एकाच ठिकाणीं वास करणारे [जे] मरुत्, [ ते ] कशा एकसारिख्या कांतीनें व्याप्त आहेत [ बरें ]! ते पराक्रमी [ मरुत् ] कोठून, कोणत्या भक्तीच्या योगानें [ आणि कोणत्या ] धनेच्छेमुळें येऊन [ भक्तांला ] बळ प्राप्त करून देतील?

## HYMN 165.

To *Indra* and the *Maruts*. The authorship of the first two is ascribed to *Indra;* of 3, 5, 7, 9 to the *Maruts*; of 4, 6, 8, 10, 11, 12 to *Indra* and of 13, 14, 15 to *Agastya*. But the whole hymn may be the production of *Agastya*. Verses 1, 2, and 13-15 form the speech of the poet, verses 4, 6, 8, 10 and 11 of Indra, and verses 3, 5, 7, and 9 of the Maruts. Metre—*Trishtubh*.

1. With what common splendour are the Maruts endowed, they who are of the same age [ and ] who live in the same place? Whence do they, the mighty ones, come? [ and ] in consequence of what kind of devotion [ and ] of what kind of desire for riches, do they bestow power [ upon their worshippers ]?

---

१. हें सूक्त मरुतांविषयीं आहे. याचा कर्ता अगस्त्य ऋषि आहे. पण तिसऱ्या मंत्रापासून बाराव्या मंत्रापर्यंत मरुत् आणि इंद्र यांचा परस्पर संवाद आहे. तिसऱ्या मंत्रांत मरुत् बोलतात. चवथ्यांत इंद्र बोलतो. पांचव्यांत पुनः मरुत्, आणि याप्रमाणें बाराव्यापर्यंत झाल्यावर १३ वा, १४ वा आणि १५ वा यांत पुनः ऋषीचें वचन आलें आहे.

या पहिल्या ऋचेचा भावार्थ:—'सर्व मरुत् मिळून एकाच वयाचे आहेत आणि एकाच ठिकाणीं राहणारे होत इतकेंच नव्हे,' पण त्या सर्वांची एकच कांति आहे. ती किती चमत्कारिक आहे बरें!

कस्य ब्रह्माणि जुजुषुर्युवानः को अध्वरे मरुत आ ववर्त ।
श्येनाँ इव ध्रजतो अन्तरिक्षे केन महा मनसा रीरमाम ॥ २ ॥
कस्य । ब्रह्माणि । जुजुषुः । युवानः । कः । अध्वरे । मरुतः । आ । ववर्त ।
श्येनान्ऽइव । ध्रजतः । अन्तरिक्षे । केन । महा । मनसा । रीरमाम॥२॥

## भाषायाम्.

२. युवानः (=नित्ययौवनोपेताः=अजरा) [मरुतः] कस्य ब्रह्माणि जुजुषुः (=कस्य स्तोतुः स्तोत्राणि सेवन्ते)? को [यजमानो] मरुतः [स्वकीये] अध्वरे (=यज्ञे) आ ववर्त (=आवर्तयामास)? श्येनान् इव अन्तरिक्षे ध्रजतः (=श्येननामकपक्षिवदन्तरिक्षे चरतस्) [तान्] केन महा मनसा (=केन महता स्तोत्रेण) रीरमाम (=रमयेम)?

अस्मान् प्रत्यगच्छन्तो मरुतः कस्य स्तोतुः समीपं कस्य वा यजमानस्य समीपं गताः स्युः? केन स्तोत्रेण तान्वयमस्माकं यज्ञं प्रत्यावर्तयेमेति च भावः ॥

तर या बलवान् मरुतांनीं येऊन आम्हांला बळ प्राप्त करून द्यावें म्हणून आम्हीं यांची कसली स्तुति करावी आणि कसल्या धनाची आम्हीं इच्छा करावी? आणि आम्हीं स्तुति केल्यावर ते कोठून येतील?'

'व्याप्त आहेत'=' सं मिमिक्षुः.' अक्षरशः कांतीशीं 'संगत आहेत.' 'म्यक्ष्'धातूचें रूप. या धातूचे सर्व प्रयोग पाहून आम्हीं भाषांतर केलें आहे.

'एकाच ठिकाणीं वास करणारे'= 'सनीळाः.' हें विशेषण मरुतांस अन्य ठिकाणींहि लाविलेलें आहे. ऋ. ७. ५६. १; ९.१००.५; १०.९९.२ पहा.

'प्राप्त करून देतील'=' अर्चन्ति.' अक्षरशः 'अर्चन्ति'शब्दाचा अर्थ 'पूजितात' अथवा 'पूजितील' असा आहे. पण 'पूजणें' अशा अर्थाचे जे धातु असतात, त्यांचा 'देणें' असाहि अर्थ असतो. उदाहरणार्थ 'मामहन्तम्' हें रूप सू. ९४ मं. १६ इत्यादि ठिकाणीं पहा.

शौनकाच्या म्हणण्याप्रमाणें, "जो कोण आप्त, पुत्र, सुहृत् आणि मित्र यांसहित राज्य करण्याची इच्छा करीत असेल, त्याणें तत्प्राप्तीसाठीं नित्य शुचिर्भूत होऊन हें सूक्त मनांत जपावें. आणि ज्यांनीं आचार्य, राजा आणि ब्राह्मण यांची चहाडी सांगितली असेल, अथवा ज्यांनीं गुरूचें गुह्य ऐकिलें असेल, त्यांनीं हें सूक्त जपावें म्हणजे ते दोषमुक्त होतील."

वृत्तासाठीं 'समानिभा' असें न म्हणून 'एते। अर्चन्ति' असें वाचावें.

२. अजर [ मरुत् ] कोणाचीं स्तोत्रें सेवन करीत बसले आहेत? कोणत्या उपासकानें मरुतांला वळवून [ आपल्या ] यज्ञांत नेलें आहे? श्येनाप्रमाणें अंतरिक्षांत उडत जाणाऱ्या मरुतांस आपण कोणत्या मोठ्या स्तोत्राच्या योगेंकरून थांबवूंया?

2. Whose hymns have the ever youthful [ ones ] sat to enjoy? What [worshipper] has turned the Maruts to his sacrifice? By what great hymn shall we stop the Maruts who fly in the firmament like eagles?

---

२. मरुत् येत नाहींत असें पाहून ऋषि म्हणतो, 'कोणा उपासकाचीं स्तोत्रें ऐकून मरुत् अडकून राहिले आहेत? अथवा कोणत्या भाग्यशाली यजमानानें त्यांस वळवून आपल्या यज्ञाप्रत नेलें असेल बरें? तर आपण असें कोणतें स्तोत्र म्हणूंया, कीं जें ऐकून मरुत् आमची उपासना ग्रहण करण्याकरितां थांबतील आणि आम्हांप्रत येतील?'

'अजर'='युवानः.' म्हणजे कधींहि म्हातारे न होणारे, नित्य तरुणच राहणारे. हें विशेषण इतर सर्व देवांस लागतें म्हणून मरुतांसहि येथें लाविलें आहे. त्यामुळेंच देवांस 'अजर' (म्हातारे न होणारे) हें नांव पडलें आहे.

'अंतरिक्षांत उडत जाणाऱ्या [ मरुतां]स'='अन्तरिक्षे ध्रजतः.' मरुत् हे मोठ्या पक्ष्यांप्रमाणें आकाशांतून उडत उडत जात आहेत असें कल्पून ऋषि बोलत आहे.

ही सर्व ऋचा ऋषि बोलत आहे असें समजावयाचें. पुढची ऋचा मरुत् बोलताहेत असें समजून अर्थ केला पाहिजे.

कुतस्त्वमिन्द्र माहिनः सन्नेको यासि सत्पते किं त इत्था ।
सं पृच्छसे समराणः शुभानैर्वोचेस्तन्नो हरिवो यत्ते अस्मे ॥३॥

कुतः । त्वम् । इन्द्र । माहिनः । सन् । एकः । यासि । सत्ऽपते ।
किम् । ते । इत्था ।
सम् । पृच्छसे । सम्ऽअराणः । शुभानैः । वोचेः । तत् । नः । हरिऽवः । यत् । ते । अस्मे इति ॥ ३ ॥

---

## भाषायाम्..

३. हे इन्द्र, त्वं माहिनः (=महान्) सन् एकः (=असहायः) कुतः (=कुतः कारणाद्) यासि (=गच्छसि)? हे सत्पते (=सतां प्रभो=साधूनां स्वामिन्), ते (=तव) इत्था (=एवं) किं [जातमस्ति]? शुभानैः (=शोभमानैः अस्माभिः) समराणः (=युक्तो) [यदासि तदा] सं पृच्छसे (=अस्मान् सम्यक् पृच्छसि=अस्मान् प्रति सौहार्देन वदसि)। [एवं सति] हे हरिवः (=पीताश्व) अस्मे (=अस्मासु विषये) ते (=तव=तव मनसि) [वर्तते] तत् [वचनं] नः (=अस्मभ्यं) वोचेः (=वद)॥

इति मरुद्वचनम् ॥

३. हे इंद्रा, तूं मोठा असून एकटाच कां चालला आहेस? हे सत्प्रभो, तुला असें काय [ झालें आहे ]? [ आम्हां ] शोभिवंतांबरोबर तूं जाऊं लागलास म्हणजे तूं आमचा चांगला समाचार घेत असतोस. तर हे पीताश्व [ इंद्रा ], तुला जें आम्हांविषयीं [बोलावयाचें असेल ] तें बोल.

3. Why, O Indra, art thou going alone, thou who art great? What [ has ] thus [ happened ] to thee, O lord of the good? Thou speakest well unto us when thou goest accompanied by us who are brilliant. Speak to us, therefore, thou of tawny horses, that which thou hast [ to speak ] about us.

३. मरुत् इंद्रास म्हणतात; 'हे इंद्रा, हे सत्प्रभो, तूं एवढा मोठा असून एकटाच कोठें चालला आहेस? अशी तुझी अवस्था कां झाली आहे? तूं जेव्हां आम्हांस बरोबर घेऊन जात असतोस, तेव्हां आम्हांबरोबर मोकळें मन करून चांगलें बोलत असतोस. तर आज तुझ्या मनांत आम्हांविषयीं काय असेल तें बोल.'

'कां'='कुतः.' वेदांत 'कुतः' शब्दाचा अर्थ बहुतकरून 'कोठून,' 'कोणत्या ठिकाणाहून,' असा होत असून, 'कशाकरितां,' 'कां' असा होत नाहीं असें समजून मोक्षमूलरादिक पंडित येथें 'कोठून' असाच अर्थ करितात. 'कोठून' असा अर्थ ज्या पदाचा होत असेल, त्याचा 'कशाकरितां' असाहि होणें हें साहजिक आहे असें आम्हांस वाटतें. सायणांनीं तरी 'कुतः कारणात्,' 'कशासाठीं' असाच अर्थ केला आहे. शिवाय पांचव्या ऋचेंत मोक्षमूलरांनींच 'अतः' याचा अर्थ 'अतः कारणात्' 'अशास्तव,' 'यास्तव' असा केला आहे; तर मग 'कुतः' याचा अर्थ 'कशास्तव' असा कां होऊं नये?

'सत्प्रभो'='सत्पते.' म्हणजे 'सज्जनांचा पति अथवा पालक.' 'वीरांचा प्रभु' असा अर्थ पाश्चात्य विद्वान् करीत असतात, पण जेथें जेथें हा शब्द आला आहे त्या त्या ऋग्वेदांतील ऋचा वाचून पाहतां 'सज्जनांचा पालक.' हा जो सायणांनीं सर्वत्र दिलेला अर्थ तो सोडून देऊन नवीन सुचविण्याचें कारण दिसत नाहीं. सू. ५३ मं. ६ आणि त्याजवरील टीप पहा.

पहिला चरण 'कुतस्तुअमिन्दर माहिनः सन्.' असा वाचला पाहिजे म्हणजे वृत्ताला मिळतो.

अतो व॒यम॑न्त॒मेभि॑र्युजा॒नाः स्वक्ष॑त्रेभिस्त॒न्वः॑ शुम्भ॑मानाः ।
महो॑भि॒रेताँ उप॑ युज्महे॒ न्विन्द्र॑ स्व॒धामनु॒ हि नो॑ ब॒भूथ॑॥५॥२४॥

अत॑ः । व॒यम् । अ॒न्त॒मेभि॑ः । यु॒जा॒नाः । स्वऽक्ष॑त्रेभिः । त॒न्व॑ः । शुम्भ॑मानाः ।
महः॑ऽभिः । एता॑न् । उप॑ । यु॒ज्म॒हे॒ । नु । इन्द्र॑ । स्व॒धाम् । अनु॑ ।
हि । नः॒ । ब॒भूथ॑ ॥ ५ ॥ २४ ॥

## भाषायाम्.

५. अतः (=अतः कारणात्=यतो हेतोस्त्वं वृत्रहननादौ एकाकी सन्नेव गच्छसि=वज्रद्वितीयमेव मां ममाश्वौ वहत इति वदसि तस्माद्धेतोर्) वयं स्वक्षत्रेभिः (=स्वायत्तबलैः) अन्तमेभिर्युजानाः (=समीपतमवर्तिभिरेभिरश्वैर्युक्ताः सन्तः) तन्वः शुम्भमानाः (=आत्मशरीराणि शोभयन्तः सन्तस्) [तान्] एतान् (=नानावर्णान्) [अश्वान्] महोभिः (=अस्माकं प्रभावैः न तु प्रत्यक्षं हस्तैर्) नु (=क्षिप्रम्) उप युज्महे (=रथे योजयामः=तव साहाय्यं कर्तुं सिद्धा भवामः)। हि (=यस्मात् कारणात्) हे इन्द्र, [त्वं] नः स्वधाम् (=अस्माकं बलम्) अनु बभूथ (=अनुभवसि=अस्मत्कर्तृकसाहाय्यरूपं बलं स्वीकरोषि)॥

इति मरुद्वाक्यम्॥

अत्रेदमनुसंधेयम्। अहमेकाकी हविर्गृह्णामि एकाकी युद्धे गच्छामीतीन्द्रेणोक्ता मरुतः अत एव तव साहाय्यं कर्तुमस्माकं समीपवर्तिनो नानावर्णहरिणरूपान् अश्वान् रथे केवलेनास्माकं प्रभावेण क्षिप्रं योजयामः सिद्धाश्च तव साहाय्यार्थं भवामः यत् त्वं हि नः साहाय्यादुद्भूतं बलमद्य यावद् बहुवारमनुभूतवानसीति वदन्तीति॥

अन्तमेभिरन्तिकतमैरश्वैर्युजाना युक्ताः सन्तः। ...... । तन्व आत्मशरीराणि शुम्भमाना दीपयन्तः। हर्षं प्राप्नुवाना इत्यर्थः। ...... । हे इन्द्र त्वमपि नोऽस्मत्संबन्धि स्वधामुदकं बलं वानुबभूथ हि। अस्मत्सृष्टोदकजन्यं हविरनुभवसि खलु। हिशब्दः परस्परकार्योपकारिभावप्रसिद्धिद्योतनार्थः। इति सायणः॥

५. यास्तवच आम्ही निजबळवान् अशा [ह्या] अत्यंत समीप असलेल्या [घोड्यां]सहित आमचीं शरीरें शोभवून, [त्या] चित्रविचित्र रंगांच्या [अश्वां]स आमच्या प्रभावेंकरून सत्वर जोडितों. कारण कीं, हे इंद्रा, तूं आमच्या बळाचा अनुभव घेत असतोस.

5. Therefore we, having adorned ourselves in company with the self-controlling [steeds] which are standing near us, are quickly yoking [those] variegated [steeds] with our might. For thou, O Indra, hast experienced our strength.

---

५. सुखाच्या वेळींहि मी एकटाच आणि युद्धादिक श्रमाच्या वेळींहि मी एकटाच असतों, माझ्या बरोबर दुसरा कोणी नाहीं, असें जें इंद्रानें वर म्हटलें, त्यावरून मरुत् म्हणतातः 'हे इंद्रा, म्हणूनच हे पहा आम्ही आपणांस अलंकारादिकेंकरून शोभवून आणि हे जे आमचे घोडे येथें उभे आहेत, त्यांस शोभवून त्या नानावर्णांच्या घोड्यांस आम्ही आपल्या रथाला जोडीत आहों, आणि ते घोडे स्वतः बळवान् आहेत, आणि त्यांस आमच्या हातांनीं रथास जोडावयास नको, ते आमच्या प्रभावेंकरून (महोभिः) आपोआप जोडिले जात आहेत. या प्रकारेंकरून तुला साहाय्य करण्यासाठीं आम्ही तयारी करीत आहों. कारण हे इंद्रा, तुला आमच्या साहाय्यापासून होणारें बळ म्हणजे कसें आहे त्याचा अनुभव आजपर्यंत बहुत वेळ आलाच आहे.'

'निजबळवान्'='स्वक्षत्रेभिः.' म्हणजे ज्यांचें बळ दुसऱ्यापासून आलेलें नव्हे, आंगचेंच आहे. असा जरी अक्षरार्थ आहे, तरी तात्पर्य असें आहे कीं, इतर घोड्यांप्रमाणें हे घोडे दुसऱ्यानें रथास जोडिले तर जोडिले जाणारे असे नव्हेत, तर आपलें बळ आपणच वापरणारे, ज्यांला बळ असून तें कसें कोठें योजावें, त्या बळाच्या योगानें आपणच रथास कसें जोडिलें जावें, हांकणाऱ्याच्या मनांत असलेल्या ठिकाणीं कसें जावें, इत्यादि बुद्धि आणि ज्ञान असलेल्या प्राण्यांप्रमाणें वागणारे असे आमचे अश्व होत.

'अत्यंत समीप असलेल्या'='अन्तमेभिः.' म्हणजे हे आमच्या पुढें उभे आहेत त्या घोड्यांसहित.

'आमचीं शरीरें शोभवून'='तन्वः शुम्भमानाः.' म्हणजे आम्ही जे नित्य अलंकार घालीत असतों ते आंगावर

क्वं१स्या वो मरुतः स्वधासीद्यन्मामेकं समधत्ताहिहत्ये ।
अहं ह्यु१ग्रस्तविषस्तुविष्मान्विश्वस्य शत्रोरनमं वधस्नैः ॥ ६ ॥
क्व । स्या । वः । मरुतः । स्वधा । आसीत् । यत् । माम् । एकम् । सम्ऽअधत्त । अहिऽहत्ये ।
अहम् । हि । उग्रः । तविषः । तुविष्मान् । विश्वस्य । शत्रोः । अनमम् । वधऽस्नैः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. इन्द्रो ब्रूते ।

हे मरुतः, स्या वः (=सा युष्माकं=पूर्वमन्त्रोक्तं युष्मत्साहाय्यरूपं) स्वधा (=बलं) क्व आसीत् (=कुत्राभवत्) यत् (=यदा) [यूयम्] एकं माम् (=एकाकिनम् असहाय्यं माम् इन्द्रम्) अहिहत्ये समधत्त (=अहिहनने अयोजयत=वृत्रहननाय गच्छतो मम साहाय्यं नाकुरुत)? हि (=यस्मात्कारणात्) उग्रः (=उद्गूर्णबलः) तविषः (=बलवान्) तुविष्मान् (=धैर्योपेतः) अहं वधस्नैः (=मदीयैरायुधैर्) विश्वस्य शत्रोः (=कृत्स्नस्य शत्रोर्वृत्रादेर्) [वधस्नानि=आयुधानि] [असहाय एव] अनमम् (=अनमयं=विश्वमपि शत्रुम् असहाय एव वशीकृतवानस्मि) ॥

यदाहं वृत्रहननाय एकाक्येव प्रवृत्तस्तदानीं तद्युष्माकं साहाय्यं क्वासीत्? तदानीमकृतसाहाय्या यूयम् । अतो हेतोरिदानीमपि युष्मदृत एव गच्छामीति भावः ॥

---

घालून. मरुतांच्या अलंकारांविषयीं आणि वस्त्रांविषयीं सू. ३७ मं. २ पहा. पहिल्या अर्धाचें तात्पर्य आम्हीं आपणास आणि या आमच्या अश्वांस वस्त्रालंकारादिकांनीं शोभविलें आहे असें आहे.

'त्या चित्रविचित्र रंगांच्या अश्वांस' = 'तान् एतान्.' 'एत' म्हणजे चित्रविचित्र रंगांचा. पूर्वार्धांत सांगितलेलेच घोडे येथें विवक्षित आहेत. आणि ते तरी घोडे म्हणजे मरुत् ज्या चित्रविचित्र हरिणी (पृषती) आपल्या रथास जोडितात, तद्रूप समजावयाचे आहेत. सू. ३९ मं. ६ पहा.

वृत्तासाठीं 'तन्वः' च्या ठिकाणीं 'तनुअः' वाचावें आणि 'नु । इन्द्र' असें तिसऱ्या आणि चवथ्या चरणांत म्हणावें.

६. हे मरुतांनो, जेव्हां तुम्हीं मला एकट्याला वृत्रहनन करावयास लाविलें तेव्हां हें तुमचें बळ कोठें होतें? कारण कीं, शक्तिमान्, प्रबळ [ आणि ] अतिप्रबळ असा जो मी, त्या मीं एकट्या इंद्रानेंच माझ्या मारक आयुधांनीं सकळ शत्रूंचीं [आयुधें] भंगून टाकिलीं.

6. Where was that your strength, O Maruts, when you suffered me alone to slay the Snake? For mighty, formidable and courageous that I am, I bent with my own arms [ the arms] of every foe.

---

६. आम्ही तुझें साहाय्य करीत असतों असें जें मरुतांनीं म्हटलें, तें खरें नव्हे असें सांगण्याच्या इच्छेनें इंद्र म्हणतो, ' हे मरुतांनो, तुम्ही माझें साहाय्य करीत असतां हें जर खरें आहे, तर मी वृत्रहनन करूं लागलों तेव्हां तुम्हीं कां साहाय्य केलें नाहीं ? आणि तुम्ही केलें नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे, कारण कीं, जेव्हां जेव्हां शत्रूंच्या आयुधांचा ( म्हणजे शत्रूचाच ) पाडाव करावयाचा प्रसंग पडला, तेव्हां तेव्हां मीच एकट्यानें आपल्या बळेंकरून आणि शस्त्रेंकरून तो पाडाव केलेला आहे, तुम्हीं मला साहाय्य केलेलें नाहीं.'

असा या मंत्राचा अभिप्राय आहे; पण वस्तुतः पाहिलें तर इंद्राला वृत्रहननाच्या वेळीं आणि दुसरे शत्रु मारण्याच्या प्रसंगीं मरुतांनी साहाय्य केलें असें वेदांत आणि इतर ग्रंथांतहि प्रसिद्ध आहे. तेव्हां साहाय्य केलें नाहीं असें जें सांगितलें आहे, तें विनोदानें असावें अथवा इंद्रमरुतांचा संवाद कल्पून एकमेकांस ते किती आणि कसें साहाय्य करीत असतात तें दाखविण्याचा उद्देश कवीचा असल्यामुळें येथें तसें झालें असावें असें वाटतें.

' वृत्रहनन करावयास '=' अहिहत्ये. ' अक्षरशः अर्थ ' सर्पाच्या हननीं,' असा आहे. वृत्राला सर्प असें वेदांत म्हणतात आणि तसें कां म्हणतात याविषयीं सू. ३२ मं. १, सू. ६१ मं. ८ आणि त्याजवरील टीप पाहा.

' आयुधें भंगून टाकिलीं '='[ वधस्नानि ] अनमम्.' म्हणजे ' शत्रूंस आपल्या अमलाखालीं आणिलें ' अथवा ' आपल्यास वश केलें,' ' त्याचा पाडाव केला.' इंग्रजी वगैरे दुसऱ्या भाषांतहि कोणाचा तरी जय झाला अथवा पराजय झाला असें म्हणावयाचें असलें तर त्याचीं आयुधें विजयी झालीं अथवा पराजित झालीं अशा अर्थाचीं वाक्यें योजण्याची चाल आहे.

' अनमं विश्वस्य शत्रोर्वधस्नैः.' या शब्दांचा अर्थ मोक्षमुलराचार्य ' मी म-

भूरि॑ चकर्थ॒ युज्ये॑भिर॒स्मे स॑मा॒नेभि॑र्वृषभ॒ पौंस्ये॑भिः ।
भूरी॑णि॒ हि कृ॒णवा॑मा शविष्ठे॒न्द्र क्रत्वा॑ मरुतो॒ यद्वशा॑म ॥ ७ ॥

भूरि॑ । च॒क॒र्थ॒ । युज्ये॑भिः । अ॒स्मे इति॑ । स॒मा॒नेभिः॑ । वृ॒ष॒भ॒ । पौंस्ये॑भिः ।
भूरी॑णि । हि । कृ॒णवा॑म । श॒वि॒ष्ठ॒ । इन्द्र॑ । क्रत्वा॑ । म॒रु॒तः॒ । यत् । वशा॑म ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. मरुद्वाक्यम् ।

हे वृषभ (=शूर) [इन्द्र], अस्मे (=अस्माकं) समानेभिः (=समानैः=तव पौंस्येन सदृशैः) पौंस्येभिर्युज्येभिः (=युज्यैः पौंस्यैः=सहायभूतैः शूरकर्मभिः) भूरि चकर्थ (=प्रभूतं कृतवानसि=प्रभूतं पराक्रमकर्म कृतवानसि)। हि (=अपि चेतः-परमपि) हे शविष्ठ इन्द्र (=अतिशयेन बलवन्निन्द्र), [त्वं] [वयं च] मरुतो यत् क्रत्वा वशाम (=प्रज्ञानेन यानि यानि कर्तुमिच्छामस्तानि तानि) भूरीणि कृणवाम (=बहूनि वीरकर्माणि करवाम संपादयाम) ॥

अस्यायमर्थः। हे इन्द्र, त्वं भूरि कृतवानसि सत्यं न तु एकः कृतवांस्तत्। अपि तु त्वत्पौंस्यसमानैरस्माकं पौंस्यैर्द्वारैव कृतवानसि। यथा च अद्य यावदस्माकं साहाय्येन प्रभूतं शूरकर्म कृतवानसि तथैव इदानीमपि बलवत्तमस्त्वं बलवत्तमाश्च वयं मरुत इत्येते मिलित्वैव बहूनि शौर्यकर्माणि संपादयामेति ॥

म॒रु॒तः॒। छान्दसमनुदात्तत्वम् इति सायणः सम्यक्। यस्मात् शविष्ठ इन्द्र इति संबुद्धपदद्वयस्य साहचर्यात् मरुत इत्यपि संबुद्धं भूतं संबुद्धेश्च सर्वानुदात्तत्वम् ॥

---

त्येक शत्रूच्या आयुधांपासून सुटलों' असा प्रोफेसर रोथ यांस अनुसरून करितात, आणि म्हणतात कीं, 'यो देह्यो अनमयद् वधस्नैः' (=ज्या अग्नीनें आपल्या आयुधांनीं असुरविद्या भंगून टाकिल्या. ऋ. ७. ६. ५), आणि 'उदम्नभस्य [वधस्नानि] नमयन् वधस्नैः' (आपल्या आयुधांनीं उदकनिरोधक वृत्राचीं आयुधें भंगून टाकणारा सोम, ऋ. ९. ९७. १५) यांतहि 'नम्'धातूचा अर्थ 'सुटणें' असा होतो. पण आम्हांस वाटतें, या तीनहि ठिकाणांवरच्या सायणभाष्यास अनुसरून आम्हीं वर दिलेला अर्थ विशेष आधारवद्ध आहे.

शत्रूचा अथवा शत्रूच्या आयुधांचा पाडाव करणें या अर्थी 'नम्' धातूचे प्रयोग दुसऱ्या ठिकाणींहि आले आहेत.

७. हे प्रबळ [ इंद्रा], त्वां पुष्कळ पराक्रम आमचीं जीं समान शौर्यें त्यांच्या साहाय्येंकरून करिता झालास. आणि आतांहि पुष्कळ पराक्रम, हे अतिबळवान् इंद्रा, [ तूं आणि आम्ही ] मरुत् जे जे मनांत इच्छूं. [ ते ते ] आणखी करूंया.

7. Much hast thou achieved, O brave [ Indra ], with the help of our prowesses that are equal [ with thine ]. And let us still achieve many things, O most mighty Indra, as [ thou and ] we Maruts may wish in [our] minds.

---

उदाहरणार्थ; 'इमे मरुतः सहसः आ नमन्ति' (=हे जे मरुत् ते प्रबळ असलेल्यांचाहि पाडाव करितात. ऋ. ७. ५६. १९); 'वधर्दासस्य तुविनृम्ण नीनमः' (=हे प्रबळ इंद्रा, शत्रूच्या आयुधाचा तूं पाडाव कर. ऋ. ८. २४. २७); 'वनमः वधः अदेवस्य पीयोः' (=हे इंद्रा, तूं देवशत्रु आणि दुष्ट वृत्राच्या मारक आयुधाचा पाडाव करिता झालास, १. १७४. ८; २. १९. ७). यावरून स्पष्ट होतें कीं प्रस्तुत मंत्रांतहि 'नम्' धातूचा अर्थ 'पाडाव करणें,' 'भंगणें,' 'मोडणें,' 'पराजित करणें,' असा केला पाहिजे.

वृत्तासाठीं पहिला चरण 'कुअ स्या वो मरुतः सुअधासीत्,' असा वाचावा; आणि तिसऱ्या चरणांत 'हि उग्रः' असें म्हटलें म्हणजे तिसरा आणि चवथा हे चरण आधुनिक श्लोकवृत्ताला चांगले जमतात.

---

७. मरुत् उत्तर देतातः 'होय, हे इंद्रा, तूं मोठमोठे पराक्रम केलेस खरे; पण ते त्वां एकट्यानें केले नाहींत; तर तुझ्या शौर्यासारिखींच जीं आम्हां मरुतांचीं शौर्यें त्यांच्या साहाय्यानेंच केले. तर हे महाबल इंद्रा, तूं आणि तुझ्यासारिखेच जे महाबळ आम्ही ते मिळून आणखीं जे जे पराक्रम करावयाचे असें मनांत आणूं ते ते आणखीहि करूं, तर आमचा तूं अव्हेर करूं नको.'

वृत्तासाठीं 'युजिएभिः,' 'पौंसिएभिः' आणि 'शविष्ठ। इन्द्र' असें वाचावें लागतें.

वधीं वृत्रं मरुत इन्द्रियेण स्वेन भामेन तविषो बभूवान् ।
अहमेता मनवे विश्वश्चंन्द्राः सुगा अपश्चकर वज्रबाहुः ॥ ८ ॥

वधीम् । वृत्रम् । मरुतः । इन्द्रियेण । स्वेन । भामेन । तविषः । बभु-
वान् ।
अहम् । एताः । मनवे । विश्वऽचन्द्राः । सुऽगाः । अपः । चकर । व-
ज्रऽबाहुः ॥ ८ ॥

अनुत्तमा ते मघवन्नकिर्नु न त्वावाँ अस्ति देवता विदानः ।
न जायमानो नशते न जातो यानि करिष्या कृणुहि प्रवृद्ध ॥९॥

अनुत्तम् । आ । ते । मघऽवन् । नकिः । नु । न । त्वाऽवान् । अ-
स्ति । देवता । विदानः ।
न । जायमानः । नशते । न । जातः । यानि । करिष्या । कृणुहि ।
प्रऽवृद्ध ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. अथेन्द्रो ब्रूते ।

हे मरुतः, इन्द्रियेण (=मदीयेन स्वकीयेन बलेन ) स्वेन भामेन (=स्वकीयेन कोपेन ) [ च ] तविषो बभूवान् (=बलवान् संपन्नः सन् ) [ एक एव ] वृत्रं वधीं (=वृत्रम् अवधीं=वृत्रं हतवान् अस्मि ) । [ अपि च तथा कृत्वा ] वज्रबाहुः ( =वज्रहस्तः=वज्रद्वितीयः=वज्रादृते सहायरहितः) अहम् (=अहमेवैकाकी ) एताः (=एताः प्रसिद्धा ) विश्वश्चन्द्राः (=विश्वचन्द्राः=सर्वेषामाह्लादकारिणीः ) अपः (=मेघोदकानि ) मनवे (=मनुष्यजाताय ) सुगाः (=सुगम्याः=सुलभानि ) चकर (=कृतवानस्मि) ॥

९. मरुतो ब्रुवते ।

हे मघवन् (=धनवन्निन्द्र ), आ ते (=तव ) अनुत्तं (=नोत्तुं बाधितुम् अशक्यं ) नकिर्नु (=नैव किमपि ) । त्वावान् (=त्वत्सदृशो ) न [ कोपि ] देवता (=देवेषु मध्ये ) विदानोस्ति (=ज्ञातोस्ति ) । हे प्रवृद्ध (=प्रकर्षेण वृद्धबल=अतिबलवन्निन्द्र ), यानि करिष्या (=यानि करिष्याणि=यानि कृत्यानि ) कृणुहि ( =कुरुषे ) [ तानि ] न जायमानो नशते न जातः ( =न कोपि इत उत्तरं भविष्यमाणो व्याप्नोति=अनुकरोति न अत्र यावत् जातः कोप्यनुकरोति ) ॥

८. हे मरुतांनो, मी आपल्या बळानें आणि कोपानें प्रबळ झालों आणि मीच वृत्राला मारिता झालों; आणि हातांत वज्र घेऊन मीच हीं सर्वांस आनंद करणारीं उदकें मानवी प्राण्यांकरितां सुलभ करिता झालों.

९. हे मघवन्, तुजपुढें अविनाश्य असें कांहींच नाहीं. तुजसारिखा देवांमध्यें दुसरा कोणी अवगत नाहीं. हे महाबळवान् [ इंद्रा ], तूं जीं कृत्यें करितोस त्यांची बरोबरी [ पुढें ] जन्मास येणारा कोणी करूं शकणार नाहीं आणि [ आजपर्यंत ] जन्मास आलेलाहिं कोणी [ करूं शकला ] नाहीं.

8. I having become, O Maruts, strong through my own might [ and ] through my own vigour, slew Vritra ; I [ myself ], with the thunderbolt in my hand, made these [ rain]-waters, which delight all, accessible to man.

9. There is nothing, O Maghavan, irresistible before thee. No one is known to be like thee among the gods. No one that is to be born, nor any one that has been born equals thee in those deeds which thou achievest, O mighty [Indra]!

८. पुनः इंद्र म्हणतो:–'नाही नाहीं; तुम्हीं नाहीं साहाय्य केलें. मी माझ्या बळाच्या आणि कोपाच्या योगानें प्रबळ होऊन मीच मेघजलनिरोधक वृत्राला केवळ माझ्या वज्राच्या साहाय्यानें मारून टाकिलें, आणि हीं जीं सकळ लोकांस आल्हाद करणारीं मेघोदकें, तीं मोकळीं केलीं आणि वृष्टीच्या द्वारें मनुष्यांस सहज मिळत अशीं केलीं.'

'आपल्या बळानें'='इन्द्रियेण.' सू. १६५ मं. ४ आणि टीप पहा.

'हातांत वज्र घेऊन'=' वज्रबाहुः.' म्हणजे माझ्या खांद्यावर जें वज्र होतें तेंच मला साहाय्य होतें, त्याशिवाय मरुतांचें अथवा दुसऱ्या कोणाचें साहाय्य मिळालें नाही.

'सर्वांस आनंद करणारीं'= 'विश्वश्चन्द्राः.' हा सायणानुसारी अर्थ पाश्चात्यांनी केलेल्या 'सर्व अंशीं सुंदर' अशा अर्थापेक्षां विशेष आधारवत्त आहे असें वाटतें.

९. इंद्राचें वर्चस्व कबूल करून मरुत् म्हणतात, 'हे इंद्रा, तूं म्हणतोस तें खरें आहे. [illegible]

एकस्य चिन्मे विभ्व१स्त्वोजो या नु दधृष्वान्कृणवै मनीषा ।
अहं ह्यु१ग्रो मरुतो विदानो यानि च्यवमिन्द्र इदीश एषाम्
॥ १० ॥ २५ ॥

एकस्य । चित् । मे । विऽभु । अस्तु । ओजः । या । नु । दधृष्वान् । कृणवै । मनीषा ।
अहम् । हि । उग्रः । मरुतः । विदानः । यानि । च्यवम् । इन्द्रः । इत् । ईशे । एषाम् ॥ १० ॥ २५ ॥

---

यानि करिष्या कर्तव्यानि भवन्ति तानि कृणुहि कुर्वीति मोक्षमूलराचार्यमनु सति व्याख्याने कृणुहि इति अनिघातं पदं न स्यात् । कृणुहि इति पदं तु कुरुषे इत्यर्थे सहनीयम् इति भाति ॥

---

## भाषायाम्.

१०. इन्द्रो ब्रूते ।

[ हे मरुतः ], विभु ओजः (=सर्वव्यापि बलम्) एकस मे चित् अस्तु (=असहायस्य ममैव भवतु=अहमेवैको विश्वबलोस्मीति युष्मदादयः सर्वे वदन्तु ) । या नु दधृष्वान् कृणवै मनीषा ( =योहं मनीषया यद्यत्कर्तुमिच्छामि तत्तत्सर्वं धैर्ययुक्तः सन् क्षिप्रं कर्तुं शक्नोमि ) । अहं हि (=अहमेव खलु ) हे मरुतः, उग्रो विदानः (=प्रबलो विख्यातः=प्रबलत्वेन ख्यातोस्मि ) । [ अहम् ] इन्द्रो [ हि ] यानि च्यवं (=यानि यानि पराक्रमकर्माण्यवगच्छामि=कर्तुं प्रवृत्तो भवामि) एषां (=तेषाम् ) [अहम् ] इत् (=अहमेव ) ईशे (=ईश्वरो भवामि ) ॥

या नु दधृष्वान् कृणवै मनीषा इत्यत्र योहं यानि यानि कर्तुं मनसि गृह्णामि तानि तानि धैर्येण संपादयामि इति यतस्ततो हेतोर्ममैवैकस्य विश्वबलत्वमिति भावः ॥

---

कीं ज्याचा तूं नाश करूं शकणार नाहीं-स. तुजसारिखा दुसरा देव देवांमध्यें ठाऊक नाहीं. आणि तूं जे पराक्रम करितोस, त्यांची बरोबरी करणारा पुढेंहि कोणी होणार नाहीं, आणि आजपर्यंत-हि कोणी झाला नाहीं.' यांत इंद्रच सर्व-श्रेष्ठ असें जें इंद्राचें म्हणणें तें मरुतांनीं

कबूल केलें आणि आपण चुकलों असें ते म्हणतात, अथवा म्हणूं तरी इच्छितात असें समजलें पाहिजे. येथपासून इंद्र संतुष्ट होऊन पुढें मरुतांशीं मित्रभावानें बोलतो आहे असें समजावयाचें.

'अविनाश्य'=' अनुत्तम.' म्हणजे ज्याचा नाश अथवा ज्याला [illegible]

१०. सर्वव्यापी बळ माझे एकट्याचेच अंगीं आहे असें म्हटलें पाहिजे. कारण जें जें म्हणून मी मनांत आणितों तें तें मी मोठ्या धैर्यानें तत्क्षणीं करावयास समर्थ असतों. हे मरुतांनो, मी महाप्रतापी आहें ह्याविषयीं प्रख्याति आहे. [ कारण कीं ], मी इंद्र जें जें हातीं घेतों त्या सर्वांचा मीच धनी होतों.

10. Let all-pervading power be [ declared ] mine alone, who can courageously do at once whatever I wish in my mind. For I am, O Maruts, known [to be] formidable. Whatever I—Indra— undertake, I alone become the master thereof.

रितां येणार नाही असें. 'अनुत्त'शब्दाचे दुसरे प्रयोग पाहून हा अर्थ आम्हीं केला आहे.

'तूं जीं कृत्यें करितोस'=' यानि करिष्या कृणुहि.' यांत 'कृणुहि' या आज्ञार्थक क्रियापदाचा 'कुरुषे' असा स्वार्थी अर्थ करावा लागतो, ही कांहींशी अडचण तर खरीच; परंतु जीं कृत्यें (यानि) करावयाचीं (करिष्या) तीं तूं कर (कृणुहि), असा अर्थ केला तर दोन मोठ्या अडचणी अशा आहेत की, पहिली 'नशते' याला कर्म पाहिजे, तें मिळणार नाहीं; आणि दुसरी ही कीं, 'कृणुहि' हें क्रियापद सर्वानुदात्त असावें तसें तें नाहीं. आज्ञार्थक क्रियापदांचा अर्थ स्वार्थी केव्हां केव्हां करावा लागतो ही चाल दुसऱ्या भाषांतहि आहे.

उदाहरणार्थ:— भक्तीनें पृथु भक्षिले मटमटां तो तुमचा हो सखा। सुदामचरित्र.

चवथ्या चरणांत 'यानि' बद्दल 'यानि' असें वाचलें तर तिसरा आणि चवथा हे चरण आधुनिक श्लोकाप्रमाणें वाचतां येतील.

१०. इंद्र म्हणतोः—'होय, सर्वबळी इंद्रच एकटा आहे, दुसरा कोणी नाहीं असें सर्वांनीं म्हटलें पाहिजे, आणि त्याप्रमाणें तुम्हीहि म्हणा; कारण की, माझ्या मनांत जें जें येतें तें तें सर्व मी एकदम धैर्यानें करूं शकतों. हे मरुतांनो, मी महाबलवान आहें हें प्रसिद्ध आहे. मी [illegible] त्याचा धनी मीच होतों; दुसऱ्याला तशी शक्ति नाहीं, त्यांनीं इच्छिलेलें त्यांस मिळतेंच असें नाहीं.'

'कारण जें जें म्हणून मी मनांत आणितों तें तें मी मोठ्या धैर्यानें तत्क्षणीं करावयास समर्थ असतों'=' या नु दधृष्वान् कृणवै मनीषा.' हा पाद कठिण [illegible]

अमन्दन्मा मरुतः स्तोमो अत्र यन्मे नरः श्रुत्यं ब्रह्म चक्र ।
इन्द्राय वृष्णे सुमखाय मह्यं सख्ये सखायस्तन्वे तनूभिः ॥ ११ ॥
अमन्दत् । मा । मरुतः । स्तोमः । अत्र । यत् । मे । नरः । श्रुत्यम् । ब्रह्म । चक्र ।
इन्द्राय । वृष्णे । सुऽमखाय । मह्यम् । सख्ये । सखायः । तन्वे । तनूभिः ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. हे मरुतः, अत्र (=इदानीं) स्तोमः (=स्तोत्रम् अनुत्तमा ते मघवन्नित्यादिरूपं) माम् अमन्दत् (=आमोदयत्=समतोषयत्)। हे नरः (=हे शूरा मरुतः), यत् श्रुत्यं (=श्रोतुं योग्यं=सर्वेषां श्रवणयोग्यं) ब्रह्म (=स्तोत्रं) [ यूयं ] मे (=मदर्थं) चक्र (=कृतवन्तः) । यद् वृष्णे (=वीर्योपेताय) सुमखाय (=सुपूजनीयाय) सखायः (=मित्रभूता) [ यूयं ] सख्ये (=मित्रभूताय) मह्यं तनूभिः (=आत्मभिः= मत्समानभूतेनात्मना) तन्वे (=मदीयात्मने) [ चक्र=कृतवन्तः ] ॥

सख्ये सखायः तन्वे तनूभिः इत्यनेन मरुताम् इन्द्रस्य च परस्परम् अतिमित्रत्वं तादात्म्यं च इन्द्रेणाभ्युपेतं भवतीति द्रष्टव्यम् ॥

---

रा आणि अडचणीपासून मुक्त असा सुचत नाही. 'या' याच्या ठिकाणीं कवीच्या मनांत प्रथम 'यो' असें घालावयाचें होतें, पण शिवाय 'यानि' असें पद वाक्यार्थास पाहिजेच आहे असें लागलेंच समजलें, यास्तव 'यो' न घालितां 'या' घालून 'यो' घातला असतां 'कृणवे' हें जसें सोदात्त असतें तसें तें सोदात्त ठेविलें. यावरूनच 'यो' अंतर्भूत आहे असें प्रथम ध्यानांत येतें. 'यो' या उदाहृत पदाचा संबंध 'कृणवै' पदाशीं जर न घेतला तर कृणवै असें सर्वानुदात्त पद पाहिजे.

'हातीं घेतों'='च्यवम्.' हा अर्थ सायणांस अनुसरून आम्हीं केला आहे. म्हणजे एकाद्या शत्रूचा पाडाव करणें इत्यादि पराक्रम करावा असें मनांत आणिलें तर त्या शत्रूचा मी एकदम धनी होतों, म्हणजे मी त्याचा एकदम पाडाव करूं शकतों.

वृत्तासाठीं 'विभु अस्तु ओजः,' आणि 'अहं हि उग्रो' असें म्हणावें लागतें.

११. हे मरुतांनो, आतां [ तुमचें ] स्तोत्र ऐकून मला आनंद झाला; जें श्रवणीय स्तोत्र, हे शूर [ मरुत् ] हो, तुम्हीं केलें—[ जें ] वीर्यवान् [ आणि ] पूजनीय अशा मज इंद्राकरितां [ तुम्हीं केलें ]—[ जें ] [ तुम्ही ] मित्र मज मित्राकरितां करिते झालां—जें केवळ मत्स्वरूपी असे जे [ तुम्ही ] ते तुमचा प्राण जो मी त्या मजकरितां करिते झालां.

11. Now, O Maruts, the praise has pleased me—the hymn deserving to be heard, which you have made for me—for me, Indra, the hero, the adorable one, [ which you ] the friends [ have made ] for me the friend, [have made] with your souls for [ me ] your other soul.

---

११. मरुतानीं इंद्राचें वर्चस्व आणि अतिश्रेष्ठत्व नवव्या मंत्रांत वर्णिलें त्याविषयीं इंद्र म्हणतो, ' हे मरुतांनो, ही जी वरच्या नवव्या मंत्रांत माझी स्तुति केली तिच्या योगानें मी आतां प्रसन्न झालों आहें. जें स्तोत्र इतकें सुंदर आहे कीं, तें सर्वांनीं ऐकण्यास योग्य होय. मज पूजनीय आणि शूर इंद्राचें हें जें तुम्हीं स्तोत्र केलें तें मित्रांनीं मित्राचें करावें तसें केलें आहे, किंबहुना एकाच व्यक्तीच्या अनेक विभूतींनीं मिळून त्या व्यक्तीचें स्तोत्र करावें तसें केलें आहे. तुम्हीं माझे मित्र आहां, मी तुमचा मित्र आहें; तुम्ही माझे जीव आहां, मी तुमचा जीव आहें. '

' पूजनीय '=' सुमखाय. ' हा शब्द कठिण आहे. सू. ८५ मं. ४ याजवरील टीप पहा.

'मत्स्वरूपी जे तुम्ही ते तुमचा प्राण जो मी त्या मजकरितां '=' तन्वे तनूभिः.' अक्षरशः अर्थ 'आत्ममूर्तींनीं. आत्ममूर्तीसाठीं'. इंद्राचा भावार्थ असा आहे कीं, आपण आणि मरुत् हे इतके जिवलग मित्र आहों कीं, ते आणि आपण एकमेकांचे प्राण जणुं आहों. 'तनु' शब्दाचा अर्थ 'आपण स्वतः' अथवा 'आपला जीव,' 'आपण' असा वेदांमध्यें पुष्कळ ठिकाणीं होत असतो.

वृत्तासाठीं ' श्रुत्यं 'च्या बद्दल ' श्रुतिअं ' आणि 'तन्वे'च्या बद्दल ' तनुए ' असें वाचावें.

एवेदेते प्रति मा रोचमाना अनेद्यः श्रव एषो दधानाः ।
संचक्ष्या मरुतश्चन्द्रवर्णा अच्छान्त मे छदयाथा च नूनम् ॥१२॥

एव । इत् । एते । प्रति । मा । रोचमानाः । अनेद्यः । श्रवः । आ । इषः । दधानाः ।
सम्ऽचक्ष्य । मरुतः । चन्द्रऽवर्णाः । अच्छान्त । मे । छदयाथ । च । नूनम् ॥ १२ ॥

### भाषायाम्.

१२. अनेद्यः (=? अनेद्याः=अनिन्द्या) एते (=पुरो दृश्यमाना) एवेत् (=अनेन प्रकारेण) मा प्रति रोचमानाः (=मां प्रति रोचमानाः= मां प्रति संप्रीयमाणाः) श्रवः आ इषः (=यशो बलं च) दधानाः (=धारयमाणाश्) चन्द्रवर्णाः (=सुवर्णवर्णा) [यूयं] हे मरुतः, संचक्ष्य (=सम्यग्दृष्ट्वा=सम्यग्विचार्य) मे अच्छान्त (=माम् उपाच्छदयत) [ते यूयं] नूनं च (=अधुनापि) छदयाथ (=उपच्छदयत=ममानुकूला भवत)॥

दुर्बोधैषा सायणेनैवं व्याख्याता । हे मरुतः एवेत् एवमेवैते यूयं मा मां प्रति रोचमाना मद्विषये संप्रीयमाणा मां ख्यापयन्तो वानेद्योऽनन्तिकरथं श्रवः कीर्तिमिषश्च दधानाः । आ इति चार्थे । यद्वानेद्य इति प्रशस्यनाम । प्रशस्यं यशोऽस्मत्तो दधाना अस्माभिर्वा धारयमाणाः । चन्द्रवर्णाः । चन्द्रमिति हिरण्यनाम । सुवर्णवर्णा यूयं मे मां संचक्ष्य सम्यक् प्रकाश्य नूनं निश्चयमच्छान्त यशोभिराच्छादितवन्तश्छदयाथ । आच्छादयथ च । मां प्रति सर्वदा रोचमाना मय्येव कीर्तिमन्नं च दधाना मत्कृतैः कर्मभिर्मामेव स्तुतेत्यर्थः । इति ॥

१२. हे जे कीर्ति आणि बळ धारण करणारे निर्दोष [ असे तुम्ही ] या प्रकारेंकरून मजविषयीं प्रसन्न आहां ते, हे मरुत् हो, सुवर्णवर्णाचे तुम्ही विचार करून मला अनुकूळ करून घेते झालां. तर आतांहि मला अनुकूळ करून घ्या.

12· Thus you who, spotless and manifesting glory and vigour, are delighted with me, have O Maruts, conciliated me after considering. And do you now conciliate me again.

---

१२. या कठिण ऋचेचा भावार्थ असा दिसतो कीं, ' हे मरुतांनो, आतां तुम्ही मजशीं जशा नम्रभावानें वागावें आणि त्यांतच आपलें भूषण मानून घ्यावें तसें करण्यास तुम्हीं आरंभ केला आहे. आणि त्यामुळें तुम्ही प्रसन्नमुख दिसत आहां. तर याप्रमाणेंच तुम्ही नित्य करीत जा, आणि मजशीं नम्रभावानें आणि मला अनुकूल होऊन वागत जा.'

'निर्दोष'='अनेद्यः.' सायणांनीं 'श्रवः' याचें विशेषण केलें आहे, आणि ' जवळ नसलेलें ' असा ते अर्थ करितात.

' या प्रकारेंकरून '=' एवा. ' म्हणजे आतां ज्या प्रकारेंकरून तुम्ही प्रसन्नमुख दिसत आहां त्या प्रकारेंकरून.

वृत्तासाठीं ' अनेद्यः ' बद्दल ' अनेदिअः,' आणि ' संचक्ष्या ' बद्दल ' संचक्षिआ ' असें वाचावें.

को न्वत्र मरुतो मामहे वः प्र यातन सखींरच्छा सखायः ।
मन्मानि चित्रा अपिवातयन्त एषां भूत नवेदा म ऋतानाम्॥१३॥
कः । नु । अत्र । मरुतः । ममहे । वः । प्र । यातन । सखीन् । अ-
च्छ । सखायः ।
मन्मानि । चित्राः । अपिऽवातयन्तः । एषाम् । भूत । नवेदाः । मे ।
ऋतानाम् ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१३. ऋषिर्ब्रूते ॥

हे मरुतः, अत्र (=अस्मिन् लोके) वः (=युष्मान्) को नु मामहे (=पूजयति)? सखायो [ यूयं ] सखीन् [ अस्मान् ] अच्छ (=सखिभूतान् अस्मान् प्रति ) प्र यातन (=प्रयात=प्रस्थायागच्छत ) । हे चित्राः (=श्रेष्ठवर्णयुक्ता ) [ मरुतः ], मन्मानि (=स्तोत्राणि ) अपिवातयन्तः (=अस्मासु गमयन्तः=अस्मासु श्रेष्ठस्तोत्रकरणबलमर्पयित्वा ) एषाम् (=अधुना क्रियमाणानां ) मे (=मम ) ऋतानाम् (=अवितथानाम् उपासनाकर्मणां ) नवेदा भूत (=नवेदसो भवत=ज्ञातारो भवत=तानि जानीत= तानि स्वीकुरुत ) ॥

हे मरुतः, कस्य मर्त्यस्य सेवां स्वीकर्तुं यूयं स्थिताः यस्माद्यूयं क्षिप्रं नागच्छथ अस्माकं सखिभूता यूयं युष्माकं सखिभूतान् अस्मान् प्रति क्षिप्रमागच्छत । अस्मासु च श्रेष्ठस्तोत्रकरणसामर्थ्यं स्थापयित्वा एतानि क्रियमाणानि सेवाकर्माणि स्वीकुरुतेति भावः ॥

१३. हे मरुतांनो, या लोकीं तुम्हांला कोण पूजित आहे? जिवलग मित्र असे जे तुम्ही ते आपल्या जिवलग मित्रांकडे येण्याकरितां निघा. हे शोभनवर्ण [ मरुतांनो ], तुम्ही आमच्या अंगीं स्तोत्रांची प्रेरणा करा आणि ही माझी उपासना लक्ष लावून ग्रहण करा.

13. Who is worshipping you in this world, O Maruts? Start ye forth, ye friends towards us your friends. Inspire into us, O bright [ Maruts ], pious hymns, and know you of these my rites.

---

१३. आतां येथून इंद्र आणि मरुत् यांचा संवाद संपला, आणि ऋषि मरुतांस बोलत आहे. 'हे मरुतांनो, तुम्ही लवकर कां येत नाहीं? दुसऱ्या कोणा एकाद्या उपासकाची उपासना ग्रहण करण्याकरितां कोठें अडून राहिलां काय? आम्ही तुमचे जिवलग मित्र आहों, आणि तुम्ही आमचे जिवलग मित्र आहां. यास्तव तुम्ही लवकर या, आणि आमच्या अंगीं तुमचें स्तोत्र रचण्याची शक्ति उत्पन्न करा, आणि ही जी आम्ही तुमची उपासना करीत आहों, ती तुम्ही स्वीकारून घ्या.'

'स्तोत्रांची प्रेरणा करा आणि'= 'मन्मानि अपिवातयन्तः.' आम्हांला स्तोत्रें करावयास येतील असें करा. ऋ. १०. २५. १ यांत, 'भद्रं नो अपि वातय मनः' (=हे सोमा, तूं आमच्या अंगीं कल्याणकारक मन स्थापित कर) असें म्हटलें आहे तें पहा. 'अपिवातय' म्हणजे अक्षरशः अर्थ '[ आम्हां]कडेस वाहून आण' असा आहे. आणि मरुतांस ( वायुदेवतांस ) वाहून आणण्याविषयीं सांगणें हें योग्यच आहे हें सांगावयास नको. 'मन्म' शब्दाचा स्तोत्र हा अर्थ प्रसिद्ध आहे. येथें सायण 'धन' असा अर्थ करितात. तसा घेतला तर 'मन्मानि अपिवातय' म्हणजे 'धनें घेऊन ये' असा अर्थ करावा. 'मन्म' शब्दाचा अर्थ सायण पुष्कळ ठिकाणीं धन असा करितात खरा. ऋ. ४. ५. ६; ४. ६. १; ४. ११. २ आणि त्याजवरील सायणभाष्य पाहा.

वृत्तासाठीं 'नु अत्र' असें व्यस्त वाचावें लागतें.

आ यद्दुवस्याद्दुवसे न कारुरस्माञ्चक्रे मान्यस्य मेधा ।
ओ षु वर्त मरुतो विप्रमच्छेमा ब्रह्माणि जरिता वो अर्चत् ॥ १४ ॥

आ । यत् । दुवस्यात् । दुवसे । न । कारुः । अस्मान् । चक्रे । मान्यस्य । मेधा ।
ओ इति । सु । वर्त । मरुतः । विप्रम् । अच्छ । इमा । ब्रह्माणि । जरिता । वः । अर्चत् ॥ १४ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे मरुतः, यत् (=यस्मात् कारणात्) अस्मान् (=? अस्माकम्=उपासकानां) मान्यस्य (=माननीयस्य विदुषः) [कवेर्] मेधा (=बुद्धिः=स्तोत्रकरणशक्तिः) कारुर्न (=कारुरिव=साक्षात्कविरिव=स्तोता यथा करोति तथा) [युष्मान्] दुवस्यात् (=अन्यस्मात् उपासकात्) दुवसे (=दुवस्यते=परिचरते=दुवस्यम् उपासकं मां प्रति) आ चक्रे (=आकृतवत्यस्ति=अस्मदभिमुखान् कृतवत्यस्ति) [अतः कारणात्] [इमं] विप्रम् अच्छ (=स्तोतारं प्रति) ओ सु वर्त (=क्षिप्रमावर्तध्वं=त्वरयागच्छत)। [एष] जरिता [हि] (=स्तोता हि) इमा ब्रह्माणि (=एतानि स्तोत्राणि) वः (=युष्मदर्थम्) अर्चत् (=प्रोक्तवानस्ति) ॥

इमां दुर्बोधां सायण एवं व्याचष्टे । हे मरुतो दुवस्यात् युष्मत्परिचरणार्हात्स्तोत्रात् तेन स्तोत्रेण दुवसे परिचरणाय पर्याप्ता कारुः कर्त्री स्तुतिकुशला मान्यस्य माननीयस्य विदुषो मेधा बुद्धिरस्मान् । नेति संप्रत्यर्थे । इदानींतनानाचक्रे । आभिमुख्येन करोति प्राप्नोतीत्यर्थः । यद्वा षष्ठीबहुवचनम् । इदं सूक्तं दुवस्यानां परिचरणार्हाणां दुवसे परिचरणायेत्यर्थः । अतो हे मरुतो यूयं विप्रं मेधाविनं यजमानं मामगस्त्यमच्छ आभिमुख्येन प्राप्तुं सु सुष्ठु वर्त । ओ इति निपातद्वयसमुदायरूप एको निपातः आङित्याभिमुख्येन । उकारोवधारणे । आवर्तध्वमेव । किमर्थमेवमिति उच्यते । इमा ब्रह्माणि इमानि परिवृढानि कर्माण्युद्दिश्य जरिता स्तोता वो युष्मानर्चत् । अर्चति । यस्मादेवं तस्मादावर्तध्वमित्यर्थः । इति ॥

सति तु 'अस्मान्'पदस्य स्थाने 'युष्मान्' इति पदे सुलभार्थः स्यान्मन्त्र एषः । इदानीं हि यद्यस्माद्युष्मान्मरुतो मान्यस्य माननीयस्य स्तोतुर्मेधा मेधया कृता स्तुतिः कारुर्न कारुरिव प्रत्यक्षं कविवद्भूत्वा दुवस्यात् पूर्वमन्त्रोक्तादन्योपासकात् दुवसे मह्यं परिचरणवते आ चक्रे आवर्तितवती भवति तस्मात् हे मरुतः यूयम् ओ सु वर्त अस्मदभिमुखं यज्ञमागच्छतेत्यादिप्रकारेण योजनीयम् ॥

१४. [ हे मरुतांनो ], ज्यापेक्षां आमच्या [ या ] विद्वान् स्तोत्याच्या प्रज्ञेनें कवीप्रमाणें [ दुसऱ्या ] उपासकापासून [ मज ] उपासकाप्रत [ तुम्हांला ] वळविलें आहे, [ त्यापेक्षां ] हे मरुतांनो, तुम्ही [ या ] कवीप्रत लवकर या. स्तोत्यानें हीं स्तोत्रें तुम्हांप्रीत्यर्थ गाइलीं आहेत.

14. Inasmuch as [ O Maruts ], the wisdom of [ this ] our learned poet has turned [ you ] from [ another ] worshipper to [this] worshipper as [does] a poet, come to [ this ] sage quickly, O Maruts. The praiser has sung these hymns for you.

---

१४. भावार्थः 'हे मरुतांनो, हा जो आमचा सूक्तवक्ता विद्वान् कवि आम्हांकरितां सूक्त म्हणत आहे त्याच्या बुद्धीनें ज्यापेक्षां तुम्हांला पूर्वमंत्रोक्त दुसऱ्या उपासकाकडून काढून, जसा एकादा साक्षात् कवि तुम्हांपुढें उभा राहून त्याणें तुम्हांस ओढून आपणाकडे वळवावें त्याप्रमाणें, आम्हांकडे वळविलें आहे, त्यापेक्षां हे मरुतांनो, तुम्ही सत्वर आमच्या या कवीप्रत ( म्हणजे आम्हां उपासकांप्रतच ) निघून या. हा जो तुमचा सूक्तवक्ता अथवा स्तोता, तो हीं स्तोत्रें तुम्हांप्रत गात आहे.'

ही ऋचा फार कठिण आहे. उत्तरार्ध बराच सोपा आहे, तरी त्याविषयीं, आणि विशेषेंकरून पूर्वार्धाविषयीं, अर्थलाभ सुलभ नसल्यामुळें ही ऋचा फार संदिग्धार्थक अशी मानण्यांत येते. विद्वान् मोक्षमूलराचार्य तें म्हणतात, कीं या ऋचेच्या पाठामध्यें कांहीं तरी फेरफार केल्याशिवाय अथवा पाठ बदलल्याशिवाय हिचा अर्थ लावणें फार कठिण, किंबहुना अशक्यच आहे, तें योग्य दिसतें. त्याप्रमाणें आम्हीं 'अस्मान्' हें पद 'अस्माकम्' अशा अर्थी आहे असें समजून निर्वाह केला आहे. याशिवाय 'युष्मान्' किंवा 'वः' हें सहज अध्याहार्य कर्म आम्हीं अध्याहृत घेतलें आहे. दुसरेहि भाषांतरकर्ते अर्थ लावण्याकरितां या मंत्रांत कांहींना कांहीं व्यत्यय समजूनच निर्वाह करितात. सायणांनींहि तसेंच केलें आहे. आणि मोक्षमूलर यांनींहि तसेंच केलेलें आहे तें पहा. परंतु आम्हांस वाटतें कीं, या सर्व मंत्रांत ज्या अडचणी आहेत त्या, 'अस्मान्' बद्दल 'युष्मान्' असें वाचावें म्हणजे नाहींशा होतील. 'युष्मान्' हें मरुतांला लागेल आणि मग अध्याहार सुद्धा करावा लागणार नाहीं.

'आमच्या [ या ] विद्वान् स्तोत्याच्या प्रज्ञेनें' = 'अस्मान् मान्यस्य मेधा.' म्हणजे यांतील जे उपासक, त्यांजकरितां एक स्तोता स्तोत्र म्हणत आहे अशी कल्पना केली पाहिजे. आणि त्या स्तोत्यानें आपल्या बुद्धीच्या बळानें रचलेली जी स्तुति ( मेधा ), ती एकाद्या साक्षात् क-

एष व: स्तोमो मरुत इयं गीर्मान्दार्यस्य मान्यस्य कारोः ।
एषा यासीष्ट तन्वे वयां विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥१५॥२६॥३॥

एषः । वः । स्तोमः । मरुतः । इयम् । गीः । मान्दार्यस्य । मान्यस्य ।
कारोः ।
आ । इषा । यासीष्ट । तन्वे । वयाम् । विद्याम । इषम् । वृजनम् ।
जीरऽदानुम् ॥ १५ ॥ २६ ॥ ३ ॥

## भाषायाम्.

१५. हे मरुतः, मान्यस्य (=माननीयस्य=प्रशस्तस्य) कारोः (=स्तोतुर्) मान्दार्यस्य (=एतन्नामकस्य उपासकस्य) एष स्तोमः (=इदं स्तोत्रम्) इयं गीः (=इयं च वाक् स्तोत्ररूपैव) वः (=युष्मदर्थ) [मार्पितास्ति]। [अतः कारणात्] [यूयं तस्य मान्दार्यस्यार्थम्] इषा आ यासीष्ट (=अन्नेन सह आगच्छत) वयां (=वयमपि) तन्वे (=आत्मार्थम् अस्माकमर्थं) इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

वयां वयमपीषमन्नं वृजनं बलं जीरदानुं जयशीलदानमेतत्सर्वं विद्याम। युष्मास्वागतेषु यज्ञसंपूर्त्यिष्ट्यादिद्वारा लभेमहीति सायणः ॥

इति द्वितीयाष्टके तृतीयोध्यायः ॥

वीप्रमाणें मरुतांसमक्ष जाऊन उभी राहून तिनें त्यांस या उपासकाकडेस वळण्याविषयीं विनंति करून शेवटीं त्यांजकडेस वळविलें असें तात्पर्य आहे.

'[दुसऱ्या] उपासकापासून [मज] उपासकाप्रत '=' दुवस्यात् दुवसे.' 'नमस्य' शब्द जसा 'नमस्' पासून झाला आहे, तसा 'दुवस्य' हा 'दुवस्' (पूजा) यापासून झाला आहे, आणि 'पूजा करणारा,' 'भक्त' असा त्याचा अर्थ समजला पाहिजे. शिवाय 'दुवस्' म्हणजेच पूजा अथवा उपासना करणारा भक्त असा अर्थ होतो, याविषयीं ऋ. १. १६८. ३ आणि त्यावरील भाष्य पहा. पूर्वोक्त मंत्रांत, 'दुसऱ्या कोणत्या उपासकाकडे तुम्ही अडून राहिलां?' असें मरुतांस बोलून यांत मरुतांला त्या दुसऱ्या उपासकाकडून वळवून आमच्या स्तुतीनें आणिलें असें सूक्तकर्ता म्हणत आहे. वस्तुतः या सर्व सूक्ताचा कर्ता मान्दार्य आहे, (खालचा मंत्र पहा) तथापि हा १४ वा मंत्र मान्दार्यानें ज्या उपासकाकरितां तो स्तोत्र म्हणत आहे, त्याच्या मुखीं घातला आहे.

'कवीमत '=' विप्रम् अच्छ' आणि 'स्तोत्यानें '=' जरिता,' हे एकच होत. पुढील मंत्रांतील मान्दार्य विवक्षित आहे.

वृचासाठीं 'वके मान्यस्य' बद्दल 'करे मानिअस' असें म्हणून 'अच्छ इषा' असेंहि म्हणावें लागतें.

१५. हे मरुतांनो, प्रशस्त कवि मान्दार्य याचें हें स्तोत्र [आणि] ही स्तुति तुम्हांला [अर्पण केली आहे]. तुम्ही [त्याजकरितां] अन्न घेऊन या. आणि आम्हां स्वताहालाहि अन्न, बळ आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र यांची प्राप्ति होओ.

15. This praise, O Maruts, [and] this hymn of the venerable poet Mândârya is [offered] unto you. Come you with food [for him]. And may we also obtain for ourselves food, strength and a son that shall quickly make us rich.

१५. 'या प्रकारेंकरून हे मरुतांनो, या शिष्ट मान्दार्य कवीनें तुमची ही प्रार्थना आणि हें स्तोत्र केलें आहे. तर तुम्ही त्याजकरितां अन्न घेऊन या. आणि आम्हांलाहि अन्न, बळ आणि सत्वर संपत्ति प्राप्त करून देणारा पुत्र हीं मिळत असें करा.' यांत प्रथम, सूक्त रचणाऱ्या मान्दार्य नावाच्या कवीला मरुतांनीं अन्न प्राप्त करून द्यावें अशी प्रार्थना करून, नंतर ज्या उपासकांकरितां मान्दार्य स्तोत्र म्हणत आहे, त्या उपासकांलाहि धनधान्य, शौर्य आणि देवांस लवकर प्रसन्न करून घेऊन लवकर बापाला श्रीमन्त करणाऱ्या पुत्राचा लाभ होओ अशी प्रार्थना आहे.

'मान्दार्य.' मान्दार्य हें विशेषनाम आहे असें सायणाचार्यांच्या भाष्यावरून स्पष्ट होत नाहीं, तथापि आहे असें उघड दिसतें. कारण तें सूक्तान्तीं आलें आहे, आणि वाक्यसंदर्भावरून केवळ विशेषण संभवत नाहीं यास्तव आम्हीं विशेषनाम घेतलें आहे. हा शब्द पुनः कोठें आलेला आढळत नाहीं.

या सूक्ताचा ऋषि अगस्त्य म्हणून सुरुवातीस सांगितलें. तो नामधारी कर्ता असावा, म्हणजे ज्याच्या वंशांतून अथवा कुळांतून संहिताकारास हें सूक्त मिळालें त्याचें नांव अगस्त्य, पण वस्तुतः सूक्त रचणारा मान्दार्य या नांवाचा (प्रायः त्याच कुळांतला) कोणीतरी पुरुष असला पाहिजे.

'[त्याजकरितां]'='[तस्मै].' हा अध्याहार 'तन्वे' (=आम्हां स्वताहाकरितां) हा जो शब्द तिसऱ्या पादांत आहे त्याजवरून सहज सुचतो. सूक्ताच्या शेवटीं वर मागतांना बहुतकरून स्तोत्र रचणाऱ्या कवीला अमुक प्राप्ति व्हावी आणि त्या कवीची योजना करणाऱ्या उपासकांला अमुक प्राप्ति व्हावी अशी प्रार्थना येत असते.

'आम्हां स्वताहालाहि'='तन्वे.' 'तनु' म्हणजे अक्षरशः अर्थ आपलें 'शरीर' असा जरी होतो, तरी त्यावरून 'आपण स्वता' असा मागाहून अर्थ होऊं लागला. आणि हें योग्यच आहे. कारण 'आत्मा' (आपला प्राण) याचा जसा 'आपण स्वता' असा अर्थ मागाहून झाला तसाच 'तनु' (आपलें शरीर) याचाहि 'आपण स्वता' असा अर्थ होणें यांत नवल नाहीं. ऋ. १.५६.८ आणि त्यांत 'तन्वि' हें रूप पहा. ऋ.६.५१.७, ऋ. ४.५६.६ आणि त्यांजवरील सायण-

## सूक्तम् १६६.

मैत्रावरुणोगस्त्य ऋषिः । मरुतो देवता । अन्त्ये द्वे त्रिष्टुभौ । शिष्टं सूक्तं जागतम् ॥

**तन्नु वोचाम रभसाय जन्मने पूर्वं महित्वं वृषभस्य केतवे ।**
**ऐधेव यामन्मरुतस्तुविष्वणो युधेव शक्रास्तविषाणि कर्तन ॥ १ ॥**

तत् । नु । वोचाम । रभसाय । जन्मने । पूर्वम् । महिऽत्वम् । वृषभस्य । केतवे ।
ऐधाऽइव । यामन् । मरुतः । तुविऽस्वनः । युधाऽइव । शक्राः । तविषाणि । कर्तन ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [ वयं ] नु (=अधुना ) [ मरुद्गणस्य ] तत् पूर्वं (=प्रसिद्धं माहात्म्यं ) रभसाय जन्मने ( =राभस्ययुक्ताय मरुज्जाताय=वेगवते मरुत्संघाय ) वृषभस्य केतवे (=वीर्यवत इन्द्रस्य प्रज्ञापकाय=ध्वजभूताय ) [ तस्मै मरुत्संघाय ] वोचाम (=ब्रूमः )। हे मरुतः, हे तुविष्वणः शक्राः (=प्रभूतध्वनयो वीराः ), युधेव ( =''युद्धेन तत्तद्युद्धनिमित्तं यथा तविषाणि कुरुथ तद्वत् '') यामन् (=यामनि अद्य मार्गे ) ऐधेव तविषाणि (=ऐधानीव तविषाणि=एधःसंबन्धितेजःसदृशानि सामर्थ्यानि=अतिदीप्ततेजःसदृशानि बलानि ) कर्तन (=कर्त=कुरुत=आविष्कुरुत ) ॥

दुर्बोधाया अस्या अयमर्थः । हे मरुतः, वयमिदानीं युष्माकं पुरातनं माहात्म्यं स्तुमः । तर्हि यथा युद्धाय गच्छन्तो यूयं ज्वलदिध्मसदृशानि दीप्तानि सामर्थ्यान्याविष्कुरुथ तद्वदद्यास्माकं यज्ञायागच्छन्तस्तेजस्वीनि बलान्याविष्कुरुतेति ॥

सायण एवं व्याख्यातवान् । हे मरुतो वयं युष्मदीयं तत्तादृशं प्रसिद्धं पूर्वं पूरकं पूर्वतनं वा महित्वं माहात्म्यं नु क्षिप्रं वोचाम । ब्रूमः । किमर्थम् । रभसाय राभस्ययुक्ताय जन्मने वेग्नां प्रादुर्भावाय । वेग्नां संनिधानायेत्यर्थः । तदपि किमर्थमित्यत आह । वृषभस्य फलस्य वर्षितुर्यज्ञस्य केतवे प्रज्ञानाय वायुप्रेरणेन मेघागमनं प्रसिद्धम् । हे तुविष्वणः गमनसंरम्भेण प्रभूतध्वनियुक्ताः हे शक्राः सर्वमपि कर्तुं शक्ताः । यूयं यामन् यामनि यागगमने प्रस्तुते सत्यैधेव ऐधान्येधःसंबन्धीनि तेजांसीव स्वकीयेन महत्त्वेन तविषाणि बलानि सामर्थ्यानि कर्तन । कुरुत । तरस्तुम इत्यर्थः । तत्र दृष्टान्तः । युधेव युद्धेन तत्तद्युद्धनिमित्तं यथा तविषाणि कुरुथ तद्वत् । इति ॥

## सूक्त १६६.

**ऋषि—अगस्त्य. देवता—मरुत्.** वृत्त—शेवटच्या दोन त्रिष्टुभ्, बाकी सर्व सूक्त जगती वृत्ताचें.

१. आतां आम्ही शूर इंद्राचा ध्वज असें जें वेगवान् मरुतांचें वृन्द त्यासाठीं त्याचें प्रसिद्ध जें पुरातन महत्त्व तें वर्णितों.—हे मरुतांनो, हे महानाद वीर हो, तुम्ही युद्धास जातेवेळीं जसे जळणाऱ्या कोलितासारिखे आपले प्रताप प्रगट करितां, तसे [ आज ] आपल्या मार्गावर ते प्रगट करा.

## HYMN 166.

To the *Maruts*. By *Agastya* the brother of *Vasishtha*. Metre—*Jagatî*, except in the last two verses where it is *Trishṭubh*,

1. Let us sing [its] well-known ancient greatness for the vigorous race [of Maruts], the herald of the hero [Indra]. O Maruts, O loud-roaring heroes, manifest on your road [to-day] your resplendent powers as when on the occasion of a battle.

---

भाष्य पहा; ‘ तन्वा ’ म्हणजे ‘ मूर्त्या ’ असा ते अर्थ करितात तोच अर्थ आमच्या म्हणण्यास उत्तम साधक होय.

‘ आम्हांला ’=‘ वयाम्. ’ सायणांनीं ‘ वयम् ’च्या बद्दल ‘वयाम्’ हें रूप आहे असें समजून निर्वाह केला आहे, त्याला आम्ही अनुसरलों आहों. ‘ वयम् ’ शब्द वृत्तानुरोधानें ‘ वयाम् ’ असा उच्चारावा यांत नवल नाहीं. ‘ वया ’ शब्द वेदांत येतो त्याचा अर्थ शाखा असा होतो. त्यावरून ( आणि कदाचित् ऋ. ६. २. ५ यावरील सायणभाष्याचे आधारावरून ) ‘ वयाम् ’ म्हणजे पुत्रपौत्रादिक संतति असा मोक्षमूलराचार्य यांणीं अर्थ केला आहे. पण केवळ ‘ वया ’ म्हणजे संतति असा अर्थ होईल हें संभवत नाहीं असें आम्हांस दिसतें.

‘ लवकर संपत्ति मिळवून देणारा [ पुत्र ]’=‘ जीरदानुम्. ’ ‘ जीरदानु ’ हें ‘ लवकर संपत्ति देणारा ’ या अर्थीं मरुत्, इंद्रावरुण, मित्रावरुण इत्यादि देवांस लाविलेलें आढळतें, त्यावरून आम्हीं ‘ पुत्रम् ’ हें अध्याहृत घेतलें आहे. ‘ वृजन ’ म्हणजे बळ, हा शब्द जर निर्विवाद रीतीनें पुंलिंगी असता, तर ‘ जीरदानुं वृजनम् ’ म्हणजे ‘ लवकर धन मिळवून देणारें बळ ’ असें भाषांतर केलें असतें.

वृत्तासाठीं ‘ मान्दारिअस्य मानिअस्य ’ आणि ‘ तनुए वयँअम् ’ असें म्हणावें लागतें.

येथें दुसऱ्या ‘ अष्टकाचा ’ तिसरा अध्याय समाप्त झाला.

नित्यं न सूनुं मधु बिभ्रत उप क्रीळन्ति क्रीळा विदथेषु घृष्वयः ।
नक्षन्ति रुद्रा अवसा नमस्विनं न मर्धन्ति स्वतवसो हविष्कृतम् ॥२

नित्यम् । न । सूनुम् । मधु । बिभ्रतः । उप । क्रीळन्ति । क्रीळाः । विदथेषु । घृष्वयः ।
नक्षन्ति । रुद्राः । अवसा । नमस्विनम् । न । मर्धन्ति । स्वऽतवसः । हविःऽकृतम् ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. क्रीळाः (=क्रीडनशीला) घृष्वयः (=कान्तियुक्ता) [एतादृशा मरुतो] मधु बिभ्रतः (=माधुर्यम् आनयन्तः=माधुर्योपेतं मध्वादिकम् आनयन्तः सन्तो) नित्यं सूनुं न [उप] (=औरसपुत्रसमीप इव) [नमस्विनम्] उप विदथेषु क्रीळन्ति (=हविर्दत्तवतो यजमानस्य समीपे यज्ञेषु विहरन्ति) । स्वतवसः (=स्वायत्तबला) रुद्राः (=रुद्रपुत्रा मरुतः) अवसा नमस्विनं नक्षन्ति (=स्वकर्तव्येन रक्षणेन सह यजमानं प्राप्नुवन्ति) [अपि च] हविष्कृतं (=हविरर्पयन्तम् उपासकं) न मर्धन्ति (=न हिंसन्ति=न क्लेशयन्ति) ॥

---

१. 'हे मरुतांनो, वेगवान्, आणि वीर अशा इंद्राचे ध्वजच असे जे तुम्ही त्यांचें पुरातन माहात्म्य आम्ही तुम्हांसमक्ष गायास इच्छितों. तर हे महानाद करणारे आणि शौर्यानें भरलेले मरुत् हो, तुम्ही युद्धास जाऊं लागलां म्हणजे जशीं आपलीं बलें जाज्वल्य रीतीनें प्रगट करितां तशीं आज आमच्या यज्ञाला येतांना प्रगट करा.'

'शूर इंद्राचा ध्वज'='वृषभस्य केतुः.' म्हणजे इंद्राच्या पुढें ध्वजाप्रमाणें अथवा [illegible]प्रमाणें जात असतात असे, जेथें जेथें इंद्र असेल तेथें तेथें राहतात असे. [illegible] 'ध्वज' असें म्हणतात.

'युद्धास जातेवेळीं इ०'='युधेव इ०.' हा सगळा उत्तरार्ध कठिण आहे. त्यांत 'यामनि तविषाणि कर्तन'='आपलीं बळें, म्हणजे आपले प्रताप, प्रगट करा' इतकें सोपें आहे; पण 'ऐधा इव' आणि 'युधा इव' ह्या उपमा दुर्बोध आहेत. पाश्चात्य विद्वान् निरनिराळे अर्थ सुचवितात; पण आम्हीं सायणांस अनुसरणें योग्य मानून त्यांच्या प्रमाणें अर्थ केला आहे. आम्हांस संशय नाहीं असें नाहीं. 'रभसाय जन्मने,' 'वृषभस्य केतवे,' 'ऐधेव' आणि 'युधेव' या शब्दांविषयीं वाद आहे. 'जन्म' म्हणजे जरी जात अथवा [illegible]

२. क्रीडा करणारे [ आणि ] कांतियुक्त [ असे जे मरुत्, ते ] गोड [ खावयास ] आणणारे [होत्साते ] यज्ञांत औरस पुत्राप्रमाणें भजकाजवळ क्रीडा करीत असतात. रुद्राचे पुत्र मरुत् पाठबळ घेऊन भजकाप्रत येतात; स्वकीयबलसंपन्न [ मरुत् ] हविर्दायक उपासकाला क्लेश होऊं देत नाहींत.

2. The resplendent [and] playful Maruts, bringing sweetness with them play with their worshipper as with a son born of their own body; they the sons of Rudra come to their worshipper with protection; they, who possess strength of their own, do not allow him who makes an oblation to be distressed.

(प्राण्यांचा प्रकार) असा अर्थ होतो, तरी केवळ 'संख्या' वर्ग, समूह, समुदाय असा होत नाहीं; आणि मरुत् ह्यांचा योनि अथवा त्यांची जाति नाहीं, त्यांचा गण, वर्ग अथवा केवळ संख्या आहे. तसेंच त्यांला इंद्राचे केतु असें दुसरे ठिकाणीं म्हटलेलें प्रसिद्ध दिसत नाहीं. 'ऐधा इव' याचा सायणांनीं दिलेला 'कोलिताच्या तेजासारिखे जे प्रताप ते' हा अर्थ संशयग्रस्त आहे. आणि 'युधा इव' याचा 'युद्धाच्या प्रसंगीं जसे' असा अर्थ होईल कीं नाहीं याविषयीं खातरी नाहीं.

या ऋचेचा उत्तरार्ध आणि दुसरा चरण हे केवळ आधुनिक श्लोकाप्रमाणें वाचतां येतात.

२. 'रुद्रपुत्र जे मरुत् ते उपासकाच्या घरीं येतात आणि त्याजबरोबर यज्ञांत आपल्या औरस मुलाबरोबर खेळण्याप्रमाणें खेळतात. ते उपासकाला क्लेश होऊं देत नाहींत.'

'क्रीडा करणारे ...... क्रीडा करीत असतात '=' क्रीळाः ...... क्रीळन्ति.' सू. ३७ मं. १, ५ आणि टीप पहा.

'रुद्राच पुत्र [ मरुत् ]'=' रुद्राः.' सू. ३९ मं. ४ आणि टीप पहा.

'स्वकीयबलसंपन्न '=' स्वतवसः.' म्हणजे जे स्वताहाच बळवान्, ज्यांचें बळ दुसऱ्यापासून प्राप्त झालेलें नव्हे, आणि जें बळ ते आपल्या स्वताहाच्या प्रेरणेनें योजूं शकतात.

यस्मा ऊमांसो अमृता अरांसत रायस्पोषं च हविषा ददाशुषे ।
उक्षन्त्यस्मै मरुतो हिता इंव पुरू रजांसि पयसा मयोभुवः ॥३॥
यस्मै । ऊमासः । अमृताः । अरासत । रायः । पोषम् । च । हविषा ।
ददाशुषे ।
उक्षन्ति । अस्मै । मरुतः । हिताःऽइंव । पुरु । रजांसि । पयसा ।
मयःऽभुवः ॥ ३ ॥
आ ये रजांसि तविषीभिरव्यंत प्र व एवांसः स्वयंतासो अध्रजन् ।
भयंन्ते विश्वा भुवनानि हर्म्या चित्रो वो यामः प्रयंतास्वृष्टिषु ॥४॥
आ । ये । रजांसि । तविषीभिः । अव्यंत । प्र । वः । एवासः ।
स्वऽयंतासः । अध्रजन् ।
भयंन्ते । विश्वा । भुवनानि । हर्म्या । चित्रः । वः । यामः । प्रऽयं-
तासु । ऋष्टिषु ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. हविषा ददाशुषे (=हविर्दानेन परिचरते) यस्मै [उपासकाय] ऊमासः (=ऊमाः=रक्षितारः) अमृताः (=मरणरहिता) [मरुतो] रायस्पोषं (=रायः पोषं=धनस्य पुनःपुनर्वर्धनं=धनस्योत्कर्षम्) अरासत (=प्रायच्छन्=प्रदातुमिच्छन्ति) अस्मै (=तस्मै) मयोभुवः (=सुखस्य भावयितारः=सुखस्य प्रदातारो) मरुतः हिता इव (=हिताचरणाः सखाय इव) पुरू रजांसि (=पुरूणि रजांसि=बहूनि स्थलानि) पयसा (=उदकेन=मेघोदकेन) उक्षन्ति (=सिञ्चन्ति) ॥

४. [हे मरुतः], ये [व एवासः=युष्माकमश्वास्] तविषीभिः (=स्वबलैः) रजांसि आ अव्यत (=लोकान् व्याप्नुवन्ति=अन्तरिक्षादिप्रदेशान् पूरयन्ति) [ते] व एवासः (=युष्माकमश्वाः) स्वयतासः (=आत्मनैव=सारथिना विनैव रथे युक्ताः सन्तः) प्र अध्रजन् (=प्रकर्षेण गच्छन्ति=धावन्ति)। [युष्माकं गमने सति] विश्वा भुवनानि हर्म्या (=विश्वानि भुवनानि हर्म्याणि च=सर्वाणि भूतजातानि सर्वाणि गृहादीनि च सुसुप्तभूतानि) भयन्ते (=भयात्कम्पन्ते)। [अतः कारणात्] ऋष्टिषु प्रयतासु (=युष्माकं हेतिषु प्रकर्षेणोद्यतासु सतीषु) वो यामः (=युष्माकं गमनं) चित्रः (=आश्चर्यकारकं) [भवति] ॥

३. आणि रक्षण करणारे अमर [ मरुत् ] ज्या हविर्दायक उपासकाला अभिवृद्ध होणारें धन देतात, त्याजकरितां [ ते ] कल्याणकारक मरुत् मित्रांप्रमाणें अनेक स्थळें पयानें भिजवितात.

४. [हे मरुतांनो], [तुमचे] जे [ अश्व ] [ सर्व आकाश]प्रदेशांला [आपल्या] बळाच्या योगानें व्यापून टाकितात, [ ते ] तुमचे अश्व आपले आपणच जोडिले जाऊन धांवतात. [ तुम्ही आलां म्हणजे] सकळ भूतें [आणि] सकळ घरें भयानें कांपतात. [तुमचे] भाले पुढें पसरले जाऊन [ जेव्हां तुम्ही चालतां, तेव्हां तें ] तुमचें जाणें आश्चर्यकारक [दिसत असतें ].

3. And for that giver of oblation to whom the affectionate, immortal [and] beneficent Maruts have given prosperity— they like friends sprinkle many regions with rain-water for the benefit of that worshipper.

4. Your horses which occupy the aerial regions with [their] powers, rush forth self-harnessed. All creatures[ and ] all houses tremble with fear. Wonderful [ is ] your march with your spears stretched forth.

---

३. या ऋचेचा भावार्थ असा दिसतो कीं, 'ज्या उपासकाला संपत्ति देण्याची आणि तिची उत्तरोत्तर अभिवृद्धि करण्याची इच्छा मरुत् करितात, त्या उपासकांचें कल्याण व्हावें म्हणून मरुत् प्रिय मित्राप्रमाणें सर्वत्र पाऊस पाडून जिकडे तिकडे स्वस्थता करितात.'

'रक्षण करणारे'='ऊमासः.' म्हणजे उपासकांचें रक्षण करण्याविषयीं नित्य सिद्ध असे, म्हणजे कृपाळु, मायाळु.

'हविर्दायक उपासकाला'='हविषा ददाशुषे.' अक्षरशः अर्थ, 'हवीनें उपासना करणाऱ्याला.' 'दाश्' धातूशीं बहुतकरून हवीची द्वितीया येते; पण याप्रमाणें तृतीयाहि केव्हां केव्हां आढळते. उदाहरणार्थ, 'यां घृतेन दाशति' (सू. ९३ मं. १०); 'यां यज्ञैः दाशति' (सू. १५१ मं. ७); 'हविर्भिर्दाशेम' (ऋ. ७. १४. १). शिवाय ऋ. ४. ४२. ९ आणि भाष्य पहा.

'अभिवृद्ध होणारें धन'='रायः पोषम्.' अक्षरशः अर्थ 'धनाची अभिवृ-

**यत्त्वेषयामा नदयन्त पर्वतान्दिवो वा पृष्ठं नर्या अचुच्यवुः ।**
**विश्वो वो अज्मन्भयते वनस्पती रथीयन्तीव प्र जिहीत ओषधिः ॥ ५ ॥ १ ॥**

यत् । त्वेषऽयामाः । नदयन्त । पर्वतान् । दिवः । वा । पृष्ठम् । नर्याः । अचुच्यवुः ।
विश्वः । वः । अज्मन् । भयते । वनस्पतिः । रथियन्तीऽइव । प्र । जिहीते । ओषधिः ॥ ५ ॥ १ ॥

## भाषायाम्.

५. यत् (=यदा) त्वेषयामाः (=दीप्तगमना) [मरुतः] पर्वतान् (=पर्ववतो मेघान्) नदयन्त (=नादयन्ति) वा (=अथवा) [यदा] नर्याः (=नृभ्यो हितास्) [ते] दिवो पृष्ठं (=द्युलोकस्यात्यन्तोत्तमं भागम्) अचुच्यवुः (=अचालयन्=चालयन्ति)—[तदा] [हे मरुतः], वो अज्मन् विश्वो वनस्पतिः भयते (=युष्माकं मार्गे सर्वोपि महावृक्षो भयात्कम्पते) [अपि च] [विश्वा] ओषधिः (=सर्वाण्योषधिः=सर्वा ओषधयो) रथीयन्तीव (=रथारूढेव सती) प्र जिहीते (=प्रकर्षेण स्वस्थानाद्गच्छति=प्रधावति) ॥

वेगवति रथे नीता ओषधिर्यथा त्वरया गच्छति तथा मरुतां गमने सति वायुनोत्पाटिता प्रेरिता च सा दृश्यत इति भावः ॥

रथीयन्तीव प्र जिहीत ओषधिरित्यत्र । तथौषधिः प्रियंगुव्रीह्यादिः प्रजिहीते प्रकर्षेण गच्छति । स्वस्थानादितस्ततश्चलतीत्यर्थः । तत्र दृष्टान्तः । रथीयन्तीव । रथमात्मन इच्छन्ती स्त्री रथारूढेत्यर्थः । तादृशी स्त्रीव । सा यथा चलति तद्वत् । इति सायणः ॥

---

डि.' म्हणजे धन अथवा संपत्ति उत्तरोत्तर अधिक अधिक होत जाणें ही वाढ. 'रायः पोषः' हे शब्द ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आले आहेत, ते सर्व येथ पाहून आम्ही भाषांतर केलें आहे. मोक्षमूलर या विद्वानांनीं 'धनाचें बाहुल्य,' म्हणजे बहुत धन, असा अर्थ केला आहे, असा वेदांत आधार [illegible]सत नाहीं.

'पयानें'='पयसा.' म्हणजे मेघोदकानें; पण दुधासारिखें जें मिष्ट आणि पोषक मेघोदक तेणेंकरून, असें ध्वनित आहे.

वृत्तासाठीं 'अक्षन्ति अस्मै' असें वाचावें.

४. 'हे मरुतांनो, तुमचे [illegible]

५. जेव्हां तेजःपुंज गमनाचे [ मरुत् ] पर्वतांकडून गर्जना करवितात, अथवा [ जेव्हां ते ] मनुष्यहितकारी [ मरुत् ] द्युलोकाच्या पाठीला हालवून टाकितात, [ तेव्हां ]—[ हे मरुतांनो ], तुमच्या मार्गांत प्रत्येक महावृक्ष भयानें कांपतो, [ आणि प्रत्येक ] झुडूप रथावर घातल्याप्रमाणें धांवतें.

5. When they of the fiery paths have made the mountains roar, or [when] the humane [ Maruts ] have shaken the back of heaven—every lord of the forest trembles through fear on your way, [O Maruts], [ every ] plant flies as if carried on a chariot.

पल्या तेजानें सर्व आकाशादिक प्रदेश भरून टाकितात, आणि त्यांस जुंपण्याला सारथि लागत नाहीं, तर ते आपले आपणच रथाला जोडिले जातात. ते तुमचे घोडे मोठ्या झपाट्यानें धावतात. आणि त्यांनीं ओढिलेल्या रथांत बसून जेव्हां तुम्ही जातां, तेव्हां तुमच्या वेगाला आणि झपाट्याला भिऊन सर्व भूतें आणि सर्व मोठमोठे वाडेहि थरथरां कांपतात. तुम्ही आपले भाले पुढें पसरून जेव्हां जात असतां, तेव्हां तुमचें गमन फार आश्चर्यकारक होय.'

'व्यापून टाकितात '=' अव्यत. ' मोक्षमूलर हे ' रजांसि अव्यत.' म्हणजे ' मेघांला क्षोभविते झाले ' असा अर्थ करितात. पण त्या अर्थाला एतद्देशीय प्रमाणाचा आधार आहे असें दिसत नाहीं. सायण प्रायः येथें आम्हीं केल्याप्रमाणें ' व्यापणें ' ' वेष्टणें ' इत्यादि अर्थ करितात, तो युक्त दिसतो.

' भाले '=' ऋष्टिषु.' सू. ३७ मं. २, सू. ६४ मं. ४८, सू. ८५ मं. ४ आणि टिपा पहा.

वृत्तासाठीं ' हर्मिआ ' आणि ' प्रयतासु ऋष्टिषु ' असें म्हटलें पाहिजे.

५. ' मरुत् जाऊं लागले म्हणजे पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक या त्रिलोकाला हालवीत आणि आपल्या मार्गावर विजेचा चकचकाट पाडीत जात असतात. ते जाऊं लागले म्हणजे मोठमोठे वृक्ष भयानें थरथरां कांपत असतात, आणि सर्व लहान लहान वनस्पति जमिनीवरून उपटून इतक्या वेगानें धांवतात कीं, त्या एका मोठ्या चपळ रथांत घालून नेल्याप्रमाणें दिसतात.'

' तेजःपुंज गमनाचे '=' त्वेषयामाः.' म्हणजे जे जात असतां मार्गावर विजांचा प्रकाश पाडीत पाडीत जात असतात.

' पर्वतांकडून '=' पर्वतान्.' म्हणजे

यूयं न उग्रा मरुतः सुचेतुनारिष्टग्रामाः सुमतिं पिपर्तन ।
यत्रा वो दिद्युद्रदति क्रिविर्दती रिणाति पश्वः सुधितेव बर्हणा॥६

यूयम् । नः । उग्राः । मरुतः । सुऽचेतुना । अरिष्टऽग्रामाः । सुऽमतिम् । पिपर्तन ।
यत्र । वः । दिद्युत् । रदति । क्रिविःऽदती । रिणाति । पश्वः । सुधिताऽइव । बर्हणा ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. हे उग्राः (=प्रबला) मरुतः, अरिष्टग्रामाः (=अहिंसितगणा) यूयं नः (=अस्माकं) सुमतिं (=शोभनबुद्ध्यात्मिकां भक्तिं) सुचेतुना (=शोभनेन मनसा=अनुग्रहेण) पिपर्तन (=पिपृत=पूरयत)। यत्र (=यदा हि) क्रिविर्दती (=? क्रिविर्दती आममांसवदारक्तवर्णदन्तयुक्ता) वः (=युष्मत्संबन्धिनी) दिद्युत् (=विद्युद्रूपा हेतिः) रदति (=' लिखति मेघसंस्त्यायं '=मेघांश्छिनत्ति) [ तदा सा ] सुधिता बर्हणेव (=सुष्ठु हिता प्रेरिता हेतिरिव) पश्वः रिणाति (=पशून् रिणाति=पशून् हिनस्ति)॥
क्रिविर्दती विक्षेपणशीलदन्ती विद्युत् हेतिः । इति सायणः ॥

---

ढग, अथवा मेघ. ' पर्वतांकडून गर्जना करवितात ' यावरून ते अंतरिक्षांतून जेव्हां जात असतात, असें विवक्षित आहे.

'द्युलोकाच्या पाठीला हालवून टाकितात '=' दिवः पृष्ठम् अचुच्यवुः.' म्हणजे मरुत् हे अत्यंत उंच असे जे स्वर्गाचे वरचे प्रदेश त्यांजवरून जाऊं लागले म्हणजे आपल्या वेगानें सर्व त्या प्रदेशांस असे काय हालवून टाकितात. 'च्यु 'धातूचा 'हालविणें' असा अर्थ होतो याविषयीं याच मंडलाचें सू. १६८ मं. ४ आणि त्यावरील भाष्य पाहा.

'[ प्रत्येक ] झुडूप रथावर घातल्याप्रमाणें धांवतें '=' रथीयन्तीव प्रजिहीते. ' ही उपमा समजावयास अवघड आहे. झुडूप रथावर घालून तो रथ मोठ्या वेगानें हाकित असल्यावर जसें मोठ्या त्वरेनें धांवतेंसें दिसतें त्याप्रमाणें मरुत् झपाट्यानें जाऊं लागले म्हणजे लहान लहान झाडें आणि झुडपें आपोआप उपटतात आणि उडून जातात.

या मंत्रांतील पहिल्या अर्धांत परोक्षनिर्देश असून उत्तरार्धांत प्रत्यक्षनिर्देश असल्यामुळें पुरुषव्यत्यय झाला आहे त्याचीं उदाहरणें दुसऱ्या ठिकाणीं वेदांत पुष्कळ आहेत.

वृत्ताकरितां ' नर्या 'च्या जागीं ' नरिआ ' असें वाचावें लागतें.

६. हे प्रबळ मरुतांनो, ज्यांच्या गणांला कोणी उपद्रव करूं शकत नाहींत असे जे तुम्ही ते [ आम्हांवर ] कृपा करून आमची प्रार्थना पूर्ण करा. [हे मरुतांनो], जेव्हां तुमची विक्राळ दांतांची वीज [ मेघांला ] छेदिते, तेव्हां ती निशाण धरून फेकिलेल्या शस्त्राप्रमाणें पशूंचा चुराडा करिते.

6. Do you, O mighty Maruts, whose troops are never hurt [ by any one ], fulfil our prayer with favour. When your gory-toothed lightning cuts through [ the clouds ], it grinds all animals like a well-directed weapon.

---

६. 'हे बळवान् मरुतांनो, तुमची भयंकर वीज जेव्हां सुटते तेव्हां ती खालीं पडतांना मेघमंडळाला भेदून येते आणि भूमीवर आली म्हणजे पश्वादिकांस चिरून टाकिते. याप्रमाणें तुमचा पराक्रम आहे, यास्तव तुम्ही आमची प्रार्थना सफळ करा.'

'विक्राळ दांतांची '=' क्रिविर्दती.' हा शब्द कठिण आहे. 'क्रिविः' हा शब्द 'क्रविः' (=हिरवें मांस ) असा जो शब्द आहे, तद्रूप होय असें कित्येक पाश्चात्त्य विद्वानांस अनुसरून समजून भाषांतर केलें आहे. सायणांनीं केलेला अर्थ भाषेखालीं पहा.

'विक्राळ दांतांची' म्हणजे या ठिकाणीं हिरव्या मांसाप्रमाणें जिचे दांत आरक्त आहेत अशी, असें तात्पर्य आहे.

वृत्तासाठीं 'सुचेतुना । अरिष्टग्रामाः' असें म्हणावें लागतें.

प्र स्कम्भदेष्णा अनवभ्रराधसोऽलातृणासो विदथेषु सुष्टुताः ।
अर्चन्त्यर्कं मदिरस्य पीतये विदुर्वीरस्य प्रथमानि पौंस्या ॥ ७ ॥

प्र । स्कम्भऽदेष्णाः । अनवभ्रऽराधसः । अलातृणासः । विदथेषु । सुऽस्तुताः ।
अर्चन्ति । अर्कम् । मदिरस्य । पीतये । विदुः । वीरस्य । प्रथमानि । पौंस्या ॥ ७ ॥

शतभुजिभिस्तमभिह्रुतेरघात्पूर्भी रक्षता मरुतो यमावत ।
जनं यमुग्रास्तवसो विरप्शिनः पाथना शंसात्तनयस्य पुष्टिषु ॥८॥

शतभुजिऽभिः । तम् । अभिऽह्रुतेः । अघात् । पूःऽभिः । रक्षत । मरुतः । यम् । आवत ।
जनम् । यम् । उग्राः । तवसः । विऽरप्शिनः । पाथन । शंसात् । तनयस्य । पुष्टिषु ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. स्कम्भदेष्णाः (=" स्तम्भितदाना अविरतदाना ") अनवभ्रराधसः (=भ्रंशरहितधना ) अलातृणासः (= ? " अत्यर्थं दातारः ") सुस्तुताः (=सुष्टूपासकैः स्तुताः ) [ एतादृशा ] [ मरुतः ] मदिरस्य पीतये (=मादनसाधनस्य मादकस्य सोमस्य पानाय=इन्द्रो यथा सोमं पिबति तथा ) विदथेषु (=यज्ञेषु ) अर्कम् अर्चन्ति (=इन्द्रस्तोत्रं गायन्ति ) । [ ते हि ] [ तस्य ] वीरस्य (=इन्द्रस्य ).प्रथमानि पौंस्या (=प्रथमानि पौंस्यानि=प्रथमकृतानि पराक्रमकर्माणि ) विदुः (=जानन्ति ) ॥

अलातृणासः । नकारस्य स्थाने लकारः । अनातृणास आतर्दनरहिताः । अथवा अलं पर्याप्तमातर्दनाः शत्रूणाम् । यद्वा अलमत्यर्थं दातारः फलानाम् । इति सायणः॥

८. हे मरुतः, यं [ जनं यूयम् ] आवत (=अप्रीणयत=प्रीणयथ ) तं शतभुजिभिः पूर्भिः (=शतगुणैर्नगरैः=शतगुणैः प्राकारैर् ) अभिह्रुतेरघात् (=कुटिलस्वभावस्य शत्रोः पापाद् ) रक्षत (=अरक्षत=रक्षथ ) । हे उग्राः (=तेजस्विनस् ) तवसः (=प्रबला ) विरप्शिनः (=महान्तो ) [ मरुतः ], यं जनं तनयस्य पुष्टिषु (=पुत्रपौत्रादयस्य पोषणेषु विषयेषु) शंसात् पाथन (=अभिशंसनात् पालयथ=दोषारोपणात् )
[ तं शतभुजिभिः पूर्भी रक्षथ ] ॥

७. ज्यांच्या देणग्या स्थिर होत, ज्यांचें धन अक्षय होय, जे अत्यंत उदार, [ आणि ] अत्यंत स्तविलेले [ असे जे मरुत्, ते ] यज्ञांत [ इंद्रानें ] मादकारक सोम प्यावा म्हणून त्याचें स्तोत्र गातात. [ कारण ] [ त्या ] वीराचे प्राचीन पराक्रम ते जाणतात.

८. हे मरुतांनो, तुम्ही ज्याला प्रसन्न होतां, त्याला घातकाच्या उपद्रवापासून शंभर वेढे असलेल्या नगरांच्या योगेंकरून संभाळीत असतां—हे तेजस्वी [ आणि ] प्रबळ [आणि] महान् [मरुत् ] हो, तुम्ही ज्या जनाला मुलांबाळांच्या पोषणाविषयीं दोषापासून रक्षितां [ त्याला तुम्ही संभाळितां ].

7. They whose gifts are everlasting, whose wealth is permanent, who are most liberal [ and ] who are highly praised, [ the Maruts] sing a hymn in sacrifices that [ Indra ] may drink the delightful Soma. For they know the first exploits of the hero.

8. With hundred-fold walls you protect from the injury of the wicked, O Maruts, him whom you have favoured—that man, O brilliant [ and ] powerful [ and ] great [Maruts], whom you [ wish to ] save from reproach in the feeding of [ his ] children.

---

७. यांत ऋषि असें कल्पितो कीं, मरुत् हे यज्ञांत प्रथम येतात आणि 'इंद्रानें तेथें येऊन मधुर सोमरस प्यावा म्हणून त्याची स्तुति गातात; इंद्राची स्तुति गाणें यांत त्यांस कांहीं कठिण नाहीं, कारण कीं, त्याणें अति प्राचीन काळापासून काय काय पराक्रम केले ते त्यांस अवगत आहेत. मरुतांनीं स्तुति केल्यावर मग इंद्र यज्ञाप्रत येत असतो.'

'अत्यंत उदार' 'अलातृणासः.' हा शब्द कठिण आहे. आम्हीं सायणांनीं सुचविलेल्या अर्थांपैकीं एक घेतला आहे, तो भाषेखालीं पाहा.

ही ऋचा श्लोकाप्रमाणें सहज म्हणतां येतेः—

प्र स्कम्भदेष्णा अनवभ्रराधसः ।
अलातृणासो विदथेषु सुष्टुताः ॥
अर्चन्ति अर्कं मदिरस्य पीतये ।
विदुर्वीरस्य प्रथमानि पौंसिआ ॥

८. 'हे मरुतांनो, तुम्ही ज्यावर प्रसाद करावयास इच्छितां आणि ज्यांच्या मुलांबाळांचें संरक्षण करावयास इच्छितां, त्याला तुम्ही शेकडो वेढे असलेल्या प्राकारांत ठेवून त्यास शत्रूपासून उपद्रव होऊं देत नाहीं.'

विश्वानि भद्रा मरुतो रथेषु वो मिथस्पृध्येव तविषाण्याहिता ।
अंसेष्वा वः प्रपथेषु खादयोऽक्षो वश्चक्रा समया वि वावृते ॥९॥

विश्वानि । भद्रा । मरुतः । रथेषु । वः । मिथस्पृध्याऽइव । तविषाणि । आऽहिता ।
अंसेषु । आ । वः । प्रऽपथेषु । खादयः । अक्षः । वः । चक्रा । सऽमया । वि । ववृते ॥ ९ ॥

---

यं जनं सुखिनं कर्तुं यूयमिच्छथ तं बहुगुणैः प्राकारैः शत्रुकृताद्दुःखोत्पादकात्कर्मणो यूयं संरक्षथ, तस्य पुत्रपौत्रादीनां पोषणं च तेन सम्यग्यथा कृतं स्यात्तथा कुरुथेति भावः ॥

---

## भाषायाम्.

९. हे मरुतः, विश्वानि भद्रा (=विश्वानि भद्राणि=सर्वाणि कल्याणानि सुखानि) [ अपि च ] मिथस्पृध्येव तविषाणि (=परस्परं स्पर्धमानानीव बलानि ) वो रथेषु (=युष्माकं रथेषु ) आहिता (=आहितानि=स्थापितानि सन्ति ) वः (=युष्माकम् ) अंसेषु आ (=बाहुषु ) प्रपथेषु [ च ] (=प्रपदेषु=पादाग्रेषु ) खादयः (=कटकानि आभरणविशेषाः ) [ सन्ति ] । वः (=युष्माकम् ) अक्षः (=रथ्योक्षः ) समया चक्रा वि ववृते (=चक्रैः सहैककालं विशेषेण गच्छति ) ॥

मिथस्पृध्येव बलाधिक्यात्परस्परस्पर्धाविषयाणि तविषाणि बलानि अंसेषूक्तलक्षणान्यायुधानि आहितानि। किं च वः प्रपथेषु । प्रगताः पन्थानो येषु विश्रामस्थानेषु तानि प्रपथानि । तेषु खादयः खाद्यानि भक्ष्याण्याहितानि । यद्वा प्रगतः पन्था येस्तेषु पादाग्रेषु खादयः स्थिरा आभरणविशेषा आहिताः । किं च वोऽक्षो युष्मत्संबन्धी रथ्योऽक्षश्चक्रा तत्रोपनिबद्धानि चक्राणि समया समीपे तेषां परिसरे वि ववृते । विशेषेण वर्तते । न कदाचिदपि चक्रेषु संलग्नो भवतीत्यर्थः । यस्मादेवं देवयजनसाधनानि सन्ति तस्माच्छीघ्रमागच्छतेत्यभिप्रायः । इति सायणः ॥

---

[illegible] वेढे असलेल्या नगरांच्या यो- [illegible] ' शतभुजिभिः पूर्भिः.' ऋ. [illegible] १४ आणि त्यावरील सायण [illegible] पहा, ( पुरी तद्रक्षासाधनभूत- [illegible] ). यावरून [illegible] होतें की, प्राचीन काळीं गांवाला अथवा नगराला चौफेर कोट असे इतकेंच नाहीं, तर त्याला एकाहून अधिक वेढे अस- ण्याचीहि क्वचित् चाल असावी. [illegible] असें सिद्ध होतें कीं [illegible]

९. हे मरुतांनो, तुमच्या रथांवर सर्व सुखें [ आणि ] परस्पर स्पर्धा जणुं करीत आहेत अशीं बळें घातलेलीं [ आहेत ]. तुमच्या दंडांत [ आणि ] पायांत कडीं [ आहेत ]. तुमचा आंस चाकांबरोबर चालतो.

9. All blessings, O Maruts, are in your chariots placed, [ and ] powers that are, as it were, striving with each other. Round your arms [ and ] feet are rings. Your axle moves quickly along with the wheels.

---

सांप्रत जसा प्राकार असतो तसाच प्राचीन काळीं असावा; कारण, अजून तरी खानदेशांत प्राकाराला अथवा गांवकुसवाला पूळ (उच्चार 'पूळ्') =पूर् असेंच नांव आहे, तें अतिप्राचीन काळापासून चालत आलें आहे असें 'पूर्' शब्दाचा जो प्राकारार्थी या मंत्रांत प्रयोग आहे, त्यावरून स्पष्ट होतें.

'दोषापासून रक्षितां '=' शंसात् पाथन.' हें वाक्य चमत्कारिक आहे, पण त्याचा दुसरा अर्थ संभवत नाहीं. आपलीं मुलेंबाळें त्याच्यानें पोसवत नाहीं असा अपवाद होऊं देत नाहीं असें विवक्षित दिसतें.

या मंत्राच्या चवथ्या पादांत 'पाथन' असें मूळचें असतां वृत्तासाठीं म्हणून 'पाथना' असें झालें आहे. हा मंत्र आलीकडील ( वंशस्थ ) वृत्ताप्रमाणें म्हटला तर 'पाथन' यांतला न दीर्घ नसणें इष्ट आहे, असें असतां मुद्दाम ह्रस्वाचा दीर्घ केला आहे, यावरून हें दीर्घीकरण वृत्तासाठीं झालेलें नाहीं असें असेल एक, किंवा जगती छंद प्राचीन काळीं वंशस्थापेक्षां कांहीं फार भिन्न अशा रीतीनें म्हणत असतील असें एक दिसतें.

---

९. 'हे मरुतांनो, तुम्ही जाऊं लागलां म्हणजे तुमच्या रथांत सकळ सुखें आणि सकळ बळें—जीं परस्पर जणुं अगोदरच टक्कर मारीत आहेत तीं—घातलेलीं असतात. तुमच्या हातांत आणि पायांत कडीं असतात. आणि तुमचा आंस चाकांबरोबर फार जलद चालतो.'

'परस्पर स्पर्धा जणुं करीत आहेत अशीं असें '—' [illegible] ' बळांचा हा गुणच आहे, कीं तीं एकमेकांची स्पर्धा करीत असतात. तीं मरुत् उपासकांला देण्याकरितां आपल्या रथांत घालून नेत असतां, आणि तीं उपासकांच्या अंगीं प्रविष्ट होण्याचे अगोदरच एकमेकांबरोबर लढत आहेत असें ऋषि कल्पीत आहे.

'दंडांत [ आणि ] पायांत कडीं '= 'अंसेष्वा प्रपथेषु खादयः.' म्हणजे

भूरी॑णि भ॒द्रा नर्ये॑षु बा॒हुषु॑ वक्षः॑सु रु॒क्मा र॑भ॒सासो॑ अ॒ञ्जयः॑ ।
अंसे॒ष्वेताः॑ प॒विषु॑ क्षु॒रा अधि॒ वयो॒ न प॒क्षान्व्यनु॒ श्रियो॑ धिरे ॥१०॥२

भूरी॑णि । भ॒द्रा । नर्ये॑षु । बा॒हुषु॑ । वक्षः॑ऽसु । रु॒क्माः । र॒भ॒सासः॑ । अ॒ञ्जयः॑ ।
अंसे॑षु । ए॒ताः । प॒विषु॑ । क्षु॒राः । अधि॑ । वयः॑ । न । प॒क्षान् । वि । अनु॑ । श्रियः॑ । धि॒रे ॥ १० ॥ २ ॥

भाषायाम्.

१०. [ मरुतां ] नर्येषु बाहुषु (=बलवत्सु भुजेषु) भूरीणि भद्रा (=बहूनि कल्याणानि ) [ सन्ति ] । वक्षःसु (=उरःस्थलेषु ) अञ्जयः (=व्यक्तानि ) रभसासः (=कान्तिमन्ति ) रुक्माः (=आभरणानि ) [ सन्ति ] । अंसेषु (=भुजमूलेषु ) एताः (=" शुभ्रवर्णा मालाः ") [ सन्ति ] । पविषु अधि (=आयुधेषु ) क्षुराः (=क्षुरधाराः ) [ सन्ति ] । [ एवं ] वयो न पक्षान् [ व्यनुदधते ] (=पक्षिणः पक्षान् यथा धारयन्ति=प्रकटयन्ति ) [ तथा ] [ मरुतः ] श्रियो वि अनु धिरे (=उक्ता लक्ष्मीरनुक्रमेण विविधं धारयन्ति=प्रकटयन्ति ) ॥

पक्षिणो यथा स्वधृतान् पक्षान् प्रसार्य उत्पतन्ति मरुतोप्युक्ताभरणादिरूपा धृता लक्ष्मीः प्रसार्य तथा गच्छन्तीति भावः ॥

भुजांत आणि पायांत तोडे आहेत. दंडांत आणि पायांत तोडे घालण्याची चाल अजून प्रसिद्ध आहे. दंडांत घालावयाच्या कड्याला दंडकडें म्हणतात. 'प्रपथेषु' हें पद कठिण आहे खरें ( सायणभाष्य पहा ), पण आम्हांस वाटतें, सायणांनीं सुचविल्याप्रमाणें 'पादाग्र' हा अर्थ येथें घेतल्याशिवाय योग्य निर्वाह लागत नाहीं. मरुत् आपल्या पायांत आणि हातांत कडीं घालितात असें वरर मंत्रांतहि सांगितलें आहे. 'प्रपथेषु' या अर्थ 'हस्तावर' असा करितात त्याला ही अडचण दिसते कीं, तो शब्द 'अंसेषु आ वः' आणि 'खादयः' यांच्यामध्यें आहे, यावरून तो त्या अर्थीं निदान येथें तरी शोभत नाहीं.

'तुमचा आंस चाकांबरोबर चालतो =' अक्षो वश्चक्रा समया वि वावृते.' म्हणजे तुमचा रथ जलद चालतो, अडखळत नाहीं, असा भावार्थ दिसतो.

वृत्तासाठीं 'तविषाणि आहिता,' व 'अंसेषु आ' आणि 'खादयो अक्षो' असें म्हणावें लागतें.

१०. [ मरुतांच्या ] प्रतापी हातांत बहुत सुखें [ असतात ], वक्षःस्थळीं लखलखीत [ आणि ] स्वच्छ अलंकार [असतात], खांद्यांवर शुभ्र माळा [ असतात ]. [त्यांच्या] आयुधांला बारीक धारा [ असतात ]. पक्षी जसे पंख [पसरितात] तसे [ हे ] [ आपल्या] कांति पसरितात.

10. Many blessings [are] in [ their ] manly arms, brilliant [ and ] clear ornaments on [ their ] breasts; fair garlands on [ their ] shoulders, sharp edges to [their] weapons. They hold [ their ] glories even as birds [ hold their ] wings.

---

१०. 'मरुतांच्या दंडांवर अनेक सुखें उपासकांला देण्याकरितां धारण केलेलीं असतात; त्यांच्या उरःस्थळी लखलखीत आणि शोभिवंत आभरणें असतात; यांच्या गळ्यांत माळा असतात; आणि यांच्या शस्त्रांला वस्त्र्याप्रमाणें धारा असतात. या प्रकारेंकरून, पक्षी जसे आपले पक्ष पसरून उडतात, तसे मरुत् वर सांगितलेले शोभिवंत पदार्थ प्रगट करीत करीत अंतरिक्षांतून जात असतात' असा भावार्थ आहे.

'लखलखीत [ आणि ]स्वच्छ अलंकार '=' रुभसासः अञ्जयः रुक्माः.' सू. ६४ मं. ४ पहा.

'शुभ्र माळा '=' एताः.' हा अर्थ आम्हीं सायणास अनुसरून केला आहे. 'ठिपके ठिपके असलेल्या हरिणाचें कातडें' असा मोक्षमूलर यांनी अर्थ केला आहे, पण त्याला वेदांतील दुसरें प्रमाण सांपडतें असें दिसत नाहीं.

वृत्तासाठीं 'नरिएषु,' 'अंसेषु एताः' आणि 'वि अनु' असें वाचावें.

मुहान्तो मुह्ना विभ्वो३ विभूतयो दूरेदृशो ये दिव्या इव स्तृभिः ।
मन्द्राः सुजिह्वाः स्वरितार आसभिः संमिश्ला इन्द्रे मरुतः परिष्टुभः ॥ ११ ॥

महान्तः । मुह्ना । विऽभ्वः । विऽभूतयः । दूरेऽदृशः । ये । दिव्याःऽइव । स्तृऽभिः ।
मन्द्राः । सुऽजिह्वाः । स्वरितारः । आसऽभिः । सम्ऽमिश्लाः । इन्द्रे मरुतः । परिऽस्तुभः ॥ ११ ॥

## भाषायाम्.

११. [ मरुतो ] मह्ना (=स्वमहिम्ना ) महान्तः [ सन्ति ] । [ अपि च ] विभ्वः (=प्रबला ) विभूतयः (=विविधैश्वर्योपेताश् ) [च सन्ति ] । ये [ मरुतः ] स्तृभिर्दिव्या इव दूरेदृशः [ सन्ति ] (=नक्षत्रैर्यथा दिव्या द्यावः शुभ्रदेशा दूराद्दृश्यमाना भवन्ति तथा दूरदेशाद्दृश्यमानाः सन्ति) । मन्द्राः (=आनन्दकारिणः) सुजिह्वाः (=सुवचनसमर्था ) आसभिः स्वरितारः (=वदनैर्मधुरं शब्दयितारः ). परिष्टुभः (=परिक्षोभयुक्ताः=स्तोत्रैर्वेष्टिता ) मरुतः इन्द्रे संमिश्लाः (=इन्द्रेण सह सम्यग् मिश्रिताः संगताः=इन्द्रस्य सहाया ) [ भवन्ति ] ॥

११. मरुत् [ आपल्या ] महिम्यानें मोठे [ होत ], प्रबळ [ आणि ] ऐश्वर्यवंत [ होत ]; जे [ मरुत् ] नक्षत्रांनीं द्युप्रदेश [ दूरपर्यंत प्रकाशतात ] तसे दूरपर्यंत प्रकाशणारे [ होत ]. रमणीय, सुजिह्व, तोंडांनीं सुस्वर, [ आणि ] स्तोत्रांनीं वेष्टिलेले असे [ जे ] मरुत्, [ ते ] इंद्राला मिळून [असतात ].

11. [ The Maruts are ] great with [ their ] greatness ; [ are ] mighty [and] fortunate ; who shine from afar even as [ do ] the heavenly regions with the stars. Delightful, sweet-tongued, [ and ] singing sweetly with [ their ] voices [ and ] surrounded by praises, the Maruts [ are ] united with Indra.

११. 'नक्षत्रांनीं द्युप्रदेश......तसे' =' दिव्या इव स्तृभिः. ' म्हणजे नक्षत्रांच्या योगानें आकाशांतील अगदी वरचे प्रदेश जसे अत्यंत दूर प्रकाशतात, तसे मरुत् आपल्या तेजांच्या योगानें मोठ्या अंतरावरून दृष्टीस पडतात. ही उपमा श्रुत्यन्तरींहि मरुतांस दिलेली आढळते. उदाहरणार्थः ' द्यावो न स्तृभिश्चितयन्त खादिनो ' इ० (=ज्यांच्या हातापायांत कडीं आहेत असे मरुत् नक्षत्रांनीं द्युप्रदेश शोभतात तसे शोभतात. ऋ. २. ३४. २ ).

' इंद्राला मिळून असतात '=' इन्द्रे संमिश्लाः. ' म्हणजे इंद्राशीं नित्य संगत असतात. नित्य इंद्राबरोबर फिरत असतात.

' स्तोत्रांनीं वेष्टिलेले '=' परिष्टुभः.' म्हणजे ज्यांच्या सभोंतालीं स्तोत्रें वेष्टून राहतात. हीं स्तोत्रें म्हणजे उपासकांनीं त्यांस अर्पिलेलीं जीं तीं होत, किंवा त्यांनीं इंद्रास अर्पावयाचीं जीं तीं होत असें मानिलें तरी चालेल.

' सुजिह्व '=' सुजिह्वाः. ' ' तोंडांनीं सुस्वर '=' आसभिः स्वरितारः. ' या दोन्ही विशेषणांचा अर्थ 'सुस्वर गाणारे' असा आहे. मरुत् सुस्वर गातात असें वेदांत सांगितलें आहे, याविषयीं सू. ८५ मं. २ आणि टीप पहा.

वृत्तासाठीं ' विभुओ, ' आणि ' दिविआ इव ' असें म्हणावें लागतें.

तद्वः सुजाता मरुतो महित्वनं दीर्घं वो दात्रमदितेरिव व्रतम् ।
इन्द्रश्चन त्यजसा वि ह्रुणाति तज्जनाय यस्मै सुकृते अराध्वम्॥१२

तत् । वः । सुऽजाताः । मरुतः । महिऽत्वनम् । दीर्घम् । वः । दात्रम् । अदितेःऽइव । व्रतम् ।
इन्द्रः । चन । त्यजसा । वि । ह्रुणाति । तत् । जनाय । यस्मै । सुऽकृते । अराध्वम् ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

१२. हे सुजाताः ( =शोभनजन्मानो=महोदारा ) मरुतः, तद् वो महित्वनं (=वक्ष्यमाणमेतद्युष्माकं माहात्म्यं ) [ भवति ] [ यद् ] वो दात्रम् अदितेर्व्रतमिव दीर्घं [ भवति ] ( =यद्युष्माकं दानम् अदितेरखण्डिताया निःसीमावकाशरूपाया एतन्नाम्न्या देवमातुः शासनं यथा विस्तीर्णं भवति तथा विस्तृतं भवति ) । [ अपि च ] यस्मै सुकृते जनाय (=यस्मै शोभनकर्मणे भक्ताय ) अराध्वं (=धनादिकमदत्त=अन्वगृह्णीत ) तत् (=तन्मनुष्योपरि कृतं वोनुग्रहम् ) इन्द्रश्चन त्यजसा वि ह्रुणाति (=इन्द्रोपि क्रोधेन न हिनस्ति ) ॥

दीर्घत्वे दृष्टान्तः । अदितेर्व्रतमिव । अदीनाया देवमातुर्भूम्या वा । व्रतमिति कर्मनाम । तद्यथा दीर्घमतिविस्तृतं तद्वत् । अदितिर्द्यौरदितिरन्तरिक्षमित्यादिमन्त्रवर्णात् । किं च हे मरुतो यूयं यस्मै सुकृते शोभनयागादिकर्त्रे यजमानाय यदभिमतं धनमराध्वं तदिन्द्रश्च इन्द्रोपि त्यजसा त्यागेन न विह्रुणाति । ...... चनेत्ययं यद्यपि निपातद्वयसमुदायरूप एको निपातः तथाप्यवयवविभागेन चशब्दः समुच्चये नशब्दो निषेधेऽधिगन्तव्यः । इति सायणः ॥

१२. हे सुजात मरुतांनो, हें तुमचें माहात्म्य [ आहे ] कीं, तुमचें दान [ म्हटलें म्हणजे ] अदितीच्या शासनाप्रमाणें विस्तीर्ण होय. तुम्ही ज्या सुकर्मकारी जनाला प्रसन्न होतां त्याचें इंद्र सुद्धा आपल्या क्रोधानें वाईट करीत नाहीं.

12. That, O well-born Maruts, [ is ] your greatness, that your gift [is] extensive like the ordinance of Aditi. Even Indra does not hurt with [ his ] wrath that pious man whom you favour.

१२. 'हे मरुतांनो, तुमचा हा एक महिमा आहे कीं, तुम्हीं दिलेलें दान अदितीच्या शासनाप्रमाणें विस्तीर्ण असतें, आणि ज्या पुण्यशील मनुष्यावर तुम्ही, कृपा करितां त्याला स्वतः इन्द्रहि आपल्या क्रोधानें कांहीं उपद्रव करीत नाहीं.'

'सुजात '=' सुजाताः.' सू. ८८ मं. ३ आणि टीप पहा.

'अदितीच्या शासनाप्रमाणें '=' अदितेरिव व्रतम्.' अदिति म्हणजे निःसीम जोस पृथिव्यन्तरिक्ष द्युलोकाची पोकळी, तद्रूप देवता. तिचें शासन म्हणजे तिचा अधिकार जेथें जेथें चालतो तें स्थान, अर्थात् तिचें राज्य तिच्या सारिखेंच निःसीम असावयाचें. तर त्याप्रमाणें मरुतांचें दान निःसीम होय असा भावार्थ विद्वन्मणि मोक्षमूलरांनीं काढिलेला खरा दिसतो. सायणांनीं केलेला अर्थ भाषेखालीं पहा. 'अदिति' या देवतेविषयीं सू. ७२ मं. ९ याजवरील टीप पहा.

'क्रोधानें '=' त्यजसा.' ऋ. १०. ७९. ६ याजवरील सायणभाष्य पहा.

वृचासाठीं ' अराध्वम्'च्या जागीं 'अराधुअम् ' असें म्हणावें लागतें.

तद्वो जामित्वं मरुतः परे युगे पुरू यच्छंसममृतास आवत ।
अया धिया मनवे श्रुष्टिमाव्या साकं नरो दंसनैरा चिकित्रिरे ॥१३

तत् । वः । जामिऽत्वम् । मरुतः । परे । युगे । पुरु । यत् । शंसम् । अमृतासः । आवत ।
अया । धिया । मनवे । श्रुष्टिम् । आव्य । साकम् । नरः । दंसनैः । आ । चिकित्रिरे ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

१३. हे मरुतः, तत् (=एतद् वक्ष्यमाणं) वः (=युष्माकं) परे युगे (=अतिमहति कालेपि वर्तमानं) जामित्वं (=जनविषये प्रेमाधिक्यं) [भवति] यत् हे अमृतासः (=अमृताः=मरणरहिता) [मरुतः], [यूयं] पुरु (=बहु यथा तथा बहूनां) शंसम् (=आशासनं=स्तोत्रम्) आवत (=अरक्षत=अपूरयत)। अया धिया (=एतादृश्यानुग्रहात्मिकया बुद्ध्या) मनवे श्रुष्टिम् आव्य (=मनुष्येभ्यः स्तोत्रं रक्षित्वा=मनुष्याणां स्तोत्रं सफलं कृत्वा) नरः (=शूरा) [यूयं] दंसनैः (=शूरकर्मभिः) साकं (=सर्वेपि युगपदेव) आ चिकित्रिरे (=सर्वतोज्ञायध्वं=सर्वतो ज्ञाता अभवत=सर्वप्रसिद्धा बभूव) ॥

१३. हे मरुतांनो, हें तुमचें [ जनांविषयींचें ] अतिदीर्घकाळीं [ हि पोंहचणारें ] प्रेम [ होय ] कीं, हे अमर [मरुतांनो], [तुम्ही जनांची ] पुष्कळ प्रार्थना सफळ करीत असतां. तुम्ही ह्या [ अनुग्राहक ] बुद्धीनें मनुष्याची प्रार्थना पूर्ण करून शूर [ असे जे ] तुम्ही [ ते ] [ आपल्या ] पराक्रमांच्या योगानें सर्वत्र एकवट प्रसिद्धीस आलां आहां.

13. This [is] your kinsmanship [ with people ], O Maruts, [ reaching ] in distant time, that you, O immortal ones, have favoured the hopes of many. With such benevolence having favoured the prayer of man, you the brave ones have together become renowned through [ your ] valorous deeds.

---

१३. 'हे अमर मरुतांनो, तुमचें सकळ जनांविषयींचें प्रेम प्रसिद्ध आहे आणि तें अत्यंत चिरकाळींहि चालू राहणारें होय. तें हें कीं, तुम्ही पुष्कळ लोकांची प्रार्थना ऐकून घेत आलां आहां आणि तसें करून मनुष्यांची आशा पूर्ण करून शूर असे जे तुम्ही, ते शूर कर्में ( पराक्रम ) करून सर्वजण मिळून एकदम सर्वत्र प्रसिद्धीस आलां आहां.'

'अति दीर्घकाळींहि [पोंहचणारें ]'= 'परे युगे.' पाश्चात्त्य विद्वान् 'परे युगे' हे शब्द 'आवत'शीं घेऊन 'अतीते काले' (यापूर्वी ) असा अर्थ करितात, पण 'पर' याचा अर्थ मागें गेलेला काळ नव्हे, पुढें येणारा काळ असा सामान्यपणें सर्वत्र करितात. जर 'अतीत काळ' असा अर्थ होईल, तर मग अर्थ चांगला जुळेल खरा ('आजपर्यंत सफळ करीत आलां' असें भाषांतर करितां येईल ) पण त्याला आधार आहे असें दिसत नाही.

'एकवट '=' साकम्.' म्हणजे, सर्व मरुत् मिळून, मरुतांचा सर्व गण एकदम.

वृत्तासाठीं 'श्रुष्टिमाविआ' असें वाचावें लागतें.

येन दीर्घं मरुतः शूशवाम युष्माकेन परीणसा तुरासः ।
आ यत्ततनन्वृजने जनास एभिर्यज्ञेभिस्तदभीष्टिमश्याम् ॥ १४ ॥
येन । दीर्घम् । मरुतः । शूशवाम । युष्माकेन । परीणसा । तुरासः ।
आ । यत् । ततनन् । वृजने । जनासः । एभिः । यज्ञेभिः । तत् ।
अभि । इष्टिम् । अश्याम् ॥ १४ ॥
एष वः स्तोमो मरुत इयं गीर्मान्दार्यस्य मान्यस्य कारोः ।
एषा यासीष्ट तन्वे वयां विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥१५॥३॥
एषः । वः । स्तोमः । मरुतः । इयम् । गीः । मान्दार्यस्य । मान्य-
स्य । कारोः ।
आ । इषा । यासीष्ट । तन्वे । वयाम् । विद्याम । इषम् । वृजनम् ।
जीरऽदानुम् ॥ १५ ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

१४. हे तुरासो मरुतः (=क्षिप्रगामिनो मरुतो देवाः), येन (=यथा) युष्माकेन परीणसा (=युष्मत्संबन्धिना राया धनेन) [वयं] दीर्घं (=चिरकालं) शूशवाम (=अभिवृद्धा भवेम) यत् (=यथा च) [अस्माकं] जनासः (=जनाः पुरुषा) वृजने आ ततनन् (=ग्रामे=अस्माकं नगर आत्मानं विस्तारयेयुः=पुत्रपौत्राद्युत्पादनेन विस्तृता भवेयुस्) तत् (=तथा) एभिर्यज्ञेभिः (=एतैरस्माभिः क्रियमाणैर्यज्ञैः) इष्टिम् अभि अश्याम् (=युष्माकं यजनं पूजनं व्याप्नुयां साङ्गं संपादयेम) ॥

येन परीणसा ॥ यद्यप्येतद्बहुनामसु पठितं तथापि यद्बहु तन्महदपि भवतीत्यत्र महदित्यर्थे गृह्यते ॥ महता युष्मदभिगमनेनैषणेन वा दीर्घमायतं सत्रादिरूपं कर्म शूशवाम । प्रवर्धयामः । किं च यत् येन चाभिगमनेनैषणेन वा जनासो जना अस्मदीया वृजने संग्राम आ ततनन् । सर्वतो विस्तारयन्ति । स्वसामर्थ्यैः संग्रामं जयन्तीत्यर्थः । तदिष्टमेषणं गमनमेभिर्यज्ञेभिरिदानीं क्रियमाणैः स्तोत्रादिरूपैः पूजनैरभि आभिमुख्येनाश्याम् । व्याप्नुयाम् । इति सायणः ॥

१५. हे मरुतः, मान्यस्य (=माननीयस्य=प्रशस्तस्य) कारोः (=स्तोतुर्) मान्दार्यस्य (=एतन्नामकस्य उपासकस्य) एष स्तोमः (=इदं स्तोत्रम्) इयं गीः (=इयं च वाक् स्तोत्ररूपैव) वः (=युष्मदर्थं=युष्मदर्थं मार्पितोऽस्ति) । [अतः कारुणात्]

१४. हे वेगवंत मरुतांनो, तुमच्या विपुल संपत्तीच्या योगानें आमची अभिवृद्धि व्हावी म्हणून [ आणि ] आमच्या गांवीं लोक जिकडे तिकडे वाढावे म्हणून या यज्ञांच्या द्वारें तुमचें यजन आमच्या हातें होओ.

१५. हे मरुतांनो, प्रशस्त कवि मान्दार्य याचें हें स्तोत्र [आणि ] ही स्तुति तुम्हांला [ अर्पण केली आहे]. तुम्ही [त्याजकरितां] अन्न घेऊन या. आणि आम्हां स्वताहालाहि अन्न, बळ आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

14. "That we may long prosper through your bounty, O swift Maruts, and that our people may spread about in our village, may we therefore accomplish your rite with these offerings.

15. This praise, O Maruts, [and] this hymn of the venerable poet Mândârya is [ offered ] unto you. Come you with food [ for him ]. And may we also obtain for ourselves food, strength, and a son that shall quickly make us rich.

---

१४. हा येथें सूक्ताचा उपसंहार होत आला. यास्तव ऋषि आपणास इष्ट असलेला वर मागतो आहेः—' हे मरुतांनो, तुम्ही आम्हांस प्रसन्न होऊन पुष्कळ धन द्यावें आणि तेणेंकरून आमची चिरकाळ अभिवृद्धि व्हावी म्हणून, आणि तुम्ही आम्हांवर अनुग्रह करावा आणि तेणेंकरून आमची संतति वाढून आमचें नगर मोठें व्हावें म्हणून आम्ही हीं यज्ञद्रव्यें अर्पण करून तुमची उपासना करीत आहों, ती पूर्ण होओ.'

' वेगवंत '=' तुरासः. ' हें मरुतांचें सहजोक्ति विशेषण आहे. वायुरूप जे मरुत ते वेगवंत खरोखरच होत.

' विपुल संपत्तीच्या योगानें '=' परीणसा. ' सायण सर्वत्र 'बहु' अथवा 'मोठें' असा अर्थ करितात, परंतु जेथें जेथें हा शब्द आला आहे ते सर्व मंत्र काढून पाहतां ' धन,' ' वैभव ' असा अर्थ होणार नाहीं असें म्हणवत नाहीं, आणि हा अथवा यासारिखाच अर्थ येथें इष्ट आहे.

' आमची अभिवृद्धि व्हावी म्हणून ' =' येन शूशवाम.' ऋ. ८. ३१. ३ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

१५. हा मंत्र पूर्व सूक्ताच्या शेवटीं आला आहे, तेथें केलेलें आणि हें भा-

## सूक्तम् १६७.

अगस्त्य ऋषिः। आद्यैन्द्री। शिष्टा मरुद्देवताकाः। त्रिष्टुप् छन्दः॥

**सहस्रं त इन्द्रोतयो नः सहस्रमिषो हरिवो गूर्ततमाः।**

**सहस्रं रायो मादयध्यै सहस्रिण उप नो यन्तु वाजाः॥ १॥**

सहस्रम्। ते। इन्द्र। ऊतयः। नः। सहस्रम्। इषः। हरिऽवः। गूर्तऽतमाः।

सहस्रम्। रायः। मादयध्यै। सहस्रिणः। उप। नः। यन्तु। वाजाः॥ १॥

[यूयं तस्य मान्दार्यस्यार्थम्] इषा आ यासीष्ट (=अन्नेन सह आगच्छत)। वयां (=वयमपि). तन्वे (=आत्मार्थम् अस्माकमर्थे) इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि)॥

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, ते सहस्रम् ऊतयः (=तव सहस्राणि रक्षणानि=त्वत्कर्तृकाः सहस्रं प्रसादा) नः (=अस्मान्) [उप यन्तु=आयान्तु]। हे हरिवः (=हरिवन्=हरिद्वर्णाश्वयुक्तेन्द्र), [तव] गूर्ततमाः (=अतिशयेन स्तुताः) सहस्रं (=सहस्रसंख्याका) इषः (=अन्नानि=अन्नादिसंपदः) [अपि च] सहस्रं रायः (=सहस्राणि धनानि) [अपि च] सहस्रिणः (=सहस्रसंख्याका) वाजाः (=अश्वा=अश्वादयः पशवः) मादयध्यै नः उप यन्तु (=मादयितुं प्रमोदयितुम् अस्मान् प्राप्नुवन्तु)॥

सहस्रम् अपरिमिता इत्यर्थः। ...... सहस्रं रायः अपरिमितानि धनानि मणिमुक्तादीनि ...... वाजा गमनवन्तश्चतुष्पाद्रूपाः पशवः। इति सायणः॥

षांतर एकच आहे. याजकरितां टिपांसाठीं वगैरे त्या मंत्रावरील भाषांतर पहावें. असें त्या मंत्रावरील भाष्यांत तसेंच येथें ही सायणाचार्य 'मान्दार्य' हें विशेष- नाम न समजतां त्याचा अर्थ विशेषणार्थी करितात. याचें कारण प्रायः असें दिसतें की, हें सूक्त अगस्त्य ऋषीचें आहे अशी प्रसिद्धि आहे तेव्हां सूक्तान्तीं मान्दार्याचा निर्देश कसा होईल हा संशय सायणादिकांस आला असावा.

## सूक्त १६७.

ऋषि—अगस्त्य. देवता—मरुत् (पहिली ऋचा मात्र इंद्राविषयीं आहे. परंतु दहावीहि पहा), वृत्त-त्रिष्टुभ्.

१. हे इंद्रा, तुझे सहस्र प्रसाद, [ आणि ] हे पीताश्व [ इन्द्रा ], तुझ्या ज्या अत्यंत प्रशस्त सहस्र अन्नसंपत्ति, त्या सहस्र संपदा [ आणि ] सहस्र घोडे आनंद करण्यासाठीं आम्हांप्रत येओत.

## Hymn 167.

To the *Maruts*, except the first verse which is addressed to *Indra*, (see also verse 10, however). By *Agastya*. Metre—*Trishtubh*.

1. May thy thousand favours, O Indra, [and] O Lord of the tawny horses, [thy] thousand highly renowned comforts, [thy] thousand riches [and] [thy] thousands of horses come unto us for our delight.

---

१. 'पीताश्व '=' हरिवः.' इंद्राचे घोडे पिवळे असतात याविषयीं प्रसिद्धि आहेच. सू. ३३ मं. ५ याजवरील टीप पाहा.

या मंत्रांत 'तुझ्या' आणि 'तुझे' असे शब्द आहेत त्यांचा अर्थ असा आहे कीं, जे प्रसाद, ज्या संपत्ति वगैरे तूं आपल्या भक्तांस देत असतोस त्या.

'आनंद करण्यासाठीं आम्हांप्रत येओत '=' मादयध्यै उप नः यन्तु.' म्हणजे आम्हांस प्राप्त होओत, आणि आम्हास आनंदित करोत.

पहिल्या पादांत 'इन्दर ऊतयो,' आणि तिसऱ्यांत 'सहस्सरं राअयो' असें म्हणावें लागतें. दुसऱ्या पादांत 'हरिवः' बद्दल 'हर्वः' असें न वाचिलें तर अकरा अक्षरांबद्दल बारा अक्षरें होतील.

आ नोऽवोभिर्मरुतो यान्त्वच्छा ज्येष्ठेभिर्वा बृहद्दिवैः सुमायाः ।
अध यदेषां नियुतः परमाः समुद्रस्य चिद्धनयन्त पारे ॥ २ ॥

आ । नः । अवःऽभिः । मरुतः । यान्तु । अच्छ । ज्येष्ठेभिः । वा । बृहत्ऽदिवैः । सुऽमायाः ।
अध । यत् । एषाम् । निऽयुतः । परमाः । समुद्रस्य । चित् । धनयन्त । पारे ॥ २ ॥

### भाषायाम्.

२. सुमायाः (=सुप्रज्ञायुक्ता) मरुतो ज्येष्ठेभिः (=ज्येष्ठैः=महत्तमैर्) बृहद्दिवैर्वा (=महादीप्तियुक्तैश्च) अवोभिः (=रक्षाप्रकारैः) [ सह ] नः अच्छ आ यान्तु (=अस्मान् प्रत्यागच्छन्तु) अध यत् (=यतः कारणात् खलु) एषां (=तेषां मरुतां) परमाः (=उत्कृष्टा) नियुतः (=अश्वाः) समुद्रस्य चित् पारे (=समुद्रस्यापि परस्मिंस्तीरे) धनयन्त (=गन्तुं शक्नुयुः) ॥

यतः कारणात् मरुतां नियुन्नामका अश्वा लौकिकाश्वविलक्षणाः सन्तः समुद्रस्याप्यपरतीरे गन्तुं शक्नुवन्ति अतः कारणात् ते मरुतो बहुभिः शोभनैस्तेजस्विभिश्च रक्षाप्रकारैः सह अस्मान् प्रति शीघ्रमागच्छन्त्विति भावः ॥

वाशब्दः समुच्चये । आगमने कथमेषां सामर्थ्यमित्यत आह । अध अथैषां मरुताम् ...... । तस्माद्रक्षणैर्धनैश्चायान्त्वित्यर्थः । इति सायणः ॥

२. परम मेधावी मरुत् अत्यंत श्रेष्ठ आणि अतिशयेंकरून तेजस्वी अशा प्रसादांसहित आम्हांप्रत येओत, कारण कीं, त्यांचे उत्कृष्ट घोडे समुद्राच्याहि पार धांवूं शकतात.

2. May the wise Maruts come towards us with [their] excellent and most brilliant protections, since their excellent horses can run even across the ocean.

२. यांत ऋषि म्हणतो कीं, 'मरुतांचे नियुत् या नांवाचे घोडे लौकिक घोड्याप्रमाणें केवळ जमिनीवरून चालणारे नव्हेत, तर समुद्रावरूनहि उडून जाणारे होत, त्यापेक्षां ते मरुतांला सहज येथें घेऊन येतील. यास्तव मरुत् आपल्या भक्तांचें संरक्षण करण्याचे जे अनेक प्रकार, त्यांसहित आम्हांप्रत येओत.'

'त्यांचे घोडे '=' नियुतः.' जसे इंद्राचे 'हरी' तसे मरुतांचे 'नियुत्.' तथापि नियुत् हें नांव वायु, इंद्राग्नी वगैरे देवांच्या घोड्यांसहि लाविलेलें आढळतें.

'धांवूं शकतात '=' धनयन्त.' ऋ. ४. ३. १२ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं 'यान्तु अच्छा' असें म्हणावें.

मिम्यक्ष येषु सुधिता घृताची हिरण्यनिर्णिगुपरा न ऋष्टिः ।
गुहा चरन्ती मनुषो न योषा सभावती विदथ्येव सं वाक् ॥३॥

मिम्यक्ष । येषु । सुऽधिता । घृताची । हिरण्यऽनिर्निक् । उपरा । न । ऋष्टिः ।
गुहा । चरन्ती । मनुषः । न । योषा । सभाऽवती । विदथ्याऽइव । सम् । वाक् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. येषु [ मरुत्सु ] उपरा न ऋष्टिः (=समीपे वर्तमाना ऋष्टिरिव ऋष्टिनामकं मरुतामायुधं यथा तेषां हस्ते भवति तद्वत् ) सुधिता (=सुष्ठु हिता=सम्यक् स्थापिता=सुशोभना ) घृताची (=घृतं मेघोदकमञ्चन्ती=मेघोदकाढ्या ) हिरण्यनिर्णिक् (=सुवर्णरूपोपेता ) [ रोदसी=मरुतां भार्या माध्यमिका वागित्यभिहिता विद्युद्रूपा ) मिम्यक्ष (=संगता भूतास्ति ) [ या रोदसी ] गुहा चरन्ती मनुषो योषा न (=गुप्तं यथा तथा निगूढा गच्छन्ती कस्यचिन्मनुष्यस्य स्त्रीव स्त्रीसदृशी ) [ तथैव ] विदथ्या वागिव सभावती (=यज्ञसंबन्धिनी सभ्या सभायामागच्छन्ती वाग्रूपा स्त्रीव स्त्रीसदृशी सती ) सं[मिम्यक्ष ] ( =मरुद्भिः सह सदैव संगता भवति ) [ ते मरुत आयान्त्विति पूर्वेण संबन्धः ] ॥

अत्रेदमुक्तं भाति । रोदसी नाम प्रसिद्धा मरुतां स्त्री । सा च विद्युद्रूपा । तथात्वे सति सा सुधिता सुष्ठु प्रेरिता भवति । मेघवृष्टिकारित्वेन च मेघोदकपयआढ्या भवति । स्वभावतश्च हिरण्यरूपा भवति । एवं सती उपरा ऋष्टिर्न सदैव मरुतां समीपे वर्तमाना तेषां ऋष्टिरायुधमिव सदासंगमनवती भवति । सा च कदाचिद्दृष्टिगोचरा कदाचिच्च अदृष्टिगोचरा भवति । यदा तु अदृष्टिगोचरा भवति तदा सा गृहे निगूढा वर्तमाना कस्यचिन्मनुष्यस्य युवतिरिव दृश्यते यदा च दृष्टिगोचरा भवति तदानीं यज्ञेषूच्चार्यमाणस्तुतिरूपा स्त्री यथा सभायां गच्छन्ती भवति तद्वदुत्प्रेक्ष्यत इति ॥

मिम्यक्ष येष्वित्यत्र मिम्यक्ष येषु रोदसी नु देवी ...... श्रुत्वा हवं मरुतो यद्ध याथ भूमा रेजन्ते अध्वनि प्रविक्ते ( ऋ. ६. ५०. ५ ) इत्यवधेयम् ॥

दुरन्वया खलु दुर्बोधार्था चेयमृक् । सायणेनापि कथं कथमपि व्याख्याता । तदेवम् ॥

सुधिता सुष्ठु निहिता सुष्ठु हिता [illegible] घृताची घृतं [illegible]

३. ज्या मरुतांबरोबर सुंदर, घृताढ्य [आणि] सुवर्णवर्ण [रोदसी] सदैव हातीं असलेल्या बरचीप्रमाणें जोडिलेली असते. [जी रोदसी] मनुष्याच्या अदृष्ट फिरणाऱ्या तरुण स्त्रीप्रमाणें [आणि] सभेंत शोभणारी जी यज्ञवाणी तिजप्रमाणें होय.

3. Maruts—with whom [their consort] Rodasî is united, perfect, rich in milky rain-water [and] of golden colour, like a spear at hand; Rodasî, [united] like the youthful wife of a man walking in secret, [and] like the sacrificial Praise delighting in company.

---

३. मरुत् येओत असें वर सांगितलें. आतां म्हणतो, 'ज्या मरुतांबरोबर त्यांची विद्युद्रूप रोदसी या नांवाची स्त्री त्यांच्या हातांत असलेल्या शस्त्राप्रमाणें सदैव चिकटलेली जणुं असते. जी रोदसी योजिलेल्या लक्ष्यावर बिनचूक पडणाऱ्या शस्त्राप्रमाणें सुंदर, लोकांला मेघोदक उत्पन्न करून देणारी, आणि सुवर्णाच्या कांतीची होय; आणि ती केव्हां केव्हां यज्ञसभेंत येणाऱ्या देवस्तुतिरूप स्त्रीप्रमाणें दृष्टोत्पत्तीस येणारी, आणि केव्हां केव्हां घरांतच फिरणाऱ्या एकाद्या मानवी स्त्रीप्रमाणें दृष्टीस न पडणारी अशी असते.'

'सुंदर'='सुहिता.' 'सुहित' या पदाचा बिनचूक रीतीनें लक्ष्यवेध करणारें (शस्त्र) असा अर्थ होतो. तेव्हां 'ऋष्टि' आणि 'रोदसी' या दोघांस लागे अशा रीतीनें याचें मराठींत भाषांतर करणें कठिण आहे. परंतु रोदसी म्हणजे तरी विद्युद्रूप आहे त्यापेक्षां लक्ष्यवेध करी अशा रीतीनें प्रेरिली जाणारी असाच दोहीं ठिकाणी अर्थ इष्ट आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

'घृताढ्य'='घृताची.' म्हणजे, मेघभेदन करून तुपासारिखें चिक्कण आणि पुष्टिकारक जें मेघोदक तें प्राप्त करून देणारी.

'सुवर्णवर्ण'='हिरण्यनिर्णिक्.' हें विशेषण विजेला चांगलें शोभतें यांत विशेष सांगणें नलगे.

'सदैव हातीं असलेल्या बरचीप्रमाणें'='उपरा न ऋष्टिः.' 'ऋष्टि' म्हणून भाल्यासारिखें मरुतांच्या हातीं सदैव राहणारें एक शस्त्र. सू. ३७ मं. २, सू. ८५ मं. ४ आणि टिपा पहा.

'अदृष्ट फिरणाऱ्या तरुण स्त्रीप्रमाणें'='गुहा चरन्ती ...न योषा.' म्हणजे बाहेर सभेंत वगैरे न येतां घरांतले घरांत राहते अशी जी एकाद्या मनुष्याची पत्नी ती जशी तशी.

'सभेंत शोभणारी यज्ञवाणी'='सभावती विदथ्या वाक् इव.' यज्ञवाणी म्हणजे यज्ञांत देवस्तुतिरूपानें उच्चारिली जाणारी जी वाचा ती होय. तीच कोणीएक स्त्री. ती सभेमध्यें जाणारी खरीच, कारण की, यज्ञांत गाइली जाणारी देवस्तुति यज्ञोत्सवाच्या वेळीं जमलेल्या

परा शुभ्रा अयासो यव्या साधारण्येव मरुतो मिमिक्षुः ।
न रोदसी अप नुदन्त घोरा जुषन्त वृधं सख्याय देवाः ॥ ४ ॥

परा । शुभ्राः । अयासः । यव्या । साधारण्याऽइव । मरुतः । मिमिक्षुः ।
न । रोदसी इति । अप । नुदन्त । घोराः । जुषन्त । वृधम् । सख्याय । देवाः ॥ ४ ॥

---

हिरण्यनिर्णिक् हितरमणीयरूपा । निर्णिगिति रूपनाम । एवंरूपा ऋष्टिर्विद्युदाख्यायुधविशेषो वा । उपरा न मेघमालेव येषु मरुत्सु संमिम्यक्ष । म्यक्षतिर्गतिकर्मा । संगताभूत् मेघपङ्क्तिविद्युताविमे अपि संगते इत्यर्थः । मेघपङ्क्तिर्विद्युच्चोभे दृष्टान्तेन विशेष्येते । गूहा निगूढा गुहायां वान्तरिक्षे चरन्ती । तत्र दृष्टान्तः । मनुषो न योषा । मनुष्यस्य परिवृढादेर्महिषीवत् । सा यथा सुवेषान्तःपुर एव मध्ये चरति तद्वत् । किं सर्वदैवमिति नेत्याह । सभावती । सभा जनसंघः । तद्वती वर्षकाल आविर्भवन्तीत्यर्थः । तत्र दृष्टान्तः । विदथ्या वागिव । विदथो यज्ञः । तदर्हतीति विदथ्या प्रैषस्तोत्रादिरूपा वाक् । सा यथा यज्ञसभां प्राप्याविर्भवति तद्वत् । यद्वा विदथ्या वेदनार्हा विवदमानयोर्वाक् । सा यथा भवति तद्वत् । सैवंरूपा येषु मिम्यक्ष ते मरुतो देवयजनमागच्छन्त्वित्यर्थः । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

४. शुभ्राः (=शोभनालंकारयुक्ता) अयासः (=गन्तारः=सततगमनशीला) मरुतः साधारण्येव (=साधारण्या स्त्रिया सहेव=समानयेव) यव्या (=यव्यया युवत्या) [रोदस्या सह] परा मिमिक्षुः (=प्रकर्षेण संगता अभवन्) । घोराः (=शत्रुघातका) [मरुतः] (=यतः कारणात् शत्रुघातिनस्तस्मात् ते) रोदसी न अप नुदन्त (=रोदस्या नापानुदन्त=न त्यक्ता अभवन्=स्वीकृता अभवन्) देवाः (=द्योतनशीलाश्च ते) वृधं [रोदसीं] सख्याय जुषन्त (=वर्धनकारिणीं कल्याणकारिणीं तां सख्याय मैत्र्ये असेवन्त=भुक्तवन्तः=तां कल्याणीं भुक्त्वा तया सह मित्रत्वं चक्रुः) ॥

यथा लोके साधारण्यैकयैव स्त्रिया बहवो युवानः संगता भवन्ति तथा एकयैव रोदस्या संगता अभवन् । ते च यतो वीर्यवन्तस्तस्माच्चान् सा नात्यजत् । सा च यस्मात् कल्याणी तस्माच्चां तेपि नात्यजन् अपि तु तां भुक्त्वा तया सह सख्यं चक्रुरिति भावः ॥

४. सततगामी [ आणि ] शोभायमान [ जे ] मरुत् [ ते ] साधारण स्त्रीशीं संगत झाल्याप्रमाणें त्या एक्या तरुणीशीं विशेषेंकरून संगत झाले. पराक्रमी [ मरुत् ] रोदसीनें टाकिले नाहींत, देदीप्यमान मरुत् त्या कल्याणीचा उपभोग करून तिजशीं सख्य संपादिते झाले.

4. The resplendent [and] impetuous Maruts united with the youthful [ Rodasî ] as with one common to many. The dreadful Maruts were not rejected by Rodasî, [ they ] the brilliant ones became fond of the delightful [ Rodasî ] for [ her ] friendship.

मंडळीपुढें गाइली जाण्यासाठीं येत असे.

परंतु वस्तुतः ही ऋचा फार कठिण आहे. 'रोदसी' म्हणून जी मरुतांची स्त्री तिचा अध्याहार येथें केला पाहिजे हें पुढच्या तीन ऋचांवरून स्पष्ट होतें. आणि ऋ. ६. ५०. ५ यांत 'मिम्यक्ष येषु रोदसी नु देवी' इ० आलें आहे, तेथें या मंत्राप्रमाणेंच शब्दरचना असून 'रोदसी' सांगितली आहे. ऋ. ५. ५६. ८ यांत, 'ज्या रथांत मरुतांबरोबर उदकदायिनी ( ? ) रोदसी बसत असते, त्या मरुतांच्या रत्नधारी रथाला आम्ही इकडे बोलावितों' ( रथं नु मारुतं वयं श्रवस्युम् आ हुवामहे । आ यस्मिन् तस्थौ सुरणानि बिभ्रती सचा मरुत्सु रोदसी ) असें म्हटलें आहे. ऋ. ६. ६६. ६ यांत 'आणि या मरुतांबरोबर स्वप्रकाशिनी रोदसी बसत असते' ( अध स्म एषु रोदसी स्वशोचिः ... तस्थौ ) असें सांगितलें आहे. ऋ. १०. ९२. ११ यांत मरुतांबरोबर रोदसीचा निर्देश केला आहे. आणि ही रोदसी म्हणजे विद्युद्रूपी अथवा जिला माध्यमिका वाक् असें म्हणतात तद्रूपी होय असें 'स्वशोचिः' इत्यादि विशेषणांवरून उघड होतें.

वृजासाठीं 'विदथिएव' असें म्हणावें.

४. भावार्थः—'एकाच स्त्रीशीं जसे पुष्कळ जण लागू असावे तसे सर्व मरुत् मिळून एक्या रोदसीशीं संगत झाले. ते पराक्रमी होते म्हणून रोदसीनें त्यांचा त्याग केला नाहीं, आणि ती कल्याण करणारी स्त्री होती म्हणून तिचा त्याग मरुतांनीं केला नाहीं, तर तिच्याशीं रममाण होऊन तिचें मित्रत्व संपादिते झाले.'

'साधारण'='साधारण्या.' म्हणजे सर्वांशीं किंवा पुष्कळांशीं संगत होणारी जी तिजशीं.

'तरुणीशीं'='यव्या.' 'युवा' पासून जसें यविष्ठ हें रूप होतें तसें हें झालें

जोषद्यदीमसुर्या सचध्यै विषितस्तुका रोदसी नृमणाः ।
आ सूर्येव विधतो रथं गात्त्वेषप्रतीका नभसो नेत्या ॥ ५ ॥ ४ ॥
जोषत् । यत् । ईम् । असुर्या । सचध्यै । विसितऽस्तुका । रोदसी । नृऽमनाः ।
आ । सूर्याऽइव । विधतः । रथम् । गात् । त्वेषऽप्रतीका । नभसः । न । इत्या ॥ ५ ॥ ४ ॥

रोदसा शब्देन रोदनस्वभावो रुद्रः । तस्य स्त्री रोदसीति केचिदाहुः । अपरे तु मरुतां स्त्रियो रोदसीति नामधेयमित्याहुः । अयमेव पक्षो युक्तः उत्तरत्रैवंव्यवहारात् ।

## भाषायाम्.

५. यद् (=यदा) असुर्या (=असुरसंबन्धिनी=द्युसंबन्धिनी=दिव्या) विषितस्तुका (=विप्रकीर्णकेशसंघा) नृमनाः (=नृषु पुरुषेषु मरुत्सु रतीच्छारूपं मनो यस्याः सा) रोदसी सचध्यै ईं जोषत् (=संगमनाय तं मारुतं गणमसेवत=रतीच्छया तं स्वीकृतवती) [तदा] [त्वेषप्रतीका]. [सा] विधतः (=परिचरतस्=तां स्तुवतो) [मरुत्संघस्य] रथम् सूर्येव (=सूर्या सवितुः कन्या यथाश्विनो रथं तथा) त्वेषप्रतीका (=दीप्तवदना) नभसो न इत्या (=सूर्यस्य गतिर्यथा सूर्यरथं तथा) आ गात् (=आरूढवती) ॥

विधत इति दुर्बोधम् । सायणाचार्यैरपि कथं.कथमप्येव व्याख्यातं तत् । परिचरतो मरुत्संघस्य ...... । यागदेशं गन्तुं रथमारूह्य वा यज्ञमागच्छति । केव । विधतः सूर्यस्य रथं त्वेषप्रतीका सूर्येव सूर्यपत्नीव । यद्वा सूर्यस्य दुहिताश्विनो रथमिव । इत्यादि ॥

आहे असें आम्ही समजतों. 'मिश्रणशील' असा जो अर्थ 'यु'धातूला अनुसरून सायण करितात, त्याचें तात्पर्य हेंच आहे; म्हणजे पर्यवसानीं त्याचा 'युवति' असाच अर्थ आहे.

'उपभोग करून तिजशीं सख्य संपादिते झाले'= सख्याय ...... 'भुज' म्हणजे उपभोग घेणें आणि हेंकरून तिचें सख्य संपादिते झाले. अक्षरशः 'सख्यासाठीं उपभोग करिते झाले.'

'रोदसीनें टाकिले नाहींत'= न रोदसी अप नुदन्त.' आम्हीं 'नुदन्त' हें 'अनुग्रन्त' अशा अर्थी घेतलें आहे. त्याशिवाय दुसरा चांगला निर्वाह दिसत नाहीं.

५. जेव्हां दिव्य, विगलितकेश, आणि कामातुर रोदसी, संगमासाठीं मरुतांला स्वीकारिती झाली, तेव्हां [ दीप्तवदना ] सूर्या जशी [ अश्वींच्या रथावर ] [ अथवा ] सूर्याची दीप्तवदना गति जशी, तशी ती [ दीप्तवदना ] तिला भजणाऱ्या [ मरुद्गणा]च्या रथाप्रत आली.

5. When divine Rodasî of dishevelled hair [ and ] filled with passion for the Maruts, accepted these [Maruts] for union, she [ of the brightface ] mounted the chariot of the admiring [ troop of Maruts ] even as bright-faced Sûryâ [ mounted ] [ that of the As'vins ], even as the bright-faced motion of the sun [mounts the chariot of the sun ].

---

'कल्याणी '=' वृधम्.' हें येथें विशेषण आहे. ऋ. १०. ८९. १० आणि सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं पहिला चरण 'परा शुभ्रा अयासो यवीआ' असें म्हणून चवथ्या पादांत 'सखिआय' असें वाचलें पाहिजे.

---

५. 'मरुतांचा आपला समागम व्हावा असें इच्छून जेव्हां देदीप्यमान आणि इकडे तिकडे केश अव्यवस्थित पडले आहेत अशी आणि कामातुर झालेली रोदसी मरुतांस स्वीकारिती झाली, तेव्हां ती त्यांच्या रथावर येऊन बसली; तेव्हां ती सवित्याची कन्या सूर्या जशी अश्वींला वरून अश्वींच्या रथावर जाऊन बसली, अथवा सूर्याची गतिरूप स्त्री जशी सूर्याच्या रथावर जाऊन बसते, तशी ही रोदसी मरुतांस वरून त्यांच्या रथावर जाऊन बसली.'

दिव्य, विगलितकेश, आणि कामातुर' हीं विशेषणें विद्युद्रूप स्त्रीलाच आहेत यांत संशय नाहीं. सायण म्हणतात कीं, संभोगानें व्याकुळ झाल्यामुळें केश इकडे तिकडे पडले होते.

'सूर्या.' सू. ३४ मं. ५ याजवरील टीप पहा.

'गति '=' इत्या.' ही उपमा चमत्कारिक आहे. पण अर्थ असाच आहे यांत संशय नाहीं.

'[ तिला ] भजणाऱ्या [मरुद्गणा]च्या रथाप्रत '=' विधतो रथम्.' 'विधतः' हें पद येथें कठिण आहे. 'विधतः' याचा अक्षरशः अर्थ देवांचें परिचरण करणारा, पूजा करणारा जो त्याचा, असा आहे. पण येथें तसा जुळत नाहीं. 'विधतोः' असा पाठ कल्पिला तरी अश्वींला लागेल, पण त्यापासून कांहीं लाभ नाहीं.

आस्थापयन्त युवतिं युवानः शुभे निमिश्लां विदथेषु पज्राम् ।
अर्को यद्वो मरुतो हविष्मान्गायद्गाथं सुतसोमो दुवस्यन् ॥ ६ ॥

आ । अस्थापयन्त । युवतिम् । युवानः । शुभे । निऽमिश्लाम् । विदथेषु । पज्राम् ।
अर्कः । यत् । वः । मरुतः । हविष्मान् । गायत् । गाथम् । सुतऽसोमः । दुवस्यन् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. हे मरुतः, यद् (=यदा ) हविष्मान् (=हविर्युक्तः ) सुतसोमः (=अभिषुतसोमः=सोमम् अभिषुतवान् ) दुवस्यन् (=परिचरन् ) वः (=युष्माकम् ) अर्कः (=स्तोता ) गाथं गायत् (=गाथम् अगायत्=युष्मत्स्तुतिम् उदचारयत् ) [ तदा ] युवानः (=नित्यतरुणाः=अजराः ) [ यूयं ] युवतिं (=नित्यतरुणीं ) निमिश्लां (=नितरां संबद्धाम्=अतिशयेन प्रियां ) पज्रां (=प्रबलाम् ) [एतादृशीं रोदसीं ] विदथेषु (=यज्ञेषु निमित्तभूतेषु सत्सु=यज्ञान् गन्तुं ) शुभे आ अस्थापयन्त ( =शोभायै रथे आरोहयत=रथे स्थापयित्वा विशेषेण शोभमाना बभूव ) ॥

इदमुक्तं भवति । हे मरुतः यदा रोदसी युष्मान् पतित्वेन वृतवती तदा यूयं यज्ञगमनेषु सत्सु तामपि वो रथे स्थापयित्वागच्छत न तु केवलं यूयमेवागच्छतेति ॥

प्रस्थापयन्तेति पुरुषव्यत्ययः सहनीयः वेदे तस्य व्यवहारात् ॥

---

सूर्याकडे, अश्वींकडे अथवा मरुद्गणाकडे लाविलें तरी हें विशेषण दुर्बोध आहे यांत संशय नाहीं.

वृत्तासाठीं ‘ असुरिआ ’ असें पहिल्या पादांत, ‘ सूरिएव ’ असें तिसऱ्या पादांत आणि ‘ नभसो न इत्या ’ असें चवथ्या पादांत, म्हणावें लागतें.

६. हे मरुतांनो, जेव्हां तुमचा स्तोता हवि घेऊन [आणि] सोम काढून भक्तीनें स्तोत्र गाऊं लागला, तेव्हां अजर असे जे तुम्ही [मरुत्] ते अजर [आणि] प्रबळ [आणि] अत्यंत प्रिय [अशी जी] रोदसी [ति]ला यज्ञगमनार्थ रथावर बसवून शोभलां.

6. When your worshipper, O Maruts, with oblation [and] with extracted Soma worshipfully sang [his] hymn, you [who are] ever-youthful did gracefully mount [on your chariot], for [visiting] sacrifices, the ever-youthful, devoted [and] mighty [Rodasî].

६. 'हे मरुतांनो, जेव्हां रोदसीनें तुम्हांला वरिलें, तेव्हां तुमच्या कोणत्याहि उपासकानें तुम्हांकारणें हवि, सोम, आणि स्तोत्र हीं सिद्ध केल्यामुळें तुम्हांला त्या यज्ञाकडे जावयाचें होतें तेव्हां केवळ तुम्ही एकटे न जातां तिलाहि आपल्या रथांत घालून नेऊं लागलां, कारण ती तुम्हांसारिखीच नित्य तरुण, प्रबळ आणि प्रीति करणारी असून, ती बसल्यामुळें तुमच्या रथाला शोभा येऊं लागली.'

'रथावर बसवून शोभलां'=' शुभे आ अस्थापयन्त.' अक्षरशः 'शोभेसाठीं बसविते झाले,' म्हणजे बसविते झालां आणि तेणेंकरून शोभलां. या मंत्रांत द्वितीय आणि तृतीय पुरुष यांचा व्यत्यय आहे, त्याचीं उदाहरणें वेदांत अन्य ठिकाणीं आहेतच.

वृत्तासाठीं 'यज्ञः' बद्दल 'यज्ञुअः' असें म्हणून दोहोंचीं तीन अक्षरें केलीं पाहिजेत.

**प्र तं विवक्मि वक्म्यो य एषां मरुतां महिमा सत्यो अस्ति ।**
**सचा यदीं वृषमणा अहंयुः स्थिरा चिज्जनीर्वहते सुभागाः ॥७॥**

प्र । तम् । विवक्मि । वक्म्यः । यः । एषाम् । मरुताम् । महिमा । सत्यः । अस्ति ॥

सचा । यत् । ईम् । वृषऽमनाः । अहम्ऽयुः । स्थिरा । चित् । जनीः । वहते । सुऽभागाः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

७. एषां मरुतां यो महिमा वक्म्यः (=स्तुत्यः=स्तोत्रयोग्यः) सत्यश्च (=सदा वर्तमानश्च) अस्ति तम् [अहं] प्र विवक्मि (=प्रकर्षेण वर्णयामि) यद् ईं (=यतः कारणात् खलु) वृषमनाः (=वीरमनोयुक्तः) अहंयुः (=अहंकारयुक्तः=वयं खलु बलिनः स्म इति भावयुक्तः) [एष मरुद्गणः] सुभागाः (=सुधनयुक्ताः) स्थिरा चित् (=? स्थिराश्चित्=दृढतरपर्वतवदचला अपि) जनीः (=मातृः मेघोदकरूपाः) सचा वहते (=साकल्येन वहति=साकल्येनेतस्ततः स्वरथे लघुवस्तुवत् नयति) ॥

स्थिरा चित् इति स्थिराश्चित् इत्यर्थे ऋगर्थलाभाय सहनीयम् इति नो मतम्। सायणस्तु उत्तरार्धं प्रकारान्तरेण व्याचष्टे । कथमेषां महिमा प्राप्त इति उच्यते । यद्यस्मादीमेतेषां संबन्धिनी रोदसी वृषमणा वृष्ट्यादिवर्षणमनस्काहंयुरहंकारवती । जगदुपकारकर्त्री नाकदाचिदस्तीत्यहंकारः । स्थिरा चित् । चिदिति पूजायाम् । अत्यन्तमविनश्वरा । ईदृशी देवी सुभागाः शोभनभाग्योपेता जनीर्जननशीलाः प्रजा वृष्ट्युत्पत्तीर्वा वहते । धारयति । वृष्टौ सत्यां सर्वे प्राणिन उत्पद्यन्ते । यस्मादेवं तस्मान्महिमास्ति । तं महिमानं स्तौमीत्यर्थः । इति ॥

७. या मरुतांचा जो स्तुत्य [ आणि ] खरा महिमा आहे, तो मी वर्णितों. [ तो हा ] कीं, वीरमनस्क [आणि] अभिमानी असा जो हा मरुद्गण तो दृढतर असलेल्याहि सुभाग्यशील मातांला आपल्याबरोबर घेऊन जात असतो.

7. I proclaim that greatness of these Maruts, which is deserving of praise [and] is great; viz. that this [troop of Maruts] [which is] noble-minded [and] proud carries with it even the firm mothers (rain-waters) that are rich.

---

७. 'महाधैर्यवान् आणि आपल्या बळाविषयीं अभिमानी असा जो मरुद्गण त्याचा महिमा असा आहे कीं मेघोदकरूपी ज्या जीवांच्या माता, त्या अंतरिक्षामध्यें मेघरूपानें पर्वतासारिख्या दृढतर असतांहि, त्यांला तो मरुद्गण हातांमध्यें घेऊन जावयाच्या एकाद्या हलक्या पदार्थाप्रमाणें सहज आपल्या रथांत घालून घेऊन जातो; हा जो ह्या मरुतांचा वर्णनीय आणि खरा महिमा, त्याचें मी वर्णन करितों,' असें तात्पर्य.

पण मरुतांविषयीं बहुतेक सूक्तें कठिण आहेत, आणि त्यांतीलच ही ऋचा होय. आम्ही दिलेला अर्थ निघण्यासाठीं 'स्थिरा' याच्या ऐवजीं 'स्थिराः' असा पाठ घेतल्याशिवाय निर्वाह नाहीं.

पूर्वार्धांत मरुतांविषयीं बहुवचनीं निर्देश असून उत्तरार्धांत गणापेक्षेनें एकवचनीं निर्देश आहे यांत नवें कांहीं नाहीं. सू. ६४ मं. १५ पहा. शिवाय, [illegible] उदाहरणें पूर्वीं आलीं आहेत. [illegible] ऋचेंत 'स्थिर' असें जें विशेषण आहे, त्याचा अर्थ पुढच्या ऋचेंतील 'अच्युत' आणि 'ध्रुव' या विशेषणांसारिखाच आहे, आणि मेघोदकाला 'अच्युत' हें विशेषण लाविल्याचें उदाहरण ऋ. ६. ३१. २ आणि त्याजवरील भाष्यांत पहा.

'जनी' शब्दाचा अर्थ माता हा वेदांत प्रसिद्ध आहे. आणि माता हें विशेषण 'आपः' (मेघोदकें) यास पुष्कळ ठिकाणीं वेदांत लाविलेलें आढळतें. उदाहरणार्थ—'अर्षन्तु आपः जवसा वि मातरः' ऋ. ८. ८९. ४; ऋ. ८. ९६. १ यांत 'अस्मै आपः मातरः सप्त तस्थुः,' ऋ. १०. १७. १० यांत 'आपः अस्मान् मातरः शुन्धयन्तु,' ऋ. १०. ६४. ९ यांत 'देवीः आपः मातरः सूदयित्न्वः' आणि ऋ. १०. ९१. ६ यांत 'तम् आपः अग्निं जनयन्त मातरः.' या उदाहरणांत 'मातरः' हें 'आपः' याच्या समागमें योजिलें आहे, परंतु 'आपः' हा शब्द नसतांहि 'मातरः' हें मेघोदकांचें वाचक ज्यांत आहे असेहि मंत्र आढळता-

पान्ति मित्रावरुणाववद्याच्चयत ईमर्यमो अप्रशस्तान् ।
उत च्यवन्ते अच्युता ध्रुवाणि वावृध ईं मरुतो दातिवारः ॥ ८ ॥

पान्ति । मित्रावरुणौ । अवद्यात् । चयते । ईम् । अर्यमो इति । अप्रऽशस्तान् ।
उत । च्यवन्ते । अच्युता । ध्रुवाणि । ववृधे । ईम् । मरुतः । दातिऽवारः ॥ ८ ॥

## भाषायाम्.

८. [ हे मरुतः ], [ तव ] मित्रावरुणौ अर्यमो (=अर्यमा च ) [ इत्येते देवा ] अवद्यात् [ प्रशस्तान् ] पान्ति (=स्तुत्यान् जनान् गर्ह्याद् दोषाद् रक्षन्ति ) ईम् अप्रशस्तान् चयते (=ये अप्रशस्ता दुष्टा जनास्तान् नाशयन्ति) । उत (=अपि च) अच्युता (=अच्युतानि=अपतनशीलानि ) [ अत एव ] ध्रुवाणि (=अचलानि ) [ मेघोदकानि ] च्यवन्ते (=च्युतानि भवन्ति=वृष्टिद्वारा पतन्ति) । [ एवं सति ] हे मरुतः, दातिवारः ईम् ( =एष युष्माकं दत्तधनो गणः=युष्माकं यो दानशाली गणः स ) वावृधे (=ववृधे=जयति=प्रकर्षेण वर्तते ) ॥

मित्रावरुणावर्यमा चेत्येते देवा अपि मरुतामनुकूला भूत्वा तेषां महिमवर्धनार्थं दुर्जननाशसाधुत्राणवृष्टिकरणादीनि कर्माणि कुर्वन्तीत्यर्थः ॥

वावृध इत्यादौ सायणस्तु । कदेत्युच्यते । हे मरुतो युष्मदीय ईमयं कालो दातिवारः प्रदेयजलः खण्डितमेघो वा यदा ववृधे । वर्धते । तदा मित्रादयो देवा युष्मदनुकूलव्यापारेण जगद्रक्षन्तीत्यर्थः । यद्वा दातिवारो दत्तवरणीयहविर्लक्षणधनो यजमानो हे मरुतः ईमेनान् युष्मान्ववृधे वर्धयति यदा तदेत्यर्थः । इति ॥

दातिवार इति विशेषणं तु नित्यं मरुत्स्वेव प्रयुक्तं तथा वेदे दर्शनात् ॥

त. उदाहरणार्थः—ऋ. १. ९५. ४ यांत 'वत्सः मातृः जनयत स्वधाभिः;' ऋ. ९. ८६. ३६ यांत 'सप्त स्वसारः अभि मातरः ...... राजसे;' ऋ. ९. १०२. ४ [illegible]शानं सप्त मातरः वेधाम् अशासत.' शिवाय ऋ. १०. ३५. २ आणि १०. १२३. ३ हेहि मंत्र पहा. वृचासाठीं 'वक्मिओ,' आणि 'मरुतआं,' असें म्हणावें लागतें.

८. [ हे मरुतांनो ], मित्रावरुण आणि अर्यमा [ हे ] [ साधूला ] निंदेपासून रक्षितात आणि दुष्टांला दंडितात. आणि न पडणारीं व अचल अशींहि मेघोदकें पडतात. [ तर ] हे मरुतांनो, दानशाली असा जो तुमचा गण त्याचा महिमा मोठा होय.

8. Mitrâ and Varuṇa and Aryamâ preserve [the good] from disgrace and punish the wicked. And those [ rain-waters ] fall, which do not fall and are firm. [Thus] [your] generous [ troop ], O Maruts, is victorious.

---

८. ' हे मरुतांनो, तुमचा महिमा इतका मोठा आहे कीं, मित्रावरुण आणि अर्यमा हे देव सुद्धा तुमच्या भक्तांस रक्षितात आणि तुमच्या निंदकांस शिक्षा करितात, आणि जमिनीवर न पडतां अंतरिक्षांतच पर्वतांप्रमाणें मेघरूपानें राहणारीं जीं उदकें तींहि भिऊन वृष्टि करूं लागतात.'

' साधूला '=' प्रशस्तान्.' या शब्दाचा अध्याहार ' अप्रशस्तान् ' असा जो शब्द मंत्रांत आहे त्यापासून केला पाहिजे.

' दानशाली '=' दातिवारः.' दातिवार शब्द वेदांत तीन ठिकाणीं आला आहे आणि तिन्ही ठिकाणीं मरुतांचें विशेषण आहे.

' महिमा मोठा होय '=' वावृधे.' अक्षरशः '( गण ) मोठा आहे,' 'वाढलेला आहे.'

वृत्तासाठीं ' पान्ति ' बद्दल ' पआन्ति ' अथवा ' अवद्यात् ' याबद्दल ' अवदिआत् ' असें म्हणावें.

नही नु वो मरुतो अन्त्यस्मे आरात्ताच्चिच्छवसो अन्तमापुः ।
ते धृष्णुना शवसा शूशुवांसोऽर्णो न द्वेषो धृषता परि ष्ठुः ॥९॥

नहि । नु । वः । मरुतः । अन्ति । अस्मे इति । आरात्तात् । चित् । शवसः । अन्तम् । आपुः ।

ते । धृष्णुना । शवसा । शूशुऽवांसः । अर्णः । न । द्वेषः । धृषता । परि । स्थुः ॥ ९ ॥

वयमद्येन्द्रस्य प्रेष्ठा वयं श्वो वोचेमहि समर्ये ।
वयं पुरा महि च नो अनु द्यून् तन्न ऋभुक्षा नरामनु ष्यात् १०

वयम् । अद्य । इन्द्रस्य । प्रेष्ठाः । वयम् । श्वः । वोचेमहि । सऽमर्ये ।

वयम् । पुरा । महि । च । नः । अनु । द्यून् । तत् । नः । ऋभुक्षाः । नराम् । अनु । स्यात् ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

९. हे मरुतः, अस्मे (=अस्माकं मध्ये) [ केपि ] वः शवसः अन्तं (=युष्माकं बलस्यावसानं) नहि नु अन्ति आरात्तात् चित् आपुः (=न सांप्रतं जानन्ति न दूरगते पूर्वस्मिन् काले वा जज्ञुः)—ते [ मरुतो ] [ हि ] धृष्णुना शवसा (=धर्षकेण बलेन) शूशुवांसः (=अतिशयेन प्रवृद्धाः सन्तः) अर्णो न (=उदकप्रवाह इव) द्वेषः (=द्विषः=शत्रून्) धृषता (=सहसा) परि स्थुः (=परिवेष्टयन्ति) ॥

अन्ति अन्तिक आरात्ताद्विदूरादपि । यद्वा चिदिति कुत्सायाम् । अत्यन्तदूरात् । ...... संनिधावसंनिधौ च न प्राप्नुवन्तीत्यर्थः । ...... । धृषता पराभिभावकेन सामर्थ्येन । इत्यादि सायणः ॥

वस्तुतस्तु धृषतेति क्रियाविशेषणम् ॥

१०. इन्द्रस्य प्रेष्ठाः (=अतिशयेन प्रिया) वयम् अद्य [तं वोचेमहि=तं स्तोतुं समर्थाः भूयास्म ] वयं समर्ये (=यज्ञे) श्वः (=परस्मिन् दिने) [ वोचेमहि=तं स्तोतुं समर्थाः भूयास्म.] । वयं पुरा [ काले ] [ तं ] महि (=प्रभूतं यथा तथा) [ [illegible] स्तुवन्तः स्म ] च (=अपि च) नः (=अस्मदर्थम्) अनु द्यून् (=दिने [illegible] प्रतिदिनमितः परमपि) [ वक्ष्यामहे=स्तोष्यामहे ] । तत् (=अतः कारणात्) [illegible]

९. हे मरुतांनो, तुमच्या बळाचा अंत आम्हांतून [कोणीहि] सांप्रतकाळीं [पावले] नाहींत आणि प्राचीनकाळींहि पावले नाहींत.—जाज्वल्य सामर्थ्यानें प्रचंड [असे जे हे मरुत्], ते पुराप्रमाणें शत्रूंला सहसा वेष्टून टाकितात.

१०. इंद्राचे अत्यंत आवडते [असे] आम्ही आज [इंद्राला] स्तवूं, आम्ही उद्यां [इंद्राला] यज्ञांत स्तवूं. आम्ही आपणांकरितां पूर्वी [इंद्राला] अत्यंत [स्तविलें आहे] आणि पुढेंहि प्रतिदिनीं [स्तवूं]. तर महान् [इन्द्र] सर्व मनुष्यांमध्यें आम्हांला प्रसन्न होओ.

9. Nor now nor in the distant past, O Maruts, have any of us reached the end of your power.—These [Maruts], invigorated by mighty power, hem in their enemies forcibly like a flood.

10. Most dear to Indra may we [praise him] to-day, may we praise [him] tomorrow in the sacrifice. We [have praised him] much before and [we will praise him] for our good from day to day. Therefore may the Great One be favourable to us of [all] men.

---

९. 'हे मरुतांनो, तुमचें बळ फार मोठें आहे, तेणेंकरून तुम्ही प्रचंड आहां आणि एकादा पूर जसा कोणाला तरी वेढून टाकितो आणि त्याला कोणत्या बाजूलाहि पळून जाण्याला मार्ग सोडीत नाहीं, तसे तुम्ही आपल्या शत्रूंला वेढून टाकितां. असें जें तुमचें बळ त्याची सीमा कोठपर्यंत आहे हें आम्हांतून कोणाला आलीकडेहि समजत नाहीं आणि पूर्वकाळींहि कोणाला समजलेलें नाहीं.

'सांप्रत काळीं......आणि प्राचीन काळींहि' = 'अन्ति...आरात्तात् चित्.' [illegible] 'जवळ...आणि दूरहि' असा [illegible] आहे. या अशा प्रकारचीं क्रिया-विशेषणें जशीं स्थलाच्या अंतराला लागतात तशींच कालाच्याहि अंतराला लागतात, आणि तीं सर्व भाषांत लागतात. वृत्तासाठीं 'अन्ति अस्मे' आणि 'शुशुवांसो। अर्णो' असें म्हणावें लागतें.

१०. ही ऋचा इंद्राविषयीं आहे. या सूक्ताच्या आरंभीं अनुक्रमणिकेंत पहिली ऋचा मात्र इंद्राविषयींची आहे असें सांगितलें आहे, पण दहावी सुद्धा इंद्राविषयींच आहे असें सांगणें अवश्य होतें. परंतु अनुक्रमणिकाकारांनीं तसें सांगितलेलें नाहीं.

'आम्ही इंद्राला अत्यंत प्रिय होऊं आणि अत्यंत प्रिय झाल्यानंतर आम्ही

एष वः स्तोमो मरुत इयं गीर्मान्दार्यस्य मान्यस्य कारोः।
एषा यासीष्ट तन्वे वयां विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥११॥५॥

एषः। वः। स्तोमः। मरुतः। इयम्। गीः। मान्दार्यस्य। मान्यस्य।
कारोः।
आ। इषा। यासीष्ट। तन्वे। वयाम्। विद्याम। इषम्। वृजनम्।
जीरऽदानुम् ॥ ११ ॥ ९ ॥

---

क्षाः (=महान्) [इन्द्रो] नरां (=नराणां मनुष्याणां मध्ये) नः (=अस्मभ्यम्) [एव] अनु स्यात् (=अनुकूलो भवतु) ॥

वयं यथा प्रतिदिनमिन्द्रस्य प्रियतमा भवेम तथा भूत्वा च तं स्तूयाम अस्मान्स तथानुगृह्णात्वित्यर्थः ॥

---

## भाषायाम्.

११. हे मरुतः, मान्यस्य (=माननीयस्य=प्रशस्तस्य) कारोः (=स्तोतुर्) मान्दार्यस्य (=एतन्नामकस्योपासकस्य) एष स्तोमः (=इदं स्तोत्रम्) इयं गीः (=इयं च वाक् स्तोत्ररूपैव) वः (=युष्मदर्थं=युष्मदर्थं प्रापितोस्ति)। [अतः कारणाद्] [यूयं तस्य मान्दार्यस्यार्थम्] इषा आ यासीष्ट (=अन्नेन सह आगच्छत) वयां (=वयमपि) तन्वे (=आत्मार्थम् अस्माकमर्थे) इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) [जीर]दानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

---

इंद्राला आज आणि उद्यां आणि प्रतिदिनीं स्तवूं असें होओ. आणि ज्यापेक्षां आजपर्यंत आम्ही नित्य इंद्राची फार सेवा केली आहे आणि पुढेंहि करणार आहों, त्यापेक्षां तो सर्वांहून आम्हांला अधिक प्रसन्न होओ' असा भावार्थ.

'अत्यंत आवडते...स्तवूं'=' प्रेष्ठाः वोचेमहि.' हा जरी अक्षरशः अर्थ आहे, तरी तात्पर्य असें आहे की आ[म्ही इं]द्राचे अत्यंत प्रिय असूं, आणि [त्याची] स्तुति गात राहूं असें घडो.

वृत्तासाठीं 'वयमद्य इन्द्र[स्य]' असा पहिला चरण म्हणून [...]त 'समरीए' असें आणि चवथ्यांत 'नरां' बद्दल 'नरआम्' असें म्हणावें.

११. हे मरुतांनो, प्रशस्त कवि मान्दार्य याचें हें स्तोत्र [आणि] ही स्तुति तुम्हांला [ अर्पण केली आहे ]. तुम्ही [ त्याजकरितां ] अन्न घेऊन या. आणि आम्हां स्वताहालाहि अन्न, बळ आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

11. This praise, O Maruts, [ and ] this hymn of the venerable poet Mândârya is [ offered ] unto you. Come you with food [ for him ]. And may we also obtain for ourselves food, strength and a son that shall quickly make us rich.

११. हा मंत्र सू. १६७ मं. १५ यांत आला आहे. त्या ठिकाणीं केलेलें भाषांतर आणि हें एकच असल्यामुळें टिपा वगैरे त्या ठिकाणच्या मंत्रावरील पाहाव्या.

## सूक्तम् १६८.

अगस्त्य ऋषिः । मरुतो देवता । अन्त्यास्तिस्त्रस्त्रिष्टुभः । शिष्टं सूक्तं जागतम् ॥

**यज्ञायज्ञा वः समना तुतुर्वणिर्धियंधियं वो देवया उ दधिध्वे ।**
**आ वोऽर्वाचः सुविताय रोदस्योर्महे ववृत्यामवसे सुवृक्तिभिः॥ १**

यज्ञाऽयज्ञा । वः । समना । तुतुर्वणिः । धियम्ऽधियम् । वः । देवऽयाः । ऊं इति । दधिध्वे ।
आ । वः । अर्वाचः । सुविताय । रोदस्योः । महे । ववृत्याम् । अवसे । सुवृक्तिऽभिः ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे मरुतः ], यज्ञायज्ञा ( =यज्ञेयज्ञे=सर्वेषु यज्ञेषु ) तुतुर्वणिः ( =त्वरमाण उपासको) वः समना [ ध्यायति ] (=युष्मान् समाने काले भजते=युष्मान् युगपत्प्रत्येकस्मिन्यागे ससंभ्रम उपासकजनः सेवते ) । देवया उ धियंधियं (=प्रत्येकस्य देवगन्तोरुपासकस्य सर्वाः सेवाः=देवान् प्रति जिगमिषोरुपासकस्य सर्वाण्यपि भजनानि=सर्वेष्वपि स्थलेषु कृतानि भजनानि ) दधिध्वे (=यूयं धारयथ=यूयं गृह्णीथ ) । [ एवं सति ] रोदस्योः सुविताय महे अवसे (=द्यावापृथिव्योः कल्याणाय महते च रक्षणाय=द्यावापृथिव्यौ यथागत्य अस्माकं कल्याणं महद्रक्षणं च कुर्यातां तथा ) सुवृक्तिभिः वः अर्वाचः आ ववृत्याम् (=शोभनकृतैः स्तोत्रैर्युष्मान् अस्माकं समीप आवर्तयितुं तेभ्यस्तेभ्य उपासकेभ्य आनेतुं समर्थो भूयासम् ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे मरुतः, सर्वेष्वपि यज्ञेषु सर्वेपि यजमाना युष्मान् युगपदेव सेवन्ते । तेषु तेषु स्थलेषु यूयं हविर्ग्रहणार्थं गमिष्यथ । अस्माकं यज्ञे च नागन्तुमनसो भविष्यथ । तदपि मया रचितैरेतैः सूक्तैर्युष्मान् अस्मद्यज्ञमानेतुं समर्थो भूयासम् । युष्मासु सत्सु आगतेषु द्यावापृथिव्यावप्यागत्य नः कल्याणं महद्रक्षणं च करिष्यत इति ॥

रोदसीभ्यां कर्तव्याय रक्षणाय मरुतामाह्वानं वेदे मन्त्रान्तरेष्वपि दृश्यते । देवया इति षष्ठ्येकवचनं ॥

"वः" इति यूयमित्यर्थे । यद्वा वो धियंधियमिति योज्यम् ॥

## सूक्त १६८.

ऋषि—अगस्त्य. देवता—मरुत्. वृत्त—शेवटच्या तीन ऋचा त्रिष्टुभ् वृत्ताच्या आहेत, त्या खेरीज करून सर्व सूक्त जगती वृत्ताचें.

१. [ हे मरुतांनो ], प्रत्येक यज्ञांत [ उपासक जन ] तुम्हांला संभ्रमानें एकदम [भजत असतात]. प्रत्येक देवेच्छू उपासकाचें सर्व भजन तुम्ही ग्रहण करीत असतां. तरी [ हे मरुतांनो ], द्यावापृथिवींनीं [ येऊन ] [ आमचें ] कल्याण करावें म्हणून [ आणि ] मोठें संरक्षण करावें म्हणून स्तोत्रांच्या योगानें मी तुम्हांला इकडे आणूं शकेन असें होओ.

## HYMN 168.

To the *Maruts*. By *Agastya*. Metre—*Jagatî*, except the last three verses which are of the *Trishṭubh* metre.

1. In every sacrifice the alacrious worshipper [ worships ] you at the same time; you receive all the worship of every god-honouring [ man ]. Nevertheless ] may I with [my] well-composed hymns turn you hitherward, that Earth and Heaven may grant prosperity [ and ] great protection.

---

१. 'हे मरुतांनो, तुम्हांला सर्व यज्ञांत उपासक लोक मोठ्या संभ्रमानें एके काळीं भजतात; आणि देवलोकीं जाऊं इच्छिणारे सर्व उपासक जेथें जेथें भजन करितात तेथें तेथें तें तुम्ही ग्रहण करितां. तर ही भजनें आणि ह्या उपासना ग्रहण करण्याकरितां तुम्ही दुसऱ्या ठिकाणी गुंतलां असाल, तेथून हें आमचें स्तोत्र ऐकण्यास तुम्ही कदाचित् येणार नाहीं. तर हीं जी मी स्तोत्रें म्हणत आहें, तीं तुम्हांस प्रविष्ट होओत, आणि तीं ऐकून तुम्ही त्या त्या उपासनांस सोडून आम्हांप्रत या, कीं जेणेकरून द्यावापृथिवी ह्या आमचें कल्याण करितील आणि मोठें रक्षण करितील,' असें या कठिण मंत्राचें तात्पर्य आहे यांत संशय नाहीं.

'उपासक जन ...... संभ्रमानें'= 'तुतुर्वणिः' अक्षरशः 'ससंभ्रम [असा उपासक ]'; म्हणजे, मोठ्या संभ्रमानें अथवा त्वरेनें उपासना करण्याच्या कामीं लागणारा सेवक किंवा भक्त. 'तुतुर्वणि' शब्द ऋग्वेदांत पुनः आलेला नाहीं.

'[ भजत असतात ]'='[ ध्यायति].' हा अध्याहार 'धियंधियं' असें जें दुसऱ्या पादांत नाम आहे आणि त्याजव-

वम्रासो न ये स्वजाः स्वतवस इषं स्वरभिजायन्त धूतयः ।
सहस्रियासो अपां नोर्मय आसा गावो वन्द्यासो नोक्षणः ॥२॥
वम्रासः । न । ये । स्वऽजाः । स्वऽतवसः । इषम् । स्वः । अभिऽजायन्त । धूतयः ।
सहस्रियासः । अपाम् । न । ऊर्मयः । आसा । गावः । वन्द्यासः । न । उक्षणः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. धूतयः (=कम्पनशीला) ये [मरुतो] वम्रासो न (=पर्वता इव) स्वजाः (=स्वजाताः=स्वयंभुवः) स्वतवसः (=स्वायत्तबलाः) [सन्तः] इषं स्वः अभिजायन्त (=अन्नं धनं चाभिलक्ष्याविर्भवन्ति=उपासकेभ्योस्मभ्यम् अन्नं धनं च दातुं प्रादुर्भवन्ति)। [ते] अपाम् ऊर्मयो न सहस्रियासः (=उदकानां समुद्रादीनां कल्लोला इव सहस्रसंख्याका) [अपि च] आसा वन्द्यासो गावो न (=आस्येन स्तोत्रेण स्तुत्या बलीवर्दा इव) उक्षणः (=सेचनसमर्थाः=वीर्यवन्तः पराक्रमिणो) [भवन्ति] ॥
वम्रासो नेतीषदुर्बोधम्। पर्वतशब्देन सायणाचार्यैः क्वचिद्वम्रशब्दस्य व्याख्यातत्वात्पर्वता इवेति व्याख्यातमस्माभिरत्रेति ज्ञेयम्। वम्र उदकनिर्झर इति मास्मानः ॥
आसेत्यपि दुर्बोधं पदम्। तदपि क्वचिद्दृष्टं सायणव्याख्यानमनुसृत्यैव विवृतमत्रास्माभिः। पाश्चात्त्यास्तु आसेति प्रत्यक्षं साक्षादित्यार्थे क्रियाविशेषणमित्याहुः तत्पक्षे आसा सर्वेषां समक्षम् अभिजायन्त प्रादुर्भवन्तीति पूर्वेण योजनीयम् ॥

रावर 'दधिध्वे' हें क्रियापद लाविलें आहे, त्यांपासून सुचतो. ह्या अध्याहाराशिवाय दुसरी निर्वाहरीति अशी कीं, 'यज्ञायज्ञा समना तुतुर्वणिर्योस्ति स वः युष्माकमेव भवति'='प्रत्येक यज्ञात संभ्रमेंकरून एकदम उपासना करणारे जे जे भक्त ते सर्व तुमचेच, दुसऱ्या देवांचे नव्हेत.' तात्पर्यांत भेद नाहीं.
'देवेप्सू उपासकाचें'='देवयाः.' म्हणजे, देवांकडे जाण्यासाठीं उपासना करणाऱ्याचें.
'प्रत्येक' हें 'उ' (=उत=एव) असें जें पद आहे, त्यावरून गम्यमान आहे.
'द्यावापृथिवीनी येऊन आमचें कल्याण करावें म्हणून'='रोदस्योः सुवितायः.' मरुत् आले तर द्यावापृथिवी कशा प्रसन्न होतील?
ह्यासाठीं 'वो अर्वाचः' असें घ्यावें.

२. जे हालवून टाकणारे [मरुत्] पर्वतांप्रमाणें स्वयंभू [आणि] स्वतःसिद्ध पराक्रमी [असून] अन्न [आणि] धन [हीं प्राप्त करून देण्या]साठीं प्रगट होतात. ते उदकांच्या लाटांसारिखे हजारो [आणि] स्तोत्रानें स्तुत्य [अशा] बलीवर्दांप्रमाणें वीर्यवंत [होत].

2. [Maruts], the shakers—who, self-born [and] self-strong like mountains, manifest themselves to [give] food [and] wealth; thousands like waves of the waters, [and] powerful like bulls fit to be renowned by song.

---

२. वरच्या मंत्रांत मरुत् सांगितले ते असे आहेत कीं, 'ते पर्वतांप्रमाणें स्वयंभू आणि स्वतःसिद्धबळ असलेले असे आहेत; आणि ते सकळ विश्वाला दणाणून टाकणारे मरुत् लोकांस अन्न आणि धन देण्यासाठीं प्रादुर्भूत होतात. जशा समुद्रावर हजारो लाटा एकामागून एक प्रचंड येतात, तसे हे प्रचंड मरुत् हजारो एकामागून एक येत असतात, आणि जसे महाप्रतापी आणि बळाच्या संबंधानें स्तोत्र ज्यांचें गाण्यास योग्य असे प्रबळ बैल असावे तसे हे प्रबळ होत.'

'हालवून टाकणारे'='धूतयः.' सू. ३९ मं. १ आणि सू. ८७ मं. ३ याजवरील सायणभाष्य पहा.

'बलीवर्दांप्रमाणें वीर्यवन्त'='गावो न उक्षणः.' म्हणजे गाईच्या पाठीस लागणारे बांमर जसे बळकट आणि वीर्यमत्त असतात, तसे मरुत् मेघोदकरूप वीर्यानें उन्मत्त होऊन तें पृथ्वीवर टाकून वनस्पत्यादिकांची उत्पत्ति करण्याविषयीं समर्थ होत; असें तात्पर्य आहे. वीर्यमदोन्मत्त पोळाची उपमा इन्द्रास अथवा मरुतांस आणि दुसऱ्या देवांस देण्याची चाल वेदांत आहे. सू. ३७ मं. ५ इत्यादि पहा.

वृत्तासाठीं 'स्वजाः' बद्दल 'सुअजाः,' 'स्वः' बद्दल 'सुअः' असें अनुक्रमें पहिल्या आणि दुसऱ्या पादांत म्हणून, तिसरा पाद 'सहस्रियासो अपआं न ऊर्मयः' असा वाचावा, आणि चवथ्यांत 'वन्दिआसो न उक्षणः' असें म्हणावें.

सोमासो न ये सुतास्तृप्तांशवो हृत्सु पीतासो दुवसो नासते ।
ऐषामंसेषु रम्भिणीव रारभे हस्तेषु खादिश्च कृतिश्च सं दधे ॥३॥

सोमासः । न । ये । सुताः । तृप्तऽअंशवः । हृत्ऽसु । पीतासः । दुवसः । न । आसते ।
आ । एषाम् । अंसेषु । रम्भिणीऽइव । ररभे । हस्तेषु । खादिः । च । कृतिः । च । सम् । दधे ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. ये [ मरुतः ] तृप्तांशवः (=सुपुष्टवल्ल्याः सकाशाज्जाताः) सुताः ( =अभिषुताः ) पीतासः सोमासो न (=पीताः सन्तः सोमा यथासते हृत्सु तथा ) दुवसो हृत्सु (=परिचरणवतां हृदयेषु ) आसते (=तिष्ठन्ति ) एषाम् अंसेषु आ (=तेषाम् अंसेषु ) रम्भिणीव (=युवतमंस्यांसलम्बिनी योषिदिव ) [ शक्तिर्नामायुधं ] रारभे (=परिरभ्य तिष्ठति ), हस्तेषु खादिश्च कृतिश्च (=कटकसदृशं हस्तत्राणकमायुधं कर्तनी कर्तनशील आयुधविशेषश्च ) सं दधे (=सम्यग् ध्रियते ) ॥

ये मरुतः सुता अभिषुतास्तृप्तांशवस्तर्पितावयवाः सोमासो न सोमा इव । यथा वल्लीरूपाः सोमा अभिषवात्पूर्वमाप्यायनेन तृप्तावयवाः सन्तः पश्चात्सुता अभिषुता रसभूताः पीतासः पीताः सन्तो हृत्सु पातॄणां हृदयेषु दुवसो नासते । परिचरन्त इवासते तद्वत् ये मरुतो यज्ञ आहूतास्तृप्तावयवा भवन्ति ध्यायमानाः सन्तो हृत्सु हृदयेषु दुवसो न परिचरन्त इवासते ...... । एषामंसेषु रम्भिणीव युवतमांसालम्बिनी योषिदिव रारभे । आरेभे । आश्लिष्यति । अवलम्बने सामर्थ्याच्छक्तयाख्यायुधविशेषो भुजलक्ष्मीर्वा । किंच हस्तेषु खादिर्हस्तत्राणकश्च कृतिः कर्तनी च खड्गलताद्वि [ ? ] संदधे । संधीयते । सम्यग् धृता भवति । परस्परसमुच्चयार्थौश्चकाराः । ये मरुद् उक्तरूपास्त आविर्भवन्तीत्यर्थः । इति सायणः ॥

३. जे [ मरुत् ], पुष्ट वल्लीचे गाळून काढिलेले [ आणि ] प्यालेले सोमरस जसे, तसे उपासकांच्या हृदयांत बसतात; त्यांच्या खांद्यावर तरुणी[नें मिठी मारिल्या] प्रमाणें [ शक्ति ] मिठी मारून राहते [आणि] हातांत चक्र आणि कर्तनी धरलेली असते.

3. Those [ Maruts] who sit in the heart of the worshipper even as Somas extracted from well-nourished plants do [when] drunk—from the shoulders of those [ Maruts ] hangs [ the spear ], like a young woman, [ and ] in their hands is held the ring and also the cutter.

---

३. 'हे मरुत् असे आहेत कीं, यांचें भजन उपासकजन करूं लागले म्हणजे, उत्तम वल्लीपासून पिळून काढिलेले सोमरस प्याले तर त्यापासून जसा पिणाऱ्यांच्या मनांत आनंद होतो, तसा मरुतांच्या ध्यानापासून उपासकांच्या मनांला आनंद होतो. यांच्या खांद्यावर शक्ति या नांवाचें आयुध चिकटलेलें असतें. तें एखादी तरुण स्त्री खांद्याला मिठी मारून राहते तसें दिसतें. यांच्या हातांत खादि आणि कृति या नांवांचीं दोन हत्यारें असतात.'

'पुष्ट वल्लीचे'=' तृप्तांशवः.' म्हणजे रसानें भरलेल्या टवटवीत सोमवल्लीपासून काढलेले. 'अंशु' म्हणजे जिजपासून सोमरस गाळून काढीत ती वल्ली. ( सू. १३७ मं. ३, सू. १२५ मं. ३ पहा ). यावरून सिद्ध होतें कीं सोमरस झाडापासून काढीत, फळापासून किंवा फुलापासून काढीत नसत.

'[ शक्ति ]'='[ शक्तिः.]' हा एक प्रकारचा भाला असे असें म्हणतात. ह्याची प्रसिद्धि अर्वाचीन संस्कृतांत फार आहे. रामायणांत लक्ष्मणावर इंद्रजितानें शक्ति मारिली ती गोष्ट सर्वांस ठाऊक आहे.

'चक्र आणि कर्तनी'=' खादिश्च कृतिश्च.' 'खादि' शब्द पूर्वी आला आहे ( सू. १६६ मं. ९ पहा ) पण तेथें कडें असा अर्थ आहे. प्रस्तुत स्थळी सायणानुसार दिलेला चक्र म्हणून एक हत्यार हा अर्थ येथें युक्त दिसतो. सायण हाताचें संरक्षण करणारें आयुध इतकेंच म्हणतात. चक्र अथवा ढाल? जर ढाल असा अर्थ असेल तर 'खादिश्च कृतिश्च' म्हणजे ढाल तरवार असा अर्थ केल्यास निराधार होईल असें नाहीं. पण 'कृति' शब्द पुनः कोठें आलेला नाहीं.

वृत्तासाठी 'तृप्रअंशवो' आणि 'न आसते' असें म्हणावें.

अव स्वयुक्ता दिव आ वृथा ययुरमर्त्याः कशया चोदत त्मना ।
अरेणवस्तुविजाता अचुच्यवुर्दृळ्हानि चिन्मरुतो भ्राजदृष्टयः ॥४॥

अव । स्वऽयुक्ताः । दिवः । आ । वृथा । ययुः । अमर्त्याः । कशया । चोदत । त्मना ।
अरेणवः । तुविऽजाताः । अचुच्यवुः । दृळ्हानि । चित् । मरुतः । भ्राजत्ऽऋष्टयः ॥ ४ ॥

को वोऽन्तर्मरुत ऋष्टिविद्युतो रेजति त्मना हन्वेव जिह्वया ।
धन्वच्युत इषां न यामनि पुरुप्रैषा अहन्यो३नैतशः ॥ ५ ॥ ६॥

कः । वः । अन्तः । मरुतः । ऋष्टिऽविद्युतः । रेजति । त्मना । हन्वाऽइव । जिह्वया ।
धन्वऽच्युतः । इषाम् । न । यामनि । पुरुऽप्रैषाः । अहन्यः । न । एतशः ॥ ५ ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

४. स्वयुक्ताः (=स्वयमेव युक्ताः=स्वयमेव अन्येन विनैव रथे युक्ता अश्वा येषां ते) [मरुतो] दिव आ वृथा अव ययुः (=दिवः सकाशात् आयासेन विनैव क्षिप्रम् अवाङ्मुखम् आगच्छन्ति)। —हे अमर्त्याः (=मरणरहिता) [मरुतः], कशया त्मना (=स्वयमेव ताडयता प्रतोदेन) [युष्मदश्वान्] चोदत (=चोदयत=प्रेरयत=स्वयमेव युज्यमानान् युष्मदश्वान् स्वयमेव ताडनकर्म कुर्वन्युष्मत्प्रतोदोत्रागमनाय शीघ्रतरान् करोतु)। —अरेणवः (=रजोहीनाः=मार्गे धूल्यभावादधूसरास्) तुविजाताः (=प्रबलं यथा तथा जाताः=प्रबलतरा) भ्राजदृष्टयः (=दीप्तर्ष्टिनामायुधा) मरुतः दृढानि चित् (=अचलान्यपि मेघोदकानि) अचुच्यवुः (=च्यावयन्ति=चालयन्ति=पातयन्ति=वृष्टिद्वारा भूम्याम् आगमयन्ति) ॥

अरेणवोपापास्तुविजाता बहुयज्ञेषु प्रादुर्भूता इति सायणः ॥

५. हे ऋष्टिविद्युतः (=ऋष्टिभिः मेघभेदनायुधविशेषैर्विद्योतमाना) मरुतः, हन्वेव जिह्वया (=जिह्वया हनू इव=जिह्वया यथा ओष्ठौ) [चाल्येते] [तथा] अन्तः (=मध्यात्=अन्तः स्थित्वा) वः (=युष्मान्) को रेजति त्मना (=[illegible]) । यामनि (=युष्माकं मार्गे) [यूयम्] इषां धन्वच्युतो न (=[illegible]

४. स्वतोयुक्त [ घोडे असलेले ] [ मरुत् ] द्युलोकाहून सहज खालीं येतात.—हे अमर्त्य [ मरुतांनो ], [ तुमच्या ] चाबकाला स्वतः [ घोडे ] हाकूं द्या.—रजोहीन, महाप्रबळ [ आणि ] लकलकीत भाले धारण केलेले मरुत् अचलांसहि [ खालीं ] पाडितात.

५. हे मरुतांनो, हे देदीप्यमान भाले असलेले [मरुत् ] हो, जिव्हेच्या योगानें ओंठ [ हालतात त्या]प्रमाणें तुम्हांला आंतून कोण चाळवितो ? [ तुम्ही ] जाऊं लागलां म्हणजे निरुदक देशीं अन्नांची जणुं वृष्टि करणारे [ आहां ]. [ तुम्ही ] दिनसंबंधी वारूप्रमाणें बहुतांवर अधिकार चालविणारे [ आहां ].

4. The self-harnessed [ Maruts ] easily come down from heaven.—Let [your] whip of its own accord hasten the [horses], O immortal ones!—The Maruts [ who are ] [ in their course ] free from dust, [ and ] mighty, [and] carry brilliant spears, throw down even that which is firm.

5. O Maruts, armed with brilliant spears, who sets you in motion from within, as the lips [move] by the tongue? [ You, who are ] as though shedders of refreshments on waterless regions in your course, [ you who are ] commanders of many like the Diurnal horse ( the Sun ).

४. 'मरुतांच्या घोड्यांला जोडणारा कोणी लागत नाहीं, ते आपले आपणच रथाला जोडिले जातात. अशा घोड्यांच्या योगानें मरुत् द्युलोकाहून पृथिवीवर येऊं लागले म्हणजे सहज आणि लवकर येतात. ते आज आपल्या घोड्यांला चाबकानें मारून सत्वर येथें येओत. मरुत् येऊं लागले म्हणजे त्यांस मार्गी धूळ लागत नाहीं, आणि ते इतके प्रबळ आणि शूर आहेत कीं, ते येतां येतां त्यांच्या रस्त्यावर जे मेघरूपी अचल पर्वत असतात, त्यांस आपल्या जाग्यावरून ते उचलतात आणि त्यांजकडून वृष्टि करवितात.'

'स्वतोयुक्त [ घोडे असलेले ]'= 'स्वयुक्ताः.' म्हणजे ज्यांचे घोडे आपल्या आपण रथास जोडिले जातात असे. अक्षरशः 'स्वतः जोडिलेले' इतकेंच आहे. जें विशेषण मरुतांच्या घोड्यांस लावावें तें येथें मरुतांसच लाविलें आहे.

क्व स्विदस्य रजसो महस्परं क्वावरं मरुतो यस्मिन्नायय ।
यच्च्यावयथ विथुरेव संहितं व्यद्रिणा पतथ त्वेषमर्णवम् ॥ ६ ॥

क्व । स्वित् । अस्य । रजसः । महः । परम् । क्व । अवरम् । मरुतः । यस्मिन् । आऽयय ।
यत् । च्यवयथ । विथुराऽइव । सम्ऽहितम् । वि । अद्रिणा । पतथ । त्वेषम् । अर्णवम् ॥ ६ ॥

---

च्यावयन्तो वर्षयन्त इव=मार्गे मेघभेदनेन निरुदकदेशे जलं वर्षित्वा अन्नवृष्टिमिव कुर्वन्तः) [ स्थ ] । [ अपि च ] अह्न्य एतशो न (=अहनि जातोऽश्व इव=सवितृरूपो दिने गमनशीलोऽश्व इव ) पुरुप्रैषाः (=बहूनामाज्ञापयितारः) [ स्थ ] ॥

त्मनेत्यनर्थकम् । दुर्बोधैषा सायणेनान्यथा व्याख्याता । तद्व्याख्यानं तद्भाष्ये द्रष्टव्यम् ॥

---

## भावार्थम्.

६. हे मरुतः, यस्मिन् [ रजसि ] आयय (=यस्मिन् लोके अन्तरिक्षरूप आगतवन्तः=यस्यान्तरिक्षस्य मध्ये चरन्त आगतवन्तः ) अस्य महो रजसः (=तस्य महतोऽन्तरिक्षस्य ) परं (=पारः=अन्तः) क्व स्वित् (=क्व भवति )? अवरं क्व (=अधोभागः आदिः क्व भवति )? यद् (=यदा ) संहितं (=सम्यक् स्थापितं संघभूतं मेघं ) विथुरेव (=विथुराणीव=शिथिलानि तृणानीव ) च्यावयथ (=चालयथ ) [तदा] अद्रिणा (=वज्रेण ) त्वेषम् अर्णवं (=दीप्तं मेघरूपं समुद्रं ) वि पतथ ( =विच्छिद्य भूमौ पातयथ ) ॥

---

ऋ. १०. ६७. ८ यांतहि मरुतांस याच अर्थाचें ' स्वयुग्भिः' असें विशेषण लाविलें आहे. आणि ऋ. १०. ७८. २ यांत त्यांस ' वातासो न स्वयुजः' (=वाऱ्यांप्रमाणें स्वयुक्त, " प्रत्यक्षवाता इव स्वयुजः स्वयं युज्यमानाः") असें म्हटलें आहे.

' चाबकाला स्वतः घोडे हाकूं द्या '= ' कशया चोदत त्मना.' कवि कल्पितो कीं, मरुतांचे घोडे जसे आपले आपण रथाला जोडिले जातात, तसा त्यांचा चाबूक हातांत न घेतला जातां घोड्यावर आपल्या आपणच बसतो. तसा आज बसो आणि ते घोडे मरुतांस घेऊन सत्वर येथें येओत. मरुतांच्या चाबकाविषयीं सू. ३७.मं. ३ पहा.

' लकलकीत भाले धारण केलेले '= ' भ्राजदृष्टयः.' सू. ३१ मं. १, सू. ६४ मं. ११ आणि सू. ८७ मं. ३ पहा.

' खाली पाडितात '=' अचुच्यवुः.'

६. हे मरुतांनो, तुम्ही ज्या [अंतरिक्षा]मधून येतां त्या ह्या मोठ्या अंतरिक्षाचा शेवट कोठें ? [आणि] आदि कोठें ? [तुम्ही] एकत्र मिळालेल्या [मेघा]ला जेव्हां गवताप्रमाणें हालवितां तेव्हां [तुम्ही] देदीप्यमान समुद्राला फोडून खालीं पाडितां.

6. Where, O Maruts, [is] the end of this vast firmament through which you have come? Where the beginning? When you shake the collected [cloud] like grass, you break asunder and throw down with the thunderbolt the brilliant ocean.

---

अक्षरशः 'चालवितात,' 'हालवितात,' चल करितात, अचल राहूं देत नाहींत.

वृत्तासाठीं 'अमर्तिआः' असें म्हणावें.

५. 'हे मरुतांनो, जिभेच्या योगानें जसे ओठ हालतात, तसें आंत राहून तुम्हांला कोण चालवितो? तुम्ही आपल्या मार्गी निरुदक प्रदेशींहि उदकवृष्टि करून अन्नाची वृष्टि केल्याप्रमाणें करितां, आणि सूर्यरूप जो नित्य आकाशांतून चालणारा घोडा तो जसा अनेक वस्तूंवर आपला अधिकार चालवितो तसे तुम्ही मरुत् आपल्या विस्तीर्ण चालण्याच्या योगानें अनेकांवर अधिकार चालविणारे आहां.'

'जिह्वेच्या योगानें ओठ [हालतात त्या]प्रमाणें '=' हन्वेव जिह्वया.' ही उपमा चमत्कारिक आहे, आणि तिची शैलीहि चमत्कारिक आहे.

'जाऊं लागलां म्हणजे '=' यामन्.' अक्षरशः, तुमच्या मार्गांत. यामन् म्हणजे मरुतांचा मार्ग. येथपासून दुसरें अर्ध दुर्बोध आहे. 'धन्वच्युतः इषां' म्हणजे 'धन्वसु इषां च्युतः च्यावयितारः वर्षयितारः' असा अर्थ घेतल्याशिवाय दुसरा निर्वाह नाहीं.

'दिनसंबंधी वारूप्रमाणें '=' अह्न्यो न एतशः.' म्हणजे दिवसाला आकाशांतून घोड्याप्रमाणें चालणारा जो सूर्य अथवा सविता त्याप्रमाणें.

उत्तरार्ध फार कठिण आहे. सायणभाष्याहून आम्ही निराळा अर्थ केला आहे, तो प्रयोगप्रमाणें पाहून आणि संदर्भास जमेल असा केला आहे.

वृत्तासाठीं 'वो अन्तर्' 'हनुएव' असें म्हणून दुसरे आणि तिसरे चरण खालीं लिहिल्याप्रमाणें वाचले पाहिजेतः—

धनुअच्युत इषआं न यामनि ।
पुरुप्रैषा अहनिओ न एतशः ॥

---

६. 'हे मरुतांनो, ज्या अति विस्तीर्ण अंतरिक्षामधून तुम्ही चालत आलां, त्याचा अंत कोठें आणि आदि कोठें हें कोणास ठाऊक आहे? तुम्ही येऊं लाग-

सातिर्न वोऽमवती स्वर्वती त्वेषा विपाका मरुतः पिपिष्वती ।
भद्रा वो रातिः पृणतो न दक्षिणा पृथुज्रयी असुर्येव जञ्जती ७

सातिः । न । वः । अमंऽवती । स्वः॑ऽवती । त्वेषा । विऽपाका । मरुतः । पिपिष्वती ।
भद्रा । वः । रातिः । पृणतः । न । दक्षिणा । पृथुऽज्रयी । असुर्याऽइव । जञ्जती ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. हे मरुतः, वः सातिर्न (=युष्माकं संबन्धिनी संभक्तिर्लाभ इव=यथा युष्माकं जयादिप्राप्तिस्तथा ) वो रातिः (=युष्माकं दानं=वृष्ट्यादिविषयम् ) अमवती (=बलवती ) स्वर्वती (=सुखवती ) त्वेषा (=दीप्ता ) विपाका (=सुखपरिणामा ) पिपिष्वती (=? पीनत्वसाधनवती=समृद्धा ) [ भवति ] [ अपि च ] पृणतो न दक्षिणा (=धनिकस्य जनस्य दक्षिणेव=धनिकजनदत्ता दक्षिणेव ) भद्रा (=कल्याणा ) [ अपि च ] असुर्या जञ्जतीव (=असुर्यस्य दिवः संबन्धिनी शक्तिरिव=द्युदेवस्य शक्तिर्विद्युद्रूपं वज्रं यथा तथा ) पृथुज्रयी (=प्रभूतवेगवती ) [ भवति ] ॥

लां म्हणजे महामेघालाहि गवताप्रमाणें हालवून, त्याचें उदक फोडून खालीं भूमीवर पाडितां.'

'देदीप्यमान समुद्राला '=' त्वेषम् अर्णवम्.' म्हणजे लकलकीत वीज ज्याबरोबर असते अशा मेघाला, किंवा मेघोदकरूपानें असणाऱ्या आन्तरिक्ष समुद्राला.

वृत्तासाठीं ' कुअस्ति०,' 'कुआवर्' आणि 'वि अद्रिणा' असें म्हणावें लागतें.

**७. हे मरुतांनो, तुमची उपार्जना जशी तशी, तुमची देणगीहि बलसंपन्न, सुखसंपन्न, तेजःसंपन्न, सुखपरिणामी, [ आणि ] समृद्ध [होय]; आणि धनिकाच्या दक्षिणेप्रमाणें कल्याणकारक, [आणि] दिव्य शक्तीप्रमाणें अत्यंत वेगसंपन्न [होय].**

7. Like that which you, O Maruts, acquire, that which you bestow [is] full of strength, full of happiness, brilliant, sweet in the end, [ and ] overflowing ; [ it is ] delightful like the gift of a rich sacrificer, [and] swift like the divine thunderbolt.

---

७. 'हे मरुतांनो, तुम्ही आपल्या शत्रूंस मारून जें यश मिळवितां तें जसें असतें तसें तुम्ही आपल्या उपासकांस देतां तें दानहि बळ, सुख, तेज, चांगला परिणाम आणि उत्कर्ष यांहीं भरलेलें असतें. तें दान एकाद्या श्रीमंत यजमानानें दिलेल्या दक्षिणेसारिखें कल्याण करणारें, आणि द्युदेवाची वज्ररूप जी शक्ति तिजप्रमाणें अत्यंत वेगयुक्त होय.'

'उपार्जना'=' सातिः.' म्हणजे तुम्ही आपल्या शत्रूला जिंकून जें यश, धन, कीर्ति इत्यादि मिळवितां तें.

'सुखपरिणामी'=' विपाका.' 'समृद्ध'=' पिपिष्वती.' 'विपाका' आणि 'पिपिष्वती' हे दोन्ही शब्द कठिण आहेत. हे ऋग्वेदांत पुनः आलेले नाहींत.

'दिव्य शक्तीप्रमाणें'=' असुर्येव जञ्जती.' म्हणजे द्युरूप जो देव त्याचें शक्ति म्हणून जें आयुध (विद्युल्लता), तिजप्रमाणें मरुतांची देणगी चपळ आहे; म्हणजे तिजसारिखी लवकर येऊन शत्रूला लवकर मारून टाकणारी होय. वेदांत द्युदेवाला असुर (=अत्यंत बलवान्) हें विशेषण पुष्कळ ठिकाणीं लाविलेलें आहे.

वृत्तासाठीं 'वो अमवती सुअर्वती' आणि 'असुरिएव' असें म्हटलें पाहिजे.

प्रति ष्टोभन्ति सिन्धवः पविभ्यो यदभ्रियां वाचमुदीरयन्ति ।
अव स्मयन्त विद्युतः पृथिव्यां यदी घृतं मरुतः प्रुष्णुवन्ति ॥८॥

प्रति । स्तोभन्ति । सिन्धवः । पविऽभ्यः । यत् । अभ्रियाम् । वाचम् । उत्ऽईरयन्ति ।
अव । स्मयन्त । विऽद्युतः । पृथिव्याम् । यदि । घृतम् । मरुतः । प्रुष्णुवन्ति ॥ ८ ॥

असूत पृश्निर्महते रणाय त्वेषमयासां मरुतामनीकम् ।
ते सप्सरासोऽजनयन्ताभ्वमादित्स्वधामिषिरां पर्यपश्यन् ॥ ९ ॥

असूत । पृश्निः । महते । रणाय । त्वेषम् । अयासाम् । मरुताम् । अनीकम् ।
ते । सप्सरासः । अजनयन्त । अभ्वम् । आत् । इत् । स्वधाम् । इषिराम् । परि । अपश्यन् ॥ ९ ॥

---

## भाषार्थः

८. यद् (=यदा) [मरुतः] अभ्रियां वाचम् उदीरयन्ति (=अभ्रभवं महानादं मेघभेदनेन उद्गमयन्ति) [तदानीं] सिन्धवः (=आन्तरिक्षा मेघोदकरूपेण वर्तमाना नद्यः) पविभ्यः प्रति स्तोभन्ति (=मेघभेदनसाधनभूतेभ्यो वज्रेभ्यः प्रतिनदन्ति=भयान्महानादं कृत्वा प्रतिचलन्ति)। यदि (=यदा) मरुतो घृतं प्रुष्णुवन्ति (=घृतवत्पोषकं मेघोदकं सिञ्चन्ति) [तदानीं] विद्युतः (=विद्योतमानास्तडितः) पृथिव्याम् अव स्मयन्त (=भूमाववस्मयन्ते=प्रकाशनरूपं स्मितं कृत्वा भूमौ पतन्ति) ॥

पविभ्यः मरुत्संबन्धिवज्रेभ्यः। ...... अभ्रियामभ्रभवां वाचं शब्दं स्तनितलक्षणम्। इति सायणः ॥

९. अयासां (=सततगमनशीलानां) मरुतां त्वेषं (=दीप्तम्) अनीकं (=वृन्दं=गणं) पृश्निः (=तेषाम् एतन्नाम्नी माता) महे रणाय (=महते संग्रामाय) असूत (=उत्पादयत्)। सप्सरासः (=? "समानरूपात्") ते [मरुतः] अभ्वं (=महद्=मेघोदकम्) अजनयन्त (=उदपादयन्)। आदित (=तस्मात्प्रभृत्येव) इषि-

८. जेव्हां [मरुत्] मेघनाद करितात, [तेव्हां] [अंतरिक्षांतील] नद [त्यांच्या] वज्रांपासून मागें हटून ओरडतात. जेव्हां मरुत् घृतवृष्टि करितात, [तेव्हां] विजा चकाकून खालीं भूमीवर पडतात.

8. The [ heavenly ] rivers roar back from the thunderbolts when [ the Maruts ] send up the thunder of the clouds. Down flash lightnings upon earth when the Maruts shower down the unctuous rain-water.

९. महान् संग्रामासाठीं सततगामी मरुतांच्या देदीप्यमान गणाला पृश्नि प्रसवली. [मग] एकाच रूपाचे [जे मरुत्], ते हें मोठें उदक उत्पन्न करूं लागले. त्या वेळापासूनच लोकांच्या दृष्टीस कमनीय अन्न पडूं लागलें.

9. Pris'ni brought forth the brilliant troop of the ever moving Maruts, for great fight. They of the same appearance [ then ] produced the great [ water ]. From that very time [ people ] began to see the lovely food about them.

---

८. मरुत् हे मेघवृष्टि करूं लागले म्हणजे काय काय होतें तें यांत सांगितलें आहे. ' मरुत् मेघभेद करून गडगडाट करूं लागले म्हणजे मेघोदकरूपानें ज्या महानद्या अंतरिक्षांत असतात, त्या मरुतांच्या वज्रांस भिऊन मोठ्यानें ओरडून मागें हटतात. आणि मरुतांनीं घृतासारिखें पुष्टिकारक उदक वर्षण्यास आरंभ केला म्हणजे विजा हांसत हांसत भूमीवर पडतात—म्हणजे विजांचा चकचकाट होऊन त्या जमिनीवर पडतात. '

'[अन्तरिक्षांतील] नद्या '=' सिन्धवः.' अन्तरिक्षांतील मेघोदकरूप नद्यांस ' सिन्धु ' असें नांव वेदांत आहे अशाविषयीं सू. ३५ मं. ८ आणि 'अंतरिक्ष ' यावरची तेथें दिलेली टीप पहा.

' चकाकून खालीं भूमीवर पडतात'= 'अव स्मयन्त पृथिव्याम्.' अक्षरशः 'भूमीवर खालीं हांसतात,' म्हणजे, हांसत हांसत भूमीवर खालीं येतात.

ह्या ऋचेचें वृत्त त्रिष्टुभ् आहे असें म्हणण्याची चाल आहे. पण ' पविभ्भिअः' असें ' पविभ्यः' बद्दल आणि 'पृथिव्यां'बद्दल 'पृथिव्विआम्' असें म्हटलें तर ही ऋचा मिश्र वृत्ताची होईल.

९. ' हा जो सदागामी मरुतांचा तेजःपुंज गण, त्याणें मेघाबरोबर लढून उ-

एष वः स्तोमो मरुत इयं गीर्मान्दार्यस्य मान्यस्य कारोः ।
एषा यासीष्ट तन्वे वयां विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥ १० ॥ ७ ॥

एषः । वः । स्तोमः । मरुतः । इयम् । गीः । मान्दार्यस्य । मान्यस्य । कारोः ।
आ । इषा । यासीष्ट । तन्वे । वयाम् । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ १० ॥ ७ ॥

राम् (=अन्वेषणीयां वरणीयां श्रेष्ठां ) स्वधाम् (=अन्नं सस्यादिरूपं ) परि अपश्यन् (=परितः पश्यन्ति=सर्वत्र सस्यादिरूपेणोद्यद् दृष्टवन्तः ) ॥

पृश्निर्मरुन्माता नानावर्णा । ...... । तामेवान्तरिक्षदेवतां केचिदाहुः । ...... । अनीकं समूहमेकोनपञ्चाशत्संख्याकम् । ... रणाय ... मेघजयायेत्यर्थः । ... सप्सरासः समानरूपा हिंसका वा मेघानाम् ।...इषिरां सर्वैरिष्टव्याम् । इत्यादि सायणः ॥

## भाषायाम्.

१०. हे मरुतः, मान्यस्य (=माननीयस्य=प्रशस्तस्य ) कारोः (=स्तोतुर् ) मान्दार्यस्य (=एतन्नामकस्य उपासकस्य ) एष स्तोमः (=इदं स्तोत्रम् ) इयं गीः (=इयं च वाक् स्तोत्ररूपैव ) वः (=युष्मदर्थं=युष्मदर्थं मार्पितास्ति) । [अतः कारणाद् ] [ यूयं तस्य मान्दार्यस्यार्थम् ] इषां आ यासीष्ट (=अन्नेन सह आगच्छत ) वयां (=वयमपि ) तन्वे (=आत्मार्थम् अस्माकमर्थे ) इषम् (=अन्नं ) वृजनं (=बलं ) जीरदानुं (=क्षिप्रदानं ) [ वीरं=पुत्रं च ] विद्याम (=लभेमहि ) ॥

दक भूमीवर पाडावें म्हणून त्याला पृश्नि या नांवाच्या मातेनें जन्म दिलें. ते जन्मल्यावर त्यांनीं मेघोदक मनुष्यांस मिळे असें केलें. त्या दिवसापासून उत्तम धान्यादिक अन्नें लोकांच्या दृष्टीस पडूं लागलीं, त्याच्या पूर्वीं असें अन्न नव्हतें.'

'सततगामी '=' अयासाम्.' सू. ६४ मं. ११ आणि टीप पहा.

'पृश्निः,' सू. २३ मं. १० आणि त्यावरील टीप पहा.

'एकाच रूपाचे '=' सप्सरासः.' हा शब्द कठिण आहे, आणि दुसऱ्या ठिकाणीं वेदांत आलेला नाहीं. आम्ही सायणांस अनुसरलों आहों.

'कमनीय अन्न '=' इषिरां स्वधाम्. या ऋचेचा हा चवथा चरण पुनः आलेला आहे. ऋ. १०. १५७. ५ पहा दोन्ही ठिकाणचे मंत्र ताडून पाहिल्यावर आम्हीं दिलेला अर्थ बरोबर आहे असें होतें. परंतु 'त्या दिवसापासून

१०. हे मरुतांनो, प्रशस्त कवि मान्दार्य याचें हें स्तोत्र [आणि] ही स्तुति तुम्हांला [अर्पण केली आहे]. तुम्ही [याजकरितां] अन्न घेऊन या. आणि आम्हां स्वताहालाहि अन्न, बळ आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

10. This praise, O Maruts, [and] this hymn of the venerable poet Mândârya is [offered] unto you. Come you with food [for him]. And may we also obtain for ourselves food, strength, and a son that shall quickly make us rich.

---

त्यांला (म्ह० मरुतांला) कमनीय हविरन्नाची प्राप्ति झाली' असाहि अर्थ सायणांनीं ऋ. १०. १५७. ५ यावर सुचविल्याप्रमाणें होईल.

वृत्तासाठीं 'जनयन्त अभ्वम्' असें म्हणावें.

---

१०. हा दहावा मंत्र आणि १६६ व्या सूक्ताचा १५ वा मंत्र एकच असल्यामुळें टिपांसाठीं वगैरे तो मंत्र पहा.

## सूक्तम् १६९.

अगस्त्य ऋषिः इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः । द्वितीया तु चतुष्पदा विराट् ॥

महश्चित्त्वमिन्द्र यत एतान्महश्चिदसि त्यजसो वरूता ।
स नो वेधो मरुतां चिकित्वान्सुम्ना वनुष्व तव हि प्रेष्ठा ॥१॥

महः । चित् । त्वम् । इन्द्र । यतः । एतान् । महः । चित् । असि । त्यजसः । वरूता ।
सः । नः । वेधः । मरुताम् । चिकित्वान् । सुम्ना । वनुष्व । तव । हि । प्रेष्ठा ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, यतः (=यतः कारणात्) त्वम् एतान् (=अस्मद्रूपान् उपासकान्=अस्मान्) महश्चित् महश्चित् त्यजसो (=अतिमहतोपि क्रोधाद्) वरूता असि (=रक्षन् भवसि=रक्षिता भवसि) स [त्वं] (=तस्मात् कारणात् हे इन्द्र, त्वं) हे मरुतां वेधः (=हे मरुतां प्रभो), चिकित्वान् (=ज्ञातवान्=अस्मद्विषयकज्ञानवान्) [त्वं] तव प्रेष्ठा (=तव प्रियतमानि) सुम्ना (=सुम्नानि=सुखानि=धनानि) नः (=अस्मभ्यं) वनुष्व हि (=प्रयच्छ हि) ॥

हे इन्द्र त्वं यतः कारणादेतान्मरुतो महश्चित् महतोऽपि सामर्थ्यातिशयवत्त्वात्त्वं निरपेक्षेणापि स्नेहान्न त्यजसीति शेषः । अतः कारणान्महश्चिदसि । चिदिति पादपूरणः । महतोऽपि त्यजसस्त्यागात् । यद्वैतत्क्रोधनाम । क्रोधाद्वा वरूता वरिता रक्षितासि । भवसि । यद्वा महतोऽपि त्यागाद्वृष्ट्यादिविषयाद्वारयितासि । इति सायणः ॥

## सूक्त १६९.

ऋषि–अगस्त्य. देवता–इन्द्र. वृत्त–त्रिष्टुभ्, मात्र दुसरी ऋचा चतुष्पदा विराट् आहे.

१. हे इंद्रा, ज्यापेक्षां तूं या [जनां]ला मोठ्याहि–मोठ्या कोपापासूनहि रक्षण करणारा आहेस, त्यापेक्षां हे मरुतांच्या प्रभो, ज्ञानी असा जो तूं, तो आम्हांला तुझीं अत्यंत आवडतीं जीं सुखें तीं प्राप्त करून दे.

## Hymn 169.

To *Indra*. By *Agastya*. Metre—*Trishṭubh* except in verse 2 where it is *Chatushpadâ Viráṭ*.

1. Inasmuch, O Indra, as thou art a protector of these [thy worshippers] from even great—yea from even great wrath, do thou therefore, O Lord of the Maruts,—thou who knowest—give unto us thy dearest gifts.

---

१. ‘ हे इंद्रा, कोणाहि देवाचा अथवा दुसऱ्याचा कोप झाला तर ज्यापेक्षां तूं आम्हाला त्यापासून रक्षितोस, त्यापेक्षां तूं आम्हांला जाणतच आहेस यासाठीं तुझीं जीं अत्यंत आवडीचीं सुखें तीं आम्हांस प्राप्त करून दे.’

‘ मोठ्या कोपापासूनहि ’=‘ महश्चित् त्यजसः.’ सायणांप्रमाणें हा अर्थ आहे. पाश्चात्त्य विद्वान् ‘आयुधापासून’ असा अर्थ करितात. एका ठिकाणीं (ऋ. ६. ३. १ याजवर ) जरी सायण तसा अर्थ करितात तरी तो येथें घेणें योग्य दिसत नाहीं. .

वृत्तासाठीं ‘ इन्द्र’बद्दल ‘ इन्दर,’ ‘ मरुतां ’ बद्दल ‘मरुतआं,’ आणि ‘प्रेष्ठा’ बद्दल ‘ प्रेअष्ठा ’ असें म्हणावें लागतें.

**अयुञ्जन्त इन्द्र विश्वकृष्टीर्विदानासो निष्षिधो मर्त्यत्रा ।**
**मरुतां पृत्सुतिर्हासमाना स्वर्मीळ्हस्य प्रधनस्य सातौ ॥ २ ॥**

अयुञ्जन् । ते । इन्द्र । विश्वऽकृष्टीः । विदानासः । निःऽसिधः । मर्त्यऽत्रा ।
मरुताम् । पृत्सुतिः । हासमाना । स्वःऽमीळ्हस्य । प्रऽधनस्य । सातौ ।

**अम्यक्सा त इन्द्र ऋष्टिरस्मे सनेम्यभ्वं मरुतो जुनन्ति ।**
**अग्निश्चिद्धि ष्मातसे शुशुक्वानापो न द्वीपं दधति प्रयांसि ॥ ३ ॥**

अम्यक् । सा । ते । इन्द्र । ऋष्टिः । अस्मे इति । सनेमि । अभ्वम् । मरुतः । जुनन्ति ।
अग्निः । । चित् । हि । स्म । अतसे । शुशुक्वान् । आपः । न । द्वीपम् । दधति । प्रयांसि ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे इन्द्र, विश्वकृष्टीः (=विश्वकृष्टयः=सर्वासां प्रजानां राजानो) विदानासः (=विदानाः=विद्वांसो) मर्त्यत्रा निःषिधः (=मर्त्येषु जनेषु शत्रुनिषेधकाः=शत्रुनाशका) [एतादृशस्] ते (=मरुतः) अयुञ्जन् (=आत्मानं योजितवन्तः=त्वया सह गन्तुं सिद्धा अभवन्)—हासमाना (=स्पर्धमाना) मरुतां पृत्सुतिः (=मरुतां सेना=मारुतो गणः) स्वर्मीळ्हस्य (=प्रशस्यतमं धनं लभ्यते यत्र तस्य) प्रधनस्य (=संग्रामस्य=वृत्रेण सह त्वया कर्तव्यस्य युद्धस्य) सातौ (=जये=जयाय) [अयुज्यत=सिद्धाभवत्] ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे इन्द्र, मर्त्येषु शत्रुनाशकाः मर्त्यानां प्रभवः ज्ञानवन्तः स्पर्धायुक्ताश्च एतादृशो ये मरुतस्तेषां गणः वृत्रेण सह त्वया कर्तव्ये संग्रामे जयाय सिद्धोभवदिति ॥

पूर्वमन्त्रे मरुतामिन्द्रसाहाय्यमुक्तम् । अत्रेन्द्रस्य मरुत्साहाय्यमुच्यते । हे इन्द्र ते मरुतोऽयुञ्जन् । युज्यन्ते । त्वया युक्ता भवन्तीत्यर्थः । इति सायणः ॥

३. हे इन्द्र, सा ते ऋष्टिः (=त्वत्संबन्धिनी प्रसिद्धा मेघस्य भेत्त्री शक्तिः) अस्मे (=अस्मद्धितार्थम्) अम्यक् (=परिगृह्णाति=उदकनिरोधिनं मेघं परिवेष्टयति) । मरुतः सनेमि (=पुरातनम्) अभ्वं (=महत्=उदकं) जुनन्ति (=प्रेरयन्ति)। शुशुक्वान् (=अतिशयेन दीप्तिमान्) अग्निश्चित् हि स्म अतसे (=अग्निरेव शुष्ककाष्ठेषु=ज्वलनमो-

२. हे इंद्रा, सर्व जनांचे राजे [ आणि ] मर्त्य लोकांमध्यें शत्रुनाशक [असे जे] ते ज्ञानी [मरुत्], [ ते ] सिद्ध झाले आहेत—उत्तम धन मिळण्याच्या युद्धांत जय मिळावा म्हणून मरुतांची सेना स्पर्धायुक्त होत्साती [ सिद्ध झाली आहे ].

३. हे इंद्रा, ती [ जी] तुझी शक्ति [ ती ] आम्हांसाठीं वळसा घालिते. पुरातन [ आणि ] महान् [ असें जें तें मेघोदक, तें ] मरुत् हाकून आणितात. जसा काय प्रदीप्त अग्निच शुष्क काष्ठांवर [ पडतो ], [ अथवा ] जशीं बेटाला उदकें [ वेष्टून राहतात ] ! [ मग उपासक ] हविरन्नें अर्पण करूं लागतात.

2. Those destroyers of enemies among mortals, the knowing lords of all men have become ready, O Indra;— the defiant force of the Maruts [ has become ready ] for victory of the battle that shall give excellent wealth.

3. That thunderbolt of thine, O Indra, surrounds [ the enemy ] for our sake. The Maruts impel the ancient [ and ] great [rain-water ]. As if burning Agni himself [ were ] among dry woods, [ or ] as if the waters surrounded an island ! Worshippers then offer oblations.

---

२. ‘ हे इंद्रा, सकळ जनांचे प्रभु, ज्ञानी, आणि मर्त्य लोकांमध्यें शत्रुनाशाविषयीं प्रसिद्ध, आणि लढाई करण्याविषयीं उत्सुक होऊन स्पर्धा करणारे असे जे मरुत्, त्यांचा गण धनदायक युद्धांत तुला साहाय्य करण्यासाठीं तयार झाला आहे पहा.’ असा भावार्थ आहे.

‘ शत्रुनाशक ’=‘ निःषिधः.’ हा शब्द वेदांत जरी दुसरे ठिकाणीं आलेला आहे, तरी याचा अर्थ करणें कठिण आहे. पाश्चात्य विद्वान् हा पहिला चरण मरुतांकडे न लावितां ‘ निःषिधः’ म्हणजे देणगी, दान असा अर्थ करून त्याप्रमाणें निर्वाह करितात; पण जेथें जेथें ‘ निःषिध् ’ शब्द स्वतंत्र अथवा समासस्थ आला आहे, ते मंत्र काढून पाहतां हा अर्थ साधार दिसत नाहीं. ऋ. १. १०. ५ यांत ‘ पुरुनिःषिधः’ असें आलें आहे, त्यावरून बहुतकरून ‘ निःषिध् ’ म्हणजे देणगी असें पाश्चात्य कल्पीत असतील.

‘ युद्धांत ’=‘ प्रधने.’ म्हणजे युद्धाव-

त्वं तू न॑ इन्द्र॒ तं र॒यिं दा॒ ओजि॑ष्ठया॒ दक्षि॑णयेव रा॒तिम् ।
स्तुत॑श्च॒ यास्ते॑ च॒कन॑न्त वा॒योः स्तनं॒ न मध्वः॑ पीपयन्त॒ वाजैः॑ ॥ ४

त्वम् । तु । नः॒ । इ॒न्द्र॒ । तम् । र॒यिम् । दा॒ः । ओजि॑ष्ठया । दक्षि॑ण-याऽइव । रा॒तिम् ।
स्तुतः॑ । च॒ । याः । ते॒ । च॒कन॑न्त । वा॒योः । स्तन॑म् । न । मध्वः॑ । पी॒प॒य॒न्त॒ । वाजैः॑ ॥ ४ ॥

भिः शुष्ककाष्ठेषु यथा=ज्वलन्तमोभिः शुष्काणि काष्ठानि यथा परिवेष्टयति तथा ) [ अथवा ] आपो द्वीपं न (=उदकानि द्वीपं यथा परिवेष्टयन्ति तथा ) [ ऋष्टिरम्यक् ] । [ तदनन्तरं जनाः] प्रयांसि (=हविरन्नानि) दधति (=ददति=तुभ्यम् इन्द्राय प्रार्पयन्ति ) ॥

इदमुक्तमत्र । हे इन्द्र अस्मद्धितार्थे तव वज्रस्तव सहाया मरुतश्च मेघस्य भेदनाय तमभिगच्छन्ति तं च शुष्ककाष्ठान्यग्निरिव द्वीपं वा जलानीव परिवेष्टयन्ति । तदनन्तरं मेघोदकानि भूमौ पतन्ति । तदानीं सर्वे जना हवींषि प्राप्यं त्वाम् उपासत इति ॥

## भाषायाम्.

४. हे इन्द्र, त्वं तु (=त्वं क्षिप्रं) नः (=अस्मभ्यं) तं रयिं दाः (=तद् वक्ष्यमाणं धनं देहि ) ओजिष्ठया दक्षिणया रातिम् इव (=अतिशयेन प्रबलया गवा धनमिव= अतिशयेन बलवती गौर्यथा पयोरूपं धनं ददाति तथा धनं देहि ) । ते वायोः याः स्तुतः चकनन्त (=ते वायोर्यदर्थं स्तुतश्चकनन्त=यस्य धनस्यार्थे ते त्वां त्वत्सहायभूतं वायुं च अस्माभिः कृताः स्तुतयः कामयन्ते=प्रेम्णा गायन्ति ) [यस्य धनस्यार्थे च ] मध्वः स्तनं न (=मधुरस्य पयसोर्थे गोरूधो यथाप्याययन्ति तथा ) [ त्वां ] वाजैः पीपयन्त (=त्वां हविरन्नैः पीनं कुर्वन्ति अस्माकमृत्विजः ) ॥

दूरान्वयैषा । भावगतं तु भात्येवम् । हे इन्द्र, यद्धनार्थं वयं त्वां वायुं च तव सहायं स्तोत्रैः कामयामहे यद्धनार्थं च त्वां गोरूध इवान्नैः पोषयामस्तादृशं धनं सा पुष्टोध्नी गौर्यथा पयोरूपं धनं ददाति तथा त्वमस्मभ्यं क्षिप्रं देहीति ॥

वायोर्धौतयुवक्षेपिष्ठस्य शीघ्रवरप्रदस्य ते ॥ कर्मणि षष्ठी ॥ वायुं त्वाम् ...... इत्यादि सायणः ॥

रोवर इंद्र जी लढाई पाण्यासाठीं करितो तींत. 'उत्तम धन ' जें येथें सांगि- | तलें आहे, तें मेघोदकरूपी होय. कारण इंद्र वृत्रावरोवर त्यासाठींच लढत असतो.

४. हे इंद्रा, ज्या तुला [आणि] वायूला स्तुति सेवितात, [आणि ज्या तुला], मधुर [दुधा]साठीं [गाईच्या] कासेला अन्नांच्या योगानें [पुष्ट केल्या]प्रमाणें, हविरन्नांनीं पुष्ट करितात, तो तूं आम्हांला सत्वर धन दे, मोठी भव्य गाय [दूध देते त्या]प्रमाणें देणगी [दे].

4. Quickly give us thou, O Indra, wealth—[give] food like a splendid cow, thou whom in company with Vâyu [our] praises have loved [and whom our priests] have nourished with offerings as [they nourish] the [cow's] udder with food.

यांतहि वृत्रासाठीं 'इन्दर' म्हणावें, आणि 'मर्तिअत्रा,' 'मरुतआं' आणि 'सुअर्माह्रुस' असें वाचावें.

३. 'हे इंद्रा, आम्हांला मेघोदक मिळावें म्हणून तुझें वज्र आणि तुझे मित्र मरुत् हे मेघावर धांवून जाऊन त्याला, सुकलेल्या लांकडांला अग्नि वेष्टितो त्याप्रमाणें, अथवा बेटाला उदकें वेष्टितात त्याप्रमाणें, वेढून त्याजकडून वृष्टि करवितात. मग उपासक जन तुला हविरन्नादिक अर्पण करून भजूं लागतात.'

'वळसा घालिते'=' अभ्यक्.' हा अर्थ ऋ. ६. ११. ५ याजवरील सायणभाष्यास अनुसरून आम्हीं केला आहे.

'हाकून आणितात'=' जुनन्ति.' येथें 'अभ्वं जुनन्ति' म्हणजे मेघोदकाला अथवा मेघाला हाकून आणितात असाच अर्थ आहे याविषयीं ऋ. ५. ५८.३ यांत 'वृष्टिं जुनन्ति' असें सांगितलें आहे त्यावरून प्रमाण सांपडतें.

'शुष्क काष्ठांवर'=' अतसे.' 'अतस' शब्द जेथें आला आहे ते दुसरे मंत्र पाहून हा अर्थ येथें आम्हीं केला आहे.

यांतहि 'इन्द्र' बद्दल 'इन्दर' म्हणावें. शिवाय 'सनेमि अभ्वं' आणि 'स्म अतसे' असें संधिविरहित वाचावें.

४. 'हे इंद्रा, तुला आणि तुजबरोबर असलेल्या वायूला आम्हीं प्रेमानें स्तोत्रें अर्पिलीं आहेत, आणि एकाद्या भव्य गाईची कास जशी आंबोण वगैरे घालून पुष्ट करावी तसा तुला आमच्या ऋत्विजांनीं हविरन्नें देऊन पुष्ट केलें आहे. तें तूं आम्हांस धन द्यावें म्हणून केलें आहे; तर तूं आम्हांला सत्वर धन दे' असा या कठिण मंत्राचा अभिप्राय आहे.

'ज्या तुला आणि वायूला स्तुति सेवितात'='स्तुतश्च यास्ते चकनन्त वायोः.' अक्षरशः 'ज्या स्तुति तुला आणि वायूला सेवितात.'

त्वे राय॑ इन्द्र तो॒शत॑मा॒: प्र॒णे॒तार॒: कस्य॑ चिदृता॒योः ।
ते षु णो॑ म॒रुतो॑ मृळयन्तु॒ ये स्मा॑ पु॒रा गा॑तू॒यन्ती॑व दे॒वाः॥५॥८

त्वे इति॑ । राय॑: । इ॒न्द्र॒ । तो॒श॒ऽत॑माः । प्र॒ऽने॒तार॑: । कस्य॑ । चि॒त् । ऋ॒त॒ऽयोः ।

ते । सु । नः॒ । म॒रुत॑: । मृ॒ळ॒य॒न्तु॒ । ये । स्म॒ । पु॒रा । गा॒तु॒यन्ति॑ऽइव । दे॒वाः ॥ ५ ॥ ८ ॥

## भाषायाम्.

५. हे इन्द्र, कस्य चिद् ऋतायोः (=यस्य कस्यापि यजनेच्छोरुपासकस्य) प्रणेतारः (=निर्वोढारः=निर्वाहकास्) तोशतमा रायः (=शत्रुघातका रायः=विजयीनि धनानि) त्वे (=त्वय्येव=तव समीप एव) [भवन्ति]। ये देवाः (=द्योतनशीला) [मरुतः] पुरा गातुयन्तीव स्म (=पुरतो यज्ञं गन्तुं मार्गम् इच्छन्त इव आचरन्ति) ते मरुतो नः सु मृळयन्तु (=अस्मभ्यं सुष्ठु अनुकूला भवन्तु=अस्मान् भृशं सुखयन्तु)॥

हे इन्द्र, शत्रुहननबलयुक्ताः सर्वेषां चोपासकानां सुखयित्र्यः संपदस्तव समीप एव भवन्ति तास्त्वमस्मभ्यं देहि ये च दीप्ता मरुतः पुरोगामिनः सेवका इव त्वाम् उपतिष्ठन्ति तेपि अस्मान् सुखयन्त्विति भावः ॥

'मधुर [दुधा]साठीं'='मध्वः.' ही एक या मंत्रांत अडचण आहे. सायणांस अनुसरून भाषांतर केलें आहे, कारण दुसरा निर्वाह दिसत नाहीं.

वायूचा संबंध इंद्राशीं नित्य येत असतो. म्हणून येथें वायूविषयीं निर्देश आहे.

वृत्तासाठीं 'तुअं तु न इन्दर' असें म्हणावें.

५. हे इंद्रा, कोणत्याहि यजनेच्छूचें कल्याण करणाऱ्या [अशा ज्या] अत्यंत विजयी संपत्ति [त्या] तुझ्याच जवळ [आहेत]. [आणि] जे देदीप्यमान मरुत् [ तुज ] पुढें जाण्याची जणुं इच्छा करितात, ते आम्हांवर मोठी कृपा करोत.

5. With thee alone, O Indra, [ are ] the most victorious riches such as prosper any pious man. May those brilliant Maruts who, as it were, wish to go ahead graciously favour us.

५. 'हे इंद्रा, ज्या संपदा तुझ्या कोणत्याहि उपासकाला प्राप्त होऊं शकतात, आणि ज्या प्राप्त झाल्यानें शत्रूंचा नाश करण्याचें सामर्थ्य येतें, त्या तुझ्या एकाच्या हातीं आहेत; तर त्या तूं आम्हांस प्राप्त करून दे. आणि तुझ्या पुढें धांवणारे जे देदीप्यमान मरुत्, तेहि आमचें कल्याण करोत.'

'पुढें जाण्याची जणुं इच्छा करितात' = 'गातुयन्तीव.' म्हणजे तूं यज्ञास येण्याला निघालास म्हणजे स्वाराप्रमाणेंच जणुं तुझ्या पुढें धांवत असतात.

'अत्यंत विजयी' = 'तोशतमाः.' हा शब्द कठीण आहे. तो ऋग्वेदांत आणखी एकच वेळ आला आहे. दोनहि ठिकाणचें सायणभाष्य पाहून अर्थ केला आहे.

वृत्तासाठीं 'तुए राये इन्दर,' 'प्रणइतारः' आणि 'तए षु' असें म्हणावें.

प्रति प्र याहीन्द्र मीळ्हुषो नॄन्महः पार्थिवे सदने यतस्व ।
अध यदेषां पृथुबुध्नास एतास्तीर्थे नार्यः पौंस्यानि तस्थुः ॥ ६ ॥

प्रति । प्र । याहि । इन्द्र । मीळ्हुषः । नॄन् । महः । पार्थिवे । सद-
ने । यतस्व ।
अध । यत् । एषाम् । पृथुऽबुध्नासः । एताः । तीर्थे । न । अर्यः ।
पौंस्यानि । तस्थुः ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. हे इन्द्र, मीळ्हुषः (=उदारान्) महः (=महतो) नॄन् (=शूरभूतान्) [मरु-तः] प्रति प्र याहि (=तान् प्रति गच्छ=तान् उपेहि) [तथा कृत्वा च] पार्थिवे सदने (=पृथिवीसंबन्धिनि, स्थले=पृथिव्यां) यतस्व (=प्रयत्नं कुरु=स्वपराक्रमं मेघभेदनरूपं दर्शय) अध यत् (=यस्मात् कारणात् खलु) एषां (=पुरोवर्तिनां) [मरुतां] पृथुबुध्नासः (=पृथुबुध्नाः=बृहन्मूलाः=बृहज्जघना) एताः (=विचित्र-वर्णा हरिणाः=विचित्रवर्णहरिणरूपा अश्वा) अर्यः पौंस्यानि तीर्थे न (=स्वामिनः कस्यचिद्रणोद्युक्तस्य बलानि सैन्यानि यथा संग्रामजिगमिषूणि सन्ति राजवीथ्यां ति-ष्ठन्ति तद्वत्) तस्थुः (=तिष्ठन्ति=त्वया सह गन्तुमुद्यताः सन्ति) ॥

तीर्थे नेत्यादौ अर्योरेः शत्रोः पौंस्यानि तीर्थे न युद्धमार्ग इव तस्थुः तिष्ठन्ति । मेघा-नाक्रमन्ते । यद्वा......। अर्योरणीयस्य स्वामिनः पौंस्यानि बलानि तीर्थे न । राजवी-थ्यां तिष्ठन्ति तद्वत् । इति सायणः ॥

६. हे इंद्रा, [ हे जे ] उदार [ आणि ] महान् [ आणि ] शूर [ मरुत् ], त्यांस तूं येऊन मिळ, [ आणि ] पृथिवीवरील प्रदेशांवर [ आपला ] पराक्रम कर; कां कीं राजाचीं सैन्यें [तयार होऊन] राजमार्गांत [उभीं राहिल्यीं]प्रमाणें या [ मरुतां]चे स्थूलजघन हरिण तयार होऊन उभे राहिले आहेत.

6. Come forth, O Indra, to join the bounteous [ and ] great heroes, [and] show [ thy ] valour on mundane regions; for their large-bottomed deer of variegated colours are standing ready even as the forces of a ruler on the royal road.

---

६. 'हे इंद्रा, हे पहा उदार, माठ आणि शूर मरुत् आणि त्यांचे जे मोठ्या टिरीचे हरिण ते तुजबरोबर लढाईला जाण्यास तयार होऊन राहिले आहेत; तर तूं पुढें येऊन त्यांस मिळ आणि त्यांच्या साहाय्यानें वृत्राबरोबर युद्ध करून वृष्टीच्या रूपानें आपला पराक्रम या भूलोकीं दावीव.'

'उदार, महान् [ आणि ] शूर '= 'मीढ्रुषः महो नृन्.' हीं विशेषणें मरुत्कृत जें मेघविदारण आणि तज्जनित उदार मेघोदकवृष्टि, त्यांस अनुलक्षून दिलेलीं आहेत.

'राजाची सैन्यें [ तयार होऊन] राजमार्गांत [उभी राहिल्या]प्रमाणें'='तीर्थे न अर्यः पौंस्यानि.' 'अरि' म्हणजे 'लढाईस जाणारा;' त्यावरूनच 'शत्रु' हा अर्थ मागाहून निघाला असावा. 'तीर्थ'-शब्दाचा दुसरा अर्थ येथें चांगला संभवत नाहीं. 'पौंस' म्हणजे सैन्य असा जो अर्थ आम्हीं कितीएक पाश्चात्यांस अनुसरून केला आहे, त्याला प्रयोगान्तराचा आधार दिसत नाहीं. पण बलवाचक जे शब्द ते सेनावाचक होतात याचीं उदाहरणें संस्कृतांत जशीं तशीं इंग्रजींतहि आहेत.

'हरिण'=' एताः.' म्हणजे चित्रविचित्र रंगांचे जे हरिण मरुतांच्या रथांला जोडिलेले असतात ते. मरुत् आपल्या रथांस हरिण जोडितात याविषयीं सू. १६५ मं. ५ आणि टीप पहा.

वृत्तासाठीं 'याहि इन्द्र' आणि 'न-अर्यः पौंसिआनि' असें म्हणावें लागतें.

तिसऱ्या चरणांत एक अक्षर अधिक आहे. यासाठीं "पृथुबुध्नासःएताः" याचा "पृथुबुध्नास एताः" असा एकवार संधि-करून पुनरपि "पृथुबुध्नासैताः" असा संधि वृत्त सुखाकरितां करावा लागतो. आलीकडल्या संस्कृतांतहि "सः एषः" याजबद्दल "सैषः" असा संधिपौनःपुन्यघटित प्रयोग क्वचित् सांपडतो. उदा॰ "सैष राजा दशरथः सैष राजा युधिष्ठिरः".

**प्रति घोराणामेतानामयासां मरुतां शृण्व आयतामुपब्दिः ।**
**ये मर्त्यं पृतनायन्तमूमैर्ऋणावानं न पतयन्त सर्गैः ॥ ७ ॥**

प्रति । घोराणाम् । एतानाम् । अयासाम् । मरुताम् । शृण्वे । आऽ-
यताम् । उपब्दिः ।
ये । मर्त्यम् । पृतनाऽयन्तम् । ऊमैः । ऋणऽवानम् । न । पतयन्त ।
सर्गैः ॥ ७ ॥

## भाषायाम्.

७. घोराणां (=भयानकानाम्) अयासां (=सततगमनशीलानाम्) एतानाम् (=एतवर्णानां मरुद्धरिणानाम्) [अपि च] मरुताम् आयताम् (=आगच्छताम्=आगच्छतां मरुतां तेषाम् एतवर्णानां हरिणानां च) उपब्दिः (=ध्वनिः) प्रति शृण्वे (=प्रति श्रूयते) [मयात्र]। ये [मरुतः] मर्त्यं (=मरणधर्माणं) पृतनायन्तं (=पृतनामात्मन इच्छन्तं=संग्राममेच्छुं=शत्रुं मेघरूपम्) ऋणवानं न (=ऋणवन्तमिव=अधमर्णमिव) ऊमैः सर्गैः पतयन्त (=स्वरक्षकैः प्रहारविशेषैः पातयन्ति=प्रहर्तृशस्त्रद्वितीयाः सन्तः पातयन्ति=तं मेघं भूमौ वृष्टिद्वारा पातयन्ति तस्मिन्पातने च प्रहारास्त्राणां साहाय्यात् अन्येन सहायेन युक्ता न भवन्ति) ॥

पातने दृष्टान्तः। सर्गैर्ऋणवानं न। ...... । ऋणवन्तमधमर्णमिव। तं यथा पीडयित्वा तदीयं धनमपहरन्ति तद्वत्। इति सम्यगाह सायणः ॥

७. [हे जे] भयानक [आणि] चपळ [असे] [मरुतांचे] चित्रविचित्र रंगांचे हरिण [आणि] [हे जे] मरुत्, ते येत आहेत त्यांचा आवाज ऐकूं येत आहे. जे [मरुत्] मर्त्य वैऱ्याला शस्त्रप्रहारांचें साहाय्य घेऊन, ऋणकऱ्याला [पाडिल्या]प्रमाणें, पाडून टाकितात.

7. The sound is heard of the awful [and] vehement speckled deer, [and] of the Maruts, as they come; [the Maruts] who by the aid of [their] missiles throw down the mortal foe (the cloud) like a debtor.

---

७. 'हे इंद्रा, मरुतांचे चित्रविचित्र रंगांचे जे हरिण रथाला जोडिलेले, ते रथ घडघड ओढीत आहेत आणि त्या रथांत बसून मरुत् येत आहेत, त्यांचा आवाज मला जवळच जणुं ऐकूं येत आहे; जे मरुत् केवळ आपल्या शस्त्राचें साहाय्य घेऊन मेघरूप शत्रूला जमीनदोस्त करून टाकीत असतात.'

'त्यांचा आवाज ऐकूं येत आहे'= 'उपब्दिः शृण्वे.' मरुत् येऊं लागले म्हणजे त्यांच्या येण्याचा आवाज अगदींच जवळ ऐकूं येतो अशाविषयीं सू. ३७ मं. ३ आणि टीप पाहा.

'मर्त्य वैऱ्याला'='मर्त्यं पृतनायन्तम्.' येथें मर्त्य वैरी म्हणजे मेघ समजावयाचा, परंतु सायणाच्या पाक्षिक अर्थाप्रमाणें मर्त्य शत्रु म्हणजे मानवी शत्रु असाहि अर्थ होऊं शकेल.

यांत ऋणकऱ्याला पाडिल्याप्रमाणें अशी जी उपमा दिली आहे, तिचें तात्पर्य सायणांप्रमाणें, देणेंकऱ्याला मारून त्याचें सर्वस्व जसें हरण करितात त्याप्रमाणें मेघाला खालीं पाडून उदकरूप त्याचें सर्वस्व काढून घेतात असें संभवतें.

वृत्तासाठीं 'मर्त्य'च्या बद्दल 'मर्तिअं' असें वाचलें पाहिजे.

त्वं मानेभ्य इन्द्र विश्वजन्या रदा मरुद्भिः शुरुधो गोअग्राः ।
स्तवानेभिः स्तवसे देव देवैर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥८॥९॥

त्वम् । मानेभ्यः । इन्द्र । विश्वऽजन्या । रद । मरुत्ऽभिः । शुरुधः ।
गोऽअग्राः ।
स्तवानेभिः । स्तवसे । देव । देवैः । विद्याम । इषम् । वृजनम् । जी-
रऽदानुम् ॥ ८ ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. हे इन्द्र, मरुद्भिस्त्वं (=मरुद्भिः सहितस्त्वं) मानेभ्यः (=मानस्य नाम पुरु-षस्य पुत्रेभ्योस्मभ्यं) विश्वजन्या (=? विश्वजन्याः=सर्वहिता) गोअग्राः (=गावोग्रे यासां ताः=गोवृद्धिविहिताः=गोवृद्धिकारकाः) शुरुधः (=अपः) रद (=मेघाद्वि-लिख=प्रयच्छ)। हे देव (=द्योतमानेन्द्र), [त्वं] स्तवानेभिर्देवैः (=स्तूयमानै-र्देवैः=स्तुतैर्देवैः=द्योतमानैर्मरुद्भिः) स्तवसे (=स्तूयसे)। [वयम्] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

विश्वजन्या विश्वजन्यः ॥ सोराकारः ॥ विश्वे प्राणिन उत्पादनीया यस्य तादृ-शस्त्वं सर्वजनहितशक्त्या वा । इति सायणाचार्याः ॥

८. हे इंद्रा, मरुतांसहित तूं मानाच्या पुत्रांला सर्व हितकारी [ आणि ] जेणेंकरून गाईंची समृद्धि होते अशीं उदकें दे. हे देदीप्यमान [ इन्द्रा ], स्तविलेले जे देदीप्यमान [ मरुत् ] त्यांहीं तूं स्तविला [ जातोस ]. आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र यांची प्राप्ति होओ.

8. Give, O Indra, thou [accompanied] by the Maruts, to the sons of Mâna the waters which benefit the world [ and ] which prosper the cows. O thou resplendent one, thou art praised by the resplendent [ Maruts ] that are [themselves ] praised. May we obtain food, strength, [and] a son that shall quickly make us rich.

---

८. 'हे इंद्रा, याप्रमाणें आम्हीं मानकुळांत जन्मलेल्या उपासकांनीं तुझी स्तुति केली आहे; तर ज्या मेघोदकांच्या योगेंकरून सर्व जगाला सुख होतें आणि गाईंची समृद्धि होते, तीं तूं मरुतांसहित प्रसन्न होऊन आम्हांस दे. ज्यांची स्तुति लोक करितात असे मरुत्हि तुझी स्तुति करितात. तर जेणेंकरून अन्न, बळ आणि विजयी पुत्र आम्हांला मिळेल असें कर.' येथें सूक्ताचा उपसंहार झाला.

'मानाच्या पुत्रांला'=' मानेभ्यः.' हा अर्थ सायणांनीं दिलेला नाहीं. पण पुष्कळ मंत्रांत ' मान ' हें पद अगस्त्याचा किंवा अगस्त्यापत्यांचा मूळ पुरुष या अर्थी आलेलें आढळतें. तेथें तेथें सायणांनीं दुसऱ्याच कांहीं प्रकारांनीं निर्वाह केलेला आहे. परंतु ऋ. ८. ६७ याचा जो कर्ता त्याचें आडनांव ' मान्य ' असें सायणांनींच अनुक्रमणिकेवरून सांगितलें आहे; त्यावरून ' मान ' हें विशेषनाम सिद्ध होतें.

' उदकें '=' शुरुधः.' म्हणजे मेघोदकें. ऋ. ४. १९. ८ याजवरील भाष्यांत सायणांनीं ' आपः ' असा अर्थ केला आहे तो पहा.

वृत्तासाठीं ' त्वं ' बद्दल ' तुअं ' असें म्हणावें.

## सूक्तम् १७०.

इन्द्रागस्त्ययोः संवादः। आद्या तृतीया चेन्द्रवाक्यम्। चतुर्थी च। शिष्टमगस्त्यवाक्यम्॥
आद्या बृहती। द्वितीयाद्यास्तिस्रोनुष्टुभः। अन्त्या त्रिष्टुप्॥ तथा हि सायणः। सूक्तस्येन्द्रागस्त्यसंवादरूपत्वादाद्या तृतीया चतुर्थी चेन्द्रवाक्यम्। अतस्तासां तस्य वाक्यन्यायेन स ऋषिः। शिष्टे अगस्त्यवाक्ये। अतस्तयोः स एवर्षिः। आद्या च बृहती ततस्तिस्रोनुष्टुभः। अन्त्या ... त्रिष्टुप्। इत्यादि॥

**न नूनमस्ति नो श्वः कस्तद्वेद यदद्भुतम्।**
**अन्यस्य चित्तमभि संचरेण्यमुताधीतं वि नश्यति॥ १॥**

न। नूनम्। अस्ति। नो इति। श्वः। कः। तत्। वेद। यत्। अद्भुतम्।
अन्यस्य। चित्तम्। अभि। सम्ऽचरेण्यम्। उत। आऽधीतम्। वि। नश्यति॥ १॥

---

### भाषायाम्.

१. न नूनम् अस्ति (=अस्माकम् अद्येति नास्ति) नो श्वः (=नापि श्व इति वर्ततेस्माकम्)। यद् अद्भुतं (=यदभूतं=भविष्यत्) तत् को वेद (=तत्को जानाति)? अभि संचरेण्यम् (=? अभितः संचारि) अन्यस्य चित्तं (=मनो) [जानाति]। उत (=अपि च) आधीतं (=यच्चिन्तितं तद्) वि नश्यति (=नष्टं भवति)॥

इत्यक्षरार्थः। सायणो हि एवं व्याचष्टे। परिदेवनप्रकारः प्रतिपाद्यते। इन्द्र आह। अद्यतनं यदस्ति तन्नूनमद्य नास्ति नूनमत्र विचिकित्सार्थे। अत्राद्येति यद्यपि नास्ति तथाप्युत्तरवाक्ये श्व इति दर्शनादत्राद्येति गम्यते। तथा श्वोऽपि नूनं नो। उशब्दोऽवधारणे। श्वस्तनमपि नैव नास्ति। अद्य यथास्मदर्थंनिरूप्यमस्मभ्यं नास्ति किल श्वः कथं लप्स्यत इति भावः। यदद्भुतमन्यस्मै निरूप्यान्यस्मै दत्तमिति यदस्ति वैपरीत्यं तत्को वेद। यद्वा यदद्भुतं भावि कार्यं यदस्ति तत्को वेद। अद्य श्वो वा लभ्यत इत्याद्या न कार्येत्युक्तं भवति। तदेवाह। अभिसंचरेण्यं सर्वतः संचार्यमन्यस्य चित्तं मानसम्। जानातीति शेषः। उत अपि च आधीतमाध्यातं चिन्तितमपि [illegible] किमु सकृत्स्मृतं नश्यतीति॥

## सूक्त १७०.

ऋषि–अगस्त्य. देवता–इन्द्र. वृत्त–१ली बृहती, २–४ अनुष्टुभ्, ५ त्रिष्टुभ्.

१. [ आम्हांला ] आतां नाहीं [ आणि ] उद्यांहि नाहीं. जें भविष्य [ होय ] तें कोण जाणतो? दुसऱ्याचें ओढाळ मन [जाणतें], आणि चिंतिलेलेंहि नाहींसें होतें.

## Hymn 170.

To *Indra*. By *Agastya*. Metre—verse 1, *Bṛihatî*; verses 2-4 *Anushṭubh*, and verse 5, *Trishṭubh*.

1. [ To us ] there is neither to-day nor to-morrow. Who knows that which [ is ] future? The wandering mind of another [knows]; and that vanishes which [ is ] expected.

---

१. हें सूक्त चमत्कारिक आहे. अशी कथा आहे कीं, अगस्त्य ऋषीनें हवि ( मांसादिक जें अर्पण करावयाचें अन्न तें ) सिद्ध करून इंद्रास द्यावयाचें तें मरुतांस दिलें. त्यामुळें इंद्र कोपला. तेव्हां ह्या सूक्तांत असलेला जो संवाद तो इंद्र आणि अगस्त्य यांजमध्यें झाला. त्याप्रमाणेंच या सूक्तांतील २–५ ऋचांचा अर्थ करावयाचा आहे असें दिसतें खरें. पहिल्या ऋचेविषयीं मात्र संशय दिसतो. तिचा संबंध या सूक्ताशीं आहे कीं नाहीं याविषयीं शंका घेण्यास जागा आहे. या सूक्ताशीं तिचा संबंध आहे असें मानिलें तर सायणादिकांप्रमाणें ती इंद्रवाक्य होय. आणि तिचा अभिप्राय असा कीं, 'मला इंद्राला आजहि हवि नाहीं आणि उद्यांहि नाहीं; त्यापुढचें कोणी पाहिलें आहे? आणि अगस्त्य जो हवि देणारा, त्याचें जें चंचल मन ( चंचल असें कीं मला देण्यासाठीं तयार केलेले हवि मला न देतां मरुतांस दिलें), त्यालाच पुढें मला हवि मिळेल कीं नाहीं तें ठाऊक आहे. कारण, आज मला खास हवि मिळेल अशी अपेक्षा असतांहि तें एकाएकीं नाहींसें झालें.' जर ह्या ऋचेचा ह्या सूक्ताशीं कांहीं संबंध नाहीं आणि ही ह्यांत उगीच जोडिली गेली आहे असें समजलें, तर या क्षणभंगुर संसाराविषयीं शोक करणारा कोणीएक म्हणतो कीं, 'जें आपण आज आणि उद्यां पाहातों तें सर्व क्षणिक आहे. त्यापुढचें जें भविष्य त्याविषयीं तर विचारावयासच नको. तें जाणण्याविषयीं एखाद्या देवास सामर्थ्य असेल आणि त्याचें मन जर आम्हांस समजेल तर आम्हांलाहि अवगत होईल. परंतु आपल्या मनांत आपण चिंतिलेलें सुद्धा नाहींसें होतें, मग दुसऱ्याच्या ( देवादिकांच्या ) मनांत काय आहे तें कसें समजेल?'

वृत्तासाठीं 'स्वः' बद्दल 'सुअः' असें आणि 'संचरेण्यं' बद्दल 'संचरेणिअं' असें वाचावें.

किं न इन्द्र जिघांससि भ्रातरो मरुतस्तव ।
तेभिः कल्पस्व साधुया मा नः समरणे वधीः ॥ २ ॥
किम् । नः । इन्द्र । जिघांससि । भ्रातरः । मरुतः । तव ।
तेभिः । कल्पस्व । साधुऽया । मा । नः । सम्ऽअरणे । वधीः ॥२॥

---

वस्तुतस्तु इन्द्रागस्त्यसंवादरूपेण सूक्तशेषेण मन्त्रस्यास्य परमार्थतः संबन्ध एव न स्यात् स्याद्वा । असंबन्धपक्षे कश्चित् क्षणभङ्गुरे संसारे शोकमना ब्रूते । अद्य श्वो वा यद्विद्यमानं प्रत्यक्षं वस्तुजातं तत् क्षणेन विनश्यति । श्वस्तनदिनात् परं किं भविष्यतीति को वेद । तज्ज्ञानार्थम् अन्यस्य भविष्यविदो देवस्य कस्यचिन्मनोभि संचरेण्यं ज्ञानार्थमुप गमनीयम् । अन्यचित्तज्ञानप्रयत्नस्तु अनर्थक एव यद्यत्कल्पनाबलान्मनसि गृह्यते तस्य क्षिप्रविनाशित्वात् ॥

अगस्त्य इन्द्राय हविर्निरूप्य मरुद्भ्यः संप्रदित्सां चकार । स इन्द्र एत्य परिदेवयांचक्रे इत्यत्र निरुक्तमनुसंधेयम् ॥

---

## भाषायाम्.

अगस्त्यवाक्यम् ।

२. हे इन्द्र, नः किं जिघांससि (=अस्मान् किमर्थं हन्तुमिच्छसि)? मरुतो [हि] तव भ्रातरः (=बन्धवः) [सन्ति] । तेभिः (=तैर्मरुद्भिः सह) साधुया (=साधु यथा तथा=सौमनस्येन) कल्पस्व (=चिन्तय) । मा नः समरणे वधीः (=अस्मान् संग्रामे मा हिंसीः) ॥

सायणस्तु इदमगस्त्यवाक्यम् । ...... अस्मान् अनपराधिनः ...... किं ...... हन्तुमिच्छसि । कथमवध्यत्वमिति अत आह । मरुतस्तव भ्रातरः । त्वया भोगप्रदानेन भरणीया इत्यर्थः । अतो वयमवध्या इत्युक्तं भवति । ...... सन्तु भ्रातरस्ततश्च किमित्यत आह । तेभिस्तैर्मरुद्भिः सह साधुया साधुत्वं कल्पस्व । कल्पय हविर्भागं तैः सह युद्धं वा । नोऽस्मान् समरणे संग्रामे मा वधीः मा हिंसीः । यथा लुप्तो दृष्टान्तः । संग्रामे यथा विरोधिनं हंसि तथास्मानिति । इति ॥

२. हे इंद्रा; [ तूं ] आम्हांला कां मारूं इच्छितोस? मरुत् तुझे बन्धु [ होत ]. त्यांशीं तूं सौमनस्यानें राहा. [ तूं ] आम्हांला युद्धांत मारूं नको.

2. Why dost thou, O Indra, desire to kill us? The Maruts are thy brothers. Think kindly of them. Do not kill us in battle.

---

२. मरुतांला हवि दिलें म्हणून इंद्र कोपला असें पाहून अगस्त्य म्हणतो, 'हे इंद्रा, ज्या मरुतांस आम्हीं हवि दिलें ते तुझेच बंधु आहेत आणि त्यांजबरोबर तूं स्नेहभावानें राहावें हें योग्य आहे; तर तूं समरांगणांत आमचा नाश करूं नकोस, आमचा पक्षपाति हो.'

किं नो भ्रातरगस्त्य सखा सन्नति मन्यसे ।
विद्मा हि ते यथा मनोऽस्मभ्यमिन्न दित्ससि ॥ ३ ॥
किम् । नः । भ्रातः । अगस्त्य । सखा । सन् । अति । मन्यसे ।
विद्म । हि । ते । यथा । मनः । अस्मभ्यम् । इत् । न । दित्ससि ॥ ३ ॥
अरं कृण्वन्तु वेदिं समग्निमिन्धतां पुरः ।
तत्रामृतस्य चेतनं यज्ञं ते तनवावहै ॥ ४ ॥
अरम् । कृण्वन्तु । वेदिम् । सम् । अग्निम् । इन्धताम् । पुरः ।
तत्र । अमृतस्य । चेतनम् । यज्ञम् । ते । तनवावहै ॥ ४ ॥

भाषायाम्.

३. हे भ्रातरगस्त्य, सखा सन् ( =अस्मद्धितकारी सन्नपि ) अस्मान् किम् अति मन्यसे ( =अस्मान् किमर्थम् अतिक्रम्य मनुषे=अस्मभ्यं कुतो न दित्ससि ) ? हि ( =यस्मात् कारणात् ) ते मनः यथा ( =याथातथ्येन ) [ वयं ] विद्म (=जानीमः) । अस्मभ्यम् इत् (=अस्मभ्यमेव ) न दित्ससि ( =दातुं नेच्छसि ) ॥

इति इन्द्रवाक्यम् अगस्त्यं प्रति ।

४. वेदिम् [ ऋत्विजः ] अरं कृण्वन्तु ( =अलं कुर्वन्तु=" संमार्जनपर्युक्षणादिना परिचरन्तु " ) । [ अपि च ] अग्निं पुरः (=पुरस्तात्=स्वपुरतः) सम् इन्धतां (=सम्यक्प्रदीपयन्तु ) । तत्र ( =तस्मिन्प्रदीप्तेऽग्नौ ) अमृतस्य ते चेतनम् ( =अमरणधर्मणस्तवाप्यायनकारिणं ) यज्ञं तनवावहै ( =आवां करवावहै ) ॥

इत्यगस्त्यवाक्यम् इन्द्रवाक्यं वा । तनवावहै इत्यत्र यं प्रति वाक्यम् अस्ति तस्यापेक्षया द्वितीयवचनम् ।

३. हे भ्राता अगस्त्या, तूं मित्र असून आम्हांला कां वगळतोस? आम्ही तुझें मन वास्तविक रीतीनें जाणतों. तूं आम्हांलाच मात्र देऊं इच्छीत नाहींस.

४. वेदीला तयार करूं द्या, अग्नीला पुढें पेटवूं द्या. त्यांत तुज अमराला पुष्ट करणारा यज्ञ आपण करूं.

3. Why, O brother Agastya, dost thou, being a friend, pass by us? We truly know thy mind. To us only thou dost not desire to give.

4. Let them prepare the altar, let them kindle Agni well before them. Therein we will make a sacrifice that shall gratify thee the immortal one.

---

३. इंद्र म्हणतो 'तर मग हे बंधू अगस्त्या, तूं माझा मित्र असतांहि हवि देतांना मला कां वगळतोस? वस्तुतः म्हटलें म्हणजे तुझें मन मला ठाऊक आहे. मरुत् देवांना हवि द्यावें आणि मलाच मात्र देऊं नये असा तुझा अभिप्राय आहे.'

या मंत्रांत आम्ही आणि आम्हांसच असे जे शब्द आले आहेत, ते मी आणि मलाच या अर्थी योजिले आहेत.

वृत्तासाठीं 'अगस्त्य' बद्दल 'अगस्तिअ,' आणि 'मनो। अस्मभ्यं' असें वाचलें पाहिजे.

४. वरचें इन्द्रवाक्य ऐकून अगस्त्य म्हणतो 'बरें तर हे आमचे ऋत्विज आतां वेदि तयार करून त्यांत अग्नि प्रदीप्त करितील; आणि हे इंद्रा, तूं ये, म्हणजे जेणेंकरून तुला सुख होईल असें हवि तुजकरितां मीं अग्नींत टाकितों.'

'यज्ञ आपण करूं'='यज्ञं तनवावहै.' तूं इंद्र आणि मी अगस्त्य मिळून यज्ञ करूं, म्हणजे तूं इंद्र येशील तर मी अगस्त्य तुजकरितां यज्ञ करीन, अशा भावार्थीनें हा प्रयोग केला आहे असें वाटतें.

वृत्तासाठीं 'वेदिं' बद्दल 'वेअदिं' असें वाचावें लागतें.

त्वमी॑शिषे वसुपते॒ वसू॑नां॒ त्वं मि॒त्राणां॑ मित्रपते॒ धेष्ठः॑ ।
इन्द्र॒ त्वं म॒रुद्भिः॒ सं व॑दस्वाध॒ प्राशा॑न ऋतु॒था ह॒वींषि ॥५॥१०॥

त्वम् । ई॒शि॒षे॒ । व॒सु॒ऽप॒ते॒ । वसू॑नाम् । त्वम् । मि॒त्राणा॑म् । मि॒त्र॒ऽप॒ते॒ । धेष्ठः॑ ।
इन्द्र॑ । त्वम् । म॒रुत्ऽभिः॑ । सम् । व॒द॒स्व॒ । अध॑ । प्र । अ॒शा॒न॒ । ऋ॒तु॒ऽथा । ह॒वींषि॑ ॥ ५ ॥ १० ॥

## भाषायाम्.

५. हे वसूनां वसुपते (=धनानां स्वामिन्), त्वम् ईशिषे (=त्वमेव ईश्वरो भवसि)। हे मित्राणां मित्रपते (=मित्राणां मध्ये श्रेष्ठमित्रभूत), त्वं धेष्ठः (=त्वमेवातिशयेन धाता दाता) [भवसि]। [एवं सत्यपि] हे इन्द्र, त्वं मरुद्भिः सं वदस्व (=तैः साकं सौमनस्येन वद=ससख्यं यथा तथा भव)। अध (=अथ=तदनन्तरम्) ऋतुथा (=ऋतावृतौ=कालेकाले) हवींषि प्राशान (=प्रकर्षेण भुङ्क्ष्व)॥

इत्यगस्त्यवाक्यम्। यदि मरुद्भिः सह सख्यं कृत्वा तैः सह संवदसे हविश्च तैः सहैव गृह्णासि तर्हि सदैव तुभ्यं हवींषि दास्याम इति भावः॥

५. हे धनाच्या धनपती, तूंच धनी आहेस, हे मित्रांच्या मित्रपती, तूंच अत्यंत उदार आहेस. हे इंद्रा, तूं मरुतांशीं ऐक्यानें राहा. आणि मग प्रत्येक प्रसंगीं हवि भक्षीत जा.

5. Thou art the Lord, O master of all blessings, thou the most bounteous, O master of friends. Be thou reconciled, O Indra, to the Maruts, and then enjoy the offerings at every time.

५. आणखी पुढें अगस्त्य असें म्हणतो कीं; 'हे इंद्रा, आम्ही मरुतांला हवि दिलें यावरून तूं मरुतांपेक्षां कमी आहेस असें आम्ही मानीत नाहीं. तर आम्ही असें म्हणतों कीं, तूं सर्व धनाचा स्वामी असून सर्व जगताचा राजा आहेस, आणि सर्व मित्रांमध्यें उत्तम मित्र असून अत्यंत उदार आहेस; परंतु मरुत् हे तुझे बंधूच आहेत त्यापेक्षां तूं त्यांशीं मित्रभावानें बोल. म्हणजे आम्ही तुजला नित्य हवि देत जाऊं.'

वृत्तासाठीं 'धेष्ठः' बद्दल 'धेअष्ठः' आणि तिसऱ्या पादांत 'त्वं' बद्दल 'तुअम्' आणि तिसऱ्या व चवथ्या पादांत 'वदस्वाध' बद्दल 'वदस्व । अध' असें वाचावें.

या सूक्ताचा अर्थ समजण्यासाठीं यास्क, सायण इत्यादिकांनीं पहिल्या ऋचेवरील टीकेंत सांगितलेली कथा कल्पिली आहे, तशाच कांहीं तरी कथेला अनुलक्षून या सूक्ताचा अर्थ केल्यावांचून निर्वाह नाहीं. इन्द्र आणि मरुत् यांजमध्यें हविर्ग्रहणाच्या योग्यतेविषयीं विरोध असल्याचें उदाहरण १६५व्या सूक्तांत आहेच. तें सूक्त पहा. मात्र आपणास हवि मिळालें नाहीं म्हणून इन्द्र दीनासारिखा निराश होऊन पहिल्या ऋचेंत असलेले उद्गार काढील असें संभवत नाहीं, यावरून तितकी ऋचा या सूक्ताशीं अथवा याच्या कथेशीं तिचा संबंध आहे असें समजून लावावी किंवा नाहीं याविषयीं आम्हांस संशय वाटतो.

## सूक्तम् १७१.

अगस्त्य ऋषिः मरुतो देवता । तत्राद्ये द्वे केवलमरुद्देवताके शिष्टाश्चतस्रो मरुत्वदिन्द्रदेवताकाः । त्रिष्टुप् छन्दः ॥

**प्रति व एना नमसाहमेमि सूक्तेन भिक्षे सुमतिं तुराणाम् ।**
**रराणता मरुतो वेद्याभिर्नि हेळो धत्त वि मुचध्वमश्वान् ॥ १ ॥**

प्रति । वः । एना । नमसा । अहम् । एमि । सुऽउक्तेन । भिक्षे । सुऽमतिम् । तुराणाम् ।
रराणता । मरुतः । वेद्याभिः । नि । हेळः । धत्त । वि । मुचध्वम् । अश्वान् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [हे मरुतः], अहम् एना नमसा (=अनेन नमस्कारेण) वः प्रति (=युष्मान् प्रति) एमि (=आगच्छामि=आगतोस्मि) सूक्तेन (=अनेन स्तोत्रेण) [च] तुराणां (=त्वरमाणानां=वेगवतां) [युष्माकं] सुमतिं (=शोभनाम् अनुग्रहरूपां बुद्धिं) भिक्षे (=याचे)। हे मरुतः, वेद्याभिः (=स्वप्रवृत्तिभिः=स्वयमेव) रराणता (=रराणत=रममाणा भवत=प्रसादध्वम्)। हेळः (=क्रोधं) नि धत्त (=त्यजत) [अपि च] अश्वान् (=युष्माकं रथे योजितान् वाहान्) वि मुचध्वं (=रथेभ्यो विमोचयत)॥

सुमतिं भिक्षे । इन्द्रस्यैव पुनर्हविःप्रदानादिदं याच्यते ।...... वेद्याभिर्वेदितव्याभिः स्तुतिभी रराणता रममाणेन मनसेत्थंभूताः सन्तो...... वि मुचध्वम् । रथेभ्यो वियोजयत । क्रोधात्पुनर्गमनं मा कुरुतेत्यर्थः । इति सायणः ॥

## सूक्त १७१.

ऋषि—अगस्त्य. देवता—मरुत्. मात्र पहिल्या दोन ऋचा केवळ मरुतांविषयीं, आणि उरलेल्या मरुत् आणि इन्द्र यांविषयीं आहेत. वृत्त त्रिष्टुभ्.

१. मी या वंदनासहित तुम्हांप्रत आलों आहें. सूक्तानें [तुम्हां] वेगवंतांचा प्रसाद याचीत आहें. [ तर ] हे मरुतांनो, तुम्ही आपण होऊन प्रसन्न व्हा. क्रोध शांत करा [ आणि ] घोडे सोडा.

## HYMN 171.

To the *Maruts*; the first two verses are addressed to the *Maruts* alone, and the rest to *Indra* and the *Maruts*. By *Agastya*. Metre—*Trishtubh*.

1. I come to you with this obeisance. With [this] hymn I implore your favour, you who are impetuous. Be you pleased, O Maruts, by your own will. Lay aside [ your ] anger. Unharness the horses.

---

१. 'सूक्तानें'='सूक्तेन.' म्हणजे हें सूक्त म्हणून, अथवा गाऊन.

'वेगवंतांचा'='तुराणाम्.' मरुतांस वेगवंत असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें आहे. सू. १६६ मं. ४, आणि टिपा पहा.

'या वंदनानें'='एना नमसा.' म्हणजे जो नमस्कार करून हें सूक्त म्हणत आहें, त्या नमस्कारासहित.

'आपण होऊन'='वेद्याभिः.' सायणाचार्य 'स्तुतींनीं' असा अर्थ करितात, पण 'वेद्याभिः' याचा अर्थ 'स्वप्रवृत्तीनें' म्हणजे 'आपण होऊन' असा होतो या गोष्टीविषयीं ऋ.६:९.१ आणि ऋ.१०.७१.८ यांजवरील सायणभाष्यांत प्रमाण आहे. 'आपण होऊन शांत व्हा' याचें तात्पर्य असें दिसतें कीं, माझ्या वंदनाची आणि स्तोत्रांची योग्यता तुमचा क्रोध शांत करण्यासारिखी नसली तरी, तुम्ही कृपाकरून तो शांत करा आणि प्रसन्न व्हा.

'घोडे सोडा'='अश्वान् वि मुचध्वम्'. म्हणजे रथाला घोडे जोडून तुम्हीं आलां आहां ते परत जाऊं नका, तर खालीं उतरा, घोडे सोडा आणि हवि घेण्यासाठीं घरांत या. सायण म्हणतात कीं, यांत जो क्रोध सांगितला, तो इंद्राला हवि दिलें आणि त्यांला ( म्हणजे मरुतांला ) दिलें नाहीं म्हणून आलेला.

वृत्तासाठीं 'वेद्याभिः' बद्दल 'वेदिआभिः' असें म्हटलें पाहिजे.

एष वः स्तोमो मरुतो नमस्वान्हृदा तष्टो मनसा धायि देवाः ।
उपेमा यात मनसा जुषाणा यूयं हि ष्ठा नमस इद्वृधासः ॥२॥

एषः । वः । स्तोमः । मरुतः । नमस्वान् । हृदा । तष्टः । मनसा ।
धायि । देवाः ।
उप । ईम् । आ । यात । मनसा । जुषाणाः । यूयम् । हि । स्थ ।
नमसः । इत् । वृधासः ॥ २ ॥

स्तुतासो नो मरुतो मृळयन्तूत स्तुतो मघवा शंभविष्ठः ।
ऊर्ध्वा नः सन्तु कोम्या वनान्यहानि विश्वा मरुतो जिगीषा॥३॥

स्तुतासः । नः । मरुतः । मृळयन्तु । उत । स्तुतः । मघऽवा । शम्ऽ-
भविष्ठः ।
ऊर्ध्वा । नः । सन्तु । कोम्या । वनानि । अहानि । विश्वा । मरुतः ।
जिगीषा ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. हे मरुतः, नमस्वान् (=नमस्कारयुक्त) एष (=मया कृतोयं) स्तोमः (=स्तोत्रं) वः (=युष्माकं) [भवति] । हृदा तष्टः (=आदरेण रचितः) [स], हे देवाः (=द्योतनशीला मरुतः), मनसा (=प्रेम्णा) धायि (=धार्यतां=प्रतिगृह्यताम्) । मनसा जुषाणाः (=आदरेण तं स्तोमं सेवमाना) ईम् उप आ यात (=इदं स्तोत्रं प्रति आगच्छत=इदं स्तोत्रं सादरं सेवितुम् अस्मान्प्रति आगच्छत) । हि (=यस्मात्कारणाद्) यूयं नमसो वृधासः इत् (=नमस्कारस्य=नमस्कारयुक्तस्योपासकजनस्य वर्धका एव) स्थ ॥

३. स्तुतासः (=स्तुताः=अस्माभिः स्तुता) मरुतो नः (=अस्मान्) मृळयन्तु (=अस्मभ्यम् अनुकूला भवन्तु=अस्मान् सुखयन्तु) उत (=अपि च) शंभविष्ठः (=अतिशयेन सुखस्य भावयिता=सुखकारितम) इन्द्रः [अस्माभिः] स्तुतः [सन्] [अस्मभ्यं मृळयतु] ।—[अपि च] हे मरुतः, जिगीषा (=जिगीषाणि=गन्तुम् इष्टानि=प्राप्तव्यानि) विश्वा अहानि (=सर्वाणि दिनानि) नः (=अस्मभ्यम्) ऊर्ध्वा (=ऊर्ध्वानि=उत्कृष्टानि) तथा च कोम्या (=? काम्या=काम्यानि) अपि च वनानि (=? वननीयानि=संभजनीयानि) सन्तु (=भवन्तु) ॥

२. हे मरुतांनो, हें वंदनयुक्त स्तोत्र तुमचें आहे. तें मी अंतःकरणापासून रचिलें आहे. तें, हे देव हो, तुम्ही मनापासून ग्रहण करा. या [ स्तोत्रा]प्रत तुम्ही येऊन मनापासून तें सेवन करा. कारण कीं, तुम्ही वंदनाचे कल्याणकर्तेच आहां.

३. स्तविलेले मरुत् आम्हांस प्रसन्न होओत. आणि अतिशयेंकरून सुखकारी [जो] स्तविलेला मघवा [ तोहि प्रसन्न होओ ].–हे मरुतांनो, आमचे पुढें येणारे सर्व दिवस उत्कृष्ट, कमनीय, [आणि] भोगयोग्य होओत.

2. This hymn, O Maruts, is yours, accompanied by my obeisance. Composed with the soul may it be received [ by you ], O brilliant ones, with [ your ] heart. Come to it to enjoy it with your soul. For you are indeed the promoters of obeisance.

3. May the Maruts praised be favourable to us, and may praised Indra, the greatest giver of happiness, [ favour us ].—May all the days that we wish to reach, O Maruts, be unto us glorious, lovely [ and ] enjoyable.

---

२. हे मरुतांनो, आम्हीं नम्रभावानें हें स्तोत्र तुम्हांप्रत रचिलें आहे. आम्हीं अंतःकरणापासून रचिलेलें हें स्तोत्र तुम्हीं मनापासून ग्रहण करा. आणि त्याचें मनापासून सेवन करण्यासाठीं म्हणून तुम्ही त्या स्तोत्राप्रत या. कारण कीं जे जे नम्रभावानें तुमची सेवा करितात, त्यांचे तुम्ही पुरस्कर्ते आहां.

'तुमचें आहे'='वः'. म्हणजे तुम्हांसाठीं रचिलें आहे, दुसऱ्यासाठीं नव्हे.

'अंतःकरणापासून रचिलें आहे'='हृदा तष्टः'. म्हणजे मोठ्या प्रेमानें उत्पन्न केलें आहे. प्राचीन ऋषि वेदाचीं सूक्तें आपण रचिलीं असें म्हणण्यास मनामध्यें शंका घेत नसत; त्या ऋषींनीं हीं वेदसूक्त रचिलीं असें आतां आपणच मात्र म्हणत नाहीं.

'वंदनाचे'='नमसः इत्.' म्हणजे पूज्यबुद्धीनें केलेला जो नमस्कार तो करणाऱ्याचे पुरस्कर्ते.

'या स्तोत्राप्रत तुम्ही येऊन मनापासून तें सेवन करा'='मनसा जुषाणाः ईम् उप आ यात.' अक्षरशः अर्थ मनापासून सेवन करणारे असे जे तुम्ही ते, याजप्रत या, म्हणजे याजप्रत या आणि मनापासून तें सेवन करा.

३. 'ही जी मी इंद्राची आणि मरुतांची स्तुति करीत आहें तिच्या योगानें ते प्रसन्न होऊन आमचें पुढें आयुष्य

अस्मादहं तविषादीषमाण इन्द्राद्भिया मरुतो रेजमानः ।
युष्मभ्यं हव्या निशितान्यासन्तान्यारे चकृमा मृळता नः ॥ ४ ॥

अस्मात् । अहम् । तविषात् । ईषमाणः । इन्द्रात् । भिया । मरुतः । रेजमानः ।
युष्मभ्यम् । हव्या । निऽशितानि । आसन् । तानि । आरे । चकृम । मृळत । नः ॥ ४ ॥

---

इत्यनुसायणम् । स आह । किंच हे मरुतो नोऽस्माकं जिगीषा । जिगातेर्गतिकर्मणो जिगीषा । जिगीषितव्यानि प्राप्तव्यान्युत्तरत्रानुभूयमानानि विश्वा सर्वाण्यहानि दिवसान्यूर्ध्वोन्नतान्युपर्युपरि श्रिया यशसा वोत्कृष्टानि कोम्या काम्यानि स्पृहणीयानि वनानि सर्वैः संभजनीयानि सन्तु । जिगीषा जेतुमिष्टानि जेतव्यानि च सन्त्विति वा योज्यम् । एवं कृत्वा मरुत इन्द्रश्च सुखयन्त्वित्यर्थः । इति ॥ वस्तुतस्तु वनशब्दस्य संभजनीयार्थत्वे महानेव संशयः । कोम्येति पदम् ऋक्संहितायाम् अन्यत्रादृष्टम् ॥

---

## भाषायाम्.

४. हे मरुतः, अहम् [अगस्त्यः] अस्मात् तविषात् (=प्रबलिन) इन्द्रात् भिया (=भयेन) ईषमाणः (=पलायमानो) रेजमानश्च [अस्मि] । युष्मभ्यं (=युष्मदर्थं) हव्या (=हव्यानि) निशितानि आसन् (=संस्कृतान्यासन्) । तानि [वयम् इन्द्रभयात्] आरे चकृम (=दूरे कृतवन्तः स्मः) [एतद्विषये] नः मृळत (=अस्मान् क्षमध्वम्) ॥

---

श्रेष्ठ, रमणीय आणि उपभोग घेण्यास योग्य असें करोत.'

या मंत्राचा उत्तरार्ध किंचित् कठिण आहे त्यांत 'कोम्य' आणि 'वन' या शब्दांच्या अर्थाविषयीं संशय आहे. आम्हीं सायणास अनुसरून अर्थ केला आहे. भाषा पहा. कदाचित् असाहि अर्थ संभवेलः– '[अंतरिक्षांत असणारी जीं] [अभ्ररूप] रमणीय अरण्यें [तीं] आम्हांसाठीं तयार असोत; आणि हे मरुतांनो, आम्हांला सदैव जय मिळविण्याची आशा असो.'

वृत्तासाठीं 'कोम्या' बद्दल 'कोमिआ' असें वाचून 'मृळयन्तु। उत,' 'वनानि। अहानि' असें म्हणावें.

४. हे मरुतांनो, या प्रबळ इंद्रापासून भिऊन मी पळून जाणारा [ आणि ] कांपणारा [असा आहें]. तुम्हांसाठीं हव्यें सिद्ध केलीं होतीं, तीं आम्हीं दूर केलीं. [ याविषयीं ] आम्हांला क्षमा करा.

4. I am fleeing [and] quivering with fear from this mighty Indra, O Maruts. For you were offerings prepared. We put them away. Pardon us, O Maruts.

४. 'हे मरुतांनो, आम्हीं तुम्हांकरितां सिद्ध केलेलें अन्न तुम्हांस अर्पण न करितां आम्हीं इंद्रास दिलें. त्यामुळें तुम्हांस राग येईल, तर येऊं देऊं नका, कारण कीं पूर्वीं तुम्हांस हवि दिल्यामुळें इंद्रालाहि मोठा कोप आला आणि त्याला मी भिऊन कांपत आहें आणि पळून जणूं जात आहें. यास्तव तुम्ही आम्हांवर क्षमा करा.'

'दूर केलीं'=' आरे चकृम.' म्हणजे मरुतांसाठीं तयार केलेलीं मरुतांजवळ आणावयाचीं होतीं तीं न आणितां दुसऱ्याला दिलीं.

वृचासाठीं 'निशितानि आसन्' आणि 'तानि आरे' असें म्हणावें लागतें.

येन मानांसश्चितयन्त उस्रा व्युष्टिषु शवसा शश्वतीनाम्।
स नो मरुद्भिर्वृषभ श्रवो धा उग्र उग्रेभिः स्थविरः सहोदाः ५
येन । मानासः । चितयन्ते । उस्राः । विऽउष्टिषु । शवसा । शश्व-
तीनाम् ।
सः । नः । मरुत्ऽभिः । वृषभ । श्रवः । धाः । उग्रः । उग्रेभिः ।
स्थविरः । सहःऽदाः ॥ ५ ॥
त्वं पाहीन्द्र सहीयसो नॄन्भवा मरुद्भिरवयातहेळाः ।
सुप्रकेतेभिः सासहिर्दधानो विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥६॥११
त्वम् । पाहि । इन्द्र । सहीयसः । नॄन् । भव । मरुत्ऽभिः । अवया-
तऽहेळाः ।
सुऽप्रकेतेभिः । ससहिः । दधानः । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽ
दानुम् ॥ ६ ॥ ११ ॥

---

## भाषायाम्.

५. येन (=यस्मात्कारणात्) शश्वतीनां व्युष्टिषु (=नित्यमागच्छन्तीनाम् उषसां प्रकाशनेषु=उदयेषु) मानासः (=माननामर्षेः पुत्रा अस्मद्रूपा) उस्राः शवसा चितयन्ते (=बालदिनानि बलेन प्रदीपयन्ति=प्रत्यहम् अग्निम् उषःकाले भृशं प्रदीपयन्ति) स [त्वम्] (=अतः कारणात् त्वं) [हे इन्द्र], हे वृषभ, (=हे वीर्यवन्निन्द्र), उग्रः (=प्रबलः) स्थविरः (=चिरंतनः) सहोदाः (=बलस्य दाता) [एतादृशस्त्वम्] उग्रेभिर्मरुद्भिः [सह] नः (=अस्मभ्यं) श्रवो धाः (=अन्नं स्थापय=प्रयच्छ) ॥

६. हे इन्द्र, त्वं सहीयसो नॄन् (=अतिशयेन बलवतो वीरभूतान्मरुतः) पाहि (=रक्ष) । सुप्रकेतेभिः (=सुप्रकेतैः=सुप्रज्ञानैर्मरुद्भिः) सासहिर्दधानः (=अतिशयेन प्रबलो भूतस्) [त्वं तैर्] मरुद्भिः [साकम्] अवयातहेळाः (=अपगतक्रोधो) भव । [वयम्] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

५. ज्यापेक्षां, शाश्वत उषांचा उदय होतांच [ हे ] मानपुत्र नित्य प्रातःकाळाला पुष्कळ प्रदीप्त करितात, त्यापेक्षां हे वीर्यवान् इंद्रा, प्रबळ, सनातन, [ आणि ] बळदायक असा जो तूं, तो आणि प्रबळ मरुत् हे मिळून आम्हांला अन्न द्या.

६. हे इंद्रा, तूं, [ या ] अति प्रबळ वीरांला रक्ष. हे जे मोठे मेधावी मरुत् ते तुला अत्यंत बळवान् असा मानितात, त्या मरुतांशीं तूं निष्कोप हो. आम्हांला अन्न, बळ [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र यांची प्राप्ति होओ.

5. Inasmuch as the sons of Mâna kindle the mornings vigorously at the break of the everlasting Ushases, do thou, therefore, O brave [ Indra ], thou mighty Indra with the mighty Maruts, thou who art ancient [ and ] the giver of power, grant us food.

6. Protect thou, O Indra, the very mighty heroes. Considered as the mightiest by the wise Maruts, be thou pacified with them. [And] may we obtain food, strength, [ and ] a son that shall quickly make us rich.

---

५. 'हे इंद्रा, ज्यापेक्षां आम्ही जे मानपुत्र ते प्रतिदिनीं उषेचा उदय होतांच अग्नि यज्ञासाठीं प्रदीप्त करितों, त्यापेक्षां तूं आणि मरुत् मिळून आम्हांला उत्तम धनाची प्राप्ति करून द्या.'

'ज्यापेक्षां ...... प्रदीप्त करितात'= 'येन चितयन्ते.' हा पूर्वार्ध कठिण आहे. 'मानासः' म्हणजे वर सू. १६९ मं. ८ यांत आणि त्याजवरील टिपेंत सांगितलेले मान ऋषीचे वंशज होत याविषयीं संशय नाहीं आणि 'शश्वतीनां व्युष्टिषु' याचा अर्थ नित्य येणाऱ्या ज्या उषा त्यांच्या प्रकाशनसमयीं, म्हणजे त्या उगवतांच असा आहे याविषयीं संशय नाहीं. मात्र उस्राः श्रवसः चितयन्ते इतक्या शब्दांच्या अर्थाविषयीं प्रश्न आहे. आतां 'चितयन्ते' म्हणजे साधारण अर्थ प्रकाशित करितात असा आहेच. यावरून 'प्रदीप्त करितात' असा होण्यास अडचण नाहीं.

'उस्राः' म्हणजे 'उषा' असा अर्थ तर प्रसिद्धच आहे. परंतु उषांच्या उदयसमयीं उषांला प्रदीप्त करितात, असा अर्थ विलक्षण दिसतो, तर 'उस्राः' याचा अर्थ केवळ दिवस इतकाच होतो (ऋ. ६. ५२. १५) त्यावरून मान प्रातःकाळीं दिवसांला ज्ञापित करितात, म्हणजे, अग्नि प्रदीप्त करून प्रभातकाळ

## सूक्तम् १७२.

अगस्त्य ऋषिः । मरुतो देवता । गायत्री छन्दः ।

चित्रो वोऽस्तु यामश्चित्र ऊती सुदानवः ।
मरुतो अहिभानवः ॥ १ ॥

चित्रः । वः । अस्तु । यामः । चित्रः । ऊती । सुऽदानवः ।
मरुतः । अहिऽभानवः ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. वो यामः (=युष्माकम् आगमनं) चित्रोस्तु (=आश्चर्यकारको भवतु)। हे सुदानवः (=शोभनदानोपेता) अहिमानवः (=सर्पतेजस्काः=सर्पस्येव तेजो येषां ते) मरुतः, [युष्माकं याम] ऊती (=रक्षणेन] चित्रः [अस्तु] (=आश्चर्यात्मको भवतु) ॥

अस्माकं यज्ञान् प्रति शीघ्रमागच्छत । आगच्छन्तश्च अस्मदर्थं शत्र्वादिभ्यो रक्षणं रक्षणोपायम् आनयथ चेत् तर्हि आश्चर्यमेषामागमनम् इति युष्मान् प्रति लोका वक्ष्यन्तीति भावः ॥

झाला असें सर्वांला कळवितात, अर्थात् नित्य प्रातःकाळीं हव्यें देऊन देवांची उपासना करितात, असा अर्थ समजावा. 'शवसा' म्हणजे, अक्षरशः बळानें इतकाच अर्थ आहे.

वृत्तासाठीं 'विडष्टिषु' असें वाचावें.

६. 'हे इंद्रा, या प्रकारेंकरून तूं आणि मरुत् यांजमध्यें शांति होण्यासाठीं तुझी स्तुति केली आहे, तर तूं या शूर मरुतांचें रक्षण कर. ते बुद्धिमान् आहेत आणि तुला सर्वांत प्रबळ समजून आपला नायक मानितात, तर त्यांजशीं तुझा क्रोध असेल तो मनांतून काढून टाक, आणि आम्हांला अन्न, बळ आणि विजयी पुत्र मिळेल असें कर.'

वृत्तासाठीं पहिल्या पादांत 'इंद्र' च्या बदल 'इन्दर' असें म्हणावें लागतें.

## सूक्त १७२.

ऋषि–अगस्त्य. देवता–मरुत्. वृत्त–गायत्री.

१. तुमचें आगमन आश्चर्यकारक होओ, हे महोदार आणि अहितेजस्क मरुत् हो, [ तुमचें आगमन] रक्षणाच्या योगेंकरून आश्चर्यकारक होओ.

## Hymn 172.

To the *Maruts*. By *Agastya*. Metre—*Gâyatrî*.

1. May your coming be wonderful, wonderful through [ your ] protection, O bounteous Maruts. shining like snakes !

---

१. 'हे उदार मरुतांनो, तुम्ही लौकर आमच्या यज्ञाप्रत या; आम्ही शत्रूपासून इत्यादि सुरक्षित राहिलों अशी लोकांत प्रसिद्धि होईल.'

'अहितेजस्क'='अहिभानवः' म्हणजे सर्प जसे कांतिमंत आणि चपळ असतात, त्याप्रमाणें मरुत् आहेत असा अर्थ.

वृत्तासाठीं 'वो अस्तु' असें म्हणावें.

आरे सा वः सुदानवो मरुत ऋञ्जती शरुः ।
आरे अश्मा यमस्यथ ॥ २ ॥

आरे । सा । वः । सुऽदानवः । मरुतः । ऋञ्जती । शरुः ।
आरे । अश्मा । यम् । अस्यथ ॥ २ ॥

तृणस्कन्दस्य नु विशः परि वृङ्क्त सुदानवः ।
ऊर्ध्वान्नः कर्त जीवसे ॥ ३ ॥ १२ ॥

तृणऽस्कन्दस्य । नु । विशः । परि । वृङ्क्त । सुऽदानवः ।
ऊर्ध्वान् । नः । कर्त । जीवसे ॥ ३ ॥ १२ ॥

---

## भाषायाम्.

२. हे सुदानवो मरुतः (=शोभनदाना महोदारा मरुतः), वो ( =युष्माकम् ) ऋञ्जती ( =ऋज्यन्ती=ऋजु गच्छन्ती ) शरुः ( =ऋष्टिः=एतन्नामकं मेघभेदकम् अस्त्रम् ) आरे [ अस्तु ] ( =दूरेस्तु=अस्मत्तो दूरदेशे वर्ततां=मास्मान् प्रहरतु ) । [ अपि च ] यम् [ अश्मानम्=अद्रिं=वज्रं ] [ यूयम् ] अस्यथ ( =प्रक्षिपथ ) [ स ] आरे [ अस्तु ] ( =अस्मत्तो दूरेस्तु=मास्मान् प्रहरतु ) ॥

३. हे सुदानवः ( =महोदारा ) [ मरुतः ], तृणस्कन्दस्य ( =एतन्नामकस्य कस्यचिच्छत्रोर् ) विशः ( =लोकान् ) नु परि वृङ्क्त ( =क्षिप्रं परितो वृश्चत ) [ अपि च ] जीवसे नः ऊर्ध्वान् कर्त ( =अस्मान् बलवतः कुरुत येन वयं चिरं जीवेम ) ॥

२. हे उदार मरुतांनो, तो जो तुमचा नीट धांवणारा भाला तो दूर [ असो ]. जो पाषाण तुम्ही फेकितां तो दूर [ असो ].

३. हे उदार [ मरुतांनो ], तुम्ही तृणस्कंदाच्या लोकांला चहूंकडून लवकर कापून टाका. आम्ही जीवंत राहाण्यासाठीं तुम्ही आम्हांला बळकट करा.

2. Far [be] your straight-running missile, O bounteous Maruts; far [ be ] the stone which you hurl.

3. Cut thou down quickly the people of Triṇaskanda from all sides. Make us strong that we may live.

---

२. ' भाला '=' शरुः.' येथें ' शरु ' म्हणजे ऋष्टि नांवाचें जें भाल्यासारिखें मरुतांचें ढग फोडून टाकण्याचें अस्त्र तें असें सायण म्हणतात तें खरें दिसतें.

' नीट धांवणारा '=' ऋजती.' ज्या धातूपासून ' ऋजु ' हा शब्द आला आहे त्या ऋज् ( ऋजुगमने ) धातूचें हें रूप आहे असें समजून निर्वाह केला आहे.

' पाषाण '=' अश्मा.' हा येथें पाषाण म्हणजे वज्रच होय. त्यालाच ' अद्रि ' अथवा खडक अथवा डोंगर असेंहि म्हणतात. सू.६१मं. ७ आणि त्यावरील टीप पहा. आकाशांतून मोठ्या पाषाणाप्रमाणें पडून ज्यावर पडेल त्याचा चुराडा करणारी जी वीज आणि गडगडाट त्यांजवर ' शरु ' आणि ' अश्मा ' या दोन्ही शब्दांचें येथें पर्यवसान आहे.

' दूर [ असो ]'=' आरे [अस्तु ].' म्हणजे त्यांचा प्रहार आम्हांवर न होओ.

३. 'तृणस्कन्द.' हा कोण होता त्याविषयीं इतिहास कांहीं ठाऊक नाहीं. मात्र कोणी शत्रु होता इतकें स्पष्ट आहे. सायण म्हणतात, एक दैत्यविशेष.

## सूक्तम् १७३.

अगस्त्य ऋषिः । इन्द्रो देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

गायत्साम नभन्यं१ यथा वेरर्चाम तद्वावृधानं स्वर्वत् ।
गावो धेनवो बर्हिष्यदब्धा आ यत्सद्मानं दिव्यं विवासान् ॥१॥

गायत् । साम । नभन्यम् । यथा । वेः । अर्चाम । तत् । ववृधानम् । स्वः॑ऽवत् ।
गावः । धेनवः । बर्हिषि । अदब्धाः । आ । यत् । सद्मानम् । दिव्यम् । विवासान् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे इन्द्र ], नभन्यं ( =नभोव्यापि=नभसि अन्तरिक्षे सत्वरं गच्छत् ) ववृधानम् ( =अतिशयेन प्रवृद्धं=पृथिव्याः सकाशाद् द्युलोकपर्यन्तं गन्तु समर्थम् ) [ अत एव ] स्वर्वत् ( =द्युलोकवत्=द्युलोकं गच्छत्=द्युलोकगामि ) साम ( =स्तोत्रं ) [ त्वं ] यथा वेः ( =येन प्रकारेण कामयसे=अङ्गीकुरुषे ) तत् ( =तथा ) [ ऋत्विग् ] गायत् ( =गायतु ) [ वयं च ] अर्चाम ( =शंसाम ) । [ तथा च ऋत्विग् गायतु वयं च शंसाम ]. यत् ( =यथा ) धेनवः ( =दोग्ध्र्यो ) गावः अदब्धाः ( =अहिंसिताः सत्यो ) बर्हिषि सद्मानं (=कुशेषु सीदन्तं ) दिव्यं ( =द्युलोकनिवासिनं ] [ त्वाम् ] आ विवासान् ( =परिचरेयुः ) ॥

अत्रेदमुक्तं भवति । हे इन्द्र, यत्स्तोत्रम् उक्तं सत् दिव्योऽश इव द्युलोकात् त्वामानयितुं समर्थं भवति तादृशं स्तोत्रम् अयम् ऋत्विग् इमे च वयं गायामः । तत् त्वं कामयस्व । प्रीत्या सह शृणु । श्रुत्वा आगत्य दर्भेष्वेतेषु निषीद । तत्रासीनं दिव्यं त्वामस्मद्गवां पयांसि संतर्पयन्तु । इति ॥

## सूक्त १७३.

ऋषि–अगस्त्य. देवता–इन्द्र. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. [ हे इंद्रा ], तूं जेणेंकरून प्रसन्न होशील, तसें आकाशगामी साम [ उद्गाता ] गाईल [ आणि ] तसें श्रेष्ठ [ आणि ] दिव्य साम आम्ही म्हणूं; [आणि] जेणेंकरून सुरक्षित दुभत्या गाई दर्भावर बसलेल्या तुज दिव्य [इंद्राची ] सेवा करितील.

## Hymn 173.

To *Indra*. By *Agastya*. Metre—*Trishṭubh*.

1. Let the priest chant a sky-pervading hymn [and] let us repeat one, mighty and heaven-reaching, so that thou [ O Indra], mayest accept it; [ and ] so that the milch-cows that are not injured may worship thee seated on the kus'a-grass, thou who art divine.

---

१. 'हे इंद्रा, जें स्तोत्र म्हटलें असतां तूं तें ग्रहण करून प्रसन्न होशील तसलें स्तोत्र आतां आमचा हा ऋत्विज म्हणेल आणि आम्हीहि म्हणूं. आणि तूं प्रसन्न होऊन आमच्या कुशासनावर येऊन बसलास म्हणजे आमच्या गाईचें दूध तुला अर्पण करूं तें तूं पी.'

'जेणेंकरून प्रसन्न होशील '=' यथा वेः.' सायण 'जें तूं जाणशील' असें भाष्य करितात. आणि कितीएक पाश्चात्य 'पक्षी जसा' असा अर्थ करितात. पक्षी असा 'वेः' या रूपाचा अर्थ होतो ( ऋ. ६. ३. ५ आणि ९. ७२. ५ यांजवरील सायणभाष्य पहा ) तरी असा अर्थ येथें युक्त नाहीं.

'आकाशगामी '=' नभन्यम्.' म्हणजे आकाशांतून तुझ्या घोड्याप्रमाणें चालून तुला घेऊन येण्याविषयीं समर्थ.

'आणि जेणेंकरून......गाई...सेवा करितील '=' यत्...गावः आ विवासान्.' म्हणजे, असें साम आम्ही आतां म्हणूं कीं, जेणेंकरून तूं प्रसन्न होऊन येशील आणि दर्भासनावर बसशील आणि तुझ्या प्रसादेंकरून सुरक्षित राहिलेल्या ज्या गाई त्यांचें दूध तुला आम्ही अर्पण करूं तें पिशील.

'दिव्य '=' स्वर्वत्.' म्हणजे स्वर्गी जाऊन तुजप्रत प्रविष्ट होणारें असें.

वृत्तासाठीं 'नभनिअं,' 'सुअर्वत्,' 'बर्हिषि अदब्धाः' आणि 'दिविअं' असें म्हणावें.

अर्च॒द्वृषा॒ वृष॑भिः॒ स्वेदु॑हव्यैर्मृ॒गो नाश्नो॒ अति॒ यज्जु॑गु॒र्यात्।
प्र म॒न्दयु॑र्म॒नां गू॒र्त होता॒ भर॑ते॒ मर्यो॑ मिथु॒ना यज॑त्रः ॥ २ ॥

अर्च॑त्। वृषा॑। वृष॑ऽभिः। स्वऽइ॑दुहव्यैः। मृ॒गः। न। अश्नः॑। अति॑। यत्। जुगु॒र्यात्।
प्र। म॒न्दयुः। म॒नाम्। गू॒र्त॒। होता॑। भर॑ते। मर्यः॑। मि॒थु॒ना। यज॑त्रः ॥ २ ॥

भाषायाम्.

२. अश्नो मृगो न (=भक्षणाय धावन् श्वापद इव) [इन्द्रो] यत् (=यथा) अति जुगुर्यात् (=अतिशयेन भृशं पिबेत्) [तथा] वृषा (=प्रबल उपासकः) स्वेदुहव्यैः (=स्वायत्तहविष्कैः=स्वतःसिद्धहविष्कैः=हविःस्वरूपैर्) वृषभिः (=प्रबलैः सोमैस्) [तम्] अर्चत् (=अर्चतु=भजताम्)।— हे गूर्त (=उद्गूर्ण=श्रेष्ठ) [इन्द्र], मन्दयुः (=स्तुतियुक्तो) यजत्रः (=यज्ञसंपादको) मर्यः (=मानुषो) होता (=देवानामाह्वाता) मिथुना (=? मिथुनेन=पत्नीसहितेन यजमानेन साकं) मनां प्र भरते (=स्तोत्रं प्रकर्षेण संपादयति=प्रापयति तुभ्यम्) ॥

अत्रेदमुक्तं भवति। हे इन्द्र, अयं यजमानो यद् बलवत्सोमरूपं हव्यं तुभ्यमर्पयिष्यति तत्त्वं गृहीत्वा प्रसीद तच्च भृशं पिपासुर्हरिण इव त्वं शीघ्रतरं पिब। अहं च होता आभ्यां दंपतिभ्यां सह ते स्तुतिं कृत्वा प्रापयामीति ॥

मन्दयुः, मनां, गूर्त, मिथुना चेत्येते शब्दास्तु संदिग्धार्थकाः। मनां गूर्तेति पदद्वयं पाश्चात्यास्तु स्तुतिं प्रवदतु इति विवृण्वन्ति ॥

सायण इमामेवं व्याचष्टे। वृषा हविषां वर्षितायं यजमानः स्वेदुहव्यैः स्वायत्तेद्धहविष्कैः। यद्वा स्वयं प्राप्तेन्धकं हव्यं येषां तादृशैर्वृषभिर्वर्षकैर्हविःप्रदातृभिरध्वर्य्वादिभिर्विशिष्टः सन् अर्चत्। अर्चयति। इन्द्रम्। यद्वा वृषा फलस्य वर्षितायमिन्द्र उक्तलक्षणैरध्वर्य्वादिभिरर्च्यते। यद्यस्मादश्नो व्यापकः पानार्थं धावन् मृगो न हरिणादिरिवायमिन्द्रोऽश्नोऽशनशीलः सन् अति जुगुर्यात्। अत्यर्थमुद्युङ्क्ते हविर्भक्षणाय। यथा मृगः क्षुत्पिपासार्दितः शीघ्रमुद्युङ्क्ते तथायमिन्द्रोऽपि। यस्मादेवं तस्मादर्चति। यद्वायमिन्द्रो यत् यथाश्नो मृग इवातिजुगुर्यात् भक्षयेत् तथार्चतीत्यर्थः। किंच हे गूर्त उद्गूर्णेन्द्र मनां मननं स्तोत्रमिच्छतां देवानां मन्दयुः स्तुतियुक्तो मर्यो होता मानुष एतन्नामक ऋत्विक् यजत्रो यागनिष्पादकः सन् मिथुना मिथुनानि युग्मरूपाणि याज्यापुरोनुवाक्यादीनि मिथुनौ वा जायापतिरूपः सन् प्र भरते। प्रकर्षेण संपादयति। तस्मादर्चतीत्यर्थः। इति ॥

२. बुभुक्षित मृगाप्रमाणें [ इंद्रानें ] एकदम भक्षण करावें म्हणून [ त्याला ] प्रबळ यजमान हव्यस्वरूप जे प्रबळ सोम त्यांच्या द्वारें भजो.—हे श्रेष्ठ [ इन्द्रा ], स्तोत्रकारी जो यज्ञसंपादक [ आणि ] तरुण होता तो, यजमान आणि त्याची स्त्री यांसह स्तोत्र अर्पण करीत आहे.

2. Let the powerful sacrificer worship [ Indra ] with the powerful Somas that are themselves an oblation, that he [ Indra ] may quaff [ them ] like a thirsty stag. The prayerful, pious, [ and ] youthful invoker, O high [ Indra ], is offering prayer together with the sacrificer and his wife.

---

२. भावार्थः—'हे इंद्रा, एकादा अत्यंत तृषाक्रांत हरिण जसा झपाट्यानें पाणी पितो, तसा तूं सोम प्यावास म्हणून सोम पिऊन प्रबळ झालेला हा आमचा यजमान तुला प्रबळ सोमरसांच्या योगेंकरून भजो. आणि मी होता स्तोत्र रचून तें यजमान आणि त्याची स्त्री यांसहित तुला अर्पण करीत आहें.' असा भावार्थ आम्हीं केलेल्या भाषांतराचा आहे, तरी हा मंत्र अत्यंत कठिण आहे यांत शंका नाहीं. 'मन्दयुः,' 'स्वेदुहव्यैः,' 'मनाम्,' 'गूर्त,' आणि 'मिथुना' हे शब्द कठिण आहेत यांचा अर्थ आणि अन्वय निश्चयेंकरून सांगतां येत नाहीं.

'प्रबळ यजमान'='वृषा.' म्हणजे स्वतः सोम पिऊन जो प्रबळ झाला आहे असा. जो सोमपान करितो तो अतिशय प्रबळ होतो अशाविषयीं वेदांत पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.

'उपासकाला' वृषा असें नांव वेदांत आहे याजविषयीं ऋ. २. १६. ४ आणि सायणभाष्य पाहा. आणि सोमाला 'वृषा.' म्हणतात याविषयीं ऋ. ९. ६४. २ आणि सायणभाष्य पाहा.

सोमाला आणि उपासकाला मिळून एकच 'वृषा' शब्द लाविला आहे. ऋ. २. १६. ५.

'हव्यस्वरूप जे प्रबळ सोम त्यांच्या द्वारें'='स्वेदुहव्यैर्वृषभिः.' म्हणजे सोमरूप हवि अर्पण करून. स्वेदुहव्य हा शब्द आणखी एकच वेळ ( सू. १२१ मं. ६ यांत) आला आहे, पण त्यावरून प्रस्तुत ठिकाणीं अर्थ लावण्यास साहाय्य मिळत नाहीं.

'यजमान आणि त्याची स्त्री यांसह'='मिथुना.' मिथुना ही येथें तृतीया आहे असें समजून आम्हीं निर्वाह केला आहे. अकारान्त शब्दाच्या तृतीयेचें एकवचन वेदांत केव्हां केव्हां आकारान्त होत असतें.

वृचासाठी 'न अभो,' आणि 'मक्आ' असें वाचावें.

नक्षद्धोता परि सद्म मिता यन्भरद्गर्भमा शरदः पृथिव्याः ।
क्रन्ददश्वो नयमानो रुवद्गौरन्तर्दूतो न रोदसी चरद्वाक् ॥ ३ ॥
नक्षत् । होता । परि । सद्म । मिता । यन् । भरत् । गर्भम् । आ ।
शरदः । पृथिव्याः ।
क्रन्दत् । अश्वः । नयमानः । रुवत् । गौः । अन्तः । दूतः । न ।
रोदसी इति । चरत् । वाक् ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

३. होता (=देवानाम् आह्वाता) [अग्निः] मिता सद्म परि यन् (=मितानि सद्मानि परितो गच्छन्=परिमितानि सदनानि प्रति गच्छन्) नक्षत् (=व्याप्नोति)। शरदः पृथिव्याः (=शरदश्च पृथिव्याश्च) गर्भं (=फलं शस्यादिरूपम्) आ भरत् (=आहरति=अङ्गीकरोति)। नयमानः (=देवानाम् अर्थं हवींषि वहन्) अश्वः क्रन्दत् (=अश्व इव क्रन्दति=हर्षातिशयात् हेषते)। गौः (=वृषभ इव) रुवत् (=शब्दायते)। दूतो न (=दूत इव) वाक् (=अस्मदुच्चार्यमाणा स्तुती) रोदसी अन्तश्चरत् (=द्यावापृथिव्योर्मध्ये चरति) ॥

दुर्बोधतरैषा। अस्माभिः पुनः प्रायः सायणमनुसरद्भिः कथं कथमपि व्याख्याता। सायणो ह्येवं व्याख्यातवान्। होता होमनिष्पादकोऽयमग्निर्मिता परिमिता सद्म सदनानि गार्हपत्यादिस्थानानि परियन् परितो गच्छन् नक्षत्। व्याप्नोति। व्याप्य च शरदः संवत्सरसंबन्धिनं पृथिव्या भूम्याश्च संबन्धिनं गर्भं गर्भस्थानीयमन्नं हविर्लक्षणमाभरत्। आहरति। स्वीकरोति। संभरति वा संवत्सरपर्यन्तं वर्धितं भूम्यामुत्पन्नमित्यर्थः। यद्वा संवत्सरसंबन्धिनं वसन्तादिकाले ज्योतिष्टोमादिषु दीयमानं पार्थिवं हविर्भरत्। वसन्ते वसन्ते ज्योतिषा यजेतेति श्रुतेः। तथा कृत्वा क्रन्ददश्वः लुप्तोपममेतत्। अश्व इव क्रन्दति हर्षातिशयात्। किं कुर्वन्। नयमानः। नयदिन्द्राय हविर्भारम्। किंच गौर्गन्तोक्षो वृष इव रुवत्। रौति शब्दायते। किं कुर्वन्। दूतो न वार्ताहरो दूत इव रोदसी रोदस्योर्द्यावापृथिव्योरन्तर्मध्ये रोदसीरन्तरा वाक् स्तूयमानः स्तुवन् वा देवान् चरत्। चरति गच्छति। हविःस्वीकाराय पृथिवीं हविःप्रापणाय द्युलोकं च परिभ्रमतीत्यर्थः। इति ॥

३. होता परिमित गृहांसभोंतालीं फिरत फिरत [ सर्व ] व्यापितो, [ आणि व्यापून ] शरदेच्या आणि पृथिवीच्या फळाला स्वीकारितो. तो भार वाहणारा होत्साता घोड्याप्रमाणें [ आनंदानें ] खिंकाळतो. बैलाप्रमाणें हंबारतो, दूताप्रमाणें वाचा पृथिवी आणि अंतरिक्ष यांजमध्यें संचार करिते.

3. The invoker, going round the counted houses occupies [ them ]. He receives the fruit of the harvest [and] of the earth. Carrying the oblations he neighs like a horse. He lows like a bull. The voice travels between earth and heaven like a messenger.

---

३. हा मंत्र फार कठिण आहे. अर्थ अत्यंत दुर्बोध आहे. आम्हीं बहुतकरून सायणांस अनुसरून भाषांतर केलें आहे. त्याचा भावार्थ असा आहे कीं:— ‘ अग्निरूप जो होता तो गार्हपत्यादिक जीं यज्ञमंडपांतील स्थानें त्यांजप्रत जाऊन तीं स्थानें व्यापून राहतो, आणि शरदृतूंत भूमीवर उत्पन्न होणारीं जीं धान्यें त्यांपासून केलेलें हवि उपासकांपासून ग्रहण करितो, आणि तें घेऊन देवांकडेस जातांना एकाद्या घोड्यासारिखा खिंकाळतो, किंवा एकाद्या पोळासारिखा हंबारतो आणि आमचें स्तोत्र आकाशांतून दूताप्रमाणें वर देवांकडेस जात असतें.’

यांतील शेवटील पादांत ‘ वाक्’शब्दाचा अर्थ आम्हीं ‘ स्तुतिरूप वाचा ’ असा केला आहे आणि सायणांनीं ‘ स्तविका अग्नि ’ असा केला आहे, याशिवाय सर्व ऋचेचें भाषांतर सायणभाष्यास अनुसरून दिलें आहे. परंतु पहिल्या पादांत ‘ मिता ’ या शब्दाचा अर्थ काय असेल तें निश्चयानें सांगवत नाहीं. सायणाचार्य ‘परिमिता सद्म’ या शब्दांचा अर्थ गार्हपत्य, आहवनीय इत्यादिक जीं यज्ञांतील अग्नीचीं ‘ परिमित ’ स्थानें तीं होत, असें म्हणतात.

दुसऱ्या पादांत गर्भ, शरदः, पृथिव्याः हे शब्द कठिण आहेत. सायणाचार्य शरदृतूचें आणि भूमीचें फलभूत असें जें धान्य त्याचा केलेला पुरोडाश असें म्हणतात. ओढाताण फार होते, पण दुसरा अर्थ सुचविणेंहि कठिण.

‘ अन्तर्दूतो इ० ’ या चवथ्या चरणांत वाक्शब्देंकरून अग्नि घेतां येईल तर बरें खरें ( पहिले तीन चरण अग्नीविषयींच आहेत असें समजल्यामुळें ); परंतु तसें करणें शक्य दिसत नाहीं. ‘ वाक् ’ म्हणजे स्तुतिरूप जी वाणी ती होय, याविषयीं सू. १६४ मं. ४५ आणि सू. १६७ मं. ३ त्यांजवरील टिपा पाहा.

ता कर्माषतरास्मै प्र च्यौत्नानि देवयन्तो भरन्ते ।
जुजोषदिन्द्रो दस्मवर्चा नासत्येव सुग्म्यो रथेष्ठाः ॥ ४ ॥

ता । कर्म । अषऽतरा । अस्मै । प्र । च्यौत्नानि । देवऽयन्तः । भरन्ते ।
जुजोषत् । इन्द्रः । दस्मऽवर्चाः । नासत्याऽइव । सुग्म्यः । रथेऽस्थाः ॥४॥

तमु ष्टुहीन्द्रं यो ह सत्वा यः शूरो मघवा यो रथेष्ठाः ।
प्रतीचश्चिद्योधीयान्वृषण्वान्ववव्रुषश्चित्तमसो विहन्ता ॥५॥१३॥

तम् । ऊं इति । स्तुहि । इन्द्रम् । यः । ह । सत्वा । यः । शूरः ।
मघऽवा । यः । रथेऽस्थाः ।
प्रतीचः । चित् । योधीयान् । वृषण्ऽवान् । ववव्रुषः । चित् । तमसः ।
विऽहन्ता ॥ ५ ॥ १३ ॥

---

भाषायाम्.

४. ता (=तानि प्रसिद्धानि) अषतरा (=अषतराणि=व्याप्नुवत्तराणि=इन्द्रं प्रति गच्छत्तराणि) [हवींषि] अस्मै [इन्द्राय] कर्म (=करवाम)। देवयन्तः (=देवान् आत्मन इच्छन्तः=देवसेवापरायणा ऋत्विजश्) च्यौत्नानि (=स्तोत्राणि) प्र भरन्ते (=प्रकर्षेण संपादयन्ति=रचयित्वा तस्मै प्रार्पयन्ति)। नासत्या इव (=अश्विनाविव) सुग्म्यः (=सुगम्यः=सुष्ठुगमनोयो) रथेस्थाः (=रथे स्थितो) दस्मवर्चाः (=आश्चर्यकारितेजोयुक्त) इन्द्रस् [तानि] जुजोषत् (=अतिशयेन सेवताम्)॥

५. यो ह सत्वा (=अतिशयेन बलवान्) यः शूरः यो मघवा (=अन्नादिसंपत्पूर्णो) रथेष्ठाः (=रथारूढश्च) [यः] प्रतीचश्चित् योधीयान् (=संमुखं युध्यतः सर्वस्मादपि योद्धृतमो) [यो] वृषण्वान् (=वीर्यवान्) [अपि च] ववव्रुषश्चित् तमसः (=आवरकस्याप्यन्धकारस्य) विहन्ता (=विशेषेण घातको) [भवति] तमु इन्द्रं (=तमेवेन्द्रमुद्दिश्य स्तुतिं कुरु)॥

---

सायणांप्रमाणेंच हा मंत्र अग्निपर लाविला तरी 'नक्षत्, भरत्, क्रन्दत्, हवत्, आणि चरत्' यांचे अनुक्रमें व्यापो, स्वीकरो, किंकाळो, हंबारो, आणि [illegible] सतें, कारण कीं गायत् आणि अर्चत् हीं जीं वर पहिल्या आणि दुसऱ्या [illegible]त क्रियापदें आलीं आहेत त्यांचा अर्थ आपण विध्यर्थी केला आहे तो पाहा.

४. तीं तीं जीं अत्यंत व्यापक [हव्यें], तीं आपण या [इंद्रा]साठीं सिद्ध करूंया, देवाळू [ ऋत्विज् ] स्तोत्रें अर्पण करीत आहेत. नासत्यांसारिखा सुलभ [आणि] रथारूढ [जो] महातेजस्वी इंद्र, [तो तीं ] मोठ्या प्रीतीनें सेवन करो.

५. जो प्रबळ, जो शूर, संपत्तिमान् [ आणि ] जो रथारूढ, [ आणि ] [ जो ] संमुख युद्ध करणाऱ्याहूनहि मोठा योद्धा, [जो] वीर्यवान् [ आणि जो ] ग्रासून टाकणाऱ्या अंधकाराचाहि घातक [ होय ], त्याच इंद्राला स्तव.

4. Let us prepare for him those most reaching [ oblations ]. The god-loving [ priests ] are offering praises. May Indra of wonderful splendor, [who is ] accessible and mounted on a chariot like the Nâsatyas, heartily enjoy them.

5. Praise that Indra alone who [ is ] mighty, who [ is ] brave, who [ is ] munificent, [and] mounted on a chariot, [ who is ] a greater warrior than any that fights face to face, [ who is ] puissant, [and who is] the destroyer even of engrossing darkness.

---

४. 'जेथें इंद्र असेल तेथें सहज प्रविष्ट होणारी अशीं हव्यें आपण इंद्राला अर्पण करूं, आणि आपले देवभक्तिपरायण ऋत्विज् त्याला स्तोत्रें अर्पण करीतच आहेत. तर इंद्र अश्वीप्रमाणें रथांत बसून लवकर आम्हांजवळ येओ आणि ही उपासना ग्रहण करो.'

'स्तोत्रें '=' च्यौत्नानि.' 'च्यौत्न' शब्दाचे वेदांतील दुसरे प्रयोग आणि त्यांवरील सायणभाष्य पाहून हा अर्थ आम्ही केला आहे.

'नासत्यांसारिखा सुलभ '= 'नासत्येव सुग्म्यः' म्हणजे अश्वीप्रमाणें सर्वत्र जाणारा. सर्वांच्या घरीं जाऊन उपासना ग्रहण करणारा.

वृत्तसंबंधानें हा मंत्र म्हणण्यास फार कठिण आहे. यांत दीर्घह्रस्वाची पुष्कळ ओढाताण केल्याशिवाय अक्षरभरती होत नाही. खालीं लिहिल्याप्रमाणें वाचावें लागतें:—

ता कर्म अषतरा अस्मई ।
प्र च्यौत्नानि देवयन्तो भरन्ते ॥
जुजोषदिन्द्रो दस्समवर्चा ।
नासत्या इव सुग्मिओ रथेष्ठाः ॥

५. सूक्तवक्ता आपल्याजवळ असलेल्या होत्याला म्हणतो. 'जो इंद्र प्रब-

प्र यदित्था महिना नृभ्यो अस्त्यरं रोदसी कक्ष्ये३नास्मै ।
सं विव्य इन्द्रो वृजनं न भूमा भर्ति स्वधावाँ ओपशमिव द्याम् ॥६॥

प्र । यत् । इत्था । महिना । नृऽभ्यः । अस्ति । अरम् । रोदसी इति । कक्ष्ये३ इति । न । अस्मै ।
सम् । विव्ये । इन्द्रः । वृजनम् । न । भूम । भर्ति । स्वधाऽवान् । ओपशम्ऽइव । द्याम् ॥ ६ ॥

## भाषायाम्.

६. यत् ( =यथा अनायासम् ) [इन्द्रो] महिना ( =महिम्ना=महत्त्वेन ) नृभ्यः इत्था प्र अस्ति ( =मनुष्येभ्यः सत्यं प्रकृष्टतरोस्ति ) [ तथैव ] अस्मै ( =तस्मा इन्द्राय ) रोदसी कक्ष्ये अरं न (=द्यावापृथिव्यौ कक्ष्यात्वेनापि नालं=न पर्याप्ते भवतः=काञ्चीकर्मणेपि नालं भवतः )। इन्द्रो वृजनं न ( =गृहमिव=अल्पं गृहं यथा तथा ) भूम सं विव्ये (=पृथिवीं सम्यग् वृणोति=संवेष्ट्य वर्तते ) । स्वधावान् ( =बलवान् ) [ इन्द्रो ] द्यां ( =द्युलोकम् ) ओपशम् इव ( =शृङ्गमिव ) भर्ति ( =धारयति ) ॥

ओपशम् इवेति संशयग्रस्तार्थकम् । सायणेनैवं व्याख्यातम् । बिभर्ति । धारणे दृष्टान्तः । ओपशमिव । ईषदुपशेत इत्योपशं शृङ्गम् । तद्वृषभ इव । यद्वा परस्परं समीपे वर्तमानं क्षित्यन्तरिक्षाख्यं लोकद्वयमोपशम् । तदिव द्यां बिभर्ति । लोकत्रयमपि बिभर्तीत्यर्थः । इति ॥

लत्वादि गुणांहीं संपन्न होय त्याचीच तूं स्तुति गा.'

'संपत्तिमान्'=' मघवा.' म्हणजे उदार असें तात्पर्य आहे.

'रथारूढ' 'रथेष्ठाः.' म्हणजे रथावर बसून भजकांच्या यज्ञाप्रत जात असणारा.

'संग्राम युद्ध करणाऱ्याहूनहि मोठा योद्धा'='प्रतीचश्चित् योधीयान्.' हें विशेषण चमत्कारिक आहे यांत संशय नाहीं.

'अंधकाराचा'='तमसः.' येथें अंधकार म्हणजे मेघादिक जो शत्रु त्याचा.

वृत्रासाठीं 'इहि इन्द्र,' 'शूरसो,' आणि 'प्रतीइचश्' असें वाचावें आमचें

६. [इन्द्र] मोठेपणानें [सर्व] मनुष्यांपेक्षां जसा उत्कृष्ट आहे [त्याप्रमाणें]च द्यावापृथिवी ह्या त्याला कंबरपट्ट्या इतक्याहि पुरत नाहींत. इंद्र पृथिवीला [एकाद्या] घराप्रमाणें वेष्टून राहतो. बलवान् [इंद्र] द्युलोकाला शिंगाप्रमाणें धारण करितो.

6. As he is truly superior to [all] men through his greatness, so all earth and heaven do not suffice him [as] a waist-band. Indra surrounds the earth as though [it were] a house. Mighty Indra supports the heaven like a horn.

६. 'इंद्र सर्व मनुष्यांपेक्षां मोठा आहे, आणि त्याप्रमाणेंच द्यावापृथिवीं-पेक्षांहि मोठा आहे, कारण कीं त्या इतक्या मोठ्या आहेत तरी इंद्राच्या कंबरेला जेवढा करदोटा पाहिजे तेवढ्या सुद्धा त्या मोठ्या नाहींत. इंद्र पृथिवीला लहानशा घराप्रमाणें वेष्टून राहतो आणि तो अत्यंत मोठ्या अशा द्युलोकाला धरितो तरी त्याचें ओझें, बैलास शिंगाचें ओझें होत नसतें त्याप्रमाणेंच, त्याला होत नसतें.'

'पृथिवीला एकाद्या घराप्रमाणें'= 'वृजनं न भूम.' येथें 'वृजन' शब्दाचा अर्थ संदिग्ध आहे.

'शिंगाप्रमाणें धारण करितो'='भर्ति ओपशम् इव.' येथेंहि ओपशं हा एक शब्द कठिण आहे. 'ओपश्' शब्द दुसऱ्या दोन तींन ठिकाणीं आला आहे त्यांवरूनहि त्याच्या साधारण अर्थाविषयीं निर्णय करितां येत नाहीं. कितीएक पाश्चात्त्य विद्वान् 'ओपश्' म्हणजे 'शिखा' अथवा 'केश' असा अर्थ करितात; परंतु त्याला ऋग्वेदावरील सायणभाष्यामध्यें आधार नाहीं. शिंग हा अर्थ प्रस्तुत मंत्रावर सायणांनीं दिलेल्या दोन अर्थांपैकीं एक आहे.

वृत्तासाठीं अस्ति । अरम्, आणि कक्षिएन अरमै असें म्हणावें.

समत्सु त्वा शूर सतामुराणं प्रपथिन्तमं परितंसयध्यै ।
सजोषस इन्द्रं मदे क्षोणीः सूरिं चिद्ये अनुमदन्ति वाजैः ॥७॥

समत्ऽसु । त्वा । शूर । सताम् । उराणम् । प्रपथिन्ऽतमम् । परिऽतंसयध्यै ।
सऽजोषसः । इन्द्रम् । मदे । क्षोणीः । सूरिम् । चित् । ये । अनुऽमदन्ति । वाजैः ॥ ७ ॥

---

भाषायाम्.

७. हे शूर [ इन्द्र ], ये (=याः) क्षोणीः (=क्षोण्यः=विशः=जनाः) सजोषसः (=संगताः सत्यो) मदे (=यज्ञे) सूरिं चित् (=प्राज्ञमेव=प्राज्ञं) [ त्वां ] वाजैः (=हविरन्नैः) अनुमदन्ति, (=अनुक्रमेण मादयन्ति हर्षयन्ति) [ ताः क्षोण्यः=ते जनाः ] सतामुराणं (=प्राणिनां बहुमतं=सर्वैः प्राणिभिर्बहुमतं=सर्वेषां प्रियं) प्रपथिन्तमम् (=उत्तममार्गभूतं) त्वा (=त्वामेव) समत्सु (=संग्रामेषु) परितंसयध्यै (=आवर्तयितुम् आह्वानेनानेतुं) [ प्रवृत्ता भवन्ति ] ॥

अस्यायमर्थः । हे इन्द्र, ये जनास्त्वां संग्रामेषु साहाय्यार्थमाह्वयन्ति ते न केवलं संग्रामेष्वाह्वयन्ति अपि तु यज्ञेष्वपि तुभ्यमेव हविरन्नानि प्रापयन्तीति ॥

सतामुराणम् इत्यत्र सतां त्वामेवाश्रित्य वर्तमानानां प्राणिनामुराणम् । उरूण्यति प्रभूतानि बलादीनि कुर्वाणम् । इति सायणः । उराणः उरु कुर्वाण इति यास्कः । पाश्चात्यास्तु वृञ् वरणे इत्यस्य व्रियमाणः वृतः इत्यर्थे कर्मणि रूपमिति सम्यक् ॥

मदशब्दस्य यज्ञार्थकत्वं सायणेनापि गृहीतमस्ति समन्धसा मदेषु वा ह्वोच । (ऋ. ७. २०. ४) इत्येतस्य भाष्ये ॥

७. हे शूर इंद्रा, [ सकळ ] प्राण्यांला आवडणारा [ आणि ] उत्तममार्गरूप असा जो तूं, त्या तुलाच संग्रामांत वळवून आणण्यासाठीं [जन] [उद्युक्त होतात]; कीं जे जन एकत्र मिळून तुज प्रज्ञावान् इंद्राला हव्यांनीं यज्ञांत हर्षवितात.

7. O brave Indra, those people who, meeting together, delight thee the wise one in a sacrifice with offerings of food,–they are ready to invoke in battles none but thee the desired of all beings, thee the best of guides.

---

७. 'हे शूर इंद्रा, जे लोक संग्रामांत तुला, तूं सकळ प्राण्यांला प्रिय असल्यामुळें आणि संकटांतुन पार पडण्याचा उत्तम मार्ग दाखविणारा असल्यामुळें, साहाय्यासाठीं बोलावितात, ते त्याच वेळीं तुला हाक मारितात असें नाहीं, तर यज्ञांतुहि ते तुज प्रज्ञावंतालाच सर्व एकत्र मिळून हव्यें अर्पण करून आनंदवितात.'

'वळवून आणण्यासाठीं [ उद्युक्त ] होतात '=' परितंसयध्यै.' यांत उद्युक्त होतात याबद्दल मुळांत कांहीं शब्द नाहीं तरी त्याच अर्थाच्या शब्दाचा अध्याहार जेथें जेथें 'ध्यै' हा प्रत्यय शेवटीं लागलेलें तुमर्थ अव्यय येतें तेथें तेथें करावा लागतो असें प्रयोगांतरावरून सिद्ध होतें.

'यज्ञांत '=' मदे.' येथें 'मदे' हा शब्द 'समत्सु' या शब्दाशीं विरोधदर्शक आहे. 'मद' शब्दाचा अर्थ 'यज्ञ' असा सायणांनीं ऋ. ७. २०. ४ या मंत्रांवरील भाष्यांत केला आहे. आणि तो येथें इष्ट आहे, यांत तर संशय आम्हांस दिसतच नाहीं.

'जे जन '=' क्षोणीः......ये.' क्षोणि शब्दाचा अर्थ जन अथवा लोक असा केला पाहिजे अशाविषयीं सू. ५४ मं. १ आणि त्याजवरील टीप पाहा. 'क्षोणि' स्त्रीलिंगी असतांहि 'ये' हें पुल्लिंगी पद घातलें आहे तें 'क्षोणि' शब्दाचा जो जन अथवा लोक असा अर्थ तदपेक्षेनें घातलें आहे. अशा प्रयोगांची उदाहरणें ऋग्वेदांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत.

वृत्तासाठी 'इन्दरम्' असें तिसऱ्या पादांत वाचावें लागतें.

एवा हि ते शं सवना समुद्र आपो यत्त आसु मदन्ति देवीः ।
विश्वा ते अनु जोष्या भूद्गौः सूरींश्चिद्यदि धिषा वेषि जनान् ॥८॥

एव । हि । ते । शम् । सवना । समुद्रे । आपः । यत् । ते । आसु । मदन्ति । देवीः ।
विश्वा । ते । अनु । जोष्या । भूत् । गौः । सूरीन् । चित् । यदि । धिषा । वेषि । जनान् ॥ ८ ॥

असाम यथा सुषखाय एन स्वभिष्टयो नरां न शंसैः ।
असद्यथा न इन्द्रो वन्दनेष्ठास्तुरो न कर्म नयमान उक्था ॥ ९ ॥

असाम । यथा । सुऽसखायः । एन । सुऽअभिष्टयः । नराम् । न । शंसैः ।
असत् । यथा । नः । इन्द्रः । वन्दनेऽस्थाः । तुरः । न । कर्म । नयमानः । उक्था ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. [हे इन्द्र], यत् (=यदा ) ते (=तव ) आपो देवीः (=देव्य आपः=द्योतमाना आन्तरिक्षा आपः मेघसंबन्धिन्यः ) समुद्रे आसु मदन्ति ( =अन्तरिक्षे आसु प्रजासु वहन्ति=अन्तरिक्षाद् इमान् जनान् प्रति वहन्ति ) [ तदा ] एवा हि ( =एवं हि अनेन प्रसिद्धेन प्रकारेण=सत्यं ) सवना ( =सवनानि=उपासकैरभिषूय प्रापिताः सोमास् ) ते शं ( =तव सुखकराणि ) [ भवन्ति ]। [ अपि च ] यदि ( =यदा ) [ त्वं ] सूरीन् चित् जनान् ( =यो यः सूरिजनस्तं तं=सर्वानपि सूरीन् जनान्=सर्वान् उपासकान् ) धिषा वेषि ( =औदार्येण कामयसे=वृष्ट्यादिकर्मरूपेणौदार्येण अनुगृह्णासि ) [ तदा ] विश्वा गौः (=स्तुतिरूपा सर्वा वाक् ) ते जोष्या अनु भूत् (=तव प्रीणयित्री भवति ) ॥

इदमुक्तं भवति । हे इन्द्र, यदा यदा त्वं मेघोदकानि मनुष्याणामर्थे अन्तरिक्षाद् वर्षयसि तदा तदा सर्वे जनास्त्वां सोमाहुतिभिर्हर्षयन्ति । यदा यदा मेघवृष्टिरूपम् औदार्यकर्म त्वमुपासकजनार्थे करोषि तदा तदा सर्वेपि स्तोतारस्त्वां स्तुवन्ति । इति ॥

समुद्र आपो यत्त आसु मदन्ति देवीरिति वाक्यं तु दुर्बोधकल्पम् ॥

ये ते वृषणो वृषभास इन्द्र ब्रह्मयुजो वृषरथासो अत्याः ।
ताँ आ तिष्ठ तेभिरा याह्यर्वाङ् हवामहे त्वा सुत इन्द्र सोमे ॥२॥

ये । ते । वृषणः । वृषभासः । इन्द्र । ब्रह्मऽयुजः । वृषऽरथासः । अत्याः ।
तान् । आ । तिष्ठ । तेभिः । आ । याहि । अर्वाङ् । हवामहे । त्वा । सुते । इन्द्र । सोमे ॥ २ ॥

आ तिष्ठ रथं वृषणं वृषा ते सुतः सोमः परिषिक्ता मधूनि ।
युक्त्वा वृषभ्यां वृषभ क्षितीनां हरिभ्यां याहि प्रवतोप मद्रिक् ॥३॥

आ । तिष्ठ । रथम् । वृषणम् । वृषा । ते । सुतः । सोमः । परिऽसिक्ता । मधूनि ।
युक्त्वा । वृषऽभ्याम् । वृषभ । क्षितीनाम् । हरिऽभ्याम् । याहि । प्रऽवता । उप । मद्रिक् ॥ ३ ॥

---

[एतादृशस् त्वम्] इन्द्रः आ[याहि]। स्तुतः (=अस्माभिः स्तुतः सन्) श्रवस्यन् (=हविरन्नमिच्छन्) [त्वं] वृषणा हरी (=वृषणौ हरिद्वर्णावश्वौ=हरिद्वर्णौ युवानावश्वौ) युक्त्वा (=रथे योजयित्वा) अवसा (=अस्मद्रक्षणेन सह=कल्याणं गृहीत्वा) अर्वाङ् मद्रिक् उप आ याहि (=अस्मदभिमुखम् इत आयाहि)॥

---

## भाषायाम्.

२. हे इन्द्र, ते (=तव) वृषणः (=युवानो) वृषभासः (=वृषभाः=श्रेष्ठा) ब्रह्मयुजः (=ब्रह्मणा स्तोत्रेण युज्यमाना) वृषरथासः (=श्रेष्ठरथाः=श्रेष्ठरथे युक्ता) [एतादृशा] ये अत्याः (=अश्वास्) तान् आ तिष्ठ (=आरोह) [आरुह्य च] अर्वाङ् आ याहि (=अस्मदभिमुखमागच्छ)। हे इन्द्र, सोमे सुते [सति] (=सोमरसेभिषुते सति=सोमरसमभिषूय) [वयं] त्वा हवामहे (=त्वामाह्वयामः)॥

३. [हे इन्द्र], वृषा (=श्रेष्ठस्त्वं) ते (=तव) वृषणं रथं (=श्रेष्ठं रथम्) आ तिष्ठ (=आगमनार्थम् आरोह)। [त्वदर्थं हि] सोमः सुतः (=अस्माभिः सोमरसोभिषुतोस्ति)। [अपि च] मधूनि परिषिक्ता (=घृतक्षीरादीनि मधुराणि द्रव्याणि तस्मिन् सोमे सिक्तानि सन्ति)। [अतः कारणात्] हे क्षितीनां वृषभ (=जनानां स्वामिन्), वृषभ्यां हरिभ्यां (=श्रेष्ठाभ्यामश्वाभ्यां) [रथं] युक्त्वा

२. हे इंद्रा, तुझे जे जवान, श्रेष्ठ, स्तोत्रानें जोडिले जाणारे, प्रबळ रथातें वाहणारे, वेगवंत घोडे त्यांवर तूं आरूढ हो, त्यांच्या योगानें तूं इकडे ये.. सोमरस काढून, हे इंद्रा, तुला आम्हीं बोलावीत आहों.

३. [हे इन्द्रा], श्रेष्ठ असा जो तूं तो तुझ्या श्रेष्ठ रथावर आरूढ हो. सोम काढिला [आहे]. त्यांत मधुर गोरस ओतिले [ आहेत ]. [तर] हे जनांच्या प्रभो, तूं श्रेष्ठ घोडे रथाला जोडून सखल मार्गानें मजजवळ ये.

2. Mount, O Indra, those thy horses that are youthful, spirited, accustomed to be yoked through an invocation, [and] that draw an excellent chariot. Come with them hitherwards. We are invoking Thee, O Indra, after extracting the juice.

3. Mount thy excellent chariot, thou who art excellent. The Soma-juice has been extracted. The sweet milk is poured into it. Having yoked, O Lord of peoples, thy excellent pair of tawny horses, come thou to me along the descending path.

---

२. इंद्राचे जे प्रसिद्ध वेगवंत अश्व त्यांला रथास जोडून त्या रथांत बसून इंद्रानें यावें अशी यांत प्रार्थना आहे.

'स्तोत्रानें जोडिले जाणारे'='ब्रह्मयुजः.' उपासकानें स्तोत्र म्हटलें म्हणजे तें ऐकतांच इन्द्र आपल्या रथाला घोडे जोडून येतो अशी प्रथमची कल्पना; नंतर स्तोत्र ऐकतांच इंद्राचे घोडे आपले आपण रथास जुंपले जाऊन इंद्रास घेऊन येतात अशी कल्पना झाली. म्हणून 'स्तोत्राच्या योगानें जोडिले जाणारे' असें विशेषण दिलें आहे. ऋ. ३. ३५. ४ यांत सूक्तकर्ता विश्वामित्र ऋषि म्हणतो, 'हे इंद्रा, स्तोत्रानें जोडिले जाणारे तुझे दोन पिवळे घोडे मी स्तोत्रानें रथाला जोडितों' (ब्रह्मणा ते ब्रह्मयुजा युनज्मि हरी ). ऋषींनी मंत्र उच्चारला म्हणजे त्याबरोबर इष्ट अशा पाहिजे त्या गोष्टी प्राचीनकाळीं लागल्याच घडत, अशी जी आपली समजूत तिचें बीज या कविकल्पनेंत आहे.

वृत्तासाठीं 'याहि अर्वाङ्' असें म्हटलें पाहिजे.

३. 'हे इन्द्रा, हे सोमरस काढून त्यांत मधुर गोरस घातले आहेत; तर तूं आपल्या रथाला तुझी उत्तम घोड्यांची जोडी जोडून मजजवळ ये.'

अयं यज्ञो देवया अयं मियेध इमा ब्रह्माण्ययमिन्द्र सोमः ।
स्तीर्णं बर्हिरा तु शक्र प्र याहि पिबा निषद्य वि मुचा हरी इह ४
अयम् । यज्ञः । देवऽयाः । अयम् । मियेधः । इमा । ब्रह्माणि । अयम् । इन्द्र । सोमः ।
स्तीर्णम् । बर्हिः । आ । तु । शक्र । प्र । याहि । पिब । निऽसद्य । वि । मुच । हरी इति । इह ॥ ४ ॥
ओ सुष्टुत इन्द्र याह्यर्वाङुप ब्रह्माणि मान्यस्य कारोः ।
विद्याम वस्तोरवसा गृणन्तो विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥५॥२०
ओ इति । सुऽस्तुतः । इन्द्र । याहि । अर्वाङ् । उप । ब्रह्माणि । मान्यस्य । कारोः ।
विद्याम । वस्तोः । अवसा । गृणन्तः । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ५ ॥ २० ॥

---

( =युक्तं कृत्वा ) प्रवता ( =प्रवणवता मार्गेण ) उप मद्रिक् याहि ( =मदभिमुखमागच्छ ) ॥

---

## भाषायाम्.

४. [ हे इन्द्र ], अयं देवयाः ( =देवान् प्रति गच्छन् देवान् प्राप्तुमिच्छन् ) यज्ञः ( =अयं पुरो दृश्यमानो देवोत्सुको यज्ञस्त्वदर्थं संपादितोस्ति ) । अयं मियेधः ( =अयं पशुस्त्वदर्थं संभृतोस्ति ) । इमा ब्रह्माणि ( =इमानि स्तोत्राणि ) [ त्वदर्थं कृतानि भवन्ति ] । हे इन्द्र, अयं [ त्वदर्थः ] सोमो [ भवति ] । [ इदं ] बर्हिः स्तीर्णम् ( =इमे दर्भा आसनार्थमास्तृता भवन्ति ) । [ अतः कारणात् ] हे शक्र ( =बलवन्निन्द्र ), आ तु प्र याहि ( =त्वं क्षिप्रम् आगच्छ ) । [ आगत्य च ] निषद्य ( =दर्भेषूपविश्य ) [ सोमं ] पिब । [ एतत्करणाय ] हरी ( =तव हरिवर्णावश्वौ ) इह ( =अत्रास्मिन् देवयजने ) वि मुच ( =रथाद् वियोजय ) ॥

५. हे इन्द्र, सुष्टुतः ( =एवं प्रकारेण अस्माभिः सम्यक् स्तुतः सन् ) मान्यस्य

---

' त्यांत मधुर गोरस ओतिले आहेत '=' परिषिक्ता मधूनि.' अर्वाचीन काळीं मद्यांत लवंग, एलची वगैरे घालून जसें मद्य मसालेदार करितात, तसा प्राचीन काळीं सोमरस दूध, तूप वगैरे घालून मिष्ट करीत असत.

४. हा देवगामी यज्ञ. हा पशु. हीं स्तोत्रें. हे इंद्रा, हा सोम. [हे] दर्भ आंथरले [ आहेत ]. हे प्रबळ [इंद्रा], तूं सत्वर ये. [येऊन] बैस आणि [ सोम ] पी. येथें घोडे सोड.

4. Here is a god-loving sacrifice, here is a victim. Here are hymns [for Thee]. Here, O Indra, is Soma. The kus'a-grass is spread [for Thee]. Come quickly, O mighty [one]. Sit down and drink. Unharness thy tawny steeds here.

५. हे इंद्रा, [ याप्रमाणें ] उत्तम रीतीनें स्तविलेला तूं इकडे मान्य कवीच्या स्तोत्रांप्रत ये. प्रातःकाळीं स्तुति करणाऱ्या आम्हांला तुझ्या कृपेनें लाभ होओ—आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांचा लाभ होओ.

5. Thus highly praised come, O Indra, hitherwards to the hymns of the poet Mânya. Singing hymns [to Thee] in the morning, may we obtain through [thy] favour—may we obtain food, strength, and a son that shall quickly make us rich.

---

४. 'देवगामी'='देवयाः.' म्हणजे देवांकडेस जाण्याविषयीं उत्सुक, देवांचा आपला समागम व्हावा अशाविषयीं तत्पर; देवांची इच्छा करणारा. येथें अचेतनाविषयीं सचेतनकल्पनोक्ति आहे. ऋ. ५. ७६. १ आणि सायणभाष्य पहा.

ह्या मंत्राचा प्रयोग उत्सर्जन आणि उपाकर्म यांत करितात.

या मंत्रांतील पहिल्या व चवथ्या चरणांत अकराबद्दल बारा अक्षरें आहेत. 'देवया अयं' याजबद्दल 'देवयायं' आणि 'हरी इह' याजबद्दल 'हरीह' असें म्हणून वृत्तनिर्वाह केला पाहिजे. दुसऱ्या चरणांतहि 'ब्रह्माण्ययं' बद्दल 'ब्रह्माणि अयं' असें व्यस्त म्हणावें लागतें.

५. 'मान्य कवीच्या'='मान्यस्य कारोः.' मान्य हें विशेषनाम आहे याविषयीं सू. १६५ मं. १५. आणि त्याजवरील टीप पहा.

'प्रातःकाळीं'='वस्तोः.' सायणाचार्य 'दिवसाला,' म्हणजे 'प्रतिदिवसाला' असा अर्थ करून विश्राम (आम्हांस लाभ होओ) याच्याकडे संबंध लावितात.

वृत्तासाठी 'इन्दर याहि अर्वाङ्,' आणि 'मानिअस्य' असें वाचावें लागतें.

## सूक्तम् १७८.

अगस्त्य ऋषिः। इन्द्रो देवता। त्रिष्टुप् छन्दः॥

**यद्ध स्या त इन्द्र श्रुष्टिरस्ति यया बभूथ जरितृभ्य ऊती।**
**मा नः कामं महयन्तमा धग्विश्वा ते अश्यां पर्याप आयोः॥ १॥**

यत्। ह। स्या। ते। इन्द्र। श्रुष्टिः। अस्ति। यया। बभूथ। जरितृऽभ्यः। ऊती।
मा। नः। कामम्। महयन्तम्। आ। धक्। विश्वा। ते। अश्याम्। परि। आपः। आयोः॥ १॥

---

कारोः (=मान्यनाम्न ऋषेः) उपब्रह्माणि (=स्तोत्राणि उपलक्ष्य=स्तोत्राणि सेवितुम्) अर्वाङ् ओ याहि (=अस्मदभिमुखम् आगच्छैव)। वस्तोर्गृणन्तः (=एवं प्रकारेण प्रातःकाले त्वां स्तुवन्तो) [वयम्] अवसा (=त्वत्प्रसादेन) विद्याम (=लभेमहि)—इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं [पुत्रं] (=क्षिप्रधनं पुत्रं) [च] विद्याम (=लभेमहि)॥

---

### भाषायाम्.

१. हे इन्द्र, यद् ह (=यस्मात् कारणात् खलु) ते स्या श्रुष्टिरस्ति (=सा श्रुष्टिस्तवास्ति=तादृशी समृद्धिस्तव हस्ते भवति) यया जरितृभ्य ऊती बभूथ (=तव स्तोतृभ्यः संरक्षणाय भूतोसि=तव स्तोतृणां संरक्षणं कृतवानसि) [तस्मात् कारणात्] मा नो महयन्तं कामम् आ धक् (=अस्मान् महतः कुर्वाणम् अस्माकम् मनोरथं मा धाक्षीः)। आयोर्विश्वा आपः (=आयोर्विश्वानि आपांसि=यजमानस्य सर्वाणि कर्माणि=यजमानैः कर्तव्यानि सर्वाण्यपि यजनादीनि कर्माणि) ते पर्यश्याम् (=तुभ्यं प्रापयेयम्=त्वत्प्रीत्यर्थं करवाणि)॥

## सूक्त १७८.

ऋषि—अगस्त्य. देवता—इन्द्र. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे इंद्रा, जिच्या योगानें तूं वंदकांचें संरक्षण करीत आला आहेस अशी समृद्धि ज्यापेक्षां तुझ्या घरीं आहे, [ त्यापेक्षां ] आमच्या उत्कर्षक मनोरथाला तूं जाळून टाकूं नको. उपासकानें करावयाचीं सर्व कर्मे मजकडून त्वत्प्रीत्यर्थ घडोत.

## HYMN. 178.

To *Indra*. By *Agastya*. Metre, *Trishṭubh*.

1. Since thou hast, O Indra, that affluence whereby thou hast become a protector to [thy] praisers, mayest thou never burn our ennobling desire: may I perform for Thee all the works of a worshipper.

---

१. 'अशी समृद्धि '=' स्या श्रुष्टिः'. अक्षरशः 'ती समृद्धि,' म्हणजे दुसऱ्या पादांत सांगितलेली जी तशा प्रकारची.

'मजकडून त्वत्प्रीत्यर्थ घडोत '=' ते अश्यां परि.' अश् धातूचा अर्थ 'करणें,' 'अर्पण करणें,' 'संपादणें,' 'पावविणें' असा होतो याविषयीं प्रयोगप्रमाणें पुष्कळ आहेत. उदाहरणार्थः— 'श्यावाश्वस्ते सवितः स्तोममानशे '= हे सवित्या, श्यावाश्व ऋषि त्वत्प्रीत्यर्थ स्तोत्र करितो ("हे सवितस्ते तुभ्यं श्यावाश्व ऋषिः स्तोमं स्तोत्रमानशे व्याप्नोति करोतीत्येतमात्मानं परोक्षतया निर्दिशन्नाह" सा०) ऋ. ५. ८२. ५. शिवाय ऋ. ६. १. ९ यांत 'यस्त आनट् समिधा हव्यदातिम्'=जो यजमान तुला समिधेनें हव्यदान करितो ("यो यजमानस्ते तव समिधा सह हव्यदातिं हविषां दानमानट् करोति," सा०). आणि विशेषेंकरून ऋ. ६. १३. ४ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

वृत्तासाठीं 'इन्दर,' 'कआमं' आणि 'परि आप आयोः' असें म्हणावें लागतें.

न घा राजेन्द्र आ दभन्नो या नु स्वसारा कृणवन्त योनौ ।
आपश्चिदस्मै सुतुका अवेषन्गमन्न इन्द्रः सख्या वयश्च ॥ २ ॥

न । घ । राजा । इन्द्रः । आ । दभत् । नः । या । नु । स्वसारा । कृणवन्त । योनौ ।
आपः । चित् । अस्मै । सुऽतुकाः । अवेषन् । गमत् । नः । इन्द्रः । सख्या । वयः । च ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. स्वसारा (=स्वसारौ=अहोरात्ररूपे) या नु (=यानि यानि) योनौ कृणवन्त (=स्वस्वस्थाने कुरुतस्) [तानि तानि] राजा इन्द्रो नो ना दभत् (=अस्मभ्यं मा हिंसतु)। सुतुकाः (=शोभनबला) [ऋत्विजः] अस्मै (=तस्मा इन्द्राय) आपश्चित् अवेषन् (=हवींषि प्रापयन्तु) [अपि च] इन्द्रो नः (=अस्मान्) सख्या वयश्च (=सर्वप्रकाराणि स्वसखत्वानि अन्नं प्रति च) गमत् (=गमयतु)॥

वयमिन्द्राय हवींषि प्रार्पयाम इन्द्रश्चास्मान् स्वसखान् स्वसमृद्धिभाजश्च करोत्वित्यर्थः ॥

इन्द्रो नोऽस्मदीयानि कर्माणि ना दभत्। सर्वतो न हिंस्यात्। कानीति उच्यते। या यानि कर्माणि वृष्ट्यादिरूपाणि स्वसारा परस्परं स्वसृभूते स्वयंसरणभूते अहोरात्रे। नु पूरणः। योनौ स्वकीये स्थाने कृणवन्त॥ द्विवचनस्थाने बहुवचनम्। कुरुतः॥ ............तानीन्द्रोऽप्यनुजानात्वित्यर्थः। स्वसृभूतावध्वर्युयजमानौ वा कुरुतः। यद्वा स्वसारोऽङ्गुलयो योनौ फलोत्पादनस्थाने यज्ञे यानि कृतवन्तस्तानीति योज्यम्। किं च अस्मा इन्द्राय सुतुकाः शोभनबलहेतून्यापोऽप्कार्याणि हवींष्यवेषन्। व्याप्नुवन्ति। नोऽस्मभ्यमिन्द्रः सख्या सख्यानि वयश्च प्रभूतमन्नं च गमत्। गमयतु॥

२. दोघी बहिणी आम्हांकरितां [आपआपल्या] स्थानीं जें जें करितात त्याची हानि राजा इंद्र न करो. बलप्रद [ऋत्विज्] याला हवि अर्पण करोत, आणि इंद्र आम्हांला आपलें सख्य आणि बळ प्राप्त करो.

2. May king Indra never destroy that which the two sisters prepare for us in [their respective] spheres. Let the strength-inspiring [priests] offer him oblations, [and] may Indra grant us [his] friendship and food.

---

२. 'इंद्र आमची कोणत्याहि प्रकारें हानि न करो. आम्ही आपल्या ऋत्विजांसह त्याला हव्यें अर्पूया, आणि इन्द्र आम्हांला आपले मित्र समजून बळ देऊन समृद्ध करो.' परंतु ह्या मंत्रात 'स्वसारा' सांगितल्या त्या कोण आहेत, तें स्पष्ट समजत नसल्यामुळें मंत्र किंचित् दुर्बोध झाला आहे, आणि तिसऱ्या पादांत 'सुतुकाः' याच्या अर्थाविषयीं थोडा वाद आहे. सायणभाष्य पहा.

'दोघी बहिणी '=' स्वसारा.' म्हणजे दिवस आणि रात्र असें सायण म्हणतात. द्युलोक आणि पृथिवी असा अर्थ संभवतो. आणि मग द्युलोक आणि पृथिवी यांत ज्या ज्या कल्याणाच्या गोष्टी व्हावयाच्या त्यांची हानि करूं नको असा भावार्थ समजला पाहिजे.

'बलप्रद [ऋत्विज्]'=' सुतुकाः.' म्हणजे ज्यांच्या स्तोत्रांनीं आणि हवींनीं आराधित देवतांस पराक्रम करण्याविषयीं बळ आणि उत्साह प्राप्त होतात तसे.

'इंद्र आम्हांला आपलें सख्य आणि बळ प्राप्त करो '=' गमत् नः इन्द्रः सख्या वयश्च.' याचा अर्थ इन्द्र आमचें सख्य आणि हविरन्न याजप्रत येओ असा कितीएक पाश्चात्त्यांनीं जाणविल्याप्रमाणें संभवतो.

वृत्तसुखार्थ 'राजा इन्दर' आणि 'सखिआ' असें वाचावें लागतें.

जेता नृभिरिन्द्रः पृत्सु शूरः श्रोता हवं नाधमानस्य कारोः ।
प्रभर्ता रथं दाशुष उपाक उद्यन्ता गिरो यदि च त्मना भूत् ॥३॥

जेता । नृऽभिः । इन्द्रः । पृत्ऽसु । शूरः । श्रोता । हवम् । नाधमानस्य । कारोः ।
प्रऽभर्ता । रथम् । दाशुषः । उपाके । उत्ऽयन्ता । गिरः । यदि । च । त्मना । भूत् ॥ ३ ॥

एवा नृभिरिन्द्रः सुश्रवस्या प्रखादः पृक्षो अभि मित्रिणो भूत् ।
समर्य इषः स्तवते विवाचि सत्राकरो यजमानस्य शंसः ॥ ४ ॥

एव । नृऽभिः । इन्द्रः । सुऽश्रवस्या । प्रऽखादः । पृक्षः । अभि । मित्रिणः । भूत् ।
सऽमर्ये । इषः । स्तवते । विऽवाचि । सत्राऽकरः । यजमानस्य । शंसः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. शूर इन्द्रो नृभिः (=वीरैर्मरुद्भिः सहितः सन्) पृत्सु जेता (=संग्रामेषु शत्रूणां जेता) [भवति]। [स] नाधमानस्य (=रक्षणं याचमानस्य) [यस्य कस्यापि] कारोः (=स्तोतुर्) हवं श्रोता (=आह्वानस्य श्रोता) [भवति]। [स] दाशुषो रथम् उपाके प्रभर्ता (=हविर्दत्तवतो यजमानस्य रथस्य संग्रामे विजयस्थानसमीपे प्रकर्षेण नेता) [भवति]। यदि च [गिर उद्यन्ता] भूत् (=यदि स्तोतृषु स्तोत्रशक्तिप्रेरणमना भवेत्तर्हि) त्मना गिर उद्यन्ता (=अनन्यप्रेरित एव स्तोत्राणि उच्चारयिता=स्वयमेव स्तोत्राणामुच्चारयिता) [भवति] ॥

४. एव (=एवमेव=यथेन्द्रः पृत्सु जेतृत्वगुणोपेतः समराङ्गणे यजमानस्याह्वानं शृणोति तस्य च रथं विजयिनं करोति तथैव) इन्द्रः पृक्षः प्रखादः (=हविरन्नानां प्रकर्षेण भक्षयिता सन्) नृभिः (=वीरैर्मरुद्भिः सहितः) सुश्रवस्या अभि मित्रिणो भूत् (=शोभनान्नेच्छया मित्रभूतानुपासकान् प्रति आभिमुख्येन भवति=तान् अभि गच्छति)। [गत्वा च] सत्राकरः (=सत्यकारी=मनोरथपूरको) यजमानस्य शंसः (=उपासकस्य शंसनीयः=उपासकस्तोत्रविषयः सन्) विवाचि समर्ये (=विविधस्तोत्रशस्त्रध्वनियुक्ते यज्ञे) इषः स्तवते (=हविरन्नानि यजमानैः समर्पितानि हविरन्नानि स्तौति सम्यगर्पितान्येतानि समीचीनान्यन्नानीति प्रशंसति) ॥

३. शूर इंद्र संग्रामांत वीरांसहित विजयी [होय], [तो] धांवा करणाऱ्या स्तोत्याची हाक ऐकणारा [होय], उपासकाचा रथ जवळ पुढें आणणारा [होय], [आणि] त्याच्या मनाला येईल तर आपणहूनच स्तोत्रें उच्चारविणारा [होय].

3. Brave Indra is the victor in battles, in company with [his] warriors [the Maruts]. He is the hearer of the call of the poet praying for help. He brings forward to the front the chariot of the worshipper. He is the inspirer of hymns of his own accord when it pleases him.

४. तसाच हविरन्नें खाऊन टाकणारा इन्द्र हविरन्नाच्या मोठ्या इच्छेनें वीरांसहित आपल्या मित्रांकडे जात असतो. उपासकानें स्तविलेला सत्यकारी [इन्द्र] अनेक नादांनीं भरलेल्या यज्ञांत हविरन्नांची प्रशंसा करितो.

4. In the same way Indra, who heartily consumes the oblations, turns towards his sacrificing friends in company with the heroes [the Maruts], eagerly desirous of sacrificial food. Indra, the gratifying subject of the sacrificer's hymn, commends the offerings in the sacrificial assembly ringing with various voices.

---

३. 'वीरांसहित'='नृभिः.' म्हणजे शूर असे जे मरुत् त्यांला बरोबर घेऊन.

'उपासकाचा रथ जवळ पुढें आणणारा [होय]'='प्रभर्ता रथं दाशुष उपाके.' म्हणजे युद्धांत इंद्रोपासकाचा रथ पुढें आणून विजयी करणारा होय.

'त्याच्या मनास इ०'. म्हणजे जर इंद्राच्या मनाला येईल कीं कोणाला तरी ऋषि करावें तर तो लागलाच त्याला ऋषि करणारा होय.

वृत्तार्थ 'इन्दर' असें म्हणावें लागतें.

४. वरच्या मंत्रांत सांगितलें कीं, इंद्र उपासकांचा धांवा ऐकून त्यांच्या साहाय्यासाठीं समरांगणांत जातो, आणि त्याचा रथ पुढें नेऊन त्याला विजयी करितो. आतां म्हणतो कीं, 'इंद्र केवळ संग्रामांत उपासकाप्रत येतो इतकेंच नाहीं, तर यज्ञांतहि उपासकाचें हविरन्न खाण्याकरितां मरुतांस घेऊन येतो, आणि अनेक प्रकारचीं अनेक ऋत्विजांनीं म्हटले-

त्वया वयं मघवन्निन्द्र शत्रूनभि ष्याम महतो मन्यमानान् ।
त्वं त्राता त्वमु नो वृधे भूर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥५॥२१॥
त्वया । वयम् । मघऽवन् । इन्द्र । शत्रून् । अभि । स्याम । महतः । मन्यमानान् ।
त्वम् । त्राता । त्वम् । ऊं इति । नः । वृधे । भूः । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ५ ॥ २१ ॥

अत्रेदमुक्तम् । यथेन्द्रः स्वसखैर्मरुद्भिः सहितः समराङ्गणे स्वोपासकानां साहाय्यार्थमाह्वानं श्रुत्वा तान् प्रति गच्छति तांश्च विजयिनः करोति तथैव मरुद्भिः सहितः स तेषां हविरन्नं प्रेम्णा भक्षयितुं तानभिगच्छति तेषां च स्तोत्राणि सेवित्वा तैर्दत्तं हविरन्नं सम्यक्सम्यगिति प्रशंसतीति ॥

## भाषायाम्.

५. हे मघवन् (=धनवन्निन्द्र), त्वया [सहायेन] वयं महतो मन्यमानान् (=आत्मानं महतो मन्यमानान्) शत्रून् अभि स्याम (=अभिभवेम=जयेम)। त्वं [नस्] त्राता त्वम् उ (=त्वं च) नो वृधे (=अस्माकमभिवृद्धये=अस्माकं धनादिवर्धनाय) भूः (=भव)। [वयम्] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

लीं स्तोत्रें ऐकून घेऊन, हविरन्नें सेवितो आणि फार चांगलीं, फार चांगलीं हीं हव्यें अशी प्रशंसा करितो.'

'वीरांसहित'=' नृभिः.' म्हणजे मरुतांसहित. मरुत् जसे इंद्राबरोबर संग्रामांत उपासकाप्रत जातात, (पूर्वील मंत्र पहा) तसे यज्ञांतहि हवि भक्षण्याकरितां ते त्याजबरोबर जातात.

'आपल्या मित्रांकडे'=' अभि मित्रिणः.' म्हणजे इंद्र मित्र आहे ज्यांचा अशा उपासकांकडे; अर्थात् इंद्राचे मित्रभूत जे उपासक त्यांजकडेस.

'उपासकानें स्तविलेला'=' यजमानस्य शंसः.' अक्षरशः यजमानाचा अथवा उपासकाचा स्तोत्रविषय. ऋ. ६. २४. २ यांत इंद्रास 'नरां शंसः' ("नृणां शंसनीयः इन्द्रः" मनुष्यांनीं वर्णावयाचा, स्तवावयाचा, स्तवनविषय) असें म्हटलें आहे तें पहा. ऋ. ४. ६. ११ यांत अग्नीला 'शंसम् आयोः' असें म्हटलें आहे (सा० "मनुष्यस्य शंसं शंसनीयं होतारम् अग्निम्"=' यजमानाचा स्तवनविषय') तें पहा.

वृत्रासाठीं 'इन्दरः' असें म्हणावें लागतें.

५. हे संपत्तिमान् इंद्रा, आपणास मोठे मानणारे असे जे शत्रु त्यांसहि तुझ्या साहाय्यानें आम्ही जिंकूं असें कर. तूं आमचा तारक, आमचा उत्कर्ष करणारा हो. आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

5. May we, O wealthy Indra, through thee [as our ally] conquer our enemies who think themselves great. Be thou our preserver and our promoter. May we obtain food, strength, [and a son] that shall quickly make us rich.

५. वृत्तासाठीं 'तुअं तराता' असें म्हणावें.

## सूक्तम् १७९.

अत्र त्रयाणां ऋचानां लोपामुद्रागस्त्यतच्छिष्यैर्दृष्टत्वात्त एवर्षयः। सूक्तप्रतिपाद्योऽर्थो रतिर्देवता। इति सायणः। उपान्त्या बृहती। शिष्टं सूक्तं त्रैष्टुभम्॥

**पूर्वीरहं शरदः शश्रमाणा दोषा वस्तोरुषसो जरयन्तीः।**
**मिनाति श्रियं जरिमा तनूनामप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः॥ १॥**

पूर्वीः। अहम्। शरदः। शश्रमाणा। दोषाः। वस्तोः। उषसः। जरयन्तीः।
मिनाति। श्रियम्। जरिमा। तनूनाम्। अपि। ऊं इति। नु। पत्नीः। वृषणः। जगम्युः॥ १॥

---

## भाषायाम्.

१. लोपामुद्रा ब्रूते।

[हे अगस्त्य], अहं पूर्वीः शरदः (=बह्वीः शरदः=बहूनि वर्षाणि) दोषा वस्तोः (=रात्रावहनि) जरयन्तीरुषसः (=जनान् सर्वान् जीर्णान् कुर्वतीरुषसः=प्रत्यहमुषः-काले) [च] शश्रमाणा (=अद्यतनकालपर्यन्तं श्रान्ताभूवम्)। जरिमा (=जरा) तनूनां श्रियम् (=अङ्गानां सौन्दर्यं) मिनाति (=हिनस्ति)। वृषणः (=सेक्तारः कामवन्तः पुरुषाः) पत्नीः (=स्त्रियः) अप्यू नु जगम्युः (=गच्छेयुः खलु=गच्छन्तीति न मे संशयः)॥

लोके हि पत्नीः स्त्रियो वृषणः सेक्तारः पुरुषा जगम्युः। गच्छेयुः। संभोगं कुर्युः। अतो मां किमित्यवमन्यसे। इति सम्यक् सायणः॥

## सूक्त १७९.

ऋषि–१ आणि २ ह्या ऋचा लोपामुद्रेनें म्हटल्या आहेत, ३ आणि ४ ह्या अगस्त्यानें म्हटल्या आहेत, आणि ५ आणि ६ ह्या अगस्त्याच्या शिष्यानें म्हटल्या आहेत, म्हणून १,२ यांचा ऋषि लोपामुद्रा; ३,४ यांचा अगस्त्य; आणि ५,६ यांचा ऋषि अगस्त्याचा शिष्य; असें सायण म्हणतात. देवता–रति. वृत्त–१-४ त्रिष्टुभ्, ५ बृहती, ६ त्रिष्टुभ्.

१. मी पुष्कळ वर्षे, रात्री, दिवसाला आणि वार्धक्य आणणाऱ्या उषःकाळीं श्रम केले आहेत. जरा गात्रांच्या शोभेला नाहींशी करिते. काय पुरुष आपल्या स्त्रियांप्रत जात असतीलच कीं नाहीं ?

## Hymn 179.

To *Love.* Verses 1 and 2 are attributed to *Lopâmudrâ*, the wife of the poet and sage *Agastya* verses 3 and 4 to *Agastya*; and verses 5 and 6 to Agastya's disciple. Metre—*Trishṭubh*, except as regards verse 5 where it is *Bṛihatî*.

1. For many autumns, night and day, [and ] at the dawns that make the world old, have I exerted myself. Old age destroys the beauty of the limbs. Husbands must certainly be uniting with their wives ?

---

१. हें सूक्त जसें चमत्कारिक तसेंच किंचित् दुर्बोधहि आहे. सायण ( पूर्वील ग्रंथकारांस अनुसरूनच यांत संशय नाहीं) म्हणतात त्यावरून अशी कथा आहे कीं, लोपामुद्रा ही जी अगस्त्य ऋषीची स्त्री, तिला काम उत्पन्न झाला. आणि तिणें त्याच्या शमनार्थ अगस्त्याशीं बोलणें लाविलें त्याविषयीं पहिल्या दोन ऋचांत सांगितलें आहे. नंतर अगस्त्य ऋषीनें उत्तर दिलें आणि तिचा मनोरथ पूर्ण करण्याचें मान्य केलें तें तिसरी आणि चवथी या ऋचांत सांगितलें आहे. दोघें जणें बोलत असतां त्याचें बोलणें अगस्त्याच्या एका शिष्यानें ऐकिलें म्हणून त्याला पश्चात्ताप झाला आणि तो जें बोलला तें शेवटच्या दोन ऋचांत आहे.

आतां ही कथा जरी सर्व अंशीं सूक्ताशीं जुळत नाहीं, तथापि इतकें खरें आहे कीं, पहिल्या आणि दुसऱ्या ऋचेंत नवऱ्याबरोबर फार वर्षे एकनिष्ठेनें

ये चिद्धि पूर्व ऋतसाप आसन्त्साकं देवेभिरवदन्नृतानि ।
ते चिदवासुर्नह्यन्तमापुः समू नु पत्नीर्वृषभिर्जगम्युः ॥ २ ॥

ये । चित् । हि । पूर्वे । ऋतऽसापः । आसन् । साकम् । देवेभिः । अवदन् । ऋतानि ।
ते । चित् । अव । असुः । नहि । अन्तम् । आपुः । सम् । ऊं इति । नु । पत्नीः । वृषऽभिः । जगम्युः ॥ २ ॥

## भाषायाम्.

२. [ हे पते अगस्त्य ], ये चित् हि ( =ये ये केपि ) पूर्वे ( =पुरातना ऋषयः ) ऋतसापः ( =ऋतस्पृशः=देवभक्तिरूपस्य सत्यस्य ब्रह्मचर्यमाचरिष्यामीति कृतसंकल्पा ब्रह्मचर्यमेव सत्यमाचरन्त ) आसन् [ अपि च ] देवेभिः साकं ( =देवैः सह ) ऋतानि ( =सत्यवचनान्येव=यथासंकल्पान्येव वचनानि ) अवदन् ( =उदचारयन् ) ते चित् ( =त एव=तेपि ) अवासुः ( =? रेतः क्षिप्तवन्तः ) । नहि अन्तम् आपुः (=ब्रह्मचर्यव्रतस्यान्तं न प्रापुः) । पत्नीः (=पत्न्यः=स्त्रियो) वृषभिः (=पुरुषैः) समु नु जगम्युः ( =अपि संगच्छेरन्=संगच्छन्त एवेति न मे संशयः ) ॥

अतस्त्वं कथं मां नानुभवसीत्यर्थः इति सम्यक् सायणः ॥

काम करून शेवटीं ब्रह्मचर्याला कंटाळलेल्या एका स्त्रियेचें ( आणि तें बहुतकरून लोपामुद्रेचें ) भाषण आहे; आणि पुढच्या दोन ऋचांत तिच्या नवऱ्याचें भाषण असून तो तिचें समाधान करीत आहे आणि तिच्या म्हणण्यास कबूल होतो. मात्र शेवटच्या दोन ऋचांत शिष्याचें भाषण नसून वधूवरांनेंच असावें असें, अथवा त्या दोन मंत्रांचा संबंध या सूक्ताशीं नाहींच असें समजून, अर्थ करणें हें बरें असें दिसतें. तें पुढें दिसून येईल.

या पहिल्या मंत्रांत स्त्री म्हणते, ' मी आजपर्यंत पुष्कळ वर्षेपर्यंत रात्रंदिवस आणि पहाटेलाहि तुजबरोबर देवोपासनेचे अतिशय श्रम केले आणि आतां मी म्हातारीहि दिसूं लागल्यें. आतां आम्ही ब्रह्मचर्य आणखी किती दिवस पाळावयाचें आणि दांपत्यधर्म आचरावयाचा तो कधीं? जगांत स्त्रीपुरुषें आपला दांपत्यधर्म आचरितात कीं नाहीं?'

' वार्धक्य आणणाऱ्या उषःकाळीं '= ' जरयन्तीः उषसः.' सू. ९२ मं. १० आणि टीपा पहा.

' जरा गात्रांच्या शोभेला नाहींशी करिते '=' मिनाति श्रियं जरिमा तनूनाम्.'

२. जे जे म्हणून प्राचीनकाळीं सत्य आचरणारे होऊन गेले [ आणि ] देवांबरोबर सत्य बोलत असत, तेहि उत्सर्ग करीत असत; त्यांनाहि अंत लागला नाहीं. स्त्रिया पुरुषांबरोबर संग करीतच असतील.

2. Even those ancients who practised truth [and] who spoke truth with the gods, even they emitted; they did not attain the end [of their vow]. Wives must be uniting with their husbands.

लोपामुद्रा ही प्राचीन इतिहासाप्रमाणें वेदसूक्ताची कर्त्री होय, तरी ती आपण म्हातारी होत आहें असें म्हणते, आपण अमर आणि अजर आहें असें म्हणत नाहीं याकडे लक्ष्य देण्यासारिखें आहे.

२. लोपामुद्रा आणखी म्हणते, ' केलेला निश्चय पाळणारे म्हणून जे जे आजपर्यंत सत्यव्रत पुरुष होऊन गेले, आणि ज्यांनीं देवांशीं ( स्तोत्रादिरूपानें ) बोलतांना एक बोलावें आणि करतांना पाहिजे तें करावें असें कधींहि केलें नाहीं, तर जें व्रत पाळावयाचें असा निश्चय असे तेंच जे बोलत, त्यांलाहि कामानें सोडिलें नाहीं, आणि हें खरेंच आहे; कारण की लोकांत अशी चालच आहे कीं स्त्रियांनी पतीशीं संग करावा.'

' देवांबरोबर सत्य बोलत असत '= ' देवेभिः साकम् अवदन् ऋतानि.' म्हणजे देवांची स्तुति करितांना आणि आपण अशा प्रकारें वर्तेन, तसें करणार नाहीं असें वचन देतांना जें करण्याविषयीं अथवा न करण्याविषयीं खरोखर निश्चय झालेला असेल, तेंच बोलत असत. मनस्येकं वचस्येकम् अशा रीतीनें बोलत नसत.

' उत्सर्ग करीत असत '=' अवासुः.' म्हणजे "अवक्षिपन्ति रेतः" असें सायण म्हणतात त्याला अनुसरून आम्हीं अर्थ केला आहे. परंतु असाच कांहीं भावार्थ असावा इतकें खरें आहे तथापि अक्षरार्थ तसाच आहे की नाहीं याविषयीं संशय आहे.

या ऋचेवरून दोन गोष्टी अशा सिद्ध होतात कीं, (१) वेदाच्या काळीं म्हणजे अतिप्राचीन काळींहि ब्रह्मचर्यव्रत हें देवप्राप्तीला साधक आहे आणि तें आचरणें हें मोठें पुण्य आहे असें मानीत असत, आणि (२) तें व्रत पाळणें हें मानवी स्वभावाला अत्यंत कठीण होय, तें शेवटास ज्यांनीं नेलें असे जर कोणी असतील तर ते फारच थोडे. सांप्रत या पृथिवीवर जे जे धर्म आहेत त्यांत ब्रह्मचर्यव्रत पाळणें हें मोठें श्रेय होय असें मानण्याची चाल आहे.

वृत्तासाठीं ' नहि अन्तम् ' असें म्हणावें लागतें.

**न मृषा श्रान्तं यदवन्ति देवा विश्वा इत्स्पृधो अभ्यश्नवाव ।**
**जयावेदत्र शतनीथमाजिं यत्सम्यञ्चा मिथुनावभ्यजाव ॥ ३ ॥**

न । मृषा । श्रान्तम् । यत् । अवन्ति । देवाः । विश्वाः । इत् । स्पृधः । अभि । अश्नवाव ।
जयाव । इत् । अत्र । शतऽनीथम् । आजिम् । यत् । सम्यञ्चा । मिथुनौ । अभि । अजाव ॥ ३ ॥

**नदस्य मा रुधतः काम आगन्नित आजातो अमुतः कुतश्चित् ।**
**लोपामुद्रा वृषणं नी रिणाति धीरमधीरा धयति श्वसन्तम् ॥४॥**

नदस्य । मा । रुधतः । कामः । आ । अगन् । इतः । आऽजातः । अमुतः । कुतः । चित् ।
लोपामुद्रा । वृषणम् । निः । रिणाति । धीरम् । अधीरा । धयति । श्वसन्तम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. अगस्त्यो ब्रूते ।

१ न मृषा श्रान्तं (=त्वया श्रमैर्यत्कृतं तन्नानर्थकं) यद् (=यस्माद्) देवा अवन्ति (=सर्वेपि देवा अस्माभिः प्रीताः सन्तोस्मान् रक्षन्ति)। [आवां] विश्वा इत् स्पृधः (=सर्वानप्यरीन्) अभि अश्नवाव (=अभितो व्याप्नुयाव=जेतुं समर्थौ स्वः)। [अपि च] अत्र (=अस्मिन् संसारे) शतनीथम् आजिं जयाव इत् (=शतसंख्याकसाधनयुक्तं=शतशः प्राप्तयो यस्मात्तं संग्रामं जितवन्तावेव) यद् (=यस्माद्) [आवां] सम्यञ्चा (=सम्यञ्चौ=परस्परं सम्यग्गच्छन्तौ=प्रेमभावेन वर्तमानौ) मिथुनौ (=मिथुनीभूतौ सन्तौ) अभि अजाव (=परस्परं संगतावभवाव) ॥

यस्मान्नो देवाः प्रसन्ना भूता रक्षन्ति सर्वानपि शत्रून् जेतुं सामर्थ्यं वर्तत आवयोः यस्माच्च त्वं चाहमपि मिथुनभूतौ परस्परं प्रेम्णा वर्तावहे अतः कारणात् अद्य यावत् त्वया यच्छ्रान्तं तन्नानर्थकं श्रान्तम् आवां च संसारे दुर्लभं जयं प्राप्तवन्ताविति भावः ॥

४. रुधतः (=रेतसो निरोद्धुर्) नदस्य (=शब्दं कुर्वतः=वृषणः=कामिनो बलीवर्दस्याश्वस्य वा) कामः (=रतीच्छालक्षणो) मा आ अगन् (=मामागमत्)। [स

३. श्रम व्यर्थ नाहीं केले. कारण कीं देव [ आम्हांला ] संरक्षितात. सर्वेहि शत्रूंला आम्हीं जिंकिलें. ज्यापेक्षां प्रेमयुक्त तुझें माझें दंपत परस्पर एकमतानें वागतें त्यापेक्षां या संसारांत शतावधि लाभ ज्यापासून व्हावयाचे असा संग्राम आपण जिंकिला.

४. अवरोधून धरणाऱ्या पोळाचा काम मला प्राप्त झाला आहे,— इकडून, तिकडून [ आणि ] सर्व ठिकाणांहून उत्पन्न झाला आहे. लोपामुद्रा मज कामीला वश करिते. बुद्धिहीन [ लोपामुद्रा ] मज बुद्धिमंताला [ आणि ] बळवंताला भोगिते.

3. Not in vain hast thou exerted thyself, since the gods [have begun to] protect us. We can subdue all enemies whatsoever. We have in this life won the race that gives a hundred benefits, since we unite with each other, a well-matched pair.

4. The desire of a self-denying stallion has come upon me. It has sprung from here, from there, [and] from everywhere. Lopâmudrâ seduces the man. The timid woman draws out the wise [and] brave man!

---

३. अगस्त्य उत्तर देतोः ' तूं मजबरोबर इतकीं वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य आचरून देवोपासनेचे कष्ट केलेस, ते व्यर्थ गेले असें समजूं नको. कारण आम्हीं आपल्या ब्रह्मचर्यानें आणि सततोपासनेनें देवांस प्रसन्न करून घेतलें आहे, त्यामुळें ते आमचें संरक्षण करूं लागले आहेत, आणि पाहिजे त्या शत्रूंचा पराजय करण्याचें सामर्थ्य आमच्या आंगीं आलें आहे. शिवाय, तूं आणि मी आजपर्यंत एकमतानें व प्रेमानें वागलों, हेंच एक मोठें श्रेय, हाच एक मोठा जय आपण संपादिला. याहून आणखी काय पाहिजे ?' वृत्तासाठीं ' अभि अश्नवाव ' असें म्हणावें लागतें.

४. वरील ऋचेंत ऋषीनें पहिल्या ऋचेच्या पहिल्या तीन पादांचें उत्तर दिलें. 'अप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः' हा जो चवथा पाद त्याचें दिलें नाही, तें या चवथ्या ऋचेंत दिलें आहे. ऋषि स्त्रियेला वश होऊन म्हणतो, मी तुला वश झालों, मी कामानें चोहींकडून व्याप्त झालों आहें. तूं अबला आणि मी पुरुष प्रबळ, असें आहे तथापि आणि मी धीमान् व तूं प्रज्ञारहित असें म्हणतात तरी, तूं मला वश केलेंस.'

इमं नु सोममन्तितो हृत्सु पीतमुप ब्रुवे ।
यत्सीमागश्चकृमा तत्सु मृळतु पुलुकामो हि मर्त्यः ॥ ५ ॥

इमम् । नु । सोमम् । अन्तितः । हृत्ऽसु । पीतम् । उप । ब्रुवे ।
यत् । सीम् । आगः । चकृम । तत् । सु । मृळतु । पुलुऽकामः । हि ।
मर्त्यः ॥ ५ ॥

अगस्त्यः खनमानः खनित्रैः प्रजामपत्यं बलमिच्छमानः ।
उभौ वर्णावृषिरुग्रः पुपोष सत्या देवेष्वाशिषो जगाम ॥ ६ ॥
॥ २२ ॥ २३ ॥

अगस्त्यः । खनमानः । खनित्रैः । प्रऽजाम् । अपत्यम् । बलम् । इ-
च्छमानः ।
उभौ । वर्णौ । ऋषिः । उग्रः । पुपोष । सत्याः । देवेषु । आऽशिषः ।
जगाम ॥ ६ ॥ २२ ॥ २३ ॥

---

काम ] इतो [ दिशः ] अमुतः ( =ततो दिशः ) [ अपि च ] कुतश्चित् ( =सर्वतोऽपि ) आजातः ( =प्रादुर्भूतोऽस्ति ) । लोपामुद्रा वृषणं ( =कामिनं पुरुषं मां ) नी रिणाति ( =स्ववशं गमयति )। अधीरा ( =अधीमती ) [ सत्यपि ] धीरं ( =धीमन्तं ) श्वसन्तं ( =" महाप्राणं महाबलं " ) [ मां ] धयति ( =उपभुङ्क्ते ) ॥

इतस्त्वत्संगमनिमित्तात् तथामुतो वसन्तादिकालात् कुतश्चित्कारणादाजातः सर्वत उत्पन्नः। इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

५. नु ( =इदानीं ) हृत्सु पीतम् (=अतिप्रेम्णा पीतम् ) इमं सोमम् अन्तितः उप ब्रुवे ( =समीपदेशात् प्रार्थये=तस्य समीपे गत्वा प्रार्थये ) । [ तद्यथा ] । यत् सीं ( =यद्यद् ) आगः ( =पापं ) चकृम ( =कृतवन्तः स्मस् ) तत् सु मृळतु ( =तद् अस्माकं सुष्ठु यथा तथा क्षमताम् ) । हि ( =यस्मात् कारणात् ) मर्त्यः ( =मरणधर्मा मनुष्यः) पुलुकामः (=पुरुकामः=बहुकामो ) [ भवति ]॥

यतो मनुष्या बहुकामाः सन्ति अतः कारणात् ते स्वकामपूरणसाधने बहूनपराधान् कुर्वन्ति । तस्मात्क्षमया विना नास्ति तेभ्यो मोक्ष इत्यर्थः ॥

६. प्रजां ( =संततिम् ) अपत्यं (=पुत्रपौत्रादिकं ) बलं [ च ] इच्छमानः (=अ-

५. आतां हा जो अगदीं अंतःकरणपूर्वक प्यालेला सोम, त्याजपुढें उभा राहून मी प्रार्थितों; कीं आम्हीं जें पाप केलें आहे त्याची तो अगदीं क्षमा करो. कारण कीं मर्त्य बहुकाम होय.

६. महाबळी अगस्त्य ऋषि प्रजा, अपत्य आणि बळ यांची इच्छा करून आवतांनीं खणता झाला आणि दोन्ही वर्णांचा उत्कर्ष करिता झाला. तो देवांपासून यथार्थ आशीर्वादांप्रत पावला.

5. I now approach and pray to this Soma that is drunk in the heart. May he pardon the sin that we have committed. For a mortal has many desires.

6. The mighty sage Agastya, desiring posterity, progeny, [and] strength dug with pickaxes, and benefited both colours. He obtained unfailing blessings from the gods.

---

'अवरोध करणाऱ्या'='रुधतः.' म्हणजे रेतोवरोध करणाऱ्या, संग ज्याला घडत नाहीं अशा.

---

५. ही ऋचा अगस्त्य आपणास आणि लोपामुद्रेस अनुलक्षून म्हणतो असें समजलें तर बरें होईल. यांत सोमदेवानें पापाची क्षमा करावी असें प्रार्थिलें आहे.

'अंतःकरणपूर्वक प्यालेला'='हृत्सु पीतम्.' म्हणजे मोठ्या आवडीनें प्यालेला. कोणी प्यालेला? अगस्त्यानें देवांस अर्पण केलेला देवांनीं जो प्याला तो असें असेल. वरच्या चार मंत्रांशीं या आणि पुढच्या मंत्रांचा संबंध वस्तुतः नसेल, आणि नाहीं असें घेऊन चाललें तर अर्थ चांगला लागेल. खरोखर संबंध नसतां हे दोन मंत्र सूक्ताला जोडिले गेले; तर अशा जोडण्याची उदाहरणें ऋग्वेदांत इतरत्रहि आढळतील. सू. १२६ मं. ७ आणि टीप पहा.

या सूक्ताशीं या ऋचेचा संबंध नाहीं अशा पक्षीं, कोणी ऋषि (कदाचित् अगस्त्यच) देवांस सोम अर्पण करून त्याला म्हणतो, 'आम्हीं केलेली पातकें आम्हांला क्षमा कर. आमच्या वांछा फार असल्यामुळें आम्हांकडून त्या पुरवण्याच्या कामीं फार पापें घडतात.'

वृत्तासाठीं 'मर्तिअः' असें म्हणावें लागतें.

६. या मंत्राचाहि संबंध या सूक्ताशीं नसेल अशा समजुतीनें लाविला तर अर्थ बरा लागेल. तो असा; यांत अगस्त्याविषयीं अन्योक्ति आहे आणि तिचें तात्पर्य असें कीं, 'अगस्त्यानें संतति

## सूक्तम् १८०.

अगस्त्य ऋषिः। अश्विनौ देवता। त्रिष्टुप् छन्दः ॥

**युवो रजांसि सुयमासो अश्वा रथो यद्वां पर्यर्णांसि दीयत्।**
**हिरण्यया वां पवयः प्रुषायन्मध्वः पिबन्ता उषसः सचेथे ॥ १ ॥**

युवोः। रजांसि। सुऽयमासः। अश्वाः। रथः। यत्। वाम्। परि। अर्णांसि। दीयत्।
हिरण्ययाः। वाम्। पवयः। प्रुषायन्। मध्वः। पिबन्तौ। उषसः। सचेथे इति ॥ १ ॥

---

न्विष्यन्) खनित्रैः खनमानः (=खननसाधनैरायुधैः खनमान) उग्रोगस्त्य ऋषिः (=बलवान् अगस्त्यनामा ऋषिर्) उभौ वर्णौ पुपोष (=वृद्धिं प्रापयत्) [स] देवेषु (=देवेभ्यः) सत्याः (=सत्यफला) आशिषो जगाम (=प्राप) ॥

खनित्रैः खनमान इत्यत्र फलस्योत्पादनसाधनैर्यज्ञस्तोत्रादिभिः खनमानः फलमभिमतमुत्पादयन्निति सायणः। उभौ वर्णाविल्यत्र च वर्णौ वर्णनीयावाकारौ कामं च तपश्च पुपोषेति स एव ॥

---

### भाषायाम्.

१. [हे अश्विनौ], [यदा] युवोः सुयमासः अश्वाः (=युवयोः सुष्ठु नियन्तुं शक्या अश्वा) रजांसि [परि दीयन्] (=आन्तरिक्षान् लोकान् परिगच्छन्ति)— यद् (=यदा) वां रथः (=युवयो रथः) अर्णांसि परि दीयत् (=आन्तरिक्षप्रदेशान् परिगच्छति॰) [तदा] वां हिरण्ययाः पवयः (=युवयो रथसंबन्धिनः सुवर्णमयाश्चक्रवलयाः) प्रुषायन् (=मधु प्रुष्णन्ति=सिञ्चन्ति)। [तथैव] [युवां] मध्वः पिबन्तौ (=यजमानैः प्रार्पितं मधुरं सोमरसं पिबन्तौ) [प्रतिदिनं प्रातःकाल] उषसः सचेथे (=उषसो देवीः सेवेथ=ताभिः सहोदित्य ताभिः सहान्तरिक्षान् प्रदेशान् भ्रमथः) ॥

---

आणि बळ यांची इच्छा करून देवोपासना केली, ती उदयास येऊन त्याला फलप्राप्ति झाली, आणि त्याला देवांपासून वर मिळाले व ते वर शेवटीं खरे झाले.'

'आवतांनीं'=' खनित्रैः.' हीं आवतें म्हणजे यज्ञ, स्तोत्र इत्यादिक जीं फलप्राप्तीचीं साधनें तीं होत, असें सायण म्हणतात तें खरें दिसतें.

## सूक्त १८०.

ऋषि–अगस्त्य. देवता–अश्वी. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. [ हे अश्वी हो ], जेव्हां तुमचे सुयंत्र घोडे अन्तरिक्षाच्या सभोंताली भ्रमण करितात, आकाशप्रदेशांच्या सभोंताली जेव्हां तुमचा रथ भ्रमण करितो, तेव्हां तुमच्या सुवर्णमय धावांपासून थपथप [ मध ] गळतो. तुम्ही मधुर सोमरस पीत पीत उषांबरोबर जातां.

## HYMN. 180.

To the *As'vins.* By *Agastya.* Metre—*Trishṭubh.*

1. [When] your well-trained horses [go round] the firmament, when your chariot goes round the sky, your golden tires drop [honey]. Drinking the sweet Soma you accompany the Ushases.

---

'दोन्ही वर्णांचा उत्कर्ष करिता झाला' ='उभौ वर्णौ पुपोष.' म्हणजे काम आणि तप असें आचार्य म्हणतात, पण तसें असेल की नाहीं याविषयीं संशय आहे. आम्हीं भाषांतर अक्षरशः केलें आहे.

वृत्तासाठीं 'अगस्तिअः' आणि 'देवेषु आशिषो' असें म्हटलें पाहिजे.

पांचवा आणि सहावा हे मंत्र अगस्त्य ऋषीच्या शिष्यानें म्हटलेले आहेत अशा समजुतीस अनुलक्षून (१ ल्या मंत्रावरील टीप पहा) शौनक म्हणतात कीं 'इमं नु सोमम्' इत्यादि दोन ऋचा जो कोण शुद्ध होऊन जपेल, तो सर्व मनोरथांच्या सिद्धीला पावेल आणि सकळ पापांपासून मुक्त होईल (इमं नु सोममित्येते द्वे ऋची प्रयतो जपेत् । सर्वान्कामानवाप्नोति पापेभ्यश्च प्रमुच्यते ).

---

[illegible] हे अश्वी हो, तुम्ही आपल्या रथांत बसून जेव्हां ब्रह्मांडाच्या सभोंताली प्रदक्षिणा करितां, तेव्हां तुमच्या रथाच्या चाकांपासून मध गळत असतो, आणि तुम्ही जाऊं लागलां म्हणजे तुम्हांला उपासकजन सोमरस अर्पण करितात आणि तो तुम्ही पीत पीत उषेच्या बरोबर जाऊन भ्रमण करीत असतां.'

'सुवर्णमय धावांपासून'='हिरण्ययः पवयः.' अश्वींचा रथ आणि त्या रथाचे अवयव सोन्याचे केले असतात याविषयीं सू. १३९ मं. ३ आणि टीप पाहा.

'मध'='मध्वः.' सू. ११७ मं. १ पाहा.

'उषांबरोबर जातां.' ज्या वेळीं उषा उगवते त्याच वेळीं अश्वींचाहि उदय होतो; म्हणून अश्वी हे उषेबरोबर जा-

युवमत्यस्याव नक्षथो यद्विपत्मनो नर्यस्य प्रयज्योः ।
स्वसा यद्वां विश्वगूर्ती भराति वाजायेट्टे मधुपाविषे च ॥ २ ॥

युवम् । अत्यस्य । अव । नक्षथः । यत् । विऽपत्मनः । नर्यस्य । प्रऽयज्योः ।
स्वसा । यत् । वाम् । विश्वगूर्ती इति विश्वऽगूर्ती । भराति । वाजाय । ईट्टे । मधुऽपौ । इषे । च ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

२. यद् (=यदा) युवं (=युवां) विपत्मनः (=विशेषेण संचारिणो) नर्यस्य (=नृभ्यो हितस्य) प्रयज्योः (=प्रकर्षेण पूजनीयस्य) अत्यस्य (=अश्वस्य=सूर्यरूपस्याश्वस्य) अव (=अवस्तात्=प्राक्) नक्षथः (=उदयप्रदेशानागच्छथः) यद् (=यदा च) हे विश्वगूर्तौ (=सर्वैरपि स्तुतावश्विनौ), स्वसा (=? यजमानभार्या) वां भराति (=वां पोषयति हविरन्नं भक्षणाय ददाति) [तदा] हे मधुपौ (=सोमरसस्य पातारौ), [सा] [वां] वाजाय (=बलाय) इषे च (=अन्नाय च) ईट्टे (=स्तौति=वां बलमन्नं च याचते) ॥

नक्षथः इत्यस्य निघातत्वम् ईट्टे इत्यस्य च अनिघातत्वं व्यत्ययमूलकमिति कृत्वा सहनीयम् ।

सायणस्त्वन्यथा । तदेवम् । हे अश्विनौ युवं युवां यदत्यस्यातनशीलस्य सततसंचारिणो विपत्मनो विविधगमनस्य विचित्रगमनस्य वा नर्यस्य मनुष्याणां हितस्य प्रयज्योः प्रकर्षेण पूज्यस्य ॥ एतानि कर्मणि षष्ठ्यन्तानि ॥ उक्तरूपं रथमव अवस्तात् तदुदयात्पूर्वं नक्षथः । व्याप्नुथो देवयजनं गन्तुम् । किंच यत् यदा हे विश्वगूर्ती सर्वस्तुत्यौ सर्वदोद्यूर्णौ वा वां युवयोः स्वसा स्वसृस्थानीया स्वयंसारिणी वोषा भराति । पोषते । त्वदागमनाय प्रभातं करोति । यदा हे मधुपौ मधुरस्य सोमरसस्य पातारौ युवां यजमानो वाजाय बलाय गमनाय वा इषे प्रभूतान्नायेट्टे । स्तौति । तदा रथं प्राप्नुथ इत्यर्थः । इति ॥

---

वणारे देव होत. सू. १८३ मं. २. शिवाय 'उषर्बुध' (प्रातःकाळीं जागृत होणारे) म्हणजे पांहाटेस उगवून ब्रह्मांडासभोताली परिभ्रमण करणारे जे देव, त्यांत अश्वींचा समावेश होत असतो, त्यामुळें अश्वींला उषांबरोबर जाणारे असें म्हटलें तें योग्यच आहे.

वृत्तासाठीं 'परि अर्णांसि' असें म्हणावें.

२. [ हे अश्वी हो ], तुम्ही जेव्हां सततसंचारी, मनुष्यहितकारी, [ आणि ] पूज्य अशा वेगवंत अश्वाच्या पूर्वी येऊन पोंहचतां, [ आणि ] जेव्हां हे सर्वस्तुत [अश्वी] हो, बहीण तुम्हांला जेऊं घालिते, तेव्हां हे सोम पिणारे [अश्वी] हो, ती तुम्हांपाशीं बळ आणि अन्न याचिते.

2. When you arrive before the swift, pervading, humane [and] honoured Horse, [and] when, o all-praised As'vins, the sister feeds you, she prays you for strength and food, o drinkers of Soma!

---

२. ही ऋचा फार कठिण आहे. आम्हीं भाषांतर अक्षरशः केलें आहे. यांत इतकें तात्पर्य दिसतें कीं, 'सूर्योदयापूर्वी अश्वींचा प्रादुर्भाव होतो, तेव्हां उपासकाची स्त्री हीच जी तुमची बहीण, ती तुम्हांला हविरन्नांनीं भजून तुम्हांपाशीं संपत्ति मागते.' असें आहे तथापि 'अत्यस्य अव नक्षथः' म्हणजे 'अश्वाच्या पूर्वी येऊन पोंहचतां' असा अर्थ होण्यास अडचण आहे. यांत सांगितलेला अश्व म्हणजे सूर्य असा अर्थ मात्र निःसंशय विवक्षित दिसतो.

वृत्तासाठीं 'अत्यस्य अव,' 'नरिअस्य' आणि 'वाजाय ईट्टे' असें म्हणावें लागतें.

युवं पयं उस्रियायामधत्तं पक्वमामायामव पूर्व्यं गोः ।
अन्तर्यद्वनिनो वामृतप्सू ह्वारो न शुचिर्यजते हविष्मान् ॥ ३ ॥

युवम् । पर्यः । उस्रियायाम् । अधत्तम् । पक्वम् । आमायाम् । अव ।
पूर्व्यम् । गोः ।
अन्तः । यत् । वनिनः । वाम् । ऋतप्सू इत्यृतऽप्सू । ह्वारः । न ।
शुचिः । यजते । हविष्मान् ॥ ३ ॥

## भाषायाम्.

३. युवं (=युवाम्) उस्रियायां (=गवि) पयः अधत्तं (=दुग्धम् अधारयतम्)। गोः आमायां [वक्षणायां] पूर्व्यं पक्वं [पयः] अव [अधत्तं] (=गोरपक्व ऊधनि पक्वं भक्षणयोग्यं श्रेष्ठं च दुग्धम् अधारयतम्)। यद् (=यस्मात् कारणात्) हे ऋतप्सू (=सत्यस्वरूपौ), शुचिर्हविष्मान् (=तेजस्वी यजमानो) ह्वारो न (=चोर इव) अन्तर्वनिनः (=?" वृक्षसमूहस्यान्तर्मध्ये") [जागरूकः सन्] वां यजते (=पूजयति)॥

दुर्बोधतमोत्तरार्धैषा सायणेनैवं व्याख्याता । हे अश्विनौ युवं युवामुस्रियायाम् । गोनामैतत् । भोगोत्स्राविण्यां गवि पयोऽधत्तम् । अधारयतम् । स्थापितवन्तौ । तथामायामपक्वायां पक्वं परिपक्वं भोगयोग्यं [गोः] गोसंबन्धि दुग्धं पूर्व्यं पूर्वभवं तत्रैवोत्पन्नमव अवस्तादधारयतम् । गवि क्षीरमुत्पाद्य पुनर्भोगाय पृथक्कृतवन्तावित्यर्थः । यत् यस्मात् हे ऋतप्सू सत्यस्वरूपौ यज्ञियहविर्भक्षयितारौ वा हे अश्विनौ वां वनिन उदकवत उदकोपलक्षितहविष्मतो यज्ञस्यान्तर्मध्ये हविष्मान् प्रदेयहविषा तद्वान् शुचिः शुद्धो यजमानो यजते । पूजयति युवाम् । तस्मादेवमकुरुतम् । यद्वा यदेवं यजमानः करोति तदेत्यर्थः । तत्र दृष्टान्तः । वनिनो वनसंबन्धिवृक्षसमूहस्यान्तर्मध्ये ह्वारो न । चोर इव । स यथा जागरूको वर्तते । तथा यजमानोऽपीत्यर्थः । इति ॥

३. [ हे अश्वी हो ], तुम्ही गाईच्या ठायीं दूध स्थापिते झालां, श्रेष्ठ पक्व दूध [गाई]च्या अपक्व [कासे]मध्यें स्थापिते झालां. कारण कीं हे सत्यस्वरूप [अश्वी हो], कांतिमान् यजमान चोराप्रमाणें [जागा राहून] तुम्हांला वृक्षांमध्यें भजतो.

3. You placed the milk in the cow, placed the excellent ripe milk in the raw udder of the cow. For the brilliant sacrificer sacrifices to you, o [As'vins] of truthful forms, in the trees [wakeful] like a thief.

३. 'गाईच्या ठायीं दूध इ०.' म्हणजे गाईत दूध उत्पन्न करिते झालां. आणि 'गाईच्या अपक्व कासेमध्यें पक्व दूध स्थापिते झालां' म्हणजे गाईच्या कच्च्या अथवा दुग्धरहित आणि केवळ मांसमय कासेंत पिण्यास योग्य असें दूध उत्पन्न करिते झालां. सू. ६२ मं. ९ यांतहि इंद्राविषयीं असेंच सांगितलें आहे. तेथें गाई म्हणजे मेघमाला असा जो अर्थ केला आहे तो येथेंहि घेतल्यास चालेल.

या मंत्राचा उत्तरार्ध कठिण आहे. आम्हीं अक्षरशः अर्थ केला आहे. 'चोराप्रमाणें' या उपमेचा भावार्थ असा कीं, चोराप्रमाणें जागा राहून मोठ्या पहांटेस तुम्हांला भजतो, परंतु 'अन्तर्वनिनः' याबद्दल 'अन्तर्वनिषु' असें असावें तें नाहीं; ही अडचण एके बाजूस ठेविली तरी वृक्षांमध्यें भजतो याचें तात्पर्य समजत नाहीं, कारण कीं अरण्यांत उपासना करण्याची चाल वेदांत प्रसिद्ध नाहीं.

'गाईच्या अपक्व कासेमध्यें'=' गोः आमायां [ वक्षणायाम् ].' ऋ. ६. ७२. ४ यांतहि इन्द्र आणि सोम यांविषयीं असें म्हटलें आहे कीं, 'इन्द्रासोमा पक्वम् आमासु अन्तः नि गवाम् इत् दधथुः वक्षणासु'=हे इंद्र आणि सोम हो, तुम्हीं गाईच्या अपक्व कासांमध्यें पक्व दूध स्थापिते झालां.

वृत्तासाठीं 'पूर्व्यम्' बद्दल 'पूर्विअम्,' आणि 'वाम्' बद्दल 'वआम्' असें म्हणावें लागतें.

युवं ह घर्मं मधुमन्तमत्रयेऽपो न क्षोदोऽवृणीतमेषे ।
तद्वां नरावश्विना पश्वइष्टी रथ्येव चक्रा प्रति यन्ति मध्वः ॥४॥
युवम् । ह । घर्मम् । मधुऽमन्तम् । अत्रये । अपः । न । क्षोदः । अवृणीतम् । एषे ।
तत् । वाम् । नरौ । अश्विना । पश्वःऽइष्टिः । रथ्याऽइव । चक्रा । प्रति । यन्ति । मध्वः ॥ ४ ॥
आ वां दानाय ववृतीय दस्रा गोरोहेण तौग्र्यो न जिव्रिः ।
अपः क्षोणी सचते माहिना वां जूर्णो वामक्षुरंहसो यजत्रा ॥५॥२३
आ । वाम् । दानाय । ववृतीय । दस्रा । गोः । ओहेन । तौग्र्यः । न । जिव्रिः ।
अपः । क्षोणी इति । सचते । माहिना । वाम् । जूर्णः । वाम् । अक्षुः । अंहसः । यजत्रा ॥ ५ ॥ २३ ॥

---

## भाषायाम्.

४. युवं ह (=युवां किल) एषे (=? साहाय्यमिच्छते) अत्रये [नाम ऋषये] मधुमन्तं घर्मं (=मधुयुक्तं तप्तं पयः) अपो न क्षोदः (=अपां न क्षोदः=उदकस्य प्रवाहमिव) अवृणीतं (=पर्यहरतम्)। तत् (=तस्मात् कारणात्) हे अश्विना नरौ (=वीरावश्विनौ), पश्वइष्टिः (=पशुयागो) मध्वः (=सोमरसाश्च) रथ्या चक्रा इव (=रथसंबन्धीनि चक्राणीव) वां प्रति यन्ति (=वाम् अभिगच्छन्ति)॥

यतः कारणाद् युवामत्रिरक्षणादीनि वीरकर्माण्यकुरुतमतः कारणात् सर्वेपि जना वां पशुसाध्येन हविषा सोमरसेन च पूजयन्तीति भावः॥

अत्रेतिहासमाहुः। प्रवर्ग्येण प्रचरन्तमत्रिं राक्षसास्तप्ते घर्मेऽपातयन्। स च तप्यमानोऽश्विनौ तुष्टाव तौ च स्तुत्या हृष्टमनसावरक्षतामिति अपरेऽग्नौ क्षिप्तमपालयतामित्याहुरिति। इति सायणः॥

५. हे दस्रा (=दस्रौ=शत्रुजितौ) [अश्विनौ], तौग्र्यो न जिव्रिः (=जीर्णस्तुग्रस्य पुत्रो यथा) [आवर्तयति स्म तथा] गोरोहेन (=गोरसस्याहुत्या) वां दानाय आ ववृतीय (=युवां संप्रदानाय मम समीप आवर्तयेयम्=आगमयेयम्)। अपः माहिना क्षोणी (=? आपो बृहती क्षोणी च=अन्तरिक्षं च महती पृथिवी च) वां सचते

४. तुम्ही साहाय्याची इच्छा करणाऱ्या अत्रीसाठीं मधुर गोरसानें भरलेल्या उष्ण दुधाचा, पाण्याच्या प्रवाहाचा [ परिहार केल्या]प्रमाणें, परिहार करिते झालां. त्यामुळेंच हे वीर अश्वी हो, पशूची आहुति [ आणि ] सोमरस हे रथाच्या चाकांप्रमाणें तुम्हांप्रत धांवतात.

4. You warded off for Atri that was imploring [ help ] [ the effects of ] the heated milk mixed with sweet clarified butter, like those of a stream of water. Hence it is that animal oblation and libations of Somas run to you, o brave As'vins, like the wheels of a chariot.

५. हे पराक्रमकारी [अश्वी] हो, तुग्राच्या वृद्ध पुत्रानें तुम्हांला आपणाकडे वळविलें त्याप्रमाणें गोरसाच्या आहुतीनें तुम्हांला मजकडे वरदानासाठीं वळविण्याचें सामर्थ्य मला द्या. अंतरिक्ष आणि विस्तीर्ण पृथिवी तुमच्या सेवेंत असतात. हे पूजनीय अश्वी हो, दुःखाचें प्राचीन जाळें तुमच्या [ सेवेंत असतें ].

5. May I, o brave [As'vins], turn you hither for gifts with an oblation of milk even as the old son of Tugra [did]. Heaven and great Earth attends on you, on you [ attends ] the ancient net of distress, o worshipful ones !

---

४. 'तुम्हीं अत्रीचें संरक्षण केलें त्या दिवसापासून लोक तुम्हांला देव मानून तुम्हांला हवि अर्पण करूं लागले.'

अत्रीविषयीं जो इतिहास येथें उद्दिष्ट आहे तो अनेक रीतींनीं सांगितला आहे. येथें सायणांनीं सांगितलेला जो इतिहास तो असा कीं, अत्रि हा प्रवर्ग्य करून आराधना करीत असतांना, म्हणजे ऊन भांड्यांत ऊन दूध ओतून त्याचा पायस करून त्याच्या अर्पणानें आराधना करीत असतांना, त्याला शत्रूंनीं त्या ऊन पायसांत टाकिलें; तेव्हां त्याणें अश्वींची स्तुति केल्यावरून अश्वींनीं तेथून त्याला काढिलें. परंतु इतर ठिकाणीं ही कथा दुसऱ्या रीतीनें सांगितलेली आहे. सू. ५१ मं. ३, सू. ११२ मं. ७ आणि सू. ११९ मं. ८ पहा.

'पाण्याचा प्रवाह' = 'अपो न क्षोदः.' 'अप्'शब्द एकवचनीहि क्वचित् आढळतो. ऋ. ८. ४. ३ आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

नि यद्युवेथे नियुतः सुदानू उप स्वधाभिः सृजथः पुरंधिम् ।
प्रेषद्वेषद्वातो न सूरिरा महे ददे सुव्रतो न वाजम् ॥ ६ ॥

नि । यत् । युवेथे इति । निऽयुतः । सुदानू इति सुऽदानू । उप ।
स्वधाभिः । सृजथः । पुरम्ऽधिम् ।
प्रेषत् । वेषत् । वातः । न । सूरिः । आ । महे । ददे । सुऽव्रतः ।
न । वाजम् ॥ ६ ॥

---

(=युवां सेवते)] हे यजत्रा (=यजत्रौ), [युवयोर्गमनकाले] अंहसो जूर्णोक्षुः (=? दुःखस्य प्राक्तनं जालम्=उपासकानां दुःखपरिहारकं प्राक्तनकालादारभ्य प्रसिद्धं युष्माकं साधनं) वां [सचते] (=युवां सेवते=सदैव युवयोः समीपं वर्तते)॥

जूर्णो वामिति चरमः पादो दुर्बोधः। अपः क्षोणी इति पदद्वयमपि संदिग्धार्थकम्। उत्तरार्धं सायण एवं व्याचष्टे। किमाश्चर्यमहमावर्तयामीति। किंतु अपः क्षोणी। अप इत्यन्तरिक्षनाम। क्षोणीति पृथिवीनाम। द्यावापृथिव्यावपि वां युवयोर्माहिना माहात्म्येन युवयोः प्रसादेन सर्वोपकारिण्याविति ख्यातिं सर्वप्रदेशव्यापित्वं वा सचते। सेवते प्रत्येकम्। यद्वा वां माहिना यजमानो द्यावापृथिव्यौ सचते। किंच हे यजत्रा यष्टव्यौ प्रसादादयमृषिर्जूर्णो जरया जीर्णाङ्गः सन्नंहसः पापाज्जरालक्षणात्प्रमुच्याक्षुश्चिरकालव्याप्तो दीर्घजीवी भूयात्। यद्वा हे यजत्रा वां प्रसादाज्जूर्णो जीर्णो यजमानोंऽहसो दुरितस्य हन्तीरप उक्तलक्षणानि सोमरसरूपाण्युदकानि क्षोणी क्षोण्याम्। सप्तम्यर्थे प्रगृह्यम्। भूम्यां चिरकालमक्षुर्व्याप्तः सन् माहिना माहात्म्येन सचते। द्वितीयो वामित्ययमादरार्थः। इति॥

---

## भाषायाम्.

६. हे सुदानू (=शोभनधनोपेतौ), यद् (=यदा) नियुतः (=अश्वान्) नि युवेथे (=नियुञ्जाथे=रथेश्वान् योजयित्वा गच्छथस्) [तदा] स्वधाभिः (=स्वतेजोभिः=स्वप्रभावैर्) [उपासकेभ्यः] पुरंधिं (=भूयसीं धियं मेधाम्) उप सृजथः (=प्रयच्छथः)। [अतः कारणाद्] [युवयोरागमने सति] वातो न (=वायुरिव शीघ्रं यथा तथा) वां वेषत् (=अभिगच्छतु) प्रेषत् आ [=तर्पयतु च]। [एवं कृते सति स] सुव्रतो न (=सुकर्मवानिव=उपासनादिसत्कर्मकारित्वात्) वाजम् (=अन्नम्=अन्नादिसंपदं) महे (=? महत्त्वाय) ददे (=आददे=स्वीकरोति=लभते=लब्ध्वा महान् भवति)॥

युक्ताश्वं रथमारुह्य यदा युवामागच्छथस्तदा युवामुपासकेभ्यो मेधां प्रयच्छथः।

६. हे महोदार [ अश्वी ] हो, तुम्ही जेव्हां घोडे हाकून जात असतां [तेव्हां] तुम्ही आपल्या सामर्थ्यानें मोठी बुद्धि [ यजमानाला ] देत असतां. यजमानानें वाऱ्याप्रमाणें जावें आणि [ तुम्हांस ] प्रसन्न करावें. [ मग ] त्याला सदाचारी म्हणून अन्नसंपत्तीची प्राप्ति होते, आणि तो मोठा होतो.

6. When, o bounteous [As'vins], you drive your steeds, you confer great wisdom [on the sacrificer] through your might. Let the sacrificer run [to you] like the wind and gratify [you]. He then receives [plenty of] food like a pious man, and becomes great.

---

त्यांत 'अपा' हें एकवचनी रूप आलें आहे तें पहा.

५. तुमाचा पुत्र सू. ११६ मं. ३ याजवरील टीप पहा.

'अन्तरिक्ष आणि विस्तीर्ण पृथिवी'= 'अपः क्षोणी माहिना.' हें कठीण आहे. 'अपः' हें 'आपः' याबद्दल आहे आणि शब्द बहुवचनीं आहे तरी 'सचते' या क्रियापदाशीं संबंध लावणें तो अंतरिक्ष या एकवचनी अर्थाच्या अपेक्षेनें अपः हें एकवचन आहे असें समजून लावणें इतकें अवश्य आहे. 'माहिना' याविषयीं सू. १५१ मं. ९ आणि ऋ. ८. ७१.९ हा मंत्र आणि त्याजवरील सायणभाष्य पहा.

या मंत्राचा चवथा पाद फार दुर्बोध आहे. त्यांत 'अक्षु' शब्दाचा अर्थ समजण्यास साधनें नाहींत. हा शब्द पुनः आलेला नाहीं. 'अंहसः' याचा संबंध कोठें घ्यावा तेंहि नीट समजत नाहीं. दुःखाचें प्राचीन जाळें तुमच्या सेवेंत असतें असा जो आम्ही अर्थ केला आहे त्याचें तात्पर्य असें कीं, जीं जीं दुःखें उपासकांला गांजीत असतील तीं तीं दुःखें तुम्ही जाळ्यांत जणुं धरून प्राचीन काळापासून नाहींशीं करीत आलां आहां तसेच सांप्रतहि करीत असतां.

वृत्तासाठीं 'तौग्र्यो' याबद्दल, 'तौग्रिओ' असें म्हणावें लागतें.

---

६. 'तुम्ही घोडे जोडिलेल्या रथांत बसून जातां तेव्हां उपासकाच्या घरीं येऊन त्याला बुद्धिसंपन्न करितां. यास्तव यजमानानें वाऱ्याप्रमाणें सत्वर जाऊन तुम्हाला प्रसन्न करावें, कारण कीं तुम्ही प्रसन्न झालां म्हणजे त्याला त्याच्या यजनरूप सत्कर्मांचें फळ असें जें अन्न तें प्राप्त होतें.'

वृत्तासाठीं 'प्रएषत्' आणि 'सुव्अरतो' असें म्हणावें.

**वयं चिद्धि वां जरितारः सत्या विपन्यामहे वि पणिर्हितावान् ।**
**अधा चिद्धि ष्मांश्विनावनिन्द्या पाथो हि ष्मा वृषणावन्तिदे-**
**वम् ॥ ७ ॥**

वयम् । चित् । हि । वाम् । जरितारः । सत्याः । विपन्यामहे । वि ।
पणिः । हितऽवान् ।
अध । चित् । हि । स्म । अश्विनौ । अनिन्द्या । पाथः । हि । स्म ।
वृषणौ । अन्तिऽदेवम् ॥ ७ ॥

**युवां चिद्धि ष्मांश्विनावनु द्यून्विरुद्रस्य प्रस्रवणस्य सातौ ।**
**अगस्त्यो नरां नृषु प्रशस्तः काराधुनीव चितयत्सहस्रैः ॥ ८ ॥**

युवाम् । चित् । हि । स्म । अश्विनौ । अनु । द्यून् । विऽरुद्रस्य । प्र-
ऽस्रवणस्य । सातौ ।
अगस्त्यः । नराम् । नृषु । प्रऽशस्तः । काराधुनीऽइव । चितयत् ।
सहस्रैः ॥ ८ ॥

---

अतःकारणाद् यजमानो युवामभिगम्य क्षिप्रं तर्पयतु । युवां हि तस्य शोभनानि क-
र्माणि सेवित्वा तस्मा अन्नादिसंपदं प्रयच्छथस्तं च महान्तं कुरुथ इति भावः ॥

आ इति समुच्चयदर्शकं पदम् । सायणश्चतुर्थं पादमेवं व्याचष्टे । अनन्तरं सुव्रतो
न अतिप्रशस्तोष्मादिकर्मवानिव वाजमन्नं महे महत्त्वायायं यजमान आ ददे । आ-
दत्ते स्वीकरोति । इति ॥

---

## भाषायाम्.

७. [ हे अश्विनौ ], वयं चिद्धि (=वयमेव) वां सत्या जरितारः (=युवयोः
परमार्थतः स्तोतार इति) विपन्यामहे (=स्तूयामहे=कथ्यामहे=जना अस्मानेव स-
त्यान् स्तोतॄन् आहुः) । [ अपि च ] पणिः (=लुब्धकः=अनुपासको) हितावान् वि
[ पन्यते ] (=निहितधनवान् इति=पिहितधनवान् इति=लुब्धक इति कथ्यते) ।
अधचित् हि स्म (=अतः कारणादेव) हे अनिन्द्या (=अनिन्द्यौ=प्रशस्यौ) वृषणौ
(=बलवन्तौ) अश्विनौ, [ युवाम् ] अन्तिदेवं पाथो हि स्म (=अन्तिदेवं नाम सत्यं
स्तोतारम् अरक्षतम्) ॥

८. हे अश्विनौ, नरां नृषु प्रशस्तः (=नृणां मध्ये ये प्रशस्ता नरस्तेषु प्रशस्तः श्रेष्ठः)

७. [हे अश्वी हो], तुमचे खरे स्तोते अशी आमचीच ख्याति गातात [आणि] अनुपासकाची कृपण अशी ख्याति गातात. म्हणूनच हे पवित्र आणि बळवान् अश्वी हो, तुम्ही अंतिदेवाला रक्षिते झालां.

7. We alone are renowned as your sincere worshippers, the unbeliever is renowned as a miser. For thus, o stainless and mighty As'vins, you protected Antideva.

८. हे अश्वी हो, साधूंतील [उत्तम] साधूंमध्यें श्रेष्ठ [असा जो] अगस्त्य [ तो ] श्रेष्ठ मेघोदकाचा प्रवाह मिळण्यासाठीं प्रतिदिनीं शंखासारिखा तुम्हांलाच हजारो नादांनीं जागृत करितो.

8. You alone, o As'vins, does Agastya the best of men among men wake from day to day for the attainment of the excellent stream, with thousands of sounds like a conch.

---

७. 'अन्तिदेव.' हें येथें एका उपासकाचें विशेषनाम आहे यांत संशय नाहीं. सायणाचार्य तसें समजत नाहींत, तथापि दुसऱ्या अर्थाचा चांगला निर्वाह दिसत नाहीं. हा शब्द दुसऱ्या ठिकाणीं आलेला नाहीं.

८. 'मेघोदकादिकाच्या प्राप्तीसाठीं अगस्त्य ऋषि तुम्हांलाच प्रतिदिनीं प्रातःकाळीं भजतो.'

'जागृत करितो' = 'चितयत्.' म्हणजे अश्वी हे 'उषर्बुध्' अथवा मोठ्या पहाटेस उठून भ्रमण करणारे आहेत त्यांस अगस्त्य अनेक स्तोत्रें म्हणून प्रातःकाळीं झोपेंतून जणुं उठवितो. अगस्त्याचीं अनेक स्तोत्रें ऐकून अश्वी जागृत होऊन आपल्या रथांत बसून येतात असा कवीचा भावार्थ आहे.

**प्र यद्वहेथे महिना रथस्य प्र स्पन्द्रा याथो मनुषो न होता ।**
**धत्तं सूरिभ्य उत वा स्वश्व्यं नासत्या रयिषाचः स्याम ॥ ९ ॥**

प्र । यत् । वहेथे इति । महिना । रथस्य । प्र । स्पन्द्रा । याथः । मनुषः । न । होता ।
धत्तम् । सूरिऽभ्यः । उत । वा । सुऽअश्व्यम् । नासत्या । रयिऽसाचः । स्याम ॥ ९ ॥

---

अगस्त्यो विरुद्रस्य प्रस्त्रवणस्य सातौ (=श्रेष्ठस्य मेघोदकप्रवाहस्य लाभे निमित्ते सति) अनु द्यून् (=प्रतिदिनं) काराधुनीव (=शङ्खादिरिव) सहस्रैः (=सहस्रसंख्याकैः) [स्तोत्ररूपैर्नादैर्] युवां चिद्धि स्म (=युवामेव) चितयत् (=चेतयति=प्रबोधयति=प्रातःकाले यज्ञागमनाय आह्वयति) ॥

विरुद्रस्य विशिष्टोष्णरूपदुःखद्रावणस्य विविधरोरूयमाणद्रवणवतो वा प्रस्त्रवणस्य वृष्ट्युदकसंस्त्यायस्य ...... । काराधुनीव । कारा शब्दः । तस्य धूनयितोत्पादयिता शङ्खादिः स इव । इत्यादि सायणः ॥

---

## भाषायाम्.

९. यद् (=यस्मात् कारणात्) [युवां] रथस्य महिना (=रथस्य माहात्म्येन=युक्तप्रभूताश्वत्वात् महान् यो रथस्तेन) प्र वहेथे (=प्रोह्येथे=तादृशं रथमारुह्य आगच्छथः)—हे स्पन्द्रा (=स्पन्द्रौ=गमनशीलौ), [यस्मात्] मनुषो न होता (=मनुष्यस्य यजमानस्य होतेव) प्र याथः (=गच्छथः) [अतः कारणात्] सूरिभ्यः (=यजमानेभ्यः) स्वश्व्यं (=शोभनानाम् अश्वानां समूहं) धत्तं (=धारयतं=प्रयच्छतम्) उत वा (=अपि च) हे नासत्या (=हे नासत्यौ), [वयं] रयिसाचः स्याम (=धनाढ्या भवेम) ॥

यस्मात् कारणाद् बहूनश्वान् योजयित्वा युवां यजमानान् आगच्छथः अतःकारणात् तेभ्योपि बहूनश्वान् प्रयच्छतम् अस्मान् स्तोतॄंश्च धनाढ्यान् कुरुतम् इत्यभिप्रायः॥

९. ज्यापेक्षां तुम्ही आपल्या मोठ्या रथांत बसून येत असतां, —हे सत्वरगामी [अश्वी] हो, [कोणा तरी] मनुष्याच्या होत्याप्रमाणें तुम्ही येत असतां, [त्यापेक्षां] तुम्ही यजमानांला अनेक उत्तम घोडे द्या आणि हे नासत्य हो, आम्ही धनाढ्य होऊं असें करा.

9. Since you are brought in a great chariot —you come forth, quick [ As'vins ], like a man's invoker, do you therefore give plenty of good horses to the sacrificers, and may we be rich, o Nâsatyas!

---

९. 'हे अश्वी हो, एकाद्या पुरोहिताप्रमाणें तुम्ही मोठ्या रथाला उत्तम घोडे जोडून येतां, कारण कीं तुम्हांजवळ पुष्कळ उत्तम घोडे आहेत. तर आम्हांलाहि तुम्ही पुष्कळ उत्तम घोडे द्या.'

'मोठ्या रथांत' = 'महिना रथस्य.' अक्षरशः, 'रथाच्या मोठेपणानें.' म्हणजे, मोठ्या रथाच्या योगानें.

'कोणातरी मनुष्याच्या होत्याप्रमाणें' = 'मनुषो न होता.' जसा एकाद्या यजमानाचा होता रथांत बसून येतो तसा. हा सरळ अर्थ उघडच आहे. पण होता रथांत बसून येत असे कीं काय ? या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे.

'ज्यापेक्षां.' म्हणजे ज्यापेक्षां तुम्ही इतके घोडे आपल्या रथास जोडितां, त्यापेक्षां तुम्हांजवळ पुष्कळ घोडे असतीलच; तर त्यांतून आम्हांला द्या, असें तात्पर्य आहे.

वृत्तासाठीं 'सुअश्व्यं,' 'नासत्तिआ' आणि 'सिआम' असें म्हणावें लागतें.

तं वां रथं वयमद्या हुवेम स्तोमैरश्विना सुविताय नव्यम् ।
अरिष्टनेमिं परि द्यामियानं विद्यामेषं वृजनं जीरदानुम् १०॥२४

तम् । वाम् । रथम् । वयम् । अद्य । हुवेम । स्तोमैः । अश्विना । सुऽविताय । नव्यम् ।
अरिष्टऽनेमिम् । परि । द्याम् । इयानम् । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ १० ॥ २४ ॥

---

### भाषायाम्.

१०. हे अश्विना (=अश्विनौ), वां (=युवयोः) नव्यं (=स्तुत्यम्) अरिष्टनेमिम् (=अहिंसितचक्रवलयं) परि द्याम् इयानं (=द्युलोकस्य परितो गच्छन्तं) तं (=पूर्वोक्तं) रथं वयम् अद्य स्तोमैः (=स्तोत्रैः) सुविताय (=अस्माकं कल्याणाय) हुवेम (=आह्वयामः)। [अतः कारणाद्] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रधनं) [वीरं पुत्रं च] विद्याम (=लभेमहि)॥

---

## सूक्तम् १८१.

अगस्त्य ऋषिः। अश्विनौ देवता। त्रिष्टुप् छन्दः ॥

कदु प्रेष्ठाविषां रयीणामध्वर्यन्ता यदुन्निनीथो अपाम् ।
अयं वां यज्ञो अकृत प्रशस्तिं वसुधिती अवितारा जनानाम् ॥१॥

कत् । ऊं इति । प्रेष्ठौ । इषाम् । रयीणाम् । अध्वर्यन्ता । यत् । उत्ऽनिनीथः । अपाम् ।
अयम् । वाम् । यज्ञः । अकृत । प्रऽशस्तिम् । वसुधिती इति वसुऽधिती । अवितारा । जनानाम् ॥ १ ॥

---

### भाषायाम्.

१. [हे अश्विनौ], प्रेष्ठौ (=प्रियतमौ) अध्वर्यन्ता (=अध्वर्यन्तौ=अध्वरं पारयितुमिच्छन्तौ) [युवाम्] इषाम् (=अन्नानां) रयीणां (=संपदाम्) अपां (=मेघवृष्टीनाम्) (=अन्नानि संपदश्च) अपः (=मेघवृष्टीश्च) उन्निनीथः (=आनयथः) यत् [तत्] कत् (=कदा)? हे वसुधिती (=धनानां धारयितारौ), हे जनानाम्

१०. हे अश्वी हो, तो जो तुमचा स्तुत्य [ आणि ] घट्ट धांवा असलेला आणि द्युलोकासभोंताली भ्रमण करणारा रथ, त्याला [ आमच्या ] कल्याणासाठीं आज आम्ही स्तोत्रांनीं बोलावीत आहों. [तर] आम्हांला अन्न, बळ आणि सत्वर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

10. We invoke today with hymns for our welfare, o As'vins, that your praiseworthy chariot of unbroken tires, that travels around heaven. May we [ therefore ] obtain food, strength, and a son that shall quickly make us rich.

१०. 'तो' = 'तम्.' म्हणजे पूर्वींच्या ऋचेंत सांगितलेला जो तो.

---

## सूक्त १८१.

ऋषि—अगस्त्य. देवता—अश्वी. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [ हे अश्वी हो ], अत्यंत प्रिय आणि यज्ञ तडीस नेऊं इच्छिणारे असे तुम्ही अन्नें, संपत्ति [आणि] मेघवृष्टि घेऊन येत असतां तीं केव्हां ? हे संपत्तीचे निधि हो, हे जनांचे रक्षक हो, या यज्ञानें तुमचें स्तोत्र केलें आहे.

## Hymn 181.

To the *As'vins.* By *Agastya.* Metre—*Trishṭubh.*

1. When is it that you, who are most dear and desirous of completing the sacrifice, bring food, riches [ and ] the rain-waters ? This sacrifice has, o treasures of wealth, o preservers of the people, sung your praise.

१. 'हा यज्ञ करून तुमची आराधना केली आहे, तर अन्नादिक संपत्ति आणि विपुल मेघवृष्टि तुम्ही यज्ञाच्या योगानें प्रसन्न झाल्यावर देत असतां तीं आम्हांला अजून कां देत नाहीं ?'

'अन्नें' = 'इषाम्.' या मंत्रांत 'इषां, रयीणाम्' ह्या षष्ठी कर्मणि आहेत, याशिवाय दुसरी अडचण कांहीं नाहीं.

आ वामश्वासः शुचयः पयस्पा वातरंहसो दिव्यासो अत्याः ।
मनोजुवो वृषणो वीतपृष्ठा एह स्वराजो अश्विना वहन्तु ॥ २ ॥

आ । वाम् । अश्वासः । शुचयः । पयःऽपाः । वातऽरंहसः । दिव्यासः । अत्याः ।
मनःऽजुवः । वृषणः । वीतऽपृष्ठाः । आ । इह । स्वऽराजः । अश्विना । वहन्तु ॥ २ ॥

आ वां रथोऽवनिर्न प्रवत्वान्त्सृप्रवन्धुरः सुविताय गम्याः ।
वृष्णः स्थातारा मनसो जवीयानहंपूर्वो यजतो धिष्ण्या यः ॥३॥

आ । वाम् । रथः । अवनिः । न । प्रवत्वान् । सृप्रऽवन्धुरः । सुविताय । गम्याः ।
वृष्णः । स्थातारा । मनसः । जवीयान् । अहम्ऽपूर्वः । यजतः । धिष्ण्या । यः ॥ ३ ॥

---

अवितारा (=जनानां रक्षितारौ), अयं यज्ञः (=अयमस्माकं यज्ञो) वां प्रशस्ति (=युवयोः स्तोत्रम्) अकृत (=अकरोत्) ॥

यस्मादेवं तस्मात् हे वसुधिती वसुनो धनस्य धरतव्यकर्माणौ तथा हे जनानामवितारौ ......युवां कदान्नानां धनानां च दातारौ भवथ इति । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

२. शुचयः (=दीप्ताः) पयस्पाः (=मेघोदकस्य पातारो) वातरंहसः (=वायुवेगा) दिव्यासः (=दिवि भवा) अत्याः (=सततसंचारिणो) मनोजुवः (=मनोजवा) वृषणः (=युवानो) वीतपृष्ठाः (=सम्यक्पोषणेन प्राप्तपृष्ठभागाः) स्वराजः (=आत्मानं राजमानाः=आत्मनोपेक्षयाऽनन्यस्वामिनः) अश्वासः (=अश्वा) वां (=युवाम्) अश्विना (=अश्विनौ) आ वहन्तु (=आनयन्तु) ॥

३. अवनिर्न प्रवत्वान् (=प्रवाह इव प्रवणवान्=निम्नभूमिं प्रति गच्छन् प्रवाह इव आशुगमनवान्) सृप्रवन्धुरः (=विस्तीर्णसारथिस्थानवान्) वां रथः (=युवयो रथः) सुविताय (=कल्याणाय) आ गम्याः (=आगच्छतु) । हे स्थातारा (=स्थातारौ=रथारूढौ तथा) धिष्ण्या (=स्तवनीयौ), यो [रथो] वृष्णो मनसो

२. तेजस्वी, मेघोदक पिणारे, वाऱ्याप्रमाणें वेगवंत, दिव्य, चपळ, मनोवेगी, नित्यतरुण, भरलेल्या पाठीचे आणि आपणाला आपणच हाकणारे असे जे तुमचे घोडे, ते तुम्हां अश्वींला येथें वाहून आणोत.

३. सखल जमिनीवर वाहणाऱ्या प्रवाहाप्रमाणें लौकर धावणारा आणि विस्तीर्ण सारथिस्थान असलेला असा जो तुमचा रथ, तो [ आमच्या ] कल्याणासाठीं येथें येओ. जो [ रथ ], हे स्तवनीय [आणि] रथारूढ अश्वी हो, वेगवान् मनापेक्षांहि वेगवान्, मनस्वी आणि पूजनीय होय.

2. May your horses carry you As'vins hither, horses that are bright, drinkers of the rain-waters, possessing the speed of the wind, heavenly, lively, quick as the mind, youthful, of sleek backs, and that are controlled by their own selves.

3. May your chariot, gliding down like a stream that glides down a slope, and furnished with a wide seat for the driver, come hither for our welfare; which, o ye mounted on the chariot, is quicker than the quick mind, conscious, and, o praiseworthy ones, fit to be worshipped.

---

२. 'भरलेल्या पाठीचे' = 'वीतपृष्ठाः.' सू. १६२. मं. ७ आणि त्याजवरील टीप पाहा.

वृत्तासाठीं 'दिवि आसो' असें म्हणावें लागतें.

३. 'मनस्वी' = 'अहंपूर्वः.' म्हणजे सचेतन जीवंत, ज्याला दुसऱ्यानें हाकण्याची गरज नाहीं, जो आपणाला आपणच हांकून घेणारा, म्हणजे हाकल्याशिवाय हाकल्याप्रमाणें चालणारा.

पूर्वील मंत्रांत 'स्वराजः' या शब्दाचा जो अभिप्राय तोच 'अहंपूर्वः' याचा या मंत्रात आहे.

वृत्तासाठीं 'धिष्णिआ' असें म्हणावें लागतें.

**इहेह जाता समवावशीतामरेपसा तन्वा३ नामभिः स्वैः ।**
**जिष्णुर्वामन्यः सुमखस्य सूरिर्दिवो अन्यः सुभगः पुत्र ऊहे ॥४॥**

इहऽइह । जाता । सम् । अवावशीताम् । अरेपसा । तन्वा । नाम-
ऽभिः । स्वैः ।
जिष्णुः । वाम् । अन्यः । सुऽमखस्य । सूरिः । दिवः । अन्यः । सु-
ऽभगः । पुत्रः । ऊहे ॥ ४ ॥

---

जवीयान् (=वेगवतो मनसोपि वेगवत्तरः) अहंपूर्वः (=मनस्वी=अहमस्मीति प्रती-
तिवान्=चेतनावान् ) [ तथा ] यजतः ( =यजनीयो ) [ भवति ] ॥

---

## भाषायाम्.

४. इहेह जाता ( =इहेह जातौ=इहेह मध्यमोत्तमस्थानयोर्जातौ ) [ तौ ] अ-रेपसा तन्वा ( =अपापेन शरीरेण ) स्वैः नामभिः ( =स्वकीयैः रूपैश्च द्वारा ) सम् अवावशीतां ( =सम्यक् स्तूयेते ) । [ हे अश्विनौ ], वाम् अन्यः ( =युवयोरेकः ) सुमखस्य जिष्णुः सूरिः ( =शोभनयज्ञस्य जयशीलः प्रेरको ) [ भवति ] अन्यः दिवः सुभगः पुत्रः ( =द्युलोकस्य शोभनभाग्यः पुत्र ) ऊहे ( =" वहति कृत्स्नमेवं पृथक् जगत् " ) ॥

इत्यक्षरार्थः । अत्र सायणः । हे अश्विनौ युवां समवावशीताम् । सह सम्यग्वा पुनः-पुनः स्तूयेथे कामयेथां वा यज्ञम् । पुरुषव्यत्ययः । कीदृशौ युवाम् । इहेह जाता । उभाभ्यामिहशब्दाभ्यां मध्यमोत्तमस्थाने उच्येते । तयोः संभूतौ । चन्द्रसूर्येणेति याvत् । सूर्याचन्द्रमसावित्येक इति निरुक्तम् । अरेपसा अपापौ । आथर्वणस्य गुरोः शिरश्छेदनादिना पापलेपरहिताविति भावः । आथर्वणायाश्विना दधीचेऽश्व्यं शिरः प्रत्यैरयतमित्यादिमन्त्रवर्णात् । केन हेतुनेति उच्यते । तन्वा शरीरेण शरीरसौन्दर्येण निमित्तेन स्वैर्नामभिः स्वीयैर्माहात्म्यविशिष्टैरश्विनौ नासत्यावित्यादिभिरपि । रम-णीयशरीरवत्त्वान्महिमोपेतनामवत्त्वाच्च हेतोः संस्तूयेथे इत्यर्थः । यद्वा अरेपसा तन्वेति योज्यम् । उक्तप्रकारेण गुरुशिरश्छेदादप्यपापेन शीर्षेण तादृशाहस्त्वरूपाप-नेनेति यावत् । किंच वां युवयोरन्य एको मध्यमस्थानान्तरिक्षस्य पुत्रस्थानीयः सोमो जिष्णुर्जयशीलः सुमखस्य शोभनयज्ञस्य सूरिः प्रेरयिता सन् ऊहे । वहति विश्वं ज-गद्धारयति । चन्द्रात्मनस्तस्योदये सति ओषधिवनस्पत्यादयो वर्धन्ते । अन्योऽपर उत्तमस्थानो दिवो द्युलोकस्य पुत्रः पुत्रस्थानीय आदित्यः सुभगः शोभनरश्मिरूपधनः

४. येथें आणि तेथें उत्पन्न झालेले [हे] दोघेजण आपल्या पवित्र शरीराच्या योगेंकरून [आणि] आपल्या विभूतींच्या योगेंकरून स्तविले जातात.—तुम्हांपैकीं एकजण सुमखाचा नायक [होय] [आणि] दुसरा द्युलोकाचा भाग्यशाली पुत्र होय.

4. Born here and here the two [As'vins] owing to their spotless bodies and their own forms are praised.—One of you [passes as] the director of the good sacrifice, the other passes as the glorious son of heaven.

---

४. येथें अश्वी म्हणजे चंद्र आणि सूर्य हे दोघे होत असें समजून ऋषि बोलत आहे. अश्वी म्हणजे चंद्र आणि सूर्य होत अशी एक समजूत प्राचीन काळापासून आहेच. ती सायणभाष्य उतरून घेतलें आहे त्यांत दिली आहे. परंतु 'एकजण सुमखाचा नायक' म्हणजे चंद्र हा यज्ञाचा संपूर्तिकर्ता असें सायण म्हणतात, तें मात्र बरोबर आहे कीं नाहीं याविषयीं विशेष प्रमाणें पाहिजेत. 'दिवो अन्यः सुभगः पुत्रः' असें आहे, त्यावरून सूर्य घेणें योग्य दिसतें खरें. परंतु चंद्र याला वेदोत्तर काळीं यज्ञपति मानूं लागले तसाच वेदकाळीं मानीत कीं नाहीं याविषयीं संशय आहे.

या मंत्रांत प्रथम तृतीय पुरुषीं निर्देश असून नंतर द्वितीय पुरुषीं निर्देश आहे. हा प्रयोग छांदस होय.

प्र वां निचेरुः ककुहो वशाँ अनु पिशङ्गरूपः सदनानि गम्याः ।
हरी अन्यस्य पीपयन्त वाजैर्मथ्रा रजांस्यश्विना वि घोषैः ॥
॥ ५ ॥ २५ ॥

प्र । वाम् । निऽचेरुः । ककुहः । वशान् । अनु । पिशङ्गऽरूपः । सदनानि । गम्याः ।
हरी इति । अन्यस्य । पीपयन्त । वाजैः । मथ्रा । रजांसि । अश्विना । वि । घोषैः ॥ ५ ॥ २५ ॥

प्र वां शरद्वान्वृषभो न निष्षाट् पूर्वीरिषश्चरति मध्व इष्णन् ।
एवैरन्यस्य पीपयन्त वाजैर्वेषन्तीरूर्ध्वा नद्यो न आगुः ॥ ६ ॥

प्र । वाम् । शरत्ऽवान् । वृषभः । न । निष्षाट् । पूर्वीः । इषः । चरति । मध्वः । इष्णन् ।
एवैः । अन्यस्य । पीपयन्त । वाजैः । वेषन्तीः । ऊर्ध्वाः । नद्यः । नः । आ । अगुः ॥ ६ ॥

---

ऊहे । वहति । कृत्स्नमेवं पृथक् जगन्निर्वाहकौ महानुभावौ युवां सह स्तूयेथे । अत्र निरुक्तम् । इहेह जातौ संस्तूयेथे पापेनालिप्यमानया तन्वा नामभिश्च स्वैर्जिष्णुर्वामन्यः सुमहतो बलस्येरयिता मध्यमो दिवोऽन्यः सुभगः पुत्र ऊह्यत आदित्यः । नि० १२. ३. । इति ॥

---

## भाषायाम्.

५. वां (=युवयोर्) निचेरुः (=नितरां चरन्) ककुहः (=उच्छ्रितः) पिशङ्गरूपः (=सुवर्णकान्तियुक्तो) [रथो] वशान् अनु (=कामानतुगम्य=अनुकामं=यथेच्छं) सदनानि प्र गम्याः (=उपासकानां गृहाणि प्रति प्रकर्षेण गच्छतु)। हे अश्विना (=अश्विनौ), रजांसि (=लोकाः=येषु लोकेषु मध्ये गमनं भवति तत्रत्या जना) वाजैर्घोषैश् [च] (=हविरन्नैः स्तोत्रैश्च) अन्यस्य मथ्रा हरी (=युवयोर्मध्य एकस्य मथनशीलावश्वौ) वि पीपयन्त (=विशेषेणाप्याययन्तु) ॥

यदाश्विनो रथोन्तरिक्षादिलोकेषु चरति तदा ताभ्यां तत्रस्था जना हविरन्नानि प्राप्य तौ स्तुवन्तीत्यर्थः ॥

६. [हे अश्विनौ], वां (=युवयोः) शरद्वान् (=शरज्जातधान्ययुक्तो) वृषभो

५. तुमचा भरधांव जाणारा सुवर्णरूप उंच [ रथ ] [ उपासकांच्या ] गृहीं यथेच्छ येओ. हे अश्वी हो, लोक [ तुम्हांतून ] एकाचे गरगर फिरणारे पिवळे घोडे हविरन्नांनीं आणि स्तोत्रांनीं पुष्ट करोत.

5. May your down-gliding, exalted, gold-hued [ chariot ] come to [ worshippers'] houses according to its pleasure. May the worlds, with oblations and praises, fatten the whirling steeds of one [of you], o As'vins !

६. हे अश्वी हो, तुमचा समृद्ध [ आणि ] वृषभाप्रमाणें प्रतापी [ रथ ] अनेक मधुर अन्नें लोटीत लोटीत येत असतो. [तुम्हांतून] एकाच्या वेगवान् अश्वांनीं उंच नद्या पुष्ट होतात [ आणि ] पसरत पसरत आम्हांप्रत येत असतात.

6. Your [chariot] filled with the harvest, [ and ] mighty like Indra comes forth, bestowing numerous nourishments of sweetness. Through the swift horses of one of you are enriched [ and ] roll unto us the high and far-spreading rivers.

---

५. भावार्थः 'तुमचा रथ अंतरिक्षादिक लोकांमधून जाऊं लागला म्हणजे तेथील लोक तुम्हांला हविरन्नें आणि स्तोत्रें अर्पण करितात.'

'[ तुम्हांतून ] एकाचे' = 'अन्यस्य.' म्हणजे सूर्याचे असें विवक्षित दिसतें.

'गरगर फिरणारे' = 'मथ्रा.' येथें 'मथ्रा' आणि 'मथ्ना' असे वैदिकांत पाठ आढळतात. आणि ऋग्वेदांत पाठांतराचें हें एकच स्थळ आहे अशी समजूत आहे. 'मथ्ना' हा शब्द अथवा हें रूप ऋग्वेदांत पुनः आलेलें नाहीं. 'मथ्रा' हें ऋ. ८. सू. ४६ मं. २३ यांत आलें आहे, आणि तें तेथेंहि अश्वांचेंच विशेषण आहे. यावरून प्रस्तुत स्थळीं 'मथ्रा' हाच पाठ खरा आहे असें ह्मणून चालणें योग्य दिसतें.

सायणाचार्य पूर्वार्धांत सांगितलेला जो रथ तो उभय अश्वींचा नसून उभयतांतून एकाचा, म्हणजे चंद्राचा असें म्हणतात.

६. 'अश्वी येतात तेव्हां सर्व प्रकारचीं धान्यें आपणाबरोबर भरून आणीत असतात. आणि अश्वींपैकीं एकाच्या ( = सूर्याच्या ? ) अश्वांच्या योगेंकरून ( = किरणांच्या योगेंकरून ? ) समृद्धिदायक उदक नद्या भरून विस्तीर्ण हो-

अर्सर्जि वां स्थविरा वेधसा गीर्बाळ्हे अश्विना त्रेधा क्षरन्ती ।
उपस्तुतावव्तं नाधमानं यामन्नयामञ्छृणुतं हवं मे ॥ ७ ॥
अर्सर्जि । वाम् । स्थविरा । वेधसा । गीः । बाळ्हे । अश्विना । त्रेधा । क्षरन्ती ।
उपऽस्तुतौ । अवतम् । नाधमानम् । यामन् । अयामन् । शृणुतम् । हवम् । मे ॥ ७ ॥
उत स्या वां रुशतो वप्ससो गीस्त्रिबर्हिषि सदसि पिन्वते नृन् ।
वृषा वां मेघो वृषणा पीपाय गोर्न सेके मनुषो दशस्यन् ॥ ८ ॥
उत । स्या । वाम् । रुशतः । वप्ससः । गीः । त्रिऽबर्हिषि । सदसि । पिन्वते । नृन् ।
वृषा । वाम् । मेघः । वृषणा । पीपाय । गोः । न । सेके । मनुषः । दशस्यन् ॥ ८ ॥

---

न निष्षाट् ( =वृषभ इव शत्रूणां निःसारयिता=इन्द्रसदृशः शत्रुनाशकौ ) [ रथो ] मध्वः पूर्वीः इषः इष्णन् ( =माधुर्यस्य बहून्यन्नानि=मधुराणि बहूनि अन्नानि प्रेरयन्=प्रयच्छन् ) प्र चरति ( =प्रकर्षेण गच्छति=वेगवान्सन्नागच्छति ) । अन्यस्य ( =युवयोर्मध्य एकस्य ) एवैर्वाजैः ( =वेगवद्भिरश्वैः ) ऊर्ध्वा नद्यः ( =उच्छ्रिता नद्यः ) पीपयन्त ( =पुष्टा भवन्ति ) [ अपि च ] वेषन्तीः ( =वेषन्त्यः=व्यापयन्त्यः सत्यो ) नः (=अस्मान्प्रति ) आ अगुः ( =आगच्छन्ति ) ॥

---

## भाषायाम्.

७. हे वेधसा अश्विना ( =मेधाविनावश्विनौ ), त्रेधा क्षरन्ती ( =त्रिभिः प्रकारैर्वहन्ती ) स्थविरा ( =सनातना ) वां गीः ( =स्तुतिरूपा युवयोर्वाक्=युवयोः स्तुतिर् ) बाळ्हे असर्जि ( =? बाढं सृज्यते=उच्चैरुच्चारितास्ति ) [ मया ] । उपस्तुतौ ( =उपेत्य स्तुतौ ) [ सन्तौ युवां ] नाधमानं ( =युवयोरनुग्रहं याचमानं ) [ माम् ] अवतं (=तर्पयतम् ) । यामन् अयामन् (=गमने चागमने च ) मे हवं शृणुतं (=मया कृतमाह्वानं शृणुतम् ) ॥

८. उत ( =अपि च ) वां रुशतो वप्ससः ( =युवयोर्दीप्तस्य स्वरूपस्य ) स्या गीः ( =सा जनप्रसिद्धा स्तुतिः ) नृन् ( =उपासकजनान् ) त्रिबर्हिषि सदसि ( =त्रिधा-

७. हे मेधावी अश्वी हो, तुमची तीन प्रकारांनीं वाहणारी सनातन स्तुति मोठ्यानें सोडिली आहे. तुमची स्तुति केली आहे, तर तुम्ही [ मज ] प्रसादयाचकाचा मनोरथ पूर्ण करा. तुमचें गमन होत असतें तेव्हां आणि होत नसतें तेव्हां माझी हाक ऐका.

८. आणि तुमच्या कांतिमान् स्वरूपाची ती प्रसिद्ध स्तुति तीन ठिकाणीं जेथें दर्भ आंथरले आहेत अशा घरीं भजकांला समृद्ध करिते. हे वीर्यवंत अश्वी हो, तुमचा वीर्यवान् मेघ, गोरसाच्या वृष्टीप्रमाणें मनोरथ पूर्ण करणारा होत्साता मनुष्यांला समृद्ध करितो.

7. Your ancient praise streaming in three ways is loudly sent forth, o wise As'vins! Worshipped with praises gratify you him who implores [your blessing]. Hear you my invocation when you are coursing and when you are not coursing.

8. And that praise of your brilliant form nourishes the worshippers in the house where the kus'a-grass is thrice spread. Your puissant cloud, o puissant As'vins, liberally nourisheth men as by a pouring of milk.

तात आणि आम्हांपाशीं येतात.'

'वृषभाप्रमाणें' = 'वृषभो न.' म्हणजे इंद्राप्रमाणें. वृषभ म्हणजे इंद्र असा अर्थ या ठिकाणीं सायणांनीं केला आहे. दुसरा अधिक समर्पक अर्थ काढणें कठिण आहे.

७. 'तीन प्रकारांनीं वाहणारी' = 'त्रेधा क्षरन्ती.' तीन तोंडांनीं वाहणारी नदी जशी, तशी. अश्वींचें सर्वच त्रिगुण अथवा त्रिप्रकार आहे. ( सू.३४ मं.२ पहा ). इतक्यावरूनच 'तीन प्रकारांनीं' असें येथें म्हटलें आहे.

'सनातन स्तुति' = 'स्थविरा गीः.' म्हणजे पुरातन काळापासून ऋषिजन ज्या प्रकारची करीत आले आहेत तशी.

'गमन' = 'यामन्.' म्हणजे अंतरिक्षादिक लोकांमधून अश्वी जात असतात तेव्हां.

वृत्तासाठीं 'त्रेधा' बद्दल 'त्रयधा' असें म्हटलें पाहिजे.

८. 'कांतिमान् स्वरूपाची' = 'रुशतो वप्ससः.' 'वप्ससः' याच्या अर्थाविषयीं संशय आहे. तो शब्द पुनः आलेला नाहीं. भाषान्तर सायणानुसार आहे.

'ती प्रसिद्ध स्तुति' = 'स्या गीः.'

युवां पूषेवाश्विना पुरंधिरग्निमुषां न जरते हविष्मान् ।
हुवे यद्वां वरिवस्या गृणानो विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ९॥२६॥

युवाम् । पूषाऽइव । अश्विना । पुरम्ऽधिः । अग्निम् । उषाम् । न ।
जरते । हविष्मान् ।
हुवे । यत् । वाम् । वरिवस्या । गृणानः । विद्याम । इषम् । वृजनम् ।
जीरऽदानुम् ॥ ९ ॥ २६ ॥

स्तीर्णबर्हिषि यज्ञगृहे ) पिन्वते (=आप्याययति ) [ उचितप्रदानादिना ] । हे वृषणा (=सेचनसमर्थौ=वीर्यवन्तौ ), वां (=युवयोर् ) वृषा मेघः (=सेचनसमर्थो जलदो ) दशस्यन् (=अभिमतफलं प्रयच्छन् ) गोर्न सेके (=गोरसस्य सेचने सति यथा तथा=पयसो वर्षणेनेव ) मनुषः पीपाय (=मनुष्यान् आप्याययति=पोषयति ) ॥

## भाषायाम्.

९. हे अश्विना (=अश्विनौ ), पुरंधिः पूषेव (=बहुधीमान् पूषा नाम देव इव ) हविष्मान् (=हविर्युक्तो यजमानः ) अग्निम् उषां न (=अग्निम् उषसं च यथा तथा ) वां (=युवामपि ) जरते (=स्तौति ) । गृणानः (=स्तुवन्=स्तोता ) यद् (=यस्मात्कारणाद् ) वरिवस्या वां हुवे (=पूजया सह युवामाह्वयति ) [ अतः कारणाद् ] इषम् (=अन्नं ) वृजनं (=बलं ) जीरदानुं (=क्षिप्रदानं ) [ वीरं=पुत्रं च ] विद्याम (=लभेमहि ) ॥

म्हणजे तुमची जी स्तुति लोक गातात ती.

'तुमचा मेघ' = 'वां मेघः.' म्हणजे ज्याजकडून तुम्ही उपासकांसाठी पृथिवीवर वृष्टि करवितां तो.

९. हे अश्वी हो, मेधावी पूषा जसा तसा हविर्युक्त यजमान अग्नीला आणि उषेला स्तवून तुम्हांला स्तवीत आहे. स्तोता ज्यापेक्षां तुम्हांला भक्तीनें स्तवीत आहे त्यापेक्षां आम्हांला अन्न, बळ, [आणि] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

9. Like wise Pûshâ the worshipper with oblation in his hand is praising you, o As'vins, like Agni and Ushâ. In-as-much as the poet is invoking you with devotion, may we obtain food, strength, and a son that shall quickly make us rich.

---

९. 'अग्नीला आणि उषेला स्तवून लागलेंच मीं तुमचेंहि स्तवन करीत आहें, आणि यजमान अग्नीला आणि उषेला हवि अर्पण करून तुम्हांलाहि अर्पण करीत आहे त्यापेक्षां आम्हांला अन्नादिकांची प्राप्ति होओ' असें तात्पर्य.

या ऋचेंत पूषा देवाची उपमा दिली आहे ती मात्र किंचित् दुर्बोध आहे. पूषा देव पोषण करितो इत्यादिक जे त्याचे गुण, त्याविषयीं सू. १४ मं. ३ याजवरील टीप पाहा.

## सूक्तम् १८२.

अगस्त्य ऋषिः । अश्विनौ देवता । जगती छन्दः ॥

**अभूदिदं वयुनमो षु भूषता रथो वृषण्वान्मदता मनीषिणः ।**
**धियंजिन्वा धिष्ण्या विश्पलावसू दिवो नपाता सुकृते शुचिव्रता १**

अभूत् । इदम् । वयुनम् । ओ इति । सु । भूषत । रथः । वृषण्ऽवान् । मदत । मनीषिणः ।
धियम्ऽजिन्वा । धिष्ण्या । विश्पलावसू इति । दिवः । नपाता । सुऽकृते । शुचिऽव्रता ॥ १ ॥

**इन्द्रतमा हि धिष्ण्या मरुत्तमा दस्रा दंसिष्ठा रथ्या रथीतमा ।**
**पूर्णं रथं वहेथे मध्व आचितं तेन दाश्वांसमुप याथो अश्विना २**

इन्द्रऽतमा । हि । धिष्ण्या । मरुत्ऽतमा । दस्रा । दंसिष्ठा । रथ्या । रथिऽतमा ।
पूर्णम् । रथम् । वहेथे इति । मध्वः । आऽचितम् । तेन । दाश्वांसम् । उप । याथः । अश्विना ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. [ हे ऋत्विजः ], इदं वयुनम् अभूत् ( =इदं प्रज्ञानम् अभवत्=प्रज्ञापकम् अश्विसंबन्धि तेजः प्रादुर्भूतमस्ति) । ओ षु भूषत (=सुष्ठु आभिमुख्येन भवत=क्षिप्रं तस्य रथस्याभिमुखं गच्छत )। [ अयं ] वृषण्वान् रथः ( =अन्तरुपविष्टवीर्यवद्श्वी तयो रथ आगतोस्ति ) । हे मनीषिणः ( =मेधाविन ऋत्विजः ), मदत ( =तौ मादयत=तावश्विनौ हर्षयत ) । धियंजिन्वा ( =कर्मणां प्रीणयितारौ ) धिष्ण्या ( =स्तुत्यौ ) विश्पलावसू ( =विश्पलावन्तौ=विश्पलातारकौ ) दिवो नपाता ( =द्युदेवस्य पुत्रौ ) सुकृते शुचिव्रता ( =सुकृते शुचिव्रतौ=सुकर्मणे सुकर्माणौ ) [ अश्विनौ मादयत ] ॥

२. [ हे अश्विनौ ], युवाम् इन्द्रतमा ( =इन्द्रतमौ=इन्द्रत्वयुक्ततमौ=इन्द्रसदृशतमौ ) धिष्ण्या ( =धिष्ण्यौ=स्तुत्यर्हौ ) मरुत्तमा ( =मरुत्त्वयुक्ततमौ ) दस्रा ( =दस्रौ=पराक्रमवन्तौ ) दंसिष्ठा ( =अतिशयपराक्रमयुक्तौ ) रथ्या ( =रथ्यौ=रथवन्तौ ) रथितमा (=रथितमौ=रथिषु मध्ये श्रेष्ठौ ) [ स्थो ] हि । [ युवां ] मध्वः

## सूक्त १८२.

ऋषि—अगस्त्य. देवता—अश्वी देव. वृत्त—जगती.

१. हा प्रकाश पडत आहे. या, हा रथ अश्वी-वीरांला घेऊन आला पहा. हे मेधावी भक्तजन हो, त्यांला तुम्ही भजा. सत्कर्मापासून आनंद पावणारे, स्तुत्य, विश्पलेचें संरक्षण करणारे, द्यूचे पुत्र आणि पुण्यवंताचें कल्याण करणारे [ असे जे अश्वी, त्यांला भजा ].

२. तुम्ही अगदी इंद्रासारिखे, तुम्ही स्तुत्य, अगदी मरुतांसारिखे, तुम्ही पराक्रमी, अत्यंत पराक्रमी, रथी, आणि उत्तम रथी [आहां]. तुम्हीं मधानें भरून लादलेल्या रथांत बसून जात असतां. त्या रथाच्या योगानें हे अश्वी हो, तुम्ही उपासकांकडे या.

## HYMN 182.

To the *As'vins.* By *Agastya.* Metre—*Jagatî.*

1. This light has broken forth. Come forward. Here is the chariot with the heroes in it. Gratify them, o wise worshippers ! [Gratify the As'vins, who are] delighted with pious work, praise-worthy friends of Vis'palâ, the sons of Dyaus and beneficent to the performer of good deeds.

2. You are most like Indra, worthy of praise, most like the Maruts, overpowering, most overpowering charioteers, best charioteers. You drive a chariot fully laden with honey. With that [chariot] come you, o As'vins, to the sacrificer.

---

१. मोठ्या पहांटेस अश्वींचा रथ येत आहे असें पाहून ऋषि बोलत आहे. 'हे गडे हो, हा पहा अश्वींचा रथ येत आहे, तर अश्वीला तुम्ही हवि इत्यादिक देऊन हर्षवा.'

'अश्वी-वीरांला घेऊन'='वृषण्वान्.' म्हणजे ज्यांत अश्वी बसले आहेत असा. सू. १०० मं. १६ पहा.

'विश्पलेचें संरक्षण करणारे'='विश्पलावसू.' अक्षरशः अर्थ विश्पला ज्यांची आहे ते. विश्पलेविषयीं सू. ११२ मं. १० आणि त्याजवरील टीप पहा.

'द्यूचे पुत्र' = 'दिवो नपाता.' यावरून अश्वी म्हणजे सूर्यचंद्रात्मक होत असें जें यास्कादिकांचें म्हणणें आहे, तें संभवतें. सूर्याला द्यूचा पुत्र असें म्हटल्याबद्दल ऋ. १०. ३७. १ पहा.

२. अश्वी आपल्या रथांत मध भरून

किमत्र दस्रा कृणुथः किमासाथे जनो यः कश्चिदहविर्महीयते ।
अति क्रमिष्टं जुरतं पणेरसुं ज्योतिर्विप्राय कृणुतं वचस्यवे ॥ ३॥

किम् । अत्र । दस्रा । कृणुथः । किम् । आसाथे इति । जनः । यः । कः । चित् । अहविः । महीयते ।
अति । क्रमिष्टम् । जुरतम् । पणेः । असुम् । ज्योतिः । विप्राय । कृणुतम् । वचस्यवे ॥ ३ ॥

जम्भयतमभितो रायतः शुनो हतं मृधो विदथुस्तान्यश्विना ।
वाचंवाचं जरितू रत्निनीं कृतमुभा शंसं नासत्यावतं मम ॥ ४ ॥

जम्भयतम् । अभितः । रायतः । शुनः । हतम् । मृधः । विदथुः । तानि । अश्विना ।
वाचम्ऽवाचम् । जरितुः । रत्निनीम् । कृतम् । उभा । शंसम् । नासत्या । अवतम् । मम ॥ ४ ॥

---

पूर्णम् आचितं ( =मधुना पूर्णं यथा तथा आपूरितं ) रथं वहेथे ( =नयथः )। तेन [ रथेन ] हे अश्विना ( =अश्विनौ ), दाश्वांसम् उप याथः ( =हविर्ददतम् उपासकं प्रति आगच्छतम् ) ॥

---

## भाषायाम्.

३. हे दस्रा ( =दस्रौ=शत्रूणाम् उपक्षपयितारौ=शत्रुजितौ ), यः कश्चित् जनः ( =यः कोपि जनः ) अहविर्महीयते ( =हवीरहितः सन्=हविरप्रयच्छन्नपि आत्मानं बहुमन्यते ) अत्र ( =तत्र=तस्य जनस्य गृहे ) किं कृणुथः ( =किं कुरुथः ) किम् आसाथे ( =तत्र किमर्थं तिष्ठथः ) ? [ तम् ] अति क्रमिष्टं ( =तम् अतिक्रम्य आगच्छतम् )। पणेरसुं जुरतम् ( =अदातुस्तस्य जीवं नाशयतम् )। वचस्यवे विप्राय (=युवयोरर्थं स्तोत्रं कर्तुमिच्छते स्तोत्रे ) [ मह्यं ] ज्योतिः कृणुतं ( =प्रकाशं कुरुतम् ) ॥

४. [ हे अश्विनौ ], रायतः शुनः ( =शब्दयतः श्वसदृशान् ) अभितः ( =आसमन्तात् ) जम्भयतं ( =नाशयतम् )। मृधो हतं ( =शत्रून् मारयतम् )। हे अश्विना ( =अश्विनौ ), तानि विदथुः ( =तानि शत्रुहननादीनि युवां जानीथः )। जरितुर्वाचंवाचं ( =स्तोतुस्तां तां स्तुतिं ) रत्निनीं कृतं ( =प्राप्तरत्नां कुरुतम् )। हे ना-

३. हे पराक्रमी अश्वी हो, जो जन हवि न देतां आपणाला मोठा मानितो त्याच्या घरीं तुम्हीं काय करितां, तेथें कां राहातां? त्याला टाकून या. त्या कृपणाचा जीव हरण करा. स्तोत्र करूं इच्छिणाऱ्या [ मज ] स्तोत्याला प्रकाश प्राप्त करून द्या.

४. भोंकणाऱ्या कुत्र्यांला आसमंतात् नाहींसे करा. शत्रूंला मारून टाका. हे अश्वी हो, तीं सर्वे तुम्ही जाणतां. स्तोत्याच्या प्रत्येक स्तवनाला रत्नसंपन्न करा. हे नासत्य हो, तुम्ही दोघेहि माझें स्तोत्र सफळ करा.

3. What do you do, why do you tarry, o mighty As'vins, with that man who, void of oblation, thinks himself great? Pass by him, take the miser's life. Show the light to the poet fond of your praises.

4. Destroy everywhere the barking dogs. Slay the enemies. You know [ all ] those things, o As'-vins! Reward every praise by the poet with excellent wealth. Gratify you both my desire, o Nâsatyas!

घेऊन येतात याविषयीं सू. ३४ मं. ३ आणि सू.२२ मं.३ याजवरील टीप पहा.

'रथी' = 'रथ्या.' म्हणजे युद्धांत रथ ज्यांला उत्तम हाकितां येतो ते. अर्थात् शत्रूचा पराजय करणारे, उत्तम वीर.

३. हवि न देणाऱ्या श्रीमंताच्या घरीं न जातां व तेथें न राहतां आपल्या घरीं येण्याविषयीं ऋषि अश्वींला प्रार्थीत आहे.

४. 'कुत्र्यांला.' म्हणजे निंदा करणाऱ्यांला.

'तीं' = 'तानि.' म्हणजे शत्रूंला मारणें इत्यादि जीं कामें तीं.

**युवमेतं चक्रथुः सिन्धुषु प्लवमात्मन्वन्तं पक्षिणं तौग्र्याय कम् ।**
**येन देवत्रा मनसा निरूहथुः सुपप्तनी पेतथुः क्षोदसो महः ॥**
**॥ ५ ॥ २७ ॥**

युवम् । एतम् । चक्रथुः । सिन्धुषु । प्लवम् । आत्मन्ऽवन्तम् । पक्षिणम् । तौग्र्याय । कम् ।
येन । देवऽत्रा । मनसा । निःऽऊहथुः । सुऽपप्तनि । पेतथुः । क्षोदसः । महः ॥ ५ ॥ २७ ॥

**अवविद्धं तौग्र्यमप्स्वऽन्तरनारम्भणे तमसि प्रविद्धम् ।**
**चतस्रो नावो जठलस्य जुष्टा उदश्विभ्यामिषिताः पारयन्ति ॥ ६ ॥**

अवऽविद्धम् । तौग्र्यम् । अप्ऽसु । अन्तः । अनारम्भणे । तमसि । प्रऽविद्धम् ।
चतस्रः । नावः । जठलस्य । जुष्टाः । उत् । अश्विऽभ्याम् । इषिताः । पारयन्ति ॥ ६ ॥

---

सत्या ( =नासत्यौ ), उभा ( =उभौ युवां ) मम शंसम् अवतं ( =मम स्तोत्रं तर्पयतं=प्राप्तफलं कुरुतम् ) ॥

---

## भाषायाम्.

५. [ हे अश्विनौ ], युवं ( =युवां ) सिन्धुषु ( =समुद्रसंबन्धिनीष्वप्सु ) तौग्र्याय ( =तुग्रपुत्राय भुज्यवे नाम राज्ञे) एतं ( =तं प्रसिद्धम् ) आत्मन्वन्तं ( =सजीवं ) पक्षिणं ( =पक्षोपेतं ) प्लवं ( =नावं ) चक्रथुः ( =कृतवन्तौ ) । येन [ प्लवेन ] सुपप्तनी ( =सुपतनौ ) [ युवां ] मनसा ( =अनुग्रहात्मिकया बुद्ध्या ) महसः क्षोदसः ( =महतः सागरात् ) [ तं तौग्र्यं ] देवत्रा निरूहथुः ( =देवेषु नीतवन्तौ ) ॥

६. जठलस्य जुष्टाः ( =जठरसदृशस्य समुद्रस्य प्रिया ) अश्विभ्याम् इषिताः ( =अश्विभ्यां प्रेरिताश् ) चतस्रो नावः अप्सु अन्तः अवविद्धम् ( =अन्तर्जले शत्रुभिः पातितम् ) अनारम्भणे तमसि प्रविद्धं ( =निरालम्ब उदकरूपेन्धतमसि प्रकर्षेण ताडितं ) तौग्र्यं ( =भुज्यम ) उत पारयन्ति ( =उत्तारयन्ति ) ॥

५. [ हे अश्वी हो ], तुम्ही तुग्रपुत्रासाठीं महासागरांत ती प्रख्यात सजीव [ आणि ] पंखांनीं उडणारी नाव उत्पन्न करिते झालां. आणि उत्तम उड्डाण करणारे असे तुम्ही त्या नावेच्या योगानें प्रेमेंकरून [ त्याला ] महासमुद्रांतून उडून देवलोकीं घेऊन गेलां.

5. You made for the son of Tugra in the oceanic waters that living [and] winged ship; wherewith you benevolently flew with [ him ] to the gods from the great wave, you who can fly well.

६. उदकांमध्यें फेकलेला, आधाररहित, अंधारांत आपटलेला जो तुग्राचा पुत्र, त्याला समुद्रप्रिय आणि अश्वींनीं हाकारलेल्या अशा च्यार नौका पार करून नेतात.

6. The four ships, dear to the belly-like [ ocean ] and propelled by the As'vins, save the son of Tugra, [ who was ] thrown down into the waters, dashed into bottomless darkness.

---

५. तुग्र राजाचा पुत्र भुज्यु याला अश्वींनीं समुद्रांत बुडत असतांना सचेतन आणि सपक्ष नौका उत्पन्न करून जगविलें आणि स्वर्गीं नेलें याविषयीं सू. ११२ मं. ६,२० इत्यादि पहा.

'उत्तम उड्डाण करणारे' = 'सुपप्तनी.' हा अर्थ सायणांनीं एका पक्षीं केला आहे, तो युक्त दिसतो. पदपाठांत 'सुपप्तनी' असें पद नसतां 'सुपप्तनि' असें आहे. त्यावरून पदपाठकर्त्यास हा अर्थ संमत नाहीं. तरी तो योग्य आहे यांत संशय नाहीं.

६. भुज्यूचीच कथा यांत चालू आहे.

'समुद्रप्रिय' = 'जठलस्य जुष्टाः.' 'जठल' शब्दाचा येथें केलेला अर्थ सायणानुसार आहे. हा शब्द पुनः ऋग्वेदांत आलेला नाहीं. 'जठलस्य जुष्टाः' या पदांचा अर्थ सायण 'समुद्राप्रत प्राप्त झालेल्या' असा करितात. कसेंहि असलें तरी हीं दोन पदें कठिण आहेत हें खरें.

**कः स्विद्वृक्षो निष्ठितो मध्ये अर्णसो यं तौग्र्यो नाधितः पर्यषस्वजत् ।**
**पर्णा मृगस्य पतरोरिवारभ उदश्विना ऊहथुः श्रोमताय कम् ॥७**

कः । स्वित् । वृक्षः । निःऽस्थितः । मध्ये । अर्णसः । यम् । तौग्र्यः । नाधितः । परिऽअसस्वजत् ।
पर्णा । मृगस्य । पतरोःऽइव । आऽरभे । उत् । अश्विनौ । ऊहथुः । श्रोमताय । कम् ॥ ७ ॥

**तद्वां नरा नासत्यावनु ष्याद्यद्वां मानास उचथमवोचन् ।**
**अस्मादद्य सदसः सोम्यादा विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥८॥२८**

तत् । वाम् । नरा । नासत्यौ । अनु । स्यात् । यत् । वाम् । मानासः । उचथम् । अवोचन् ।
अस्मात् । अद्य । सदसः । सोम्यात् । आ । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ८ ॥ २८ ॥

---

## भाषायाम्.

७. कः स्वित् वृक्षः अर्णसो मध्ये निष्ठितः (=कश्चिद् वृक्ष आगत्य समुद्रस्य मध्ये निश्चलः स्थित इव) यं [वृक्षं] नाधितः (=तारणं याचमानस्) तौग्र्यो (=भुज्युः) पर्यषस्वजत् (=परित आलिङ्गितवान्)। पतरोर्मृगस्य आरभे पर्णा इव (=पततः कस्यापि मृगस्य आलम्बनाय पर्णानि पक्षाः प्राप्ता इव)। हे अश्विनौ, श्रोमताय (=यशसे) [तं भुज्युम्] उदूहथुः (=ऊर्ध्वं प्रापयथः स्म=ऊर्ध्वं प्रापय्य यशस्विनौ भूतौ)॥

८. हे नरा नासत्या (=नरौ नासत्यौ=शूरावश्विनौ), यद् [इदम्] उचथं (=स्तोत्रं) मानासः (=मानर्षेः पुत्रा अस्मद्रूपा) वाम् अवोचन् (=अकुर्वन्) तद् वाम् अनु स्यात् (=युवामनुकूलं भवतु=युवाभ्यां प्रियं भवतु)। आ (=अपि च) अस्मात् सोम्यात् सदसः (=सोमयुक्तादस्माद्यज्ञगृहात्=अस्मात् सोमयुक्तयज्ञाद्) [वयम्] अद्य इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि)॥

७. कोणी एक वृक्ष समुद्रामध्यें निश्चल जणूं उभा राहिला, ज्याला तारणेच्छु तुग्रपुत्र वेटाळिता झाला. पडणाऱ्या मृगाला धरावयास पंख जणुं [ मिळाले ]. हे अश्वी हो, [ तुम्ही तुग्रपुत्राला ] वर काढून कीर्ति मिळविते झालां.

८. हे शूर नासत्य हो, [ हें ] जें तुमचें स्तोत्र मानांनीं केलें तें तुम्हांला आवडो. आणि हें जें सोमयुक्त यज्ञगृह त्याच्या योगानें आज आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

7. As if a certain tree stood firm in the middle of the ocean, which the distressed son of Tugra embraced. As if a falling animal obtained wings to support it. You, o As'vins, raised [ him ] and became renowned.

8. May this hymn please you, o brave Nâsatyas, which the sons of Mâna have sung unto you. And to-day through this sacrificial assembly where soma has been offered, may we obtain food, strength, [and] a son that shall quickly make us rich.

---

७. भुज्यूला तारण्याकरितां ज्या नौका एकाएकीं अश्वींनीं प्राप्त करून दिल्या, त्यांला या मंत्रांत दोन उपमा सांगितल्या आहेत. पहिली ही कीं, भुज्यूला पाण्यांत बुडत असतां वृक्षच जणुं धरावयाला मिळाला; दुसरी ही कीं, खालीं पडणाऱ्या एकाद्या मृगाला उडून जाण्यास पंखच जणुं प्राप्त झाले. या प्रकारेंकरून अश्वींनीं भुज्यूचें संरक्षण केलें.

८. 'मानांनीं' म्हणजे मानऋषीच्या वंशजांनीं. 'मान' हें विशेषनाम आहे याविषयीं सू. ११७ मं. ११ आणि त्यावर दिलेली टीप पहा.

## सूक्तम् १८३.

अगस्त्य ऋषिः । अश्विनौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**तं युञ्जाथां मनसो यो जवीयान् त्रिवन्धुरो वृषणा यस्त्रिचक्रः ।**
**येनोपयाथः सुकृतो दुरोणं त्रिधातुना पतथो विर्न पर्णैः ॥ १ ॥**

तम् । युञ्जाथाम् । मनसः । यः । जवीयान् । त्रिऽवन्धुरः । वृषणा । यः । त्रिऽचक्रः ।
येन । उपऽयाथः । सुऽकृतः । दुरोणम् । त्रिऽधातुना । पतथः । विः । न । पर्णैः ॥ १ ॥

**सुवृद्रथो वर्तते यन्नभि क्षां यत्तिष्ठथः क्रतुमन्तानु पृक्षे ।**
**वपुर्वपुष्या सचतामियं गीर्दिवो दुहित्रोषसा सचेथे ॥ २ ॥**

सुऽवृत् । रथः । वर्तते । यन् । अभि । क्षाम् । यत् । तिष्ठथः । क्रतुऽमन्ता । अनु । पृक्षे ।
वपुः । वपुष्या । सचताम् । इयम् । गीः । दिवः । दुहित्रा । उषसा । सचेथे इति ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१ हे वृषणा (=वर्षकौ=वीर्यवन्तावश्विनौ), यो [ रथो ] मनसो जवीयान् (=मनसोपि वेगवत्तरस्) त्रिवन्धुरस् (=ईषारूपत्रिविधबन्धनकाष्ठयुक्तो ) यस्त्रिचक्रः (=चक्रत्रयोपेतः ) [ अपि च ] येन सुकृतो दुरोणं (=सुकर्मकारिणो यजमानस्य गृहम् ) उपयाथः (=गच्छथः)—[ युवां ] त्रिधातुना [ रथेन ] (=त्रिप्रकारस्थानोपेतेन रथेन) पर्णैर्विर्न (=पक्षैः पक्षीव) पतथः (=उत्पतथः)—तं [रथं] युञ्जाथां (=योजयतम्) ॥

२. यद् (=यदा ) क्रतुमन्ता (=क्रतुमन्तौ=गमनाय कृतसंकल्पौ ) पृक्षे (=हविरन्नाय=हविरन्नं प्रति गन्तुं ) [ रथम् ] अनु तिष्ठथः (=आश्रयथस् ) [ तदानीं स ] रथः अभि क्षां ( =देवयजनभूमिं प्रति ) यन् ( =गच्छन् ) सुवृत् वर्तते ( =सुचक्रभ्रमणं यथा तथा गच्छति) । इयं [मम] वपुष्या गीः (=युवयोः शरीराय हिता इयं स्तुतिरूपा वाग् ) वपुः सचतां (=युवयोः शरीरं सेवतां=युवयोः शरीरेण सह गच्छतु ) । दिवो दुहित्रा उषसा ( =द्युदेवस्य कन्यकया उषसा ) सचेथे ( =संगच्छेथे=तया सह गच्छथः=तया सह समकालत्वेन गच्छथः ) ॥

## सूक्त १८३.

ऋषि—अगस्त्य. देवता—अश्वी. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. हे वीर्यवंत अश्वी हो, जो मनापेक्षांहि वेगवान्, तीन दांड्यांचा, [आणि] जो तीन चाकांचा, ज्यांत बसून तुम्हीं पुण्यवंताच्या घरीं जात असतां—पक्षांच्या योगेंकरून जसा पक्षी, तसे तुम्ही त्रिगुणित [रथाच्या योगा]नें जातां—त्या रथाला तुम्ही जोडा.

२. हे अश्वी हो, तुम्ही जेव्हां मनांत संकल्प करून हविरन्नासाठीं रथांत बसतां तेव्हां तो रथ यज्ञभूमीकडे जातेवेळीं फार सुरळीतपणें चालतो. ही सुखकारक स्तुति तुमच्या अंगाबरोबर जाओ. तुम्ही द्यूची कन्यका उषा इजबरोबर जात असतां.

## HYMN 183.

To the *As'vins.* By *Agastya.* Metre—*Trishtubh.*

1. Put the horses to that chariot which is swifter than the mind is of a triple seat, and which has three wheels; o puissant [As'vins], in which you go to the house of the righteous— you fly with the threefold chariot as a bird with wings.

2. When resolved [to go] you mount your chariot for [receiving] the offering, easy rolls your chariot, going towards the sacrificial ground. May this praise, which is good for your person, be united with your person. With Ushas, the daughter of Dyaus, are you united.

---

१. तीन दांड्यांचा. सू.११८. मं.१,२ हे आणि त्यांजवरील टिपा पाहा.

२. तात्पर्य: 'हे अश्वी हो, उपासकांचें हवि घेण्याकरितां जेव्हां तुम्ही रथांत बसून जात असतां तेव्हां तुमचा रथ फार जलद चालतो. आणि तुम्ही जातां त्या वेळीं द्यूची कन्यका उषा हीहि तुम्हांबरोबरच असते. तर ही माझी स्तुतिहि तुम्हांबरोबर जाओ.' 'अंगाबरोबर' = 'वपुः.' 'वपुष्या गीः वपुः सचतां' यांतील 'वपुः' हा शब्द कठिण आहे. 'वपुष्या गीः सचतां' म्हणजे 'सुखकारक स्तोत्र तुम्हाला सेवो' असा अर्थ आहे यांत संशय नाहीं. 'वपुः' म्हणजे 'शरीर' असा अर्थ आहे तरी तुमचें (अश्वींचें) शरीर, असा अर्थ येथें संभवत नाहीं; पण दुसरा निर्वाह दिसत नाहीं.

आ तिष्ठतं सुवृतं यो रथो वामनु व्रतानि वर्तते हविष्मान् ।
येन नरा नासत्येषयध्यै वर्तिर्याथस्तनयाय त्मने च ॥३॥
आ । तिष्ठतम् । सुऽवृतम् । यः । रथः । वाम् । अनु । व्रतानि । वर्तते । हविष्मान् ।
येन । नरा । नासत्या । इषयध्यै । वर्तिः । याथः । तनयाय । त्मने । च ॥ ३ ॥

मा वां वृको मा वृकीरा दधर्षीन्मा परि वर्क्तमुत माति धक्तम् ।
अयं वां भागो निहित इयं गीर्दस्राविमे वां निधयो मधूनाम् ॥४॥
मा । वाम् । वृकः । मा । वृकीः । आ । दधर्षीत् । मा । परि । वर्क्तम् । उत । मा । अति । धक्तम् ।
अयम् । वाम् । भागः । निऽहितः । इयम् । गीः । दस्रौ । इमे । वाम् । निऽधयः । मधूनाम् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. यो वां हविष्मान् (=हविर्भिः पूर्णो ) रथः अनु व्रतानि वर्तते (=यज्ञकर्माण्यनुलक्ष्य गच्छति ) येन [ च ] हे नरा नासत्या ( =शूरौ नासत्यौ ) इषयध्यै ( =हविरन्नं प्राप्तुं ) [ यजमानस्य ] वर्तिः (=गृहं प्रति ) तनयाय त्मने च (=पुत्राद्यपत्यकल्याणार्थं तस्य स्वात्मकल्याणार्थं च ) याथस्तं सुवृतं (=शोभनचक्रभ्रमणं रथम् ) आ तिष्ठतम् (=आरोहतम् ) ॥

४. वां वृकः (=युवयोर्हिंसकोरण्यश्वा ) अस्मान् [ मा दधर्षीत्=मा हिनस्तु ] आ (=अपि च ) वृकीः (=वृकी=अरण्यशुनी ) मा दधर्षीत् (=मा हिनस्तु ) [युवाम् अस्मान् ] मा परि वर्क्तम् ( =अस्मान् मा वर्जयतम्=अस्मान् परितो मा वर्जयतम् ) । उत (=अपि च ) मा [ अस्मान् ] अति धक्तम् (=" अस्मानतिक्रम्यान्यस्मै मा दत्तम्" ) । अयं (=पुरोदर्शी ) वां भागः (=युवयोर्हविर्भागो ) निहितः (=युवयोरर्थं प्रार्पितः ) । इयं गीः (=युवयोरर्थम् एषा स्तुतिः कृतास्ति) । हे दस्रौ (=पराक्रमिणावश्विनौ ), इमे मधूनां वां निधयः (=युवयोरर्थं मधुराणां सोमरसानां राशयः ) [ प्रार्पिता भवन्ति ] ॥

३. हे शूर नासत्य हो, हवींनीं भरलेला जो रथ कर्माकडे जात असतो त्या तुमच्या सुरळीत चालणाऱ्या रथांत तुम्ही बसा; ज्याच्या योगेंकरून तुम्ही उपासकाचें आणि त्याच्या मुलांबाळांचें कल्याण करण्याकरितां हविरन्नासाठीं त्याच्या घरीं जातां.

४. तुमचा लांडगा [आम्हांस] उपद्रव न करो, आणि लांडगीहि उपद्रव न करो. तुम्ही [आम्हांस] वगळून जाऊं नका, अथवा [आम्हांस] टाकून [दुसऱ्यावर] प्रसाद करूं नका. हा तुमचा भाग येथें ठेविला आहे, ही तुमची स्तुति केली आहे. हे पराक्रमी [अश्वी] हो, हे सोमरसांचे राशि तुम्हांस अर्पण केले आहेत.

3. Mount that easy-rolling chariot of yours which, filled with offerings, runs towards sacrifices, [and] in which you, o brave Nâsatyas repair for oblation to the sacrificer's house for his own and his children's benefit.

4 Let not your wolf hurt [us], let not your she-wolf hurt [us]. Do not avoid us, and do not favour others in preference to us. Here is your part of the offering put down for you, here is praise for you. Here are heaps of the sweet juices for you, o conquering heroes.

'तुम्ही द्युची कन्यका उषा इजबरोबर जात असतां' = 'दिवो दुहित्रा उषसा सचेथे.' म्हणजे उषःकाळीं उगवत असतां.

३. 'हवींनीं भरलेला' = 'हविष्मान्.' म्हणजे जो भ्रमण करतां करतां उपासकांनीं अर्पण केलेल्या हवींनीं भरिला जातो तो.

४. यांत सांगितलेला अश्वींचा लांडगा आणि अश्वींची लांडगी म्हणजे काय याविषयीं संशय आहे. अश्वींच्या संबंधानें सू. ११७ मं. १७, १८, सू. ११६ मं. १६ यांत लांडगीविषयीं सांगितलेलें आहे, पण लांडग्याविषयीं कोठें सांगितलेलें आढळत नाहीं. कदाचित् लांडगा आणि लांडगी म्हणजे सायण म्हणतात त्याप्रमाणें कोणीहि घात करणारा आणि घात करणारी असें समजावयाचें आहे.

**युवां गोतमः पुरुमीळ्हो अत्रिर्दस्रा हवतेऽवसे हविष्मान् ।**
**दिशं न दिष्टामृजूयेव यन्ता मे हवं नासत्योप यातम् ॥ ५ ॥**

युवाम् । गोतमः । पुरुऽमीळ्हः । अत्रिः । दस्रा । हवते । अवसे । हविष्मान् ।
दिशम् । न । दिष्टाम् । ऋजुयाऽइव । यन्ता । आ । मे । हवम् । नासत्या । उप । यातम् ॥ ५ ॥

**अतारिष्म तमसस्पारमस्य प्रति वां स्तोमो अश्विनावधायि ।**
**एह यातं पथिभिर्देवयानैर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥६॥२९॥४॥**

अतारिष्म । तमसः । पारम् । अस्य । प्रति । वाम् । स्तोमः । अश्विनौ । अधायि ।
आ । इह । यातम् । पथिऽभिः । देवऽयानैः । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ६ ॥ २९ ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

५. हे दस्रा (=दस्रौ=पराक्रमिणौ ), गोतमः, पुरुमीळ्हः, अत्रिः [इत्येषां प्रत्येको] हविष्मान् (=हविर्युक्तः सन्=हविषा) युवाम् अवसे (=रक्षणाय) हवते (=आह्वयति)। हे नासत्या (=नासत्यावश्विनौ ), यन्ता दिष्टां दिशं न ऋजूयेव (=अभिमतं गन्तव्यं स्थानं रथेनाजिधावनकर्ता यथा धावति तद्वत्) मे हवम् उप आ यातं (=ममाह्वानं प्रत्यागच्छतम् ) ॥

६. [ वयम् ] अस्य तमसः पारम् (=अस्य दुःखस्य पर्यन्तभूमिम् ) अतारिष्म (=उत्तीर्णा भूताः स्मः) । हे अश्विनौ, वां प्रति [ युष्म ]- स्तोमः अधायि (=युवां प्रति=युवयोः प्रीत्यर्थमेतत्स्तोत्रमकारि ) । [ तस्मात् कारणाद् ] देवयानैः पथिभिः (=देवैर्गन्तव्यैर्मार्गैः ) इह आ यातम् (=अत्रागच्छतम् ) [ अपि च वयम् ] इषम् (=अन्नं ) वृजनं (=बलं ) जीरदानुं (=क्षिप्रदानं ) [ वीरं=पुत्रं च ] विद्याम (=लभेमहि ) ॥

द्वितीयाष्टके चतुर्थोऽध्यायः समाप्तः ।

५. हे पराक्रमी [अश्वी] हो, तुम्हांला गोतम, पुरुमीह्ळु, [आणि] अत्रि हे हवि अर्पण करून संरक्षणासाठीं आह्वान करीत असत. हे नासत्य हो, नेमलेल्या ठिकाणाला सरळ मार्गानें जसा रथ हाकणारा [जातो], तसे तुम्ही माझ्या हाकेप्रत या.

5. Gotama, Purumiḷhḷa [and] Atri invoke you, o conquering heroes, with offerings for help. As a chariot-racer [drives] to a fixed goal by a straight road, so come ye to my invocation, o Nâsatyas!

६. [आतां] आम्ही या अंधकाराच्या पार पडलों. हे अश्वी हो, हें स्तोत्र तुम्हांप्रीत्यर्थ केलें आहे. ज्या मार्गानीं देव चालतात त्या मार्गानीं तुम्ही इकडे या. [आणि] आम्हांस अन्न, बळ, आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

6. We have come to the end of this darkness. [This] hymn is made for you, o As'vins! Come hither along the paths by which the gods walk. [And] may we obtain food, strength, [and] a son that shall quickly make us rich.

---

५. 'गोतम,' 'पुरुमीह्ळु' आणि 'अत्रि' हे कोण होत याविषयीं सू.५१ मं. १६ आणि सू. १५१ मं. २ आणि सू. ११२ मं. ७ पहा. त्या तिघांनीं तुम्हांला हवि अर्पण करून जसें संरक्षणासाठीं पूर्वकाळीं बोलाविलें तसा मी आज तुम्हांस बोलावीत आहें, तर तुम्ही या असें तात्पर्य आहे.

६. या मंत्रांत सांगितलेला अंधकार म्हणजे दुःखरूपी अंधकार होय असें सायण म्हणतात तसें असेल, अथवा रात्ररूप अंधार असेल, किंवा संसाररूप अंधार असेल. सूक्त ९२ मं. ६, आणि ऋ. ७.७३.१ आणि त्याजवरील टीप आणि सायणभाष्य पहा.

येथें दुसऱ्या अष्टकाचा चवथा अध्याय संपला.

## सूक्तम् १८४.

अगस्त्य ऋषिः । अश्विनौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**ता वामद्य तावपरं हुवेमोच्छन्त्यामुषसि वह्निरुक्थैः ।**
**नासत्या कुह चित्सन्तावर्यो दिवो नपाता सुदास्तराय ॥ १ ॥**

ता । वाम् । अद्य । तौ । अपरम् । हुवेम । उच्छन्त्याम् । उषसि । वह्निः । उक्थैः ।
नासत्या । कुह । चित् । सन्तौ । अर्यः । दिवः । नपाता । सुदाःऽतराय ॥ १ ॥

**अस्मे ऊ षु वृषणा मादयेथामुत्पणीँर्हतमूर्म्या मदन्ता ।**
**श्रुतं मे अच्छोक्तिभिर्मतीनामेष्टा नरा निचेतारा च कर्णैः ॥ २॥**

अस्मे इति । ऊं इति । सु । वृषणा । मादयेथाम् । उत् । पणीन् । हतम् । ऊर्म्या । मदन्ता ।
श्रुतम् । मे । अच्छोक्तिऽभिः । मतीनाम् । एष्टा । नरा । निऽचेतारा। च । कर्णैः ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. हे नासत्या (=नासत्यौ) कुह चित् सन्तौ (=कुत्रापि वर्तमानौ) दिवो नपाता (=द्युदेवस्य पुत्रौ) ता वाम् अद्य ता [ वाम् ] अपरं (=तौ प्रसिद्धौ युवामस्मिन्दिने युवां चापरस्मिन्दिने) उच्छन्त्याम् उषसि (=उषसि तमो विवासयन्त्यां सत्याम्=उषःकाले) वह्निः (=वह्नयः=हविर्वाहः=हविर्युक्ता) अर्यः (=स्तोत्रशीला) [वयम्] उक्थैः (=स्तोत्रैः) सुदास्तराय (=अत्यर्थं शोभनहविर्दात्रे यजमानाय) हुवेम (=आह्वयाम)॥

२. हे वृषणा (=वृषणौ=वीर्यवन्तावश्विनौ), अस्मे उ सु मादयेथाम् (=अस्मास्वेव सुष्ठु तृप्यतम्) [ अस्माकं च ] [ सोमस्य ] ऊर्म्या (=सोमस्योर्मिणा=सोमस्य प्रवाहेण=अस्माभिः प्रार्पितेन सोमेन) मदन्ता (=मदन्तौ=हर्षं प्राप्नुवन्तौ) पणीन् (=अयजकान् लुब्धकान्) उत् हतम् (=उन्मूल्य नाशयतम्)। [अपि च ] हे नरा (=नरौ शूरावश्विनौ), मतीनाम् अच्छोक्तिभिः (=स्तुतीनामभिवचनैर्) एष्टा (=एष्टौ=आनीतौ) कर्णैश्च निचेतारा (=निचेतारौ=श्रुतस्य संचेतारौ) [युवां] मे श्रुतं (=ममाह्वानं शृणुतम्)॥

एष्टेति पदम् आयज् इति सोपसर्गाद्धातोः ॥

## सूक्त १८४.

ऋषि–अगस्त्य. देवता–अश्वी. वृत्त– त्रिष्टुभ्.

१. हे नासत्य हो, प्रसिद्ध जे तुम्ही त्या तुम्हां द्युपुत्रांला, तुम्ही कोठेंहि असलां तरी, उषा उगवतांच हवींनीं आणि स्तोत्रांनीं भक्तिपूर्वक होत्साते आम्ही उदार यजमानासाठीं आज आह्वान करूं, आणि उद्यां आह्वान करूं.

२. हे वीर्यवंत [ अश्वी] हो, तुम्ही आमच्याच येथें आनंद पावा. [ आमचा ] सोम पिऊन कृपण अनुपासकांला निर्मूळ करा. हे शूर [अश्वी] हो, [तुम्हां]प्रत म्हटलेलीं जीं स्तोत्रें त्यांच्या योगानें प्राप्त झालेले आणि कानांनीं संचय करणारे असे जे तुम्ही ते माझें म्हणणें ऐका.

## Hymn 184.

To *the As'vins*. By *Agastya*. Metre—*Trishṭubh*.

1. So may we invoke today, so invoke tomorrow you, o Nâsatyas, wherever you may be, you the sons of Dyaus, for the benefit of the liberal sacrificer, with oblations, hymns and devotion, at the break of Dawn

2. In our house alone be you exhilarated o puissant [As'vins] ! and delighted with our flow [of Soma], destroy the unsacrificing misers. Brought hitherwards by the address of hymns, and observers with your ears, hear me, o brave [ones] !

---

१. यांत होता ( म्हणजे यज्ञ संपादन करणारा ) म्हणतो कीं, 'हे अश्वी हो, आम्ही तुम्हांला आज आणि आम्ही तुम्हांला उद्यां ( म्हणजे प्रतिदिनीं ) प्रातःकालीं स्तोत्रें आणि हव्यें आणि भक्ति यांच्या योगानें आमच्या यजमानार्थ आह्वान करूं, मग तुम्ही कोठेंहि असा.'

'हवींनीं '=' वह्निः.' येथें 'वह्नि' हें एकवचन 'वह्नयः' या अनेकवचनाच्या जागीं योजिलें आहे. 'वह्नि' म्हणजे जो हवि घेऊन अर्पण्यासाठीं पुढें सरसावला तो.

'भक्तिपूर्वक '=' अर्यः.' 'अरि' म्हणजे 'भक्तिमान्,' 'स्तोत्र करणारा,' 'भजक' हा अर्थ वेदांत प्रसिद्ध आहे.

'उदार यजमानासाठीं '=' सुदास-

**श्रिये पूषन्निषुकृतेव देवा नासत्या वहतुं सूर्यायाः ।**
**वच्यन्ते वां ककुहा अप्सु जाता युगा जूर्णेव वरुणस्य भूरेः ॥३॥**

श्रिये । पूषन् । इषुकृताऽइव । देवा । नासत्या । वहतुम् । सूर्यायाः ।
वच्यन्ते । वाम् । ककुहाः । अप्ऽसु । जाताः । युगा । जूर्णाऽइव ।
वरुणस्य । भूरेः ॥ ३ ॥

---

**भाषायाम्.**

३. हे पूषन् ( = ? पूषणौ=पोषकौ ) नासत्या देवा ( =नासत्यौ देवौ ), [ युवाम् ] इषुकृतेव (=इषुकृताविव=बाणीकृताविव सन्तौ=बाणवच्छीघ्रीकृतौ सन्तौ ) सूर्याया वहतुं (=सूर्यानाम्न्याः सूर्यकन्याया विवाहं प्रति ) श्रिये ( =शोभायै=सशोभं यथा तथा) [अवच्यथाम्=अधावतम्] । अप्सु जाताः (=आन्तरिक्षेषु प्रदेशेषु जाता) वां ककुहाः (=युवयोरुच्छ्रिता अश्वा ) भूरेर्वरुणस्य जूर्णा युगेव (=महतो वरुणदेवस्य पुरातनानि युगानीव=पुरातनान्यश्वयुग्मानीव ) वच्यन्ते (=धावन्ति स्म ) ॥

अत्र सायणः । सविता सूर्यो दुहितरं सूर्याख्यां प्रदातुमना देवानाहूय सामर्थ्यसमीक्षणायाजिं परिकल्प्य य इमं जेष्यति स एषां कन्यकामृक्सहस्रकॢप्तं स्तोत्रं च लभत इत्यकल्पयत् । तमग्निः प्रथममजयत् तमन्वश्विनावपि जित्वाग्निं प्रधृष्य ऋक्सहस्रं कन्यकां चालभेताम् । तत इन्द्र उषाश्चाजयताम् । तौ च तैरग्न्यादिभिः प्रार्थितौ स्वशस्त्रस्य कंचित्कंचिद्भागं तेभ्यः परिकल्प्य सूर्यां स्वरथेऽधारयतामिति । अयमितिहासो ब्राह्मणे प्रजापतिर्वै सोमाय राज्ञ इत्यत्राम्नातोऽस्माभिः प्रथमाष्टके । १.८. २०. ५.. आ वां पतित्वं सख्यायेत्यत्र प्रपञ्चितः । तत्राह । हे पूषन् पोषक सूर्य । एतच्चन्द्रस्याप्युपलक्षणं सूर्याचन्द्रमसोरेवाश्विन्वात् । सूर्याचन्द्रमसावित्येक इति यास्केनोक्तत्वात् । अतः पूषन्नित्युक्ते हे पोषकावश्विनावित्युक्तं भवति । हे पोषकौ हे नासत्या असत्यरहितौ देवा देवौ युवां श्रिये श्रेयसे शस्त्रस्य कन्यायाश्च लाभायेत्यर्थः । इषुकृतेव । इवशब्द एवार्थे । आजिधावनायेषुवच्छीघ्रमृजुगामिनौ कृतावेव सन्तौ सूर्याया एतन्नामिकायाः सवितुः पुत्र्याः ॥ कर्मणि षष्ठी ॥ सूर्यां वहतुं रथे धारयितुमाजिमुदजयतमित्यर्थः । यस्मादेवं तस्मादप्सु जाताः कर्मसु संपादिताः ककुहाः शस्त्ररूपाः स्तुतयो भूरेरविच्छिन्नप्रवाहस्य वरुणस्य फलप्रतिबन्धकपापनिवारकस्य यागस्य सिद्ध्यर्थं तत्संबन्धिन्यो वां प्रति वच्यन्ते होत्रादिभिः । युवामेव शस्त्रगतमन्त्रैर्यागकाले च स्तुवन्तीत्यर्थः । युगा जूर्णेव । जीर्णानि युगानीव । इवशब्दः संप्रत्यर्थः । पुरातना यागकाला यथा तद्वदद्यतना अपीत्यर्थः । पूर्वकाले यथा युवामेव स्तुवन्ति तद्वदिदानीमपीति तात्पर्यम् । इति ॥

३. हे पोषक [अश्वी] हो, हे नासत्य देव हो, तुम्ही सूर्येच्या विवाहाप्रत बाणासारिखे शोभत [भरधांव गेलां]. तुमचे अंतरिक्षांत जन्मलेले उंच [घोडे] महान् वरुणाच्या प्राचीन जोड्यांप्रमाणें भरधांव गेले.

3. You [ran] gracefully, o nourishing gods Nâsatyas, to the marriage of Sûryâ, as if turned into arrows. Your high steeds born in the firmament gallopped like the ancient teams of great Varuṇa.

---

राय.' म्हणजे देवांला विपुल हव्यें देणारा जो यजमान त्याजवर अश्वी प्रसन्न व्हावे म्हणून.

वृत्तासाठीं 'उच्छन्तिआम्,' 'नासत्तिआ' आणि 'सुदआस्तराय' असें म्हणावें लागतें.

२. 'आमच्याच येथें' इ०. म्हणजे आमच्याच घरीं हवि आणि सोम भक्षण्याकरितां या, दुसऱ्याच्या घरीं जाऊं नका.

'[तुम्हां]प्रत म्हटलेलीं जीं स्तोत्रें' ='अच्छोक्तिभिः मतीनाम्.' म्हणजे अक्षरशः 'स्तोत्रांच्या अभिवचनांनीं.' अभिवचन म्हणजे कोणाला तरी संबोधून म्हटलेलें वचन.

वृत्तासाठीं, 'ऊमिआ' आणि 'मतीनआम्' असें म्हणावें लागतें.

---

३. 'हे नासत्य हो, तुमची स्त्री सूर्या इच्याशीं तुमचा विवाह झाला त्या प्रसंगीं तुम्ही बाणांप्रमाणें धांवलां. आणि तुमचे घोडे वरुणदेवाच्या घोड्यांप्रमाणें भरधांव गेले' असें तात्पर्य.

सूर्या ही कोण व तिच्या लग्नाच्या वेळीं अश्वी कां धांवले याविषयीं सू. ३४ मं.५, आणि त्यावरील टीप पहा.

**अस्मे सा वां माध्वी रातिरस्तु स्तोमं हिनोतं मान्यस्य कारोः ।**
**अनु यद्वां श्रवस्या सुदानू सुवीर्याय चर्षणयो मदन्ति ॥ ४ ॥**

अस्मे इति । सा । वाम् । माध्वी इति । रातिः । अस्तु । स्तोमम् । हिनोतम् । मान्यस्य । कारोः ।
अनु । यत् । वाम् । श्रवस्या । सुदानू इति सुऽदानू । सुऽवीर्याय । चर्षणयः । मदन्ति ॥ ४ ॥

**एष वां स्तोमो अश्विनावकारि मानेभिर्मघवाना सुवृक्ति ।**
**यातं वर्तिस्तनयाय त्मने चागस्त्ये नासत्या मदन्ता ॥ ५ ॥**

एषः । वाम् । स्तोमः । अश्विनौ । अकारि । मानेभिः । मघऽवाना । सुऽवृक्ति ।
यातम् । वर्तिः । तनयाय । त्मने । च । अगस्त्ये । नासत्या । मदन्ता ५

## भाषायाम्.

४. हे माध्वी (=मधुपात्रयुक्तावश्विनौ), सा वां रातिः (=प्रसिद्धं युवयोर्दानम्) अस्मे अस्तु (=अस्मासु भवतु=अस्मभ्यं दत्तं भवतु) । मान्यस्य कारोः (=मानऋषेः पुत्रभूतस्य कवेः) स्तोमं हिनोतं (=स्तोत्रं हिनुतं=स्तोत्रं प्रीणयतम्) । यद् (=यस्मात्कारणात्) हे सुदानू (=शोभनदानोपेतावश्विनौ), चर्षणयः (=मनुष्याः) श्रवस्या (=अन्नेच्छया) सुवीर्याय (=शोभनबलाय) [च] वाम् अनु मदन्ति (=युवां सोमाद्यर्पणेन हर्षयन्ति) ॥

५. हे मघवाना अश्विनौ (=हे भगवन्तावश्विनौ), एष वां स्तोमः (=एतद् युवयोः स्तोत्रं) मानेभिः (=मानस्य पुत्रैरस्मदात्मभिः) सुवृक्ति (=सुवचनं यथा तथा) अकारि । [एवं सति] हे नासत्या (=हे नासत्यावश्विनौ), तनयाय त्मने च (=अस्माकं स्वात्महितार्थं पुत्रपौत्रादीनां च हितार्थं) वर्तिर्यातम् (=अत्रायातम्) । अगस्त्ये मदन्ता (=अगस्त्ये माद्यन्तौ=अगस्त्यस्य मम गृहे हर्षं प्राप्नुवन्तौ=अगस्त्यगृहे च सोमादिभक्षणेन हर्षं प्राप्नुतम्) ॥

४. हे मधुपात्रयुक्त अश्वी हो, तुमचा जो उदार प्रसाद तो आम्हांला प्राप्त होओ, तुम्ही मान्यकवीचें स्तोत्र प्रीतीनें ग्रहण करा. कारण कीं, हे महोदार अश्वी हो, जन अन्नाच्या इच्छेनें [ आणि ] चांगल्या बळासाठीं तुम्हांला हर्षवितात.

५. हे धनसंपन्न अश्वी हो, हें स्तोत्र सुंदर रीतीनें रचून मानपुत्रांनीं तुम्हांप्रीत्यर्थ म्हटलें आहे. तुम्ही आमच्या मुलांबाळांकरितां आणि आम्हांकरितां [आमच्या ] घरीं या. आणि हे नासत्य हो, अगस्त्याच्या घरीं हर्ष पावा.

4. With us may that your bounty be, o bearers of sweetness! Love you the hymn of the poet Mânya. For people exhilarate you, o most bounteous ones, with the desire of food and for great strength.

5. This hymn composed with care is sung unto you, o bounteous As'vins, by the sons of Mâna. Come home unto us for our children's and for our own sake, delighting yourselves in the house of Agastya, o Nâsatyas.

---

४. ' मधुपात्रयुक्त '=' माध्वी.' ' माध्वी ' हा शब्द वेदांत बऱ्याच ठिकाणीं आला आहे. तो नित्य अश्वींचें विशेषण असतो. अश्वी येत असतां त्यांजबराबर मधु असतें हें प्रसिद्ध आहे त्या गोष्टीला अनुलक्षून हें विशेषण दिलें आहे.

'मान्य' याविषयीं सू. १६५ मं. १४, आणि त्याजवरील टीप पहा.

५. ' अगस्त्याच्या घरीं '=' अगस्त्ये.' म्हणजे सूक्तकर्ता अगस्त्य याच्या घरीं.

**अतारिष्म तमसस्पारमस्य प्रति वां स्तोमो अश्विनावधायि ।**
**एह यातं पथिभिर्देवयानैर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥ ६ ॥ १ ॥**

अतारिष्म । तमसः । पारम् । अस्य । प्रति । वाम् । स्तोमः । अश्वि-
नौ । अधायि ।
आ । इह । यातम् । पथिऽभिः । देवऽयानैः । विद्याम । इषम् । वृ-
जनम् । जीरऽदानुम् ॥ ६ ॥ १ ॥

## भाषायाम्.

६. [ वयम् ] अस्य तमसः पारम् ( =अस्य दुःखस्य पर्यन्तभूमिम् ) अतारिष्म (=उत्तीर्णा भूताः स्मः ) । हे अश्विनौ, वां प्रति [ एष ] स्तोमः अधायि ( =युवां प्रति=युवयोः प्रीत्यर्थमेतत्स्तोत्रमकारि ) । [ तस्मात् कारणाद् ] देवयानैः पथिभिः (=देवैर्गन्तव्यैर्मार्गैर् ) इह आ यातम् ( =अत्रागच्छतम् ) [ अपि च वयम् ] इषम् ( =अन्नं ) वृजनं ( =बलं ) जीरदानुं ( =क्षिप्रदानं ) [ वीरं=पुत्रं च ] विद्याम (=लभेमहि ) ॥

---

## सूक्तम् १८५.

अगस्त्य ऋषिः । द्यावापृथिव्यौ देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**कतरा पूर्वा कतरापरायोः कथा जाते कवयः को वि वेद ।**
**विश्वं त्मना बिभृतो यद्ध नाम वि वर्तेते अहनी चक्रियेव ॥ १ ॥**

कतरा । पूर्वा । कतरा । अपरा । अयोः । कथा । जाते इति । कव-
यः । कः । वि । वेद ।
विश्वम् । त्मना । बिभृतः । यत् । ह । नाम । वि । वर्तेते इति ।
अहनी इति । चक्रियाऽइव ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. हे कवयः (=हे ऋषयः), अयोः (=अनयोर्द्यावापृथिव्योः ) पूर्वा कतरा (=का पूर्वम् उत्पन्ना ) अपरा कतरा (=का पश्चाद्भाविनी)? कथा जाते (=एते कथं जाते)?

६. [ आतां ] आम्ही या अंधकाराच्या पार पडलों. हे अश्वी हो, हें स्तोत्र तुम्हांप्रीत्यर्थ केलें आहे. ज्या मार्गांनीं देव चालतात त्या मार्गांनीं तुम्ही इकडे या. [ आणि ] आम्हांस अन्न, बळ, आणि लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

6. We have come to the end of this darkness. [This] hymn is made for you, o As'vins! Come hither along the paths by which the gods walk. [And] may we obtain food, strength, [and] a son that shall quickly make us rich.

६. पूर्व सूक्ताच्या शेवटील आणि | हा मंत्र एकच आहेत.

## सूक्त १८५.

ऋषि– अगस्त्य. देवता–द्यावापृथिवी. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे ऋषींनों, या दोघांतून पहिली कोण आणि नंतरची कोण, [ आणि ] या दोघी कशा झाल्या [ हें ] कोण जाणतो ? ज्यापेक्षां सकळ विश्वाला ह्या प्रत्येक स्वतंत्रपणें धारण करितात. [ ह्या द्यावापृथिवी ] दिवस आणि रात्र चक्रांनीं फिरल्याप्रमाणें वेगवेगळ्या फिरतात.

## HYMN 185.

To *Dyâvâ Prithivyau* i.e. *Heaven* and *Earth*. By *Agastya*. Metre–*Trishtubh*.[1]

1. Which of these two is the prior [and] which the posterior, how they were created––who knows, o poets? For they support the whole universe each independently. They revolve like day and night on a wheel.

१. हें सूक्त द्यावापृथिवींविषयीं आहे; म्हणजे सूर्यादिकांच्या प्रकाशानें तेजःपुंज जो पृथिवीच्या वरील अनंत अवकाशप्रदेश, कीं ज्यामध्यें सूर्यादिक अगणित प्रचंड गोल उगवून दिवस करितात तो द्यु, आणि जिजवर आपण राहतों ती पृथिवी. यावरून दिसून येईल कीं द्यावापृथिवी म्हणजे सर्व जगत्, विश्व, सर्व वस्तु ज्यांत आहेत तें सर्व स्थळ; मग तें पृथिवीसंबंधी असो, अथवा

भूरिं द्वे अचरन्ती चरन्तं पद्वन्तं गर्भमपदी दधाते ।
नित्यं न सूनुं पित्रोरुपस्थे द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥ २॥
भूरिम् । द्वे इति । अचरन्ती इति । चरन्तम् । पत्ऽवन्तम् । गर्भम् ।
अपदी इति । दधाते इति ।
नित्यम् । न । सूनुम् । पित्रोः । उपऽस्थे । द्यावा । रक्षतम् । पृथिवी
इति । नः । अभ्वात् ॥ २ ॥
अनेहो दात्रमदितेरनर्वं हुवे स्वर्वदवधं नमस्वत् ।
तद्रोदसी जनयतं जरित्रे द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥ ३ ॥
अनेहः । दात्रम् । अदितेः । अनर्वम् । हुवे । स्वःऽवत् । अवधम् ।
नमस्वत् ।
तत् । रोदसी इति । जनयतम् । जरित्रे । द्यावा । रक्षतम् । पृथिवी
इति । नः । अभ्वात् ॥ ३ ॥

---

[ एतद् ] को विवेद (=को विशेषेण जानाति)? यद् (=यस्मात्कारणाद् ) विश्वं नाम (=सकलं वस्तुजातं=कृत्स्नमपि जगत् ) त्मना बिभृतो ह (=आत्मनैव धारयतः=प्रत्येकम् अनन्यापेक्षया धारयतः ) । [ अपि च ] अहनी चक्रियेव (=अहोरात्रे यथा चक्रेण तथा ) वि वर्तेते (=विविधं वर्तेते=प्रत्येकम् अनन्यापेक्षया परिभ्रमतः ) ॥

---

## भाषायाम्.

२. द्वे (=एते द्यावापृथिव्यौ ) [ स्वयम्] अचरन्ती (=अचरन्त्यौ) अपदी (=पादरहिते च सत्यौ ) चरन्तं पद्वन्तं च भूरिं गर्भं ( =पादयुक्तं कृत्स्नं प्राणिजातं ) दधाते (=धारयतः)। पित्रोरुपस्थे नित्यं सूनुं न (=मातापित्रोरुत्सङ्गे, मातापितरौ यथा स्वकीयं पुत्रं धारयतस्तथा ) [ ते धारयतः ] । [ एवं सति ] हे द्यावापृथिवी ( =द्यावापृथिव्यौ ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान् पापात्पालयतम् ) ॥

३. अदितेः (=अखण्डिताया द्यावापृथिवीरूपाया निःसीमावकाशलक्षणाया देव्या) अनेहः (=अपापम्) अनर्वम् (=अक्षीणं) स्वर्वत् (=स्वर्गयुक्तम्) अवधम् ( =अमरणं) नमस्वत् (=अन्नवद्) दात्रं (=दानम्=औदार्यं) हुवे (=आह्वयामि=याचे) । हे रोदसी (=द्यावापृथिव्यौ), तद् [ दात्रं ] जरित्रे (=स्तोत्रे=मदर्थं) जनयतम् (=उत्पादयतम्)। हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान्पापात्पालयतम्)॥

२. ह्या दोघी जणी [स्वतः] न चालणाऱ्या [ आणि ] पादहीन [ असतां ] चालणाऱ्या [ आणि ] सपाद अनेक प्राण्यांला धारण करितात. आईबापांच्या मांडीवर औरस पुत्राला धरिल्याप्रमाणें [धरितात].—हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

३. मी अदितीचें निष्पाप, अक्षय, स्वर्गयुक्त, अमर, आणि अन्नादिसंपत्तियुक्त धन प्रार्थितों. हे द्यावापृथिवी हो, तें तुम्ही [मज] स्तोत्यासाठीं प्राप्त करून द्या. हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

2. They both support, even as parents their own son on their lap, many a walking and footless creature, though themselves not walking and not possessed of feet. Preserve us, o Heaven and Earth, from calamity.

3. I pray for the bounty of Aditi, which is free from sin, inexhaustible, heavenly, immortal, full of riches. Bestow that on the poet, ye Heaven and Earth. Preserve us, o Heaven and Earth, from calamity.

---

पृथिवीवरील, अथवा आसपासची जी पोकळी, तिजसंबंधी असो.

सूक्तकर्ता विचारितो की, 'या दोहोंतून द्यु पहिला कीं पृथिवी पहिली हें कोण सांगूं शकेल? अथवा ह्या कशा झाल्या तें कोण सांगूं शकेल?'

ह्या आपआपल्या आश्रितभूतांस एकमेकांवर अवलंबून न राहतां धारण करितात, आणि दिवस आणि रात्र जशा चक्रावर जणूं फिरतात, तशा ह्या चक्रावर फिरतात असें दिसतें.

'फिरतात'='वर्तेते.' म्हणजे, एकादा रहाट जसा चाकावर फिरतो तसें.

---

२. 'स्वतः अपाद आणि न चालणाऱ्या असतांहि सपाद आणि चालणाऱ्या अशा असंख्य प्राण्यांला ह्या, आईबाप जसे आपल्या औरस पुत्रास मांडीवर घेतात त्याप्रमाणें, आपल्या आंगावर घेऊन रक्षितात.'

३. या ठिकाणीं जी अदिति सांगितली ती द्यावापृथिवीरूपच देवी होय. अदिति म्हणजे या विश्वांतील निरवधिक जो अवकाश, तद्रूप देवता होय, आणि द्यावापृथिवी हे दोन भाग मिळून तो अवकाश झाला आहे. वास्तव

अतप्यमाने अवसावन्ती अनु ष्याम रोदसी देवपुत्रे ।
उभे देवानामुभयेभिरह्नां द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥ ४ ॥
अतप्यमाने इति । अवसा । अवन्ती इति । अनु । स्याम । रोदसी इति ।
देवपुत्रे इति देवऽपुत्रे ।
उभे इति । देवानाम् । उभयेभिः । अह्नाम् । द्यावा । रक्षतम् । पृथिवी
इति । नः । अभ्वात् ॥ ४ ॥
संगच्छमाने युवती समन्ते स्वसारा जामी पित्रोरुपस्थे ।
अभिजिघ्रन्ती भुवनस्य नाभिं द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात्॥५॥२
संगच्छमाने इति सम्ऽगच्छमाने । युवती इति । समन्ते इति सम्ऽ-
अन्ते । स्वसारा । जामी इति । पित्रोः । उपऽस्थे ।
अभिजिघ्रन्ती इत्यभिऽजिघ्रन्ती । भुवनस्य । नाभिम् । द्यावा । रक्षत-
म् । पृथिवी इति । नः । अभ्वात् ॥ ५ ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

४. अतप्यमाने (=स्वयम् अन्यैरपीड्यमाने अपि ) [ जनान् ] अवसा अवन्ती (=रक्षणेन रक्षन्त्यौ) देवपुत्रे (=देवाः पुत्रा ययोस्ते) रोदसी (=द्यावापृथिव्यौ ) [ वयम् ] अनु स्याम (=अनुभवेम=सेवेमहि) । उभे [युवां] देवानाम् अह्नाम् उभयेभिः (=द्योतमानैरहभी रात्रिभिश्चेत्युभयैः=द्योतमानेषु दिवसेषु च रात्रिषुच) हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान्पापात्पालयतम् ) ॥

५. संगच्छमाने (=परस्परं संगते ) युवती (=सदैव तरुण्यौ ) समन्ते (=समानपर्यन्ते ) स्वसारा (=स्वसारौ=परस्परं स्वसृसंबन्धयुक्ते ) जामी (=बन्धुभूते ) पित्रोरुपस्थे भुवनस्य नाभिम् अभि जिघ्रन्ती ( =स्वकीये पैतृक उत्सङ्गे भुवनस्य नाभिभूतमुदकमभिजिघ्रन्त्यौ=तस्याभिघ्राणं कुर्वत्यौ ) हे द्यावापृथिवी ( =द्यावापृथिव्यौ ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान्पापात्पालयतम् ) ॥

---

अदिति म्हणजे द्यावापृथिवी असें ध्यानांत ठेवन अदितिशब्दाचा प्रयोग या मंत्रांत केला आहे.

४. [स्वतः] पीडारहित [असतांहि] रक्षणानें जनांचें पालन करणाऱ्या, [आणि] देव ज्यांचे पुत्र होत, अशा ज्या द्यावापृथिवी, त्यांचा अनुग्रह आम्हांवर होओ. तुम्ही दोघीहि देवीप्रमाणें दिवसास आणि रात्रीस हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

4. May we delight Heaven and Earth, the parents of the gods, they who themselves undistressed protect [others] with grace. May you both on both bright days and nights—may you both, o Heaven and Earth, preserve us from calamity.

५. परस्परसंबद्ध, सदातरुण, समानपर्यन्तक, परस्पर बहिणी, बंधुभूत, [आणि] भुवनाच्या नाभीला आपल्या पैतृक मांडीवर झुंगणाऱ्या अशा ज्या तुम्ही त्या हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

5. Those who are united each to the other, ever young, have common borders, are related as sisters [and] related as brothers, caress in their parental lap the navel of the universe (Rain-water), preserve us, o Heaven and Earth, from calamity.

---

४. 'द्यावापृथिवीस कोण उपद्रव करीत नाहीं, तरी दुसऱ्या कोणास उपद्रव झाला म्हणजे त्याला रक्षणारे असे जे देवांचे आईबाप ते आम्हांवर प्रसन्न होओत. हे द्यावापृथिवी हो, तुम्ही उभयतां रात्री आणि दिवसाला आम्हांस दुःखापासून रक्षा.'

५. 'भुवनाच्या नाभीला'=' भुवनस्य नाभिम्.' म्हणजे मेघोदक असें सायण म्हणतात. 'भुवनस्य नाभिः,' अथवा 'पृथिव्या नाभिः' हे शब्द उत्तरवेदीचा मध्यभाग या अर्थी ऋग्वेदांत बरेच ठिकाणी आलेले आहेत. (सू. १६४ मं. ३४, ३५ पहा). सू. ५९ मं. १ यांत वैश्वानर अग्नीला 'नाभिः क्षितीनाम्' असें म्हटलें आहे. तेव्हां प्रस्तुत मंत्रांतहि कदाचित् 'भुवनस्य नाभिम्' म्हणजे सूर्यरूपानें अथवा वैद्युत अग्नीच्या रूपानें विद्यमान असणारा जो अग्नि, तो घ्यावयाचा असेल.

'समानपर्यन्तक'=' समन्ते.' म्हणजे दोघींच्या सीमा एकमेकांस लागलेल्या आहेत, किंवा जेथें एकीची सीमा संपते तेथें दुसरीच्या सीमेला आरंभ होतो.

**उर्वी सद्मनी बृहती ऋतेन हुवे देवानामवसा जनित्री ।**
**दधाते ये अमृतं सुप्रतीके द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥६॥**

उर्वी इति । सद्मनी इति । बृहती इति । ऋतेन । हुवे । देवानाम् । अवसा । जनित्री इति ।
दधाते इति । ये इति । अमृतम् । सुप्रतीके इति सुऽप्रतीके । द्यावा । रक्षतम् । पृथिवी इति । नः । अभ्वात् ॥ ६ ॥

**उर्वी पृथ्वी बहुले दूरेअन्ते उप ब्रुवे नमसा यज्ञे अस्मिन् ।**
**दधाते ये सुभगे सुप्रतूर्ती द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥७॥**

उर्वी इति । पृथ्वी इति । बहुले इति । दूरेअन्ते इति दूरेऽअन्ते । उप । ब्रुवे । नमसा । यज्ञे । अस्मिन् ।
दधाते इति । ये इति । सुभगे इति सुऽभगे । सुप्रतूर्ती इति सुऽप्रतूर्ती । द्यावा । रक्षतम् । पृथिवी इति । नः । अभ्वात् ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. उर्वी (=उर्व्यौ=विस्तीर्णे) बृहती (=बृहत्यौ=महत्यौ) सद्मनी (=सद्मभूते) देवानां जनित्री (=देवानां जनित्र्यौ=पितरौ) ऋतेन (=यज्ञेन) अवसा (=प्रेम्णा) [च] हुवे (=आह्वयामि) । ये सुप्रतीके (=सुरूपे) [जनित्र्यौ] अमृतं दधाते (=अमृतत्वं धारयतः=मोक्षं धारयतः) । —हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान् पापात्पालयतम्) ॥

७. उर्वी (=उर्व्यौ=विस्तीर्णे) पृथ्वी (=पृथ्व्यौ) बहुले (=महत्यौ) दूरेअन्ते (=अपारे) [द्यावापृथिव्यौ] अस्मिन् यज्ञे नमसा (=स्तोत्रेण) हुवे (=आह्वयामि)। ये सुभगे (=शोभनभाग्ये) सुप्रतूर्ती (=शोभनवितरणे=महोदारे) दधाते (=सर्वान् धारयतः) । —हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), नः अभ्वाद् रक्षतम् (=अस्मान् पापात्पालयतम्) ॥

६. विस्तीर्ण [ आणि] महान् आधारभूत जे देवांचे आईबाप त्यांला मी यज्ञाच्या योगानें आणि प्रेमानें बोलावितों; जे रूपवान् होत्साते अमृत धारण करितात.– हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

6. I invoke with sacrifice [ and ] with devotion the parents of the gods, who are vast and extensive asylums; the beautiful [ parents ] who contain immortality [ in them ].— Preserve us, o Heaven and Earth, from calamity.

७. विस्तीर्ण, अफाट, महान् [ आणि] अपार [अशा ज्या द्यावापृथिवी ] त्यांस मी या यज्ञांत स्तोत्रानें स्तवितों; ज्या सौभाग्यसंपन्न [ आणि ] महोदार होत्सात्या [ सर्वांस ] धारण करितात.– हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

7. I invoke with a hymn in this sacrifice the vast, broad, great [ and ] far-extending [ Heaven and Earth ]; who, blessed [ and ] bounteous, support [ all ]. Preserve us, o Heaven and Earth, from calamity.

---

६. 'आधारभूत '=' सद्मनी.' म्हणजे जेथें सर्वांस आश्रय मिळतो अशा.

'अमृत धारण करितात '=' अमृतं दधाते.' सायण म्हणतात की, येथें अमृत म्हणजे उदक होय. 'अमृत' याचा 'अमरत्व' हा अर्थ वेदांत प्रसिद्ध आहे.

देवान्वा यच्चकृमा कच्चिदागः सखायं वा सदमिज्जास्पतिं वा ।
इयं धीर्भूया अवयानमेषां द्यावा रक्षतं पृथिवी नो अभ्वात् ॥ ८ ॥
देवान् । वा । यत् । चकृम । कत् । चित् । आगः । सखायम् । वा ।
सदम् । इत् । जाःपतिम् । वा ।
इयम् । धीः । भूयाः । अवऽयानम् । एषाम् । द्यावा । रक्षतम् ।
पृथिवी इति । नः । अभ्वात् ॥ ८ ॥
उभा शंसा नर्या मामविष्टामुभे मामूती अवसा सचेताम् ।
भूरि चिदर्यः सुदास्तरायेषा मदन्त इषयेम देवाः ॥ ९ ॥
उभा । शंसा । नर्या । माम् । अविष्टाम् । उभे इति । माम् । ऊती इति ।
अवसा । सचेताम् ।
भूरि । चित् । अर्यः । सुदाःऽतराय । इषा । मदन्तः । इषयेम । देवाः ।
॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

८. यत् कच्चित् आगः (=यत्किमपि आगः=यं यम् अपराधं) देवान् [प्रति] चकृम (=वयं कृतवन्तः स्मः) सखायं [प्रति] वा सदमित् जास्पतिं [प्रति] वा (=सदैव जायापतिं जामातरं प्रति वा) [अपराधं चकृम] एषां (=तेषामपराधानाम्) इयं धीः (=एषास्माभिः क्रियमाणा स्तुतिः) अवयानम् (=अपगमनं=निरसनं) भूयाः (=भूयात्=भवतु) । हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), नः अभ्वात् रक्षतम् (=अस्मान् पापात्पालयतम्) ॥

९. शंसा (=शंसौ=शंसनीयौ) उभा (=उभौ) नर्या (=नर्यौ=नराणां हितौ) [द्यावापृथिवीरूपमातापितरौ] माम् अविष्टाम् (=मां रक्षताम्) । उभे ऊती (=रक्षके=द्यावापृथिव्यौ) अवसा मां सचेतां (=प्रीत्या मम सहाये भवताम्) । हे देवाः, अर्यः (=स्तोतारो) [वयं] [स्वयम्] इषा मदन्तः (=अन्नेन माद्यन्तः=युष्माभिर्दत्तयान्नसंपदा हृष्यन्तः) सुदास्तराय भूरि चित् इषयेम (=शोभनहविरन्नदानोपेताय यजमानाय बहुलमन्नादिकं प्रापयेम) ॥

---

८. 'जांवयाचे'='जास्पतिम्.' हा अर्थ सायणास अनुसरून केला आहे तो योग्य आहे असें आम्हांस वाटतें. कारण 'जांवई' हा मराठी शब्द 'जास्पति'

८. आम्हीं जे देवांचे कांहीं अपराध केले असतील, अथवा मित्राचे अथवा कधीं तरी जांवयाचे [ अपराध केले असतील ] त्यांचें प्रायश्चित्त हें स्तोत्र होओ.– हे द्यावापृथिवी हो, आम्हांला दुःखापासून रक्षा.

8. Whatever sins we have committed against the gods, or against a friend or ever against a soninlaw, may this hymn be an atonement for them. Preserve us, o Heaven and Earth, from calamity.

९. स्तुत्य आणि मनुष्यांचें हित करणारे हे उभय [आईबाप] मला रक्षोत. रक्षण करणाऱ्या ह्या उभय [ द्यावापृथिवी] मला कृपाकरून पाठबळ होओत. हे देव हो, स्तोत्र करणारे जे आम्ही ते [ स्वतः ] अन्नानें हर्ष पावणारे होत्साते सुदानशाली यजमानाला पुष्कळ [ संपत्ति ] प्राप्त करून देऊं असें करा.

9. May they, both praise-worthy [ and ] beneficent to mankind, protect me. May both the protectors be with me graciously. Praying may we, ourselves delighted with food, obtain o gods, much for the bounteous sacrificer.

---

या शब्दापासून निघाला आहे असें म्हणण्यास कांहीं अडचण नाहीं. आणि हें जर खरें असेल तर जांवई या शब्दाचा मराठींत जो अर्थ आहे, तोच जास्पतीचा मूळ अर्थ संस्कृतांत असावा. जास्पति हा शब्द ऋग्वेदांत आणखी एकच वेळ (ऋ.७.३८.६ ) यांत आला आहे, पण तेथें सायणाचार्यांनीं त्याचा ‘ प्रजानां पालकः’ असा अर्थ केला आहे. ‘ जास्पत्य ’ असा एक शब्द ऋग्वेदांत दोन ठिकाणीं आढळतो. (ऋ.५.२८.३ आणि ऋ. १०.८५.२३). यांत जामात याचा संबंध असा न करितां जाया आणि पति यांचा संबंध किंवा ‘ दांपत्य ’ असा केला आहे; तथापि ‘ जांवई ’ याचें मूळ ‘जास्पति’ हें नसतां दुसऱ्या कोणत्या तरी शब्दांत आहे असें जोंपर्यंत सिद्ध झालें नाहीं, तोंपर्यंत ‘ जास्पति ’ म्हणजे ‘जामात’ आणि ‘जास्पत्य’ म्हणजे जामातृसंबंध असें मानणें योग्य आहे.

९. ‘ द्यावापृथिवी माझें रक्षण करोत. त्या मज स्तोत्याला विपुळ अन्नादिक धन देओत. आणि मजवर प्रसन्न होऊन माझ्या द्वारें या माझ्या यजमा-

नालाहि पुष्कळ धन देओत' अशी स्तोत्र रचणाऱ्या कवीची प्रार्थना या ऋचेंत आहे.

'देवे' म्हणून जे मंत्रपुष्पाच्या वेळीं वगैरे म्हणतात त्यांत हा मंत्र म्हणण्याची चाल आहे. आणि त्याचें कारण इतकेंच कीं, यांत 'देवाः' हें पद आलें आहे. हे 'देवे' तीस आहेत, म्हणजे ज्याच्या शेवटीं 'देवाः' हें पद आलें आहे असे तीस मंत्र ऋग्वेदसंहितेंतून जिकडून तिकडून घेऊन देवे म्हणत असतात. ते मंत्र येणेंप्रमाणें:—

१. नमो॑ म॒हद्भ्यो॒ नमो॑ अर्भ॒केभ्यो॒ नमो॒ युव॑भ्यो॒ नम॑ आशि॒नेभ्यः॑ । यजा॑म दे॒वान्यदि॑ श॒क्नवा॑म॒ मा ज्याय॑सः॒ शंस॒मा वृ॑क्षि देवाः ॥ ऋ. १. २७. १३.

२. मुमत्तु नः परि॑ज्मा वस॒र्हा मु॒मत्तु॒ वातो॑ अ॒पां वृष॑ण्वान् । शि॒शी॒तमि॑न्द्रा पर्वता यु॒वं न॒स्तन्नो॒ विश्वे॑ वरिवस्यन्तु दे॒वाः ॥ ऋ. १. १२२. ३.

३. कृ॒था तें अग्ने शु॒चय॑न्त आ॒योर्द॑दा॒शुर्वाजे॑भिराशुषा॒णाः । उ॒भे यत्तो॒के तन॑ये॒ दधा॑ना ऋ॒तस्य॒ साम॑न्र॒णय॑न्त दे॒वाः ऋ. १. १४७. १.

४. य॒ज्ञेन॑ य॒ज्ञम॑यजन्त दे॒वास्तानि॒ धर्मा॑णि प्रथ॒मान्या॑सन् । ते ह॒ नाकं॑ म॒हि॒मानः॑ सचन्त॒ यत्र॒ पूर्वे॑ सा॒ध्याः सन्ति॑ दे॒वाः ऋ. १.१६४.५०. १०.९०.१६.

५. परा॑ शु॒भ्रा अ॒यासो॑ य॒व्या सा॑धार॒ण्येव॑ म॒रुतो॑ मिमिक्षुः । न रो॑द॒सी अप॑ नुदन्त घो॒रा जु॒षन्त॒ वृधं॑ स॒ख्याय॑ दे॒वाः ऋ. १. १६७. ४.

६. त्वे राय॑ इन्द्र तो॒शत॑माः प्र॒णेता॑रः॒ कस्य॑ चिदृता॒योः । ते षु णो॑ म॒रुतो॑ मृळयन्तु॒ ये स्मा॑ पु॒रा गा॑तू॒यन्ती॑व दे॒वाः ॥ १. १६९. ५.

७. उ॒भा शंसा॒ नर्या॒ माम॑विष्टामु॒भे माम॒ूती अव॑सा सचेताम् । भूरि॑ चिद॒र्यः सु॒दास्त॑राये॒षा मद॑न्त इषयेम देवाः ॥ १. १८५. ९.

८. उ॒त न ईं म॒रुतो॑ वृ॒द्धसे॑नाः॒ स्मद्रोद॑सी॒ सम॑नसः सदन्तु । पृष॑दश्वा॒सोऽव॒नयो॒ न रथा॑ रि॒शाद॑सो मित्र॒युजो॒ न दे॒वाः ॥ १. १८६. ८.

९. तव॑ स्याम पु॒रुवी॑रस्य॒ शर्म॑न्नुरु॒शंस॑स्य वरुण प्रणेतः । यूयं नः॑ पुत्रा अदितेरदब्धा अ॒भि क्ष॑मध्वं॒ युज्या॑य देवाः ऋ. २. २८. ३

१०. दि॒वक्षि॒दा ते॑ रुचयन्त रो॒का उ॒षो वि॑भा॒तीरनु॑ भासि पू॒र्वीः । अ॒पो यद॑ग्न उ॒शध॒ग्वने॑षु॒ होतु॑र्म॒न्द्रस्य॑ प॒नय॑न्त दे॒वाः ॥ ऋ. ३. ६. ७

११. शंसा॑ म॒हामिन्द्रं॒ यस्मि॒न्विश्वा॒ आ कृ॒ष्टयः॑ सोम॒पाः काम॒मव्य॑न् । यं सु॒क्रतुं॑ धि॒षणे॑ विभ्वत॒ष्टं घ॒नं वृ॒त्राणां॑ ज॒नय॑न्त दे॒वाः ॥ ३. ४९. १.

१२. त्रिरु॑त्त॒मा दू॑ण॒शा रो॑च॒नानि॒ त्रयो॑ राज॒न्त्यसु॑रस्य वी॒राः । ऋ॒ताना॑न इ॒षिरा॑ दू॒ळभा॑स॒स्त्रिरा दि॒वो वि॒दथे॑ सन्तु दे॒वाः ॥ ३. ५६. ८.

१३. नाप॑भूत॒ न वो॑ऽतीतृषा॒मानिः॑शस्ता ऋभवो य॒ज्ञे अ॒स्मिन् । समिन्द्रे॑ण॒ मद॑थ॒ सं म॒रुद्भिः॒ सं राज॑भी रत्न॒धेया॑य देवाः ॥ ऋ. ४. ३४. ११.

१४. को वस्त्राता वसवः को वरूता द्यावाभूमी अदिते त्रासीथां नः। सहीयसो वरुण मित्र मर्तात्को वोऽध्वरे वरिवो धाति देवाः ४. ५५. १.

१५. अप्रतीतो जयति सं धनानि प्रतिजन्यान्युत या सजन्या। अवस्यवे यो वरिवः कृणोति ब्रह्मणे राजा तमवन्ति देवाः॥ ४. ५०. ९.

१६. त्वमपो यदवे तुर्वशायारमयः सुदुघाः पार इन्द्र। उग्रमयातमवहो ह कुत्सं सं ह यद्वामुशनारन्त देवाः॥ ५. ३१.८

१७. मूर्धानं दिवो अरतिं पृथिव्या वैश्वानरमृत आ जातमग्निम्। कविं सम्राजमतिथिं जनानामासन्ना पात्रं जनयन्त देवाः॥ ६. ७. १.

१८. नाभिं यज्ञानां सदनं रयीणां महामाहावमभि सं नवन्त। वैश्वानरं रथ्यमध्वराणां यज्ञस्य केतुं जनयन्त देवाः॥ ६. ७. २.

१९. ते नो रायो द्युमतो वाजवतो दातारो भूत नृवतः पुरुक्षोः। दशस्यन्तो दिव्याः पार्थिवासो गोजाता अप्या मृळता च देवाः ६. ५०. ११.

२०. ये के च ज्मा महिनो अहिमाया दिवो जज्ञिरे अपां सधस्थे। ते अस्मभ्यमिषये विश्वमायुः क्षप उस्रा वरिवस्यन्तु देवाः॥ ६. ५२. १५.

२१. अस्मे रुद्रा मेहना पर्वतासो वृत्रहत्ये भरहूतौ सजोषाः। यः शंसते स्तुवते धायि पज्र इन्द्रज्येष्ठा अस्माँ अवन्तु देवाः॥ ८. ६३. १२.

२२. परि प्र धन्वेन्द्राय सोम स्वादुर्मित्राय पूष्णे भगाय॥१॥ इन्द्रस्ते सोम सुतस्य पेयाः क्रत्वे दक्षाय विश्वे च देवाः ९. १०९, १. २.

२३. प्रयाजान्मे अनुयाजांश्च केवलानूर्जस्वन्तं हविषो दत्त भागम्। घृतं चापां पुरुषं चौषधीनामग्नेश्च दीर्घमायुरस्तु देवाः १०. ५१. ८.

२४. एभिर्ददे वृष्ण्या पौंस्यानि येभिरौक्षद्वृत्रहत्याय वज्री। ये कर्मणः क्रियमाणस्य मह्न ऋतेकर्ममुदजायन्त देवाः॥ १०. ५५. ७.

२५. अनृक्षरा ऋजवः सन्तु पन्था येभिः सखायो यन्ति नो वरेयम्। समर्यमा सं भगो नो निनीयात्सं जास्पत्यं सुयममस्तु देवाः॥ १०. ८५. २३.

२६. गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः। भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वादुर्गार्हपत्याय देवाः॥ १०. ८५. ३६.

२७. समस्मिञ्जायमान आसत ग्ना उतेमवर्धन्नद्यः स्वगूर्ताः। महे यत्त्वा पुरूरवो रणायावर्धयन्दस्युहत्याय देवाः॥ १०. ९५. ७

२८. ब्रह्मचारी चरति वेविषद्विषः स देवानां भवत्येकमङ्गम्। तेन जायामन्वविन्दद्बृहस्पतिः सोमेन नीतां जुह्वं न देवाः॥ १०. १०९. ५.

२९. सद्यो जातो व्यमिमीत यज्ञमग्निर्देवानामभवत्पुरोगाः। अस्य होतुः प्रदिश्यृतस्य वाचि स्वाहाकृतं हविरदन्तु देवाः॥ १०. ११०. ११.

ऋतं दिवे तदवोचं पृथिव्या अभिश्रावाय प्रथमं सुमेधाः ।
पातामवद्याद्दुरितादभीके पिता माता च रक्षतामवोभिः ॥ १० ॥
ऋतम् । दिवे । तत् । अवोचम् । पृथिव्यै । अभिऽश्रावाय । प्रथमम् । सुऽमेधाः ।
पाताम् । अवद्यात् । दुःऽइतात् । अभीके । पिता । माता । च । रक्षताम् । अवःऽभिः ॥ १० ॥

इदं द्यावापृथिवी सत्यमस्तु पितर्मातर्यदिहोपब्रुवे वाम् ।
भूतं देवानामवमे अवोभिर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥ ११ ॥ ३ ॥
इदम् । द्यावापृथिवी इति । सत्यम् । अस्तु । पितः । मातः । यत् । इह । उपऽब्रुवे । वाम् ।
भूतम् । देवानाम् । अवमे इति । अवःऽभिः । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ११ ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

१०. तत् (=तस्मै हेतवे) सुमेधाः (=सुमेधावी कविरहं) दिवे पृथिव्यै (=द्यावापृथिवीभ्यां=तत्प्रीत्यर्थम्) ऋतं (=स्तोत्रम्) अभिश्रावाय (=अभिश्रवणाय=ते मामभ्यागत्य यथा शृणुयातां तथा) प्रथमं (=सर्वेभ्यो देवेभ्योपि पूर्वम्) अवोचम् (=अगायम्)। [ते] अवद्याद् (=दोषात्) [तथैव] दुरिताद् अभीके (=पापसकाशात्) पातां (=रक्षताम्)। माता पिता च (=मातापितृभूते द्यावापृथिव्यौ) अवोभिः (=संरक्षणै) रक्षतां (=पालयताम्) ॥

११. हे द्यावापृथिवी (=द्यावापृथिव्यौ), हे पितः, हे मातः, यद् इह वाम् उपब्रुवे (=वामुपेत्य यद्युवयोः स्तोत्रमगायं) [तद्] इदं [स्तोत्रं] सत्यम् अस्तु (=सफलं भवतु)। अवोभिः (=संरक्षणैर्) देवानाम् अवमे भूतं (=सर्वेभ्योपि देवेभ्यः समीपतरे भवतम्)। [अपि च] वयम् इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

---

१०. यास्तव द्यूनें आणि पृथिवीनें ऐकून घ्यावें म्हणून मी सुमेधावीनें त्यांजप्रीत्यर्थ प्रथम स्तोत्र गाइलें आहे. दोषापासून आणि पापापासून ते रक्षोत. पिता आणि माता प्रसादांनीं संभाळोत.

10. Therefore I the sage have first sung a hymn to Heaven and to Earth that they may hear [me]. May they save [us] from reproach, [save us] from sin. May the Father and the Mother preserve [us] with [their] favours.

११. हे पित्या द्यू, हे माते पृथिवी, हें जें स्तोत्र मी तुमची उपासना करून येथें म्हटलें आहे, तें सफळ होओ. तुम्ही [आपल्या] प्रसादांनीं [सर्व] देवांपेक्षां [आम्हांला] अत्यंत जवळच्या व्हा. [आणि] आम्हांला अन्न, बळ, [आणि] लवकर संपत्ति मिळवून देणारा [पुत्र], यांची प्राप्ति होओ.

11. o Heaven and Earth, may this [prayer] be fulfilled which, o Father, o Mother, I have addressed here unto you. Be you most accessible [to us] with [your] favours, of all the gods. May we obtain food, strength, [and] [a son] that shall quickly make us rich.

---

३०. इदं ते पात्रं सनंवित्तमिन्द्र पिबा सोमंमेना शतक्रतो। पूर्ण आहावो मंदिरस्य मध्वो यं विश्व इदभिहर्यन्ति देवाः॥ १०. ११२. ६.

वृत्तासाठीं तिसऱ्या पादांत 'सुदआस्तराय' असें म्हटलें पाहिजे.

---

१०. 'पापापासून'='दुरिताद् अभीके.' सू. १२१ मं. १४ आणि टीप पहा.

## सूक्तम् १८६.

अगस्त्य ऋषिः । विश्वे देवा देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

**आ न इळाभिर्विदथे सुशस्ति विश्वानरः सविता देव एतु ।**
**अपि यथा युवानो मत्सथा नो विश्वं जगदभिपित्वे मनीषा ॥१॥**

आ । नः । इळाभिः । विदथे । सुऽशस्ति । विश्वानरः । सविता । देवः । एतु ।
अपि । यथा । युवानः । मत्सथ । नः । विश्वम् । जगत् । अभिऽपित्वे । मनीषा ॥ १ ॥

**आ नो विश्व आस्क्रा गमन्तु देवा मित्रो अर्यमा वरुणः सजोषाः ।**
**भुवन्यथा नो विश्वे वृधासः करन्त्सुषाहा विथुरं न शवः ॥ २ ॥**

आ । नः । विश्वे । आस्क्राः । गमन्तु । देवाः । मित्रः । अर्यमा । वरुणः । सऽजोषाः ।
भुवन् । यथा । नः । विश्वे । वृधासः । करन् । सुऽसहा । विथुरम् । न । शवः ॥ २ ॥

---

### भाषायाम्.

१. विश्वानरः (=सर्वप्राणिहितकारी) देवः (=द्योतमानः) सविता सुशस्ति (=सुशस्ती=सुशस्त्या=शोभनस्तोत्रेण) इळाभिः (=अन्नैः सह=अस्मदर्थमन्नानि गृहीत्वा) नो विदथे (=अस्माकं यज्ञे) आ एतु (=आगच्छतु) । यथा (=येन प्रकारेण) हे युवानः (=सदातरुणा देवाः), [युष्माकम्] अभिपित्वे (=अभिगमने सति) मनीषा (=मनीषया=कृपया) नः विश्वं जगच्च मत्सथ (=मादयथ=हर्षयथ)॥ अत्रेदमुक्तं भवति । हे सवित्रादयो देवाः यूयमस्माकं स्तोत्रं श्रुत्वा अस्मदर्थमन्नानि गृहीत्वा नो यज्ञ आगच्छत । आगतेषु हि युष्मासु युष्मत्कृपया सर्वे जनास्तथा वयमपि हृष्टा भविष्याम इति ॥

२. मित्रः अर्यमा वरुणश् [चेति] सजोषाः (=संगता) आस्क्राः (=शत्रूणामास्कन्दयितारः=पराक्रमिणो) देवा नः आ गमन्तु (=अस्मान् आगच्छन्तु) । यथा (=येन प्रकारेण) विश्वे (=सर्वेपि ते) नो वृधासः (=अस्माकं वर्धयितारो) भुवन्

## सूक्त १८६.

ऋषि– अगस्त्य. देवता–विश्वे देव. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. सर्वांचें कल्याण करणारा देदीप्यमान सविता चांगल्या स्तोत्राच्या योगानें आमच्या यज्ञांत अन्नें घेऊन येओ; कीं जेणेंकरून, हे अजर हो, तुम्ही येतांच आपल्या कृपेनें आम्हांला [आणि] सर्व जगताला हर्षवाल.

२. पराक्रमण करणारे सर्व देव–मित्र, अर्यमा, वरुण हे मिळून–आम्हांप्रत येओत; कीं जेणेंकरून ते सर्व आमचे उत्कर्षक होतील [आणि] आमचें बळ सर्वजण मिळून क्षीण होऊं देणार नाहींत.

## Hymn 186.

To *Vis've Devas* (*All* the *gods* taken collectively). By *Agastya*. Metre—*Trishṭubh*.

1. May resplendent Savitâ, the benefactor of all men, come to our sacrifice through the good hymn bringing food [ for us ] ; so that you may, o ever youthful [ gods ], so soon as you arrive, gladden us, [gladden] the whole world, by [ your ] kindness.

2. May all the victorious gods come unto us—Mitra, Aryamâ and Varuṇa, all joined; so that they may all be our promoters, and may not together render our power frail.

---

१. ' हे सवित्या, तूं आणि इतर देव मिळून आमचें स्तोत्र ऐकून आम्हांसाठीं सर्व प्रकारचीं अन्नें घेऊन आमच्या यज्ञांत या; कारण तुम्ही आलां म्हणजे तुम्ही आम्हांवर कृपा केली म्हणून आम्हांस आणि सर्व जगतास आनंद होईल.'

' अन्नें घेऊन '=' इळाभिः.' सू. ४८ मं. १६ आणि त्याजवरील टिपा पहा.

' अजर '=' युवानः.' प्राचीन आर्य लोकांचे देव म्हटले म्हणजे बहुतकरून सूर्यादिक जीं तेजें तद्रूप असत. आणि हे देव नित्य उगवून मनुष्यांच्या दृष्टीस पडून जातात, व पुनः येतात; असा क्रम नित्य चालला असतांहि ते कधींच म्हातारे होत नाहींत. म्हणून त्यांस अजर अथवा म्हातारे न होणारे आणि ते कधींहि मरत नाहींत म्हणून त्यांस अमर असें म्हणत असत. अजरत्वाचें आणि अमरत्वाचें जें येथें कारण सांगितलें तें, प्राचीन आर्यांचे देव म्हणजे सूर्यादिक नित्य तेजें होत, असें संस्कृतावरून समजतें म्हणून उघड होतें. ग्रीक, रोमन इत्यादिक लोकांचे जे प्राचीन देव तेहि जरी अजर आणि अमर असत, तरी त्यांच्या अजरत्वाची आणि अमरत्वाची उपपत्ति त्या लोकांस सांगतां आली नसती.

प्रेष्ठं वो अतिथिं गृणीषेऽग्निं शस्तिभिस्तुर्वणिः सजोषाः ।
असद्यथा नो वरुणः सुकीर्तिरिषश्च पर्षदरिगूर्तः सूरिः ॥ ३ ॥
प्रेष्ठम् । वः । अतिथिम् । गृणीषे । अग्निम् । शस्तिऽभिः । तुर्वणिः ।
सऽजोषाः ।
असत् । यथा । नः । वरुणः । सुऽकीर्तिः । इषः । च । पर्षत् । अ-
रिऽगूर्तः । सूरिः ॥ ३ ॥
उप व एषे नमसा जिगीषोषासानक्ता सुदुघेव धेनुः ।
समाने अहन्विमिमानो अर्कं विषुरूपे पयसि सस्मिन्नूधन् ॥४॥
उप । वः । आ । ईषे । नमसा । जिगीषा । उषसानक्ता । सुदुघाऽइव । धेनुः ।
समाने । अहन् । विऽमिमानः । अर्कम् । विषुऽरूपे । पयसि । स-
स्मिन् । ऊधन् ॥ ४ ॥

---

(=भवेयुः) [यथा च] सुसहा (=सुष्ठु यथा तथा सममेव) [अस्माकं] शवः (=बलं) विधुरं न करन् (=विहीनं न कुर्युः) ॥

यथास्माकं बलं वर्धयेयुर्न तु तद्विहीनं कुर्युस्तथा सर्वेपि देवा मित्रार्यमवरुणादयः संगता भूत्वास्मान् प्रति आगच्छन्त्वित्यर्थः ॥

---

## भाषायाम्.

३. [हे ऋत्विजः], [योग्निस्] तुर्वणिः (=शत्रुजित्) [तथा] शस्तिभिः सजोषाः (=स्तोत्रैर्युक्तो) [भवति तं] वः (=युष्माकं) प्रेष्ठम् (=अतिशयेन प्रियम्) अतिथिम् अग्निं गृणीषे (=स्तौमि) । यथा सुकीर्तिः (=सुश्लोको) वरुणो नः (=अस्मदीयः) असत् (=भवेत्) च (=अपि च) सूरिः (=प्रज्ञावान्) अरिगूर्तः (=स्तोतृभिः स्तुतः) [सन्] इषः पर्षत् (=अन्नान्यापूरयेत्=बहून्यन्नानि प्रयच्छेत्) ॥

एतदुक्तं भवति । अहम् अग्निं वरुणं च स्तौमि यथा तौ अस्मान् प्रत्यागत्य अस्मदनुकूलौ भूत्वा बहून्यन्नानि प्रयच्छताम् ॥

४. [ये] उषासानक्ता (=उषा रात्रिश्च) धेनुरिव सुदुघा (=सुखेन दोग्धुं शक्या) [तौ] वः (=युवां प्रति) नमसा जिगीषा (=स्तोत्रेण धनजिगीषया च सह) उप आ ईषे (=अभ्यागच्छामि) । सस्मिन् ऊधन् (=एकस्मिन्नेवोधसि) विषुरूपे पयसि (=नानारूपे दुग्धे सति) समाने अहनि (=एकस्मिन्नेव दिने) अर्कं विमिमानः (=स्तोत्रं निर्मिमाण) [उप आ ईषे] ॥

३. तुमचा अत्यंत प्रिय पाहुणा, विजयशाली [ आणि ] स्तोत्रांनीं युक्त असा जो अग्नि, त्याला मी स्तवितों; कीं जेणेंकरून सुश्लोक आणि प्रज्ञावान् वरुण आमचा होईल आणि स्तोत्यांनीं स्तविलेला होत्साता पुष्कळ अन्नसंपत्ति देईल.

3. I praise your dearest guest Agni, [who is] victorious, [ and ] is honoured with hymns; so that well-praised Varuṇa may be ours, and he, the wise and praised of the pious, may bestow abundance of food.

४. जी उषा आणि जी रात्र दुभत्या गाईप्रमाणें होत त्या तुम्हांप्रत मी स्तोत्रासहित आणि धन जिंकण्याच्या इच्छेनें येतों. मी एकाच कासेंत अनेक प्रकारचें दूध असतां एकाच दिवशीं निरनिराळीं स्तोत्रें करीत [तुम्हांप्रत येतों].

4. To you, o Ushas and night who are easy to milk like a milchcow, I come with a song and a desire to win; composing a hymn the same day when milk of various kinds is in the same udder.

२. 'मित्र,' 'अर्यमा,' आणि 'वरुण' हे कोण आहेत याविषयीं सू. २ मं. ७ आणि सू. २६ मं. ४ आणि त्यांजवरील टिपा पहा.

३. 'हे मित्र हो, मी अग्नि आणि वरुण यांस स्तवितों, कीं जेणेंकरून वरुण येऊन आमचाच जणुं होईल, आणि आम्हांस पुष्कळ अन्नसंपत्ति देईल.'

या मंत्राच्या पूर्वार्धांत वरुणाचें आणि उत्तरार्धांत अग्नीचें नांव नाहीं तरी अग्नि आणि वरुण यांस मी बोलावितों आणि ते दोघेहि येऊन आम्हांस अन्नसंपत्ति देओत, असें विवक्षित आहे. कोठून तरी अग्नीचें आणि वरुणाचें नांव मंत्रांत आणावें इतकेंच तात्पर्य आहे; आणि पहिल्या ऋचेंत तरी 'सविता' आणि सर्व अजर देव यांविषयींहि असेंच समजलें पाहिजे.

४. या ऋचेंत 'उषासानक्ता' (म्हणजे उषा आणि रात्र) या दोन देवींविषयीं सांगितलें आहे. आणि पूर्वीप्रमाणें येथें तरी त्यांचें नांव कसेंतरी मंत्रांत यावें याहून दुसरा उद्देश कवीचा नाहीं; म्हणजे त्यांचें नांव ऋचेंत गोवणें या उद्देशाहून त्यांजविषयीं काय म्हणावयाचें ही गोष्ट कमी महत्त्वाची मान-

उत नोऽहिर्बुध्न्यो३ मर्यस्कः शिशुं न पिप्युषीव वेति सिन्धुः ।
येन नपातमपां जुनाम मनोजुवो वृषणो यं वहन्ति ॥ ५ ॥ ४ ॥

उत । नः । अहिः । बुध्न्यः । मयः । करिति कः । शिशुम् । न । पिप्युषीऽइव । वेति । सिन्धुः ।
येन । नपातम् । अपाम् । जुनाम । मनःऽजुवः । वृषणः । यम् । वहन्ति ॥ ५ ॥ ४ ॥

---

समाने इत्यादि दुर्बोधम् । सायग एवं व्याचष्टे । किं कुर्वन् । तस्मिन् समाने ऊधन् ऊधस्युत्पन्ने विषुरूपे नानारूपे पयसि क्षीरघृतादिकेऽर्कमर्चनीयमन्नं चरुपुरोडाशादिकं विमिमानः । विविधं मिमानः । कस्मिन्काले । समानेऽहन् । षष्ठेऽहनि एकस्मिन्नेवाहनि सर्वदैव वेत्यर्थः । एकस्मिन्नेवाहनि समान ऊधस्युत्पन्ने नानारूपे पयसि त्वदर्थं हविर्मिमान उपगच्छामीत्यर्थः । यद्वा तस्मिन् सर्वस्मिन्नूधसि फलाख्यक्षीरोत्पादके यज्ञे निमित्तभूते सति विषुरूपे पयसे नानारूपे सोमलक्षणोदकेऽर्कमन्नसाधनं स्तोत्रं विमिमानोऽहं युष्मानभि गच्छामि । इति ॥

---

## भाषायाम्.

५. उत (=अपि च) अहिर्बुध्न्यः (=एतन्नामको देवो) नो मयस्कः (=अस्मभ्यं सुखं करोतु)। पिप्युषी [ धेनुः ] शिशुम् इव (=पयसा वर्धयित्री गौर्यथा वत्समेति तथा) सिन्धुर्वेति (=सिन्ध्वभिमानिनी देवो अस्मान् प्रति आगच्छति=आगच्छतु) येन [ अहिर्बुध्न्यस्य सिन्धोश्चागमनेन ] अपां नपातम् (=उदकानां पुत्रमग्निं) जुनाम (=अस्मान् प्रति प्रापयेम=आगमयेम) यम् [ अग्निं ] मनोजुवो वृषणः (=मनोवद्वेगवन्तो बलवन्तश्चाश्वा) वहन्ति ॥

अहिर्बुध्न्यो देवः सिन्धुश्चेत्येतावागच्छताम् । तयोरागतयोर्हि अग्निरप्यागमिष्यतीति भावः ॥

अहिरन्तरिक्षगाम्यहन्ता वाहीनो वाहन्यमानो वैतन्नामको देवः। स एव बुध्न्यः। बुध्नं बन्धकमन्तरिक्षम् । तदर्हतीति बुध्न्योऽन्तरिक्षार्येतन्नामको देवः । इति सायणः ॥

---

केली आहे. त्यामुळें 'उषासानक्ता' यांचें नांव ऋचेंत आलें आहे हें उघड दिसतें, पण त्यांजविषयीं जें कांहीं सांगितलें आहे तें उत्तरार्धांत तरी निदान स्पष्ट समजत नाहीं; कारण 'एकाच कालेंत इ०' हा भाग दुर्बोध आहे. अक्षरशः भाषांतर केलें आहे.

५. आणि अहिर्बुध्न्य आमचें कल्याण करो. दूध पाजणारी गाय वत्साप्रत येते त्याप्रमाणें सिन्धु आम्हांप्रत येओ; कीं जेणेंकरून आम्हीं उदकांच्या पुत्राला इकडे आणूं, ज्याला मनासारिखे वेगवन्त नवान घोडे वाहत असतात.

5. And may Ahir-Budhnya grant us happiness, [and] may Sindhu come to us even as a fattening cow [comes] to her calf; so that we may hasten hither the son of the waters, who is carried on young horses swift as the mind.

---

५. यांत इतकेंच सांगितलें आहे कीं, 'अहिर्बुध्न्य,' 'सिन्धु,' आणि 'वैद्युत अग्नि' हे देव येओत.

'अहिर्बुध्न्य.' हा एक देव वेदांत बराच प्रसिद्ध आहे. 'अहिर्बुध्न्य' या नांवाचा अर्थ सायण 'अंतरिक्षांतील अहि या नांवाचा देव' असा करितात. ऋ. २. ३१. ६ हेंहि सूक्त विश्वेदेवांविषयींच आहे त्यांत त्याचें आह्वान 'अज एकपाद्,' 'सविता,' 'अपां नपात्' या देवांबरोबर केलें आहे. ऋ. ५. ४१ हेंहि सूक्त विश्वेदेवांविषयीं आहे, त्याच्या १६व्या मंत्रांत अहिर्बुध्न्याचें आह्वान मरुतांबरोबर केलें आहे, आणि तो आम्हांस शत्रूंच्या स्वाधीन न करो अशी ऋषीनें प्रार्थना केली आहे. ऋ.६.४९या वैश्वदेवसूक्ताच्या १४व्या मंत्रांत 'पर्वत,' 'सविता,' 'भग' यांजबरोबर त्याची स्तुति केली आहे. ऋ.६.५० हेंहि वैश्वदेव सूक्त आहे. त्याच्या १४व्या मंत्रांत 'अज एकपाद्,' 'पृथिवी,' 'समुद्र,' 'विश्वेदेव' यांजबरोबर त्याची प्रार्थना केली आहे. ऋ. ७. ३४ हेंहि सूक्त वैश्वदेव आहे. त्यांतील १७व्या मंत्रांत 'अहिर्बुध्न्य' आम्हांस शत्रूंच्या स्वाधीन न करो अशी प्रार्थना आहे. ऋ. ७.३५ हेंहि वैश्वदेव आहे. त्याच्या १३वे मंत्रांत 'अज एकपाद्,' 'समुद्र,' 'अपां नपात्,' 'पृश्नि' यांजबरोबर त्याची प्रार्थना आहे. ऋ. ७.३८ कितीएक देवांविषयीं आहे. त्याच्या ५व्या मंत्रांत वरूत्री देवीसहित त्याची प्रार्थना आहे. ऋ. १०. ६४ हेंहि सूक्त वैश्वदेव आहे. त्यांतील ४थ्या मंत्रांत त्याची प्रार्थना 'बृहस्पति,' 'अज एकपाद्' यांच्या बरोबर केली आहे. ऋ. १०.६६ हेंहि वैश्वदेव होय. त्यांतील ११व्या मंत्रांत 'समुद्र,' 'सिन्धु,' 'अन्तरिक्ष,' 'अज एकपाद्' आणि 'तनयित्नु' (=मेघ) यांजबरोबर प्रार्थना केली आहे. ऋ. १०.९२ हेंहि वैश्वदेव आहे. त्यांतील १२व्या मंत्रांत 'सूर्य,' 'चंद्र,' 'पृथिवी' आणि 'द्युदेव' यांजबरोबर 'त्याची' प्रार्थना केली आहे.

उत नं ईं त्वष्टा गन्त्वच्छा स्मत्सूरिभिरभिपित्वे सजोषाः ।
आ वृत्रहेन्द्रश्चर्षणिप्रास्तुविष्टमो नरां न इह गम्याः ॥ ६ ॥
उत । नः । ईम् । त्वष्टा । आ । गन्तु । अच्छ । स्मत् । सूरिऽभिः ।
अभिऽपित्वे । सऽजोषाः ।
आ । वृत्रऽहा । इन्द्रः । चर्षणिऽप्राः । तुविःऽतमः । नराम् । नः ।
इह । गम्याः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

६. उत (=अपि च) त्वष्टा (=एतन्नामको देवोपि) नः ईम् अच्छ आ गन्तु (=तान् अस्मान् उपागच्छतु) [अपि च] अभिपित्वे (=अभ्यागमने=आगमने=आगमनकाले) स्मत् सूरिभिः सजोषाः (=प्रज्ञावद्भिर्देवैः सहितः सन्) [आगच्छतु] । [तथैव] वृत्रहा (=वृत्रहननकारी) चर्षणिप्राः (=मनुष्याणां मनोरथस्य पूरको) नरां तुविष्टमः (=सर्वेषु शूरेषु मध्ये बलवत्तम) इन्द्रो नः इह आ गम्याः (=इन्द्रोप्यत्रास्मानागच्छतु) ॥

स्मत् सहार्थे । सायणस्तु स्मत्सहार्थे प्राशस्त्ये वा वर्तते । अत्र प्रशंसायाम् । प्रशस्तं यथा तथेति ॥

---

त्याच्या पुढचें ९३वें सूक्त वैश्वदेवच आहे; त्यांतील ५व्या मंत्रांत 'सूर्य' आणि 'चंद्र' यांजबरोबर प्रार्थना केली आहे. ऋ.४.५५ हेंहि विश्वेदेवांविषयींच आहे. त्यांतील ६व्या मंत्रांत 'द्यावापृथिवी' यांजबरोबर त्याची प्रार्थना केलेली आहे.

याशिवाय दुसऱ्या ठिकाणीं ऋग्वेदांत 'अहिर्बुध्न्य' आलेला नाहीं. वर सांगितलें आहे त्यावरून उघड होतें कीं, 'अहिर्बुध्न्य' याजविषयीं स्वतंत्र सूक्त नाहीं; आणि त्याचें नांव जेथें जेथें आलें आहे, तीं सर्व सूक्तें 'विश्वेदेव' यांजविषयीं आहेत; आणि त्याची प्रार्थना येते ती 'अज एकपाद्' इत्यादिक महत्त्वाच्या पण अप्रसिद्ध देवांबरोबर येते; आणि त्याजविषयीं कथा, इतिहास वगैरे इतर देवांच्या सारिखा कांहीं नाहीं.

'अहिर्बुध्न्य' याची व्युत्पत्ति सांगून सायणांनीं कोठकोठें अंतरिक्षांत झालेला अग्नि असा त्याचा पर्यवसित अर्थ केला आहे. (उदाहरणार्थः— ऋ.७.३८.५ याजवर "उत अपि च अहिर्बुध्न्यः बुध्ने अन्तरिक्षे भवः बुध्न्यः एतीत्यहिः । एतत्पदद्वयाभिधः मध्यमस्थानः अग्निः अहिर्बुध्न्य इत्युच्यते.")

'सिन्धु' म्हणजे सिन्धुरूप देवता.

६. आणि त्वष्टाहि आम्हांप्रत येओ, आणि येतांना प्रज्ञावंत [देवां]सहित [येओ]. वृत्राला मारणारा, मनुष्यांचे मनोरथ पूर्ण करणारा [ आणि ] शूरांमध्यें अत्यंत पराक्रमी इन्द्र येथें आम्हांप्रत येओ.

6. And may Tvashṭâ come unto us, and when coming may he come accompanied by the wise [ gods ]. May Indra, the killer of Vṛitra, the gratifier of men's wishes and the most mighty of [ all ] heroes, come here unto us.

आतां सिन्धु म्हणजे येथें सिन्धुनदी समजावयाची, किंवा समुद्र समजावयाचा याविषयीं संशय आहे. कारण वेदांत सिन्धुनदीरूप देवतेचा निर्देश जसा सिन्धुशब्दानें झालेला आहे तसाच समुद्ररूप देवतेचाहि निर्देश 'सिन्धु' शब्दानें झालेला आढळतो. उदाहरणार्थ, सू. ९४ मं. १६ यांत समुद्राभिमानी देव 'सिन्धु' शब्दानें घ्यावयाचा आहे. ऋ. १०.७५.२,४,६ यांत 'सिन्धु' शब्दानें सिन्धुनदीरूप जी देवी तिचा निर्देश आहे. सू.१२२ मं. ६ आणि त्याजवरील टीप हीहि पहा.

'उदकांच्या पुत्राला'=' अपां नपातम्.' सू. १२२ मं. ४ आणि टीप पहा.

६. 'त्वष्टा इतर देवांस घेऊन येओ, आणि इंद्रहि येओ,' असा भावार्थ.

'त्वष्टा' सू. १४२ मं.१० आणि टीप पहा.

वृत्तासाठीं 'ईइं' असें 'ई' बद्दल, आणि 'गन्त्वच्छा' बद्दल 'गन्तु अच्छा,' आणि 'आ वृत्रहा इन्दरश्चर्षणिप्रा' असें म्हणावें.

उत नं ईं मतयोऽश्वयोगाः शिशुं न गावस्तरुणं रिहन्ति ।
तमीं गिरो जनयो न पत्नीः सुरभिष्टमं नरां नसन्त ॥ ७ ॥
उत । नः । ईम् । मतयः । अश्वऽयोगाः । शिशुम् । न । गावः । तरुणम् । रिहन्ति ।
तम् । ईम् । गिरः । जनयः । न । पत्नीः । सुरभिःऽतमम् । नराम् । नसन्त ॥ ७ ॥
उत नं ईं मरुतो वृद्धसेनाः स्मद्रोदसी समनसः सदन्तु ।
पृषदश्वासोऽवनयो न रथा रिशादसो मित्रयुजो न देवाः ॥८॥
उत । नः । ईम् । मरुतः । वृद्धऽसेनाः । स्मत् । रोदसी इति । सऽमनसः । सदन्तु ।
पृषत्ऽअश्वासः । अवनयः । न । रथाः । रिशादसः । मित्रऽयुजः । न । देवाः ॥ ८ ॥

---

## भाषायाम्.

७. उत (=अपि च) अश्वयोगाः ( =अश्वानामिव योगोन्योन्ययोजनं यासां ताः =अश्वा इव संयुक्ता) मतयः (=सुमतयः=इन्द्रस्यानुमहात्मिका बुद्धयो ) न ईम् (=अस्मानिमान्=पूर्वोक्तान् अस्मान् ) तरुणं शिशुं गावो न (=अल्पं वत्सं गावो यथा लिहन्ति तद्वत् ) रिहन्ति (=लिहन्ति=लिहन्तु ) । तम् ईं ( =तमेनं=तमिन्द्रं च) नरां सुरभिष्टमं (=नृणां शूराणां मध्येतिशयेन सुरभिं काम्यं ) गिरः ( =अस्माभिः कृताः स्तुतयः) पत्नीर्जनयो न ( =पतिमत्यः स्त्रिय इव=भार्याः पतिमिव ) नसन्त (= संगच्छन्ते=संगच्छन्तां=व्याप्नुयुः=तेन सह संश्लिष्टा भवन्तु )॥

इन्द्रस्य कृपा गौर्वत्समिवास्मान् लेढु । अस्माकं स्तुतिश्चेन्द्रं भार्या पतिमिव संगच्छतामिति भावः ॥

८. उत ( =अपि च) वृद्धसेनाः ( =प्रवृद्धबला ) मरुतः स्मत् रोदसी ( =द्यावापृथिव्यौ च ) समनसः ( =समानमनस्काः=एकमनसः ) [ सन्तो ] न ईम् ( =अस्मान् इमान्=पूर्वोक्तान् अस्मान् ) [ आगम्य ] सदन्तु ( =निषीदन्तु ) । [ ते ] पृषदश्वासः ( =पृषदश्वाः =पृषत्य एव अश्वा येषां ते ) [ भवन्ति ] । [ तेषां ] रथा

७. आणि घोड्यांप्रमाणें एकमेकांस जोडिलेल्या ज्या इन्द्राच्या कृपा, त्या लहान वत्साला जशा गाई चाटितात तशा आम्हांला चाटोत. आणि सकळ वीरांमध्यें अत्यंत प्रिय असा जो तो [इन्द्र] त्याला, स्त्रियांनीं पतीला आलिंगिल्याप्रमाणें, आमच्या स्तुति आलिंगोत.

८. आणि ज्यांचें बळ मोठें आहे ते मरुत् एक मनानें, द्यावापृथिवींसहित, येऊन आम्हांजवळ बसोत. [त्यांच्या] रथास ठिपक्याठिपक्यांच्या हरिणी जोडिल्या [असतात]. [त्यांचे] रथ प्रवाहांप्रमाणें धांवणारे [असतात]. [हे] देव शत्रूंला खाऊन टाकणारे [आणि] मित्रांला जणुं जोडिलेले [होत].

7. And may [his] blessings harnessed together like horses come and fondly lick us, even as cows lick [their] new-born calf. And may our hymns embrace him, the most beloved of heroes, even as wives [embrace their husbands].

8. And may the Maruts, whose troops are large, as also Heaven and Earth, being all of one mind, come and sit for us. They have variegated deer for horses. [Their] chariots [are] like running streams. [Those] gods are, as it were, eaters of [their] enemies [and] yoked to [their] friends.

---

७. 'गाई जशा आपल्या लहान वासराला प्रीतीनें चाटितात तशा इन्द्राच्या कृपा आम्हांला चाटोत आणि आम्हीं केलेली इन्द्राविषयींची स्तुति, स्त्री पतीला आलिंगिते तशी, जाऊन इन्द्राला आलिंगो.'

'घोड्यांप्रमाणें एकमेकांस जोडिलेल्या' = अश्वयोगाः.' म्हणजे रथास जसे घोडे एकत्र जोडिलेले असतात, तशा एकत्र जोडल्या जाऊन जणुं येणाऱ्या.

८. सू. १८५ मं. ९ याजवरील टीपेंत जे 'देवे' सांगितले त्यांपैकीं हा मंत्र होय. शेवटीं 'देवाः' हा शब्द येतो म्हणून 'देवे'।

या मंत्राची रचना सरळ नाहीं.

प्र नु यदे॑षां महि॒ना चि॑कि॒त्रे प्र युं॑जते प्र॒युज॒स्ते सु॑वृ॒क्ति ।
अध॒ यदे॑षां सु॒दिने॒ न शरु॒र्विश्व॒मेरि॑णं प्रुषा॒यन्त॒ सेनाः॑ ॥ ९ ॥

प्र । नु । यत् । ए॒षाम् । म॒हि॒ना । चि॒कि॒त्रे । प्र । यु॒ञ्ज॒ते । प्र॒ऽयुजः॑ ।
ते । सु॒ऽवृ॒क्ति ।
अध॑ । यत् । ए॒षाम् । सु॒ऽदिने॑ । न । शरुः॑ । विश्व॑म् । आ । इरि॑-
णम् । प्रु॒षा॒यन्त॑ । सेनाः॑ ॥ ९ ॥

प्रो अ॒श्विना॒वव॑से कृणु॒ध्वं॒ प्र पू॒षणं॒ स्वत॑वसो॒ हि सन्ति॑ ।
अ॒द्वे॒षो विष्णु॒र्वात॑ ऋभु॒क्षा अच्छा॑ सु॒म्नाय॑ ववृतीय दे॒वान् ॥१०॥

प्रो इति॑ । अ॒श्विना॑ । अव॑से । कृ॒णु॒ध्व॒म् । प्र । पू॒षण॑म् । स्वऽत॑वसः ।
हि । सन्ति॑ ।
अ॒द्वे॒षः । विष्णुः॑ । वातः॑ । ऋ॒भु॒क्षाः । अच्छ॑ । सु॒म्नाय॑ । व॒वृ॒ती॒य॒ ।
दे॒वान् ॥ १० ॥

---

अवनयो न (=नद्यादीनां प्रवाहा इव) [निम्नगाः सन्ति] [ते मरुतो] देवा रि-
शादसो मित्रयुजो न (=शत्रूणाम् अत्तारो मित्रैश्च संयुक्ता इव) [भवन्ति] ॥

---

## भाषायाम्.

९. यद् (=यदा) सुवृक्ति (=सुवृत्तया=उपासकैः शोभने स्तोत्रे कृते सति) ते (=मरुतः) प्रयुजः प्र युञ्जते (=अश्वान् रथे योजयन्ति=अश्वान् रथे योजयित्वा गच्छन्ति) अध यत् (=अपि च यदा) सुदिने न (=निरभ्रे दिवसेपि) एषां शरुः सेनाश् [च] (= तेषां वज्रो गणाश्च) विश्वम् इरिणं (= सर्वं तटाकम्) आ प्रुषायन्त (= आपूरयन्ति मेघवृष्ट्या) [तत्=तदा] एषां महिना [इते] प्र चिकित्रे (=एते मरुतः स्वकीयेन महिम्ना प्रज्ञायन्ते=तदा तेषां महिमा प्रतीयते) ॥

इदमुक्तं भवति । यदा भक्तैः स्तुता मरुतः स्वकीयेन वज्रेण सर्वाणि तटाकादीनि मेघोदकैः पूरयन्ति तदा तेषां महिमा जनैः प्रतीयत इति ॥

प्र नु यत् इत्यत्रस्थो यच्छब्दो युञ्जते इत्यनेन योजनीयः । चिकित्रे इत्यस्य च निघातत्वम् अपेक्षितं युञ्जते इत्यस्य च नापेक्षितम् । एवं सत्यपि वर्तमानं चिकित्रे इत्यस्य अनिघातत्वम् युञ्जते इत्यस्य च निघातत्वं व्यत्ययमूलकम् इति कृत्वा सहनीयम् ॥

१०. [हे ऋत्विजः], अश्विनो अवसे (=रक्षणाय) प्र कृणुध्वं (=प्रसादयत) ।

९. ते चांगल्या स्तोत्रामुळें जेव्हां [ आपले ] घोडे रथाला जोडितात आणि निरभ्र दिवशींहि त्यांचें वज्र [ आणि ] त्यांचे गण प्रत्येक तळ्याला भरून टाकितात, तेव्हां त्यांच्या महिम्यानें ते विराजतात.

१०. [ हे ऋत्विजांनो ], रक्षणासाठीं अश्वींला प्रसन्न करा, पूषा याला प्रसन्न करा. कारण ते स्वाधीनबल होत. द्वेषहीन विष्णु, वायु [ आणि ] महान् [ इन्द्र ] [ स्वाधीनबल होत ]. [ या ] देवांला सुखासाठीं मी येथें आणीन असें होओ.

9. They distinguish themselves then by their greatness when through an excellent hymn they yoke their teams, and when their thunderbolt and their troops fill all the ponds even on a cloudless day.

10. Propitiate the As'vins for protection, propitiate Pûshâ. For they are of independent power. Benevolent Vishṇu, Vâta [ and ], the great [ Indra ] [are of independent power]. May I turn the gods hitherwards, for [our] happiness.

---

९. 'मरुतांचा महिमा किती मोठा आहे, तो उपासकांच्या स्तोत्रांनीं प्रसन्न होऊन जेव्हां मरुत् रथास घोडे जोडून त्यांत बसून येतात, आणि येतां येतां आपल्या वज्राच्या योगानें निरभ्र आकाश असतांहि एकाएकीं पाऊस पाडून सर्व तळीं भरून टाकितात तेव्हां, लोकांच्या प्रत्ययास येतो.'

हा मंत्र दुर्बोध आहे. याची शब्दरचना आणि अन्वय फार क्लिष्ट आणि आयाससाध्य आहेत.

'त्यांचें वज्र'=' एषां शरुः.' 'शरु' म्हणजे मरुत् धारण करितात तो भाला किंवा वज्र. सू. १७२ मं. २ आणि त्याजवरील पहिली टीप पहा.

१०. 'पूषा' सू. १४ मं. ३ याजवरील टीप पहा.

'स्वाधीन'= 'स्वतवसः.' म्हणजे त्यांचें बळ दुसऱ्यापासून आलेलें नाहीं, तर त्यांचें स्वताहाचें, त्यांच्याच आंगचें आहे. ते अमुक देवाचे अमुक होत म्हणून बलवान् असें नव्हे, तर ज्यांचें बळ स्वतंत्र आणि स्वयंभु आहे.

इयं सा वो अस्मे दीधितिर्यजत्रा अपिप्राणी च सदनी च भूयाः।
नि या देवेषु यतते वसूयुर्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥ ११ ॥५॥
इयम् । सा । वः । अस्मे इति । दीधितिः । यजत्राः । अपिऽप्राणी ।
च । सदनी । च । भूयाः ।
नि । या । देवेषु । यतते । वसुऽयुः । विद्याम । इषम् । वृजनम् ।
जीरऽदानुम् ॥ ११ ॥ ५ ॥

---

पूषणं प्र [ कृणुध्वं ] (= प्रसादयत ) । हि (= यस्मात् कारणात् ) [ ते ] स्वतवसः (= स्वायत्तबलाः ) सन्ति । अद्वेषः (= द्वेषरहितो ) विष्णुः वातः (= वायुः) ऋभुक्षाः (= महान्=इन्द्रः) [ इत्येते स्वतवसः सन्ति ] । देवान् सुम्नाय (= सुखाय ) अच्छ ववृतीय (= अस्मान् प्रति आवर्तयेयम् ) ॥

अद्वेषो द्वेषरहितो विष्णुर्व्याप्त एतन्नामको देवः । प्रथममनाहूतोपि न कुप्यतीति वक्तुमद्वेष इत्युक्तम् । इति सायणः ॥

---

## भाषायाम्.

११. हे यजत्राः (= यजनीया देवाः ), इयं सा (= सेयं ) वः (=युष्मद्विषया ) अस्मे दीधितिः (= अस्माकं दीधितिर्यज्ञरूपा क्रिया ) अपिप्राणी च सदनी च भूयाः (= अपिप्राणनवती चेष्टावती यूयं यत्र प्राणिथ तादृशी निवासवती च यूयं यत्र निवसथ तादृशी च भूयात् भवतु ) । या वसूयुः (= धनमिच्छन्ती ) [ दीधितिर् ] देवेषु नि यतते (= देवेषु प्रापणाय नितरां प्रयत्नं करोति ) । [एवं सति] [वयम्] इषम् (= अन्नं ) वृजनं (= बलं ) जीरदानुं (= क्षिप्रदानं ) [ वीरं=पुत्रं च ] विद्याम (= लभेमहि ) ॥

---

११. हे पूज्य [ देव ]हो, ही जी तुमची उपासना आम्हीं केली आहे, ती तुम्ही सचेतन करा आणि तिच्या ठायीं तुम्ही वास करा. जी उपासना धनाची वांछा करणारी होत्साती देवांप्रत पोंहचण्याविषयीं प्रयत्न करीत आहे. [ तर ] आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा [पुत्र] यांची प्राप्ति होओ.

11. May this our devotion offered unto you, O worshipful [ gods ], be one in which you may breathe and in which you may dwell; devotion, which soliciting wealth, strives towards the gods. May we [ therefore ] obtain food, strength, [ and a son] that shall quickly make us rich.

---

११. 'सचेतन करा' म्हणजे तिच्या आंगीं जीव उत्पन्न करा, निर्जीव आहे ती सजीव जशी करा.

## सूक्तम् १८७.

अगस्त्य ऋषिः । पितुर्देवता । आद्यानुष्टुब्गर्भोष्णिक् । तृतीया पञ्चमी षष्ठी सप्तम्येकादशी चेति पञ्चानुष्टुभः । शिष्टा गायत्र्यः ॥

पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ।
यस्य त्रितो व्योजसा वृत्रं विपर्वमर्दयत् ॥ १ ॥

पितुम् । नु । स्तोषम् । महः । धर्माणम् । तविषीम् ।
यस्य । त्रितः । वि । ओजसा । वृत्रम् । विऽपर्वम् । अर्दयत् ॥ १ ॥

स्वादो पितो मधो पितो वयं त्वा ववृमहे ।
अस्माकमविता भव ॥ २ ॥

स्वादो इति । पितो इति । मधो इति । पितो इति । वयम् । त्वा । ववृमहे ।
अस्माकम् । अविता । भव ॥ २ ॥

### भाषायाम्.

१. नु (=इदानीं) महो धर्माणं तविषी (=महतस्त्रितादेर्धारकं बलात्मकं च) पितुं (=सोमलक्षणमन्नं) स्तोषं (=स्तवानि) । यस्य [पितोर्] ओजसा (=बलेन) त्रितः (=एतन्नामको देवो) वृत्रं विपर्वं (=विच्छिन्नसंधिकं यथा तथा) वि अर्दयत् (=विविधं हतवान्) ॥

त्रितो विस्तीर्णतमः प्रख्यातकीर्तिस्त्रिषु क्षित्यादिस्थानेषु तायमानोपीन्द्र इति सायणः । कश्चिदतिपुरातनकालप्रख्यातो देव इत्यपरे सम्यक् ॥

२. हे स्वादो (=आस्वादनीय) पितो (=पेय), हे मधो (मधुर) पितो, वयं त्वा (=त्वां) ववृमहे (=सेवामहे) । [अतस्त्वम्] अस्माकम् अविता (=रक्षिता) भव ॥

## सूक्त १८७.

ऋषि—अगस्त्य. देवता— पितु ("अन्न," असें म्हणण्याचा संप्रदाय आहे. 'पितु,' म्हणजे सोमरसरूपी जें पेय तें ). वृत्त—१ली अनुष्टुब्गर्भा उष्णिक्; ३री, ५वी, ६वी, ७वी, आणि ११वी ह्या अनुष्टुभ्; उरलेल्या गायत्री.

१. मी आतां मोठ्याला धारण करणारा, [ आणि मोठ्याचें] बळ असा जो पितु, त्याची स्तुति करीन. ज्या [ पितू]च्या पराक्रमेंकरून त्रित वृत्राला मारून त्याचे तुकडे करिता झाला.

२. हे रुचिकर पितू, हे मधुर पितू, आम्ही तुला सेवितों. [तर] तूं आमचा रक्षणकर्ता हो.

## HYMN. 187.

To *Pitu* or *Drink* (i.e. the Soma-juice). By *Agastya.* metre—the first verse is *Anushṭubgarbhâ Ushṇik;* verses 3,5,6, 7, and 11 are *Anushṭubhs;* the rest are *Gâyatrîs.*

1. Let me now sing of Drink the sustainer [and] the strength of the great; by the power whereof Trita destroyed Vṛitra, dismembering his limbs.

2. O sweet Pitu, O delicious Pitu, we wait upon thee. Be thou our protector.

---

१. हें सूक्त 'पितु' विषयीं आहे. 'पितु' म्हणजे अक्षरशः 'पेय' असा अर्थ आहे. सोमरूप जें पेय ( अथवा अन्न ) तो 'पितु' आहे. 'पितु' असें सोमरसाचें नांव आहे, परंतु शाकभाजी इत्यादिक जें अन्न तेंहि 'पितु' शब्दानें घ्यावयाचें असें आठव्या मंत्रावरून दिसून येतें. 'पितु' हा सचेतन आहे असें क्षणभर मानून त्याची स्तुति केली आहे.

'मोठ्याला,' म्हणजे त्रितादिक जे महान् महान् देव त्यांला.

'त्रित' हा कोण देव आहे याविषयीं सू. ५२ मं. ५ आणि त्याजवरील टीप पहा. मात्र त्या टिपेंत त्रितानें वृत्राला मारिल्याविषयीं वेदांत उल्लेख आढळत नाहीं असें सांगितलें आहे, त्याची शुद्धि या मंत्राच्या संबंधानें करणें अवश्य आहे.

या सर्व सूक्ताचा पाठ शांतिसूक्त, श्राद्धसूक्त आणि पितृसूक्त यांत म्हणत असतात. तो असा कीं, *अन्न वाढीत असतांना पात्राला तूप लाविल्यानंतर हें

उप॑ नः पितवा च॑र शि॒वः शि॒वाभि॑रू॒तिभिः॑ ।

म॒यो॒भुर॑द्वि॒षे॒ण्यः सखा॑ सु॒शेवो॒ अद्व॑याः ॥ ३ ॥

उप॑ । न॒ः । पि॒तो॒ इति॑ । आ । च॒र । शि॒वः । शि॒वाभिः॑ । ऊ॒तिऽभिः॑ ।

म॒यः॒ऽभुः । अ॒द्वि॒षे॒ण्यः । सखा॑ । सु॒ऽशेवः॑ । अद्व॑याः ॥ ३ ॥

तव॒ त्ये पि॑तो॒ रसा॒ रजां॒स्यनु॒ विष्ठि॑ताः ।

दि॒वि वाता॑ इव श्रि॒ताः ॥ ४ ॥

तव॑ । त्ये । पि॒तो॒ इति॑ । रसाः॑ । रजां॑सि । अनु॑ । वि॒ऽस्थि॒ताः ।

दि॒वि । वाताः॑ऽइव । श्रि॒ताः ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. हे पितो, शिवः (= मङ्गलस्) [ त्वं ] शिवाभिरूतिभिः (= मङ्गलै रक्षणैः सह) उप नः आ चर (= अस्मान् प्रति आगच्छ)। मयोभुः (= कल्याणकारी) अद्विषेण्यः (= प्रियः) सुशेवः (= सुखकारी) अद्वयाः (= निष्कपटः) सखा (= मित्रभूतस्) [ त्वमा चर ]॥

४. हे पितो, तव त्ये (= ये प्रख्यातास्ते) रसाः (= स्वाद्वम्लादिषड्रसा) दिवि श्रिता वाता इव (= द्युलोके व्याप्ता वायव इव) रजांसि अनु विष्ठिताः (= आन्तरिक्षादिषु लोकेषु विविधं व्याप्ता) [ भवन्ति ] ॥

---

सर्व सूक्त म्हणतात. उद्देश उघड दिसतो कीं, जें अन्न वाढलें जात आहे तें मधुर आहे, व उत्तम आहे. इत्यादि त्याची प्रशंसा व्हावी. शिवाय शांतिसूक्तांतहि याचा पाठ म्हणतात.

शौनक असें म्हणतात कीं, नित्य हें सूक्त म्हणून अन्नाची स्तुति आणि पूजा करावी, आणि नंतर तें अन्न भक्षण करावें, त्याची निंदा करूं नये. असें करील त्याला अन्नापासून उत्पन्न होणाऱ्या (अजीर्णादिक) रोगांचा उपद्रव होणार नाहीं. त्यांत विष असलें तरी त्याचें अमृत होईल. विष पिऊन हें सूक्त म्हटलें तर विषाचा नाश होईल. मात्र भोजन करितेवेळीं मौन* धारण करावें आणि शुचिर्भूत असलें पाहिजे. तेव्हां तें अन्न दुसऱ्यास द्यावें, त्याची पूजा करावी, त्याची आहुति द्यावी. तसें करणाऱ्यास भुकेपासून त्रास होणार नाहीं आणि अन्नापासून व्याधि उत्पन्न होणार नाहीं।

३. हे पितू, कल्याणकारक असा जो तूं तो कल्याणकारक रक्षणांसहित आम्हांप्रत ये. सुखकारक, प्रिय, बरें करणारा, निष्कपट मित्र [असा तूं आम्हांप्रत ये].

४. हे पितू, तुझे जे रस ते, द्युलोकांत वायु पसरले आहेत त्यांप्रमाणें सर्वत्र लोकीं पसरलेले आहेत.

3. Come thou unto us, O Pitu, thou the auspicious, with auspicious helps: thou the beneficent, the kind, the propitious [and] the sincere friend.

4. Thy various flavours pervade all regions, O Pitu, even as the winds pervade the firmament.

---

२. 'रुचिकर' आणि 'मधुर' ('स्वादु,' 'मधु') हीं जीं येथें विशेषणें दिलीं आहेत, तींच पवमानाच्या आरंभींची ऋचा (ऋ. ९.१.१) यांत सोमाला 'स्वादिष्ठ' आणि 'मदिष्ठ' ह्या रूपानें दिलीं आहेत तीं पहा (स्वादिष्ठया मदिष्ठया पवस्व सोम धारया).

---

३. 'रक्षणांसहित ये'='ऊतिभिः आ चर.' म्हणजे, 'तूं ये आणि आमचें रक्षण करण्याचे अनेक उपाय आम्हांला शिकीव.' सविता, वरुण यांची जशी स्तुति आणि प्रार्थना करावी तशी पितूची येथें केली आहे, कारण पितु हा सचेतन देवस्वरूपभाक् होय असें मानून त्याचें हें सूक्त आहे.

४. 'सर्व रस, म्हणजे गोड, आंबट, तिखट इत्यादि जे रस ते पितूच्या म्हणजे सोमाच्या अंगीं आहेत, व ते वातावरणाप्रमाणें सर्वत्र पसरले आहेत' असें ऋषि म्हणतो.

**तव॒ त्ये पि॑तो॒ दद॑त॒स्तव॑ स्वादिष्ठ॒ ते पि॑तो ।**
**प्र स्वा॒द्मानो॒ रसा॑नां तुवि॒ग्रीवा॑ इवेरते ॥ ५ ॥ ६ ॥**

तव॑ । त्ये । पि॒तो इति॑ । दद॑तः । तव॑ । स्वा॒दि॒ष्ठ॒ । ते । पि॒तो इति॑ ।
प्र । स्वा॒द्मानः॑ । रसा॑नाम् । तु॒वि॒ग्रीवाः॑ऽइव । ई॒र॒ते ॥ ५ ॥ ६ ॥

**त्वे पि॑तो म॒हानां॑ दे॒वानां॒ मनो॑ हि॒तम् ।**
**अका॑रि॒ चारु॑ के॒तुना॒ तवाहि॒मव॑सावधीत् ॥ ६ ॥**

त्वे इति॑ । पि॒तो इति॑ । म॒हाना॑म् । दे॒वाना॑म् । मनः॑ । हि॒तम् ।
अका॑रि । चारु॑ । के॒तुना॑ । तव॑ । अहि॑म् । अव॑सा । अ॒व॒धी॒त् ॥ ६ ॥

**यद॒दो पि॑तो॒ अज॑गन्वि॒वस्व॒ पर्व॑तानाम् ।**
**अत्रा॑ चिन्नो मधो पि॒तोऽरं॑ भ॒क्षाय॑ गम्याः ॥ ७ ॥**

यत् । अ॒दः । पि॒तो इति॑ । अज॑गन् । वि॒वस्व॑ । पर्व॑तानाम् ।
अत्र॑ । चि॒त् । नः॒ । म॒धो इति॑ । पि॒तो इति॑ । अर॑म् । भ॒क्षाय॑ । ग॒म्याः॒ ॥ ७ ॥

---

**भाषायाम्.**

५. हे पितो, ददतस्तव (=दानशीलस्य तव, हे स्वादिष्ठ पितो, तव) रसानां त्ये-ते (=ते प्रख्याताः) स्वाद्मानः (=स्वादयितारस्) तुविग्रीवा इव (=प्रवृद्धग्रीवा इव) प्र ईरते (=संचरन्ति) ॥

ये ये तव रसान् आस्वादयन्ति ते ते प्रवृद्धबलाः सन्तः संचरन्तीति भावः ॥

६. हे पितो, महानां देवानां (=महतां देवानां) मनस्त्वे (=त्वयि) हितं (=निहितमस्ति=त्वत्पानमनसस्ते भवन्ति)। [अपि च] [तव] केतुना [तव] चारु अकारि (=कमनीयं क्रियते)। तवावसा (=तव साहाय्येन) [इन्द्रः] अहिम् अवधीत् (=वृत्ररूपं सर्पं हतवान्) ॥

७. हे पितो, यद् अदः (=यत्र) पर्वतानां विवस्व (=? मेघानां द्योतमानम् उदकम्) अजगन् (=आगच्छेत्) अत्र चेत् (=तत्र) हे मधो पितो (=हे मधुरपेय), नो भक्षाय (=अस्माकं भक्षणाय) अरं (=पर्याप्तं यथा तथा) गम्याः (=आगच्छ) ॥

यदा मेघेभ्यो वृष्टिर्भवति तदा पर्याप्तपानार्थं यदुदकं लभ्यते तदेव पितोरागमनमित्यर्थः ॥

विवस्वेति दुर्बोधं पदम् ॥

५. हे पितू, तुज उदाराच्या रसांचे, हे अत्यंत रुचिकर पितू, तुझ्या रसांचे जे जे भोक्ते ते ते पुष्टग्रीव जणुं होत्साते फिरत असतात.

५. Those, O Pitu, those, O most delicious Pitu, who relish the flavours of thee the bounteous one, go forth stout-necked.

६. हे पितू, महान् देवांचें मन तुझ्या ठायीं ठेविलेलें आहे. तें तुझ्या चातुर्यैकरून काम्य होत असतें. तुझ्या साहाय्यानें [ इन्द्र ] अहीला मारिता झाला.

6. In thee, O Pitu, is placed the mind of the great gods. By [ thy ] wisdom it is made lovely. By thy helps did he [ Indra ] slay the snake.

७. हे पितू, जेथें पर्वतांचें उदक येतें तेथें, हे मधुर पितू, तूं आमच्या भक्षणासाठीं पुरशील इतका ये.

7. Where, O Pitu, the water of the mountains comes, there come thou, O sweet Pitu, sufficient for us to drink.

---

५. 'जे जे पितूच्या रसांचा स्वाद घेतात ते ते प्रबळ होऊन फिरत असतात.'

६. पितूच्या ठायीं देवांचें मन ठेविलेलें आहे म्हणजे, देवांचें मन पितूच्या आंत चिकटून राहतें, म्हणजे तें सोम पिण्याविषयीं तत्पर असतें.

सोमाच्या साहाय्यानें इंद्र वृत्राला मारिता झाला याविषयीं पूर्वी पुष्कळ वेळ उल्लेख आले आहेत.

७. 'मेघरूप पर्वतांपासून जेव्हां वृष्टि होते तेव्हां जें पुष्कळ पाणी प्यावयाला मिळतें तें पितूच्या योगानें ( अथवा पितु येतो म्हणूनच ) मिळतें.' हें उघडच आहे, कारण मेघवृष्टि झाली म्हणजे पेय मिळतें.

'पर्वतांचें उदक'='पर्वतानां विवस्व.' मेघाला पर्वत असें नांव वेदांत आहे. कारण मेघांचा आकार पर्वतांच्या आकारासारिखा असतो. 'विवस्व' शब्द कठिण आहे.

यदपामोषधीनां परिंशमारिशामहे ।
वातापे पीव इद्भव ॥ ८ ॥
यत् । अपाम् । ओषधीनाम् । परिंशम् । आऽरिशामहे ।
वातापे । पीवः । इत् । भव ॥ ८ ॥
यत्ते सोम गवाशिरो यवाशिरो भजामहे ।
वातापे पीव इद्भव ॥ ९ ॥
यत् । ते । सोम । गोऽआशिरः । यवऽआशिरः । भजामहे ।
वातापे । पीवः । इत् । भव ॥ ९ ॥
करम्भ ओषधे भव पीवो वृक्क उदारथिः ।
वातापे पीव इद्भव ॥ १० ॥
करम्भः । ओषधे । भव । पीवः । वृक्कः । उदारथिः ।
वातापे । पीवः । इत् । भव ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

८. यद् अपाम् ओषधीनां परिंशं (=यम् उदकानामोषधीनां च परिलेशं) [वयम्] आरिशामहे (=भक्षयामस्) [तद्रूपस्त्वं] हे वातापे (=?"वातवत्सर्वव्यापक") [पितो], पीव इत् भव (=प्रवृद्धिकरो रस एव भव) ॥

वयं यदुदकानामोषधीनां चांशं भक्षयामस्तद्रूपः पितुः पुष्टिकरो रसो भवतीत्यर्थः॥

९. हे सोम, यद् गवाशिरस्ते [यश] यवाशिरस् [ते] (=क्षीरादिभिर्गोरसैः संस्कृतस्य तव तथा यवविकारैः संस्कृतस्य तवांशं) भजामहे (=सेवामहे) [तद्रूपस्त्वं] हे वातापे (=वातवत्सर्वव्यापक) [पितो], पीव इद्भव (=प्रवृद्धिकरो रस एव भव) ॥

१०. हे ओषधे (=ओषधिरूप पितो), त्वं करम्भो भव (=दधिमिश्रसक्तुपिण्डो भव) । [त्वं] पीवः (=वर्धको रसो) [भव] । [त्वम्] उदारथिर्वृक्कः (=उद्दीपको "व्याधेर्वर्जयिता") [भव] । हे वातापे (=वातवत्सर्वव्यापक) [पितो], पीव इद् भव (=प्रवृद्धिकरो रस एव भव) ॥

वृक्को व्याधेर्वर्जयितेति सायणः ।

उदारथिरूर्ध्वंगम इन्द्रियाणामुद्दीपयितेति च सः ॥

८. आम्ही जो उदकांचा [आणि] ओषधींचा लेश भक्षितों त्याचा, हे सर्वव्यापी [ पितू ], तूं रसच हो.

९. हे सोमा, जो गोरसयुक्ताचा आणि जो तुज धान्ययुक्ताचा अंश आम्ही सेवन करितों त्याचा, हे सर्वव्यापी [पितू], तूं रसच हो.

१०. हे ओषधी, तूं पिण्ड हो. रस आणि उद्दीपक व्याधिवर्जक हो. हे सर्वव्यापी [ पितू ], तूं रसच हो.

8. What little of the waters [ and ] of the vegetables we consume, turn that into fat, O pervader!

9. What [ little ], O Soma, of thee when mixed with milk, of thee when mixed with corn, we consume, turn that into fat, O pervader!

10. O plant, be thou the barley-dish. Be thou, fat, the exciting destroyer of disease. Turn that into fat, O pervader!

---

८. 'आम्ही जें थोडें पाणी पितों अथवा थोडी भाजी खातों त्यांत पितु शिरतो आणि त्याचा तो उत्तम रस करितो.' या मंत्रावरून 'पितु' हा केवळ सोमादिक पेयाचाच अभिमानी देव नव्हे, तर शाकभाजी इत्यादिक अन्नाचाहि आहे असें होतें.

९. 'गोरसयुक्ताचा आणि धान्ययुक्ताचा '=' गवाशिरः यवाशिरः.' सोमांत दूध घालून तो थोडा ऊन करीत असत, त्याला गवाश्रित असें नांव असे. आणि त्याप्रमाणेंच त्यांत यव किंवा जव अथवा सातु या धान्याचें पीठ घालून तयार केलेले जे सोम त्यांचें नांव 'यवाशिर्' होय.

१०. 'पिण्ड'='करम्भः.' सातूचें पीठ दह्यांत कालवून त्याचा केलेला जो पिंड तो 'करम्भ.' तो सातूचा केलेला असतो म्हणून पितूला येथें 'ओषधि' असें म्हटलें आहे.

'उद्दीपक व्याधिवर्धक '=' वृक्कः उदारथिः'. हे दोनहि शब्द कठिण आहेत, आणि दुसऱ्या ठिकाणीं ऋग्वेदांत कोठें आलेले आढळत नाहींत. 'वृक्क' म्हणजे शरीरांतील कांहीं मांसभाग असावा असें कोणी म्हणतात.

**तं त्वा वयं पितो वचोभिर्गावो न हव्या सुषूदिम ।**
**देवेभ्यस्त्वा सधमादमस्मभ्यं त्वा सधमादम् ॥ ११ ॥ ७॥**

तम् । त्वा । वयम् । पितो इति । वचःऽभिः । गावः । न । हव्या । सुसूदिम ।
देवेभ्यः । त्वा । सधऽमादम् । अस्मभ्यम् । त्वा । सधऽमादम्॥११॥७

---

## भाषायाम्.

११. हे पितो, तं त्वा ( =एवं स्तुतं त्वां ) वयं वचोभिः ( =स्तुतिभिर् ) गावो न ( =गावो यथा हव्यानि दुग्धरूपाणि क्षरन्ति तथा ) हव्या सुषूदिम ( =हव्यानि क्षारयामः =हव्यरसान् त्वत्सकाशान्निष्काशयामः) । देवेभ्यः (=देवार्थं ) त्वा सधमादं ( =तेषां सह मादयितारं ) [ तथैव ] त्वा ( =त्वाम् ) अस्मभ्यं सधमादं ( =सह मादयितारं ) [ सुषूदिम =हव्यरसान् क्षारयामः ] ॥

---

## सूक्तम् १८८.

अगस्त्य ऋषिः । आप्रीसूक्तमिदम् । प्रथमायाः सुसमिद्धोऽग्निः । द्वितीयायास्तनूनपात् । तृतीयाया इड्नामकोऽग्निः । चतुर्थ्या बर्हिः । पञ्चम्या द्वारः । षष्ठ्या उषासानक्तौ । सप्तम्या दैव्यौ होतारौ । अष्टम्या भारतीळासरस्वत्यो देव्यः । नवम्यास्त्वष्टा । दशम्या यूपरूपो वनस्पतिः । एकादश्याः स्वाहा ॥ गायत्री छन्दः ॥

**समिद्धो अद्य राजसि देवो देवैः सहस्रजित् ।**
**दूतो हव्या कविर्वह ॥ १ ॥**

सम्ऽइद्धः । अद्य । राजसि । देवः । देवैः । सहस्रऽजित् ।
दूतः । हव्या । कविः । वह ॥ १ ॥

---

## भाषायाम्.

१. हे सहस्रजित् ( =सहस्रदेवैः=द्योतमानैर्ऋत्विग्भिः) समिद्धः (=सुसमिद्धः= सम्यग्दीप्तः एतन्नामको ) देवः ( =द्योतमानस् ) [ त्वमग्निः] अद्य राजसि (=अस्मिन्दिने ईशिषे )। कविर्दूतः ( =मेधावी दूतः सन् ) हव्या वह (=हव्यानि देवान्प्रति नय ) ॥

११. हे पितो, या प्रकारेंकरून तुजपासून आम्हीं, गाई हव्यें दुभतात त्याप्रमाणें, स्तोत्रांनीं हव्यें दोहिलीं आहेत. देवांकारणें हर्षकारक सोंगडा [ आणि ] आम्हांकारणें हर्षकारक सोंगडा असा जो तूं, त्या तुला [आम्हीं दोहिलें आहे].

11. Thus have we with hymns made thee, O Pitu, yield oblations even as cows [yield oblations]–thee the agreeable associate for the gods, thee the agreeable associate for us.

११. 'या प्रकारेंकरून तुला दोहून आम्हीं रस काढिले आहेत, आणि देवांला आणि आम्हांला आनंद उत्पन्न करणारा असा एक मित्र सिद्ध केला आहे.'

---

## सूक्त १८८.

ऋषि–अगस्त्य. देवता–१ समिद्ध अग्नि, २ तनूनपात् अग्नि, ३ इड् अग्नि, ४ बर्हि ( दर्भ ), ५ द्वारें, ६ उषा आणि रात्र ( दिवस आणि रात्र ), ७ दोन दिव्य होते, ८ तिघीजणी देवी ( भारती, इळा, सरस्वती ), ९ त्वष्टा, १० वनस्पति ( यूप ), ११ स्वाहा.

१. हे सहस्र जिंकणाऱ्या [ अग्नी ], तेजस्वी [ ऋत्विजां]नीं चांगला पेटविलेला तेजस्वी असा जो तूं, तो आज राजा आहेस. विद्वान् दूत असा जो तूं तो हव्यें घेऊन जा.

## HYMN 188.

To 1 *Samiddha* ( well-lighted ) *Agni*, 2 *Tanûnapât Agni*, 3 *Agni* called *Iḍ*, 4 *Barhis* ( the sacrificial *grass*.), 5 the *Doors*, 6 *Ushas* and *Night* ( the *Dawn* or *Day* and *Night* ) 7 the two *Divine Invokers*, 8 the three *Goddesses* ( *Bhâratî*, *Iḷâ* and *Saraswatî* ), 9 *Tvashṭâ*, 10 the *wooden Post*, 11 *Svâhâ*.

1. [ O Agni ], *well-kindled* by the illustrious priests thou, the illustrious conqueror of thousands, rulest to-day. Do thou, the wise messenger, carry the oblations.

**तनूनपादृतं यते मध्वा यज्ञः समंज्यते ।**
**दधत्सहस्रिणीरिषः ॥ २ ॥**

तनूऽनपात् । ऋतम् । यते । मध्वा । यज्ञः । सम् । अज्यते ।
दधत् । सहस्रिणीः । इषः ॥ २ ॥

**आजुह्वानो न ईड्यो देवाँ आ वक्षि यज्ञियान् ।**
**अग्ने सहस्रसा असि ॥ ३ ॥**

आऽजुह्वानः । नः । ईड्यः । देवान् । आ । वक्षि । यज्ञियान् ।
अग्ने । सहस्रऽसाः । असि ॥ ३ ॥

---

## भाषायाम्.

२. यज्ञः ( =यज्ञियः =यजनार्हः ) ऋतं यते ( =यज्ञं गच्छते =हविर्ददते यजमानाय यजमानार्थं ) सहस्रिणीः इषः (=सहस्रसंख्याकान्यन्नानि ) दधत् (=धारयन्=प्रयच्छन् ) तनूनपात् ( =एतन्नामकोऽग्निः ) मध्वा सम् अज्यते (=मधुरेणाज्यसोमादिद्रव्येण सम्यग्व्यक्तः क्रियते =तर्प्यते ) ॥

३. आजुह्वानः ( =आहूयमान ) ईड्यः ( =स्तुत्यः =“इड्नामकस्” ) [ त्वं ] यज्ञियान् ( =यज्ञार्हान् ) देवान् नः ( =अस्मान् प्रति ) आ वक्षि ( =आवह ) । हे अग्ने, [ त्वं ] सहस्रसाः ( =सहस्रसंख्याकानां धनानां दाता ) असि ॥

---

१. हें एक आप्रीसूक्त आहे. सू.१३ मं. १ याजवरील टीप पहा.

‘सहस्र जिंकणाऱ्या’=‘सहस्रजित्.’ हजारो शत्रूंस अथवा धनांला जिंकणारा.

‘चांगला पेटविलेला’ =‘[सु]समिद्धः’. ‘सुसमिद्ध’ हें येथें अग्नीच्या विभूतिविशेषाचें नांव. ती या मंत्राची देवता आहे. सू. १३ मं. १ आणि सू. १४१ मं. १ पहा.

‘दूत’=‘दूतः.’ सू.४४ मं.२ आणि टीप पहा.

२. यज्ञ करणाऱ्या यजमानाकारणें हजारो अन्नसंपत्ति देणारा असा जो पूज्य तनूनपात्, त्याला मधुर आहुतीनें स्निग्ध केला आहे.

३. [ आम्हीं ] बोलाविलेला असा जो स्तुत्य तूं तो पूज्य देवांला आम्हांकडे आण. हे अग्नी, तूं हजारो [संपत्ति] देणारा आहेस.

2. *Tanúnapát*, who deserves to be honoured [and] who bestows thousands of foods on the sacrificer, is anointed with the sweet oblation.

3. Invoked [ by us ] do thou the *Praiseworthy* one bring the adorable gods to us. Thou art a giver of thousands [ of riches ], O Agni!

---

२. 'तनूनपात्' याविषयीं सू. १३ मं. २ आणि टीप पहा.

'पूज्य '=' यज्ञः'. हा सायणांनीं केलेला अर्थ बरोबर आहे असें आम्हांस वाटतें. सू. १०५ मं. ४ आणि त्याजवरील भाषा पहा.

३. 'स्तुत्य '=' ईड्यः.' ही ऋचा 'इड्' नांवाच्या अग्नीविषयीं आहे असें 'ईड्य' या शब्दावरून समजावयाचें. 'ईड्य' यामधील 'ई' दीर्घ आहे तरी चिंता नाहीं. सू. १३ आणि सू. १४२ यांतील तिसरा मंत्र 'नराशंस' अग्नीविषयीं आहे. तेव्हां 'इड्' नांवाचा अग्नि आणि 'नराशंस' हे एकच समजले पाहिजेत. 'ईड्य' म्हणजे 'स्तुत्य' असा अर्थ उघड आहे, त्यापेक्षां 'नराशंस' शब्दाचा जो 'नरांनीं स्तवावयाचा' असा अर्थ करितात तो खरा आहे असें होतें.

प्राचीनं बर्हिरोजसा सहस्रवीरमस्तृणन् ।
यत्रादित्या विराजथ ॥ ४ ॥

प्राचीनम् । बर्हिः । ओजसा । सहस्रऽवीरम् । अस्तृणन् ।
यत्र । आदित्याः । विऽराजथ ॥ ४ ॥

विराट् सम्राड्विभ्वीः प्रभ्वीर्बह्वीश्च भूयसीश्च याः ।
दुरो घृतान्यक्षरन् ॥ ५ ॥ ८ ॥

विऽराट् । सम्ऽराट् । विऽभ्वीः । प्रऽभ्वीः । बह्वीः । च । भूयसीः ।
च । याः ।
दुरः । घृतानि । अक्षरन् ॥ ५ ॥ ८ ॥

सुरुक्मे हि सुपेशसाधि श्रिया विराजतः ।
उषासावेह सीदताम् ॥ ६ ॥

सुरुक्मे इति सुऽरुक्मे । हि । सुऽपेशसा । अधि । श्रिया । विऽराजतः ।
उषसौ । आ । इह । सीदताम् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

४. ओजसा (=बलेन) सहस्रवीरं (=सहस्रवीरोपेतं =सहस्रवीराणां यावद्बलं तावता बलेन युक्तं) बर्हिः (=कुशासनं) प्राचीनं (=प्रागग्रं यथा तथा) [ऋत्विजः] अस्तृणन् । यत्र [बर्हिषि] हे आदित्याः (=अदितेः पुत्राः), [=यूयं] विराजथ (=विविधं राजध्वे) ॥

५. या दुरः (=या द्वारो) विराट् (=विराजः=विशेषेण राजमानाः) सम्राट् (=सम्राजः =सम्यग्भ्राजमाना) विभ्वीः (=विभ्व्यः =विशेषेण बलेन सह वर्तमानाः) प्रभ्वीः (=प्रभ्व्यः =प्रकर्षेण बलेन वर्तमाना) बह्वीश्च (=बह्व्यश्च=अनेकाश्च) भूयसीश्च (=भूयस्यश्च=असंख्याताश्च) [भवन्ति ता] [दुरो] घृतान्यक्षरन् (=घृतवद्रसवन्तराणि मेघोदकादीनि द्रव्याणि क्षरन्ति=वर्षन्ति) ॥

६. सुरुक्मे (=शोभनदीप्ताभरणे), सुपेशसा (=सुपेशसौ=शोभनरूपे) [उषासानक्ता] श्रिया अधि विराजतः (=सौन्दर्येण अधिकं शोभेते) [ते] उषासौ (=उषासानक्ता=अहोरात्रे देव्यौ) इह आ[गम्य] सीदतां (=निषीदताम्) ॥

४. बळानें सहस्रवीर असे दर्भ पूर्वेकडे टोकें करून आंथरले आहेत; कीं ज्यांवर हे आदित्य हो, तुम्ही विराजत आहां.

4. They have spread, points eastward, the *kus'a-grass* which in power is [as though] possessed of a thousand heroes. And on it you, O sons of Aditi, are shining.

५. विशेषेंकरून राज्य करणारीं, साम्राज्य करणारीं, विभावयुक्त, प्रभावयुक्त, अनेक आणि असंख्य अशीं जीं द्वारें तीं घृतस्राव करितात.

5. The *Doors* which are illustrious, paramount, excellent, supreme, numerous and innumerable, are pouring out nourishments.

६. सुंदर अलंकार घातलेल्या आणि रूपवती अशा ज्या [ उषा आणि रात्र ] त्या सौंदर्यानें फार शोभतात. उषा आणि रात्र येऊन येथें बसोत.

6. Well-adorned and of beautiful shape the *Dawn* and the *Night* shine exceedingly with beauty. May the *Dawn* and the *Night* come and sit.

---

४. ही ऋचा कुशांविषयीं आहे. सू. १३ मं. ५ पहा.

'आदित्य' = 'आदित्याः'. म्हणजे अदितीचे पुत्र. अर्थात् सविता, इंद्र, वरुण इत्यादिक देव. 'आदित्य' या नांवाविषयीं पूर्वी पुष्कळ ठिकाणीं निर्देश आलाच आहे.

५. सू. १३ मं.६ आणि सू. १४२ मं. ६ आणि टिपा पहा.

'घृतस्राव करितात' याचा अर्थ सायण 'मेघोदकें' वर्षितात असा करितात.

६. सू. १३ मं. ७ आणि टीप पहा.

'उषा आणि रात्र'='उषासौ.' येथें उषाशब्दानें केवळ प्रभातकालाभिमानिनी देवी घ्यावयाची नाहीं, तर दिवस ( दिवसाभिमानिनी देवता ) असें सायणांस अनुसरून समजणें योग्य आहे.

प्रथमा हि सुवाचसा होतारा दैव्या कवी ।
यज्ञं नो यक्षतामिमम् ॥ ७ ॥

प्रथमा । हि । सुऽवाचसा । होतारा । दैव्या । कवी इति ।
यज्ञम् । नः । यक्षताम् । इमम् ॥ ७ ॥

भारतीळे सरस्वति या वः सर्वा उपब्रुवे ।
ता नश्चोदयत श्रिये ॥ ८ ॥

भारति । इळे । सरस्वति । याः । वः । सर्वाः । उपऽब्रुवे ।
ताः । नः । चोदयत । श्रिये ॥ ८ ॥

त्वष्टा रूपाणि हि प्रभुः पशून्विश्वान्समानजे ।
तेषां नः स्फातिमा यज ॥ ९ ॥

त्वष्टा । रूपाणि । हि । प्रऽभुः । पशून् । विश्वान् । सम्ऽआनजे ।
तेषाम् । नः । स्फातिम् । आ । यज ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

७. प्रथमा (=प्रथमौ=आद्यौ=मनुष्यहोतुः पूर्वभवौ) सुवाचसा (=सुवाचसौ=प्रियवचनौ) दैव्या (=देवानां संबन्धिनौ) कवी (=मेधाविनौ) होतारा (=होतारौ=पुरोहितौ) नः (=अस्माकम्) इमं यज्ञं यक्षतां (=यजताम्) ॥

८. हे भारति, हे इळे, हे सरस्वति, या वः सर्वा उपब्रुवे (=उपेत्य स्तौमि) तां [यूयं] नः (=अस्मान्) श्रिये चोदयत (=संपदे प्रेरयत)।

भरत आदित्यः। तस्य संबन्धिनी भारती। द्युलोकदेवता। इळा भूदेवी। सरो वाग्उदकं वा। तद्वती अन्तरिक्षदेवता इत्यभिप्रायः सायणस्य ॥

९. रूपाणि प्रभुः (=रूपाणि प्रभविता=रूपाणां शरीराणां प्रादुर्भावयिता=उत्पादयिता) त्वष्टा (=एतन्नामको देवो) विश्वान् पशून् समानजे (=सर्वान् गवादीन् पशून् व्यक्तीकरोति = करोति)। [हे त्वष्टः], तेषां [पशूनां] स्फातिं (=वृद्धिं) नः (=अस्मदर्थम्) आ यज (=आनय) ॥

त्वष्टा यज्ञसाधनपात्राभिमानी देवो रूपाणि योनौ सृष्टानि रेतांसि रूपाणि कर्तुं प्रभुर्हि। हिशब्दः श्रुत्यन्तरप्रसिद्धिद्योतनार्थः। रेतसः सिक्तस्य त्वष्टा रूपाणि विकरोतीति श्रुतेः। इति सायणः ॥

७. प्रियवचन [आणि] बुद्धिमान् असे जे दोघे दिव्य आदि होते ते ह्या आमच्या यज्ञाला संपादोत.

८. हे भारती, हे इळे, हे सरस्वती, ज्या तुम्हां सर्वांस मी स्तवितों, त्या तुम्ही सर्व आम्हांला संपत्तीप्रत न्या.

९. [सकळ] शरीरें [निर्माण करण्याला] समर्थ असा त्वष्टा सर्व पशूंला उपजवितो.– [तो तूं हे त्वष्ट्या], आम्हांकरितां त्यांची वृद्धि कर.

7. May the primeval sages, the two *Divine invokers* perform this our sacrifice.

8. O *Bhâratî*, O *Iḷa*, O *Saraswatî*, do you, all of whom I approach and praise, hasten us to wealth.

9. *Tvashṭâ* who makes the bodies has brought into existence all animals.—Do thou, [O *Tvashṭâ*], bring these fat unto us.

---

७. सू. १३ मं. ८ आणि टीप पहा. 'संपादोत'='यक्षताम्.' म्हणजे मानवी होत्यांप्रमाणें येऊन आमच्या यज्ञाची संपादणी करोत.

८. सू. १३ मं. ९ आणि टीप पहा. या मंत्रावरील भाष्यांत सायण म्हणतात कीं, भारती म्हणजे द्युलोकरूप देवता, 'इळा' म्हणजे भूलोकरूप देवता, आणि सरस्वती म्हणजे अंतरिक्षरूप देवता.

९. सू. १३ मं. १० पहा. 'त्यांची'='तेषाम्.' पशूंची.

उप त्मन्यां वनस्पते पाथो देवेभ्यः सृज ।
अग्निर्हव्यानि सिष्वदत् ॥ १० ॥
उपं । त्मन्यां । वनस्पते । पार्थः । देवेभ्यंः । सृज ।
अग्निः । हव्यानिं । सिस्वदत् ॥ १० ॥

पुरोगा अग्निर्देवानां गायत्रेण समंज्यते ।
स्वाहाकृतीषु रोचते ॥ ११ ॥ ९ ॥
पुरःऽगाः । अग्निः । देवानाम् । गायत्रेणं । सम् । अज्यते ।
स्वाहाऽकृतीषु । रोचते ॥ ११ ॥ ९ ॥

---

## भाषायाम्.

१०. हे वनस्पते (=यूपाभिमानिन् देव ), [ त्वं ] त्मन्या ( =आत्मनैव ) देवेभ्यः (=देवानामर्थे ) पाथः उंप सृज (=पशुरूपमन्नम् उत्पादय ) । [ तस्योत्पत्तेरनन्तरम् ] अग्निः हव्यानि ( =हवींषि ) सिष्वदत् ( =स्वदुयतु=स्वादूकरोतु ) ॥

११. देवानां पुरोगाः ( =पुरोगामी=मुख्यः ) अग्निः गायत्रेण सम् अज्यते (=व्यक्तीक्रियते=पूज्यते ), स्वाहाकृतीषु ( =स्वाहाकारयुक्तेषु हविर्दानेषु सत्सु ) [ स ] रोचते ( =अत्यर्थं दीप्यते ) ॥

एताः प्रयाजदेवता यज्ञावयवाभिमानिन्यः । तद्द्वारा यज्ञ एव स्तूयत इति केषांचिन्मतम् । अग्नेरेव नामान्तरमित्यन्ये । इति सायणः ॥

१०. हे वनस्पती, तूं देवांकारणें स्वतः अन्न उत्पन्न कर. अग्नि हव्यांला गोड करील.

10. Yield thou, O *Vanaspati*, of thy own accord the food for the gods. Agni shall then sweeten the offerings.

११. देवांचा पुढारी अग्नि स्तोत्रानें अलंकृत केला आहे. स्वाहाकार होतांच तो अत्यंत प्रकाशतो.

11. Agni, the foremost of the gods is honoured with a hymn. He shines when oblations are given with *Svâhâ*.

---

१०. सू. १३ मं. ११ पहा.

देवांला अर्पावयाचें जें मांसरूप अन्न तें, यूपाला बांधलेल्या पशूपासून मिळावयाचें; याकरितां ऋषि यूपालाच म्हणतो कीं, तें मांसरूपी अन्न तूं उत्पन्न कर. आणि यूपापासून हिरवें मांस मिळाल्यावर तें मग अग्नि शिजवून रुचिकर करील.

११. सू. १३ मं. १२ पहा.

हा मंत्र 'स्वाहा' हा जो उच्चारदर्शक शब्द त्याच्या अभिमानी देवतेविषयीं असल्यामुळें 'स्वाहा' हा शब्द यांत आणिला आहे. वस्तुतः पाहिलें तर यांत स्तुति अग्नीचीच आहे.

'स्वाहाकार होतांच' =' स्वाहाकृतीषु.' म्हणजे 'स्वाहा'! 'स्वाहा'! असा मोठ्यानें उच्चार करून घृतादिकांच्या आहुति अग्नीमध्यें टाकितांच.

## सूक्तम् १८९.

अगस्त्य ऋषिः । अग्निर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ।

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।**
**युयोध्य१स्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥ १ ॥**

अग्ने । नय । सुऽपथा । राये । अस्मान् । विश्वानि । देव । वयुनानि । विद्वान् ।
युयोधि । अस्मत् । जुहुराणम् । एनः । भूयिष्ठाम् । ते । नमःऽउक्तिम् । विधेम ॥ १ ॥

**अग्ने त्वं पारया नव्यो अस्मान्त्स्वस्तिभिरति दुर्गाणि विश्वा ।**
**पूश्च पृथ्वी बहुला न उर्वी भवा तोकाय तनयाय शं योः ॥ २ ॥**

अग्ने । त्वम् । पारय । नव्यः । अस्मान् । स्वस्तिऽभिः । अति । दुःऽगानि । विश्वा ।
पूः । च । पृथ्वी । बहुला । नः । उर्वी । भव । तोकाय । तनयाय । शम् । योः ॥ २ ॥

---

## भाषायाम्.

१. हे देव (=द्योतमान) अग्ने, विश्वानि वयुनानि विद्वान् (=सर्वाणि यजनकर्माणि=सर्वान् उपासनाप्रकारान् जानन्) [त्वं] सुपथा (=शोभनेन मार्गेण) अस्मान् राये नय (=स्वर्गादिधनं प्रति प्रापय)। जुहुराणम् एनः (=हिंसकं पापम्) अस्मत् युयोधि (=अस्मत्तः पृथक् कुरु=तस्मादस्मान् विमोचय)। ते (=तव) भूयिष्ठां नमउक्तिम् (=अतिप्रवृद्धां नमस्कारोक्तिं=स्तुतिं) विधेम (=परिचरेम)॥

उत्पथप्रतिपन्नो यो भ्रष्टो वापि पथः क्वचित् । पन्थानं प्रतिपद्येत कृत्वा वा कर्म गर्हितम् । अग्ने नयेति सूक्तेन प्रत्यृचं जुहुयाद् घृतम् । जपेच्च प्रयतो नित्यम् उपतिष्ठेत वानलम् । इति शौनकः ऋग्विधाने ॥

२. हे अग्ने, नव्यः (=स्तवनार्हस्) त्वम् अस्मान् स्वस्तिभिः (=शोभनैरुपायैः) विश्वा दुर्गाणि (=सर्वाणि पापानि) अति पारय (=तेषां पारं नय)। च (=अपि च) नः (=अस्मदर्थं) पृथ्वी (=पृथुतरा) बहुला (=विस्तीर्णा) उर्वी (=दीर्घा)

## सूक्त १८९.

ऋषि–अगस्त्य. देवता–अग्नि. वृत्त–त्रिष्टुभ्.

१. हे देदीप्यमान अग्नी, सकल उपासनांतें जाणणारा असा जो तूं, तो आम्हांला चांगल्या मार्गानें संपत्तीप्रत ने. नाशक पापाला आम्हांपासून दूर कर. तुझी आम्ही अत्यंत स्तुति करूं.

२. हे अग्नी, स्तुत्य असा जो तूं तो आम्हांला कल्याणकारक उपायांनीं सकळ पापांच्या पार ने. तूं आम्हांला विस्तीर्ण, मोठा आणि अफाट असा प्राकार हो. तूं आमच्या मुलांस आणि पुत्रांस कल्याण आणि सुख देणारा हो.

## HYMN 189.

To *Agni*. By *Agastya*. Metre —*Trishtubh*.

1. Knowing all modes of worship do thou, O brilliant Agni, lead us to wealth by a good road. Separate from us destructive sin. We will offer exceeding praise to thee.

2. O Agni, do thou, who deservest to be praised, take us safely across all dangers by auspicious means. Be thou to us a great, long and extensive fortress, [ and ] a source of happiness and prosperity to our children and our sons.

---

१. ' सकल उपासनांतें जाणणारा'= ' विश्वानि वयुनानि विद्वान्.' म्हणजे उपासना करण्याचे जे निरनिराळे प्रकार, ते ज्याला ठाऊक आहेत असा.

' संपत्तीप्रत '=' राये.'.

' हें सूक्त अति प्राचीन काळापासून फार प्रसिद्ध आहे. ' ऋग्विधान ' या नांवाच्या ग्रंथांत शौनक म्हणतात कीं, वाईट मार्गास लागलेला, अथवा मार्गापासून भ्रष्ट झालेला, अथवा ज्यानें निंद्य कर्में केलें असेल असा कोणी 'अग्ने नय' हें सूक्त म्हणून प्रत्येक ऋचेला तुपाची आहुति देईल, आणि नित्य नियमानें जपेल अथवा अग्नीची उपासना करील, तो पुनः मार्गाप्रत पोंहचेल.' शिवाय पहिल्या पांच ऋचा श्रावणींत म्हणतात, आणि पहिली आणि दुसरी ह्या ऋचा अष्टमीश्राद्धांत म्हणण्याची चाल आहे.

' प्राकार हो ' =' पूर्भव.' म्हणजे किल्ला हो, तट हो.

तुळाभार करितात त्यांत या मंत्राचा पाठ म्हणतात.

वृत्तासाठीं ' पुरुश्च ' असें म्हणावें.

अग्ने त्वमस्मद्युयोध्यमीवा अनग्नित्रा अभ्यमन्त कृष्टीः ।
पुनरस्मभ्यं सुवितायं देव क्षां विश्वेभिरमृतेभिर्यजत्र ॥ ३ ॥

अग्ने । त्वम् । अस्मत् । युयोधि । अमीवाः । अनग्निऽत्राः । अभि । अमन्त । कृष्टीः ।
पुनः । अस्मभ्यम् । सुवितायं । देव । क्षाम् । विश्वेभिः । अमृतेभिः । यजत्र ॥ ३ ॥

---

पूः (=प्राकारः=संरक्षणसाधनं ) भव । तोकाय तनयाय [ च ] (=अपत्येभ्यः पुत्रेभ्यश्च ) शं योः (=सुखं कल्याणं च ) [ भव ] ॥

पूश्च पृथ्वी बहुला न उर्वीत्यत्र अधा मही न आयस्यनाधृष्टो नृपीतये पूर्भवा शतभुजिः ( ऋ. ७.१५.१४) तस्य च अधाधुना हे अग्ने अनाधृष्टोऽप्रतिधर्षणीयस्त्वं नोऽस्माकं नृपीतये नृणां रक्षणार्थं मही महत्यायसा निर्मिता शतभुजिरत्यन्तं विस्तृता शतगुणा पूः पुरी । तद्रक्षासाधनभूतप्राकारादिर्वा पूरूच्यते । भव । यथायसा निर्मिता पुरी तद्रक्षासाधनभूतप्राकारादिर्वा शत्रुभ्यो भीतान्रक्षति तद्वद्राक्षसेभ्यो भीतानस्मान् पाहीत्यर्थः" । इति भाष्यमनुसंधेयम् ॥

---

## भाषायाम्.

३. हे अग्ने, त्वम् अस्मत् (=अस्मत्तः ) अमीवाः (=व्याधीन् ) युयोधि (=पृथक्कुरु ) । [ ता अमीवा ] अनग्नित्राः कृष्टीः (=अग्निनापालयिताः प्रजाः=अनग्निपालितान् जनान् ) अभिअमन्त (=अभिभवन्तु=अभिभवितुमर्हन्ति) । पुनः (=अपि तु ) हे देव (=द्योतमान) यजत्र (=यजनीय ) [ अग्ने ], विश्वेभिः (=सर्वैः ) अमृतेभिः (=अमृतैः=अमरैर्देवैः सह ) अस्मभ्यं सुविताय (=अस्मदर्थं शोभनफलाय =अस्माकं कल्याणाय ) क्षां (=भूमिं प्रति ) [ आगच्छ ] ॥

३. हे अग्नी, तूं आम्हांपासून व्याधींला काढून टाक. ज्यांचें रक्षण अग्नि करीत नाहीं त्या लोकांस [ व्याधींनीं ] पीडावें. तर आमचें कल्याण व्हावें म्हणून, हे पूजनीय [ आणि ] देदीप्यमान [ अग्नी ], तूं सकळ अमरांला घेऊन भूमीवर [ ये ].

3. Remove from us, O Agni, [all] diseases. They should distress those men who are not protected by Agni. On the contrary [come thou] to the earth with all the immortals for our welfare.

---

३. 'ज्यांचें रक्षण' इ०. म्हणजे तूं आमचें रक्षण करितोस अशी प्रसिद्धि आहे त्यापेक्षां तुझे आश्रित जे आम्ही त्या आम्हांस रोगाचा उपद्रव होऊं नये. अग्नीचे जे अनाश्रित त्यांस व्हावा.

पाहि नो अग्ने पायुभिरजस्रैरुत प्रिये सदन आ शुशुक्वान् ।
मा ते भयं जरितारं यविष्ठ नूनं विदन्मापरं सहस्वः ॥ ४ ॥

पाहि । नः । अग्ने । पायुऽभिः । अजस्रैः । उत । प्रिये । सदने ।
आ । शुशुक्वान् ।
मा । ते । भयम् । जरितारम् । यविष्ठ । नूनम् । विदत् । मा । अपरम् ।
सहस्वः ॥ ४ ॥

मा नो अग्नेऽव सृजो अघायाविष्यवे रिपवे दुच्छुनायै ।
मा दत्वते दशते मादते नो मा रीषते सहसावन्परा दाः॥५॥१०

मा । नः । अग्ने । अव । सृजः। अघाय । अविष्यवे । रिपवे । दुच्छुनायै ।
मा । दत्वते । दशते । मा । अदते । नः । मा । रिषते । सहसाऽवन् ।
परा । दाः ॥ ५ ॥ १० ॥

---

## भाषायाम्.

४. हे अग्ने, नः (=अस्मान्) अजस्रैः पायुभिः (=अविच्छिन्नैः संरक्षणप्रकारैः) पाहि (=पालय) उत (=अपि च) शुशुक्वान् (=अतिशयेन दीप्तिमान्) [सन्] प्रिये सदने (=तव प्रियभूते यागगृहे) आ[सीद=आगत्य निषीद] । हे यविष्ठ (=अतिशयेन तरुण), ते जरितारं (=स्तोतारं) भयं (=भीतिर्) नूनं मा विदत् (=अद्य मा प्राप्नोतु) [तथैव] हे सहस्वः (=सहस्वन्=बलवन्), अपरं मा [विदत्] (=अपरस्मिन् दिने श्वोपि मा प्राप्नोतु) ॥

५. हे अग्ने, नः (=अस्मान्) अघाय (=हिंसकाय) मा अव सृजः (=मा त्याक्षीः) अविष्यवे (=भक्षयितुम् इच्छते) रिपवे (=शत्रवे) दुच्छुनायै (=द्विषे) [च] [माव सृजः] । दत्वते (=दन्तवते) दशते (=खादते सर्पादये) [च] मा [परा दाः] अदते (=अदन्तकाय=शृङ्गादिभिर्घातिने) नो मा [परा दाः] [अपि च] हे सहसावन् (=सहस्विन् बलवन्नग्ने), रिषते (=हिंसकाय तस्कर राक्षसादये) मा परा दाः (=पराभूतं मा देहि=मा तेस्मान् पराभिभवन्तु) ॥

४. हे अग्नी, तूं आम्हांस अविच्छिन्न पालनांनीं संभाळ, आणि देदीप्यमान होत्साता प्रिय घरांत [बैस]. हे अत्यंत तरुण [अग्नी], तुझ्या स्तोत्याला आज भीति प्राप्त न होओ, [आणि] हे बळवान [अग्नी] उद्यांहि [ प्राप्त ] न [ होओ ].

५. हे अग्नी, तूं आम्हांला हिंसकाच्या स्वाधीन, खाऊन टाकणाऱ्याच्या स्वाधीन, शत्रूच्या स्वाधीन [ अथवा ] द्वेष्ट्याच्या स्वाधीन करूं नको. आम्हांला दांत असणाऱ्याच्या, आणि दंश करणाऱ्याच्या हातीं देऊं नको. दांत नसणाऱ्याच्या हातीं देऊं नको, हे बलवान् [ अग्नी ], नाशकाच्या हातीं देऊं नको.

4. Protect us, O Agni, with uninterrupted protections, and do thou the most brilliant one [ sit down ] in [ thy ] dear home. May terror never touch thy singer to-day, O most youthful [ Agni ], nor [ touch him ] tomorrow, O mighty one!

5. Do not, O Agni, abandon us to the noxious, to him who consumes, to the enemy, to the hater. Do not give us away to him who has teeth, to him who stings nor to him who has no teeth, nor O mighty Agni, to him who injures.

---

४. ' अविच्छिन्न पालनांनीं '=' अजस्रैः पायुभिः': म्हणजे ज्यांचा नाश कधीं कोणीहि करूं शकत नाहीं अशा रक्षणप्रकारांनीं.

' प्रिय घरांत '=' प्रिये सदने.' जेथें यज्ञ करितात त्या मंडपांत.

' अत्यंत तरुण ' =' यविष्ठ.' सू. २२ मं. १० आणि टीप पहा.

५. ' दांत नसणाऱ्याच्या हातीं '= ' अदते.' म्हणजे दांतांनीं नव्हे, तर शिंगांनीं मारणारे जे प्राणी त्यांच्या स्वाधीन.

**वि घ त्वावाँ ऋतजात यंसद्गृणानो अग्ने तन्वे३ वरूथम् ।**
**विश्वाद्रिरिक्षोरुत वा निनित्सोरभिह्रुतामसि हि देव विष्पट् ॥६॥**

वि । घ । त्वाऽवान् । ऋतऽजात । यंसत् । गृणानः । अग्ने । तन्वे ।
वरूथम् ।
विश्वात् । रिरिक्षोः । उत । वा । निनित्सोः । अभिऽह्रुताम् । असि ।
हि । देव । विष्पट् ॥ ६ ॥

**त्वं ताँ अग्न उभयान्वि विद्वान्वेषि प्रपित्वे मनुषो यजत्र ।**
**अभिपित्वे मनवे शास्यो भूर्मर्मृजेन्य उशिग्भिर्नाक्रः ॥ ७ ॥**

त्वम् । तान् । अग्ने । उभयान् । वि । विद्वान् । वेषि । प्रऽपित्वे । म-
नुषः । यजत्र ।
अभिऽपित्वे । मनवे । शास्यः । भूः । मर्मृजेन्यः । उशिक्ऽभिः । न ।
अक्रः ॥ ७ ॥

---

## भाषायाम्.

६. हे ऋतजात (=यज्ञाय जात ) अग्ने, त्वावान् (=त्वया तद्वान्=त्वद्भक्तो ) गृणानः (=स्तुतिं कुर्वन्=तव स्तोत्रं कृत्वा ) तन्वे (=आत्मने=स्वात्महितार्थं ) विश्वाद् (=सर्वस्मात् ) रिरिक्षोः ( =हिंसितुमिच्छोः ) उत वा (=अथवा ) निनित्सोः (=निन्दितुमिच्छतो ) वरूथं (=रक्षकं कवचं ) वि च यंसत् (=वियच्छेत् खलु=प्रयच्छेत् खलु=प्रयन्तुं समर्थो भवति ) । हि (=यस्मात् कारणात् ) हे देव (=द्योतमान), [ त्वम्] अभिह्रुतां ( =कुटिलं कुर्वतां द्विषां) विष्पट् असि (=विशेषेण द्रष्टा=विशेषेण बाधकोसि ) ॥

७. हे यजत्र अग्ने (=हे यजनीय अग्ने ), तान् उभयान् विद्वान् (=देवान् मनुष्यांश्चेत्युउभयजनान् जानन् ) प्रपित्वे (=प्रातःकाले ) मनुषः ( =मनुष्यान्) वि वेषि (=विविधं गच्छसि=भिन्नभिन्नमनुष्यान् प्रति गच्छसि ) । अभिपित्वे (=सायंकाले ) अक्रः (=शत्रूणामाक्रमिता ) [ त्वं ] मनवे शास्यः (=यजमानाय स्तुत्यः ) उशिग्भिः मर्मृजेन्यो न (=ऋत्विग्भिश्च परिचरणीयो ) भूः (=भवसि ) ॥

६. हे यज्ञासाठीं निर्माण झालेल्या अग्नी, तुझा भक्त तुझी स्तुति करून आपणासाठीं प्रत्येक घातेच्छू आणि निंदेच्छूपासून रक्षण करणारें कवच मिळविण्याला समर्थ होय. कारण कीं हे द्योतमान [ अग्नी ], तूं दुष्ट जनांचा संहार करणारा आहेस.

७. हे पूजनीय अग्नी, तूं [ देव आणि मनुष्य ] या दोन्ही लोकांस जाणणारा होत्साता प्रात:काळीं मनुष्यांप्रत येत असतोस. पराक्रमी तूं संध्याकाळीं ऋत्विजांनीं जसा उपास्य असतोस तसा यजमानाला स्तवनीय असतोस.

6. O Agni born for [ promoting ] sacrifice, thy servant praises [ thee ] and is able to obtain for himself protection from every evil-minded [ and every ] evil-tongued person. For thou, O brilliant [ Agni ], art the destroyer of the wicked.

7. Knowing both the races (gods and men ) thou comest, O adorable Agni, to men in the morning. In the evening thou, the victor, becomest the object of praise to the sacrificer as thou [ art ] the object of worship to the priests.

---

६. 'हे अग्नी, तुझा भक्त जो असेल त्याणें तुझी स्तुति केली म्हणजे सर्व नाशकांपासून आणि सर्व निंदकांपासून रक्षण करणारें कवच जणुं त्याणें घातल्याप्रमाणें त्याचें रक्षण होत असतें.'

वृत्तासाठीं 'तुआवान्' व 'तनुए' असें म्हणावें.

७. 'देवांस आणि मनुष्यांस जाणणारा असा जो अग्नि तो सकाळीं सर्व मनुष्यांचे घरीं येतो, आणि संध्याकाळींहि तो येतो; आणि त्याचें स्तोत्र यजमान करितो आणि ऋत्विज त्याची सेवा करितात.' असा भाषांतराचा भावार्थ. तथापि 'तान् उभयान् विद्वान्' आणि 'मर्मृजेन्यः उशिग्भिः न अक्रः' इतके शब्द कठिण आहेत.

अवोचाम निवचनान्यस्मिन्मानस्य सूनुः सहसाने अग्नौ ।
वयं सहस्रमृषिभिः सनेम विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥८॥११॥

अवोचाम । निऽवचनानि । अस्मिन् । मानस्य । सूनुः । सहसाने । अग्नौ ।
वयम् । सहस्रम् । ऋषिऽभिः । सनेम । विद्याम । इषम् । वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ८ ॥ ११ ॥

## भाषायाम्.

८. [अनेन प्रकारेण] मानस्य सूनुः (=माननामकस्योपासकस्य पुत्रः) [अहम्] अस्मिन् सहसाने (=शत्रूणामभिभवितरि) अग्नौ (=तस्यार्थे) निवचनानि (=एतानि स्तोत्राणि) अवोचाम (=प्रावादिष्म=प्रावदम्) । वयम् ऋषिभिः (=सूक्तकर्तृभिर्द्वारा) सहस्रं [धनं] सनेम (=संभजेमहि) । [वयम्] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रधनं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि)॥

---

## सूक्तम् १९०.

अगस्त्य ऋषिः । बृहस्पतिर्देवता । त्रिष्टुप् छन्दः ॥

अनर्वाणं वृषभं मन्द्रजिह्वं बृहस्पतिं वर्धया नव्यमर्कैः ।
गाथान्यः सुरुचो यस्य देवा आशृण्वन्ति नवमानस्य मर्ताः ॥१॥

अनर्वाणम् । वृषभम् । मन्द्रऽजिह्वम् । बृहस्पतिम् । वर्धय । नव्यम् । अर्कैः ।
गाथान्यः । सुऽरुचः । यस्य । देवाः । आऽशृण्वन्ति । नवमानस्य । मर्ताः ॥ १ ॥

## भाषायाम्.

१. अनर्वाणम् (=अप्रत्यृतं=केनापि प्रतिकूलेनाप्राप्तं) वृषभं (=वृषणं=नित्ययुवानं) मन्द्रजिह्वं (=मादकवचनं=मधुरवाचं) नव्यं (=स्तुत्यर्हं) बृहस्पतिं (=मन्त्रस्य पालयितारमेतन्नामकं देवम्) अर्कैर्वर्धय (=स्तोत्रैः संतोषय)। गाथान्यः (=स्तोत्रनायकस्य) सुरुचः (=शोभनदीप्तिमतो) यस्य नवमानस्य (=स्तुवानस्य=

८. [या प्रकारेंकरून] या पराक्रमी अग्नीप्रीत्यर्थ मी मानाच्या पुत्रानें स्तोत्रें म्हटलीं आहेत. आम्हांला ऋषींच्या योगेंकरून सहस्र [धनांचा] लाभ होओ. आम्हांला अन्न, बळ, [आणि] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

8. [Thus] have I the son of Mâna sung these hymns in honour of this victorious Agni. May we attain to thousand-fold [wealth] through the sages. May we obtain food, strength, [and] a son that shall quickly make us rich.

८. 'मानाच्या पुत्रानें' = 'मानस्य सूनुः.' म्हणजे मानऋषीचा वंशज जो या सूक्ताचा कर्ता त्याणें. सू.११७मं.११आणि सू.१६९मं.८ आणि त्याजवरील टीप पहा. 'ऋषीच्या योगेंकरून '=' ऋषिभिः.' म्हणजे जे ऋषि (अथवा कवि) हें सूक्त आम्हांबरोबर म्हणावयास लागले आहेत त्यांच्या योगेंकरून. 'मंत्रांच्या योगेंकरून' असा सायण अर्थ करितात त्याला प्रमाण दिसत नाहीं.

---

## सूक्त १९०.

ऋषि—अगस्त्य. देवता— बृहस्पति. वृत्त—त्रिष्टुभ्.

१. [हे होत्या], अजिंक्य, अजर, सुवचन,[आणि] स्तुत्य असा जो बृहस्पति त्याला तूं स्तोत्रांनीं संतुष्ट कर. जो स्तोत्रनायक, सुदीप्तिमान् [बृहस्पति] स्तवन करूं लागला म्हणजे देव [आणि] मर्त्य हे स्तब्ध होऊन ऐकितात.

## Hymn 190.

To *Brihaspati* (the presiding deity of Prayer). By *Agastya*. Metre—*Trishtubh.*

1. Delight with hymns Brihaspati, who is irresistible, ever young, sweet-tongued, [and] worthy of being praised; whom the gods [and] the mortals hear when he, the leader of hymns, and bright in appearance, sings the praises.

१. 'बृहस्पति' म्हणजे स्तोत्राची देवता, अथवा स्तोत्ररूपच देवता. सू. १४ मं. ३ आणि सू. १०५ मं. १७ आणि त्यावरील टीप पहा.

तमृत्विया उप वाचः सचन्ते सर्गो न यो देवयतामसर्जि ।
बृहस्पतिः स ह्यञ्जो वरांसि विभ्वाभवत्समृते मातरिश्वा ॥ २ ॥

तम् । ऋत्वियाः । उप । वाचः । सचन्ते । सर्गः । न । यः । देवऽयताम् । असर्जि ।
बृहस्पतिः । सः । हि । अञ्जः । वरांसि । विऽभ्वा । अभवत् । सम् । ऋते । मातरिश्वा ॥ २ ॥

---

स्तोत्राणि गायतो ) [ बृहस्पतेः=बृहस्पतिं =बृहस्पतेर्वचनानि ) देवा मर्ताः ( =देवाश्च मर्त्याश्च ) आशृण्वन्ति (=सादरं शृण्वन्ति ) ॥

---

## भाषायाम्.

२. तम् ऋत्वियाः ( =ऋतुसंबन्धिन्यः =कालेकाले जाता ) वाचः ( =स्तुतय ) उप सचन्ते ( =उपेत्य सेवन्ते ) । यो [ बृहस्पतिर् ] देवयतां सर्गो न असर्जि (=देवान् इच्छतां जनानां=स्तोतॄणां सार इव सृज्यते=जातोस्ति) । वरांसि अञ्जः (=? तेजांसि प्रादुर्भावयन् ) स विभ्वा (=महान् ) मातरिश्वा बृहस्पतिः ऋते (=यज्ञे ) सम् अभवत् ( =संभूतः ) ॥

यः स्तोतॄणां सारभूतोजायत यश्च वृत्रहननेन तेजांसि प्रादुर्भावयति यश्च यज्ञे मन्त्ररूपेण संभूतः स बृहस्पतिः सर्वैः कालेकाले स्तोत्रेण स्तूयत इति भावः ॥

एषा भृशमेव दुःखेन बुध्यते । तथा सायणेनापि कथंकथमपि व्याख्याता । तदेवम् । तं बृहस्पतिमृत्विया वर्षर्तुसंबन्धिन्यो वाचो माध्यमिका उप सचन्ते । समीपे सेवन्ते । यः सर्गो न । उदकस्य स्रष्टापि ॥ न शब्दोप्यर्थे ॥ देवयतां देवानिच्छतां यजमानानामसर्जि फलम् । यद्वा देवत्वमिच्छतां मनुष्याणामसर्जि सृष्टवान्वृष्ट्युदकम् । यद्वा ऋत्वियाः प्राप्तकालीना वाचो होत्रादिप्रेरिता वाच उप सचन्ते तं यः सर्गो न उदकसृष्टिरिव सः स एव बृहस्पतिरञ्जो हि । व्यञ्जकः खलु । तस्मिन्वर्षति सर्वे भवन्ति । अत एव विभ्वा विभुर्व्याप्तो मातरिश्वा वृष्टिनिर्मातर्यन्तरिक्षे चेष्टमानो वायुसदृशो वा वरांसि वरणीयानि वृष्ट्यादिफलानि संपादयन् ऋत उदके निमित्तभूते सति समभवत् । संभूता । अथवा अञ्जो यज्ञियानां व्यञ्जको मातरिश्वा फलस्य निर्मातरि यज्ञे श्वसिता वर्तमानः स बृहस्पतिर्ऋते यज्ञे निमित्तभूते सति वरांसि वरणीयानि हवींषीच्छन् विभ्वा विभुः समभवत् । इति ॥

२. त्याला नियमित वेळीं होणाऱ्या स्तुति सेवितात. जो देवभक्तांचा सार जणुं जन्मला. तो महान् मातरिश्वा बृहस्पति तेजांला प्रगट करणारा होत्साता यज्ञांत उत्पन्न झाला.

2. Upon Him wait praises offered at regular times, who was born as it were the quintessence of devout men. That vast Mâtaris'vâ Brihaspati, who manifests all the lights, was born in worship.

२. भावार्थः 'जो बृहस्पति म्हणजे केवळ स्तोते जनांचें सार होय, जो वृत्रादिकांला मारून सूर्यादिकांचीं तेजें प्रगट करितो, आणि जो मन्त्ररूपानें यज्ञांत जन्मला, त्या बृहस्पतीची सेवा स्तुतिरूप वाणी नेमलेल्या वेळीं नित्य करितात.'

'देवभक्तांचा सार जणुं जन्मला'='सर्गो न यो देवयताम् असर्जि.' म्हणजे जो स्तोत्यांचें (ऋषींचें) जीवनच जणुं, प्राणच जणुं, तत्त्वच कीं काय, असा होय. बृहस्पति ज्यापेक्षां स्तोत्ररूप देवता होय, त्यापेक्षां तो स्तोत्यांचें सार होय असें म्हणणें स्वाभाविक आहे. बृहस्पति उत्तम स्तोता अशी प्रसिद्धि आहेच.

'मातरिश्वा बृहस्पति.' मातरिश्वा हें जसें अग्नीचें विशेषण तसेंच बृहस्पति अथवा ब्रह्मणस्पति याचेंहि आहे. सू.९६ मं. ४ आणि त्याजवरील टीप पहा.

'तेजांला प्रगट करणारा'='अञ्जो वरांसि.' हे शब्द कठिण आहेत. 'अञ्ज' म्हणजे 'व्यञ्जक' अथवा प्रादुर्भाव करणारा असा जो अर्थ तो सायणानुसार केला आहे. पण त्याला दुसरें प्रमाण पाहिजे. शिवाय 'वरांसि' ही द्वितीया षष्ठ्यर्थीं घ्यावी लागते ही तरी मोठी अडचण नाहीं, तरी कांहींशी अडचण खरीच. आतां बृहस्पति तेजांला वृत्रादिकांपासून मुक्त करितो याविषयीं सू.६२ मं. ३ आणि त्याजवरील टीप पहा.

'यज्ञांत उत्पन्न झाला'='ऋते सम् अभवत्.' हें उघडच आहे, कारण यज्ञ जर नाहीं, तर मंत्र नाहीं आणि मंत्र नाहीं तर मंत्राभिमानी बृहस्पति देवहि नाहींच.

उपस्तुतिं नमस उद्यतिं च श्लोकं यंसत्सवितेव प्र बाहू ।
अस्य क्रत्वाहन्यो३ यो अस्ति मृगो न भीमो अरक्षसस्तुविष्मान् ॥ ३
उपऽस्तुतिम् । नमसः । उत्ऽयतिम् । च । श्लोकम् । यंसत् । सविताऽइव । प्र । बाहू इति ।
अस्य । क्रत्वा । अहन्यः । यः । अस्ति । मृगः । न । भीमः । अरक्षसः । तुविष्मान् ॥ ३ ॥
अस्य श्लोको दिवीयते पृथिव्यामत्यो न यंसद्यक्षभृद्विचेताः ।
मृगाणां न हेतयो यन्ति चेमा बृहस्पतेरहिमायाँ अभि द्यून् ॥४॥
अस्य । श्लोकः । दिवि । ईयते । पृथिव्याम् । अत्यः । न । यंसत् । यक्षऽभृत् । विऽचेताः ।
मृगाणाम् । न । हेतयः । यन्ति । च । इमाः । बृहस्पतेः । अहिऽमायान् । अभि । द्यून् ॥ ४ ॥

---

## भाषायाम्.

३. सवितेव बाहू (=सविता यथा स्वकीयान् किरणरूपान् बाहून् प्रयच्छति तथा) [बृहस्पतिः] उपस्तुतिं (=स्तोत्रं) नमस उद्यतिं श्लोकं च (=नमस्कारस्य उद्धरणं प्रदानं मन्त्रं च) प्र यंसत् (=प्रयच्छतु=प्रेरयतु)। अहन्यो योस्ति (=दिवससंबन्धी सूर्यरूपोश्वो योस्ति,) [सः] अरक्षसः (=भद्रस्य) अस्य [बृहस्पतेः] क्रत्वा (=क्रतुना=सामर्थ्येन) मृगो न भीमः (=सिंह इव भयानकः) सन् तुविष्मान् (=प्रबलो) [भवति] ॥

४. अस्य [बृहस्पतेः] श्लोकः (=बृहस्पतिना कृतं स्तोत्रं) दिवि पृथिव्यां (=द्यावापृथिव्योर्मध्ये) ईयते (=त्वरया गच्छति)। यक्षभृत् (=हविरादिकं दधानो) विचेताः (=विशिष्टप्रज्ञायुक्तः) [स श्लोकः] अत्यो न (=अश्व इव) यंसत् (=प्रयन्तुं प्रकर्षेण गन्तुं समर्थो भवति)। मृगाणां हेतयो न (=? मृगेषु प्रेरिता हेतयः अस्त्राणीव) इमाश्च बृहस्पतेः (=बृहस्पतेरिमाः स्तुतिरूपा हेतयोपि) अहिमायान् द्यून् अभि (=महाप्रज्ञान् द्युप्रदेशान् प्रति) यन्ति (=गच्छन्ति) ॥

सर्वस्तोतृणां सारभूतेन बृहस्पतिना कृतं स्तोत्रं तेनैव दत्तं हविरादिकं गृहीत्वा वेगवानश्व इव अथवा मृगेषु प्रेरिता व्याधादीनां हेतय इव द्युलोकस्थितान् महाप्रज्ञान् देवान्प्रति गच्छतीत्यभिप्रायः ॥

३. सविता जसा आपले बाहु [ प्रेरितो ] तसा [ बृहस्पति ] स्तुति, आणि नमस्काराची आहुति आणि स्तवन हीं प्रेरो. दिनसंबंधी जो [ अश्व ] आहे तो या कल्याणकारक [ बृहस्पती ]च्या पराक्रमेंकरून भयंकर मृगाप्रमाणें बलवान् होतो.

४. ह्याचा गीत द्युलोकीं [ आणि ] पृथिवीवर धांवतो. हवि धारण करणारा [ आणि ] अति बुद्धिमान् असा याचा गीत घोड्याप्रमाणें धांवूं शकतो. मृगांच्या अस्त्रांप्रमाणें बृहस्पतीचींहि अस्त्रें, महाप्रज्ञ द्युप्रदेशांप्रत जात असतात.

3. May he send forth the praise, the offering of obeisance and the hymn even as Savitâ [ sends forth ] his arms. By the power of this beneficent one the Diurnal [ Horse ], which is formidable like the lion, is mighty.

4. His hymn runs through heaven, through earth. Like a swift steed it can stretch, carrying oblation, and pious. Like shafts of wild beasts, these of Brihaspati run towards the celestial regions of great wisdom.

---

३. याचा भावार्थ असा दिसतो कीं, 'सूर्य जसा आपले किरण अत्यंत दूर अंतरावर एका क्षणांत पोंहचवितो, त्याप्रमाणें बृहस्पति उपासकांनीं देवांप्रीत्यर्थ केलेली स्तुति, उपासना आणि गुणवर्णना हीं देवांप्रत एकदम पाठवून देओ. त्याचा पराक्रम लहान नाहीं, तर आकाशामध्यें सूर्य जो एकाद्या महा सिंहाप्रमाणें पूर्वेकडून पश्चिमेकडे उडी मारितो तो याच्याच पराक्रमानें मारीत असतो.'

'दिनसंबंधी अश्व '=' अह्न्यः'. सू. १६८ मं. ५ आणि त्यावरील टीप पहा.

४. 'बृहस्पतीनें केलेलें देवांचें स्तोत्र त्याणें अर्पिलेलें हवि घेऊन एकाद्या वेगवान वाऱ्याप्रमाणें पृथिवी आणि स्वर्ग यांवर चढतें; तें एकाद्या व्याधानें श्वापदांवर फेकिलेल्या बाणांप्रमाणें स्वर्गीं असणाऱ्या महाप्रज्ञ देवांप्रत धांवतें.'

'मृगांच्या शस्त्रांप्रमाणें '=' मृगाणां न हेतयः'. ही षष्ठी किंचित् विलक्षण आहे, पण दुसरा चांगला निर्वाह दिसत नाहीं.

'महाप्रज्ञ '=' अहिमायान्.' 'अहिमाय' शब्द कठिण आहे. सायणांनीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा अर्थ

ये त्वा देवोस्रिकं मन्यमानाः पापा भद्रमुपजीवन्ति पज्राः ।
न दूढ्ये३ अनु ददासि वामं बृहस्पते चयस इत्पियारुम् ॥५॥१२॥

ये । त्वा । देव । उस्रिकम् । मन्यमानाः । पापाः । भद्रम् । उपऽजीवन्ति । पज्राः ।

न । दुःऽध्ये । अनु । ददासि । वामम् । बृहस्पते । चयसे । इत् । पियारुम् ॥ ५ ॥ १२ ॥

सुप्रैतुः सूयवसो न पन्था दुर्नियन्तुः परिप्रीतो न मित्रः ।
अनर्वाणो अभि ये चक्षते नोऽपीवृता अपोर्णुवन्तो अस्थुः ॥ ६ ॥

सुऽप्रैतुः । सुऽयवसः । न । पन्थाः । दुःऽनियन्तुः । परिऽप्रीतः । न । मित्रः ।

अनर्वाणः । अभि । ये । चक्षते । नः । अपिऽवृताः । अपऽऊर्णुवन्तः । अस्थुः ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

५. हे देव [ बृहस्पते ], ये पज्राः ( =बलवन्तः ) पापाः ( =पापबुद्धयः ) [पुरुषा ] भद्रं ( =कल्याणं ) त्वा ( =त्वाम् ) उस्रिकं ( =कुत्सितमनड्वाहं ) मन्यमाना उपजीवन्ति ( =प्राणन्ति=आयुर्व्ययं कुर्वन्ति ) [ तस्मै ] दुध्ये ( =तस्मै दुर्बुद्धये जनाय=तेभ्यो दुर्बुद्धिभ्यो जनेभ्यो ) न वामम् अनुददासि ( =सुखं न प्रयच्छसि ) । हे बृहस्पते, पियारुं चयसे इत् ( =हिंसकं त्वं हंस्येव ) ॥

६. [ हे बृहस्पते, त्वं ] सुप्रैतुः सूयवसो न पन्थाः [ भवसि ] ( =सुष्ठुगमनवान् सुष्ठुतृणवान्मार्ग इवासि ) [ अपि च ] दुर्नियन्तुः परिप्रीतो मित्रो न [ भवसि ] ( =दुर्निवार्यः अत्यन्तसंतुष्टः सखेवासि ) । अनर्वाणः ( =केनापि प्रतिकूलेनाप्रतिगता) ये [ ? जना ] नः अभि चक्षते (=अस्मान् आभिमुख्येन सहृदयं पश्यन्ति) [ ते ] अपीवृताः ( =शत्रुभिः स्वयम् आवृता अपि ) अपोर्णुवन्तः ( =अपगतावरणवन्तः =आवरणस्यापाकर्तारः ) [ सन्तः ] अस्थुः ( =भवन्ति ) ॥

उत्तरार्धस्य संदिग्धोर्थः । येऽनर्वाणः इत्यनेन बुभुत्सितानां दुर्ज्ञेयत्वात् ।

५. हे देवा, जे बळवान् पापी [मनुष्य] तुज कल्याणकराला निःसत्त्व मानून आयुष्य घालवितात, त्या दुष्ट [जना]चें तूं कल्याण होऊं देत नसतोस. हे बृहस्पती, तूं पापी मनुष्याला शिक्षा केल्याशिवाय राहत नाहींस.

६. [हे बृहस्पती], [तूं] सुगम्य [आणि] समृद्ध तृणमार्गाप्रमाणें [आहेस]. [तूं] अनिवार्य [आणि] परम संतुष्ट मित्राप्रमाणें [आहेस]. जे अजिंक्य [जन] आम्हांवर कृपावलोकन करितात ते आच्छादित असतांहि आच्छादन काढून टाकणारे असे उभे राहतात.

5. Those sinful [and] strong people, O god [Brihaspati], who think thee a mean bull, thee who art beneficent, and pass their lives, to such wicked men thou givest no weal. Thou certainly dost punish, O Brihaspati, the sinful man.

6. [Thou art, O Brihaspati] as a road along which it is pleasant to go and along which there is good grass; like a friend difficult to restrain [and] much pleased. Those who, irresistible, look upon us [with pleasure], stand as rescuers [though] covered all over.

---

केला आहे. आणि व्युत्पत्तिहि सांगितलेली ग्राह्य दिसत नाहीं; तरीहि आम्हीं दिलेला अर्थ त्यांच्या भावार्थास अनुसरूनच आहे.

---

५. 'निःसत्त्व'='उस्रिकम्.' अक्षरशः 'दुबळं बैल.' ज्याच्या आंगांतून बळ सर्व निघून गेलें आहे असा बैल, ज्याच्या हातून कांहीं कामें होण्यासारिखें नाहीं असा, निरुपयोगी.

६. ही ऋचा कठिण आहे. कारण प्रथमार्धांत प्रतिपादित जो विषय, तो उत्तरार्धांत प्रतिपादित असलेल्या विषयाहून भिन्न असतांहि प्रथमार्धांत क्रियापद नाहीं, व कर्ताहि नाहीं; आणि उत्तरार्धांत कर्तृपद जरी आहे, तरी तें कोणाचें दर्शक आहे हें ठाऊक नसल्यामुळें अर्थ समजण्यास कठिण आहे. आम्हीं अर्थ होईल तितका अक्षरशः केला आहे.

'आच्छादित असतांहि आच्छादन काढून टाकणारे'='अपीवृताः अपोर्णुवन्तः'. म्हणजे जरी त्यांस शत्रूंनीं वेष्टिलेलें असतें तरी आम्हांवरचें शत्रुवेष्टन काढून टाकणारे होत असा भावार्थ असेल काय?

सं यं स्तुभोऽवनयो न यन्ति समुद्रं न स्रवतो रोधचक्राः ।
स विद्वाँ उभयं चष्टे अन्तर्बृहस्पतिस्तर आपश्च गृध्रः ॥ ७ ॥

सम् । यम् । स्तुभः । अवनयः । न । यन्ति । समुद्रम् । न । स्रवतः ।
रोधऽचक्राः ।
सः । विद्वान् । उभयम् । चष्टे । अन्तः । बृहस्पतिः । तरः । आपः ।
च । गृध्रः ॥ ७ ॥

एवा महस्तुविजातस्तुविष्मान्बृहस्पतिर्वृषभो धायि देवः ।
स नः स्तुतो वीरवद्धातु गोमद्विद्यामेषं वृजनं जीरदानुम् ॥८॥१३॥

एव । महः । तुविऽजातः । तुविष्मान् । बृहस्पतिः । वृषभः । धायि ।
देवः ।
सः । नः । स्तुतः । वीरऽवत् । धातु । गोऽमत् । विद्याम । इषम् ।
वृजनम् । जीरऽदानुम् ॥ ८ ॥ १३ ॥

---

## भाषायाम्.

७. यं स्तुभः (=स्तुतयः) अवनयो न सं यन्ति (=प्रवाहा इव संगच्छन्ते) [अथवा] रोधचक्राः स्रवतो न (=रोधश्चक्रा नद्य इव =रोधांस्येव चक्राणि यासां ता नद्यो यथा समुद्रं गच्छन्ति तथा गच्छन्ति) स विद्वान् (=ज्ञानवान्) गृध्रः (=जलाकाङ्क्षी) बृहस्पतिस् तरः (=वेगम्) आपश्च [इति] उभयम् [अपि] अन्तश्चष्टे (=अन्तः पश्यति) ॥

इत्यक्षरार्थः । अभिप्रायः पुनर्दुर्बोधः ।

८. एव (=अनेन प्रकारेण) बृहस्पतिर् महः (=महान्) तुविजातः (=प्रबलस्) तुविष्मान् (=बलवान्) वृषभः (=वर्षिता=वीर्यवान्) देवो धायि (=अधायि =कृतोऽस्ति =जातोऽस्ति) । सः [अस्माभिः] स्तुतः [सन्] वीरवद् गोमद् [धनं] नो धातु (=वीर्यवद्भिः पुत्रैर्युक्तं गोभिर्युक्तं धनम् अस्मभ्यं ददातु) । [अपि च] इषम् (=अन्नं) वृजनं (=बलं) जीरदानुं (=क्षिप्रदानं) [वीरं=पुत्रं च] विद्याम (=लभेमहि) ॥

७. ज्याजप्रत प्रवाह [ वाहल्या]प्रमाणें सर्व स्तुति वाहून जातात, समुद्राप्रत तीरचक्र नद्या जशा [ वाहतात ] तशा [ वाहून जातात ], तो जलवर्षकांक्षी प्रज्ञावान् बृहस्पति वेग आणि उदकें ह्या दोहोंलाहि अंतर्यामीं पाहतो.

7. That wise Brihaspati, to whom all praises flow like streams, [ flow ] as rivers rolling on their banks flow to the sea, sees, when desirous of waters, both the force and the waters within himself.

८. या प्रकारेंकरून बृहस्पति हा मोठा प्रबळ सामर्थ्यवान् [ आणि ] वीर्यवान् देव झाला आहे. त्याची स्तुति केली आहे, तर तो आम्हांला वीर आणि गाई प्राप्त करून देओ. आम्हांला अन्न, बळ, [ आणि ] लवकर संपत्ति मिळवून देणारा पुत्र, यांची प्राप्ति होओ.

8. Thus has Brihaspati been made a great, strong, mighty, [ and ] puissant god. Being praised may he bestow upon us warriors and cows. May we obtain food, strength, [and a son] that shall quickly make [ us ] rich.

---

७. वरच्या मंत्रापेक्षां हा मंत्र कांहींसा सोपा आहे, तथापि उत्तरार्धांत 'वेग आणि उदकें या दोहोंलाहि अंतर्यामीं पाहतो' असें आहे तें दुर्बोध आहे. अक्षरार्थ भाषांतरांत दिला आहे. कदाचित्, 'बृहस्पतीला जेव्हां उदकवृष्टि व्हावी अशी इच्छा होते तेव्हां उदक कोठें आहे आणि वेगानें कसें येईल तें अंतर्यामीं समजतें ' असा भावार्थ असेल काय?

'तीरचक्र '='रोधचक्राः.' हाहि शब्द कठिण आहे. तीर अथवा तटाक हींच ज्यांचीं जणुं चाकें होत अशा नद्यारूप गाड्या असा अक्षरार्थ दिसतो. अथवा सायण म्हणतात तसा तीरांवरून जाणाऱ्या हा अर्थ असेल.

८. हा येथें या सूक्ताचा उपसंहार झाला. यांत ऋषि जो वर मागतो त्याजकडेस लक्ष्य देण्यासारिखें आहे. शूर आणि पराक्रमी पुत्र आणि गुरें ढोरें हीं मागितलीं आहेत, आणि पुढें अन्न, बळ आणि धन मिळवून देणारा पुत्र हीं मागतो. यावरून प्राचीन काळच्या आर्य लोकांत आणि सांप्रतच्या त्यांच्या वंशजांत किती फेरफार झाला आहे तो उघड दृष्टीस पडतो.

## सूक्तम् १९१.

अगस्त्य ऋषिः। अप्तृणसूर्यास्त्रयो देवताः। अनुष्टुप् छन्दः। दशम्येकादशीद्वादश्यो महापङ्क्तयः। त्रयोदशी महाबृहती ॥

अष्टकौ सप्तकः षट्को दशको नवकश्चेति महापङ्क्तिलक्षणम्। चत्वारोष्टका जागतश्चेति महाबृहत्या लक्षणम् ॥

कङ्कतः षोडशोपनिषदानुष्टुभमप्तृणसौर्यं विषशङ्कावान् अगस्त्यः प्राब्रवीत्। दशम्याद्याश्च तिस्रो महापङ्क्तयो महाबृहती चेति। उपनिषदिति रहस्यमित्यर्थः। विषशङ्कायुक्तोगस्त्यस्तत्परिहारायेदमुक्तवान्। ......... अत्र कङ्कतो नेति सूक्तं तु विषार्तः प्रयतो जपेत्। विषं न क्रमते चास्य सर्पादृष्टिविषादपि। यत्कीटलूतासु विषं दंष्ट्रिवृश्चिकतश्च यत्। मूलं च कृत्रिमं चैव जपन् सर्वमपोहति। ऋग्वि. १. २७

इति। इति सायणः ॥

**कङ्कतो न कङ्कतोऽथो सतीनकङ्कतः।**

**द्वाविति प्लुषी इति न्यदृष्टा अलिप्सत ॥ १ ॥**

कङ्कतः। न। कङ्कतः। अथो इति। सतीनऽकङ्कतः।

द्वौ। इति। प्लुषी इति। इति। नि। अदृष्टाः। अलिप्सत ॥ १ ॥

### भाषायाम्.

१. कङ्कतः (=अल्पविषः कश्चित् प्राणी.) न कङ्कतः (=तद्विपरीतः =अनल्पविषो महोरगादिः) अथो (=तथा च) सतीनकङ्कतः (=उदकचारी अल्पविषवान् कश्चिद्दुण्डुभादिः) द्वाविति प्लुषी इति (=एवं दाहकौ विषकारिद्विप्रकारौ) [तथैव] अदृष्टाः (=अदृश्यमानरूपा एतत्संज्ञकाश्च केचित्) नि अलिप्सत (=विशेषेण लिम्पन्ति =सर्वाण्यङ्गानि विषमावृणोति) ॥

## सूक्त १९१.

ऋषि– अगस्त्य. देवता–अप्तृणसूर्य. म्हणजे उदकें, तृणें आणि सूर्य. वृत्त–त्रिष्टुभ्, पण १०,११,१२ ह्या तीन ऋचा महापङ्क्ती; १३वी महाबृहती. असें संप्रदायास अनुसरून सायण ह्मणतात. परंतु १०,११,१२,१३ ह्या खेरीज करून बाकी सर्व अनुष्टुभ् होत.

१. कंकत, अकंकत आणि जलकंकत, असे दोन प्रकारचे जाळणारे विषार आणि अदृष्ट विषार यांनीं [मला] जाळून टाकिलें आहे.

## HYMN 191.

To *Aptṛiṇasûryâs* (i. e. the *Waters*, the *Plants* and the *sun* viewed in reference to snake and other poisons). By *Agastya*. Metre—*Anushṭubh*, except in 10, 11 and 12 where it is *Mahâpankti*, and in 13 where it is *Mahâbṛihatî*. This is a hymn against poison, or poisonous insects.

1. The *kankata*, the non-*kankata*, the water-*kankata*—the two kinds of burning insects—and the unseen poisonous insects are burning me.

---

१. हें सूक्त फार चमत्कारिक आहे. कथा अशी आहे कीं, अगस्त्य ऋषीला आपणास विषाराचा दंश झाला आहे असें वाटलें त्या वेळीं त्याणें हें सूक्त रचिलें. आतां वस्तुतः हें सूक्त विषारी जे सर्पादिक प्राणी त्यांविरुद्ध अथवा त्यांतून कोणी एकानें केलेल्या दंशावर म्हटलें आहे. आणि जसे सर्पदंशावर गारुड्यांनीं अथवा भगतांनीं घालावयाचे मंत्र विसंगत आणि गूढार्थक असतात त्याप्रमाणें हें सूक्त आहे.

'कंकत' म्हणजे किंचित् विषकारी एक जंतु, कदाचित् विंचू असेल. 'अकंकत' म्हणजे ज्याचें विष अल्प नव्हे, तर पुष्कळ आहे असा महासर्पादिक प्राणी. असें सायण म्हणतात.

'अदृष्ट विषार'=' अदृष्टाः.' म्हणजे जे दिसत नाहींत असे विषारी जंतु. त्यांस 'अदृष्ट' हेंच नांव आहे असें सायण म्हणतात. पुढील कितीएक मंत्रांतहि 'अदृष्ट' हें नांव आलें आहे.

शौनक म्हणून जे ऋग्विधानग्रंथाचे कर्ते ते म्हणतात कीं, ज्याला विषबाधा झाली आहे त्याणें मन लावून हें सूक्त जपावें, म्हणजे सर्पाचें अथवा दृष्टीचें, किंवा किड्यांचें किंवा कोळ्याचें, दाढा असलेल्या प्राण्याचें अथवा विंचवाचें जें विष, मग तें मूळचें असो किंवा केलेलें

अदृष्टान्हन्त्यायत्यथो हन्ति परायती ।
अथो अवघ्नती हन्त्यथो पिनष्टि पिंषती ॥ २ ॥
अदृष्टान् । हन्ति । आऽयती । अथो इति । हन्ति । पराऽयती ।
अथो इति । अवऽघ्नती । हन्ति । अथो इति । पिनष्टि । पिंषती ॥२॥
शरासः कुशरासो दर्भासः सैर्या उत ।
मौञ्जा अदृष्टा वैरिणाः सर्वे साकं न्यलिप्सत ॥ ३ ॥
शरासः । कुशरासः । दर्भासः । सैर्याः । उत ।
मौञ्जाः । अदृष्टाः । वैरिणाः । सर्वे । साकम् । नि । अलिप्सत ॥३॥

**भाषायाम्.**

२. आयती (=आगच्छन्ती) [ओषधिर्] अदृष्टान् (=एतन्नामकान् विषधरान् प्राणिनो) हन्ति (=हिनस्ति) । अथो (=अपि च) परायती (=परागच्छन्ती) [ओषधिस्] [तान्] हन्ति (=हिनस्ति) । अथो (=अपि च) अवघ्नती (=निघातेन घ्नती) [ओषधिर्] हन्ति । अथो पिंषती (=पेषणकर्त्री) [ओषधिस्] [तान्] पिनष्टि (=चूर्णीकरोति) ॥

अनेन विषघ्न्योषधिः स्तूयत इति सायणः ॥

३. शरासः (=शराः वेणुदण्डसदृशा अन्तश्छिद्रास्तृणविशेषाः) कुशरासः (=कुत्सितशरा अन्तश्छिद्राः शरसदृशास्तृणविशेषा) दर्भासः (=दर्भाः =कुशाः) सैर्याः (=तटाकादिप्रान्तोद्भवास्तृणविशेषा अश्ववाला इति प्रसिद्धा) मौञ्जाः (=मुञ्जा इति प्रसिद्धा) वैरिणाः (=वीरणप्रकाराः) [एतेषु वर्तमाना] अदृष्टाः (=पूर्वोक्तरूपा विषधराः) सर्वे साकं (=मिलित्वा युगपदेव) नि अलिप्सत (=निलिम्पन्ति स्म=सर्वाण्यङ्गानि विषेणावृण्वन्ति स्म) ॥

इति सायणाभिप्रायः ॥

असो, त्यापासून उपद्रव होणार नाही.

हें सूक्त अप्तृणसूर्य या तिघांविषयीं आहे असें अनुक्रमणिकेस अनुसरून वर सांगितलें आहे. 'अप्तृणसूर्य' म्हणजे उदक, गवत आणि सूर्य हे तिघे.

२. येणारी [ औषधी ] अदृष्ट [ विषारां]ला मारून टाकिते, आणि जाणारी [औषधी] मारून टाकिते. आणि आपटणारी [औषधी] मारून टाकिते आणि चुरडणारी [ औषधी ] चुरडते.

३. शर, कुशर, दर्भ आणि सैर्य, मुंज आणि वैरिण [यांतील] सर्व अदृष्ट विषारांनीं एकदम मला जाळून टाकिलें आहे.

2. The [drug] that comes kills the unseen [poisonous insects] and [the drug] that goes away kills. And [the drug] that strikes down kills, and the crushing [drug] crushes [them].

3. All the unseen poisonous things [in] the *s'aras,* in the *Kus'aras,* in the *darbhas* and *sairyas,* [in] the *maunjas* [and] the *bairinas* are burning [me] at the same time.

२. ज्या औषधींच्या योगानें विष उतरतें त्यांची स्तुति या ऋचेंत आहे. 'कितीएक औषधि (म्ह. वनस्पति) उगवतांना, कितीएक मावळतांनां, कितीएक खालीं विषावर अथवा विषारी प्राण्यावर आपटल्या असतां आणि कितीएक वनस्पतींनीं विषारी पदार्थ चुरडला असतां, विषाचा नाश करणाऱ्या आहेत.'

३. शर, कुशर, दर्भ, सैर्य, मुञ्ज, वैरिण इत्यादिकांमधील जे विषार ते मला एकदम जाळीत आहेत असें तात्पर्य.

'शर' म्हणजे वेळूसारिखें आंत पोकळ असलेलें एकप्रकारचें गवत. 'कुशर' म्हणजेहि त्यांतलाच एक प्रकार. 'दर्भ' प्रसिद्धच आहेत. 'सैर्य' म्हणजे तडागावर वगैरे होणारें अश्ववाल नांवाचें एक गवत. 'मुञ्ज' गवत प्रसिद्ध आहे, कारण त्याची दोरी करून उपनयनाच्या वेळीं कंबरेला बांधितों म्हणून उपनयनाला मौञ्जीबंधन अथवा मुंज असें नांव पडलें आहे. 'वैरिण' हेंहि एक तशाच प्रकारचें गवत आहे.

'शांतिसूक्त' म्हणून जें बाळंतिणीच्या आणि तिच्या मुलाच्या संरक्षणाकरितां दहा रात्री म्हणतात त्यांत या मंत्राचा पाठ म्हणतात.

आणि श्राद्धाच्या वेळींहि हा मंत्र म्हणत असतात.

नि गावो॑ गो॒ष्ठे अ॑सदन्नि मृ॒गासो॑ अविक्षत ।
नि के॒तवो॒ जना॑नां॒ न्य१॒॑दृष्टा॑ अलिप्सत ॥ ४ ॥

नि । गावः॑ । गो॒ऽस्थे । अ॒स॒द॒न् । नि । मृ॒गासः॑ । अ॒वि॒क्ष॒त ।
नि । के॒तवः॑ । जना॑नाम् । नि । अ॒दृष्टाः॑ । अ॒लि॒प्स॒त ॥ ४ ॥

ए॒त उ॒ त्ये प्रत्य॑दृश्रन्प्रदो॒षं तस्क॑रा इव ।
अदृ॑ष्टा॒ विश्व॑दृष्टाः॒ प्रति॑बुद्धा अभूतन ॥ ५ ॥ १४ ॥

ए॒ते । ऊँ॒ इति॑ । त्ये । प्रति॑ । अ॒दृ॒श्र॒न् । प्र॒ऽदो॒षम् । तस्क॑राःऽइव ।
अदृ॑ष्टाः । विश्व॑ऽदृष्टाः । प्रति॑ऽबुद्धाः । अ॒भू॒त॒न ॥ ५ ॥ १४

द्यौर्वः॑ पि॒ता पृ॑थि॒वी मा॒ता सोमो॒ भ्राताdि॑तिः॒ स्वसा॑ ।
अदृ॑ष्टा॒ विश्व॑दृष्टा॒स्तिष्ठ॑ते॒लय॑ता॒ सु कम् ॥ ६ ॥

द्यौः॑ । वः॒ । पि॒ता । पृ॒थि॒वी । मा॒ता । सोमः॑ । भ्राता॑ । अदि॑तिः । स्वसा॑ ।
अदृ॑ष्टाः । विश्व॑ऽदृष्टाः । तिष्ठ॑त । इ॒लय॑त । सु । क॒म् ॥ ६ ॥

---

## भाषायाम्.

४. गावो गोष्ठे नि असदन् (=निषीदन्ति स्म) मृगासः (=मृगाः =श्वापदा) नि अविक्षत (=निविष्टाः =स्वस्वस्थानेषूपरताः) । जनानां केतवः (=प्रज्ञानानि= बुद्धयो) नि (=नीचान्यभवन्) । [एतस्मिन् समये] अदृष्टाः (=पूर्वोक्तप्रकारा विषधरा) नि अलिप्सत (=सर्वाण्यङ्गानि विषेणावृण्वन्ति स्म) ॥

५. त्ये (=ते प्रसिद्धा विषधरास्) तस्करा इव (=चौरा इव) प्रदोषं (=रात्रौ) एते उ प्रति अदृश्रन् (=एते खलु दृश्यन्ते) हे विश्वदृष्टाः (=सर्वं दृष्टं यैस्ते) अदृष्टाः (=एतन्नामकाः पूर्वोक्ता विषधराः), [यूयं] प्रतिबुद्धा अभूतन (=जागरूका भवत) ॥

६. द्यौः (=द्युदेवो) वः पिता (=युष्माकं पिता भवति) । पृथिवी [युष्माकं] माता । सोमः (=? द्युलोको) [युष्माकं] भ्राता [भवति] । अदितिः स्वसा [भवति] । हे विश्वदृष्टाः (=सर्वस्य द्रष्टारः) अदृष्टाः (=एतन्नामकाः पूर्वोक्ता विषधराः), तिष्ठत इलयत सु कं (=स्वस्वस्थानेषु तिष्ठत सुखं गच्छत च =मां प्रति मा गच्छत) ॥

४. गाई गोठ्यांत बसल्या आहेत, सावजें [ आपापल्या ठिकाणांत ] शिरून निजलीं आहेत. लोकांच्या बुद्धि पडून [स्तब्ध झाल्या आहेत ]. अदृष्ट [विषारांनीं] [ मला ] जाळून टाकिलें आहे.

५. हे ते रात्रीं चोर जसे तसे दृष्टीस पडत आहेत. हे सर्वांस पाहणारे अदृष्ट [विषार] हो, तुम्ही जागे राहा.

६. द्यू तुमचा पिता, पृथिवी तुमची माता, सोम भ्राता [आणि] अदिति [ तुमची ] बहीण होय. हे सर्वांला पाहणारे अदृष्ट [ विषार] हो, तुम्ही यथेच्छ राहा अथवा जा.

4. Down are the cows sitting in the cow-fold, down have the beasts entered [ into their cairns ]. Down [ are ] the intellects of people. And down are the unseen [ poisonous things ] burning [ me ].

5. Here are seen they like thieves at night. O all-seeing unseen [ poisonous insects ], be ye watchful!

6. Dyaus [ is ] your father, the Earth [ your ] mother. Soma [ is your ] brother, Aditi [ your ] sister. O unseen [poisonous insects ] that see all, stay you [ where you are ], go you with ease.

---

४. 'जेव्हां गाई रात्रीं आपल्या गोठ्यांत शांत बसल्या आहेत, जेव्हां सर्व जनावरें आपआपल्या जागेंत पडून राहिलीं आहेत, आणि जेव्हां मनुष्यांचीं इंद्रियें गाढ निद्रेंत विलीन झालीं आहेत, तेव्हां पूर्वी सांगितलेले विषार जाळून टाकितात.'

५. आपल्यापुढें रात्रीच्या वेळीं विषार पाहतो आहे असें कल्पून ऋषि म्हणत आहे की, 'दिवसा लपून राहून रात्रीचे जसे चोर बाहेर पडतात तसे हे पहा विषार दृष्टीस पडत आहेत. हे विषार हो, तुम्ही चोरांसारिखे जागे राहतां.'

'विश्वदृष्ट' = 'विश्वदृष्टाः'. म्हणजे सर्वांला पाहणारे असे.

६. 'सायणांच्या म्हणण्याप्रमाणें या मंत्रापासून पुढें विषाची चिकित्सा आहे. म्हणजे विष जाण्यासाठीं या मंत्रांचा उपयोग औषधाप्रमाणेंच करावयाचा. अदृष्ट जे विषार पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक यांमध्यें उत्पन्न झालेले असतील, ते आपआपल्या जागीं राहोत मजवर न येओत,' असा भावार्थ.

